# विक्रीस तयार.

## मराठी पुस्तकमाला.

**१. श्री नामदेवाच्या व त्यांच्या सर्व कुटुंबांतील मनुष्यांच्या आणि त्यांच्या समकालीन साधूंच्या अभंगांची गाथा**—हिजमध्यें सुमारें ३५०० अभंग आहेत. आरंभीं श्रीनामदेवबावांचें संक्षिप्त चरित्र आणि संतजनांनीं केलेलीं स्तुतीपर वचनें दिलीं आहेत; व शेवटीं अनुक्रमणिकाही छापली आहे. या सर्व अभंगांचे भक्तिज्ञानादि विषयांप्रमाणें प्रकरणें पाडलीं आहेत. ग्रंथाचा कागद चांगला मोहरेदार व चिंवट असून अक्षर फार सुंदर व स्पष्ट वापरलें आहे. सध्यां नामदेवाची गाथा पुणें मुक्कामीं छापिली आहे तिजबरोबर आह्मीं छापलेली गाथा ताडून पाहतां अक्षर, कागद आणि अभंगसंख्येमध्यें आमची गाथा त्या गाथेपेक्षां सर्वप्रकारें उत्तम आणि ग्राह्य असेंच दिसून येईल. असें असतांही आम्हीं या गाथेची किंमत रु. ४ च ठेविली आहे, बाहेरगांवचे लोकांस टपाल हांसील रु. ।।० जास्त पडेल.

**२. तुकारामबावाच्या अभंगांची गाथा**—या गाथेंत सुमारें ९००० वर अभंग छापले आहेत. त्याशिवाय साधुसंतांनीं केलेलीं तुकारामबावाचीं स्तोत्रें व चरित्रें जीं या ग्रंथाच्या आरंभीं छापलीं आहेत तीं गणतींत धरलीं तर एकंदर १०,००० वर हा ग्रंथ होईल. या गाथेचे दोन भाग केले आहेत. त्यांमध्यें भक्ति-ज्ञानवैराग्यादि प्रकरणांप्रमाणें अभंगांची योजना केली आहे. ग्रंथाच्या शेवटीं वर्णा-नुक्रमही दिला आहे. या दोन भागांची किंमत रु. ४–८, व ट. ह. रु. १ पडेल.

**३. तुकारामबावाच्या शिष्यांच्या अभंगांची गाथा**—तुकारामबावाचे बंधु कान्होबा, मुलगी भागूबाई आणि शिष्य निळोबा यांचे संपूर्ण अभंगांची गाथा भक्ति–ज्ञान–वैराग्यादि प्रकरणें पाडून छापिली आहे. किंमत ग्राहकांस स्वल्प पडावी म्हणून रु. १।।।. ठेविली आहे.

४. **श्रीवामनपंडितकृत समश्लोकी भगवद्गीता**—प्रत्येक अध्यायाचे आरंभीं व शेवटीं त्यांनीं गीतार्णवसुधा (गीतारहस्य) नामें केलेलें प्रकरण जोडिलें आहे. अशी सर्वोत्कृष्ट आणि संपूर्ण वामनपंडितकृत समश्लोकी गीता मूळसहित पूर्वीं कधींच छापिली नव्हती. रेशमी बांधलेली किंमत १० आणे, आणि साधे पुठ्याची किंमत ६ आणे.

☞ वर दाखविलेलीं सर्व पुस्तकें मुंबई येथें एस्प्लनेड रोड कोटांत ६५ नंबरच्या घरीं आमच्या येथें विकत मिळतील. व बेळगांवीं **रा. रा. आबाजी रामचंद्र सांवत**, 'श्री रामतत्त्व' छापखान्याचे मलक यांजकडे आणि कोल्हापुरीं **रा. रा. रामचंद्र चिंतामण भागवत** बुकसेलर यांच्या दुकानीं मिळतील.

**तुकाराम तात्या.**

सच्चरित्र तुकारामाच्या

# अभंगांची गाथा.

ही

**तुकाराम तात्या**

यांनीं

तत्त्वविवेचकग्रंथप्रसारक मंडळीसाठीं




मुंबईंत,

" तत्त्वविवेचक " छापखान्यांत छापून प्रसिद्ध केली.

इसवी सन १८९६.



किंमत १॥ रुपया.

अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक.



घ.



च.

### न.

7578

अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक.



## ष.



## स.

अभंगाचा अंक.

॥ श्री ॥

# ॥ तुकारामाचे अभंग ॥

## मंगलाचरण.

॥ १ ॥ सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥ धृ० ॥ तुळसीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर तेंचि रूप ॥ १ ॥ मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ३ ॥

॥ २ ॥ समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरि वृत्ति राहो ॥ धृ० ॥ आणीक नलगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ॥ १ ॥ ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें दुश्चित्त झणी जडों देसी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें कळलें आह्मां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥ ३ ॥

॥ ३ ॥ सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पति सोयरिया ॥ धृ० ॥ गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ १ ॥ विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं न मागे आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥ ३ ॥

॥ ४ ॥ राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥ धृ० ॥ कस्तुरीमळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ १ ॥ मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळही ॥ २ ॥ कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयानो ॥ ३ ॥ सकळही तुह्मी व्हा गे एकीसवा । तुका ह्मणे जीवा धीर नाहीं ॥ ४ ॥

॥ ५ ॥ कर कटावरी तुळसीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावीं हरी ॥ धृ० ॥ ठाकले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरि दावीं डोळां ॥ १ ॥ कटीं पीतांबर कास मिरवली । दाखवीं वहिली ऐसी मूर्ती ॥ २ ॥ गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तेंचि रूप ॥ ३ ॥ [illegible] पांजरा होऊं पाहे आतां । येईं पंढरिनाथा भेटावया ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी पुरवावी आस । विनंति उदास करूं नये ॥ ५ ॥

॥ ६ ॥ गरुडाचे वारिकें कासे पीतांबर । सांवळें मनोहर कैं देखेन ॥ धृ० ॥ बरवा बरवंटा घनमेघ सांवळा । वैजयंती माळा गळां शोभे ॥ १ ॥ मुगुट माथां कोटि सूर्यांचा झळाळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ॥ २ ॥ ओतीव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ॥ ३ ॥ उद्धव अक्रूर उभे दोहींकडे । वर्णिती पवाडे सनका-दिक ॥ ४ ॥ तुका ह्मणे नव्हे आणिकांसारिखा । तोचि माझा सखा पांडुरंग ॥ ५ ॥

# विराण्या.

॥ ७ ॥ वाळो जन मज ह्मणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥ सांडूनि लौकिक जालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥ नाइकें वचन बोलतां या लोकां । ह्मणे जालों तुका हरिरता ॥ ३ ॥

॥ ८ ॥ आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । ह्मणोनि व्यभिचारा टेकलियें ॥ १ ॥ रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण त्यानिराळी न गमे घडी ॥ २ ॥ नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रातलें अनंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ९ ॥ हाचि नेम आतां न फिरें माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥ घर-रिघी जालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥ बळियाचा अंगसंग जाला आतां । नाहीं भय चिंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १० ॥ नाहीं काम माझें काज तुह्मांसवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥ १ ॥ व्यभिचार माझा पडिला ठाउका । न सर ती लोकांमाजी जालें ॥ २ ॥ न धरावा लोभ कांहीं मजविशीं । जालें देवपिशी तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ११ ॥ विसरलें कुळ आपुला आचार । पति भावे दीर घर सोय ॥ १ ॥ सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माझें ॥ २ ॥ मज आतां कोणी आळ-वान झणी । तुका ह्मणे कांनीं बहिरी जालें ॥ ३ ॥

॥ १२ ॥ न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ १ ॥ सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥ २ ॥ आळ आला होता आह्मीं भांडखोरी । तुका ह्मणे खरी केली मात ॥ ३ ॥

॥ १३ ॥ दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंता पासूनिया ॥ १ ॥ बळियाच्या आह्मी जालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जिवाच्या उदारा । जालों प्रीतिकरा गोविंदासी ॥ ३ ॥

॥ १४ ॥ क्षणभरी आह्मीं सोसिलें वाईट । सानिलें अवीट निजसुख ॥ १ ॥ सांडी मागें केल्या भरोवरी । अधिकचि परी दुःखाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे [illegible] नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ ३ ॥

॥ १५ ॥ आह्मां आह्मी आतां वडील धाकुटीं । नाहीं पोटीं पाठीं कोण [illegible] फावला एकांत एकविध भाव । हरि आह्मांसवें सर्व भोगी ॥ २ ॥ तुका [illegible] एके ठायीं । असों जेथें नाहीं दुजें कोणी ॥ ३ ॥

॥ १६ ॥ सर्व सुख आह्मी भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश [illegible] साठीं सांडियेले भरतार । रातलों या परपुरूषाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अ[illegible] धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

॥ १७ ॥ एका जिवें आतां जिणें जाले दोहीं । वेगळीक कांहीं नव्हें अ[illegible] नारायणा आह्मां नाहीं वेगळीक । पुरविली हे भाक सांभाळिली ॥ २ ॥ तुक[illegible] सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ ३ ॥

॥ १८ ॥ हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥ १ ॥ सेवासुखें करूं विनोदवचन । आह्मी नारायण एकाएकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी झालों उदासीन । आपुल्या आधीन केला पति ॥ ३ ॥

॥ १९ ॥ मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयानो ॥ १ ॥ न साहवे तुह्मां या जनाची कूट । बोलती वाईट ओखटें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आह्मी ॥ ३ ॥

॥ २० ॥ शिकविलें तुह्मीं तें राहें तोंवरी । मज आणि हरि वियोग तों ॥ १ ॥ प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ ३ ॥

॥ २१ ॥ सांगतों तें तुह्मी अइकावें कानीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ १ ॥ जोंवरी या तुह्मां मागिलांची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥ २ ॥ तुका ह्मणे काय वांयांविण धिद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ ३ ॥

॥ २२ ॥ आजिवरी तुह्मां आह्मां नेणपण । कौतुकें खेळणें संग होता ॥ १ ॥ आतां अनावर जालें अगुणाची । करूं नये तेंचि करीं सुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बुडविलीं दोन्ही । कुळें एक मनीं नारायण ॥ ३ ॥

॥ २३ ॥ सासुरियां वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावेंची ॥ १ ॥ सांडवर कोणी न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥ २ ॥ न व्हावी ते जाली आमची भंडाई । तुका ह्मणे काई लाजों आतां ॥ ३ ॥

॥ २४ ॥ मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ १ ॥ आतां तुह्मी पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वांयांविण ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी भयाभीत नारी । कैसी संग सरी तुह्मां आह्मां ॥ ३ ॥

॥ २५ ॥ परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ १ ॥ संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनि मागुतें पाहूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपासोई ॥ ३ ॥

॥ २६ ॥ अइकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडा या सोई भ्रताराची ॥ १ ॥ नव्हे आराणुक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥ ३ ॥

आहांच वाहांच आंत वरी दोन्ही । न लगा गडणी आह्मां तैशा ॥ १ ॥ तेथें भेडसावूं कोणा । आवरूनि मना बंद द्यावा ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं वांचुनी । नव्हे हे करणी भलतीची ॥ ३ ॥

॥ बहुतांच्या आह्मी न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥ १ ॥ रितां वांयां जाय काळ । लटिकें तें मूळ फजितीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी ा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥ ३ ॥

त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा । कठीण हें जिवा तोंचिवरी ॥ १ ॥

मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा । अंतर हें संगा नेदी पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वविशीं हा संपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसें ॥ ३ ॥

॥ ३० ॥ न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ १ ॥ मानेल त्या तुह्मी आइका स्वभावें । मी तों माझ्याभावें अनुसरलें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं फिरावें बहुती । माझी तों हे गती जाली आतां ॥ ३ ॥

॥ ३१ ॥ न बोलतां तुह्मां कळों न ये गुज । ह्मणउनी लाज सांडियेली ॥ १ ॥ आतां तुह्मां पुढें जोडीतसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी बैसलों शेजारीं । करील तें हरी पाहों आतां ॥ ३ ॥

## भाव.

॥ ३२ ॥ नये जरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥ ध्रु० ॥ नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल । येईल तैसा बोल रामकृष्ण ॥ १ ॥ देवापाशीं मागें आवडीची भक्ति । विश्वासेंशीं प्रीति भावबळें ॥ २ ॥ तुका ह्मणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिस ॥ ३ ॥

॥ ३३ ॥ सावध जालों सावध जालों । हरिच्या आलों जागरणा ॥ ध्रु० ॥ तेथें वैष्णवांचे भार । जयजयकार गर्जतसे ॥ १ ॥ पळोनियां गेली झोप । होतें पाप आड तें ॥ २ ॥ तुका ह्मणे तया ठाया । ओल छाया कृपेची ॥ ३ ॥

॥ ३४ ॥ आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ॥ धृ० ॥ कुळीं कन्यापुत्र होतीं जो सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥ १ ॥ गाती भागवत करिती श्रवण । आणीक चिंतन विठोबाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या देवा पार नाहीं ॥ ३ ॥

॥ ३५ ॥ अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ धृ० ॥ देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ १ ॥ आपुल्या वैभवें । शृंगारावें निर्मळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जेवी सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥ ३ ॥

॥ ३६ ॥ सुखें वोळंब दावी गोहा । माझें दुःख नेणा पाहा ॥ धृ० ॥ आवडीचा मारिला वेडा । होय होय कैसा ह्मणे भिडा ॥ १ ॥ निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तीन ॥ २ ॥ गेले वारीं तुह्मीं आणिली साकर । सातही गेली साडेदहा शेर ॥ ३ ॥ अखंड मज पोटाची व्यथा । दूधभात साकर तूप पथ्या ॥ ४ ॥ दों पाहरा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपती ॥ ५ ॥ नीज नये घाली फुलें । जवळीं न साहती मुलें ॥ ६ ॥ अंगा चंदन लाविते भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ७ ॥ हाड गळोनि आले मास । माझें दुःख तुह्मां नेणवे कैसें ॥ ८ ॥ तुका ह्मणे जिता गाढव केला । मेलियावरी नरका नेला ॥ ९ ॥

॥ ३७ ॥ पावलें पावलें तुझें आह्मां सर्व । दुजा नका भाव होऊं देऊं ॥ ध्रु० ॥ जेथें तेथें देखें तुझीच पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥ १ ॥ भेदाभेदमतें भ्रमाचे संवाद ।

आह्मां नको वाद त्यांशीं देऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे अणु तुजवीण नाहीं । नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥ ३ ॥

॥ ३८ ॥ वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्वकर्मा होळी करुनी सांडूं ॥ धृ० ॥ अमुप हे गांठी बांधूं भांडवल । अनाथा विठ्ठल आह्मां जोगा ॥ १ ॥ अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥ २ ॥ जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥ ३ ॥ गेले पुढें त्यांच्या शोधित मारग । चला जाऊं माग घेत आह्मी ॥ ४ ॥ तुका ह्मणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाश्रिया ॥ ५ ॥

॥ ३९ ॥ जेविले ते संत मागें उष्टावळी । अवघ्या पत्रावळी करुनी झाडा ॥ धृ० ॥ सोवळ्या ओंवळ्या राहिलों निराळा । पासूनि सकळां अवघ्यां दुरी ॥ १ ॥ पुढें पत्रें मज न लगे सांगावें । हें तों देवें बरें शिकविलें ॥ २ ॥ उसन्यानें आह्मी नाहीं आतळत । जाणोनि संकेत उभा असें ॥ ३ ॥ येथें कोणी कांहीं न धरावी शंका । मज चाड एका भोजनाची ॥ ४ ॥ लांचावला तुका मारितसे झड । पुरविलें कोड नारायणें ॥ ५ ॥

॥ ४० ॥ देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥ धृ० ॥ ब्रह्मादिकांसि हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ १ ॥ अवघियां पुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ २ ॥ इच्छादानीं येथें वळला समर्थ । अवघेंचि आर्त पुरवितो ॥ ३ ॥ सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुरती वाटे कवळी ब्याचें ऐसें ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाक लक्ष्मीच्या हातें । कामारी सांगातें निरुपम ॥ ५ ॥

॥ ४१ ॥ अवगुणांचें हातीं । आहे अवघी फजीती ॥ धृ० ॥ नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिकें गोड ॥ १ ॥ विष तांब्या वाटी । भरली लावूं नये होटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । शुद्ध बरा सोंग वाव ॥ ३ ॥

॥ ४२ ॥ हरीच्या जागरणा । जातां कां रे नये मना ॥ धृ० ॥ कोठें पाहासील तुटी । आयुष्य वेचे फुकासाटीं ॥ १ ॥ ज्यांनीं तुज गुंती । ते तों मोकलिती अंतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा । लाभ काय तो विचारा ॥ ३ ॥

॥ ४३ ॥ धर्माची तूं मूर्ती । पाप पुण्य तुझे हातीं ॥ धृ० ॥ मज सोडवीं दातारा । कर्मापासूनी दुस्तरा ॥ १ ॥ करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥ २ ॥ जिवींच्या जीवना । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

॥ ४४ ॥ ब्रह्मादिक जया लाभासि ठेंगणे । बळियें आह्मी भले शरणागत ॥ धृ० ॥ कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । जाला पद्मनाभ सेवाॠणी ॥ १ ॥ कामधेनूचिया क्षीरा पार नाहीं । इच्छेचिये वाहीं वरुषावें ॥ २ ॥ बैसलिये ठायीं लागलें भरतें । त्रिपुटीवरतें भेदी ऐसें ॥ ३ ॥ हरि नाहीं आह्मा विष्णुदासां जगीं । नारायण अंगीं विसा- ॥ तुका ह्मणे बहु लाटे हें भोजन । नाहीं रिता कोण राहत राहीं ॥ ५ ॥

॥ ४५ ॥ तुजें खंडे तरी । उरला तो अवघा हरि ॥ आपणाबाहेरी । न लगे ठाव ०॥ इतुलें जाणावया जाणा । कोठें तरी मनें मना ॥ पारधीच्या खुणा- साधावें ॥ १ ॥ देह आधीं काय खरा । देहसंबंधपसारा ॥ बजगायणें गोरा ॥

रक्षणसें भासतें ॥ २ ॥ तुका करी जागा । नको वासवूं वाउगा ॥ आहेसि तूं भागा । अंगीं डोळे उघडी ॥ ३ ॥

॥ ४६ ॥ विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ॥ धृ० ॥ अइका जी तुह्मी फक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ १ ॥ कोणाहीं जिवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ३ ॥

॥ ४७ ॥ आह्मी तरी आस । जालों टाकोनि उदास ॥ धृ० ॥ आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥ १ ॥ भलतें ठायीं पडों । देह तुरंगीं हा चढो ॥ २ ॥ तुमचें तुह्मांपासीं । आह्मी आहों जैसीं तैसीं ॥ ३ ॥ गेले मानापमान । सुखदुःखाचें खंडन ॥ ४ ॥ तुका ह्मणे चित्तीं । नाहीं वागवीत खंती ॥ ५ ॥

॥ ४८ ॥ निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ धृ० ॥ मज हेंही नाहीं तेंही नाहीं । वेगळा दोहीं पासुनी ॥ १ ॥ देहभोग भोगें घडे । जें जें जोडे तें तें बरें ॥ २ ॥ अवघें पावे नारायणीं ॥ जनार्दनीं तुक्याचें ॥ ३ ॥

॥ ४९ ॥ जन विजन जालें आह्मां । विठ्ठलनामाप्रमाणें ॥ धृ० ॥ पाहें तिकडे बापमाय । विठ्ठल आहे रखुमाई ॥ १ ॥ वन पट्टण एकभाव । अवघा ठाव सरता जाला ॥ २ ॥ आठव नाहीं सुखदुःखा । नाचे तुका कौतुकें ॥ ३ ॥

॥ ५० ॥ हिरा ठेवितां ऐरणी । वांचे मारितां जो घणीं ॥ धृ० ॥ तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा ॥ १ ॥ मोहरा होय तोचि अंगें । सूत न जळे ज्याचे संगें ॥ २ ॥ तुका ह्मणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥ ३ ॥

॥ ५१ ॥ आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ धृ० ॥ ऐसा संतांचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ १ ॥ तीर्थे पर्वकाळ । अवघीं पायांपें सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ३ ॥

॥ ५२ ॥ माझिया मीपणा । जाला यावरी उगाणा ॥ धृ० ॥ भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसविलें अंग ॥ १ ॥ दाविलें निमित्त । फार थोडें घात हित ॥ २ ॥ यावे कामावरी । तुका ह्मणे नाहीं उरी ॥ ३ ॥

॥ ५३ ॥ सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार आशा समूळ ॥ निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥ धृ० ॥ मोक्षाचें तीर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघीं जनें ॥ तीर्थांसी तीर्थ जाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शनें ॥ १ ॥ मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळा भूषणांसी ॥ हरिच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥ २ ॥ तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची ॥ तुका ह्मणे तो परिसाहुनि आगळा । काय महिमा वर्णू त्याची ॥ ३ ॥

॥ ५४ ॥ आहे तें सकळ कृष्णाचि अर्पण । न कळतां मन दुजें भावी ॥ धृ० ॥ ह्मणउनी पाठी लागतील भूतें । येती गवसीत पांचजणें ॥ १ ॥ ज्याचें त्या वेचलें आठव

न होतां । दंड या निमित्ताकारणें हा ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें चेंपियेला गळा । मी मी वेळोवेळा करीतसे ॥ ३ ॥

॥ ५५ ॥ महारासि सिवे । कोपें ब्राह्मण तो नव्हे ॥ धृ० ॥ तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥ १ ॥ नातळे चांडाळ । त्याचा अंतरी विटाळ ॥ २ ॥ ज्याचा संग चित्तीं । तुका ह्मणे तो त्या याती ॥ ३ ॥

॥ ५६ ॥ तेलनीशीं रुसला वेडा । रागें कोरडें खातो भिडा ॥ धृ० ॥ आपुलें हित आपण पाही । संकोच तो न धरी कांहीं ॥ १ ॥ नावडे लोकां टाकिला गोहो । बोडिलें डोकें सांडिला मोहो ॥ २ ॥ शेजारणीच्या गेली रागें । कुतऱ्यांनीं घर भरिलें मागें ॥ ३ ॥ पिसारागें भाजिलें घर । नागविलें तें नेणें फार ॥ ४ ॥ तुका ह्मणे यांच्या रागें । फेडिलें सावलें देखिलें जगें ॥ ५ ॥

॥ ५७ ॥ मज दास करी त्यांचा । संतदासांच्या दासांचा ॥ धृ० ॥ मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥ १ ॥ नीचवृत्तिकाम । परी मुखीं तुझें नाम ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवे । माझे संकल्प वेचावे ॥ ३ ॥

॥ ५८ ॥ सदा तळमळ । चित्ताचिये हळहळ ॥ धृ० ॥ त्याचें दर्शन न व्हावें । शब्द असतां तो जिवे ॥ १ ॥ कुशब्दाची घाणी । अमंगळविली वाणी ॥ २ ॥ नेणे शब्द पर । तुका ह्मणे उपकार ॥ ३ ॥

॥ ५९ ॥ जया नाहीं नेम एकादशीव्रत । जाणावें तें प्रेत शव लोकीं ॥ धृ०॥ त्याचें वय नित्य काळ लेखीताहे । रागें दात खाय करकरा ॥ १ ॥ जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन । नाहीं तें स्मशान गृह जाणां ॥ २ ॥ जयेकुळीं नाहीं एक ही वैष्णव । त्याचा बुडे भवनदीतापा ॥ ३ ॥ विठोबाचें नाम नुचारी जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड रजकाचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्याचे काष्ठ हातपाय । कीर्तना नव जया हरिचिया ॥ ५ ॥

॥ ६० ॥ अह्मी सदैव सुडके । जवळीं येतां चोर धाके ॥ जाऊं पुढी भिकें । कुतरीं घर राखती ॥ धृ० ॥ नांदणूक ऐसी सांगा । नाहीं तरी वांयां भागा ॥ थोरपण अंगा । तरी ऐसें आणावें ॥ १ ॥ अक्षय साचार । केलें सायासांनीं घर ॥ एरंडासिवार । दुजा भार न साहती ॥ २ ॥ धन कण घरोघरीं । पोट भरे भिकेवरी ॥ जतन तीं करी । कोण गुरें वासरें ॥ ३ ॥ जाली सकळ निश्चिती । भांडवल शेण माती ॥ झळझळीत भिंती । वृंदावनें तुळसीचीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवा । अवघा निरविला हेवा ॥ कुटुंबाची सेवा । तोचि करी आमुच्या ॥ ५ ॥

॥ ६१ ॥ पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेचे ॥ धृ० ॥ न करितां परनिंदा परद्रव्य अभिलाष । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ १ ॥ बैसलिये ठायीं ह्मणतां रामराम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥ २ ॥ संताचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ३ ॥ खरें बोलातां कोण लागती सायास ॥ काय वेचे यास ऐसें सांगा ॥ ४ ॥ तुका ह्मणे देव जोडे याचसाठीं । आणीक ते आटी न लगे कांहीं ॥ ५ ॥

॥ ६२ ॥ शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ धृ० ॥ मुखीं अमृताची वाणी । देह वचावा कारणीं ॥ १ ॥ सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ३ ॥

॥ ६३ ॥ चित्त समाधानें । तरी विष वाटे सोनें ॥ धृ० ॥ बहू खोटा अतिशय । जाणां भले सांगों काय ॥ १ ॥ मनाच्या तळमळें । चंदनेंही अंग पोळे ॥ २ ॥ तुका ह्मणे तुजा । उपचार पीडा पूजा ॥ ३ ॥

॥ ६४ ॥ परिमळ ह्मणू चोळूं नये फूल । खाऊं नये मूल आवडतें ॥ १ ॥ मोतिंयाचें पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥ कर्मफळ ह्मणुनी इच्छूं नये काम । तुका ह्मणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

॥ ६५ ॥ माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया । अंग आणि छाया तया परी ॥ धृ० ॥ तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणांतळीं हारपते ॥ १ ॥ दुजें नाहीं तेथें बळ कोणासाटीं । आणीक ते आटी विचाराची ॥ २ ॥ तुका ह्मणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैसीं तैसीं ॥ ३ ॥

॥ ६६ ॥ दुर्जनासि करी साहे । तो ही लाहे दंड हे ॥ धृ० ॥ शिंदळीच्या कुंटणी वाटा । संग खोटा खोट्याचा ॥ १ ॥ यर यरा कांचणीं भेटे । आगी उठे तथुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे कापूं नाकें । पुढें आणिकें शिकविती ॥ ३ ॥

॥ ६७ ॥ वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चिती देव नाहीं ॥ धृ० ॥ भाडेकरी वाहे पाठीवरी भार । अंतरींचें सार लाभ नाहीं ॥ १ ॥ देवपूजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥ २ ॥ तुका ह्मणे फळ चिंतिती आदरें । लाघव हे चार शिंदळीचे ॥ ३ ॥

॥ ६८ ॥ पवित्र सोंवळीं । एक तींच भूमंडळीं ॥ धृ० ॥ ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥ १ ॥ तींच भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धर्नावितें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । त्यांची केल्या पावे सेवा ॥ ३ ॥

॥ ६९ ॥ आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥ धृ० ॥ करी इंद्रियांची सेवा । पाहे आवडीचा हेवा ॥ १ ॥ भ्रमलें चावळे । तैसें उचित न कळे ॥ २ ॥ तुका ह्मणे विषें । अन्न नाशियेलें जैसें ॥ ३ ॥

॥ ७० ॥ ढेकरें जेवण दिसे साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ॥ धृ० ॥ हेही बोल तेही बोल कोरडे फोल रुचीविण ॥ १ ॥ गव्हांचिया होती परी । फके वरी खाऊं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ॥ ३ ॥

॥ ७१ ॥ करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥ धृ० ॥ कळावें तयासि कळे अंतरींचें । कारण तें साचें साचा अंगीं ॥ १ ॥ अतिशया अंतीं लाभ किंवा घात । फळ देतें चित्त बीजा ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥ ३ ॥

॥ ७२ ॥ एकादशीव्रत सोमवार न करिती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ धृ० ॥

काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥ १ ॥ हरिहरां नाहीं बोटभरी वाती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्यांची गति होईल नेणों ॥ ३ ॥

॥ ७३ ॥ नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हाचि धंदा ॥ धृ० ॥ देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥ १ ॥ रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥ २ ॥ तुका ह्मणे आत्महत्यारे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥ ३ ॥

॥ ७४ ॥ स्मशान ते भूमि प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी ॥ धृ० ॥ भरतील पोट श्वानाचिया परी । वस्ति केली घरीं यमदूतां ॥ १ ॥ अपूज्य लिंग तेथें अतित न ये थारा । ऐसी वस्ती चोरां कंटकांची ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं ठावी स्थिति मनीं । यमाची निश्चिती कुळवाडी ॥ ३ ॥

॥ ७५ ॥ आहाकटा त्याचे करिती पितर । वंशीं दुराचार पुत्र जाला ॥ धृ० ॥ गर्भींच ना गर्भ नव्हेचि कां वांज । माता त्याची लाज लाजा पापी ॥ १ ॥ परपीडे परद्वारीं सावधान । सादरचि मन अभाग्याचें ॥ २ ॥ न मिळतां निंदा आहारीं उपवास । संभ्र-हावे दोष सकळही ॥ ३ ॥ परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचे ते किडे दुग्धीं मरे ॥ ४ ॥ तुका ह्मणे विटाळाचीच तो मूर्ति । दया क्षमा शांति नावडे त्या ॥ ५ ॥

॥ ७६ ॥ श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर पापी ॥ धृ० ॥ नाहीं भीड आणि धीर । उपदेश न जिरे क्षीर ॥ १ ॥ माणसांसि भुंके । विजातीनें थाव थुंके ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । मळिण करा तें फजित ॥ ३ ॥

॥ ७७ ॥ देखोनी हरखली भांड । पुत्र झाला ह्मणे रांड ॥ नेणे तो आला भांड । आहाड चोर शिंदळ ॥ धृ० ॥ जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भांडवल थुंका ॥ थोर आला चुका । वर कां नाहीं घातली ॥ १ ॥ भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं घोरें ॥ निष्ठुर उत्तरें । पापवृष्टी मळिणचित्त ॥ २ ॥ दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ ॥ तुका ह्मणे खळ । ह्मणोनियां निषिद्ध तो ॥ ३ ॥

॥ ७८ ॥ नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा ॥ धृ० ॥ नेणें राग वेळ काळ घात मात । तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥ १ ॥ तुका ह्मणे मज चाड नाहीं जना । तुज नारायणा वांचूनियां ॥ २ ॥

॥ ७९ ॥ माझी पाठ करा कवी । उठ लावी दारोदार ॥ धृ० ॥ नेम नया पारखी सिव । लाजे ठाव सांडितां ॥ १ ॥ उष्टावळी करूनि जमा । कुंथोनि प्रेमा आणितसे ॥ २ ॥ तुका ह्मणे बाहेर सुटी । आंतचि गोविंदीं न सरती ॥ ३ ॥

॥ ८० ॥ उपाधीच्या नावें घेतला सिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ॥ धृ० ॥ कासासाठीं हात भरूनि धुवावे । चालतिया गांवें मारगासि ॥ १ ॥ काय नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें तें तें ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविलें ॥ ३ ॥

॥ ८१ ॥ योगाचें तें भाग्य क्षमा । आधीं दमा इंद्रियें ॥ ध्रु० ॥ अवघीं भाग्यें येती घरा । देव सोयरा जालिया ॥ १ ॥ मिरासीचें ह्मणे संत । नांहीं देत पीक उगें ॥ २ ॥ तुका ह्मणे उचित जाणां । उगीं सिणा काशाला ॥ ३ ॥

॥ ८२ ॥ न ये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥ ध्रु० ॥ तों हे चावटीचे बोल । जन रंजवणें फोल ॥ १ ॥ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ३ ॥

॥ ८३ ॥ बाईल सवासिण आई ॥ आपण पितरांचे ठायीं ॥ ध्रु० ॥ थोर बंध जाला नष्टा । अवध्या अपसव्य चेष्टा ॥ १ ॥ विषयांचें चरवणीं । केली आयुष्याची गाळणी ॥ २ ॥ तुका ह्मणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥ ३ ॥

॥ ८४ ॥ दानें कांपे हात । नावडे तें विशीं मात ॥ ध्रु० ॥ कथीं चावटीचे बोल । हिंग क्षीरीं मिथ्या फोल ॥ १ ॥ न वजती पाय । तीर्थां ह्मणे वेचूं काय ॥ २ ॥ तुका ह्मणे मनीं नाहीं । न ये आकारातें काहीं ॥ ३ ॥

॥ ८५ ॥ वळितें जें गाई ॥ त्यासि फार लागे काई ॥ ध्रु० ॥ निवे भावाच्या उत्तरीं । भलते एके धणीवरी ॥ १ ॥ न लागती प्रकार । कांहीं मानाचा आदर ॥ २ ॥ सांडी थोरपणा । तुका ह्मणे सवें दीना ॥ ३ ॥

॥ ८६ ॥ मैत्र केले महा बळी । कामा न येती अंतकाळीं ॥ ध्रु० ॥ आधीं घे रे रामनाम । सामा भरीं हा उत्तम ॥ १ ॥ नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥ २ ॥ धन मेळविलें कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥ ३ ॥ कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥ ४ ॥ तंववरी मिरविसी बळ । जंव आला नाहीं काळ ॥ ५ ॥ तुका ह्मणे बापा । चुकवीं चौऱ्याशींच्या खेपा ॥ ६ ॥

॥ ८७ ॥ कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका न ये ॥ ध्रु० ॥ तैसें मज नको करूं कमळापती । देईं या संगति सज्जनांची ॥ १ ॥ तिनें पाचारिलें इल बा ह्मणोन । येरु पळे आण जाली आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे येर येरा जें विच्छिन्न । तेथें वांते सीण सुखा पोटीं ॥ ३ ॥

॥ ८८ ॥ सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वता एवढें ॥ ध्रु० ॥ धरीं धरीं आठवण । मानीं संताचें वचन ॥ १ ॥ नेलें रात्रीनें तें अर्धें । बाळपण जराव्याधें ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढा । घाणा जुंती जसी मूढा ॥ ३ ॥

॥ ८९ ॥ बोलायाचा त्यासीं । नको संबंध मानसीं ॥ ध्रु० ॥ जया घडली संतनिंदा तुज विसरूनि गोविंदा ॥ १ ॥ जळो त्याचें तोंड । नको दृष्टीपुढें भांड ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥ ३ ॥

॥ ९० ॥ तीळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसेचि खळ ॥ ध्रु० ॥ कां रे सिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥ १ ॥ मानदंभासाटीं । केली अक्षरांची आटी ॥ २ ॥ तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ॥ ३ ॥ वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ ४ ॥ तुका ह्मणे चुकलें वर्म । केला अवघाचि अधर्म ॥ ५ ॥

॥ ९१ ॥ संवसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ ध्रु० ॥ ह्मण-उनी तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ १ ॥ बहुतां जन्मींचा जालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ २ ॥ वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ३ ॥ बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दिवस जालों कासाविस ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीननाथा ॥ ५ ॥

॥ ९२ ॥ भक्तकरुणी देव बोलती पुराणें । निर्धार वचनें साच करी ॥ ध्रु० ॥ मागें काय जाणों अइकिली वार्ता । कबिर सातें जातां घडिया वांटी ॥ १ ॥ मायागिया धन आणिलें घरासि । न घे केला त्यासि त्याग तेणें ॥ २ ॥ नामदेवाचिया घरासि आणिलें । तेणें लुटविलें द्विजां हातीं ॥ ३ ॥ प्रत्यक्षासि काय ध्यावें हें प्रमाण । त्र्यंबकाचें कोण काढियेलें ॥ ४ ॥ बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥ ५ ॥ तुका ह्मणे नाहीं जयासि निर्धार । नाडला साचार तोचि एक ॥ ६ ॥

॥ ९३ ॥ भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥ ध्रु० ॥ ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगीं च अधर्म ॥ १ ॥ देव अंतर तें पाप । खोटें उगवा संकल्प ॥ २ ॥ तुका ह्मणे भीड खोटी । लाभ विचारावा पोटीं ॥ ३ ॥

॥ ९४ ॥ भोरप्यानें सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें ॥ ध्रु० ॥ टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदि जगीं फांसे जैसे ॥ १ ॥ ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ॥ २ ॥ स्वादिक हा स्नेहवाद पशु पाळी । कापावया नळी तयासाठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसा भला मी लोकांत । परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ९५ ॥ गेली वीरसरी । मग त्यासि रांड मारी ॥ ध्रु० ॥ मग नये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ॥ १ ॥ भंगलिया चित्ता । न ये कशानें सांधितां ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर । भंगलिया पाठीं कीर ॥ ३ ॥

॥ ९६ ॥ युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥ ध्रु० ॥ कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ॥ १ ॥ न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामाविण ॥ ३ ॥

॥ ९७ ॥ कंठीं कृष्णमणी । नाहीं अशुभ ते वाणी ॥ ध्रु० ॥ हो का नर अथवा नारी । रांड तये नांवें खरी ॥ १ ॥ नाहीं हातीं दान । शूर्पणखा कांकण ॥ २ ॥ बोळविली संतीं । केली बोडोनि फजिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे माळा । नाहीं त्याची अवकळा ॥ ४ ॥

॥ ९८ ॥ माया ब्रह्म ऐसें ह्मणती धर्मठक । आपणासरिसे लोक नागविले ॥ ध्रु० ॥ विषयीं लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नाद्या हाकोनि फिरे ॥ १ ॥ करोनि खातां पाक जिरे सुरण राई । करितां अतित्याई दुःख पावे ॥ २ ॥ औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनियां गुळा दृष्टीपुढें ॥ ३ ॥ तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांजट बोलणीं वारा त्यांचीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जया पिंडाचें पाळण । न घडे नारायणभेट तयां ॥ ५ ॥

॥ १०९ ॥ मान अपमानाचें गोवें । अवघे गुंडूनी ठेवावें ॥ धृ० ॥ हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ १ ॥ शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥ २ ॥ आली उर्मी साहे । तुका ह्मणे थोडें आहे ॥ ३ ॥

॥ ११० ॥ थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे आलिया ॥ धृ० ॥ दर्पामिष नाहीं भंगी । पांडुरंगीं सरलें तें ॥ १ ॥ अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥ २ ॥ तुका ह्मणे लटिकें पाहे । सांडी देहें अभिमान ॥ ३ ॥

॥ १११ ॥ आतां उघडीं डोळे । जरी अद्यापि न कळे ॥ तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासी ॥ धृ० ॥ मनुष्यदेहा ऐसा निध । साधिली ते साधे सिद्ध ॥ करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ १ ॥ नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलीकाचे द्वारीं ॥ कट धरूनियां करी । उभाउभी पालवी ॥ २ ॥ तुका ह्मणे फुकासाठीं । पायीं पातली या मिठी ॥ होतो उठाउठी । लवकरी च उतार ॥ ३ ॥

॥ ११२ ॥ न करी संग राहें रे निश्चळ । लागों नेदीं मळ ममतेचा ॥ धृ० ॥ या नांव अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥ १ ॥ इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही न ये वरी मन ॥ २ ॥ तुका ह्मणे न ये आणीक अंतरा । अंतरीं या भरा आनंदाचा ॥ ३ ॥

॥ ११३ ॥ पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ धृ० ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे ॥ १ ॥ आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पेठ पेठ । भूमिवरी हें वैकुंठ ॥ ३ ॥

॥ ११४ ॥ तिर्थीं धोंडा पानी । देव रोकडा सज्जनीं ॥ धृ० ॥ मिळालिया संत-संग । समर्पितां भलें अंग ॥ १ ॥ तीर्थीं भाव फळे । येथें आनाड तें वळे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥ ३ ॥

॥ ११५ ॥ घेऊनियां चक्र गदा । हाचि धंदा करी तो ॥ धृ० ॥ भक्तां राखे पाया-पासीं । दुर्जनासी संहारी ॥ १ ॥ अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥ ३ ॥

॥ ११६ ॥ देखोनि पुराणिकांची दाढी । रडे फुंदे नाक ओढी ॥ धृ० ॥ प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ १ ॥ आवरितां नावरे । स्वर काढी मेंढरें ॥ २ ॥ बोलों नये मृत्यावाटां । ह्मणे होतो त्यांचा तोटा ॥ ३ ॥ दोन्ही हिंगे चारी पाय । खुणा दावी ह्मणे होय ॥ ४ ॥ मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥ ५ ॥ होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे कुडें । काळीं येतें तें रोकडें ॥ ७ ॥

॥ ११७ ॥ दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी । देखोनियां दुरी जावें तया ॥ धृ० ॥ आइका हो तुह्मी मात हे सज्जन । करूं संपादन नये बोलों ॥ १ ॥ दुर्जनाचें अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वल सदा तैसी ॥ २ ॥ दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसा-ळलेवरी धांवे श्वान ॥ ३ ॥ दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलास त्याग देवाचा त्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती सांगावें पृथक । अंग कुंभीपाक दुर्जनाचें ॥ ५ ॥

॥ ९९ ॥ मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें कर फोडी ॥ ध्रु० ॥ आणोनि काकरा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ॥ १ ॥ संचित सांगती बोळवणें सवें । आचरलें यावें फळ तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे शेखी स्मशान तोंवरी । संबंध गोवरी अंगा सवें ॥ ३ ॥

॥ १०० ॥ गौळीयाची ताकपिरें । कोण पोरें चांगलीं ॥ ध्रु० ॥ येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥१॥ काय उपाय पडिले होते । कण्याभोंवते विठ्ठलाच्या ॥ २॥ तुका ह्मणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥ ३ ॥

॥ १०१ ॥ आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ ध्रु० ॥ सकळांच्या पायां माझे दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ १ ॥ हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥२ ॥ तुका ह्मणे लाभ होय तों व्यापार । करा काय फार शिकवावें ॥ ३ ॥

॥ १०२ ॥ भक्तविण देवा । कैंचें रूप घेडें सेवा ॥ ध्रु० ॥ शोभविलें येरयेरां । सोनें एकें माटीं हिरा ॥ १ ॥ देवाविण भक्ता । कोण देता निष्कामता ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळ । माता जैसें स्नेहजाळ ॥ ३ ॥

॥ १०३ ॥ विश्वाचा जानिता । ह्मणे यशोदेसी माता ॥ध्रु०॥ ऐसा भक्तांच्या अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥ १ ॥ निष्काम निराळा । गोपी लाविंयेल्या चाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें । रूपा अव्यक्त चांगलें ॥ ३ ॥

॥ १०४ ॥ काय दिनकरा । केला कोंबड्यानें खरा ॥ ध्रु० ॥ कां हो एसा संत ठेवा । भार माझे माथां देवा ॥ १ ॥ आर्डविलें दासीं । तरि कां मरती उपवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे हातीं । कळा सकळ अनंतीं ॥ ३ ॥

॥ १०५ ॥ जेवितां ही धरी । नाक हागतिया परी ॥ ध्रु० ॥ ऐसियाचा करी चाळा । आपुलीच अवकळा ॥ १ ॥ सांडावें मांडावें । काय ऐसें नाहीं ठावें ॥ २ ॥ तुका ह्मणे करी । ताका दुधा एकसरी ॥ ३ ॥

॥ १०६ ॥ हो का पुत्र पत्नी बंधू । त्यांचा तोडावा संबंधू ॥ ध्रु० ॥ कळों आलें खव्याळसें । शितों नये लिंपों दोषें ॥ १ ॥ फोडावें मडकें । मेलें लखीं पाये एकें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यागें । विण चुकीजेना भोगें ॥ ३ ॥

॥ १०७ ॥ व्याल्याविण करी शोभन तांतडी । चार ते गधडी करीतसे ॥ध्रु०॥ कासया पाल्हाळ आणिकाचे देखी । सांगतां नव्हे सुखी साखरेसी ॥ १ ॥ कुंथाच्या डेकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कष्टी मळिणवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे अरे वाचाळ हो एका । अनु-भवेंवीण नका वाव घेऊं ॥ ३ ॥

॥ १०८ ॥ जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥ध्रु०॥ येर मित्र पुत्र धना कोण लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रु ॥ १ ॥ प्रल्हादें जनक बिभीषणें बंधू । राज्य माता निंदु भरतें केली ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व धर्म हरिचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ३ ॥

॥ १०९ ॥ मान अपमानाचें गोवें । अवघें गुंडूनी ठेवावें ॥ ध्रु० ॥ हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ १ ॥ शांतीची वसती । तेथें खुंटे काळगती ॥ २ ॥ आली ऊर्मी साहें । तुका ह्मणे थोडें आहे ॥ ३ ॥

॥ ११० ॥ थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे जालिया ॥ ध्रु० ॥ हर्षामर्ष नाहीं अंगीं । पांडुरंगीं सरलें तें ॥ १ ॥ अवघ्या साधनांचें सार । न लगे फार शोधावें ॥ २ ॥ तुका ह्मणे लटिकें पाहें । सांडी देहें अभिमान ॥ ३ ॥

॥ १११ ॥ आतां उघडीं डोळे । जरी अद्यापि न कळे ॥ तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासी ॥ ध्रु० ॥ मनुष्यदेहा ऐसा निध । साधिली ते साधे सिद्ध ॥ करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ १ ॥ नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलीकाचे द्वारीं ॥ कट धरूनियां करीं । उभाउभी पालवी ॥ २ ॥ तुका ह्मणे फुकासाठीं । पायीं घातली या मिठी ॥ होतो उठाउठी । लवकरी च उतार ॥ ३ ॥

॥ ११२ ॥ न करी संग राहें रे निश्चळ । लागों नेदी मळ ममतेचा ॥ ध्रु० ॥ या नांवें अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥ १ ॥ इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही न ये वरी मन ॥ २ ॥ तुका ह्मणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या धरा आनंदाचा ॥ ३ ॥

॥ ११३ ॥ पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ ध्रु० ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे ॥ १ ॥ आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पेठ पेठ । भूमिवरी हें वैकुंठ ॥ ३ ॥

॥ ११४ ॥ तिर्थी धोंडा पानी । देव रोकडा सज्जनीं ॥ ध्रु० ॥ मिळालिया संत-संग । समर्पितां भलें अंग ॥ १ ॥ तीर्थी भाव फळे । येथें आनाड तें वळे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥ ३ ॥

॥ ११५ ॥ घेऊनियां चक्र गदा । हाचि धंदा करी तो ॥ ध्रु० ॥ भक्ता राखे पाठा-पाशीं । दुर्जनासी संहारी ॥ १ ॥ अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥ ३ ॥

॥ ११६ ॥ देखोनि पुराणिकांची दाढी । रंडें फुंदें नाक ओढी ॥ ध्रु० ॥ प्रेम खोटें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ १ ॥ आवरितां नावरे । खर आठवी नेवरें ॥ २ ॥ बोलों नये मुखावाटां । ह्मणे होतां त्यांचा तोटा ॥ ३ ॥ दोन्ही शिंगें चारी पाय । खुणा दावी ह्मणे होय ॥ ४ ॥ मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥ ५ ॥ होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे कुडें । काळीं येतें तें रोकडें ॥ ७ ॥

॥ ११७ ॥ दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी । देखोनियां दुरी व्हावें तया ॥ ध्रु० ॥ आइका हो तुह्मी मात हे सज्जन । करूं संघटन नये बोलों ॥ १ ॥ दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वल सदा तैशी ॥ २ ॥ दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसा-ळलेवरी धांवे श्वान ॥ ३ ॥ दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलास त्याग देहाचा त्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती सांगावें पृथक । अंग कुंभीपाक दुर्जनाचें ॥ ५ ॥

॥ ११८ ॥ अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अंत्यज तो ॥ धृ० ॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मानी जो ॥ १ ॥ तुका ह्मणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ २ ॥

॥ ११९ ॥ शब्दा नाहीं धीर । ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ धृ० ॥ त्याचें न व्हावें दर्शन । खळा पंगती भोजन ॥ १ ॥ संतांस जो निंदी । अधम लोभासाठी वंदी ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटीं । भाव आणीक जया होटीं ॥ ३ ॥

॥ १२० ॥ चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥ धृ० ॥ शिंदळीच्या मागें वेचितां पाउलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ॥ १ ॥ तुका ह्मणे भितों पुढिलिया वृत्ता । ह्मणऊनि चिंता उपजली ॥ २ ॥

॥ १२१ ॥ मांडवाच्या दारा । पुढें आणिला ह्मातारा ॥ धृ० ॥ ह्मणे नवरी आणा रांड । जाळा नवऱ्याचें तोंड ॥ १ ॥ समय न कळे । काय उपयोगी ये वेळे ॥ २ ॥ तुका ह्मणे खरा । येथूनिया दूर करा ॥ ३ ॥

॥ १२२ ॥ कांहीं नित्यनेमाविण । अन्न खाय तो श्वान ॥ वांयां मनुष्यपण । भार वाहे तो वृषभ ॥ धृ० ॥ त्याचा होय भूमी भार । नेणे यातीचा आचार ॥ जाला द्वावेदार । भोगवी अघोर पितरांसी ॥ १ ॥ अखंड अशुभ वाणी । स्वप्नें न बोलेचि स्वप्नीं ॥ पापी तयाहुनी । आणीक नाहीं दुसरा ॥ २ ॥ पोट पोसी एकला । भूतां दया नाहीं ज्याला ॥ पाठी लागे आल्या । अतिताचे वाराशीं ॥ ३ ॥ कांहीं संतांचें पूजन । न घडे तीर्थाचें भ्रमण ॥ यमाचा आंदण । सीण थोर पावेल ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी ॥ देवा विसरूनी । गेली ह्मणतां मी माझें ॥ ५ ॥

॥ १२३ ॥ कन्या गो करी कायेच्या विकरा ॥ चांडाळ तो खरा तया मांस ॥ १ ॥ गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यांतिशी कारण नाहीं देवा ॥ २ ॥ आचारभ्रष्ट मंत्र करू-
सें करिती । तुका ह्मणे जाती नरकामधीं ॥ ३ ॥

॥ १२४ ॥ हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद ॥ धृ० ॥ एका एकाचे हृदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ॥ १ ॥ भेदकासी नाड । एक वेलांटीच आड ॥ २ ॥ उजवें वामांग । तुका ह्मणे एकचि अंग ॥ ३ ॥

॥ १२५ ॥ वक्त्या आधीं मान । गंध अक्षता पूजन । श्रोता यांत आला जाण । तरी त्या नाहीं उचित ॥ धृ० ॥ शीर सर्वांगा प्रमाण । यथाविधि कर चरण । धर्माचें पाळण । सकळीं सत्य करावें ॥ १ ॥ पट्ट पुत्र सांभाळी । पिता त्याची आज्ञा पाळी । प्रमाण सकळीं । ते मर्यादा करावी ॥ २ ॥ वरासनीं पाषाण । तो न मानावा सामान्य । येर उपकरणें । सोनियाचीं परी तीं नीच ॥ ३ ॥ सोनियाच्या पूजण । मृगुट्मणि कळा हीण । जयाचें कारण । तया ठायीं अळंकार ॥ ४ ॥ सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम त्याचें धन । तुका ह्मणे जाण । तुह्मी संत तदर्थीं ॥ ५ ॥

॥ १२६ ॥ घरीं रांडा पोरें मरती उपवासीं । सांगे लोकांपासीं थोरपण ॥ १ ॥ नक-

नियां घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय चुकावूनि ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जाणों त्या प्रमाण । ठकावे हे जन तैसे नहों ॥ ३ ॥

॥ १२७ ॥ मायबाप जोहार । सारा साधावया आलों वेसकर ॥ ध्रु० ॥ मागील पुढील करा झाडा । नाहीं तरी खोडा घालिती जी ॥ १ ॥ फांकूं नका रुजू जालिया वांचून । सांगा जी कोण घरीं तीं धण्या ॥ २ ॥ आजि मायबाप करा तडामोडी । उद्यां कोणी घडी राहेना हो ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न चले ते बोली । अखेर ते साली झाडा घेती ॥ ४ ॥

॥ १२८ ॥ येऊं द्या जी कांहीं वेसकरास । आंतून बाहेर वांजच्या घास ॥ १ ॥ जों यावें तों हातचि रिता नाहीं । कधीं तरी कांहीं द्यावें घ्यावें ॥ २ ॥ तुका ह्मणे उद्यां लावीन ह्मनेरा । जे हे दारोदारां भोंवतां फिरा ॥ ३ ॥

॥ १२९ ॥ देती घेती परज गेली । घर खालीं करूनियां ॥ ध्रु० ॥ धांवणियाचें न पडे हातीं । खादली राती काळोखीं ॥ १ ॥ अवघियांचें अवघें नेलें । कांहीं ठेविलें नाहीं मागें ॥ २ ॥ सांग संपादूनि दाविला भाव । गेला आधीं माव वरि होती ॥ ३ ॥ घराकडे पाहूं नयेसेंचि जालें । अमानत केलें दिवाणांत ॥ ४ ॥ आतां तुका कोणा न लगेचि हातीं । जाली ते निश्चिती बोलों नये ॥ ५ ॥

॥ १३० ॥ शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षितीला हो दिसां आतां ॥ ध्रु० ॥ उठाउठी करी स्मरणाच्या धावा । भरवत देवा नाहीं धीर ॥ १ ॥ त्वरा जाली गरुड टाकियेला मागें । द्रौपदीच्या लागे नारायणें ॥ २ ॥ तुका ह्मणे करी बहु न तानडी । प्रेमाची आवडी लोभ फार ॥ ३ ॥

॥ १३१ ॥ बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥ ध्रु० ॥ वाट दावी तया न लगे रुसावें । अतिशयाई जीवें नाहीं पाय ॥ १ ॥ निंब दिल्या रोग तुटाया अंतरीं । पोभाळितां वरि आंत चरे ॥ २ ॥ तुका ह्मणे हित वेंचण्यास काळें । पडती आंधळे कूपा माजी ॥ ३ ॥

॥ १३२ ॥ माकडें मुठी धरिलें फुटाणे । गुंतलें तें नेणे ज्ञान तेथें ॥ ध्रु० ॥ काय तो तयाचा लेखावा अन्याय । हित नेणे काय आपुलें तें ॥ १ ॥ शुकें नळिकेशीं गोंवियेले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे एक ऐसे पशुजीव । न चले उपाव कांहीं तेथें ॥ ३ ॥

॥ १३३ ॥ हरि तूं निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठीण । नव्हे तें करिसी आन । कवणें नाहीं केलें तें ॥ ध्रु० ॥ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व । पुत्र पत्नी जीव । डोंबा घरीं वोपविलीं ॥ १ ॥ नळा दमयंतीचा योग । विघडिला त्यांचा संग । ऐसें जाणे जग । पुराणें ही बोलती ॥ २ ॥ राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दया भूतीं । तुळविलें अंतीं । तुळें मास तयाचें ॥ ३ ॥ कर्ण भिडतां समरांगणीं । बाणीं व्यापियेला रणीं । मागसी पाडोनी । तेथें दांत तयाचे ॥ ४ ॥ बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिला कर । करूनि काहार । तो पाताळीं घातला ॥ ५ ॥ श्रियाळाच्या घरीं । धरणें

मांडिलें मुरारी । मारविलें करीं । त्याचें बाळ त्याहातीं ॥ ६ ॥ तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गति । ठाव नाहीं पुढती । तुका ह्मणे करिसी तें ॥ ७ ॥

॥ १३४ ॥ चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥ धृ० ॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळी वसे ॥ १ ॥ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी ॥ २ ॥ केलीं मागें नको राहों । तुज जमान आह्मी आहों ॥ ३ ॥ करीं तुज जीं करवती । आणिक नामें घेऊं किती ॥ ४ ॥ तुका ह्मणे काळा । रीग नाहीं निघती ज्वाळा ॥ ५ ॥

॥ १३५ ॥ बाळ बापा ह्मणे काका । तरी तो कां निरपराध ॥ धृ० ॥ जैसा तैसा भाव गोड । पुरवी कोड विठ्ठल ॥ १ ॥ साकरेसि ह्मणतां धोंडा । तरी कां तोंडा न रुचे ॥ २ ॥ तुका ह्मणे आरुष बोल । नव्हे बोल आहाच ॥ ३ ॥

॥ १३६ ॥ चित्तीं नाहीं तें जवळी असोनि काय । वत्स सांडी माय तणें त्याचें ॥ १ ॥ प्रीतीचा तो वायु गोड लागे मात । जरी जाय चित्त मिळोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघें फिकें भावाविण । मीठ नाहीं अन्न तेणें न्यायें ॥ ३ ॥

॥ १३७ ॥ काय काशी करिती गंगा । भीतरि चांगा नाहीं तो ॥ धृ० ॥ अभणी कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासी ॥ १ ॥ काय टिळे करिती माळा । भाव सवळा नाहीं त्या ॥ २ ॥ तुका ह्मणे प्रेमें विण । बोले भुंके अवघा शीण ॥ ३ ॥

॥ १३८ ॥ शिवळा सात्याचा नाहीं हा विश्वास । बाईल तो त्यास न विसंबे ॥ १ ॥ दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर । तो ह्मणे इतर लोक तैसे ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्या चित्तीं जे वासना । तयाची भावना तयापरी ॥ ३ ॥

## काला चेंडूफळी.

॥ १३९ ॥ झेला रे झेला वरचेवर झेला । हातिचें गमावी तो पाठीं साहे टोला ॥ धृ० ॥ त्रिगुणाचा चेंडू हातें झुगारी निराळा । वरिलिया मुखें मन लावी तेथें डोळा ॥ १ ॥ आगळा होऊनि धरी वरिच्चिया वरी । चपळ तो जिंके गांज्या ठके वरझारी ॥ २ ॥ हातीं सांपडलें उभें बैसों नेदी कोणी । सोरी मागें सोरी घेतां ओणवे करूनी ॥ ३ ॥ डोई पडिलिया सोसी दुःखाचे डोंगर । पाठीवरी भार भोवताहीं उभा फेर ॥ ४ ॥ तुका ह्मणे सुख पाहे तयाचें आगळें । जिंकि तो हरवी कोणी एका तरी काळें ॥ ५ ॥

॥ १४० ॥ अझुनिकां थीर पोरा न ह्मणसी किर । धरूनियां धीर लाजे बुर निघाला ॥ धृ० ॥ मोकळा होतासि कां रे पडिलासि डोई । वरिलांचा भार आतां उसंगता नाहीं ॥ १ ॥ मेळवूनि मेळा एकाएकीं दिली मिठी । कवळिलें एक बहु बैसविलीं पाठीं ॥ २ ॥ तळील तें वरी वरील तें येथें तळा । न सुटे तोंवरी येथें गुंतलिया खेळा ॥ ३ ॥ सांडिला डाव पुढें सईल धरी हात । चढेल तो पडेल ऐसी ऐका रे मात ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती आवरावे हात पाय । न खेळावें तोंच बरें वरी न ये डाय ॥ ५ ॥

## कोडें.

॥ २४१ ॥ कोडें रे कोडें ऐका हें कोडें । उगवूनि फार राहे गुंतोनियां थोडें ॥ धृ० ॥ पुसतसें सांगा मी हें माझें ऐसें काई । रुसूं नका नुगवे तो झवे आपुली आई ॥ १ ॥ सांगतों हें मूळ कांहीं न धरावी खंती । जालें जीवों मेलें मरो प्रारब्धा हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अभिमान सांडावा सकळीं । नये अंगावरी वांयां येऊं देऊं कळी ॥ ३ ॥

॥ २४२ ॥ नुगवे तें उगवून सांगितलें भाई । घालुनियां ताळा आतां शुद्ध राखा घाई ॥ धृ० ॥ आतां कांहीं नाहीं राहिलें । म्यां आपणा आपण पाहिलें ॥ १ ॥ कमाईस मोल येथें नका रीस मानूं । निवडूं नये मज कोणा येथें वानूं ॥ २ ॥ तुका ह्मणे परोपरी कान्हो वनमाळी । जयेजत मग सेवटिला एक वेळीं ॥ ३ ॥

॥ २४३ ॥ हरुष आनंदाचा । घोष करा हरिनामाचा ॥ कोण हा दैवाचा । भाग पावे येथील ॥ धृ० ॥ पुण्य पाहिजे बहुत । जन्मांतरींचें संचित ॥ होईल करीत । आला अधिकारी तो ॥ १ ॥ काय पाहातां हे भाई । हरुषें नाचा धरा घाई ॥ पोटभरी कांहीं । घेतां उरी न ठेवा ॥ २ ॥ जें सुख वृष्टी आहे । तेंच अंतरीं जो लाहे ॥ तुका ह्मणे काय । कळिकाळ ते बापुडें ॥ ३ ॥

॥ २४४ ॥ अवघे गोपाळ ह्मणती या रे करूं काला । काय कोणाची सिदोरी ते पाहों द्या मला ॥ नका कांहीं मागें पुढें रे ठेवूं खरें च बोला । वंची वंचला तोचि रे येथें भोवंडा त्याला ॥ धृ० ॥ घेतल्यावांचून झाडा रे नेदी आपुलें कांहीं । एकां एक ग्वाही बहुत देती मोकळें नाहीं । ताक सांडी येर येर रे काला भात भाकरी दहीं । आलें घेतो मध्यें बैसला नाहीं आणवीत तेंही ॥ १ ॥ एका नाहीं धीर तांतडी दिल्या सोडोनि मोटा । एक सोडितील गाठी रे एक चालती वाटा । एक उभा भार वाहोनि पाहे उगाचि खोटा । एक ते करूनि आराले आतां ऐसेंचि घाटा ॥ २ ॥ एकीं स्थिराविल्या गाई रे एक वळल्या देती । एकांच्या फांकल्या वोढाळा फेरे भोंवतीं घेती । एकें चारा-चारा गुंतलीं नाहीं जीवन चित्तीं । एक एका चला ह्मणती एक हुंबरी घेती ॥ ३ ॥ एकीं एकें वाटा लाविलीं भोळीं नेणती मुलें । आपण घरींच गुंतलें माळा नासिलीं फुलें । गांठीचें तें सोडूं नावडे खाय आइतें दिलें । सांपडलें वेठी वोढी रे भार वाहातां मेलें ॥ ४ ॥ एक ते माया गुंतले घरीं बहुत काम । वार्ताही नाहीं तयाची तया कांहींच ठावें । जैसें होतें शिळें संचित तैसें लागलें खावें । हातोहातीं गेलें वेचुनि मग पडिलें ठावें ॥ ५ ॥ एकीं हातीं पायीं पटे रे अंगीं लाविल्या राखा । एक ते सोलिव बोडके केली सपाट शिखा । एक ते आळसी तळीं रे वरी वाढिल्या काखा । सिदोरी वांचून बुद्धि रे केला अवघ्यां वाखा ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां कान्होबा आह्मां वांटोनि द्यावें । आहे नाहीं आह्मांपाशीं तें तुज अवघेंचि ठावें । मोकालितां तुह्मी शरण आह्मी कवणासि जावें । कृपावंतें कृपा केली रे पोट भरे तों खावें ॥ ७ ॥

॥ २४५ ॥ बैसवूनि फेरी । गडियां मध्यभागीं हरी । अवघियांचें करी । समाधान

सारिखें ।। धृ० ।। पाहे तो देखे समोर । भोगी अवघे प्रकार । हरुषे झाली कर । कवळ मुखीं देती ते ।। १ ।। बोले बोलतिया सवें । देतील तें त्यांचें घ्यावें । एक एका ठावें । यरं येरा अदृश्य ।। २ ।। तुका ह्मणे देवा । बहु आवडीचा हेवा । कोणाचिया जीवा । वाटों नेदी विषम ।। ३ ।।

।। १४६ ।। आह्मां निकट वासें । कळों आलें जैसें तैसें । नाहीं मनारीसें । कान्होबाचे अंतरीं ।। धृ० ।। पीडती आपुल्या भावना । जैसी जयाची वासना । कर्मांच्या दखणा । पाहे लीळा कौतुक ।। १ ।। खेळ खेळे न पडे डाई । ज्याचा भार त्याच्या ठायीं । कोणी पडतील डाई । कोणी कोडीं उगवीती ।। २ ।। तुका ह्मणे कवळ । हातीं देऊनि गोपाळ । देतो ज्यांचें बळ । त्यांसि तसा विभाग ।। ३ ।।

।। १४७ ।। काम सारूनि सकळ । आले अवघे गोपाळ । जाली भातां वेळ । ह्मणती आणा सिदोऱ्या ।। धृ० ।। देती आपुलाला झाडा । गाई बैसविल्या वाडा । शेंदिल्य बोबडा । वांकडयाचा हरि मेळीं ।। १ ।। आपुलालिये आवडी । मुदा बांधल्या परवडी । निवडूनियां गोडी । हरि मेळवी त्यांत तें ।। २ ।। भार वागविल ॰ डीं । नव्हती मिळाली जों मांदी । सकळांचे संदी । तोझी अवघीं उतरलीं ।। ३ ।। मागें जो तांतडी । त्यांसि रागा येती गडी । तुझी कां रे कुडी । येथें मिथ्या भावना ।। ४ ।। एक एकाच्या संवादें । कैसे धाले ब्रह्मानंदें । तुका ह्मणे पदें । या रे वंदूं हरीचीं ।। ५ ।।

।। १४८ ।। यमुने पाबळीं । गडियां बोले वनमाळी । आणा सिदोऱ्या सकळीं । काला करूं आजी । अवघे एके ठायीं । करूनि स्वाद त्याचा पाहीं । मजपाशीं आहे नाहीं । तुह्मामाजी देतों ।। धृ० ।। ह्मणती बरवें गोपाळ । ह्मणती बरवें गोपाळ । वाहाती सकळ । मोहरी पांवे आनंदें । खडकीं सोडियेल्या मोटा । अवघा केला एकवटा । काला करूनियां वांटा । गडियां देतो हरी ।। १ ।। एकापुढें एक । घाली हात पसरी मुख । गोळा पांवे तया सुख । अधिकचि वाटे । ह्मणती गोड जालें । ह्मणती गोड जालें । आणिक देई । नाहीं पोट धालें ।। २ ।। हात नेतो मुखापाशीं । एर आशा तोंड वासी । खाय आपण तयासी । दावी वांकुलिया । देऊनियां मिठी । पळे लागतील पाठीं । धरूनि काढितील ओठीं । मुखामाजी खाती ।। ३ ।। ह्मणती ठकडा रे कान्हा । लावी घांसा भरी राणा । तुम करितो शहाणा । पाठोवाठीं तयाच्या । अवघियांचे खाय । कवळ कृष्णा माझी माय । सुरवर ह्मणती हाय हाय । सुखा अंतरलों ।। ४ ।। एक एका मागें । कृष्णा पाठी तोंडावरी । गोळा न साहवे हरी । ह्मणे पुरे आतां । येतो काकुलती । गोळा न साहवे श्रीपती । ह्मणे खेळों आतां नीती । सांगों आदरिलें ।। ५ ।। आनंदाचे करी । माजी घालुनियां हरी । एक घालिती हुंबरी । वाती सिंगें पांवे । वांकडे बोबडे । थुडे मुडे एक लुडे । कृष्णा आवडती पुढें । बहु भाविक ते ।। ६ ।। करी कवतुक । त्यांचें देखोनियां मुख । हरी वाटतसे सुख । खदखदां हांसे । एक एकाचें उच्छिष्ट । खातां न मानिती वीट । केली लाजतां ही धीट । आपुलिया संगें ।। ७ ।। नाहीं ज्यांची गेली भूक । त्यांचें पसरवितो मुख । अवघियां देतो सुख । सारिखें चि हरी । ह्मणती भला भला

हरी । तुझी संगती रे बरी । आतां चाळविसी तरी । न वजों आणिका सवें ॥ ८ ॥ गाई विसरल्या चार । पक्षी श्वापदांचे भार । जालें यमुनेचें स्थिर । जळ वाहों ठेलें ॥ देव पाहाती सकळ । मुखें घोटूनियां लाळ । धन्य ह्मणती गोपाळ । धिग जालों आह्मी ॥ ९ ॥ ह्मणती कैसें करावें । ह्मणती कैसें करावें । यमुनाजळीं व्हावें । मत्स्य शेष घ्यावया । सुरवरांचे थाट । भरलें यमुनेचें तट । तंव अधिकची होट । मटमटां वाजवी ॥ १० ॥ आनंदें सहित । क्रीडा करी गोपीनाथ । ह्मणती यमुनेंत हात । नका घालूं कोणी । ह्मणती जाणे जीवींचें । ह्मणती जाणे जीवीचें । लाजे त्यास येथें कै... । शेष कृष्णाचें । लाभ थोरिवे ॥ ११ ॥ धन्य दिवस काळ । आजी पावला गोपाळ । ह्मणती धालों रे सकळ । तुझिया नि हातें । मानवले गडी । एक एकाचें आवडी । हरीं खादलें परवडी । धणीवरी आजी ॥ १२ ॥ तुझा संग बरवा । नित्य आह्मां द्यावा । ऐसें करुनि जीवा । नित्य देवा चालावें । तंव ह्मणे वनमाळी । घ्यारे कांठिया कांबळी । आतां जाऊं खेळीमेळीं । गाई चारावया ॥ १३ ॥ तुका ह्मणे प्रेमें धालीं । कोणा न साहवे चाली । गाई गोपाळांसि केली । अ... ण वांसरी ॥ १४ ॥ आजि जाला आनंद । आजि जाला आनंद । चाले परमानंद । सवें आह्मांसहित ॥ १५ ॥

॥ १४९ ॥ या हो या चला जाऊं सकळा । पाहों हा सोहळा आजि वृंदावनींचा ॥ धृ० ॥ वाइला गोपाळें वेणुनाद पडे कानीं । धीर नव्हे मनीं चित्त जालें चंचळ ॥ १ ॥ उरलें तें सांडा काम नका करूं गोवी । हेचि वेळ ठावी मज कृष्णभेटीची ॥ २ ॥ निवतील डोळे याचें श्रीमुख पाहतां । बोलती तें आतां वरचीं सोसूं वाईट ॥ ३ ॥ कृष्णभेटी आड कांहीं नावडे आणीक । लाज तरी लोक मन जालें उदास ॥ ४ ॥ एकाएकीं चालियेल्या सादावींत सवें । तुका ह्मणे देवें रूपें केल्या तन्मय ॥ ५ ॥

## फुगड्या.

॥ १५० ॥ फुगडी फू फुगडी घालितां उघडी राहे । लाज सांडोनि एक एकी पाहे ॥ धृ० ॥ फुगडी गे अवघें मोडी गे । तरीच गोडी गे संसार तोडी गे ॥ १ ॥ माग जे शिकली होतीस पोटीं । तेंचि विचारूनि आतां उच्चारी ओठीं ॥ २ ॥ त्रिगुणांची वेणी तुझे उडते पाठीं । सावरूनि धरी घाली मूळबंदीं गांठी ॥ ३ ॥ आगळें पाउल जिंके एकाएक । पावसी मान हे मानवती तिन्ही लोक ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुजमजमध्यें एक भाव । सम तुकें बार घेऊं पावों उंच ठाव ॥ ५ ॥

॥ १५१ ॥ फुगडी फू सवती माझे तूं । हागुनि भरलें धू तुझ्या ढुंगा तोंडावरि थू ॥ धृ० ॥ फुगडी घेतां आली हरी । ऊठ जावो जगनोवरी ॥ १ ॥ हात पाय केवळ जाती । ढुंगण घोळितां लागे माती ॥ २ ॥ सात पांच आणिल्या हरी । वांचुनी काय तगसी पोरी ॥ ३ ॥ सरला दम पांगले पाय । आझुनि वरी घोळिसी काय ॥ ४ ॥ तुका ह्मणे आझुन जरी । सांगितलें तें गधडी करी ॥ ५ ॥

## लखोटा.

॥ १९२ ॥ लये लये लखोटा । मूळबंदि कासोटा । भावा केलें साहे । आतां माझें पाहें ॥ १ ॥ हातोहातीं गुंतली । जीवपणा मुकली । धीर माझा निका । सांडीं बोल फिका ॥ २ ॥ अंगीकारी हरि । नको पडों फेरी । लाज धरीं भांडे । जग सोडी रांडे ॥ ३ ॥ बैस भावा पाठीं । ऐक माझ्या गोष्टी । केला सांडीं गोहो । येथें धरीं मोहो ॥ ४ ॥ पाठमोरा डोल । आवरी तें बोल । पांगलीस बाळा । पुढें भवकळा ॥ ५ ॥ आतां उभी ठायीं । उभाउभीं पाहीं । नको होऊं कुकरी । पुढें गाढव कुतरी ॥ ६ ॥ नाम केलें खरें । आपुलें म्या बरें । तुका ह्मणे येरीं । पांगविल्या पोरी ॥ ७ ॥

## हुंबरी.

॥ १९३ ॥ तुझी कोण घाली हुंबरी । साही पांगल्या अठरा चारी ॥ ध्रु० ॥ सहस्र मुखावरी हरी । शेष शिणविलें ॥ १ ॥ चंद्रवासवें घातली उडी । नाथिला कांठ्याा देऊनि बुडी ॥ २ ॥ अशुद्ध पीतां करुणा नाहीं । तुवां माउशी ही मारियेली ॥ ३ ॥ रावणाचें घर बुडविलें सारें । त्याचीं रांडापोरें मारियेलीं ॥ ४ ॥ जाणों तो ठावा आहेसि आह्मां । तुवां आपुला मामा मारियेला ॥ ५ ॥ याशीं खेळतां नाश थोरू । तुकयास्वामी सारंगधरू ॥ ६ ॥

## हमामा.

॥ १९४ ॥ मशीं पोरा घे रे बार । तुझें बुजीन खालील द्वार ॥ ध्रु० ॥ पोरा हमामा रे । पोरा हमामा रे ॥ १ ॥ मशीं हमामा तूं घालीं । पोरा वरी सांभाळीं खालीं ॥ २ ॥ मशी च मशी बोल । पोरा जिव्हाळ्याची ओल ॥ ३ ॥ मशी घेतां भास । जीवा मीनपणा नास ॥ ४ ॥ मज सवें खरा । पण जाऊं नेदी घरा ॥ ५ ॥ आर्माचिये रंगीं । पुढें तगेना ये संगीं ॥ ६ ॥ तुक्यासवें भास । हरी जीवा करी नास ॥ ७ ॥

॥ १९५ ॥ हमामा रे पोरा हमामा रे । हमामा घालितां ठकलें पोर । करी येरझार चौऱ्याशीची ॥ ध्रु० ॥ पहिले पहारा रंगासि आलें । सोहं सोहं सें बार घेतलें ॥ देखोनि गडी तें विसरलें । डाई पडिले आपणची ॥ १ ॥ दुसऱ्या पहारा महा आनंदें । हमामा घाली छंदछंदें । दिस वाढे तों गोड वाटे । परि पुढें नेणे पोर काय होतें तें ॥ २ ॥ तिसऱ्या पहारा घेतला बार । अहंपणें पाय न राहे स्थिर । सोस सोस करितां डाईं पडसी । सत्य जाणें हा निर्धार ॥ ३ ॥ चौथ्या पहारा हमामा । घालिसी कांपविसी हात पाय । सुऱ्यापाटिलाचा पोर यम । त्याचे पडसील डाईं ॥ ४ ॥ हमामा घालितां आला तुका । त्यानें सांडिली गडयाची सोई । यादवांचा मूळ एक विठोबा । त्यासवें चालिलो गाई ॥ ५ ॥

## गाई.

॥ १५६ ॥ आह्मां घरीं एक गाय दुभताहे । पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥ ध्रु० ॥ वान ते सांवळी नांव तें श्रीधरा । चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥ १ ॥ वत्स नाहीं माय भलत्या सवें जाय । कुर्वाळी तो लाहे भावभरणा ॥ २ ॥ चहूं धारीं क्षीर वोळली अमुप । धाले सनकादिक सिद्ध मुनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी भूक तेथें काय । जोगाविले माय तिन्ही लोकां ॥ ४ ॥

## कांडण.

॥ १५७ ॥ सिद्ध करूनियां ठेविलें कांडण । मज सांगातीण शुद्ध बुद्धि गे ॥ ध्रु० ॥ आठव हा धरीं मज जागें करीं । मागिलें पाहारीं सेवटिच्या गे ॥ १ ॥ सम तुकें घाव घालीं वो साजणी ॥ मी तुजमिळणी जंव मिळें ॥ २ ॥ एक करी पाखडी दुसरी निवडी । निःशेष तिसडी ओज करी ॥ ३ ॥ सरलें कांडण पाकसिद्धि करी । मेळवण खिरीसा-करेचें ॥ ४ ॥ उद्धव अक्रूर बंधु सोयेजण । बाप नारायण जेवणार ॥ ५ ॥ तुका ह्मणे मज माहेरीं आवडी । ह्मणोनि तांतडी मूळ केलें ॥ ६ ॥

॥ १५८ ॥ सावडी कांडण ओवी नारायण । निवडे आपण भूस सार ॥ ध्रु० ॥ मुसळ आधारीं आवरूनि धरीं । सांवरोनि थिरीं घाव घालीं ॥ १ ॥ वाजती कांकणें अनुहात गजरें । छंद माहियेर गाऊं गीति ॥ २ ॥ कांडितां कांडण नव्हे भाग सीण । तुजमज अपण निवडे तों ॥ ३ ॥ तुका ह्मणे रूप उमटे आरिसा । पाक त्या सारिसा शुद्ध जाला ॥ ४ ॥

## आडसण दळण.

॥ १५९ ॥ शुद्धीचें सारोनि भरियेली पाळी । भरडोनि वोंगळी नाम केलें ॥ ध्रु० ॥ आडसोनि शुद्ध करीं वो साजणी । सिद्ध कां पापिणी नासियेलें ॥ १ ॥ सुपीं तोंन्हि पाहें धड उगटिलें । नव्हतां नासिलें जगझोंडी ॥ २ ॥ सुपीं तोंन्हि आले तुज तें आधीन । दळिल्या जेवण जसें तसें ॥ ३ ॥ सुपीं तोंन्हि संग गेई धडफुडी । एकसा गधडी नास केला ॥ ४ ॥ दळितां भावलें तुज कां न कळे । काय गेलें डोळे कान तुझे ॥ ५ ॥ सुपीं तोंन्हि वोज न करितां सायास । पडसी सांदीस तुका ह्मणे ॥ ६ ॥

## दळण.

॥ १६० ॥ शुद्ध दळणाचें सुख सांगों काई । मानविल सईबाई तुज ॥ ध्रु० ॥ शुद्ध तें दळण लवकरी पावे । डोलवितां निवे अष्टांग तें ॥ १ ॥ शुद्ध तें जवितां तन निवे मन । अल्प त्या इंधन थुडा लागे ॥ २ ॥ शुद्ध त्याचा पाक सुचित चांगला । आणिक त्याला नाश नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे शुद्ध आवडे सकळां । भतार वेगळा न करी जीवें ॥ ४ ॥

॥ १६१ ॥ उपजोनियां पुढती येऊं । काला खाऊं दहींभात ॥ ध्रु० ॥ वैकुंठीं तों ऐसें

नाहीं । कवळ कांहीं काल्याचें ॥ १ ॥ एकमेकां देऊं मुखीं । सुखी घालूं हुंबरी ॥ २ ॥ तुका ह्मणे वाळवंट । बरवें नीट उत्तम ॥ ३ ॥

॥ १६२ ॥ याल तर या रे लागें । अवघे माझ्या मागें मागें ॥ धृ० ॥ आजि देतों पोटभरी । पुरे ह्मणाल तोंवरी ॥१॥ हळू हळू चला । कोणी कोणाशीं न बोला ॥२॥ तुका ह्मणे सांडा ताटे । तेणें नका भरूं पोटें ॥ ३ ॥

॥ १६३ ॥ शिंकें लावियेलें दुरी । होतों तिघांचे मी वरी॥धृ०॥ तुह्मी व्हा रे दोहींकडे । मुख पसरूनि गडे ॥ १ ॥ वाहाती त्या धारा । ध्यारे दोहींच्या कोपरा ॥ २ ॥ तुका ह्मणे हातीं टोका । अधिक उणें नेदी एका ॥ ३ ॥

॥ १६४ ॥ पळालि ते भ्याड । त्यांसि येथें जाला नाड ॥ धृ० ॥ धीट घेती धणीवरी । शिंकीं उतरितो हरी ॥ १ ॥ आपुलिया मतीं । पडलीं विचारीं तीं रितीं ॥ २ ॥ तुका लागे ध्यारे पायां । कैं पावाल या ठाया ॥ ३ ॥

॥ १६५ ॥ धालें मग पोट । केला गड्यांनीं बोभाट ॥ धृ० ॥ ये रे ये रे नारायणा । बोलों अबोलण्या खुणा ॥ १ ॥ खांद्यावरी भार । तीं शिणती बहु फार ॥ २ ॥ तुकयाच्या दातारें । नेलीं सुखी केलीं पोरें ॥ ३ ॥

॥ १६६ ॥ पाहाती गौळणी । तंव पालथीं दुधाणीं ॥ धृ० ॥ ह्मणती नंदाचिया पोरें । आजि चोरी केली खरें ॥ १ ॥ त्याविण हे नासी । नव्हे दुसरिया ऐसी ॥ २ ॥ संगें तुका मेळा । त्याणें अगुणा आणिला ॥ ३ ॥

॥ १६७ ॥ आतां ऐसें करूं । दोघां धरूनियां मारूं ॥ धृ० ॥ मग टाकिती हे खोडी । तोंडीं लागली ते गोडी ॥ १ ॥ कोंडूं घरामधीं । न बोलोनि जागों न बुद्धी ॥ २ ॥ बोलाविती देवा । तुका गडियांचा मेळावा ॥ ३ ॥

॥ १६८ ॥ गडी गेले रडी । कान्हो नेदीस तूं चढी ॥धृ०॥ आह्मी न खेळों न खेळों । आला भाव तुझा कळों ॥ १ ॥ न साहावे भार । बहु लागतो उशीर ॥ २ ॥ तुका आला रागें । येऊं नेदी मागें मागें ॥ ३ ॥

## हाल

॥ १६९ ॥ यमुनेतटीं मांडिला खेळ । ह्मणे गोपाळ गडियांसी ॥ धृ० ॥ हाल महाहाल मांडा । वाउगी सांडा मोकळी ॥ १ ॥ नांवें ठेवूनि वांटा गडी । न वजे रडी मग कोणी ॥ २ ॥ तुका ह्मणे कान्हो तिळतांदळ्या । जिंके तो करी आपुला खेळया ॥ ३ ॥

॥ १७० ॥ बळे डाई न पडे हरी । बुद्धि करी शाहणा तो ॥ धृ० ॥ मोकळें देश्या खेळों ध्यावें । सम भावें सांपडावया ॥ १ ॥ येतो जातो वेळोवेळां । न कळे कळा सांपडती ॥ २ ॥ तुका ह्मणे धरा ठायींच्या ठायीं । मिठी जीवीं पायीं घालुनियां ॥ ३ ॥

## सुतुतू.

॥ १७१ ॥ जीवशिवाच्या मांडूनि हाला । अहं सोहं दोन्ही भेडती भला ॥ धृ० ॥ घाली सुतुतू फिरोनि पाही आपुणासि । पाही बळिया तो मागिला तुटी पुढिलासी ॥ १ ॥

खेळिया तो हाल सांभाळी । धुम घाली तो पडे पाताळीं ॥ २ ॥ बळिया गांड्या तो च्चि खेळे । दम पुरे तो वेळोंवेळां खेळे ॥ ३ ॥ हातीं पडे तो चि ढांग । दम पुरे तो खेळिया चांग ॥ ४ ॥ मागें पुढें पाहे तो जिंके । हातीं पडे तोचि आधार फिके ॥ ५ ॥ आपल्या बळें खळे रे भाई । गडियाची सांडोनि सोई ॥ ६ ॥ तुका ह्मणे मी खेळिया नव्हें । जिकडे पडें त्या चि सवें ॥ ७ ॥

॥ १७२ ॥ अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदा घरीं ॥ धृ० ॥ नवल केव्हडें केव्हडें । न कळे कान्होबाचें कोडें ॥ १ ॥ पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासि यशोदा भोजन घाली ॥ २ ॥ विश्वव्यापक कमळापती । त्यासि गौळणी कडिये घेती ॥ ३ ॥ तुका ह्मणे नटधारी । भोग भोगून ब्रह्मचारी ॥ ४ ॥

॥ १७३ ॥ कृष्ण गोकुळीं जन्मला । दुष्टां चळकांप सुटला ॥ धृ० ॥ होतां कृष्णाचा अवतार ॥ आनंद करितीं घरोघर ॥ १ ॥ प्रेम नाम वाचें गाती । सदा आनंदें नाचती ॥ २ ॥ तुका ह्मणे हरती दोष । आनंदानें करिती घोष ॥ ३ ॥

॥ १७४ ॥ मेळउनि सकळ गोपाळ । कांहीं करिती विचार ॥ धृ० ॥ चला जाऊं चोरूं लोणी । आजि घेऊं चंद्रधणी ॥ वेळ लावियेला अझुणी । एकाकारितां गडे हो ॥ १ ॥ वाट काढिली गोविंदीं । मागें गोपाळांची मांदी ॥ २ ॥ अवघाचि वावरे । काळों-नेदी कोणा फिरे ॥ ३ ॥ घर पाहोनि एकांताचें । नवविधा नवनीताचें ॥ ४ ॥ रिघे आपण भीतरीं । पुरवी माथुलियाच्या हरी ॥ ५ ॥ बोलों नेदी ह्मणे स्थीर । खुणा दावी खा रे क्षीर ॥ ६ ॥ जोगावल्यावरी । तुका करितो चाकरी ॥ ७ ॥

॥ १७५ ॥ धन्य त्या गौळणी इंद्राच्या पूजनीं । नैवेद्य हिरोनि खातो कृष्ण ॥ धृ० ॥ अरे कृष्णा इंद्र अमर इच्छिती । कोण तयांप्रति येइल आतां ॥ १ ॥ तुका ह्मणे देव दाखवी विंदान । नैवेद्य खाऊन हासों लागे ॥ २ ॥

॥ १७६ ॥ तुह्मी गोपी बाळा मज कैशा नेणा । इंद्र अमरराणा म्याचि केला ॥ धृ० ॥ इंद्र चंद्र सूर्य ब्रह्मा तिन्ही लोक । माझे सकळीक यम धर्म ॥ १ ॥ माजपासू-नियां जाले जीव शिव । देवांचा ही देव मी च कृष्ण ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांसी बोले नारायण । व्यर्थ मी पाषाण जन्मा आलों ॥ ३ ॥

॥ १७७ ॥ कां रे गमाविल्या गाई । आली वळती तुझी जाई ॥ मागें जालें काई । एका तें कां नेणसी ॥ धृ० ॥ केलास फजित । मागें पुढें ही बहुत ॥ लाज नाहीं नित्य । नित्य दंड पावतां ॥ १ ॥ वोला खोडा खिळ गाढी । ऐसा कोण तये काढी ॥ धांवेल का पाडी । तुझी आधीं बोढाळा ॥ २ ॥ चाल धांवें । मी ही येतों तुजसवें । तुका ह्मणे जंव । तेथें नाहीं पावली ॥ ३ ॥

॥ १७८ ॥ काय या संतांचे मानूं उपकार । मज निरंतर जागविती ॥ धृ० ॥ काय देवा यांसि व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ १ ॥ सहज बोलणें हित उप-देश । करूनि सायास शिकविती ॥ २ ॥ तुका ह्मणे वत्स धेनुचिया चित्तीं । तैसें मज येती सांभाळित ॥ ३ ॥

॥ १७९ ॥ कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥ धृ० ॥ काला वांटूं एकमेकां । वैष्णवां निका संभ्रम ॥ १ ॥ वांकुलिया ब्रह्मादिकां । उत्तम लोकां दाखवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे भूमंडळीं । आह्मी बळी वीर गाढे ॥ ३ ॥

॥ १८० ॥ कवळाचिया सुखें । परब्रह्म जालें गोरखें ॥ हात गोऊनि खाय मुखें । बोटासांदी लोणचें ॥ धृ० ॥ कोण जाणें तेथें । कोण लाभ कां तें । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥१॥ घाली हमामा हुंबरी । पांवा वाजवी छंदें मोहरी ॥ गोपाळांचे फेरी । हरि छंदें नाचतसे ॥ २ ॥ काय नव्हतें त्या घरीं खावया । रिघे लोणी चोरावया ॥ तुका ह्मणे सवें तया । आह्मीही सोंकलों ॥ ३ ॥

॥ १८१ ॥ कान्होबा आतां तुह्मी आह्मी च गडे । कोणाकडे जाऊं नेदूं ॥ धृ० ॥ वाहीन तुझी भारशिदोरी । वळतीवरी येऊं नेदीं ॥ १ ॥ ढवळे गाईचें दूध काढूं । एकएकल्यां ठोंबे मारूं ॥ २ ॥ तुका ह्मणे टोकवूं त्यांला । जे तुझ्या बोला मानीत ना ॥ ३ ॥

॥ १८२ ॥ बहु काळीं बहु काळीं । आह्मी देवाचीं गोवळीं ॥ धृ० ॥ नाहीं विटों देत भात । जेऊं बैसवी सांगातें ॥ १ ॥ बहु काळें बहु काळें । माझें पांवरे कांबळें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं नाहीं । त्याचें आमचें सें कांहीं ॥ ३ ॥

॥ १८३ ॥ बहु बरा बहु बरा । या सांगातें मिळे चारा ॥ धृ० ॥ ह्मणोनि जीवेंसाठीं । घेतली कान्होबाची पाठी ॥ १ ॥ बरवा बरवा दिसे । समागम याचा निमिषें ॥ २ ॥ पुढती पुढती तुका । सोंकला सोंकवितो लोकां ॥ ३ ॥

॥ १८४ ॥ येती पाण्यासी हुंबरी । त्यांचें समाधान करी ॥ धृ० ॥ ऐसी गोपाळांची सवे । जाती तिकडे मागें धांवे ॥ १ ॥ स्थिरावली गंगा । पांगविली ह्मणे उगा ॥ २ ॥ मोहरी पांवा काठी । तुका ह्मणे याजसाठीं ॥ ३ ॥

॥ १८५ ॥ वळी गाई धांवे घरा । आमच्या करी येरझारा ॥ धृ० ॥ नांव घेतां तो जवळी । बहु भला कान्हो बळी ॥ १ ॥ नेदी पडों उणें पुरें । ह्मणे अवघें चि बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंता । वाटे न व्हावा परता ॥ ३ ॥

॥ १८६ ॥ ह्मणती धालों धणीवरी । आतां न लगे शिदोरी । नये क्षणभरी । आतां यासि विसंबों ॥ धृ० ॥ चाल चाल रे कान्होबा खेळ मांडूं रानीं । बैसवूं गोठणीं गाई जमा करुनी ॥ १ ॥ न लगे जावें घरा । चुकलिया येरझारा । सज्जन सोयरा । मायबाप तूं आह्मां ॥ २ ॥ तुका ह्मणे धालें पोट । आतां कशाचा बोभाट । पाहाणें ते वाट । मागें पुढें राहिली ॥ ३ ॥

॥ १८७ ॥ तुझिये संगती । जाली आमुची निश्चिंती ॥ धृ० ॥ नाहीं देखिलें तें मिळे । भोग सुखाचे सोहळे ॥ १ ॥ घरीं ताकाचें सरोवर । येथें नवनीताचे पूर ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मी न वजों दवडितां ॥ ३ ॥

॥ १८८ ॥ कामें पीडिलों माया । बहु मारी नाहीं दया ॥ धृ० ॥ तुझ्या राहिलों आधारें । जालें अवघें चि बरें ॥ १ ॥ तुझे लागलों संगती । आतां येतों काकुळती ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझ्या भिडा । कान्होबा हे गेली पीडा ॥ ३ ॥

# टिपरी.

॥ १८९ ॥ खेळ मांडियेला वाळवंटीं घाई । नाचती वैष्णव भाई रे ॥ क्रोध अभिमान केला पावटणी । एक एकां लागतील पायीं रे ॥ धृ० ॥ नाचती आनंदकल्लोळीं । पवित्र गाणें नामावळी । कळिकाळावरि घातलीसे कास । एक एकाहूनी बळी रे ॥ १ ॥ गोपीचंदनउटी तुळसीच्या माळा । हार मिरवती गळां । टाळ मृदंग घाई पुष्पवरुषाव । अनुपम्य सुखसोहळा रे ॥ २ ॥ लुब्धलीं नादीं लागली समाधी । मूढ जन नर नारी लोकां । पंडित ज्ञानी योगी महानुभाव । एकचि सिद्धसाधकां रे ॥ ३ ॥ वर्णाभिमान विसरली याती । एकएकां लोटांगणीं जाती । निर्मळ चित्त झालीं नवनीतें । पाषाणा पाझर सुटती रे ॥ ४ ॥ होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले हे वैष्णव वीर रे । तुका ह्मणे सोपी केली पायवाट । उतरावया भवसागर रे ॥ ५ ॥

॥ १९० ॥ एके घाईं खेळतां न पडसी डाईं । दुजयाशनें ठकसील भाई रे । त्रिगुणांचे फेरी थोर कष्टी होसी । या चौर्‍यांशी तरी धरीं सोई रे ॥ धृ० ॥ खेळ खेळोनियां निराळा चि राही । सांडी या विषयाची घाई रे । तेणें चि खेळें बसवंत होसी । ऐसें सत्य जाणें माझ्या भाई रे ॥ १ ॥ सिंपियाचा पोर एक खेळिया नामा । तेणें विठ्ठल बसवंत केला रे । आपुल्या सवंगडिया सिकवूनि घाई । तेणें सकळ जन जागविला रे । एक घाईं खेळतां तो न चुके चि कोठें । तया संत जन मानवले रे ॥ २ ॥ ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा । सोपान आनंदें खेळती रे । कान्हो गोवारी त्यांनीं बसवंत केला । आपण भोंवतीं नाचती रे । सकळिकां मिळोनि एकी च घाई । त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ॥ ३ ॥ रामा बसवंत कबीर खेळिया । जोडा बरवा मिळाला रे । पांचा संवगडियां एक चि घाई । तेथें नाद बरवा उमटला रे । ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां त्यांनीं । तो ही खेळ निवडिला रे ॥ ४ ॥ ब्राह्मणाचा पोर खेळिया एका भला । तेणें जन खेळकर केला रे । जनार्दन बसवंत करूनियां । तेणें वैष्णवांचा मेळ मेळविला रे । एकचि घाई खेळतां खेळतां । आपणचि बसवंत जाला रे ॥ ५ ॥ आणीक खेळिये होउनियां गेले । वर्णावया वाचा मज नाहीं रे । तुका ह्मणे गडे हो हुशारूनि खेळा । पुढिलांची धरूनियां सोई रे । एकचि घाइ खेळतां जो चुकला । तो पडेल संसारडाईं रे ॥ ६ ॥

॥ १९१ ॥ बाराही सोळा गडियांचा मेळा । सतरावा बसवंत खेळिया रे । अतित पद राखों जेणें टिपरीया घाई । अनुहातें वाद्यें मांदळा रे ॥ धृ० ॥ नाचत पंढरिये जाऊं रे खेळिया । विठ्ठल रखुमाई पाहूं रे ॥ १ ॥ सा चहूं वेगळा अठराही निराळा । बाकें वाजवूं एक चाळा रे । विसरती पक्षी चारा घेणें पाणी । तारुण्य वहभाव बाळा रे ॥ २ ॥ आनंद तेथिचा मुकियासि वाचा । बहिर ऐकती कानीं रे । आंधळयांसि डोळे पांगुळांसि पाय । तुका ह्मणे वृद्ध होती तरणे रे ॥ ३ ॥

॥ १९२ ॥ दोन्ही टिपरीं एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे । कुसरी अंगें

मोडितील परी । मेळविति एका छंदें रे ॥ धृ० ॥ कांहींच न वजे वांयां रे । खेळियां एकचि बसवंत अवघियां रे । सम विषम तेथें होऊं च नेदी । जाणऊनि आगळियां रे ॥ १ ॥ संत महंत सिद्ध खेळतील घाईं । तेच सांभाळी माझ्या भाई रे । हात राखोन हाणिती टिपऱ्या । टिपरें मिळोनि जाय त्याची सोई रे ॥ २ ॥ विताळाचें अवघें जाईल वांयां । काय ते शृंगारूनि काया रे । निवडूनि बाहेर काढिती निराळा । जो न मिळे संताचिया घाई रे ॥ ३ ॥ प्रकाराचें काज नाहीं सोडी लाज । निःशंक होउनियां खेळें रे । नेणतीं नेणतींच एकें पावलीं मान । विठ्ठल नामाचिया बळें रे ॥ ४ ॥ रोमांच गुढिया डोलविती अंगें । भावबळें खेळविती सोंगें रे । तुका ह्मणे कंठ सद्गदित दाटे । या विठोबाच्या अंगसंगें रे ॥ ५ ॥

॥ १९३ ॥ या रे गडे हो धरूं घाई जाणतां ही नेणतां । नाम गाऊं टाळी वाऊं आपुलिया हिता ॥ धृ० ॥ फावलें तें घ्यारे आतां प्रेमदाता पांडुरंग । आजि दिवस सोनियाचा वोडवला रंग ॥ १ ॥ हिंडती रानोरान भुजंगांत कांट्यावन । सुख तयांहून आह्मां गातां नाचतां रे ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रह्मादिकां सांवळें दुर्लभ सुखा । आजि येथें आलें फुका नाम मुखा कीर्तनीं ॥ ३ ॥

॥ १९४ ॥ भीमातीरीं एक वसलें नगर । त्याचें नांव पंढरपुर रे । तेथील मोकासी चार भुजा त्यासी । बाइल सोळा हजार रे ॥ धृ० ॥ नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया । सुख देईल विसावा रे । पुढें गेले ते निधाई जाले । वाणितील त्याची सीमा रे ॥ १ ॥ बळियां आगळा पाळी लोकपाळां । रीघ नाहीं कळिकाळा रे । पुंडलीक पाटील केली कुळवाडी । तो जाला भवदुःखा वेगळा रे ॥ २ ॥ संतसज्जनीं मांडिलीं दुकानें । जया जें पाहिजे तें आहे रे । भुक्तिमुक्ति फुकाच साटीं । कोणी तयाकडे न पाहे रे ॥ ३ ॥ दोन्हीच हाट भरले घनदाट । अपार मिळाले वारकरी रे । न वजों ह्मणती आह्मी वैकुंठा । जिहीं देखिली पंढरी रे ॥ ४ ॥ बहुत दिस होती मज आस । आजि घडलें सायासीं रे । तुका ह्मणे होय तुमचेनी पुण्यें । भेटी तया पायांसी रे ॥ ५ ॥

॥ १९५ ॥ पंढरी चोहटा मांडियेला खेळ । वैष्णव मिळोनि सकळ रे । टाळ दिंपरी मांदळें एक नाद रे । जाला बसवंत देवकीचा बाळ रे ॥ धृ० ॥ चला तें कवतुक भाई रे । पाहों डोळां कामीं गुंतलेति काई रे । भाग्यवंत कोणी गेले सांगातीं । ऐसें सुख त्रिभुवनीं नाहीं रे ॥ १ ॥ आनंदाचे वाद सुखाचे संवाद । एक एका दाखविती छंद रे । साही अठरा चारी घालुनियां घाई । नाचती फेरी टाळसुद्ध रे ॥ २ ॥ भक्तींचीं भूषणें मुद्रा आभरणें । शोभती चंदनाच्या उट्या रे । सत्व सुंदर कास घालूनि कुसरी । गर्जती नाम बोभाटीं रे ॥ ३ ॥ हरि हर ब्रह्मा तीर्थासहित भीमा । देव कोटी तेहतीस रे । विस्मित होऊनि ठाकले सकळ जन । अमरावती केली ओस रे ॥ ४ ॥ वाणितील थोरी वैकुंठींची परी । न पवे पंढरीची सरी रे । तुकयाचा दास ह्मणे नका आळस करूं । सांगतों नरनारींस रे ॥ ५ ॥

॥ १९६ ॥ ब्रह्मादिकां न कळे खोळ । ते हे आकळ धरिली ॥ धृ० ॥ मोहरी पांवा

चाहे काठी। धांवें पाठीं गाईचे ॥ १ ॥ उच्छिष्ट न लभे देवा। तें हें सदैवां गोवळयां ॥ २ ॥ तुका ह्मणे जोड जाली। ते हे माउली आमुची ॥ ३ ॥

॥ १९७ ॥ कान्होबा तूं आलगट। नाहीं लाज बहु धीट। पाहिलें वाईट। बोलोनियां खोटें ॥ धृ० ॥ परि तूं न सांडिसी खोडी। करिसी केली घडीघडी। पाडीसी रोकडी तुटी माये आह्मांसी ॥ १ ॥ तूं ठायींचा गोवळ। अविचारी अनर्गळ। चोरटा शिंदळ। ऐसा पिटूं डांगोरा ॥ २ ॥ जरी तुझी आई। आह्मी घालूं सर्वा ठायीं। तुका ह्मणे तें हीं। तुज वाटे भूषण ॥ ॥ ३ ॥

॥ १९८ ॥ भोजनाच्या काळीं। कान्हो मांडियेली आळी। काला करी वनमाळी। अन्न एकवटा। देई निवडुनी। माते ह्मणतो जननी। हात पिटूनि मेदिनी। वरि अंग घाली ॥ धृ० ॥ कैसा आळी घेसी। नव्हे तेंचि करविसी। वेई दुसरें तयेसी। वारी ह्मणे नको ॥ १ ॥ आतां काय करूं। नये यासि हाणूं मारूं। नव्हे बुझावितां स्थिरू। कांहीं करिना हा। त्यांचि केलें एके ठायीं। आतां निवडुनि खाई। आह्मा जाचितोसि काई। हरिसि ह्मणे माता ॥ २ ॥ त्याचें तयाकुन। करवितां तुटे भान। तंव जालें समाधान। उठोनियाँ वैसे। माते बरें जाणविलें। अंग चोरूनि आपुलें। तोडियेलें एका बोलें। कैसें सुखदुःख ॥ ३ ॥ ताट पालवें झाकिलें। होतें तैसें तेथें केलें। भिन्नाभिन्न निवाडिलें। अन्नें वेगळालीं। विस्मित जननी। भाव देखोनियां मनीं। ह्मणे नाहीं ऐसा कोणी। तुज सारिखा रे ॥ ४ ॥ हरुषली माये। सुख अंगीं न समाये। कवळूनि बाहे। देती आलिंगन। आनंद भोजनीं। तेथें फिटलीसे धणी। तुका ह्मणे कोणी। सांडा शेष मज ॥ ५ ॥

॥ १९९ ॥ चला वळूं गाई। बैसों जेऊं एके ठायीं ॥ धृ० ॥ बहु केली वणवण। पायपिटी जाला सिण ॥ १ ॥ खांदीं भार पोटीं भुक। काय खेळायाचें सुख ॥ २ ॥ तुका ह्मणे धांवें। मग अवघें बरवें ॥ ३ ॥

॥ २०० ॥ नेणों वेळा काळ। घालों तुझ्यानें सकळ ॥ धृ० ॥ नाहीं नाहीं रे कान्होबा भय आह्मापाशीं। वळूनि पुरविसी गाई पोटा खावया ॥ १ ॥ तुजपाशीं भये। हें तों बोलों परी नये ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल। आह्मा अनुभवें फोल ॥ ३ ॥

## विटूदांडू.

॥ २०१ ॥ सारा विटूदांडू। आणीक कांहीं खेळ मांडूं ॥ धृ० ॥ बहु अंगा आलें डाव। स्थिर नाहीं कोठें पाव ॥ १ ॥ कोली हाणे टोला। झेली तेणें तो गोविला ॥ २ ॥ एकमेकां हाका मारी। सेल जाळी एक धरी ॥ ३ ॥ राजी आलें नांव। फेरा न चुकेचि धांव ॥ ४ ॥ पुढें एक पाटी। एक एकें दोघां आटी ॥ ५ ॥ एका सोस पोटीं। एक धांवे हात पिटी ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां। खेळ मोडावा परता ॥ ७ ॥

॥ २०२ ॥ पाहातां गोवळी। खाय त्यांची उष्टावळी ॥ धृ० ॥ करिती नामाचें चिंतन

गडी कान्होबाचें ध्यान ॥ १ ॥ आली व्यावी डाई । धांवे वळत्या मागें गाई ॥ २ ॥ एके ठायीं काला । तुका ह्मणे भाविकाला ॥ ३ ॥

॥ २०३ ॥ पैल आली आगी कान्हो काय रे करावें । न कळे तें कैसें आजि वांचों आह्मी जीवें ॥ धृ० ॥ धांव रे हरी सांपडलों संधी । वोणव्याचे मधीं बुद्धि कांहीं करावी ॥ १ ॥ अवचितां जाळ येतां देखियेला वरी । परतोनि पाहतां आधीं होतों पाठमोरी ॥ २ ॥ सभोंवता फेर रीग न पुरे पळतां । तुका ह्मणे जाणसी तें करावें अनंता ॥ ३ ॥

॥ २०४ ॥ भिऊं नका बोले झाकुनियां राहा डोळे । चालवील देव धाक नाहीं येणें वेळे ॥ धृ० ॥ बाप रे हा देवांचाही देव काळों । नेदी माव काय करी करवी ते ॥ १ ॥ पसरूनि मुख विश्वरूप खाय जाळ । सारूनियां संधीं अवघे पाहाती गोपाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी मागें भ्यालों वांयांविण । कळों आलें आतां या सांगातें नाहीं शिण ॥ ३ ॥

॥ २०५ ॥ नेणती तयांसि साच भाव दावी हरी । लाज नाहीं नाचे पांवा वाजवी मोहरी ॥ धृ० ॥ चला रे याच्या पायां लागों आतां । राखिलें जळतां महा आगीपासुनी ॥ १ ॥ कैसी रे कान्होबा एवढी गिळियेली आगी । न देखा पोळला तुज तोंडीं कोठें अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी कां रे करितां नवल । आमची सिदोरी खातो—त्याचें आलें बळ ॥ ३ ॥

॥ २०६ ॥ त्यांनीं धणीवरी संग केला हरीसवें । देऊनि आपुलें तोचि देईल तें खावें ॥ धृ० ॥ न ठेवी आभार प्रेमाचा भुकेला । बहु दिवस संग हाचि निर्धार त्याला ॥ १ ॥ कान्होबा तूं जेवीं घासोघासीं ह्मणती । आरुष गोपाळें त्यांची बहु देवा प्रीती ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां जाऊं आपुलिया घरा । तोय वांचविलें ऐसें सांगों रे दातारा ॥ ३ ॥

॥ २०७ ॥ द्या रे भोंकरें भाकरी । दहींभाताची सिदोरी । ताक सांडीं दुरी । असेल तें तयापें ॥ धृ० ॥ येथें द्यावें तैसें घ्यावें । थोडें परी निरें व्हावें । सांगतों हें ठावें । असों द्या रे सकळां ॥ १ ॥ माझें आहे तैसें पाहे । नाहीं तरी घरा जाये । चोरोनियां माये । नवनीत आणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । माझें कोणी नाहीं हरी । नका करूं दुरी । मज पायां वेगळें ॥ ३ ॥

॥ २०८ ॥ काल्याचिये आसे । देव जळीं जाले मासे । पुसोनियां हांसे टिरीसांगातें ज्ञान ॥ धृ० ॥ लाजे त्यासि वाटा नाहीं । जाणे अंतरींचें तेंही । दीन होतां कांहीं । होऊं नेदी वेगळें ॥ १ ॥ उपाय अपाय यापुढें । खोटे निवडितां कुडे । जोडूनियां पुढें । हात उभे तुपेक्षी ॥ २ ॥ तें द्या रे सावकाशें । जया फावेल तो तैसें । तुका ह्मणे रसें । प्रेमा-न्वय आनंदें ॥ ३ ॥

॥ २०९ ॥ गोपाळ ह्मणती कान्होबा या रे कांहीं मागों । आपुलाले आह्मी जीवींची तया आवडी सांगों । एक ह्मणती उगे रे उगे मागेंचि लागों । निजों नका कोणी घरीं रे आजि अवघेचि जागों ॥ धृ० ॥ जाणोनि नेणता हरि रे मध्यें उगाचि बैसे । नाइकोनि बोल अइके कोण कोणाचे कैसे । एक एकाच्या संवादा जाणे न मिळेची ऐसें । पोटींचें होटा आणवी देतो तयांसि तैसें ॥ १ ॥ एक ह्मणाते बहु रे

आह्मी पीडिलों माया। नेदी दहींभातसिदोरी ताक घालिती पिया। तापलों वळितां गोधनें नाहीं जीवन छाया। आतां मागों पोटभरी रे याच्या लागोनि पायां ॥ २ ॥ एक ह्मणति तुमचें अरे पोट तें किती। मागों गाई ह्मैसी घोडे रे धन संपत्ति हत्ती। देव गडी कान्हो आमुचा आह्मां काय विपात। कन्याकुमरें दासी रे बाजावरी सुपती ॥ ३ ॥ एक ह्मणती बेटे हो कोण करी जतन। गाढव तैसें चि घोडे रे कोण तयाचा मान। लागे भवरोग वाहतां खांदीं चवघे जण। हातीं काठ्या डोया बोडक्या हिंडी मोकळे राण ॥ ४ ॥ एक ह्मणती रानी रे बहु सावजें फार। फाडफाडूं खाती डोळे रे पाय नेतील कर। राखोनि राखे आपणा ऐसा कइचा शूर। बैसोनि राहों घरीं रे कोण करी हे चार ॥ ५ ॥ घरीं बैसलिया बहुतें बहु सांगती काम। रिकामें कोणासी नाव ऐसें आह्मासि ठावें। चौघांमध्यें बरें दिसेसें तेथें नेमक व्हावें। लपोनि सहज खेळतां भलें गडियासवें ॥ ६ ॥ एक ह्मणती गडी ते भले मिळती मता। केली तयावरी चाली बरी आपुली सत्ता। नसावे ते तेथें तैसे रे खेळ हाणिती लाता। रडी एकापुढें गेलिया गोंधळ उडती लाता ॥ ७ ॥ एक ह्मणती खेळतां उगीं राहती पोरें। ऐसें काय घडे थके रे कोण लहान थोरें। अवघीं येती रागा रे एका ह्मणतां बरें। संगें वाढे कलह हरावा एकाएकींच खरें ॥ ८ ॥ एक ह्मणती एकला रे तूं जासील कोठें। सांडी मांडी हें वाउगें तुझे बोलचि खोटे। ठायीं राहा उगे ठायींच कांरे सिणसी वाटे। अवघि यांची सिदोरी तुझे भरली मोटे ॥ ९ ॥ तुका ह्मणे काय काहण्या अरे सांगाल गोष्टी। चाटावे तुमचे बोल रे भुका लागल्या पोटीं। जागा करूं या रे कान्होबा मागों कवळ ताटीं। धाले गडी तुका ढेकर देतो विठ्ठल कंठीं ॥ १० ॥

॥ २१० ॥ आजि ओस अमरावती। काला पाहावया येती। देव विसरली। देहभान आपुला ॥ धृ० ॥ आनंद न समाये मेदिनी। चारा विसरल्या पाणी। तटस्थ व्या ध्यानीं। गाई जाल्या श्वापदें ॥ १ ॥ जें या देवांचें दैवत। उभें आहे या रंगांत। गोपाळांसहित। क्रीडा करी कान्होबा ॥ २ ॥ तया सुखाची शिराणी। तीच पाउलें मेदिनी। तुका ह्मणे मुनी। धुंडितां न लाभती ॥ ३ ॥

॥ २११ ॥ चला बाई पांडुरंग पाहूं वाळवंटीं। मांडियेला काला भोंवती गोपाळांची दाटी ॥ धृ० ॥ आनंदें कवळ देती एकामुखीं एक। न ह्मणती सान थोर अवघी सकळिक ॥ १ ॥ हमामा हुंबरी पांवा वाजविती मोहरी। घेतलासे फेर मार्जी चालुनियां हरी ॥ २ ॥ लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती। विसरलीं देहभाव शंका नाहीं चित्तीं ॥ ३ ॥ पुष्पांचा वरुषाव जाली आरतियांची दाटी। तुळसी गुंफोनियां माळा घालितील कंठीं ॥ ४ ॥ यादवांचा राणा गोपीमनोहर कान्हा। तुका ह्मणे सुख वाटे देखोनियां मना ॥ ५ ॥

॥ २१२ ॥ माझे गडी कोण कोण। निवडा भिन्न यांतुनी ॥ धृ० ॥ आपआपणामध्यें मिळों। एक खेळों एकाशीं ॥ १ ॥ घाबरियांच्या मोडा काड्या। धाडा भाड्यां वळतियां ॥ २ ॥ तुका ह्मणे देवापाशीं। विटाळशी नसावी ॥ ३ ॥

॥ २१३ ॥ हेंचि अनुवाद सदा सर्वकाळ । करुनियां गोपाळकाला सेवूं ॥ धृ० ॥ घोरसलें कामधेनूचें दुभतें । संपूर्ण आइतें गगनभरी ॥ १ ॥ संत सनकादिक गोमट्या घरवडी । विभाग आवडी इच्छेचिये ॥ २ ॥ तुका ह्मणे मधीं घालूं नारायण । मग नव्हे सीण कोणा खेळें ॥ ३ ॥

॥ २१४ ॥ अधिकाचा मज कांटाळा । तुह्मां गोपाळां संगती ॥ धृ० ॥ काय नाहीं तुह्मापाशीं । सकळांविशीं संपन्न ॥ १ ॥ उद्योगाचा नेघें भार । लागल्या सार पुरतें ॥ २ ॥ तुका ह्मणे अधीर जिणें । नारायणें न करावें ॥ ३ ॥

॥ २१५ ॥ जालों आतां एके ठायीं । न वंचूं कांहीं एकमेकां ॥ धृ० ॥ सरलों हेंगे देउनि मोट । कटकट काशाची ॥ १ ॥ सोडोनियां गांठी पाहें । काय आहे त्यांत तें ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों निराळा । आतां गोपाळा देऊं बोभा ॥ ३ ॥

॥ २१६ ॥ यारे करुं गाई । जमा निजलेती काई । बोभाटानें आई । घरा गेल्या मारील ॥ धृ० ॥ घाला घाला रे कुकारे । ज्याची तेणेंचि मोहरे । एवढेंचि पुरे । केलियानें सावध ॥ १ ॥ नेणोनियां खेळा । समय समयाच्या वेळा । दुश्चिताजवळ । मिळालेति दुश्चित ॥ २ ॥ तुका ह्मणे शीक । न धरितां लागे भीक । धरा सकळीक । मनेरीं धांवा वळतियां ॥ ३ ॥

॥ २१७ ॥ वोळलीचा दोहूं पान्हा । मज कान्हा सांगितला ॥ धृ० ॥ घ्याजी हेंगे क्षीर हातीं । निगुतीनें वाढावें ॥ १ ॥ सांगितलें केलें काम । नव्हे धर्म सत्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे नवें जुनें । ऐसें कोणें सोसावें ॥ ३ ॥

॥ २१८ ॥ येइल तें घेइन भागा । नव्हे जोगा दुसरिया ॥ धृ० ॥ आवडी ते तुह्मी जाणा । बहु गुणांसारिखी ॥ १ ॥ मज घेती डांगवरी । सवें हरि नसलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे राबवा देवा । करीन सेवा सांगितली ॥ ३ ॥

॥ २१९ ॥ अंतरली कुटी भेटी । भय धरूनियां पोटीं । ह्मणतां जगजेठी । धांवें करुणाउत्तरीं ॥ धृ० ॥ बाप बळिया शिरोमणी । उतावीळ या वचनीं । पडलिया कानीं । धांवा न करी आळस ॥ १ ॥ बळ दुनी शरणागता । स्वामी वाहों नेदी चिंता । आइतेंचि दाता पंगतीस बैसवी ॥ २ ॥ वाहे खांदीं पाववी घरा । त्याच्या करीं येरझारा । बोबड्या उत्तरा । स्वामी तुकया मानवे ॥ ३ ॥

॥ २२० ॥ धन्य तें गोधन कांबळी काष्ठिका । मोहरी पांवा निका ब्रीद वांकी ॥ धृ० ॥ धन्य तें गोकुळ धन्य ते गोपाळ । नर नारी सकळ धन्य जाल्या ॥ १ ॥ धन्य ते देवकी जसवंती दोहींचें । वसुदेवनंदाचें भाग्य जालें ॥ २ ॥ धन्य त्या गोपिका सोळा सहस्र बाळा । यादवां सकळां धन्य जालें ॥ ३ ॥ धन्य ह्मणे तुका जन्मा तींचि आलीं हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ४ ॥

॥ २२१ ॥ गौळणीं बांधिती धारणासि गळा । खेळे त्या गोपाळांमाजी ब्रह्म ॥ धृ० ॥ धांवोनियां मागे यशोदे भोजन । हिंडे रानोरान गाईपाठीं ॥ १ ॥ तुका ह्मणे सर्व काळ ज्याचे अंगीं । भोळेपणालागीं भीक मागे ॥ २ ॥

॥ २२२ ॥ देखिलासि माती खातां । दावियानें बांधी माता ॥ धृ० ॥ जाळी घेऊनि कांबळी काठी । गाई वळी वेणु पाठीं ॥ १ ॥ मोठें भाग्यार्थाचें बळ । देव जाला त्याचें बाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तासाठीं । देव धांवे पाठोंपाठीं ॥ ३ ॥

॥ २२३ ॥ हा गे माझे हातीं । पाहा कवळ सांगाती ॥ धृ० ॥ देवें दिला खातों भाग । कराल तर करा लाग ॥ १ ॥ घालें ऐसें पोट । वरी करूनियां बोट ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । मग कैच्या या परी ॥ ३ ॥

॥ २२४ ॥ अवघें अवघीकडे । दिलें पाहे मजकडे ॥ अशा संवगडे । साहित थोरी लागली ॥ धृ० ॥ कां रे धरिला अबोला । माझा वांटा देई मला ॥ सिदोरीचा केला । झाडा आतां निवडे ना ॥ १ ॥ भूक लागली अनंता । कां रे नेणसी जाणतां । भागलों वळितां । गाई सैरा ओढाळा ॥ २ ॥ तुका करुणा भाकी । हरि पाहे गोळा टाकी ॥ घेता जाला सुखी । भीतरी वांटी आणीकां ॥ ३ ॥

॥ २२५ ॥ आह्मी गोवळीं रानटें । नव्हों जनांतील धीटें ॥ धृ० ॥ सिदोरीचा काल्या काला । एक वांटितों एकाला ॥ १ ॥ खेळों आपआपणाशीं । आमचीं तीं आह्मांपाशीं ॥ २ ॥ मिळालों नेणते । तुका कान्होबा भोंवते ॥ ३ ॥

॥ २२६ ॥ " अवघियां दिला गोर । मजकरे पाहीना " ॥ धृ० ॥ फुगे गोपाळ डोळे चोळी । ढुंगा थापली ह्मणे तोंडा ॥ १ ॥ आवडती थोर मोटे । मी रे पोरटें दैन्यवाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणों भाव । जीविचा देव बुझावी ॥ ३ ॥

## मृदंग पाठ्या.

॥ २२७ ॥ मागें पुढें पाहें सांभाळूनि दोनी ठाय । चुकावूनि जाय गडी राखे गडियांसी ॥ धृ० ॥ मुरडे दंडा दोहीं तोंडे गडियां सावध करी । भेटतियासंगें तया हाल तुजवरी ॥ १ ॥ गडियां गडी वांटुनि देई । ज्याचा सोडी तेचि ठायीं ॥ २ ॥ अगळ्या बळें करील काय । तुज देणें लागे डोय ॥ ३ ॥ नवां घरीं पाउला करीं । सांपडे तो तेथें धरीं ॥ ४ ॥ जिंकोनि डाव करीं । टाहो सत्ता आणिकांवरी ॥ ५ ॥ सांपडोनि डाई बहू । काळ गुंतलासी ॥ ६ ॥ वळिया गडी फळी । फोडी न धरितां त्यांसी ॥ ७ ॥ चुकांडी जो खाय मिळोनि अंगीं जाय । गुंतलासी काय तुका ह्मणे अझुनी ॥ ८ ॥

॥ २२८ ॥ पाहा रे तमाशा तुमचा येथें नव्हे लाग ॥ देईन तो भाग आलियाचा बाहेरी ॥ धृ० ॥ जागा रे गोपाळा नो ठायीं ठायीं जागा । चाहुलीनें भागा दूर मजपासूनि ॥ १ ॥ न रिघतां ठाव आह्मा ठावा पाळतियां । भयाभीत वांयां तेथें काय चांचपा ॥ २ ॥ तुका ह्मणे हातां चढे जीवाचिये चाटीं । मिटकया देतां गोड मग लागतें शेवटीं ॥ ३ ॥

॥ २२९ ॥ डाई घालुनियां पोरें । त्यांचीं गुरें चुकवीलीं ॥ धृ० ॥ खेळ खेळतां फोडिल्या डोया । आपण होय निराळा ॥ १ ॥ मारिती माया घेती जीव । नाहीं कींव अन्यायें ॥ २ ॥ तुका कान्होबा मागें । तया अंगें कळों आलें ॥ ३ ॥

॥ २३० ॥ आतां हेंचि जेऊं हेंचि जेऊं । सवें घेऊं सिदोरी ॥ धृ० ॥ हरिनामाचा खिचडा केला । प्रेमें मोहिला साधनें ॥ १ ॥ चवीं चवीं घेऊं घास । ब्रह्मरस आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे गोड लागे । तों तों मागे रसना ॥ ३ ॥

॥ २३१ ॥ अवघेंचि गोड जालें । मागीलिये भरी आलें ॥ धृ० ॥ साह्य जाला पांडुरंग । दिला अभ्यंतरीं संग ॥ १ ॥ थडिये पावतां तो वाव । मागें वाहावतां ठाव ॥ २ ॥ तुका ह्मणे गेलें । स्वप्नींचें जागें जालें ॥ ३ ॥

॥ २३२ ॥ तुजसवें येतों हरी । आह्मां लाज नाहीं तरी । उचलिला गिरी । चांग तईं वांचलों ॥ धृ० ॥ मोडा आतां खेळ । गाई गेल्या जाला वेळ । फांकल्या ओढाळ । नाहीं तोंचि आवरा ॥ १ ॥ चांगदेवें यमुनेसी वांचलों बुडतां । निलाजिरीं आह्मी नाहीं भय धाक या अनंता ॥ २ ॥ खातों आगी माती । आतां पुरे हा सांगाती । भोंवता भोंवेल । आह्मां वाटतें हें चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे उरी नाहीं तुजसवें । शाहाणिया दुरी छंद भोळिया सवें ॥ ४ ॥

॥ २३३ ॥ नको आह्मांसवें गोपाळा । येऊं ओढाळा तुझ्या गाई ॥ धृ० ॥ कोण धांवे त्यांच्या लागें । मागें मागें येरझारी ॥ १ ॥ न बैसती एके ठायीं । धांवती दाही दाहा वाटां ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं राख मनेरी । मग त्या येरी आह्मी जाणों ॥ ३ ॥

॥ २३४ ॥ मागायास गेलों सिदोरी । तुझ्या मायाघरीं गांजियेलों ॥ धृ० ॥ तुजविणें ते नेदी कोणा । सांगतां खुणा जिवें गेलों ॥ १ ॥ वांयांविण केली येरझार । आतां पुरे घर तुझी माया ॥ १ ॥ तुका ह्मणे तूं आह्मां वेगळा । राहें गोपाळा ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ २३५ ॥ काकुलती येतो हरी । क्षणभरी निवडितां ॥ धृ० ॥ तुमची मज लागली सवें । ठायींचे नवे नव्हों गडी ॥१॥ आणीक बोलाविती फार । बहु थोर नावडती ॥२॥ भाविकें त्यांची आवडी मोठी । तुका ह्मणे मिठी घाली जिवें ॥ ३ ॥

॥ २३६ ॥ वरतां वेघोंनि घातली उडी । कळंबाबुडीं यमुनेसी ॥ धृ० ॥ हरि बुडाला बोंब घाला । घरचीं त्यांला ठावा नाहीं ॥ १ ॥ भवनदीचा न कळे पार । काळिया माजी थोर विखार ॥ २ ॥ तुका ह्मणे काय वाउग्या हाका । हातींचा गमावूनिया थिका ॥ ३ ॥

॥ २३७ ॥ अवघीं मिळोनि कोल्हाळ केला । आतां होता ह्मणती गेला ॥ धृ० ॥ आपलिया रडती भावें । जयासवें जयापरी ॥ १ ॥ चुकलों आह्मी खेळतां खेळ । गेला गोपाळ हातींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे धावती थडी । न घाली उडी आंत कोणी ॥ ३ ॥

॥ २३८ ॥ भ्याली जिवा चुकली देवा । नाहीं ठावा जवळी तो ॥ धृ० ॥ आहाकट करिती हाय । हात डोकें पिटिती पाय ॥ १ ॥ जवळी होतां न कळे आह्मां । गेल्या सीमा नाहीं दुःखा ॥ २ ॥ तुका ह्मणे हा लाघवी मोटा । पाहे खोटा खरा भाव ॥ ३ ॥

॥ २३९ ॥ काळिया नाथूनि आला वरी । पैल हरी दाखविती ॥ धृ० ॥ दुसरियावें न कळे कोणा । होय नव्हेसा संदेह मना ॥ १ ॥ रूपा भिन्न पालट जाला । गोमांवळेसा पै देखिला ॥ २ ॥ आश्वासीत आला करें । तुका खरें ह्मणे देव ॥ ३ ॥

॥ २४० ॥ हरि गोपाळांसवें सकळां । भेटे गळया गळा मेळवूनी ॥ धृ० ॥ भाविकें त्यांची आवडी मोठी । सांगे गोष्टी जीविंचिया ॥ १ ॥ योगियांच्या ध्याना जो नये भाकरी त्यांच्या मागोनि खाये ॥ २ ॥ तुका ह्मणे असे शाहाणियां दुरी । बोबडियां दास हाका मारी ॥ ३ ॥

॥ २४१ ॥ धांव कान्होबा गेल्या गाई । न ह्मणे मी कोण ही काई ॥ धृ० ॥ आपुलियांचें वचन देवा । गोड सेवा करीतसे ॥ १ ॥ मागतां आधीं धावा डाव । बळिया मी तो नाहीं भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा सवें । अनुसरावें जीवेंभावें ॥ ३ ॥

॥ २४२ ॥ धाकुट्याचे मुखीं घांस घाली माता । वरी करी सत्ता शाहाणियां । ॥ धृ० ॥ ऐसें जाणपणें पडिलें अंतर वाढे तों तों थोर अंतराय ॥ १ ॥ दोन्ही उभयतां आपणचि ज्याली । आवडीची चाली भिन्न भिन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगापासुनी निराळें । निवडिलें बाळें रडतें स्तनीं ॥ ३ ॥

॥ २४३ ॥ देवाचे ह्मणोनि देवीं अनादर । हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥ धृ० ॥ आतां येथ जना ह्मणावें तें काई । जया भार डोई संसाराचा ॥ १ ॥ त्यजुनी संसार अभिमान सांडा । जुलूम हा मोटा दिसतसे ॥२॥ तुका ह्मणे आळस करूनियां साहे । बळें कैसे पाहें वायां जातीं ॥ ३ ॥

॥ २४४ ॥ उपदेश तो भलत्या हातीं । जाला चित्तीं धरावा ॥ धृ० ॥ नये आड पात्रावरी । कवटी सारी नारळें ॥ १ ॥ स्त्री पुत्र बंदीजन । नारायण स्मरविती ॥ २ ॥ तुका ह्मणे रत्नसार । परि उपकार चिंधीचे ॥ ३ ॥

॥ २४५ ॥ संतांचे गुण दोष आणितां या मना । कळिया उगाणा सुकृताचा ॥ धृ० ॥ पिळोनियां पाहे पुष्पाचा परिमळ । चिरोनि केळी केळ गाबव तो ॥ १ ॥ तुका ह्मणे गंगे आमीसि विटाळ । लावी तो चांडाळ दुःख पावे ॥ २ ॥

॥ २४६ ॥ चुंबळीचा करी चुंबळीशीं संग । अंगीं वसे रंग क्रियाहीन ॥ धृ० ॥ बीजा ऐसें फळ दावी परिपाकीं । परिमळ लौकिकीं जाती ऐसा ॥ १ ॥ माकडाच्या गळां रत्न कुळांगना । सांडूनियां सुना बिदी धुंडी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा ज्याली तें गाढवीं । फजिती ते व्हावी आहे पुढें ॥ ३ ॥

॥ २४७ ॥ सांपडला संदीं । मग बळिया पडे बंदीं ॥ धृ० ॥ ऐसी कोणी वाहे वेळ । हातीं काळाच्या सकळ ॥ १ ॥ दाता मागे दान । जाय याचका शरण ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ३ ॥

॥ २४८ ॥ सर्प विंचू दिसे । धन अभाग्या कोळसे ॥ धृ० ॥ आला डोळ्यांसि कावळ । तेणें मळलें उजळ ॥ १ ॥ अंगाचे भोंवडी । भोंय झाड फिरती धोंडी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाड । पाप ठाके हिता आड ॥ ३ ॥

॥ २४९ ॥ न देखोन कांहीं । म्यां पाहिलें सकळही ॥ धृ० ॥ जालों अवघियांपरी । मी हें माझें ठेलें दुरी ॥ १ ॥ न घेतां घेतलें । हातें पायें उसंतिलें ॥ २ ॥ खादलें न खातां ।

रसना रस जाली घेतां ॥ ३ ॥ न बोलोनि बोलें । केलें प्रगट झांकिलें ॥ ४ ॥ नाइकिलें कानीं । तुका ह्मणे आलें मनीं ॥ ५ ॥

## ब्रह्मचारी फिर्याद गेला.

॥ २५० ॥ काखे कडासन आड पडे । खडबड खडबडे हुसकलें ॥ ध्रु० ॥ शाक्करा दाक्करा । फजितखोरा लाज नाहीं ॥ १ ॥ अवघा जाला राम राम । कोणी कर्म आचरे ना ॥ २ ॥ हरिदासांच्या पडती पायां । ह्मणती तायां नागवावें ॥ ३ ॥ ठायीं ठायीं फजीत जालें । पारणें केलें अवकळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाश केला । विटंबिला वेश जिहीं ॥ ५ ॥

॥ २५१ ॥ कुटुंबाचा केला त्याग । नाहीं राग जंव गेला ॥ ध्रु० ॥ भजन तें वोंगळवाणें । नरका जाणें चुके ना ॥ १ ॥ अक्षराची केली आटी । जरी पाठीं सकळिका ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें पाय । तया जाय स्थळासी ॥ ३ ॥

॥ २५२ ॥ तारातिम वरी तोंडाच पुरतें । अंतरा हें येतें अंतरींचें ॥ ध्रु० ॥ ऐसी काय वरी दिसे ठकाठकी । दिसतें लौकिकीं सत्या ऐसें ॥ १ ॥ भोजनांत घाले विष कालवूनि । मोहचाळवणी मारावया ॥ २ ॥ तुका ह्मणे भेद देखों नये कांहीं । आवरणी पुढें सोंग दावी ॥ ३ ॥

॥ २५३ ॥ ब्रह्मनिष्ठ काडी । जरी जीवानांवें मोडी ॥ ध्रु० ॥ तया घडली गुरुहत्या । गेला उपदेश तो मिथ्या ॥ १ ॥ सांगितलें कानीं । रूप आपुलें वाखाणी ॥ २ ॥ भूतांच्या मत्सरें । ब्रह्मज्ञान नेलें चोरें ॥ ३ ॥ शिकल्या सांगे गोष्टी । भेद क्रोध वाहे पोटीं ॥ ४ ॥ निंदा स्तुति स्तवनीं । तुका ह्मणे वेची वाणी ॥ ५ ॥

॥ २५४ ॥ इहलोकींचा हा देहे । देव इच्छिताती पाहें ॥ ध्रु० ॥ धन्य आह्मी जन्मा आलों । दास विठोबाचे जालों ॥ १ ॥ आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे पावठणी । करूं स्वर्गाची निशाणी ॥ ३ ॥

॥ २५५ ॥ पंडित वाचक जरी जाला पुरता । तरी कृष्णकथा ऐके भावें ॥ ध्रु० ॥ क्षीर तुपा साकरे जालिया भेटी । तैसी पडे मिठी गोडपणें ॥ १ ॥ जाणोनियां लाभ घेईं हा पदरीं । गोड गोडावरी सेवीं बापा ॥ २ ॥ आणिकांचें मूळ उपजोनी खोड । जरी तुज चाड आहे तुझी ॥ ३ ॥ नाना परिमळ द्रव्य उपचार । अंगीं वरी सार चंदनाचा ॥ ४ ॥ जेविलयाविण शून्य ते शृंगार । तैसी गोडी हरिकथेविण ॥ ५ ॥ ज्याकारणें वेदश्रुति ही पुराणें । तेंचि विठ्ठलनामें तिष्ठे कथे ॥ ६ ॥ तुका ह्मणे येर वगडाची पेंवें । सकळकळ आघवें मूळ तेथें ॥ ७ ॥

॥ २५६ ॥ आणिकांच्या कापिती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥ ध्रु० ॥ करिती बेटे उसणवारी । यमपुरी भोगावया ॥ १ ॥ सेंदराचें दैवत केलें । नवस बोले मवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाचति पोरें । खोडितां येरें अंग दुखे ॥ ३ ॥

॥ २५७ ॥ गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोठें ब्रह्मचारी त्याग केला ॥ ध्रु० ॥

गायत्री स्वमुखें भक्षीतसे मळ । मिळाल्या वाहाळ गंगाओघ ॥ १ ॥ कागाग्नियें विप्र जन्म पिंपळांसी । पांडवकुळासि पाहातां दोष ॥ २ ॥ शकुंतळा सूत कर्ण शृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसी ॥ ३ ॥ गणिका अजामेळ कुब्जा तो विदुर । पाहातां विचार पिंगळेचा ॥ ४ ॥ वाल्हा विश्वामित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ॥ ५ ॥ न व्हावी तीं जालीं कर्मे नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त ॥ ६ ॥ तुका ह्मणे पूर्व नाठवी श्रीहरी । मूळ जो उच्चारी नरक त्यासी ॥ ७ ॥

॥ २५८ ॥ सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वानालागीं ॥ धृ० ॥ मुक्ताफळहार खरासि घातला । कस्तुरी सूकराला चोजविली ॥ १ ॥ वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खूण काय जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तांचें महिमान साधु जाणे ॥ ३ ॥

॥ २५९ ॥ ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतितपावना देवराया ॥ धृ० ॥ संसार करितां ह्मणती हा दोषी । टाकितां आळसी पोटपोसा ॥ १ ॥ आचार करितां ह्मणती हा पसारा । न करितां नरा निंदिताती ॥ २ ॥ संतसंग करितां ह्मणती हा उपदेशी । येरा अभाग्यासि ज्ञान नाहीं ॥ ३ ॥ धन नाहीं त्यासि ठायींचा करंटा । समर्थासि ताठा लाविताती ॥ ४ ॥ बहु बोलों जातां ह्मणती हा वाचाळ । न बोलतां सकळ ह्मणती गर्वी ॥ ५ ॥ भेटीसि न वजातां ह्मणती हा निष्ठुर । येतां जातां घर बुडविलें ॥ ६ ॥ लग्न करूं जातां ह्मणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥ ७ ॥ निपुत्रिका ह्मणती पहा हो चांडाळ । पातकाचें मूळ पोरवडा ॥ ८ ॥ लोक जैसा ओक धरितां धरेना । अभक्ता जिरे ना संतसंग ॥ ९ ॥ तुका ह्मणे आतां ऐकावें वचन । त्यजूनियां जन भक्ति करा ॥ १० ॥

॥ २६० ॥ धर्म रक्षावया साठीं । करणें आटी आह्मांसी ॥ धृ० ॥ वाचा बोलों वेद-नीती । करूं संतीं केलें तें ॥ १ ॥ न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ॥ २ ॥ तुका ह्मणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ३ ॥

॥ २६१ ॥ चवदा भुवनें जयाचिये पोटीं । तोचि आह्मीं कंठीं सांठविला ॥ धृ० ॥ काय एक उणें आमुचिये घरीं । वोळगती द्वारीं रिद्धिसिद्धी ॥ १ ॥ असुर जयानें घातले तोरडीं । तो आह्मांसि जोडी कर दोन्ही ॥ २ ॥ रूप नाहीं रेखा जयासि आकार । आह्मी तो साकार भक्तीं केला ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं । समान तो मुंगी आह्मा-साठीं ॥ ४ ॥ रिद्धिसिद्धि सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ ५ ॥ तुका ह्मणे आह्मी देवाहूनि बळी । जालों हे निराळी ठेवुनि माया ॥ ६ ॥

॥ २६२ ॥ केला मातीचा पशुपती । परि मातीसि काय ह्मणती । शिवपूजा शिवासि पावे । माती मातीमाजी सामावे ॥ धृ० ॥ तैसे पुजिती आह्मां संत । पूजा घेतो भगवंत । आह्मी किंकर संतांचे दास । संतपदवी नको आह्मांस ॥ १ ॥ केला पाषा-णाचा विष्णू । परी पाषाण नव्हे विष्णू । विष्णुपूजा विष्णुसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥ २ ॥ केली कांशाची जगदंबा । परि कांसे नव्हे अंबा । पूजा अंबेची

अंबेला घेणें । कांसे राहे कासेंपणें ॥ ३ ॥ ब्रह्मानंदे पूर्णामाजी । तुका ह्मणे केली कांजी । ज्याची पूजा त्याणेंचि घेणें । आह्मीं पाषाणरूप राहणें ॥ ४ ॥

॥ २६३ ॥ ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ॥ धृ० ॥ येरा मानी विधि पाळणापुरतें । देवाचीं तीं भूतें ह्मणोनियां ॥ १ ॥ सर्वभावें जालों वैष्णवांचा दास । करीन त्यांच्या आस उच्छिष्टाची ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे मानती हरिदास । तैसी नाहीं आस आणिकांची ॥ ३ ॥

॥ २६४ ॥ दया तिचें नांव भूतांचें पाळण । अणीक निर्दळण कंटकांचें ॥ १ ॥ पाप त्याचें नांव न विचारितां नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे धर्म रक्षावया साठीं । देवासही आटी जन्म घेणें ॥ ३ ॥

॥ २६५ ॥ करावें गोमटें । बाळा माते तें उमटे ॥ धृ० ॥ आपुलिया जीवाहूनी । असे वाल्हें तें जननी ॥ १ ॥ वियोग तें तिस । त्याच्या उपचारें तें विष ॥ २ ॥ तुका ह्मणे पायें । डोळा सुखावे ज्या न्यायें ॥ ३ ॥

॥ २६६ ॥ कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनी पाहे ॥ धृ० ॥ तैसें जालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा ॥ १ ॥ चुकलिया माये । बाळ हुरू हुरू पाहे ॥ २ ॥ जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ३ ॥

॥ २६७ ॥ हातीं होन दावी बेना । करिती लेंकीच्या धारणा ॥ धृ० ॥ ऐसे धर्म जाले कळीं । पुण्य रंक पाप बळी ॥ १ ॥ सांडिले आचार । द्विज चाहाड जाले चोर ॥ २ ॥ टिळे लपविती पातडीं । लेती विजारा कातडीं ॥ ३ ॥ बैसोनियां तक्तां । अन्नेंविण पिडिती लोकां ॥ ४ ॥ मुदबख लिहिणें । तेल तुपावरीं जिणें ॥ ५ ॥ नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ॥ ६ ॥ राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ॥ ७ ॥ वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥ ८ ॥ अवघे बाह्य रंग । आंत हिरवें वरी सोंग ॥ ९ ॥ तुका ह्मणे देवा । काय निद्रा केली धावा ॥ १० ॥

॥ २६८ ॥ साळंकृत कन्यादान ॥ करितां पृथ्वीसमान ॥ धृ० ॥ परि तें न कळे या मूढा । येईल कळों भोग पुढां ॥ १ ॥ आचरतां कर्म । भरे पोट राहे धर्म ॥ २ ॥ सत्या देव साहे । ऐसें करूनियां पाहें ॥ ३ ॥ अन्न मान धन । हें तों प्रारब्धा आधीन ॥ ४ ॥ तुका ह्मणे सोस । दुःख आतां पुढें नास ॥ ५ ॥

॥ २६९ ॥ दिवच्या वाचें लावुनि खाणें । करूनि मंडण दिली हातीं ॥ धृ० ॥ नवरा नेई नवरी घरा । पूजन वरा पाद्याचें ॥ १ ॥ गौरविली विहीण व्याही । घडिलें कांहीं ठेवूं नका ॥ २ ॥ करूं द्यावें न्हावें वरें । ठायींचें कां रे न कळेची ॥ ३ ॥ वऱ्हाडियांचे लागे पाठीं । जैसी उटिका तेलीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जोडिला थुंका । पुढें नरका सामग्री ॥ ५ ॥

॥ २७० ॥ ब्रह्महत्त्या मारिल्या गाई । आणीक काई पाप केलें ॥ धृ० ॥ ऐका जेणें विकिली कन्या । पवाडे त्या सुन्याचे ॥ १ ॥ नरमांस खादली भारी । हाका मारी ह्मणोनी ॥ २ ॥ अवघें पाप केलें तेणें । जेणें सोनें अभिलाषिलें ॥ ३ ॥ उच्चारितां मज तें पाप । जिव्हे कांप सुटतसे ॥ ४ ॥ तुका ह्मणे कोरान्न रांड । बेटा भांड मागे ना कां ॥ ५ ॥

॥ २७१ ॥ याचा कोणी करी पक्ष । तो ही त्याशी समतुल्य ॥ धृ० ॥ फुकासाठीं पावे दुःखाचा विभाग । पूर्वजांसि लाग निरयदंडीं ॥ १ ॥ ऐके राजा न करी दंड । जरि या लंड दुष्टासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें अन्न । मद्यपाना समान ॥ ३ ॥

॥ २७२ ॥ कपट कांहीं एक । नेणें भुलवायाचें लोक ॥ धृ० ॥ तुमचें करितों कीर्त्तन । गातों उत्तम ते गुण ॥ १ ॥ दाऊं नेणें जडीबुटी । चमत्कार उठाउठी ॥ २ ॥ नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ॥ ३ ॥ नव्हें मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ती ॥ ४ ॥ नाहीं देवार्चन । असे मांडिलें दुकान ॥ ५ ॥ नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाण खुण ॥ ६ ॥ नव्हें पुराणिक । करणें सांगणें आणीक ॥ ७ ॥ नेणें वाद घटा पटा । करितां पंडित करंटा ॥ ८ ॥ नाहीं जाळींत भणदीं । उदो ह्मणोनि आनंदी ॥ ९ ॥ नाहीं हालवीत माळा । भोंवतें मेळवुनि गबाळा ॥ १० ॥ आगमीचें कुडें नेणें । स्तंभन मोहन उच्चाटणें ॥ ११ ॥ नव्हें यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १२ ॥

॥ २७३ ॥ रडोनियां मान । कोण मागतां भूषण ॥ धृ० ॥ देवें दिलें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥ १ ॥ लावितां लावणी । विके भीके कण्या दानी ॥ २ ॥ तुका ह्मणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥ ३ ॥

॥ २७४ ॥ पूज्या एकासनीं आसनीं आसन । बैसतां गमन मातेशीं तें ॥ धृ० ॥ सांगतों तें धर्म नीतीचे संकेत । सावधान हित व्हावें तरी ॥ १ ॥ संतां ठाया ठाव पूजनाची इच्छा । जीवनींच वळसा सांपडला ॥ २ ॥ तुका ह्मणे एकाएकीं वरासन । दुजें तेथें भिन्न अशोभ्य तें ॥ ३ ॥

॥ २७५ ॥ जेणें सुखें स्तवी । तेंचि निंदे पाठीं लावी ॥ धृ० ॥ ऐसी अधमाची याती । लोंपी सोनें खाय माती ॥ १ ॥ गुदद्वारा वाटे । मिष्टान्नांचा नरक लोटे ॥ २ ॥ विंचु लाभाविण । तुका ह्मणे वाहे शीण ॥ ३ ॥

॥ २७६ ॥ अधमाची यारी । रंग पतंगाचे परी ॥ धृ० ॥ बिटे न लगतां क्षण । मोल जाय वांयां विण ॥ १ ॥ सर्पाचिया परी । विषें भरला कल्हारी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । मज ह्मणी ऐसे दावा ॥ ३ ॥

॥ २७७ ॥ आणिकांचीं स्तुति आह्मां ब्रह्महत्या । एका वांचुनि त्या पांडुरंगा ॥ धृ० ॥ आह्मां विष्णुदासां एकविध भाव । न ह्मणों या देव आणिकांसी ॥ १ ॥ शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेन ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आणिका संकल्पें । अवघींच पापें घडतील ॥ ३ ॥

॥ २७८ ॥ तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥ धृ० ॥ माझे मनोरथ सिद्धी । पाववावे कृपानिधी ॥ १ ॥ तूं तों उदाराचा राणा । माझी अल्पचि वासना ॥ २ ॥ कृपावृष्टी पाहें । तुका ह्मणे होई साहे ॥ ३ ॥

॥ २७९ ॥ संताच्या अतिक्रम । देवपूजा तो अधर्म ॥ धृ० ॥ येती दगड तैसे वरी । मंत्रपुष्पें देवा शिरीं ॥ १ ॥ अतीतासि गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । ताडण भेदकांची सेवा ॥ ३ ॥

॥ २८० ॥ करणें तें देवा । हेंचि एक पावे सेवा ॥ धृ० ॥ भवर्षे घडे येणें सांग । भक्त देवाचें तें अंग ॥ १ ॥ हेंचि एक धर्म । काय बोलिला तो धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥ ३ ॥

॥ २८१ ॥ मागें नेणपणें घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥ धृ० ॥ परनारीचें जया घडलें गमन । दावीतो वदन जननीरत ॥ १ ॥ उपदेशावरी मन नाहीं हातीं । तो आह्मां पुढती पाहूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥ ३ ॥

॥ २८२ ॥ आणिकांच्या घातें । ज्यांचीं निवतील चित्तें ॥ धृ० ॥ तेचि ओळखावे पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥ १ ॥ कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे भांडा । धीर नाहीं ज्याचा तोंडा ॥ ३ ॥

## हनुमंतस्तुति.

॥ २८३ ॥ शरण शरण जी हनुमंता । तुज आलों रामदूता ॥ धृ० ॥ काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ १ ॥ शूर आणि धीर । स्वामिकाजीं तूं सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे रुद्रा । अंजनीचिया कुमरा ॥ ३ ॥

॥ २८४ ॥ केली सीताशुद्धी । मूळ रामायणा आधीं ॥ धृ० ॥ ऐसा प्रतापी गहन । सुरां सकळ भक्तांचें भूषण ॥ १ ॥ जाऊनि पाताळा । केली देवीची अवकळा ॥ २ ॥ राम लक्ष्मण । नेले आणिले चोरून ॥ ३ ॥ जोडुनियां कर । उभा सन्मुख समोर ॥ ४ ॥ तुका ह्मणे जपें । वायुसुता जाती पापें ॥ ५ ॥

॥ २८५ ॥ काम घातला बांदोडी । काळ केला देशधडी ॥ धृ० ॥ तया माझें दंडवत । कपिकुळीं हनूमंत ॥ १ ॥ शरीर वज्रा ऐसें । कवळी ब्रह्मांड जो पुच्छें ॥ २ ॥ रामाच्या सेवका । शरण आलों ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ २८६ ॥ हनुमंत महाबळी । रावणाची दाढी जाळी ॥ धृ० ॥ तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ १ ॥ करोनि उड्डाण । केलें लंकेचें शोधन ॥ २ ॥ जाळीयेली लंका । धन्य धन्य ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ २८७ ॥ कुंभ अवघा एक आवा । पाकीं एकीं गुफे डावा ॥ धृ० ॥ ऐसे भिन्न भिन्न साटे । केले प्रारब्धानें वांटे ॥ १ ॥ हिरे दगड एक खाणी । केशें निआतीसी पाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे शिरीं । एक एकाची पायरी ॥ ३ ॥

॥ २८८ ॥ मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रिते ॥ धृ० ॥ ऐसीयाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥ १ ॥ बोलों जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे बहुतोंडे जे वाचाळ । तैंग तेंच मूळ लटिक्याचें ॥ ३ ॥

॥ २८९ ॥ न लगे चंदना सांगावा परिमळ । वनस्पतिमेळ हाकारूनी ॥ धृ० ॥ अंतरींचें धावे स्वभावें बाहेरी । धरितां ही परी आवरेना ॥ १ ॥ सूर्ये नाहीं जागें करीत या

जना । प्रकाश किरणा कर म्हून ॥ २ ॥ तुका ह्मणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ॥ ३ ॥

॥ २९० ॥ चइंनाचे हात पाय ही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ धृ० ॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥ १ ॥ तुका ह्मणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळेचि ना ॥ २ ॥

॥ २९१ ॥ मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचें कारण । मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥ धृ० ॥ मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली । मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥ १ ॥ मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य । प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगती ॥ २ ॥ साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात । नाहीं नाहीं अनुदैवत । तुका ह्मणे दुसरें ॥ ३ ॥

॥ २९२ ॥ मायबापें जरी सर्पीण बोका । त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥ धृ० ॥ चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥ तुका ह्मणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ ३ ॥

॥ २९३ ॥ शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ॥ धृ० ॥ पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निजसुखा ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी लांचासाठीं ग्वाही । देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥ ३ ॥

॥ २९४ ॥ प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥ धृ० ॥ अवघा देवचि जाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥ १ ॥ सत्वरजतमबाधा । नव्हे हरिभक्तांसि कदा ॥ २ ॥ खाय बोले करी । अवघा त्यांच्या अंगें हरी ॥ ३ ॥ देवभक्तपण । तुका ह्मणे नाहीं भिन्न ॥ ४ ॥

॥ २९५ ॥ शास्त्राचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो माझा सांगाती प्राणसखा ॥ धृ० ॥ ह्मणउनी नाहीं आणिकांचा पांग । सर्व जालें सांग नामें एका ॥ १ ॥ सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आह्मां संगें क्रीडा करी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी त्रिधींचे जनिते । स्वयंभू आइते केले नव्हों ॥ ३ ॥

॥ २९६ ॥ ऐका महिमा आवडीची । बोरें खाय भिलटीचीं ॥ धृ० ॥ थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला । अष्टमा सिद्धींला । न मनी क्षीरसागराला ॥ १ ॥ पव्हे सुदामदेवाचे । फके मारी कोरडेचे ॥ २ ॥ न ह्मणे उच्छिष्ट अथवा थोडें । तुका ह्मणे भक्तीपुढें ॥ ३ ॥

॥ २९७ ॥ कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिंति त्वां थोर मानियेली ॥ धृ० ॥ कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥ १ ॥ तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घासील भूमीसी वदन यम ॥ २ ॥ का रे नागवसी आयुष्य खातो काळ । दिसेंदिस बळ क्षीण होतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासि सांगा कोणी तरी । विसरला हरी मायबाप ॥ ४ ॥

॥ २९८ ॥ साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळां न पाहवे ॥ २ ॥

साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कापती देखोनियां ॥ २ ॥ असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २९९ ॥ आमचे गोसावी अयाचितवृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश ॥ १ ॥ दगडाची नाव आधींच ते जड । ते काय दगड तारूं जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे वेष विटंबिला त्यांनीं । सोंगसंपादणी करिती परी ॥ ३ ॥

॥ ३०० ॥ मृगजळा काय करावा उतार । पावावया पार पैल थडी ॥ धृ० ॥ खापराचे होन खेळती लेंकुरें । कोण त्या वेव्हारें लाभ हाणी ॥ १ ॥ मंगळदायक करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥ २ ॥ स्वप्नींचें जें सुखदुःख जालें काहीं । जागृतीं तों नाहीं साच भाव ॥३॥ सारीं जालीं मेलीं लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३०१ ॥ माझें ह्मणतां याला कांरे नाहीं लाज । कन्या पुत्रभाज धन वित्त ॥धृ०॥ कोणी सोडवी ना काळाचे हातींचें । एकाविणें साचें नारायणा ॥१॥ तुका ह्मणे किती सांगावें चांडाळा । नेणे जीवकळा कोण्या जीतो ॥ २ ॥

॥ ३०२ ॥ आंधळ्यासि जन अवघेंचि आंधळें । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥धृ०॥ रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासि कारण रुची नाहीं ॥ १ ॥ तुका ह्मणे शुद्ध नाहीं जों आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ २ ॥

॥ ३०३ ॥ छळी विष्णुदासा कोणी । त्याची अमंगळ वाणी ॥ धृ० ॥ येऊं न द्यावा समोर । अभागी तो दुराचार ॥ १ ॥ नावडे हरिकथा । त्याची व्यभिचारीण माता ॥ २ ॥ तुका ह्मणे याती । भ्रष्ट तयाची ते मती ॥ ३ ॥

॥ ३०४ ॥ बोलविसी तैसें आणीं अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥ धृ० ॥ मिठेंविण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥ १ ॥ संपादणीविण विटंबिलें सोंग । गुणेंविण चांग रूप हीन ॥ २ ॥ कन्यापुत्रेंविण मंगळदायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसी होते मज परी । न देखें अंतरीं प्रेमभाव ॥ ४ ॥

॥ ३०५ ॥ अंगीं ज्वर तया नावडे साकर । जन तो इतर गोडी जाणे ॥ धृ० ॥ एकाचिये तोंडीं पडिली ते माती । अवघे ते खाती पोटभरी ॥ १ ॥ चारितां बळें येत असे दांतीं । मागोनियां घेती भाग्यवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे नसे संचित हें बरें । तयासि दुसरें काय करी ॥ ३ ॥

॥ ३०६ ॥ धिग जीणें तो बाईले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥ धृ० ॥ धिग जीणें ज्याचें लोभावरी मन । अतीतपूजन घडेचि ना ॥ १ ॥ धिग जीणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥ २ ॥ धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य । झुगे मनालागीं साधूपणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ४ ॥

॥ ३०७ ॥ अरे हें देह व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें । द्यूतकर्म मनोभावें । सारी-पाट खेळावा ॥ धृ० ॥ मग कैचें हरिचें नाम । निजेलिया जागा राम । जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ॥ १ ॥ विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अतिधीट । तया

तेचि वाट । अधोगती जावया ॥ २ ॥ आणीक एक कोड । नरका जावयाची चाड । तरी संतनिंदा गोड । करीं कवतुकें सदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें । मना लावी राम पिसें । नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जासी ठकोनी ॥ ४ ॥

॥ ३०८ ॥ अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ ध्रु० ॥ नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मतीं पाषांडिया ॥ १ ॥ जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दुषिला देव ॥ ३ ॥

॥ ३०९ ॥ एक तटस्थ मानसीं । एक सहजचि आळसी ॥ ध्रु० ॥ दोन्ही दिसती सारिखीं । वर्म जाणे तो पारखी ॥ १ ॥ एक ध्यानीं करिती जप । एक बैसोनि घेती झोंप ॥ २ ॥ एकां सर्वस्वाचा त्याग । एकां पोटासाठीं जोग ॥ ३ ॥ एकां भक्ति पोटासाठीं । एकां देवासवें गांठी ॥ ४ ॥ वर्म पोटीं एका । फळें दोन ह्मणे तुका ॥ ५ ॥

॥ ३१० ॥ काय कळे बाळा । बाप सदैव दुबळा ॥ ध्रु० ॥ आहे नाहीं हें न कळे । हातीं काय कोण्या वेळे ॥ १ ॥ देखिलें तें दृष्टी । मागे घालुनियां मिठी ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । माझ्या मज समजावें ॥ ३ ॥

॥ ३११ ॥ भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥ ध्रु० ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळूनी वर्ते मन ॥ १ ॥ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवें आस ॥ २ ॥ हें नातें सें झालें । तुका ह्मणे वांयां गेलें ॥ ३ ॥

॥ ३१२ ॥ एकादशीस अन्न पान । जे नर करीती भोजन । श्वानविष्ठे समान । अधम जन तो एक ॥ ध्रु० ॥ ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥ १ ॥ अशुद्ध विटाळसीचें खळ । विडा भक्षितां तांबूळ । सांपडे सबळ । काळ्याहातीं न सुटे ॥ २ ॥ सेज बाज विलास भोग । करी कामिनीशीं संग । तया जोडे क्षयरोग । जन्मल्याचें बळिवंत ॥ ३ ॥ आपण न वजे हरिकीर्तना । आणिकां वारी जातां कोणा । त्याच्या पापें जाणा । ठेंगणा महामेरू ॥ ४ ॥ तया दंडी यमदूत । जाले तयाचे अंकित । तुका ह्मणे व्रत । एकादशी चुकलीया ॥ ५ ॥

॥ ३१३ ॥ करवितां व्रत अर्धें पुण्य लाभे । मोडवितां दोघे नरका जाती ॥ ध्रु० ॥ शुद्धबुद्धि होय दोघां एक मान । चोरासवें कोण जिवें राखे ॥ १ ॥ आपुलें देऊनी आपुला चि घात । न करावा थीत जाणोनियां ॥ २ ॥ देऊनियां वेच धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मारग मोडूं नये ॥ ४ ॥

॥ ३१४ ॥ इनामाची भरली पेठ । वाहाती दाट मारग ॥ ध्रु० ॥ अवघेची येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥ १ ॥ अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ३ ॥

॥ ३१५ ॥ वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ ध्रु० ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एक सरे भवसिंधू ॥ १ ॥ जाणत्या अजाण्या मंत्र

महा लाभ फुकासाठीं ॥ १ ॥ विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे पापें । जाति संतांचिया जपें ॥ ३ ॥

॥ ३२७ ॥ देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥ धृ० ॥ दोहीं-कडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांटा आपुलाला ॥ १ ॥ दाखविले परी नाहीं वर्जिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळबीजमात्र ॥ ३ ॥

॥ ३२८ ॥ शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटोळें ॥ धृ० ॥ ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु जाले तट ॥ १ ॥ लौकिका बाहेरी । घाली रोंखीं जया धरी ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥ ३ ॥

॥ ३२९ ॥ वैद्य वाचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ॥ धृ० ॥ काय जाणों कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ १ ॥ नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥ २ ॥ जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥ ३ ॥

॥ ३३० ॥ मारगीं बहुत । याचि गेले साधुसंत ॥ धृ० ॥ नका जाऊं आडराणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ १ ॥ चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥ २ ॥ झळ-कती पताका । गरुड टके ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ३३१ ॥ कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां । आलें वैकुंठ जवळां । सन्निध पंढरीये ॥ धृ० ॥ पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं । आवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥ १ ॥ चालती स्थिर स्थिर । गरुड टकयांचे भार । गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥ २ ॥ मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुलती । शूर उटा-वती । एका एक आगळे ॥ ३ ॥ नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें वैष्णव-दळ । कळिकाळ कांपती ॥ ४ ॥ आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटींचे सुख । धन्य धन्य मृत्युलोक । ह्मणती भाग्याचे कैसे ॥ ५ ॥ मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी । उधार नाहीं पंढरीसी । पायापाशीं विठोबाच्या ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां । काय करणें आह्मां चिंता । सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥ ७ ॥

॥ ३३२ ॥ जया दोषां परीहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढ-रपूर देखिलिया ॥ धृ० ॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मातीर्थीं विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥ १ ॥ सकळतीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥ २ ॥ नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठाया । धन्य भाग्य जयां । जे पंढरपूर देखती ॥ ३ ॥ उपजोनि संसारीं । एक वेळ पाहें पा पंढरी । महादोषां कैंची उरी । देवभक्त देखिलिया ॥ ४ ॥ ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी । सुदर्शन घरटी करी । रीग न पुरे कळिकाळा ॥ ५ ॥ तें सुख वर्णा-वया गति । एवढी कैंची मज मति । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥ ६ ॥ तुका ह्मणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । अधम जन्मांतरिचा । तया पंढरी नावडे ॥ ७ ॥

तंव काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ २ ॥ तुका ह्मणे विधि निषेध लोपला । उच्छेद या जाला मारगाचा ॥ ३ ॥

॥ ३१६ ॥ विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ धृ० ॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥ १ ॥ बहु आतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । कृपा करीजे ते देवें ॥ ३ ॥

॥ ३१७ ॥ येथींचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ धृ० ॥ वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व साटा ते ठायीं ॥ १ ॥ येथींचिया नाशवंतें । काय रितें चाळवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ३ ॥

॥ ३१८ ॥ उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ॥ धृ० ॥ बोलविले बोल बोलें । धनीविठ्ठला सन्निध ॥ १ ॥ तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामीच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे नये आह्मां । पुढें कामा गबाळ ॥ ३ ॥

॥ ३१९ ॥ बोलावें तें धर्मा मिळे । बरे डोळे उघडूनी ॥ धृ० ॥ काशासाठीं खावें शेण । जेणें जन थुंकी तें ॥ १ ॥ दुजें ऐसें काय बळी । जें या जाळी अग्नीसी ॥ २ ॥ तुका ह्मणे शूर रणीं । गांढे मनीं बुरबुरी ॥ ३ ॥

॥ ३२० ॥ बरा कुणबी केलों । नाहीं तरि दंभेंचि असतों मेलों ॥ धृ० ॥ भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥ १ ॥ विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥ २ ॥ सेवा चुकतों संताची । नागवण हे फुकाची ॥ ३ ॥ गर्व होता ताठा । जातों यमपंथें वाटा ॥ ४ ॥ तुका ह्मणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥ ५ ॥

॥ ३२१ ॥ दाता नारायण । स्वयें भोगिता आपण ॥ धृ० ॥ आतां काय उरलें वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥ १ ॥ देखती जे डोळे । रूप आपुलें तें खेळे ॥ २ ॥ तुका ह्मणे नाद । जाला अवघा गोविंद ॥ ३ ॥

॥ ३२२ ॥ कृपा करुनी देवा । मज साच तें दाखवा ॥ धृ० ॥ तुह्मी दयावंत कैसे । कीर्ति जगामाजी वसे ॥ १ ॥ पाहोनियां डोळां । हातीं ओढवाल काळा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझा करावा कुढावा ॥ ३ ॥

॥ ३२३ ॥ ठायींची ओळखी । येईल टाकूं टाका सुखीं ॥ धृ० ॥ तुमचा जाईल इमान । माझे कपाळीं पतन ॥ १ ॥ ठेविला तो ठेवा । अभिलाषें बुडवावा ॥ २ ॥ मनीं न विचारा । तुका ह्मणे हे दातारा ॥ ३ ॥

॥ ३२४ ॥ तुझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें ॥ धृ० ॥ रूप कासवाचे परी । धरनि राहेन अंतरीं ॥ १ ॥ नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । चिंतन ते तुझी सेवा ॥ ३ ॥

॥ ३२५ ॥ गहूं एकजाती । परी त्या पाधाणी नासिती ॥ धृ० ॥ वर्म जाणावें तें सार । कोठें काय थोडें फार ॥ १ ॥ कमाईच्या सारें । जाति दाविती प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥ ३ ॥

॥ ३२६ ॥ पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥ धृ० ॥ नेघे माझे वाचे तुटी ।

महा लाभ फुकासाठीं ॥ १ ॥ विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे पापें । जाति संतांचिया जपें ॥ ३ ॥

॥ ३२७ ॥ देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥ धृ० ॥ दोहीकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील सांटा आपुलाला ॥ १ ॥ दाखविले परी नाहीं वर्जिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळबीजमात्र ॥ ३ ॥

॥ ३२८ ॥ शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटोळें ॥ धृ० ॥ ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु जाले तट ॥ १ ॥ लौकिका बाहेरी । घाली रोंखीं जया धरी ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥ ३ ॥

॥ ३२९ ॥ वैद्य वाचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ॥ धृ० ॥ काय जाणों कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ १ ॥ नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥ २ ॥ जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥ ३ ॥

॥ ३३० ॥ मारगीं बहुत । याचि गेले साधुसंत ॥ धृ० ॥ नका जाऊं आडराणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ १ ॥ चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥ २ ॥ झळकती पताका । गरुड टके ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ३३१ ॥ कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां । आलें वैकुंठ जवळां । सन्निध पंढरीये ॥ धृ० ॥ पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं । आवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥ १ ॥ चालती स्थिर स्थिर । गरुड टकयांचे भार । गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥ २ ॥ मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुलती । शूर उठावती । एका एक आगळे ॥ ३ ॥ नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें वैष्णवदळ । कळिकाळ कांपती ॥ ४ ॥ आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटीचें सुख । धन्य धन्य मृत्युलोक । ह्मणती भाग्याचे कैसे ॥ ५ ॥ मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी । उधार नाहीं पंढरीसी । पायापाशीं विठोबाच्या ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां । काय करणें अह्मां चिंता । सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥ ७ ॥

॥ ३३२ ॥ जया दोषां परीहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपूर देखिलिया ॥ धृ० ॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मातीर्थीं विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥ १ ॥ सकळतीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥ २ ॥ नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठाया । धन्य भाग्य जयां । जे पंढरपूर देखती ॥ ३ ॥ उपजोनि संसारीं । एक वेळ पाहें पा पंढरी । महादोषां कैची उरी । देवभक्त देखिलिया ॥ ४ ॥ ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नर नारी । सुदर्शन घरटी करी । रीग न पुरे कळिकाळा ॥ ५ ॥ तें सुख वर्णावया गति । एवढी कैची मज मति । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥ ६ ॥ तुका ह्मणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । अधम जन्मांतरिचा । तया पंढरी नावडे ॥ ७ ॥

॥ ३३३ ॥ एक नेणतां नाडली । एकां जाणिवेची भुली ॥ धृ० ॥ बोलों नेणे मुके । वेडें वाचाळ काय निकें ॥ १ ॥ दोहीं सवा नाड । विहीर एकीकडे आड ॥ २ ॥ तुका ह्मणे कर्म । तुझें कळों नेदी वर्म ॥ ३ ॥

॥ ३३४ ॥ ह्मणवितों दास । मज एवढीच आस ॥ धृ० ॥ परी तें अंगीं नाहीं वर्म । करीं आपुला तूं धर्म ॥ १ ॥ बडबडितों तोंडें । रितें भावेंविण धेंडें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा । दावूं जाणतों पसारा ॥ ३ ॥

॥ ३३५ ॥ पूजा समाधानें । अतिशयें वाढे सीण ॥ धृ० ॥ हें तों जाणां तुह्मी संत । आहे बोलिली ते नीत ॥ १ ॥ पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माथा । पायीं ठेवीं तुह्मां संतां ॥ ३ ॥

॥ ३३६ ॥ स्वमींच्चिया गोष्टी । मज धरिलें होतें वेठी । जाल्या सेवटीं । जालें लटिकें सकळ ॥ धृ० ॥ वायां भाकिली करुणा । मूळ पावावया सिणा । राव रंक राणा । कोण स्थानावरि आहे ॥ १ ॥ सोसिलें तें अंगें । खरें होतें नव्हतां जागें । अनुभव हा सांगे । दुःखें डोळे उघडीले ॥ २ ॥ तुका ह्मणे संतीं । सावचित केलें अंतीं । नाहीं तरि होती । टाळी बैसोनि राहिली ॥ ३ ॥

॥ ३३७ ॥ आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ॥ धृ० ॥ याति कुळ येथें असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं ॥ १ ॥ काळकूट पितळ सोनें शुद्ध रंग । अंगाचेंच अंग साक्षी देतें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरी जातीसवें भेटी । नवनीत पोटीं सांटविलें ॥ ३ ॥

॥ ३३८ ॥ बाळपणीं हरि । खेळे मथुरेमाझारी । पायीं घागरिया सरी । कडदोरा वांकी । मुख पाहे माता । सुख न माये चित्ता । धन्य मानव संचित । वोडवलें भाग्य ॥ धृ० ॥ बाळ चांगलें वो । बाळ चांगलें वो । म्हणतां चांगलें । वेळ लागे तया बोलें । जीवापरीस तें वाल्हें । मज आवडतें ॥ १ ॥ मिळोनियां याती । येती नारी कुमारी बहुती । नाहीं आठव त्या चित्तीं । देहभाव कांहीं । विसरल्या घरें । तान्हीं पारठीं लेकुरें । धाक सांडोनियां येरें । तान भूक नाहीं ॥ २ ॥ एकी असतील घरीं । चित्त तयापासीं परी । वेगीं करोनि वोसरी । तेथें जाऊं पाहे । लाज सांडियली बाज । नाहीं फाजितीचें काज । सुख सांडोनियां सेज । तेथें धाव घाली ॥ ३ ॥ बांधियेल्या बाळा । नर नारी या सकळा । बाळा खेळवी अबला । त्याही विसरल्या । कुमर कुमारी । नाभाव हा शरीरीं । वृष्टी न फिरे माघारी । तया देखतां हे ॥ ४ ॥ वैरभाव नाहीं । आप पर कोणा कांहीं । शोक मोह दुःख ठायीं । तया निरसलीं । तुका म्हणे सुखी । केलीं आपणासारखीं । स्वामी माझा कवतुकें । बाळवेषें खेळे ॥ ५ ॥

॥ ३३९ ॥ अशोकाच्या वनीं सीता शोक करी । कांहो अंतरले रघुनाथ दुरी । येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी । कांहो मज आणिलें अवघड लंकापुरी ॥ धृ० ॥ सांगा वो त्रीजटे सखिये ऐसी मात । देईल कां नेदी भेटी रघुनाथ । मन उतावीळ जाला दुरी पंथ । राहों न सके प्राण माझा कुडी आंत ॥ १ ॥ काय दुष्ट आचरण होतें म्यां केलें ।

तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगीलें । गाईवत्सा पत्नीपुरुषा विघडिलें । न कळे वो संचित चरण अंतरले ॥ २ ॥ नाडियेलें आशा मृगकांतिसोनें । धाडिलें रघुनाथा पाठिलागे तेणें । उलंघिली आज्ञा माव काय मी जाणें । देखुनि सूनाट घेउनि आलें सुनें ॥ ३ ॥ नाहीं मूळ मारग लाग आणिक सोये । एकाविण नामें रघुनाथाच्या माये । उपटी पक्षिया एक देउनि पाये । उदकवेढ्यामध्यें तेथें चाले काये ॥ ४ ॥ जनकाची नंदिनी दुःखें ग्लानी थोरी । चुकली कुरंगिणी मेळा तैशा परी ॥ संमोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी । घेइल तुकीयास्वामी राम लंकापुरी ॥ ५ ॥

॥ ३४० ॥ वीट नेघे ऐसें रांधा । जेणें बाधा उपजे ना ॥ धृ० ॥ तरीच तें गोड राहे । निरें पाहे स्वयंभ ॥ १ ॥ आणिकां गुणां पोटीं वाव । दावी भाव आपुला ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध जाती । ते मागुती परतेना ॥ ३ ॥

॥ ३४१ ॥ नव्हतों सावचित । तेणें अंतरलें हित ॥ धृ० ॥ पडिला नामाचा विसर । वाढविला संसार ॥ १ ॥ लटिक्याचे पुरीं । वाहोनियां गेलों दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाव । आह्मां सांपडला भाव ॥ ३ ॥

॥ ३४२ ॥ अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ॥ धृ० ॥ आपुलालें तुह्मी करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य राम राम ॥ १ ॥ देखोनि जीवन जरि जाय तान । तरि कां सांठवण घरोघरीं ॥ २ ॥ देखोनियां छाया सुख न पवीजे । जंव न बैसीजे तया तळीं ॥ ३ ॥ हित तरी होय गातां आईकतां । जरि राहे चित्ता दृढ भाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे होसी भावेंचि तूं मुक्त । काय करिसी युक्त जाणिवेची ॥ ५ ॥

॥ ३४३ ॥ काय उणें आह्मां विठोबाचे पाईं । नाहीं ऐसें काई येथें एक ॥ धृ० ॥ तें हें भोंवतालें ठायीं वांटू मन । बराडी करून दारोदारीं ॥ १ ॥ कोण बळी माझ्या विठोबा वेगळा । आणीक आगळा दुजा सांगा ॥ २ ॥ तुका ह्मणे मोक्ष विठोबाचे गांवीं । फुकाचीं लुटावीं भांडारें तीं ॥ ३ ॥

॥ ३४४ ॥ सेवितों रस तो वांटितों आणिकां । घ्या रे होऊं नका रानभरी ॥ धृ० ॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥ १ ॥ मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धि याचे पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ३ ॥

॥ ३४५ ॥ ऐसे ऐसियानें भेटती ते साधू । ज्याच्या दरशनें तुटे भवबंदू । जे कां सच्चिदानंदीं नित्यानंदू । जे कां मोक्षसिद्धी तीर्थ वंदू रे ॥ धृ० ॥ भाव सर्वकारण मूळ वंदू । सदा समबुद्धि नास्तिक्यभेदू । भूतकृपा मोडीं द्वेषकंदू । शत्रु मित्र पुत्र सम करीं बंधु रे ॥ १ ॥ मन बुद्धि काया वाचा शुद्ध करीं । रूप सर्वत्र देखोनि नमस्कारीं । लघुत्व सर्वभावें अंगीकारीं । सांडीमांडी मीतूंपण ऐसी थोरी रे ॥ २ ॥ अर्थकामचाड नाहीं चित्ता । मानापमान मोह माया मिथ्या । वर्ते समाधानीं जाणोनि नेणता । साधु भेट देती त्या अवचिता रे ॥ ३ ॥ मनीं दृढ धरीं विश्वास । नाहीं सांडीमाडीचा सायास । साधुदर्शन नित्यकाळ त्यास । तुका ह्मणे जो विटला जाणीवेस रे ॥ ४ ॥

॥ ३४६ ॥ भवसागर तरतां । कां रे करीतसां चिंता । पैल उभा दाता । कटीं कर ठेवुनियां ॥ धृ० ॥ त्याचे पायीं घाला मिठी । माल नेघे जगजेठी । भावा एका साठीं । खांदां वाहे आपुल्या ॥ १ ॥ सुखें करावा संसार । परि न संडावे दोन्ही वार । दया क्षमा घर । चोजवीत येतील ॥ २ ॥ भुक्तिमुक्तीची चिंता । नाहीं दैन्य दरिद्रता । तुका ह्मणे दाता । पांडुरंग वोळगिल्या ॥ ३ ॥

॥ ३४७ ॥ जें कां रंजलें गांजलें । त्यासि ह्मणे जो आपुलें ॥ धृ० ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ १ ॥ मृदु सबाह्य नवनीत । तसें सज्जनाचें चित्त ॥ २ ॥ ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥ ३ ॥ दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ५ ॥

॥ ३४८ ॥ याजसाठीं भक्ती । जगीं रूढवावया ख्याती ॥ धृ० ॥ नाहीं तरी कोठें दुजें । आहे बोलाया सहजें ॥ १ ॥ गौरव यासाठीं । स्वामिसेवेची कसोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे अळंकारा । देवभक्त लोकीं खरा ॥ ३ ॥

॥ ३४९ ॥ अमंगळ वाणी । नये ऐकों ते कानीं ॥ धृ० ॥ जो हे दूषी हरिची कथा । त्यासि क्षयरोगव्यथा ॥ १ ॥ याति वर्ण श्रेष्ठ । परि तो चांडाळ पापिष्ठ ॥ २ ॥ तुका ह्मणे पाप । माय नावडे ज्या बाप ॥ ३ ॥

॥ ३५० ॥ कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥ धृ० ॥ वाचे तुकारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥ १ ॥ कैसा निरयगांवा । जाऊं न पवे विसावा ॥ २ ॥ तुका ह्मणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥ ३ ॥

॥ ३५१ ॥ आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वता भाव ॥ धृ० ॥ करवी प्राणिकांचे घात । खोडी काढूनि पंडित ॥ १ ॥ श्वानाचियापरी । मिष्टान्नासि विटाळ करी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । सटवेचि ना पांचा दिसां ॥ ३ ॥

॥ ३५२ ॥ गर्भाचें धारण । तिनें वागविला सिण ॥ धृ० ॥ व्याली कुन्हाडीचा दांडा । वर न घली च तोंडा ॥ १ ॥ उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जाय । नरका अभक्ताची माय ॥ ३ ॥

॥ ३५३ ॥ पतनासि जे नेती । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥ धृ०॥ विधीपुरतें कारण । बहु वारावें वचन ॥ १ ॥ सर्वस्वासि नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥ २ ॥ तुका ह्मणे दुरी । राखतां हे तोंची बरी ॥ ३ ॥

॥ ३५४ ॥ देव आड जाला । तो भोगिता मी उगला । अवघा निवारला । सीण शुभाअशुभाचा ॥ धृ० ॥ जीवशिवाचें भातुकें । केलें क्रीडाया कौतुकें । कैचीं येथें लोकें । हा आभास अनित्य ॥ १ ॥ विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ तयाचा ॥ २ ॥ अवघी एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥ ३ ॥ प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस । पायापाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥ ४ ॥

# मंबाजी गोसावी यांनीं स्वामीस पीडा केली.

॥ ३५५ ॥ न सोडीं न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ॥ धृ० ॥ भलतें जड पडो भारी । जीवावरी आगोज ॥ १ ॥ शतखंड देह शस्त्रधारी । करितां परी न भीयें ॥ २ ॥ तुका ह्मणे केली आधीं । दृढ बुद्धी सावध ॥ ३ ॥

॥ ३५६ ॥ बरवें बरवें केलें विठोबा बरवें । पाहोनि आंत क्षमा अंगी काटीवरी मारविलें ॥ १ ॥ शिव्या गाळी नीत नाहीं । बहु फार विटंबिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे क्रोधा हातीं । सोडवूनि घेतलें रे ॥ ३ ॥

॥ ३५७ ॥ पावलों पावलों । देवा पावलों रे ॥ १ ॥ बरवें संचित होतें तैसें जालें आतां काय बोलों रे ॥ २ ॥ सोज्ज्वळ कंटकवाटा भावें करूं गेलों रे । तुका ह्मणे करूनि वेगळा केलों रे ॥ ३ ॥

॥ ३५८ ॥ कां होती कां होती । देवा एवढी फजीती ॥ धृ० ॥ मुळीं वर्म नसतें चुकलों । तो मी ऐसें चिन्तीं ॥ १ ॥ होणार होऊनि गेलें । मिथ्या आतां खंती रे ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरे आतां । दुर्जनाची संगती रे ॥ ३ ॥

॥ ३५९ ॥ सोडवा सोडवा । सोडवा हो अनंता ॥ धृ० ॥ तुजविण ऐसा । कोण दुजा प्राणदाता ॥ १ ॥ कोणा लाज नेणां ऐसें । आणिकां शरण आह्मी जातां ॥ २ ॥ तुका ह्मणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥ ३ ॥

॥ ३६० ॥ पुत्राची वासना । शुभ ऐके जेवीं माता ॥ धृ० ॥ तैसें राहो माझें मन गातां ऐकतां हरिगुण ॥ १ ॥ नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहे । कासवीचें पिलें माय ॥ ३ ॥

॥ ३६१ ॥ ध्यानी योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोवाठीं तयाचिया ॥ धृ० ॥ तान भुक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभाव ॥ १ ॥ कोण सखें तया आणीक सोयरें । असे त्यां दुसरें हरीविण ॥ २ ॥ कोण सुख त्यांच्या जीवासि आनंद नाहीं राज्यमद घडी तयां ॥ ३ ॥ तुका ह्मणे विष अमृतासमान । कृपा नारायण करितो होय ॥ ४ ॥

॥ ३६२ ॥ न व्हावें तें जालें देखियेले पाय । आतां फिरूं काय मागें देवा ॥ धृ० ॥ बहु दिस होतों करीत हे आस । तें आलें सायासें फळ आजी ॥ १ ॥ कोठवरि जिणें संसाराच्या आशा । उगवों हा फांसा येथूनियां ॥ २ ॥ बुडालीं तयांचा मूळ ना मारग लागे तो लाग सांडूनियां ॥ ३ ॥ पुढें उलंघितां दुःखाचे डोंगर । नाहीं अंतपार गर्भवास ॥ ४ ॥ तुका ह्मणे कास धरीन पीतांबरीं । तूं भवसागरीं तारूं देवा ॥ ५ ॥

॥ ३६३ ॥ वैकुंठा जावया तपाचे सायास । करणें जीव नास न लगे कांहीं ॥ १ ॥ तया पुंडलिकें केला उपकार । फेडावया भार पृथीवीचा ॥ २ ॥ तुका ह्मणे सोपी केली पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥ ३ ॥

॥ ३६४ ॥ शोकें शोक वाढे । हिमतीचे धीर गाढे ॥ धृ० ॥ येथें केले नव्हे काई

लांडिपण खोटें भाई ॥ १ ॥ करिती होया होय । परी नव्हे कोणी साह्य ॥ २ ॥ तुका ह्मणे घडी । साधिलिया एक थोडी ॥ ३ ॥

॥ ३६५ ॥ ह्मणउनी खेळ मांडियेला ऐसा । नाहीं कोणी दिशा वर्जीयेली ॥ धृ० ॥ माझिया गोतें हें वसलें सकळ । न देखिजे मूळ विटाळाचें ॥ १ ॥ कर्मान ओळली शिली एकसरें । न देखों दुसरें विषमासी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं काळापाशीं गोवा । स्थिति माति देवा वांचुनियां ॥ ३ ॥

॥ ३६६ ॥ वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥ धृ० ॥ नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥ १ ॥ पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ॥ २ ॥ तुका ह्मणे याती । हो का तयाची भलती ॥ ३ ॥

॥ ३६७ ॥ करोत तपादि साधनें । कोणी साधो गोरांजनें ॥ धृ० ॥ आह्मी न वजों तया वाटा । नाचूं पंढरीचोहटां ॥ १ ॥ पावोत आत्मस्थिती । कोणी ह्मणोत उत्तम मुक्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे छंद । आह्मां हरिच्या दासां निंद्य ॥ ३ ॥

## स्वामीस सद्गुरूची कृपा जाली.

॥ ३६८ ॥ सद्गुरुरायें कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥ धृ० ॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ १ ॥ भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ २ ॥ कांहीं कळे उपजला अंतराय । ह्मणोनियां काय त्वरा जाली ॥ ३ ॥ राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥ ४ ॥ बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्ण हरी ॥ ५ ॥ माघशुद्ध दशमी पाहुनि गुरुवार । केला अंगीकार तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ३६९ ॥ माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ धृ० ॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंपा कांहीं कोठें ॥ १ ॥ जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ २ ॥ जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरु पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ३७० ॥ घालूनियां भार राहिलों निश्चिंतीं । निरविलें संतीं विठोबासी ॥ धृ० ॥ लावूनियां हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ १ ॥ कटीं कर सम चरण साजिरे । राहिला भीवरे तीरीं उभा ॥ २ ॥ खुंटले सायास आणिकि या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥ ३ ॥ तुज वाटे आतां तें करीं अनंता । तुका ह्मणे संता लाज माझी ॥ ४ ॥

॥ ३७१ ॥ माझिये मनींचा जाणा हा निर्धार । जिवासि उदार जालों आतां ॥ धृ० ॥ तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥ १ ॥ ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥ २ ॥ जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । हेंचि आतां नाहीं लाज तुह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतीं घातला हावाला । न सोडीं विठ्ठला पाय आतां ॥ ४ ॥

॥ ३७२ ॥ देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥ धृ० ॥ ऐसा असोनि अनुभव । कासाविस होती जीव ॥ १ ॥ देवाची जतन । तया बाधूं न शके अन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । प्रऱ्हादासि यत्न करी ॥ ३ ॥

॥ ३७३ ॥ भले ह्मणवितां संतांचे सेवक । आइत्याची भीक सुखरूप ॥ धृ० ॥ ठसावितां बहु लागती सायास । चुकल्या घडे नास अल्प वर्म ॥ १ ॥ पाकसिद्धि लागे संचित आइतें । घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें सांगतांचि गोष्टी । रणभूमि दृष्टी न पडे तों ॥ ३ ॥

॥ ३७४ ॥ संतसमागम एखादिया परी । राहावें त्याचे द्वारीं श्वानयाती ॥ धृ० ॥ तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥ १ ॥ कामारी बटीक सेवेचे सेवक । दीनपण रंक तेथें भलें ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥ ३ ॥

॥ ३७५ ॥ एकली राणागोविंदा सवें । गेलें ठावें तें जालें ॥ धृ० ॥ मज न ह्मणा न ह्मणा शिदळी । नाहीं विषम जवळी आतळलें ॥ १ ॥ नव्हती देखिली म्यां वाट । ह्मणोनि हा धीट संग केला ॥ २ ॥ भेणें मिठी दिधली गळां । सेजे जवळ दडालें ॥ ३ ॥ सलगी धरी पयोधर । साहाती करमुर सवें ॥ ४ ॥ आहेव मी गर्भीणपणें । हें सांगणें कां लागे ॥ ५ ॥ तुका ह्मणे सेवटा नेलें । संपादिलें उभयतां ॥ ६ ॥ होतें बहुत हे दिवस मानसीं । आजि नवस हे फळले नवसीं ॥ ७ ॥

॥ ३७६ ॥ व्हावी भेटी ते जाली गोविंदासीं । आतां सेवा करीन निश्चयेसीं वो ॥ धृ० ॥ स्थिर स्थिर मजाचि साहे करा । बहु कष्ट सोसिल्या येरझारा । येथें आड मज न साहावे वारा । देऊनि कपाट आलें तें दुसरें वारा वो ॥ १ ॥ मूळ सत्ता हे सायासाची जोडी । नेदी वेगळें होऊं एकी घडी । नाहीं लौकिक स्मरला आवडी । आतां येणें काळें या वो लोभें वेडी वो ॥ २ ॥ उदयीं उदय साधिला अवकाश । निश्चितीनें निश्चिती सावकाश । धरियें गोडी बहुत आला रस । तुका ह्मणे हा मागुता न ये दिवस वो ॥ ३ ॥

॥ ३७७ ॥ स्वयें सुखाचे जाले अनुभव । एक एकीपाशीं सांगतील भाव । अवघ्यां अवघा हा कैसा नवलाव । सर्वसाक्ष तेथेंचि त्याचा जीव वो ॥ धृ० ॥ आपआपणाशीं करिती नवल । परि वादावाद न संडिती बोल । एका मेघःश्यामें जलधर वोल । रसीं उताविळ हृदय सखोल वो ॥ १ ॥ एक विषय तो सकळांचा हरि । त्याच्या आवडीनें आवडी इतरीं । अंध बहिर हे प्रेतलोकाचारी । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥ २ ॥ स्तुति पराविया मुखें रुचिकर । प्रीतिपात्राच्या गौरवीं आदर । परस्परें हें सादरा सादर । योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ॥ ३ ॥ भक्तिवल्लभ न तुटे चराचरीं । आप्त अनाप्त हे ऐशी ठेवी उरी । दुरी जवळी संचिता ऐसें धरी । रंगा रंगा एसें होणें लागे हरि वो ॥ ४ ॥ तुका लाधला हें उच्छिष्ट भोजन । आला बाहेरी प्रेमें वोसंडून । पडिलें कानीं त्या जीवाचें जतन । धरियेले एकाभावें हृदयीं चरण वो ॥ ५ ॥

॥ ३७८ ॥ आजि का वो तूं दिससी दुश्चिती । ह्मणी एका मन लगे तुझ्या चित्तीं ।

दिलें ठेवूं तें विसरसी हातीं । नेणों काय बैसला हरि चित्तीं वो ॥ धृ० ॥ सर सर परती जालीस आतां भांड । कैसें दाखविसी जगासी या तोंड । व्याली माय ते लाजविली रांड । नाहीं थार दो ठायीं जाला खंड वो ॥ १ ॥ होतें तैसें तें उमटलें वरी । बाह्य संपादणी अंतरींची चोरी । नाहीं मर्यादा निःसंग बावरी । मन हें गोविंदीं देह काम करी वो ॥ २ ॥ नाहीं करीत उत्तर कोणासवें । पराधीन भोजन दिलें खावें । नाहीं अचळ सावरावा ठावे । देखों उदासीन तुज गे देहभावें वो ॥ ३ ॥ कोठें नेणों हा फावला एकांत । सदा किलकिल भोंवतीं बहुत । दोघे एकवाटा बोलावया मात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥ ४ ॥ करी कवतुक खेळ खेळे कान्हा । दावी लाघव भांडवी सासुसुना । परा भक्ति हे शुद्ध तुह्मी जाणा । तुका ह्मणे ऐसें कळों यावें जना वो ॥ ५ ॥

॥ ३७९ ॥ भरिला उलंडूनि रिता करी घट । मीस पाणियाचें गोविंदाची चट । चाले झडझडां उसंतूनि वाट । पाहे पाळतूनि उभा तोचि नीट वो ॥ धृ० ॥ चाळा लावियेले गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें । दावी बहुतांच्या बहुवेषपंथें । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥ १ ॥ मनीं आवडे तें करावें उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनि आधार । उगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढविसी उत्तरा उत्तर वो ॥ २ ॥ धरिली खोडी दे टाकोनियां मागें । न ये विनोद हा कामा मशीं संगें । मिठी घालीन या जीवाचिया त्यागें । नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगें रे ॥ ३ ॥ सुख अंतरींचें बाह्य ठसठसी । ह्मणे विनोद हा काय सोंग यासी । तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदानंदन या थोरपणें जासी रे ॥ ४ ॥ करी कारण तें कळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जाना । मन मिनलें रे तुका ह्मणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥ ५ ॥

॥ ३८० ॥ आजि नवल मी आलें येणें राणें । भेटी अवचितीं नंदाचिया कान्हें । गोवी सांगती वो सकळही जन । होतें संचित आणियेलें तेणें वो ॥ धृ० ॥ गेलें होउनि न चले आतां कांहीं । साद घालितां जवळी दुजें नाहीं । अंगीं जडला मग उरलें तें काई । आतां राखतां गुमान भलें बाई वो ॥ १ ॥ बहुत कामें मज नाहीं आराणूक । एक सारितां तों पुढें उभें एक । आजि मी टाकोनि आलें सकळिक । तंव रचिलें आणिक कवतुक वो ॥ २॥ चिंता करितां हरिली नारायणें । अंगसंगें मिनतां दोघेजणें । सुखें निर्भर जालियें त्याच्या गुणें । तुका ह्मणे खुंटलें येणें जाणें वो ॥ ३ ॥

॥ ३८१ ॥ मै भुली घरजानी बाट । गोरस बेचन आयें हाट ॥ धृ० ॥ कान्हा रे मनमोहन लाल । सबही बिसरूं देखें गोपाल ॥ १ ॥ काहां पग डारूं देख आनेरा । देखें तों सब वोहिन घेरा ॥ २ ॥ हूं तों थकित भैर तुका । भागा रे सब मनका धोका ॥ ३ ॥

॥ ३८२ ॥ हरिबिन रहियां न जाये जिहिरा । कबकी थाडी देखें राहा ॥ धृ० ॥ क्या मेरे लाल कवन चुकी भई । क्या मोहिपासिती बेर लगाई ॥ १ ॥ कोई सखी हरी जावे बुलावन । बारहि डारूं उसपर तन ॥ २ ॥ तुका प्रभु कब देखें पाऊं । पासीं आऊं फेर न जाऊं ॥ ३ ॥

॥ ३८३ ॥ भलो नंदाजीको डिकरो । लाज राखीलीन हमारो ॥ धृ० ॥ आगळ आवो देवजी कान्हा । मैं घरछोडी आहे ह्माना ॥ १ ॥ उनसुं कळना नव्हे तो भला । खसम अहंकार दादुला ॥ २ ॥ तुकाप्रभु परबल हरी । छपी आहे हुं जगाथी न्यारी ॥ ३ ॥

॥ ३८४ ॥ नका कांहीं उपचार माझ्या शरीरा । करूं न साहती बहु होतो उबारा । मनोजन्य व्यथा वेध जाला अंतरा । लवकरी आणा नंदाचिया कुमरा ॥ धृ० ॥ सखिया वेशिया तुह्मी प्राणवल्लभा । निवविला भाव आर्तभूत या लोभा । उमटली अंगीं वो सांवळी प्रभा । साच हे अवस्था कळे मज माझ्या क्षोभा ॥ १ ॥ नये कळों नेदावी हे वडिलांसि मात । घडावा तयासी उत्कंठा एकांत । एकाएकीं साक्षी येथें आपुलें चित्त । कोण्या काळें होईल नेणों भाग्य उदित वो ॥ २ ॥ स्वाद सीण देहभाव निद्रा खंडन । पाहिलें तटस्थ उन्मळित लोचन । अवघें वोसाऊन उरलें तें चरण । तुका ह्मणे दर्शनांचें आलें जीवन ॥ ३ ॥

॥ ३८५ ॥ पडिली भुली धांवतें सैराट । छंद गोविंदाच्या चोजविते वाट । मागें सांडोनि सकळ बोभाट । वंदी पदांबुजें ठेवूनि ललाट वो ॥ धृ० ॥ कोणी सांगा या गोविंदाची शुद्धी । होतें वाहिलें लपाला आतां खांदीं । कोठें आड आली हे देहबुद्धी । धांवा आळवी करुणा कृपानिधी वो ॥ १ ॥ मागें बहुतांचा अंतरला संग । मुळें जयाचिया तेणें केला त्याग । पहिलें पाहातां तें हरपलें अंग । खुंटली वाट नाहींसें जालें जग वो ॥ २ ॥ शोकें वियोग घडला सकळांचा । गेल्या शरण हा अन्याय आमुचा । केला उद्धार रे घडल्या दोषांचा । जाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ॥ ३ ॥

॥ ३८६ ॥ काय उणें का कारितोसि चोरी । किती सांगों तुज नायकसी हरी । परपरता तूं पळोनि जासी दुरी । अनावर या लोकिका बाहेरी वो ॥ धृ० ॥ माया करुणा हे करितें बहुत । किती सोसूं या जनांचे आघात । न पुरे अवसरु हेंचि नित्यानित्य । तूंचि सांडवीं करूनि स्थिर चित्त वो ॥ १ ॥ बहुत कामें मी गुंतलिये घरीं । जासी डोळा तूं चुकावूनि हरी । करितां लाग न येसीच पळभरी । नाहीं सायासाची उरी तिन्ही पुरी वो ॥ २ ॥ तुज ह्मणीयें मी न संगें अनंता । नको जाऊं या डोळ्यां परता । न लगे जोडी हे तुजविण आतां । तुकया स्वामी कान्होबा गुणभरिता वो ॥ ३ ॥

॥ ३८७ ॥ घाली कवाड टळली वाड राती । काम व्यापिली का पाडली भुलिची । कोणें लागला गे सदैवचें हातीं । आजि शून्य शेजे नाहीं दिसे पती वो ॥ धृ० ॥ बोले हृतिकेशी राधा हें वचन । मशीं लाघव दाखवी नारायण । ह्मणे कोमळ परी बहु गे निर्गुण । याशीं न बोलें कळला मज पूर्ण वो ॥ १ ॥ धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता । तें पाचारिलें होउनि ये वो सीता । लाजिनली रूप न ये पालटितां । जाला भीमकी आपण राम सीता वो ॥ २ ॥ सत्यभामा दान करी नारदासी । तें कळला वो मज हृषीकेशी । तुळे घालितां न ये कनक वो राशी । सम तुके एक पान तुळसी वो ॥ ३ ॥ मज भुली पडली कैशापरी । आह्मां भोगुनि ह्मणे मी ब्रह्मचारी । दिली वाट यमुने मायें खरी । तुह्मां आह्मां न कळे अद्यापवरी वो ॥ ४ ॥ जाणे जीवींचें सकळ नारायण ।

असे व्यापूनि तो न दिसे लपून । राधा संबोखिली प्रीती आलिंगून । तुका ह्मणे येथें भावचि कारण वो ॥ ५ ॥

॥ ३८८ ॥ मिळोनि गौळणी देती यशोदे गाऱ्हाणीं । दहिं दूध तुप लोणी शिंकां नुरे कांहीं । मेळवूनि पोरें तेथें रिघे एकसरें । वेगीं आणोनी सामोरें तेथें लोणी खाय ॥ धृ० ॥ हरि सोंकला वो हरि सोंकला वो । सोंकला तो वारीं तुज लाज नाहीं तरी । आह्मां सांपडतां उरी तुज मज नाहीं ॥ १ ॥ तुज वाटतसे कोड यासि लागतसे गोड । काय हासतेसी वेड तुज लागलें वो । आह्मी जाऊं तुजवरी पोरें चाळविल्या पोरी । काय सांगों भांडखोरी लाज वाटे आह्मां ॥ २ ॥ मुख माळिण वदन उभा हाडनिये घोणे । तंव दसवंती ह्मणे आणा शीक लावूं । थोर आणिला कांटाळा घरीं दारीं लोकपाळां । डेरा रिघोनि गुसळा तेथें लोणी खाय ॥ ३ ॥ मिळोनि सकळा दावें लावूनियां गळां । केशा बांधिती उखळा येथें राहे उगा । बरा सांपडलासी हरी आजिच्यानें करिसिल चोरी । डोळे घालूनियां येरी येरीकडे हांसे ॥ ४ ॥ फांकल्या सकळा उपडूनियां उखळा । मोडी वृक्ष विमळार्जुन दोन्ही । उठिला गजर दसवंती नव्हे धीर । धांवे तुकयाचा दातार आलिंगला वेगीं ॥ ५ ॥

॥ ३८९ ॥ गोरस घेउनी सातें निघाल्या गौळणी । तंव तीं कृष्णाची करणी काय करी तेथें । जाला पानसरा मिठी घातली पदरा । आधीं दान माझें सारा मग चाला पंथें ॥ धृ० ॥ सर जाऊं दे परता । मुळीं भेटलासी आतां । नाट लागलें संचिता । खेपा खुंटलिया ॥ १ ॥ आसुडी पदरा धरी आणीक दुसरा । येरी झोंबतील करा काय वेडा होसी । आलों गेलों बहु वेळां नेणों गोरा कीं सांवळा । सर परता गोवळा काय बोलतोसी ॥ २ ॥ आह्मी येथें अधिकारी मागें केली तुह्मी चोरी । आतां कळलियावरी मागें केलें त्याचें । बोलिल्या हांसुनी आह्मी सासुरवासिनी । कां रे झोंबसी दुरूनी करी मात कांहीं ॥ ३ ॥ वांयां परनारी केशा धरिसी पदरीं । तयां कळलिया उरी तुज मज नाहीं । जडला जिव्हारीं फांकों नेदी तया नारी ॥ जेथें वर्म तें धरी जाऊं पाहे लियेचें ॥ ४ ॥ तया हातीं सांपडल्या हातीं पाटीं चुकाविल्या । कृष्णमिळणीं मिळाल्या त्याही न फिरती । तुका ह्मणे खंती वांयां न धरावी चित्तीं । होतें तुमच्या संचितीं वोडवलें आजी ॥ ५ ॥

॥ ३९० ॥ हरी तुझी कांति रे सांवळी । मी रे गोरी चांपेकळी । तुझ्या वर्णें होइन काळी । मग हें वाळी जन मज ॥ धृ० ॥ उगला राहें न करीं चाळा । तुज किती सांगों रे गोवळा । तुझा खडबड कांबळा । अरे नंदबाळा आलगटा ॥ १ ॥ तुझिये अंगीं घुरट घाणी । बहु खासी दूध तुप लोणी । घरिचें बाहेरिल आणोनी । मी रे चांदणी सकुमार ॥ २ ॥ मज ते हांसतील जन । धिःकारिती मज देखोन । अंगीं तुझें देखोनि लक्षण । मग विटंबण होइल रे ॥ ३ ॥ तुज लाज भय शंका नाहीं । मज तंव सज्जन पिशुन व्याही । आणीक मात बोलूं कांहीं । कसी भीड नाहीं तुज माझी ॥ ४ ॥ वचन मोडी नेदी हात । कळलें न साहेची मात । तुकयास्वामी गोपीनाथ । जीवन्मुक्त करूनि भोगी ॥ ५ ॥

॥ ३९१ ॥ सात पांच गौळणी आलिया मिळोनि येशोदे गाऱ्हाणें देती कैसें । काय ऱ्यालीस पोर चोरटें सिरजोर जनावेगळेंची कैसें । दहिं दूध लोणी शिकां नुरेचि कांहीं कवाड जैशाचें तैसें । चाळवूनि नाशिलीं कन्याकुमरें आमुच्या सुनांसि लाविलें पिसें गे बाइये ॥ धृ० ॥ आह्मुनि तरी यासि सांगें बरव्या परी नाहीं तरी नाहीं उरी जीवेसाटी । मिळोनि सकळै जणी करूं वाखा सखीं तुज मज होईल तुटी गे बाइये ॥ १ ॥ नेणे आपपर लौकिक वेव्हार भलते ठायीं भलतें करी । पाळतुनि घरीं आह्मी नसतां तेथें आपण संचार करी । सोगया चुंबन देतो आलिंगन लोळे सेजाबाजावरी । शिंकीं कडा फोडी गोरसाचे डेरे धरितां न सांपडे करीं गे बाई ये ॥ २ ॥ आतां याची चाड नाहीं आह्मां भीड सांपतां कोड पूरवूं मनिचें । सोसिलें बहु दिस नव्हता केला निस ह्मणुनि एकुलतें तुमचें । चरण खांबीं जीवें बांधेन सरिसा जवें न चले कांहीं याचें । अर्थ प्राण देतां न सोडी सर्वथा भलतें हो या जिवाचें गे बाइये ॥ ३ ॥ वेडनी जननी हातीं चक्रपाणी देतिसे गौळणी वेळोवेळां । निष्ठुर वाद ह्मणीं बोलाल सकळा क्षोभ जाइल माझ्या बाळा । जेथें लागे हात घाढतें नवनीत अमृताच्या कल्लोळा । देखोनि तुकयास्वामी देश देहभाव विसरल्या सकळा गे बाइये ॥ ४ ॥

॥ ३९२ ॥ विरहतापें फुंदे छंद करिते जाती । हा गे तो गे सावधान सर्वेचि दुश्चिती । न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवतीं । वेगळीच पर्डो पाहे कुळाहुनि याती ॥ धृ० ॥ खुंटलीसी जाली येथें अवघियांची गती । आपुलीं परावीं कोण नेणे भोंवतीं । त्यांचीं नांवें बोभे अहो अहो श्रीपती । नवलाव हा येरां वाटोनियां हांसती ॥ १ ॥ बाहेरीच धांवे रानां न धरीच घर । न कळे बंधना जाला तेणें संचार । विसरूनि गेली सासुरें कीं माहेर । एका अवलोकीं एका पाडिला विसर ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी अवध्या राहा निश्चळा । नये आतां येऊं येथें सर्वथा बळा । त्याचा त्याच्या मुखें अवघाची निर्वाळा । बहुतां मतें येथें तर्कवाद निराळा ॥ ३ ॥

॥ ३९३ ॥ येरे कृष्णा खुणाविती खेळों भातुकें । मिळालिया बाळा एकेठायीं कवतुकें । कळों नेदी माया त्याचें त्यास ठाउकें । खेळतोसें दावी लक्षलक्षापें मुकें ॥ धृ० ॥ अखंडित चट्ट त्यांनीं लावियेला कान्हा । आवडे तया त्या वाहाती संकल्प मना । काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना । एकांताचें सुख जाती घेवोनियां राणा ॥ १ ॥ अवघियांचा जाणें जाला मेळासा हरी । मिळोनियां जावें तेथें तया भीतरी । कळों नेदी घरिच्या करी गोवूनी चोरी । हातोहातीं नेती परपरत्या दुरी ॥ २ ॥ आनंदें निर्भर आपणाशीं आपण । क्रीडतील बाळा त्यजिलें पारिखें जन । एकाएकीं तेथें नाहीं दुसरें भिन्न । तुका ह्मणे एका नारायणा वांचून ॥ ३ ॥

॥ ३९४ ॥ खेळतां मुरारी जाय सरोवरा तिरीं । तंव नग्नचिया नारी तेथें देखियेल्या । मांडिले विदान ख्याल सुखाचें संधान । अंग लपवूनी मान पिलंगत चाले ॥ धृ० ॥ ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे । पायां पडतां रे न सोडी नेदी साउलां रे ॥ १ ॥ साड्या साउलीं पातळें गोंडे कसणिया चोळ्या । धुंयी घेउनी सकळा कळंबावरी पळे ।

खांदी धरूनियां करीं दृष्टि घालोनि सामोरी । बैसे पाला वोढी वरी खदखदां हांसे ॥ २ ॥ आनंदें कल्लोळ बाळा खेळती सकळ देती उलटिया चपळ। एकी एकीहून हौस वेल सुर काडी। एकी उगविती कोडीं। नाना परीच्या निकडी खेळ मांडियेला ॥३॥ एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तंव नारी । ह्मणे नाहीं नेलें चोरी काय जाणों केव्हां । केला सकळीं हाकार तंव आलिया बाहेरी । आतां ह्मणतील घरां जावें कैशा परी ॥ ४ ॥ तंव हांसे वनमाळी वरी पाहोनी सकळीं । लाजे रिघालिया जळीं मागें पुढें हात । लाज राखावी गोपाळा आह्मांजणींची सकळां। काय मागसी ये वेळा देऊं गुळवाटी॥ ५॥ जोडोनियां कर या गे सकळी समोर । वांयां न बोलावें फार बडबड कांहीं । भातुकें भूषण नाहीं चाड नेघें धन । करा एक चित्त मन या गे मजपाशीं ॥ ६ ॥ एक एकीकडे पाहे लाज सांडुनियां राहे। ह्मणे चला आतां संये जाऊं तयापाशीं। जोडोनियां हात कैशा राहिल्या निवांत । तुका ह्मणे केली मात लाज राखिली तयांची ॥ ७ ॥

॥ ३९५ ॥ धरिला पालव न सोडी माझा येणें ॥ कांहीं करितां या नंदाचिया कान्हें । एकली न येतें मी ऐसें काय जाणें । कोठें भरलें अवघड या राणें रे ॥ धृ० ॥ सोडीं पालव जाऊं दे मज हरी । वेळ लागला रे कोपतील घरीं । सासू दारुण सासरा आहे भारी । तुज मज सांगतां नाहीं उरी रे ॥ १ ॥ सख्या वाशिया होत्या मजपाशीं । तुज फावलें रे फांकतां तयांसी । होतें अंतर तर सांपडतें कैसी । एकाएकीं अंगीं जडलासी रे ॥ २ ॥ कैसी भागली हे करितां उत्तर । शक्ति मावळल्या आसुडितां कर । स्वामी तुकयाचा भोगिया चतुर । भोग भोगी त्यांचा राखे लोकाचार वो ॥ ३ ॥

॥ ३९६ ॥ गाई गोपाळ यमुनेचे तटीं । येती पाणिया मिळोनि जगजेठी । चेंडू चौगुणा खेळती वाळवंटीं । चला चला ह्मणती पाहूं दृष्टी वो ॥ धृ० ॥ ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी । चित्त विव्हळ देखावया हरी । मिस पाणियाचें करितील घरीं । बारा सोळा मिळोनि परस्परीं वो ॥ १ ॥ चिरें चोळिया त्या धुतां विसरती । ऊर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्ती । कोणा नाठवे कोण कुळ याती । जालीं तटस्थ सकळ नेत्रपातीं वो ॥ २ ॥ दंतधावनाचा मुखामाजी हात । वाद्यें वाजती नाइके जनमात । करी श्रवण कृष्णवेणुगीत । स्वामी तुकयाचा पुरवील मनोरथ वो ॥ ३ ॥

॥ ३९७ ॥ कोठें मी तुझा धरूं गेलें संग । लावियेलें जग माझ्या पाठीं ॥ धृ० ॥ सर सर ते परता अवगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥ १ ॥ रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ती । न देखें भोंवतीं मी ते माझी ॥ २ ॥ तुकयाचा स्वामी माझे जीवीं च बैसला । बोलींच अबोला करूनियां ॥ ३ ॥

॥ ३९८ ॥ गोड लागे परी सांगतांचि न ये । बैसे मिठी सये आवडीची ॥ धृ० ॥ वेधलें वो येणें श्रीरंगरंगें । मीमाजी अंगें हारपलीं ॥ १ ॥ परतेचि ना दृष्टी बैसली ते ठायीं । विसावोनि पायीं ठेलें मन ॥ २ ॥ तुकयाच्या स्वामीसवें जाली भेटी । तेव्हां जाली तुटी मागिल्यांची ॥ ३ ॥

॥ ३९९ ॥ पाहावया माजी नभा । दिसे शोभा चांगली ॥ धृ० ॥ बैसला तो माझे

मनीं । नका कोणी लाजवूं ॥ १ ॥ जीवा आवडे जीवाहूनि । नव्हे क्षण वेगळा ॥ २ जालें विश्वंभरा ऐसी । तुकया दासी स्वामीची ॥ ३ ॥

॥ ४०० ॥ कोणी एकी भुलली नारी । विकितां गोरस ह्मणे घ्या हरी ॥ धृ० देखिला डोळां बैसला मनीं । तो वदनीं उच्चारी ॥ १ ॥ आपुलियाचा विसर भोळा गोविंद कळा कौतुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे हांसे जन । नाहीं कान तेठायीं ॥ ३ ॥

॥ ४०१ ॥ रुक्मिणी आइत सत्यभामा मंदिरीं रे । वाट पाहे टळोनि गेली रात्री न येचि देव येतील कामलहरी रे । पडिली दुश्चित्त तंव तो कवाड टिमकारी रे ॥ धृ० सर गा परता कळला तुझा भाव रे । कार्या पुरतें हें दाविसी लाघव रे । बोलतां तें अवघी तुझी माव रे । जाणोनि आलासी उजडता समयो रे ॥ १ ॥ मीच वेडी तु बोल नाहीं रे । दानावेळे विटंबणा जाली काय रे । मागुती रुद्रासि भेटी दिली तई विश्वास तो तुझ्या बोला आझुनि तरी रे ॥ २ ॥ भ्रम होता तो अवघा कळों आला मानवत होतें मी भला भला रे । नष्टा क्रिया नाहीं मां तुझ्या बोला रे । तुकयाबंधु स्त्रा कानडया कौसल्या रे ॥ ३ ॥

॥ ४०२ ॥ तंव तो हरि ह्मणे वो निजांगने वो । लाइ नीच कां देसील डोहणे मजपें दुजें आलें तें देव जाणे वो । शब्द काय हे बोलसी ते उणे वो ॥ धृ० ॥ पाहा विचारुनी आधि वो । सांडुनि देई भ्रांति करीं स्थिर बुद्धि वो । तंट केलें हें माझें उपाधी वो । उघडी डोळे आझुनि तरी धरीं शुद्धि वो ॥ १ ॥ कोठें तरी दुनियांत वो । स्त्रियांनीं भ्रतारा दानां दिलें वो । कैसा भला मी नव्हे तें सोसिलें वो । रुसतें तूं उफराटें नवल जालें वो ॥ २ ॥ काय सांग म्यां दैन्य केली कैसी वो । तुझ्या आणविलें हनुमंतासि वो । कष्टी केलें मज गरुडा भीमकीसि वो । तुकयाबंधु ह्मणे खोटें नव्हे यासि वो ॥ ३ ॥

॥ ४०३ ॥ तंव ते ह्मणे ऐका हृषीकेशी वो । नवाजिलें तुह्मीं ह्मणा आपणांसि तरी कां वंचनुक सुमनासि वो । नट नाट्य बरें संपादूं जाणतोसि वो ॥ धृ० ॥ सर हो परता हो आतां हरी । ह्मणे सत्राजिताची कुमरी । जाणतें मी या शब्दाच्या कुसरी । च करून ठकाविलें आजिवरी ॥ १ ॥ भावें गेलें म्हणून न व्हावा वियोग । मनिचें जन्मांतरीं व्हावा संग । तों तों केलें हें पाठमोरें जग । ऐसें काय जाणें हे तुझें ॥ २ ॥ काय करूं या नागविलें कामें । लागलें तयास्तव इतुकें सोसावें । नाहीं कां नव्हती ठावीं वर्मे । परद्वारी ऐसा हाकलिती प्रसिद्धनांवें ॥ ३ ॥ काय सांगावे तुझे गुण । न फुटे वाणी निष्ठुर ऐसा निर्गुण । आप पर न ह्मणसी बहीण । सासूसुनास लावुनि पाहासी भांडण ॥ ४ ॥ इतुक्रियावरी ह्मणे वैकुंठी राणा । होऊन गेलें तें नये आणूं मना । आतां न करीं तैसें करी क्रिया आणा । वत्सल ह्मणे तुकया बंधु कान्हा ॥ ५ ॥

॥ ४०४ ॥ कान्हो एकली रे एकली रे । तुजसवें चुकलें रे । भय वाटे वनीं अबळा धाकली रे ॥ धृ० ॥ निघतां घरीं आई बा वारी । तुजसवें कां आलियें हरी ॥

लोक पाया सांगती खोटा । परी मी चटा लागलियें ॥ २ ॥ पिकल्या बोरी जालें सामोरी । काय [illegible] कोठें राहिला हरी ॥ ३ ॥ भाड खुंट जालिया जाळी । काय जाणों कान्हें [illegible] रळी ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाऊं आलिया वाटा । पाहों हरि पायीं न मोडे कांटा ॥ ५ ॥

॥ ४०५ ॥ क्याला मज आयो वारितेसी घरा । खेळतों सोंकरा नंदाचा मी ॥ धृ० ॥ बहु दिसीं जाली यासीं मज भेटी । आतां वाटे तुटी न परावी ॥ १ ॥ कोवळें बोलतो मना [illegible] । डोळियाचें पातें ढापवेना ॥ २ ॥ आजि सकळांसी आलें चोळुनियां । कां गो पाठी [illegible] पुसविली ॥ ३ ॥ तुमचें तें काय खोळंबलें काज । बल्या कां गो मज कोंडा घरीं ॥ ४ ॥ तुकायाचा धनी गोकुळनायक । सरा कांहीं एक बोलतों मी ॥ ५ ॥

॥ ४०६ ॥ आतां न यें मागें । मी आलें याच्या रागें । काय माझें जगें । कोपोनियां करावें ॥ धृ० ॥ कां गो कलित्यां कोल्हाल । तुह्मी भलत्याच सकल । वेचाल ते बोल । [illegible] बोलिले ॥ १ ॥ याचे भेटी माझें मन । स्वरूपीं ठाकले लोचन । वेगळें तें क्षण आतां होऊं नावरे ॥ २ ॥ काज काम नको जालें । बीजें नावरे बोलिलें । याचिया [illegible] । कामबाणीं अंतर ॥ ३ ॥ या वेगळें होणें । आतां जळों तैसें जिणें । घेतलें तें मनें । आतां मागें न फिरे ॥ ४ ॥ आतां मोठी वार । माझी नका धरूं चार । तुकयाचा [illegible] । [illegible] मी [illegible] ॥ ५ ॥

॥ ४०७ ॥ हरिरता चपळा नारी । लागवरी न रिघती ॥ धृ० ॥ अवघ्या अंगें सर्वां- [illegible] । [illegible] काम भोगता ॥ १ ॥ वाचा वाच्यत्वासि न ये । कोठें काय करावें ॥ २ ॥ तुका ह्मणे [illegible] । देवपिसा [illegible] ॥ ३ ॥

॥ ४०८ ॥ गौळणी आल्या वाज । ह्मणती या गे राखों आज । सांपडवुनी माज- [illegible] धरूनी कोंडूं । उघडें कवाड उभ्या काळोशाचे आड । साता पांचा एक भीड [illegible] ॥ धृ० ॥ नित्य सोंकवला नेरी । सांगों चित्त बोला । आतां सांपडतां [illegible] कोण सोडी जीवें ॥ १ ॥ जाणोनियां हरी त्याच घरा आला चोरी । गडियां [illegible] पूर्वद्वारें शिरे । त्यांच्या भयाभीत चाले पिलंगत भोंवतालें । पाहे तंव [illegible] नवनीत पुढें ॥ २ ॥ उतरोनि सिंकें । पाहे चाखोनियां निकें । गोड तेंचि [illegible] । हातीं लांबवितो । जाणे राखती तयांसी । तेथें अधिकचि नासी । माग [illegible] । चोरी जाणावया ॥ ३ ॥ जाणोनियां नारी । मूळ वर्मद्वार धरी । माज [illegible] । घरांत धरीयेला । कां रे नागविसी । माझे मुळीं लागलासी । आणवीन [illegible] । [illegible] तें ॥ ४ ॥ दोहीं संधी बाहे । धरूनि नेती माते पाहे । काय [illegible] । [illegible] येणें । तुका ह्मणे सुख । त्याचें वाढों नेदी दुःख । रसवंती [illegible] । [illegible] रंजविल्या ॥ ५ ॥

॥ ४०९ ॥ आलियें धांवति धांवति भेट होइल म्हूण । तंव ते टळली वेळ वो माझा [illegible] ॥ धृ० ॥ आतां काय करूं सांग वो मज भेटेल कैसा । हरिलागीं प्राण फुटे [illegible] आशा ॥ १ ॥ लाविला उशीर बहुतीं बहु ओढिती ओढा । सांभाळितां

सांग असांग दुःख पावल्यें पीडा ॥ २ ॥ जळो आतां संसारु वो कईं शेवट पुरे । तुका-याच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ॥ ३ ॥

॥ ४१० ॥ आणीक काय थोडीं । परि तीं फार खोटीं कुडीं ॥ धृ० ॥ सदा मोकळींच पुरें । होतीं फजीत तीं पोरें ॥ १ ॥ सदा घालिती हुंबरी । एक एकांचें न करी ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । माय वेळोवेळां मारी ॥ ३ ॥

॥ ४११ ॥ बहुतांचे संगती । बहु पावलों फजिती ॥ धृ० ॥ बरें केलें नंदबाळें । मागि-लांचें तोंड काळें ॥ १ ॥ माझ्या करितील तंटा । लपती आलिया बोभाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे काई । किती ह्मणों बाप आई ॥ ३ ॥

॥ ४१२ ॥ गाईन ते लीळा चरित्र पवाडे । राखिले सवंगडे सहित गाई ॥ धृ० ॥ चोरिलें नवनीत बांधविला गळा । जे तुह्मीं गोपाळा छंद केले ॥ १ ॥ मोहिल्या गोपिका पांवयाच्या छंदें । केली ते गोविंदें क्रीडा गाऊं ॥ २ ॥ मायबापा लाड दाखविलें कौतुक । तें या आणूं सुख अंतरासी ॥ ३ ॥ निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी । ऐसा ह्मणों बळी अमुचा स्वामी ॥ ४ ॥ तुका ह्मणे सरसी असों येणें बोधें । लागोनि संबंधें सर्वकाळ ॥ ५ ॥

## डांका.

॥ ४१३ ॥ चौक भरियेला आसनीं पाचारिली कुळस्वामिनी । वैकुंठवासिनि ये धांवोनी झडकरी ॥ धृ० ॥ रंगा येईं वो विठाई सांवळिये डोळसे । तुझें श्रीमुख साजिरें तें मी केधवां देखेन ॥ १ ॥ रजतमधुपारती । पंचप्राणांची आरती । अवघी सारोनी आइती । ये धांवती झडकरी ॥ २ ॥ मन मारोनियां मेंढा । आशा मनसा तृष्णा सुटी । भक्तिभाव नैवेद्य तारीं । भरोनि केला हाकारा ॥ ३ ॥ डांका अनुहात गजरें । येऊनि अंगासी संचरें । आपुला घेउनी पुरस्कार । आरोग्य करीं तुकयासी ॥ ४ ॥

॥ ४१४ ॥ साच माझा देव्हारा । भाक ठेवा भाव खरा । त्रिगुणाचा फुलवरा । आणा विनंति सांगतों ॥ धृ० ॥ माझें दैवत हें रंगीं । नाचे वैष्णवांचा संगीं । भरलें मग अंगीं । निवाड करी दोहींचा ॥ १ ॥ तुझें आहे तुजपासीं । परि तूं जागा चुकलासी । निवडु-नियां नासी । तुझ्या घरिच्यांनीं केली ॥ २ ॥ आतां न पडे ठावें । वांचूनियां माझ्या देवें । अंधकार व्हावें । नासु ठाव शोधावा ॥ ३ ॥ आंधळ्यांसी डोळे । देते पांगुळासी पाय । वांजा पुत्र फळे । नवस पुरविते विठाई ॥ ४ ॥ उगविली कोडीं । मागें कितेकांचीं सांपडीं । तुका ह्मणे घडी । न लगे नवस द्या आधीं ॥ ५ ॥

॥ ४१५ ॥ विनति घातली अवधारीं । मज देईं वो अभय करीं । पीडिलों खेचरीं । आणीक वारी नांवांची ॥ धृ० ॥ रंगा येईं वो ऐकला रंग वोडवला । हरिनाम उठिला गाजर केला हाकारा ॥ १ ॥ देवांचे दैवते । तुज नमिलें आदिनाथें । ये वो कृपावंते । भोगा माझ्या धांवती ॥ २ ॥ न लवीं आतां वेळ । आइत सारिली सकळ । तुका ह्मणे कुळ । आमुचिये दैवते ॥ ३ ॥

॥ ४१६ ॥ माझा देव्हारा साचा । नाहीं आणीक कोणाचा । त्रिभुवनीं याचा । ठसा न लगे पुसावें ॥ धृ० ॥ या रे लोटांगणीं । कांहीं करा विनवणी । करील झाडणी । भूत काढी संसार ॥ १ ॥ पडिले विषयांचे गोंधळीं । ते त्रिगुण आकळी । हरिनाम आरोळी । कानीं पडतां ते उठी ॥ २ ॥ घेतला अहंकारें । काम क्रोध या मत्सरें । पळती प्रेमभरें । अवघे ठाव सांडुनी ॥ ३ ॥ घेतलासे पुरा । माया ममता आसरा । अवघ्या एकसरा । पळती रंग देखोनी ॥ ४ ॥ तुका ह्मणे द्यावा भाव । फिटेल मनिचा संदेह । आणीक न लगे ठाव । कांहीं कोठें हिंडावे ॥ ५ ॥

॥ ४१७ ॥ पुढें येते देवी । तिची जती चालों द्यावी । मागील झाडावी । झाडा मान आसडी ॥ धृ० ॥ एकवीरा आली अंगा । आतां निवारील रोगा । माझ्या भक्तापाशीं सांगा । पूजा भावें करावी ॥ १ ॥ मेंढा मारावा लोवाळ । पूजा पावली सकळ । तुह्मीं केलें बळ । मग मी ठायीं न पडें ॥ २ ॥ तुका ह्मणे मुळीं । लागली ते आली कुळीं । वंदुनी सकळीं । जीवें भावें ओवाळा ॥ ३ ॥

॥ ४१८ ॥ अवघ्या जेष्ठादेवी कोण पूजनाचा ठाव । धरितांचि भाव कोठें नाहींसें जालें ॥ धृ० ॥ दिसे सारिखें सारिखें । परि तें कारणीं पारिखें । तळीं गेलें देखें । वरी टोले न साहाती ॥ १ ॥ पट एका शिरीं । यथाविधीनें त्या येरी । बसकोळ्या घागरी डेरे रांझण गाडगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माना । येथें कोणीं रुसावें ना । आपुलाल्या स्थानां । जेथें त्याचि शोभल्या ॥ ३ ॥

॥ ४१९ ॥ खेचर खडतर । काळ कांपती असुर । नांदे भीमातीर । पंढरपुरपाटणीं ॥ धृ० ॥ आतां करी कां रे हाकारा । सहस्र नामें एकसरा । दवडिते खेचरा । अंगसंगें धरूनी ॥ १ ॥ सीते जाली झडपणी । राहाणे वासुगीच्या बनीं । पावली जननी । झोंटि मोकळिया केशी ॥ २ ॥ लाविलें कावरें । प्रल्हादा ह्मैसासुरें । आली येकसरें । दांत खात रंगासी ॥ ३ ॥ वसुदेवाचीं बाळें । सात खादलीं ज्या काळें । आली भोगवेळे । तया कारणें तेथें ॥ ४ ॥ पांडवें बापुडीं । वाज केलीं फिरती वेडीं । धांवोनियां काढी । अंगसंगें वाहाविलीं ॥ ५ ॥ नामाचें चिंतन । तेथें धांवते आपण । न विचारितां हीण । भाव देखे जयाचा ॥ ६ ॥ कुळीची कुळदेवता । तुका ह्मणे आह्मां माता । काय भय भूतां । काळ यमदूताचें ॥ ७ ॥

॥ ४२० ॥ देवी देव जाला भोग सरला यावरी । सांगाया दुसरी ऐसी नाहीं उरली ॥ धृ० ॥ हरिनाम देवनाम तुह्मी गाऊनियां जागा । पेंठवणी मागा नका ठेवूं लिगाड ॥ १ ॥ शेवटीं सुताळी बरवी वाजवावी डांक । ताळा घाली एक सरलियाचे शेवटीं ॥ २ ॥ गुंडाळा देव्हारा मान देती मानकरी । तुका ह्मणे बरीं आजि कोडीं उगविलीं ॥ ३ ॥

॥ ४२१ ॥ जाली झडपणी खडतर देवता । संहरली आतां निघों नये ॥ धृ० ॥ मज उपचार ह्मणी आतां करा । न साहे दुसरा भार कांहीं ॥ १ ॥ नेऊनियां घाला चंद्रभागे तिरीं । जीवा नाहीं उरी कांहीं आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे कळों आलें वर्तमान । माझें तों वचन आच्छादलें ॥ ३ ॥

॥ ४२२ ॥ अंगीं देवी खेळे । कां रे तुह्मासी न कळे । कोणाचे हे चाळे । सुख दुःख न मानितां ॥ धृ० ॥ मीं तों आतां येथें नाहीं । ओळखी वचनाच्या ठायीं । पालटाचा घेई । भाव खरें लोपे ना ॥ १ ॥ आपुलाले तुह्मी पुसा । सोवा एव्याच सरिसा । स्थिरावल्या कैसा । काय जाणों विचार ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभकाळ । तेथें नसावें शीतळ । मग तैशी वेळ । कोठें जाते सांपडों ॥ ३ ॥

॥ ४२३ ॥ पांगुळ जालों देवा नाहीं हात ना पाय । बैसलों जयावरी सैराट तें जाय । खेटितां कुंप कांटी । खुंट दरडी न पाहे । आधार नाहीं मज कोणी । बाप ना माये ॥ धृ० ॥ दाते हो दान करा । जातें पंढरपुरा । न्या मज तेथवरी । अखमाचा सोयरा ॥ १ ॥ हिंडतां गव्हानें गा । शिणलों दारोदारीं । न मिळेचि दाता कोणी । जन्मदुःखातें वारी । कीर्ति हे संता मुखीं । तोचि दाखवा हरी । पांगळा पाय देतो नांदे । पंढरपुरीं ॥ २ ॥ या पोटाकारणें गा । जालों पांगीला जना । न सरेचि बापमाय । भीक नाहीं खंडणा । पुढारा ह्मणती एक । तया नाहीं करुणा । श्वान हें लागे पाठीं । आशा बहु दारुणा ॥ ३ ॥ काय मी चुकलों गा । मागें नेणवे कांहीं । न कळेचि पाप पुण्य । तेथें आठव नाहीं । मी माझी भुललों गा । दीप पतंगासोयी । द्या मज जीवदान । संत महानुभाव कांहीं ॥ ४ ॥ दुरोनि आलों मी गा । दुःख जालें दारुण । यावया येथवरी होतें हें चि कारण । दुर्लभ भेटी तुह्मां । पायीं जालें दरुषन । विनावितो तुका संतां । दोन्ही कर जोडून ॥ ५ ॥

॥ ४२४ ॥ देश वेष नव्हे माझा । सहज फिरत आलों । करूं सत्ता कवणावरी । कोठें स्थिर राहिलों पाय डोळे ह्मणतां माझे । तीं हीं कैसा मोकलिलों । परदेशी नाहीं कोणी । अंध पांगुळ जालों ॥ धृ० ॥ आतां माझी करीं चिंता । दान देईं भगवंता । पाठीं पोटीं नाहीं कोणी । निरवीं सज्जन संता ॥ १ ॥ चालतां वाट पुढें । भय वाटतें चित्तीं । बहुत जन गेलीं । नाहीं आलीं मागुतीं । न देखें काय जालें । कान तरी ऐकती । बैसलों संधिभागीं । तुज धरूनि चित्तीं ॥ २ ॥ भाकितों करुणा गा । जैसा सांडिला ठाव । न भरे पोट कधीं । नाहीं निश्चळ पाव । हिंडतां भागलों गा । लक्ष चौऱ्याशीं गांव । धरूनि राहिलों गा । हाचि वसता ठाव ॥ ३ ॥ भरवसा काय आतां । कोण आणि अवचिता । तैसीच जाली कीर्ति । तया मज बहुतां । ह्मणउनि मारीं हाका । सोयी पावें पुण्यवंता । लागली भूक थोरी । तूंचि कृपाळु दाता ॥ ४ ॥ संचित सांडवलें । कांहीं होतें जवळीं । वित्त गोत पुत्र माया । तुटली हे लागावळी । निष्काम जालों देवा । होतें माझे कपाळीं । तुका ह्मणे तूंचि आतां । माझा सर्वस्वे बळी ॥ ५ ॥

॥ ४२५ ॥ देखत होतों आधीं मागें पुढें सकळ । मग हे दृष्टि गेली वरी आले पडळ । तिमिर कोंदलेंसें वाढे वाढतां प्रबळ । भीत मी जालों देवा काय ज्याल्याचें फळ ॥ धृ० ॥ आतां मज दृष्टी देईं । पांडुरंगा मायबापा । शरण आलों आतां । निवारूनियां पापा । अंजन लेववुनी । करीं मारग सोपा । जाईन सिद्धपंथें । अवघ्या चुकती खेपा ॥ १ ॥ होतसे खेद चिंता । कांहीं नाठवे विचार । जात होतों जना मागें । तोही सांडिला आधार । हा ना तोसा ठाव जाला । अवघा पडिला अंधार । फिरलीं माझीं मज । कोणी न देती आधार ॥ २ ॥

जोंवरि चळण गा । तोंवरि ह्मणती माझा । मानिती लहान थोर । देहसुखाच्या का[illegible] इंद्रियें मावळलीं । आला बागुल आजा । कैसा विपरीत जाला । तो विदेह नव्हे दुजा ॥ ३ ॥ गुंतलों या संसारें । कैसा झालोंसें अंध । मी माझें वाढवुनी । मायातृष्णेचा बाध । स्वहित न दिसेचि । केला आपुला वध । लागले काळ पाठीं । सवें काम हे क्रोध ॥ ४ ॥ लागती चालतां गा । गुणदोषाच्या ठेंसा । सांडिली वाट मग । जालों निराळा कैसा । पाहतों वास तुझी । थोरी करुनी आशा । तुका ह्मणे वैद्यराजा । पंढरीच्या निवासा ॥ ५ ॥

॥ ४२६ ॥ सहज मी आंधळा गा निजानिराकार पंथें । वृत्ति हे निवृत्ति जाली जन न दिसे तेथें । मी माजी हारपलें ठायीं जेथींचा तेथें । अदृश्य तेंचि जालें कांहीं दृश्य जें होतें ॥ धृ० ॥ सुखी मी निजलों गा शून्य सारूनि तेथें । त्रिकुटशिखरी गा ज्ञान मिळे आइतें ॥ १ ॥ टाकिली पात्र झोळी धर्मअधर्म आशा । कोल्हाळ चुकविला त्रिगुणाचा वोळसा । न मागें मी भीक आतां हाचि जाला भरवसा । वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ॥ २ ॥ ऊर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद । अरूप जागविला दाता घेऊनि छंद । घेऊनि आला दान निजतत्व निजबोध । स्वरूपीं मेळविलें नांव ठेविला भेद ॥ ३ ॥ शब्द हा बहुसार उपकाराची राशी । ह्मणोनि चालविला मागें येतील त्यांसीं । मागोनि आली वाट सिद्धओळीचि तैसी । तरले तरले गा आणीक ही विश्वासी ॥ ४ ॥ वर्म तें एक आहे दृढ धरावा भाव । जाणिवनागवण नेदी लागो ठाव ॥ ह्मणोनि संग टाकी सेवीं अद्वैत भाव । तुका ह्मणे हाचि संतीं मार्गें केला उपाव ॥ ५ ॥

॥ ४२७ ॥ आंधळ्यापांगळ्याचा एक विठोबा दाता । प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता । घडी मोडी हेळामात्रें पापपुण्यसंचिता । भवदुःख कोण वारी तुजवांचुनि चिंता ॥ धृ० ॥ धर्म गा जागो तुझा तूंचि कृपाळु राजा । जाणसी जीवींचें गा न सांगतां सहजा ॥ १ ॥ घातली लोळणी गा पुंडलीकें वाळवंटीं । पंढरी पुण्य ठाव नीरे भीवरे तटीं । न देखें दुसरें गा जाली अदृश्यदृष्टी । वोळला प्रेमदाता केली अमृतवृष्टी ॥ २ ॥ आणीक उपमन्यु एक बाळ धाकुटें । न देखे न चलवे जना चालते वाटे । घातली लोळणी गा हरिनाम बोभाटें । पावला त्याकारणें धांव घातली नेटें ॥ ३ ॥ बैसोनि खोळी शुक राहे गर्भ आंधळा । शीणला येरझारी दुःख आठवी वेळा । मागील सोसिलें तें ना भी ह्मणे गोपाळा । पावला त्याकारणें लाज राखीली कळा ॥ ४ ॥ न देखे जो या जना तया दावी आपणा । वेगळा सुखःदुखा मोहो सांडवी धना । आपपर तें ही नाहीं बंधुवर्ग सज्जना । तुकया तेंचि परी जाली पावें नारायणा ॥ ५ ॥

॥ ४२८ ॥ भगवंता तुजकारणें मेलों जीताचि कैसी । निष्काम बुद्धि ठेली चळण नाहीं तयासी । न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी । जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी ॥ धृ० ॥ विठोबा दान दे गा तुझ्या सारिखें नामा । कीर्ति ये वाखाणिली थोर वाढली सीमा ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति तूंचि एक होसि सिद्धीचा दाता । ह्मणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता । सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां । कृपादान देईं देवा येऊनि सामोरा आतां ॥ २ ॥ संसारसागरु गा भवदुःखाचें मूळ । जनवाद

अंथरूण माजी केले इंगळ । इंद्रियें वज्रघातें तपें उष्ण वरी जाळ । सोसिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ ॥ ३ ॥ तिन्हीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा । वेंघलों वरि खोडा भाव धरूनि टेंका । जाणवी नरनारी जागो धरम लोकां । पावती पुण्यवंत सोई आ मुच्यिये शाका ॥ ४ ॥ नाठवे आपपर आतां काय बा करूं । सारिखा सोइसवा हारपला विचारू । घातला योगक्षेम तुज आपुला भारू । तुकया शरणागता देई अभयकरू ॥ ५ ॥

## वासुदेव.

॥ ४२९ ॥ मनुराजा एक देहपुरी । असे नांदतु त्यासि दोघी नारी । पुत्र पौत्र संपन्न भारी । तेणें कृपा केली आह्मांवरी गा ॥ धृ० ॥ ह्मणउनि आलों या देशा । होतों नाहीं तरी भुललों दिशा । दाता तो मज भेटला इच्छा । येउनि मारग दाविला सरिसा गा ॥ १ ॥ सवें घेउनि चौघेजण । आला कुमर सुलक्षण । कडे चुकवुनि कांटवण । ऐका आणिलीं तीं कोण कोण गा ॥ २ ॥ पुढें भक्तीनें धरिलें हातीं । मागें ज्ञान वैराग्य धर्म येती । स्थिर केलीं जीं आचपळें होतीं । सिद्ध आणुनि लाविलीं पंथीं गा ॥ ३ ॥ केले उपकार सांगों काय । बाप न करी ऐसी माय । धर्में त्याच्या देखियेले पाय । दिलें अक्षय भय वारूनि दान गा ॥ ४ ॥ होतों पीडत हिंडतां गांव । पोट भरेना राहावया ठाव । तो येणें अवघा संदेह । ह्मणे फेडियेला तुकयाचा बंधव गा ॥ ५ ॥

॥ ४३० ॥ गातों वासुदेव मी ऐका । चित्त ठेवुनि ठायीं भावें एका । डोळे झाकुनि राग करूं नका । काळ करीत बैसला लेखा गा ॥ धृ० ॥ राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबंदीं । सांडावा उगिया उपाधी । लक्ष लावुनि राहा गोविंदीं गा ॥ १ ॥ ऐसा अल्प मानवी देह । शत गणिलें अर्ध रात्र खाय । पुढें बालत्व पीडा रोग क्षय । काय भजनासि उरलें तें पाहें गा ॥ २ ॥ क्षणभंगुर नाहीं भरवसा । व्हा रे सावध सोडा माया आशा । न चळे बळ पडेल मग फासा । पुढें हुशार थोर आहे वोळसा गा ॥ ३ ॥ कांहीं थोडें बहुत लागपाठ । करा भक्ति भाव धरा बळकट । तन मन ध्यान लावुनियां नीट । जर असेल करणें गोड शेवट गा ॥ ४ ॥ विनवितों सकळां जनां । कर जोडुनि थोरां लाहनां । दान इतुलें द्या मज दीना । ह्मणे तुकयाबंधु राम ह्मणा गा ॥ ५ ॥

॥ ४३१ ॥ गेले टळले पाहार तीन । काय निदसुरा अज्ञून । जागे होउनि करा कांहीं दान । नका ऐकोनि झाकों लोचन गा ॥ धृ० ॥ हरि राम कृष्ण वासुदेवा । जाणवितसें जना । चिपळ्या टाळ हातीं मुखीं घोष । नारायणा गा ॥ १ ॥ जें टाकेल कोणा कांहीं । फळ पुष्प अथवा तोय । द्या परी मीस घेऊं नका भाई । पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥ २ ॥ देवाकारणें भाव तस्मात् । द्यावें न लगे फारसें वित्त । जालें एक चित्त तरी बहुत । सेवळ्यासाठीं नका करूं वाताहात गा ॥ ३ ॥ आलों येथवरी बहु सायास । करितां दान हेंचि मागावयास । नका भार घेऊं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥ ४ ॥ आतां मागुता येईल फेरा । हें तों न घडे या नगरा । ह्मणे तुकयाबंधु धरा । ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥ ५ ॥

॥ ४३२ ॥ राम राम दोनी अक्षरें। सुलभ आणि सोपारें । जागा मागिले प्रहारें। सेवटिचें गोड तेंचि खरें गा ॥ धृ० ॥ राम कृष्ण वासुदेवा । जाणवी जनासी। वाजवी चिपळिया । टाळ घागऱ्याघोषें गा ॥ १ ॥ गाय वासुदेव वासुदेवा। भिन्न नाहीं आणिका भावा। दान आणोनियां करीं आवा। न ठेवीं उरीं कांहीं ठेवा गा ॥ २ ॥ एक वेळा आणविती। धरूनियां राहा चित्तीं। नेघें भार सांडीं कामा हातीं। नीज घेऊनि फिरती गा ॥ ३ ॥ सुपात्रीं सर्व भाव। मीं तों सर्व वासुदेव । जाणती कृपाळु संत महानुभाव। जया भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥ ४ ॥ शूर दान जीवें उदार । नाहीं वासुदेवीं विसर। कीर्ति वाढे चराचर। तुका ह्मणे तया नमस्कार गा ॥ ५ ॥

॥ ४३३ ॥ बोल बोले अबोलणें। जागें बाहेर आंत निजेलें। कैसें घरांत घरकुल केलें। नेणों आंधार ना उजेडलें गा उजेडलें गा ॥ धृ० ॥ वासुदेव करितों फेरा। वाडिआंत बाहेर दारा। कोणी कांहीं तरी दान करा। जाब नेदा तरी जातों सामोरा गा ॥ १ ॥ हातीं टाळ दिंडी मुखीं गाणें। गजर होतो बहु मोठ्यानें। नाहीं निवडिलीं थोरलाहानें। नका निजों भिकेच्या भेणें गा ॥ २ ॥ मी वासुदेव तत्वता । कळों येईल विचारितां। आहे ठाउका सभाग्या संतां। नाहीं दुजा आणीक मागता गा ॥ ३ ॥ काय जागाचि निजलासी। सुनें सांगोन दारापासीं। तुझ्या हितापाठीं करी व्यास व्यासी । भेटी न घेसी वासुदेवासी गा ॥ ४ ॥ ऐसें जागविलें अवघें जन। होतें संचित तींहीं केलें दान । तुका ह्मणे दुबळीं कोणकोण। गेलीं वासुदेवा विसरून गा ॥ ५ ॥

॥ ४३४ ॥ रामकृष्ण गीती गात। टाळ चिपळ्या वाजवीत। छंदें आपुलिया नाचत। नीज घेऊनि फिरत गा ॥ धृ० ॥ जनीं वनीं हा अवघा देव। वासनेचा हा पुसावा ठाव। मग बोळगती वासुदेव। ऐसा मनीं वसूं आवा भाव गा ॥ १ ॥ निज दासाची थोर आवडी। वासुदेवासि लागली गोडी। मुखीं नाम उच्चारी घडोघडीं। ऐसी करा हे वासुदेवजोडी गा ॥ २ ॥ अवघा सारूनि सेवट जाला। प्रयत्न न चले कांहीं केला। जागा होई सांडुनि झोपेला। दान देई वासुदेवाला गा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रे धन्य त्याचें जिणें। जींहीं घातलें वासुदेवा दान। त्याला न लगे येणें जाणें। जालें वासुदेवीं राहणें गा ॥ ४ ॥

## गांवगुंड.

॥ ४३५ ॥ आह्मी जालों गांवगुंड। अवघ्या पुंड भूतांसी ॥ धृ० ॥ दुसरें तें खेळों आलें। एका बोलें तो मियां ॥ १ ॥ अवघियांचा येऊं लाग । नेदूं अंग शिवाया ॥ २ ॥ तुका ह्मणे खुंदूं नाद। जिंतूं वाद सर्वांनें ॥ ३ ॥

## जोगी.

॥ ४३६ ॥ जग जोगी जग जोगी। जागजागे बोलती ॥ धृ० ॥ जागता जगदेव। राखा कांहीं भाव ॥ १ ॥ अवघा क्षेत्रपाळ। पूजा सकळ ॥ २ ॥ पूजापत्र कांहीं । फल पुष्प तोय ॥ ३ ॥ बहुतां दिसां फेरा । आला या नगरा ॥ ४ ॥ नका घेऊं भार । धर्म तोचि सार ॥ ५ ॥ तुका मागे दान। द्या जी अनन्य ॥ ६ ॥

# सरवदा.

॥ ४३७ ॥ एका गा ए भाई । सरवदा सांगतो काई । येथें नाडेल माई । हो पुत्रांची । ते करिती तिची विटंबना । अवघ्या प्रसिद्ध जना । एक न मानिमां ताहाणा । तो जाणा सुख न पवे ॥ धृ० ॥ आणीक ऐका गा ए । सरवदा सांगतो काय । खरेंचि बोले तो जाय । नरकामध्यें अधोगती । हें चौघांच्या मुखें । मना आणावें सुखें । अवघीं चुकती दुःखें । खोटें बोला नरनारी ॥ १ ॥ आणीक नाडेल एक जाण । सरवदा बोलतो वचन । जागें माझें ह्मणोन । पडिलें खान तया घरीं । ह्मणोन न ह्मणा माझें काहीं । निजीं निजा सुखें ठायीं । यत्न होईल तई । चोराठायीं विश्वास ॥ २ ॥ आणीक एकी परी । सरवदा सांगतो थोरी । दुःख पावेल नारी । पतिव्रता यामधीं । पांचांनी दिधली हातीं । ह्मणोनि न मनावी निश्चिती । परपुरुषीं होय रती । सुखगती न पावे ॥ ३ ॥ आणीक एकी परी । सरवदा सांगतो तें करीं । दान देतां जो न वारी । नव्हे भला भला तो । तुका ह्मणे भाई । येथें नांव काई । सांगसी तें ठायीं । मरो रांडेचे ॥ ४ ॥

# मुंढा.

॥ ४३८ ॥ संबाल यारा उपर तलें दोन्हो मारकी चोट । नजर करे सो ही गावे पछ्या जावे लुट ॥ धृ० ॥ प्यार खुदाई रे बाबा जिकिर खुदाई ॥ १ ॥ उडे कुंड बुग नचावे आगल भुलन प्यार । लडबड खडबड कांहेका खचलावत भार ॥ २ ॥ कहे तुका चलो एका हम जिन्होंके सात । मिलावे तो उसे देना तोही चढावे हात ॥ ३ ॥

॥ ४३९ ॥ सब संबाल भ्याने लौंढे खडा केऊं गुंग । मदिरयी मना हुवा भंगि राडी भंग ॥धृ०॥ अपसकुं संबाल आपसकुं संबाल । मुंढे खुब राख ताल । मुथिर्वाले बोला नहीं तो करूंगा हाल ॥ १ ॥ आवलका तो पीछें नहीं मुदल बिसर जाय । फिरते नहीं माज रंडी गधे गोते खाय ॥ २ ॥ जिन्हो खातिर इतना होता सो नहीं तुझे बेफाम । उन्हा जोरो लिया तुंबा तुंबा बुरा काम ॥ ३ ॥ निकल जावे चिकल जोरो मुंढे दिलदारी । जबानीकी छोड दे बात फिर एक तारी ॥ ४ ॥ कहे तुका फिसल रुका मेरे को दान देख । पकड धका गांडगुढघी मार चलाऊं आलेख ॥ ५ ॥

॥ ४४० ॥ आवल नाम आल्ला बडा लेते भुल न जाये । इलाम त्याकामुपरताही तुंब बजाये ॥ धृ० ॥ आल्ला एक तूं नबी एक तूं ॥ १ ॥ काटते सिर पावों हात नहीं जीव उराये । आगले देखे पिछले बुझे । आपें हजुर आये ॥ २ ॥ सब सबरी नचाव भ्याने । खडा आपनी सात । हात पावों रखते जवाब । नहीं आगनी बात ॥ ३ ॥ सुनो भाई बजार नहीं । सबहि निरचे लाव । नन्हा बडा नहीं कोये एक तेर मिलाव ॥ ४ ॥ गल्लालिये एक तार नहीं प्यार । जीवतनकी आस । कहे तुका सो हि बुझा । राख्खालिये पायेंनपास ॥ ५ ॥

## डोई फोडा.

॥ ४४१ ॥ तन भञ्याय ते बुरा जिकीर ते करे । सीर काटे ऊर कुटे ताहां सब डरे ॥ धृ० ॥ ताहां एक तूं ही ताहां एक तू ही । ताहां एक तूं ही रे बाबा हमें तुह्मे नहीं ॥ १ ॥ दिदार देखो भुले नहीं किशे पछाने कोये । सचा नहीं पकडूं सके झुटा झुटे रोये ॥ २ ॥ किसे कहे मेरा किन्हे सात लिया भास । नहीं मेलो मिले जीवना झुटा किया नास ॥ ३ ॥ सुनो भाई कैसा तोही । होय तैसा होय । बाट खाना आल्ला कहाना दुकवारां तोही ॥ ४ ॥ भला लिया भेक मुंढे । आपना नफा देख । कहे तुका सोही संका । हाक आल्ला एक ॥ ५ ॥

## मलंग.

॥ ४४२ ॥ नजर करे सोहि जिके बाबा दुरथी तमासा देख । लकडी फांसा लेकर बैठा मागले ठकण भेख ॥ धृ० ॥ काहे भुला एक देखत आंखो मार तडांगो बाजार ॥ १ ॥ दमरी चमरी जो नर भुला । सोत आघो हि लत खाये ॥ २ ॥ नहि बुलावत किसे बाबा आपहि मत जाये । कहे तुका उस असाके संग फिरफिर गोदे खाये ॥ ३ ॥

## दरवेस.

॥ ४४३ ॥ अल्ला करे सो होय बाबा करतारका सिरताज । गाउ बछरे तिस चलावे यारी बाघो न सात ॥ १ ॥ खयाल मेरा साहेबका । बाबा हुवा करतार । व्हांटें आघे चढे पीठ । आपे हुवा असवार ॥ २ ॥ जिकिर करो अल्लाकी बाबा सबल्यां अंदर भेस । कहे तुका जो नर बुझे सो हि भया दरवेस ॥ ३ ॥

## वैद्यगोळी.

॥ ४४४ ॥ अल्ला देवे अल्ला दिलावे अल्ला दारु अल्ला खिलावे । अल्ला बगर नही कोये अल्ला करे सोहि होये ॥ धृ० ॥ मर्द होये वो खडा फीर नामर्दकुं नहीं धीर । आपने दिलकुं करना खुसी तीन दामकी क्या खुमासी ॥ १ ॥ सब रसोंका किया मार । भजन-गोली एकहि सार । इमान तो सबही सखा । थोडी तो भी लेकर ज्या ॥ २ ॥ जिन्हो पास नील सोये । वोहि बसकर तिरोवे । सांतो पांचो मार चलावे । उतार सो पीछे खावे ॥ ३ ॥ सब ज्वानी निकल जावे । पीछे गधडा मटी खावे । गांवढाळ सो क्या लेवे । हयवानि मरी नहि धोवे ॥ ४ ॥ मेरी दारु जिन्हें खाया दिदार दरगां सो हि पाया । सन्हे बुंदी पाल जावे । बिगारी सोवे क्या लेवे ॥ ५ ॥ बजारका बुझे भाव । वो हि पुसता आवे ठाव । फुकट बाटु कहे तुका । लेवे सोहि लें हिसखा ॥ ६ ॥

## गोंधळ.

॥ ४४५ ॥ राजस सुंदर बाळा । पाहों आलिया सकळा वो । बिंबीं बिंबोनि ठेली माझी परब्रह्म वेल्हाळा वो कोटि रविशशी माझी । परब्रह्म वेल्हाळा वो ॥ धृ० ॥ राजस

विठाबाई । माझें ध्यान तुझे पायीं वो । त्यजुनियां चौर्‍यांसी । लावी आपुलिये सोई वो ॥ १ ॥ सकुमार साजिरी । कैसीं पाउलें गोजिरीं वो । कंठीं तुळसीमाळा । उभी भीवरेच्या तिरीं वो । दंत हिरया ज्योती । शंखचक्र मिरवे करीं वो ॥ २ ॥ निर्गुण निराकार । वेदां न कळेचि आकार वो । शेषादिक श्रमले । श्रुति न कळे तुझा पार वो । उभारोनि बाहे । भक्तां देत अभयकर वो ॥ ३ ॥ येउनि पंढरपुरा । अवतरली सारंगधरा वो । देखोनि भक्ति भाव । वोरसली अमृतधारा वो । देउनि प्रेमपान्हा । तुकया स्वामीनें किंकरा वो ॥ ४ ॥

॥ ४४६ ॥ सुदिन सुवेळ । तुझा मांडिला गोंधळ वो । पंच प्राण दिवटे । दोन्ही नेत्रांचे हिलाल वो ॥ धृ० ॥ पंढरपुरनिवासे । तुझे रंगीं नाचत असें वो । नवस पुरवीं माझा । मनिची जाणोनियां इच्छा वो ॥ १ ॥ मांडिला देव्हारा । तुझा त्रिभुवनामाझारीं वो । चौक साधियेला । नाभिकळस ठेविला वरी वो ॥ २ ॥ बैसली देवता । पुढें वैष्णवांचें गाणें वो । उद्गारें गर्जती । कंठीं तुळसीचीं दर्शनें वो ॥ ३ ॥ स्वानंदाचे ताटीं । धूप दीप पंचारती वो । ओवाळिली माता । विठाबाई पंचभूतीं वो ॥ ४ ॥ तुझें तुज पावलें । माझा नवस पुरवीं आतां वो । तुका ह्मणे राखें । आपुलिया शरणागता वो ॥ ५ ॥

॥ ४४७ ॥ सुंदर मुख साजिरें । कुंडलें मनोहर गोमटीं वो । नागर नाग खोपा । केशर कस्तुरी मळवटीं वो । विशाळ व्यंकट नेत्र । वैजयंती तळपे कंठीं वो । कास पीतांबराची । चंदन सुगंध साजे उटी वो ॥ धृ० ॥ अतिबरवंटा बाळा । आली सुलक्षणी गोंधळा वो । राजस तेजोराशी । मिरवी शिरोमणी वेल्हाळा वो । कोटि रविशशिप्रभा । लोपल्या सकळा वो । न कळे ब्रह्मादिकां । अनुपम्य इची लीळा वो ॥ १ ॥ सावळी सकुमार । गोरी भुजा शोभती चारी वो । सखोल वक्षस्थळ । सुढाळ पदक झळके वरी वो । कटीं क्षुद्र घंटिका । शब्द करिताती माधुरी वो । गर्जत चरणीं वाकी । अभिनव संगीत करी वो ॥ २ ॥ अष्टांगें मंडित काय । वर्णावी रूपठेवणी वो । शोधिव सुंदर रसाची ओतिली । सुगंध लावण्यखाणी वो । सर्वकळासंपन्न । मंजुल बोले हास्यवदनीं वो । बहु रूपें नटली । आदिशक्ति नारायणी वो ॥ ३ ॥ घटस्थापना केली । पंढरपुरमहानगरीं वो । अस्मानीं मंडप दिला । तिन्ही ताळांवरी वो । आरंभिला गोंधळ इनें । चंद्रभागेतिरीं वो । आली भक्तिकाजा । कृष्णाबाई योगेश्वरी वो ॥ ४ ॥ तेहतिस कोटि देव । चामुंडा अष्ट कोटि भैरव वो । आरत्या कुरवंडया । करिती पुष्पांचा वरुषाव वो । नारद तुंबर गायन । ब्रह्मानंद करिती गंधर्व वो । वंदी चरणरज तेथें । तुकयाचा बंधव वो ॥ ५ ॥

॥ ४४८ ॥ शंख करिशी ज्याच्या नांवें । त्याचें तुज नाहीं ठावें । ऐक सांगतों एका भावें । सांपडे घरीं तें जीवउनि खावें । रे विठ्ठल ॥ धृ० ॥ टिळे माळा करंडी सोंग । धरुनि चाळाविलें जग । पसरी हात नाहीं त्याग । दावी दगड पूजी भग । रे विठ्ठल ॥ १ ॥ राख लावुनि अंग मळी । वाये ठोके मी एक बळी । वासने हातीं बांधवी नळी । त्यासि येउनि गिळी । रे विठ्ठल ॥ २ ॥ कोण तें राहडीचें सुख । वरते पाय हातें मुख ।

करवी पीडा भोगवी दुःख । पडे नरकीं परी न पळेचि मूर्ख । रे विठ्ठल ॥ ३ ॥ सिकला फाक मारी हाका । रांडा पोरें मेळवी लोकां । विटंबी शरीर मागे रुका । केलें तें मोलें अवघेंचि फुका । रे विठ्ठल ॥ ४ ॥ कळावें जनां मी एक बळी । उभा राहोनि मांडी फळी । फोडोनि गुडघे कोंपर चोळी । आपला घात करोनि आपणचि तळमळे । रे विठ्ठल ॥ ५ ॥ फुकट खेळें ठकलीं वायां । धरुनि सोंग बोडक्या डोया । विसरों नये ती अंतरीं माया । संपादणीविण विटंबिली काया । रे विठ्ठल ॥ ६ ॥ धुळी माती कांहीं खेळोंच नका । जवादी चंदन घ्यावा बुका । आपणा परिमळ आणिकां लोकां । मोलाची महिमा फजिती फुका । रे विठ्ठल ॥ ७ ॥ बहुत दुःखी जालियां खेळें । अंगीं बुद्धि नाहींत बळें । पाठी-वरी तोबा तोंड काळें । रसना द्रवे उपस्थाच्या मुळें । रे विठ्ठल ॥ ८ ॥ काय सांगतों तें ऐका तुका । मोडा खेळ कांहीं अवगों च नका । चला जेवूं आधीं पोटीं लागल्या भुका । धाल्यावरी बरा टाकमटिका । रे विठ्ठल ॥ ९ ॥

॥ ४४९ ॥ ऐक बाई तुज वो कांहीं सांगतें शकुन । निजलिया अर होसी आगे म्हणऊन ॥ धृ० ॥ मान्य माझें केलें सांगतें एका बोलें । न येतां हे भले काळीं कोणा लोकांसी ॥ १ ॥ सांगतें गुण जिवींची खुण ऐक माझी मात । बैस एका भावें माझे हातीं दे वो हात ॥ २ ॥ बरवा घरचार तुज सांपडला ठाव । फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ॥ ३ ॥ आहे तुझे हातीं एका नवसाचें फळ । भावा करीं साह्य नाहीं अड-रांच्या बळें ॥ ४ ॥ करीं लागपाठ चित्त वित्त नको पाहों । अखंड तो चुडा तुज भोगईल ना हो ॥ ५ ॥ कुळींची हे मुळी तुझे लागलीसे देवी । पडिला विसर नेदी फळ नाहीं ठावी ॥ ६ ॥ तुका म्हणे नांद सुखें धरीं आठवण । माझ्या येती कोणी त्यांचा राख बरा मान ॥ ७ ॥

## कावडे.

॥ ४५० ॥ आहा रे भाई । प्रथम नमूं तो विनायक । ठेवुनि गुरुचरणीं मस्तक । वदेन प्रसादिक वाणी । हरिहरांचे पवाडे ॥ धृ० ॥ माझी ऐसी ओवावळी । वाटे वासरें आगळी । पान्हेरीनें मार्ग मळी । जीवन घ्या रे कापडि हो ॥ १ ॥ जें या सीनल्यामूनि सीतळ । पाताळा-हुनि जें पातळ । प्रेमामृत रसाळ । तें हें सेवा अहो भाग्याचे ॥ २ ॥ जिकाल तरी जिंका रे अभिमान । दवडाल तरी दवडा लज्जा आणि मान । धराल ते धरा यांचे चरण । दावाल पण ऐसा दावा तो ॥ ३ ॥ काळा घेऊं नेदीं वाव । आला तो राखें पावडाव । शुद्ध सत्वीं राखोनि भाव । म्हणा महादेव हरिहर वाणी गर्जो द्या ॥ ४ ॥ पराचिया नारी माउली समान । परधनीं बाटों नेदीं मन । जीविस्व तें तृणासमान । स्वामिकाजीं आण शूर म्हणों तया ॥ ५ ॥ शक्ति वेचाविया परउपकारा । खोटें खोटयाचा पसारा । सत्य तें भव-नदीचा तारा । आळस तो न करा येथें अहो सांगतों ॥ ६ ॥ व्रत करा एकादशी सोमवार । कथा पूजन हरिजागर । पुण्य तें असे गातां नाचतां बहु फार । पुन्हा बोलिला संसार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥ ७ ॥ संग संतांचा करितां बरवा । उत्तमोत्तम कीर्तिचा ठेवा ।

नेथवरी सुपंथें चालावा । उगवा वासना लिगाड ॥ ८ ॥ तुका चालवितो कावडी । प्रवृत्ति निवृत्ति चोखडी । पुढती पुढती अधिक गोडी । भरूनि कळस भजन आवडी केशवदास नटतसे ॥ ९ ॥

॥ ४५१ ॥ आहा आहा रे भाई । हें अन्नदानाचें सत्र । पव्हे घातली सर्वत्र । पंथीं अवघे पंथ मात्र । इच्छाभोजनाचें आर्त पुरवावया ॥ धृ० ॥ याचें तेणें घ्यावें । न सरेसें केलें सदाशिवें । पात्र शुद्ध पाहिजे बरवें । मंगळभावें सकळ हरि ह्मणा रे ॥ १ ॥ नव्हे हें कांहीं मोकळें । साक्षी चौघांचिया वेगळें । नेदी नाचों मताचिया बळें । अणु अणोरणीया आगळें । महादि महदा साक्षिलें हरि ह्मणा रे ॥ २ ॥ हे हरिनामाची आंबिली । जका पोटभरी केली । विश्रांति कल्पतरूची साउली । सकळां वर्णां सेवितां भली । ह्मणा हर हर महादेव ॥ ३ ॥ तुका हरिदास तराळ । अवघे हाकारी सकळ । या रे वंदू शिखरातळ ॥ चैत्रमास पर्वकाळ महादेवदर्शनें ॥ ४ ॥

॥ ४५२ ॥ आहा रे भाई । नमो उदासीन जाले देहभावा । आळविती देवा तया नमो ॥ धृ० ॥ नमो तीर्थपंथें चालती तयांसी । येती त्यांसी बोळविती त्यां नमो ॥ १ ॥ नमो तयां संतवचनीं विश्वास । नमो भावें दास्य गुरूचें त्यां ॥ २ ॥ नमो तया मातापित्यांचें पाळण । नमो त्या वचन सत्य वदे ॥ ३ ॥ नमो तया जाणे आणिकाचें सुखदुःख । राखे तान भूक तया नमो ॥ ४ ॥ परोपकारी नमो पुण्यवंता । नमो त्या दमित्या इंद्रियांसी ॥ ५ ॥ तुका ह्मणे नमो हरिचिया दासा । तेथें सर्व इच्छा पुरलीसे ॥ ६ ॥

॥ ४५३ ॥ आहा रे भाई । तयावरी माझी ओंवाळीं । भ्रष्ट ये कळीं क्रियाहीन ॥ धृ० ॥ थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी । वाणिली ते थोरी रवडा वांयां बाहेरी ॥ १ ॥ बाइलेच्या दास पित्रांस उदास । भीक भीकाऱ्यास नये दारा ॥ २ ॥ विद्याबळें वाद सांगोनियां छळी । आणिकांसि फळी मांडोनियां ॥ ३ ॥ गांविचिया देवा नाहीं दंडवत । ब्राह्मण अतीत घडेचि ना ॥ ४ ॥ सदा सर्वकाळ करितोचि निंदा । स्वप्नीं ही गोविंदा आठवीना ॥ ५ ॥ खासेमध्यें धन पोटासि बंधन । नेणें ऐसा दानधर्म कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे नट दावुनीयां सोंग । लवों नेदी अंग भक्तिभावें ॥ ७ ॥

॥ ४५४ ॥ आहा रे भाई । गंगा नव्हे जळ । वृक्ष नव्हे वड पिंपळ । तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ । श्रेष्ठ तनु देवाचिया ॥ धृ० ॥ समुद्र नदी नव्हे पैं गा । पाषाण ह्मणों नये लिंगा । संत नव्हती जगा । मानसा त्या सारिखे ॥ १ ॥ काठी ह्मणों नये वेतु । अन्न ह्मणों नये सांतु । राम राम हे मातु । नये ह्मणों शब्द हे ॥ २ ॥ चंद्र सूर्य नव्हती तारांगणें । मेरु तो नव्हे पर्वतासमान । शेष वासुकी नव्हे सर्प जाण । विखाराच्या सारिखे ॥ ३ ॥ गरुड नव्हे पाखरूं । ढोर नव्हे नंदिकेश्वरू । झाड नव्हे कल्पतरू । कामधेनु गाय न ह्मणावी ॥ ४ ॥ कूर्म नव्हे कासव । डुकर नव्हे वराह । ब्रह्मा नव्हे जीव । स्त्री नव्हे लक्ष्मी ॥ ५ ॥ गवाक्ष नव्हे हाड । पाटाव नव्हे कापड । परीस नव्हे दगड । सगुण ते ईश्वरीचे ॥ ६ ॥ सोनें नव्हे धातू । मीठ नव्हे रेतु । नाहीं नाहीं चर्मातु । कृष्णाजिन व्याघ्रांबर ॥ ७ ॥ मुक्ताफळें नव्हेति गारा । खडखाऐसा नव्हे हिरा । जीव नव्हे सोइरा ।

बोळवीजे स्वइच्छेनें ॥ ८ ॥ गांव नव्हे द्वारावती । रणछोड नव्हे मूर्ती । तीर्थ
गोमती । मोक्ष घडे दर्शनें ॥ ९ ॥ कृष्ण नव्हे भोगी । शंकर नव्हे जोगी । तुका प
रंगीं । हा प्रसाद लाधला ॥ १० ॥

## सौऱ्या.

॥ ४५५ ॥ वेसन गेलें निष्काम जालें नर नव्हे नारी । आपल्या तुटी पारख्या
सौरियांचे फेरी ॥ धृ० ॥ त्याचा वेध लागला छंद हरि गोविंद वेळोवेळां । आपुलें
हासत रागें सावलें घालिती गळां ॥ १ ॥ जन वेषा भीतें तोंडा आमुच्या भांडप
कर कटीं भीमा तटीं पंढरीचा राणा ॥ २ ॥ वेगळ्या याति पडिलों खंतीं अवघ्या
भावें । टाकियेली चाड देहभाव जीवें शिवें ॥ ३ ॥ सकळांमधीं आगळी बुद्धि रि
करूं सेवा । वाय तुंबामूढासवें भक्ति नाचों भावा ॥ ४ ॥ ह्मणे तुका टाक रुका न
निर्लज्जा । बहु जालें सुख काम चुकलों या काजा ॥ ५ ॥

॥ ४५६ ॥ आणिकां उपदेशूं नेणें नाचों आपण । मुंढा वांयां मारगेली वांयां
जन ॥ धृ० ॥ तैसा नव्हे चाळा आवरीं मन डोळा । पुढिलांच्या कळा कवतुक जाण
॥ १ ॥ बाहिरल्या वेषें आंत जसें तसें । झाकलें तों बरें पोट भरे तेणें मिसें ॥ २ ॥
ह्मणे केला तरी करीं शुद्ध भाव । नाहीं तरी जासी वांयां हा ना तोसा ठाव ॥ ३ ॥

॥ ४५७ ॥ टाक रुका चाल रांडे कां गे केली गोवी । पुसोनियां आलें ठाव ह्मण
देतें सिवी ॥ धृ० ॥ आतां येणें छंदें नाचों विनोदें । नाहीं या गोविंदें माझें मजसी
॥ १ ॥ कोरडे ते बोल कांगे वेंचितेसी वांयां । वर्ते करूनि दावीं तुझ्या मुळींचिया
॥ २ ॥ याजसाठीं म्या डौर धरियेला हातीं । तुका ह्मणे तुझ्यां गांठी सोडायाची खंती

॥ ४५८ ॥ मोकळी गुंते रिती कुंथे नाहीं भार दावें । धेडवाडा बैसली खोडा घे
आपुल्या भावें ॥ धृ० ॥ ऐका बाई लाज नाहीं आणिकां त्या गरतीची । समाधानी
स्थानीं जाणे सेवा पतीची ॥ १ ॥ न बोलतां करी चिंता न मारितां पळे । दादला
नावडे निजे जगझोडीचे चाळे ॥ २ ॥ देखत आंध बहिर कानीं बोल बोलतां
तुका ह्मणे पतन सोयरीं ऐसीं जालीं एकें ॥ ३ ॥

॥ ४५९ ॥ सातें चला काजळ घाला तेल फणी करा । दिवाण दारीं बैसले पारीं
फेर धरा ॥ धृ० ॥ या साहेबाचें जालें देणें वेळोवेळां न लगे येणें । आतां हाटीं कशा
हिंडों पाटी दुकानें ॥ १ ॥ अवघ्या जणी मुंढा धणी नाचों एकें घाई । सरसावतें
कैसा चाळा एके ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वोळगों एका तोड चिंता माया । देऊं
आतां जाऊं मुळींचिया ठाया ॥ ३ ॥

॥ ४६० ॥ सौरी सुर जालें दुर डौर घेतला हातीं । माया मोह सांडवलें तीहीं
जालें सरती ॥ धृ० ॥ चाल विठाबाई अवघी पांज देई । न धरीं गुज कांहीं चा
सांपडतां ॥ १ ॥ हिंडोनि चौऱ्याशी घरें आलें तुझ्या दारा । एक्या रुक्यासाठीं अ
संसारा ॥ २ ॥ लाज मेली शंका गेली नाचों महाद्वारीं । भ्रांति सावलें फिटो

३ ॥ जालें भांडी जगा सांडी नाहीं भीड चाड । घालीन चरणीं
ां तें कोड ॥ ४ ॥ तुका ह्मणे रुका करी संसारतुटी । आतां तुझ्या
जीवे साटीं ॥ ५ ॥
सपाट वेसनकाट निःसंग जालें सौरी । कुडपीयेला वेष आतां येऊं
गाऊं रघुरामा हेंचि उरलें आह्मां । नाहीं जीवतमा विकगोलासहीत
ता झाकुनि काय आतां । कोणासवें लाज कोण तुका पाहता
ंग आह्मां दुरावलें जग । भिन्न जालें सुख भाव पानरना रंग ॥ ३ ॥
हीं तजियेलां दोन्ही । फिराविला वेष नव्हों कोणाचीच कोणी
आह्मां वेष दिला जेणें । जनाप्रचित सर्वें असो गुरूपणें ॥ ५ ॥
नरनारी संवसारीं अंतरलों । निर्लज्ज निष्काम जना वेगळेंचि ठेलों
मा ने आपुल्या गांवा । तुजविण आह्मां कोण सोयरा सांगाती
निंद्य पिशुनाचे चेरे । साहूं तुजसाठीं अंतरलीं सकोईरें ॥ २ ॥
हाती पाठविला तुज । तुका ह्मणे आतां सांडुनि लौकिक

पाट करूनि थाट । दावीतसे तोरा । आपणाकडे पाहो कोणी ।
धृ० ॥ ते सौरी नव्हे निकी भक्तीविण फिकी ॥ १ ॥ चांग भांग करूनि
मुदी । रुक्याची आस धरुनी । हालवी तीं फुदीं ॥ २ ॥ थोरें घरीं
चे वरी । जेथें निघे रुका । तेथें हालवी टिरी ॥ ३ ॥ भांग मांग बाहेर
व्हे तेग । तुका दास नटतसे । न करी त्याचा संग ॥ ४ ॥
ल माझ्या राघो । डोंगरीं दिवा लागो ॥ धृ० ॥ घर केलें दार केलें ।
जारणी पापिणीचीं । पांच पोरें मरो ॥ १ ॥ घरीं पांच पोरें । तीं मज-
ाचांच्या बळें । खादलीं बावन केळें ॥ २ ॥ घर केलें दार केलें । दुकाण
ी राणी । धांगडधिंगा तिचा मोटा ॥ ३ ॥ दुकान केला मोटा । तर पदरीं
ा ह्मणसी जोगी । तर सोळा सहस्र भोगी । तुका ह्मणे वेगीं । तर
४ ॥
न्मा आलिया गेलिया परी । भक्ति नाहीं केली । माझें माझें ह्मणोनियां ।
० ॥ येथें कांहीं नाहीं । लव गुरूच्या पायीं । चाल रांडे राकी रुका ।
गुरुविण मार्ग नाहीं । करिसी तें फोल ॥ १ ॥ खाउनि वेडनी लेउनि
ाह्मी बऱ्या । साधु संत घरा आल्या । होती पाठमोऱ्या ॥ २ ॥ वाचोनि
। ह्मणती आह्मी संत । परनारी देखोनि त्यांचें । चंचळ जालें चित्त
घालुनि माळा । ह्मणती आह्मी साधू । दयाधर्म चित्तीं नाहीं । ते
॥ कलियुगीं घरोघरीं । संत जाले फार । वीतिभरी पोटासाठीं । हिंडती
त ह्मणती केली निंदा । निंदा नव्हे भाई । तुका असे अनन्यें भावें ।
६ ॥

## वाघा.

४६६ ॥ अनंत जुगाचा देव्हारा । निजबोधांचा घुमारा । अवचिता भरला वारा ।
ळारी देवाचा ॥ धृ० ॥ शुद्धसत्त्वाचा कवडा मोठा । बोधबिरडें बांधला गांठा । गळां
याचा पट्टा । वाटा दावूं या भक्तीच्या ॥ १ ॥ हृदय कोटंबा सांगातें । घोळ वाजवूं
ज्ञातें । ज्ञानभंडाराचें पोतें । रितें नव्हे कल्पांतीं ॥ २ ॥ लक्ष चौऱ्याशीं घरें चारी ।
न्माची केली वारी । प्रसन्न जाला देव मल्लारी । सोहंभावीं राहिलों ॥ ३ ॥ या देवाचें
ां वारें । अंगीं प्रेमाचें फेंपरें । गुरुगुरु करी वेडे चारें । पाहा तुकें भुंकविलें ॥ ४ ॥

## ललित.

४६७ ॥ आजी दिवस जाला । धन्य सोनियाचा भला ॥ धृ० ॥ जाले संताचे
ी । बरवें भोजन निगुती ॥ १ ॥ रामकृष्णनामें । बरवीं मोहियेलीं प्रेमें ॥ २ ॥ तुका
आला । चवी रसाळ हा काला ॥ ३ ॥

४६८ ॥ तुह्मी तरी सांगा कांहीं । आह्मांविशीं रखुमाबाई ॥ धृ० ॥ कांहीं उरलें तें
। वेगीं पाठवुनी देईं ॥ १ ॥ टोकत बैसलों देखा । इच्छीतसें ग्रासा एका ॥ २ ॥
इउनि बहुडा जाला । तुका ह्मणे विठ्ठल बोला ॥ ३ ॥

४६९ ॥ वाट पाहें बाहे निडळीं ठेवुनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टि लागलें चित्त
० ॥ कई येतां देखें माझा मायबाप । घटिका बोटें दिवस लेखीं धरूनियां माप ॥ १ ॥
डोळा लवे उजवी स्फुरते बाहे । मन उताविळ भाव सांडुनियां देहे ॥ २ ॥ सुख-
गोडचित्तीं न लगे आणीक । नाठवे घरदार तान पळाली भूक ॥ ३ ॥ तुका ह्मणे
दिवस ऐसा तो कोण । पंढरीचे वाटे येतां मूळ देखेन ॥ ४ ॥

४७० ॥ तुझें ब्रुस्य करूं आणिका मागों खावया । धिग् जालें जिणें माझें पंढरी-
॥ धृ० ॥ काय गा विठोबा तुज ह्मणावें । थोराच्या दैवें गोड शुभअशुभ ॥ १ ॥
राचा धाक निरंतर आह्मांसी । मरण भलें परि काय अवकळा तैसी ॥ २ ॥ तुझे
गागत शरण जाऊं आणिकांसी । तुका ह्मणे कवणा लाज हें कां नेणसी ॥ ३ ॥

४७१ ॥ पुरविली आळी । जे जे केली ते ते काळीं ॥ धृ० ॥ माय तरी ऐसी सांगा ।
ळुवा पांडुरंगा ॥ १ ॥ घेतलें तुतरी । उचलोनि कडियेवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे घांस ।
घाली ब्रह्मरस ॥ ३ ॥

४७२ ॥ कथेची सामग्री । देह अवसानावरी ॥ धृ० ॥ नको जाऊं देऊं भंगा ।
माझी पांडुरंगा ॥ १ ॥ आयुष्य करीं उणें । परी मज आवडो कीर्तन ॥ २ ॥ तुका
ह्मणी । या वेगळी मना नाणीं ॥ ३ ॥

४७३ ॥ गळित जाली काया । हेंचि ललित पंढरिराया ॥ धृ० ॥ आलें अवसा-
ासीं । रूप राहिलें मानसीं ॥ १ ॥ वाइला कळस । तेथें स्थिरावला रस ॥ २ ॥ तुका
गोड जालें । नारायणीं पोट धालें ॥ ३ ॥

॥ ४७४ ॥ रत्नजडित सिंहासन । वरी बैसले आपण ॥ ध्रु० ॥ कुंचे ढळती दोहीं बाहीं । जवळी रखुमाई राही ॥ १ ॥ नाना उपचारीं । सिद्धि वोळगती कामारी ॥ २ ॥ हातीं घेऊनि पादुका । उभा बंदिजन तुका ॥ ३ ॥

॥ ४७५ ॥ हिरा शोभला कोंदणीं । जडित माणिकांची खाणी ॥ ध्रु० ॥ तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥ १ ॥ कोटी चंद्रलीळा । पूर्णिमेच्या पूर्णकळा ॥ २ ॥ तुका ह्मणे दृष्टि धाये । परतोनि माघारी ते न ये ॥ ३ ॥

॥ ४७६ ॥ पतित पतित । परी मी त्रिवाचा पतित ॥ ध्रु० ॥ परी तूं आपुलिया सत्ता । मज करावें सरता ॥ १ ॥ नाहीं चित्तशुद्धी । स्थिर पायांपाशीं बुद्धी ॥ २ ॥ अपराधाचा केलों । तुका ह्मणे किती बोलों ॥ ३ ॥

॥ ४७७ ॥ उभारिला हात । जगीं जाणविली मात ॥ ध्रु० ॥ देव बैसले सिंहासनीं । आल्या याचका होय धनी ॥ १ ॥ एकाच्या कैवाडें । उगवे बहुतांचें कोडें ॥ २ ॥ दोहीं ठायीं तुका । नाहीं पडों देत चुका ॥ ३ ॥

# आशीर्वाद.

॥ ४७८ ॥ जीवेंसाठीं यत्नभाव । त्याची नाव बळकट ॥ ध्रु० ॥ पैल तीरा आतां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥ १ ॥ विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥ २ ॥ तुका ह्मणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥ ३ ॥

॥ ४७९ ॥ आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥ ध्रु० ॥ कल्याण तें असे क्षेम । वाढे प्रेम आगळें ॥ १ ॥ भक्तिभाग्यगांठीं धन । त्या नमन जीवासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिचे दास । तेथें आस सकळ ॥ ३ ॥

॥ ४८० ॥ तयासाठीं वेचूं वाणी । अइकों कानीं वारता ॥ ध्रु० ॥ क्षेम माझे हरि-जन । समाधान पुसतां त्यां ॥ १ ॥ परवीचे जे सांगाती । त्यांची याती न विचारीं ॥ २ ॥ तुका ह्मणे धैर्यवंतें । निर्मळचित्तें सरवीं तीं ॥ ३ ॥

॥ ४८१ ॥ अभय उत्तर संतीं केलें दान । जालें समाधान चित्त तेणें ॥ ध्रु० ॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण । द्यावें कृपादान नारायणा ॥ १ ॥ आलें जें उचित देहविभागासी । तेणें पायांपासीं उभी असों ॥ २ ॥ तुका ह्मणे करी पूजन वैखरी । बोबडा उत्तरीं गातों गीत ॥ ३ ॥

॥ ४८२ ॥ असो मंत्रहीन क्रिया । नका चर्या विचारूं ॥ ध्रु० ॥ सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥ १ ॥ विचारूनि ठाया ठाव । येथें भाव राहिला ॥ २ ॥ आतां तुक-यापाशीं हेवा । नाहीं देवा तांतडी ॥ ३ ॥

॥ ४८३ ॥ ऐकें वचन कमळापती । मज रंकाची विनंती ॥ ध्रु० ॥ कर जोडितों कथाकाळीं । आपण असावें जवळीं ॥ १ ॥ घेईं ऐसी भाक । मागेन जरि कांहीं आणिक ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे देवा । शब्द इतुका राखावा ॥ ३ ॥

॥ ४८४ ॥ आली लळिताची वेळ । असा सावध सकळ ॥ ध्रु० ॥ लाहो करा वेगीं

स्मरा । टाळी वाउनि विश्वंभरा ॥ १ ॥ जालिया अवसान । न संपडती चरण ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे थोडे । अवधि उरली आहे पुढें ॥ ३ ॥

॥ ४८५ ॥ नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचामनेंसहित आलों शरण ॥ धृ० ॥ करीं अंगीकार नको मोकलूं हरी । पतितपावन ब्रिदें करावीं खरीं ॥ १ ॥ नेणें भक्तिभाव तुझा ह्मणवितों दास । जरि देसी अंतर तरि लज्जा कोणास ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाये । आतां कोण दुजा ऐसा आह्मांसी आहे ॥ ३ ॥

॥ ४८६ ॥ तूंच मायबाप बंधु सखा आमचा । वित्त गोत जीवलग जीवाचा ॥ धृ० ॥ आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां । योगक्षेमभार तुझे घातला माथां ॥ १ ॥ तूंच क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ । तूंच तप तीर्थ व्रत गुरु सकळ ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु करिता कार्यता देवा । तूंच भाव भक्ति पूजा पुनस्कार आथवा ॥ ३ ॥

॥ ४८७ ॥ करुनी उचित । प्रेम घालीं हृदयांत ॥ धृ० ॥ आलों दान मागायास । थोरी करूनियां आस ॥ १ ॥ चिंतन समयीं । सेवा आपुलीच देईं ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे भावा । मज निरवावें देवा ॥ ३ ॥

॥ ४८८ ॥ गाऊं वाजऊं टाळी रंगीं नाचों उदास। सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ॥ धृ० ॥ बळीयाचा बळी तो कैवारी आमुचा । भुक्तिमुक्तिदाता सकळांही सिद्धींचा ॥ १ ॥ मारूं शब्दशस्त्रबाण निःशंक अनिवार । कंटकाचा चुर शिर फोडूं काळाचें ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड । आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥ ३ ॥

॥ ४८९ ॥ सांडूनि वैकुंठ । उभा विटेवरी नीट ॥ धृ० ॥ आला आला रे जगजेठी । भक्ता पुंडलिकाचे भेटी ॥ १ ॥ पैल चंद्रभागे तिरीं । कट धरूनियां करीं ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे अंबर । गजर होतो जयजयकार ॥ ३ ॥

॥ ४९० ॥ कृपाळु भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥ धृ० ॥ उभा न पाचारितां दारीं । न सांगतां काम करी ॥ १ ॥ भाव देखोनि निर्मळ । रजां वोडवी कपाळ ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ॥ ३ ॥

॥ ४९१ ॥ केला अंगीकार पंढरीच्या देवें । आतां काय करितो काळ मशक मानवें ॥ धृ० ॥ घातलीं बाहेर तीं भय होतें ज्यानें । बैसला आपण तेथें घालुनियां ठाणें ॥ १ ॥ लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी । हा पुरता निर्धार कळों आला आह्मांसी ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु न लगे करावी चिंता । कोणेविशीं आतां बैसलों हस्तीवरी माथां ॥ ३ ॥

॥ ४९२ ॥ अगोचरी बोलिलों आज्ञेविण आगळें । परी तें आतां न संडावें राउळें ॥ धृ० ॥ जाईल रोकडा बोल न पुसती आह्मां । तुझा तुझें ह्मणविलें पाहा पुरुषोत्तमा ॥ १ ॥ न व्हावा न वजावा न कळतां अन्याय । न धरावें तें मनीं भलता करा उपाय ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु हीन मी ह्मणोनि लाजसी । वारा लागों पाहातोहे उंच्या झाडासी ॥ ३ ॥

ाकसिद्धि वाट पाहे रखुमाई । उदक तापलें डेरां चौकसा मर्दूनि
ंगा उशीर जाला भोजनीं । उभ्या आंचवणा गोपी काळस घेउनी
त्त सेवेलागीं सकळा । उद्धव अक्रूर आले पाचारूं मुळा ॥ २ ॥
ति सुगंधा । रत्नदीप ताटीं वाळा विडिया विनोदा ॥ ३ ॥
पंढरीराणा । असा सावचित्त सांगे सकळा जना ॥ ४ ॥
कळ जन उठिले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥ धृ० ॥
ांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥ १ ॥ जोडोनि
ादर । पायावरी शिर ठेवूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे काय पढियेतें
गा सुख दुःख ॥ ३ ॥
विनवणी पायीं ठेवीं माथा । परिसावी विनवणी माझी पंढरीनाथा
ावेंसें वाटतें पायीं । साहोनि संकोच ठाव थोडासा देईं ॥ १ ॥
ळों तुझिया ठाया । पाहें कृपादृष्टि मज पंढरीराया ॥ २ ॥
वेडीं वांकडीं । नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं ॥ ३ ॥
घालुनि तळीं चालती वनमाळी । उमटती कोमळीं कुंकुमाचीं
भवघे सकळ जन । तारियेले पाषाण उदकीं जेणें ॥ १ ॥ पैस धरुनीं
ग्रीं । मौन्य धरुनी कांहीं नो बोलावें ॥ २ ॥ तुका अवसरु जाण-
ाल मंदिरें कवाडें ॥ ३ ॥
गेले हरि राहा क्षणभरी । होईल फळ धीर करावा ॥ धृ० न करीं
एक निवांत बैसावें ॥ १ ॥ करुनी मर्दन सारिलें पाणी । न्हाले
॥ २ ॥ नेसला सोनसळा विनवी रखुमाई । वाढिलें आतां ठायीं
ुनियां भोजन घेतलें आंचवण । आनंदें नारायण पहुडले ॥ ४ ॥
तां । सकळां बहुतां होतीची ॥ ५ ॥
आह्मां कांहीं सांगा जी रखुमाई । शेष उरलें ठायीं सनकादि-
बाहेरी बैसलों आशा । पुराया ग्रासा एकमेकां ॥ १ ॥ येथवरी आलों
करुनी आह्मी दातारा ॥ २ ॥ प्रेम देउनियां बहुडा आतां दिला ।
ल बोला ॥ ३ ॥
ाले जन मन जालें निश्चळ । चुकवुनी कोल्हाळ आला तुका
करावें शयन । रखुमाई आपण समवेत ॥ १ ॥ घेउनियां आलों हातीं
वरणा स्वामीचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां परिसावीं सादरें ।
ा ॥ ३ ॥
गाणें माझा जवळील ठाव । निरोपीन भाव होईल तो ॥ धृ० ॥ तुह्मां
वभावें । उतरूनि जीवें जाईन लोण ॥ १ ॥ एकाएकीं बहु करीन
आवडीनें ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं जगदानी उदार । फेडशील भार

॥ ५०१ ॥ सिणलेती सेवकां देउनि इच्छादान । केला अभिमान अंगीकारा ॥ धृ० ॥ अहो दीनानाथा आनंदमुरती । तुह्मांसि शोभती ब्रीदें ऐसीं ॥ १ ॥ बहुतांनीं विनविलें बहुतां प्रकारीं । सकळां ठायीं हरि पुरलेती ॥ २ ॥ तुका ह्मणे अगा कुटुंबवत्सळा । कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥ ३ ॥

॥ ५०२ ॥ उठा भागलेती उजगरा । जाला स्वामी निद्रा करा ॥ धृ० ॥ वाट पाहाते रुक्मिणी । उभी मंचक संवारुणी ॥ १ ॥ केली करा क्षमा । बडबड पुरुषोत्तमा ॥ २ ॥ लागतो चरणा । तुकयाबंधु नारायणा ॥ ३ ॥

॥ ५०३ ॥ पावला प्रसाद आतां उठोनि जावें । आपला तो श्रम कळों येतसे जीवें ॥ धृ० ॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा । पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ १ ॥ तुह्मांसि जागवूं आह्मी आपुलिया चाडा । शुभाशुभ कर्मे दोष वाराया पीडा ॥ २ ॥ तुका ह्मणे दिलें उच्छिष्टाचें भोजन । आह्मां आपुलिया नाहीं निवाडिलें भिन्न ॥ ३ ॥

॥ ५०४ ॥ शब्दांचीं रत्नें करुनी अळंकार । तेणें विश्वंभर पूजियेला ॥ धृ० ॥ भावाचे उपचार करूनि भोजन । तेणें नारायण जेवविला ॥ १ ॥ संसारा हातीं दिलें आंचवण । मुखशुद्धि मन समर्पिलें ॥ २ ॥ रंगलीं इंद्रियें सुरंग तांबूल । माथां तुळसीदळ समर्पिलें ॥ ३ ॥ एकभावदीप करूनि नीरांजन । देऊनि आसन देहाचें या ॥ ४ ॥ न बोलोनि तुका करी चरणसेवा । निजविलें देवा माजघरीं ॥ ५ ॥

॥ ५०५ ॥ उठोनियां तुका गेला निजस्थळा । उरले राउळामाजी देव ॥ धृ० ॥ निजल जालें सेवका स्वामीचें । आज्ञे करुनी चित्त समाधान ॥ १ ॥ पहुडलिया हरि अनंतशेनावरी । तेथें नाहीं उरी कांहीं काम ॥ २ ॥ अवघी बाहेर घालूनि गेला तुका । सांगितलें लोकां निजले देव ॥ ३ ॥

## दसरा.

॥ ५०६ ॥ पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा । सांपडला तो साधा आजि मुहूर्त बरा ॥ गर्जा जयजयकार हरि हृदयीं धरा । आळस नका करूं लाहानां सांगतों थोरां ॥ धृ० ॥ या हो या हो बाइयानों निघाले हरी । सिलंगणा वेगीं घेउनि आरत्या करीं । ओंवाळूं श्रीमुख वंदूं पाउलें शिरीं । आह्मां दैव आलें येथें घरिच्या घरीं ॥ १ ॥ अक्षय मुहूर्त औटामध्यें साधे तें । मग येरी गर्जे जैसें तैसें होत जातें । ह्मणोनि मागें पुढें कोणी न पाहावें येथें । सांडा परतें काम जाऊं हरि सांगातें ॥ २ ॥ बहुतां बहुतां रीतीं चित्तीं धरा हें मनीं । नका गे करूं आइकाल ज्या कानीं । मग हें सुख कधीं न देखाल स्वप्नीं । उरेल हायहाय मागें होईल काहाणी ॥ ३ ॥ ऐसियास वंचती त्यांच्या अभाग्या पार । नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार । मग हे वेळ घटिका न ये अजरामर । कळलें असों द्या मग पडतील विचार ॥ ४ ॥ जयासाठीं ब्रह्मादिक जालेति पिसे । उच्छिष्टा कारणें देव जळीं जाले मासे । अर्द्धांगीं विश्वमाता लक्ष्मी वसे । तो हा तुकयाबंधु ह्मणे आलें अनायासें ॥ ५ ॥

॥ ५०७ ॥ ओंवाळूं आरती पंढरीराया । सर्वभावें शरण आलों तुझिया पायां ॥ धृ० ॥

सर्व व्यापून कैसें रूप आकळ । तो हा गौळया घरीं जाला कृष्ण बाळ ॥ १ ॥ स्वरूप गुणातीत जाला अवतारधारी । तो हा पांडुरंग उभा विटेवरी ॥ २ ॥ भक्तीचिया काजा कैसा रूपासि आला । ब्रिदाचा तोडर चरणीं मिरविला ॥ ३ ॥ आरतें आरती ओंवाळिली । वाखाणितां कीर्ति वाचा परतली ॥ ४ ॥ भावभक्तिबळें होसी कृपाळु देवा । तुका ह्मणे पांडुरंगा तुझ्या न कळती मावा ॥ ५ ॥

॥ ५०८ ॥ करूनि आरती । आतां ओंवाळूं श्रीपती ॥ धृ० ॥ आजि पुरले नवस । धन्य जाला हा दिवस ॥ १ ॥ पाहा वो सकळा । पुण्यवंता तुह्मी बाळा ॥ २ ॥ तुका वाहे टाळी । होता सन्निध जवळी ॥ ३ ॥

॥ ५०९ ॥ व्याल माळ जरी पडेन मी पायां । दंडवत वांयां कोण वेची ॥ धृ० ॥ आलें तें हिशोबें अवघिया प्रमाण । व्यावें तरी दान मान होतो ॥ १ ॥ मोकळिया मनें व्याल जरी सेवा । प्रसाद पाठवा लवकरी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी जालिया कृपण । नामाची जतन मग कैची ॥ ३ ॥

॥ ५१० ॥ तुह्मीं जावें निजमंदिरा । आह्मी जातों आपल्या घरा ॥ धृ० ॥ विठोबा लोभ असों देई । आह्मी असों तुमच्ये पाई ॥ १ ॥ चित्त करी सेवा । आह्मी जातों आपल्या गांवा ॥ २ ॥ तुका ह्मणे दिशा भुलों । फिरोन पायापाशीं आलों ॥ ३ ॥

॥ ५११ ॥ पाहें प्रसादाची वाट । व्यावें धोवोनियां ताट ॥ धृ० ॥ शेष घेऊनि जाईन । तुमचें जालिया भोजन ॥ १ ॥ जालों एकसवा । तुह्मां आळुनीयां देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । करूनि राहिलों निश्चिंत ॥ ३ ॥

॥ ५१२ ॥ केलीं कटकट गाऊं नाचों नेणतां । लाज नाहीं भय आह्मां पोटाची चिंता ॥ धृ० ॥ बैसा सिणलेती पाय रगडूं दातारा । जाणवूं वा वारा उब आली शरीरा ॥ १ ॥ उशिरा उशीर किती काय ह्मणावा । जननिये बाळका कोप कांहीं न धरावा ॥ २ ॥ तुझिये संगतीं आह्मीं करूं कोल्हाळ । तुका ह्मणे बाळें अवघीं मिळोन गोपाळ ॥ ३ ॥

॥ ५१३ ॥ कळस वाहियेला शिरीं । सहस्रनामें पूजा करीं ॥ धृ० ॥ पीक पिकलें पिकलें । घन दाटोनियां आलें ॥ १ ॥ शेवटींचें दान । भागा आला नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट । भरलें वारले बोभाट ॥ ३ ॥

॥ ५१४ ॥ आरुष शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं । लडिवाळ बाळकें तूंचि आमुची आई ॥ धृ० ॥ देई गे विठाबाई प्रेमभातुकें । अवघियां कथनुकें लहानां थोरां सकळां ॥ १ ॥ असो नसो भाव आलों तुझिया ठाया । पाहे कृपादृष्टि आतां पंढरीराया ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तुह्मी वेडीं वांकुडीं । नामें भवपाश आतां आपुलिया तोडीं ॥ ३ ॥

॥ ५१५ ॥ आडकलें देवद्वार । व्यर्थ काय करकर ॥ धृ० ॥ आतां चला जाऊं घरा । नका करूं उजगरा ॥ १ ॥ देवा लागलीसे निज । येथें उभ्या काय काज ॥ २ ॥ राग येतो देवा । तुका ह्मणे नेघे सेवा ॥ ३ ॥

॥ ५१६ ॥ कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ धृ० ॥ कृष्ण माझा गुरु कृष्ण माझें तारूं । उतरी पैलपारू भवनदीची ॥ १ ॥ कृष्ण माझें

मन कृष्ण माझें जन । सोइरा सज्जन कृष्ण माझा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा श्रीकृष्ण विसावा । वाटे न करावा परता जीवा ॥ ३ ॥

॥ ५१७ ॥ कृपा करावी भगवंतें । ऐसा शिष्य द्यावा मातें ॥ धृ० ॥ माझें व्रत जो चालवी । त्यासि द्यावें त्वां पालवी ॥ १ ॥ व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । तिहीं लोकीं ज्याचा झेंडा ॥ २ ॥ तुका हाका मारी । माझ्या विठोबाच्या द्वारीं ॥ ३ ॥

॥ ५१८ ॥ जातों वाराणसी । निरवी गाई घोडे ह्मैसी ॥ धृ० ॥ गेलों येतों नाहीं ऐसा । सत्य मानावा भरवसा ॥ १ ॥ नका काढूं माझीं पेवें । तुह्मीं वरळा भूस खावें ॥ २ ॥ भिकारियाचे पाठीं । तुह्मीं घेउनि लागा काठी ॥ ३ ॥ सांगाल जेवाया ब्राह्मण । तरी कापाल माझी मान ॥ ४ ॥ बोकलिया बोका । म्यां खर्चिला नाहीं रुका ॥ ५ ॥ तुह्मीं खावें ताकपाणी । जतन करा तूपलोणी ॥ ६ ॥ नाहीं माझे मनीं । पोरें रांडा नागवणी ॥ ७ ॥ तुका ह्मणे नीट । होतें तैसें बोले स्पष्ट ॥ ८ ॥

॥ ५१९ ॥ कास घालोनि बळकट । झालों कळिकाळासी नीट । केली पायवाट । भवसिंधूवरुनी ॥ धृ० ॥ या रे या रे लाहान थोर । याति भलते नारीनर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥ १ ॥ कामी गुंतले रिकामे । जपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥ २ ॥ एकंदर शिका । पाठविला इहलोका । आलों ह्मणे तुका । मी नामाचा धारक ॥ ३ ॥

॥ ५२० ॥ आह्मी वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषी । साच भावें वर्तावया ॥ धृ० ॥ झाडूं संतांचे मारग । आडरानें भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं ॥ १ ॥ अर्थें लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें । विषयलोभी मन । साधनें बुडविलीं ॥ २ ॥ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका ह्मणे करा । जयजयकार आनंदें ॥ ३ ॥

॥ ५२१ ॥ बळियाचें अंकित । आह्मी जालों बळिवंत ॥ धृ० ॥ लाता हाणोनि संसारा । केला षडूर्मींचा मारा ॥ १ ॥ जन धन तन । केलें तृणाही समान ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मी मुक्तीचिया माथां ॥ ३ ॥

॥ ५२२ ॥ मृत्युलोकीं आह्मां आवडती परी । नाहीं एका हरिनामेंविण ॥ धृ० ॥ विटलें हें चित्त प्रपंचापासुनी । वमन हें मनीं बैसलेंसे ॥ १ ॥ सोनें रूपें आह्मां मृत्तिके समान । माणिकें पाषाण खडे तैसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरी आह्मांपुढें ॥ ३ ॥

॥ ५२३ ॥ स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणामृत्तिकेच्या ॥धृ०॥ नाठवे हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरे ना ॥ १ ॥ दृष्टिमुखें मरण इंद्रियाच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी अग्नि जाला साधू । परी पावे बाधूं संघट्टणें ॥ ३ ॥

॥ ५२४ ॥ पराविया नारी रखुमाईसमान । हें गेलें नेमून ठायींचेंची ॥ धृ० ॥ जाईं वो तूं माते न करी सायास । आह्मी विष्णुदास नव्हों तैसे ॥ १ ॥ न साहावें मज तुझें हें

पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज पाहिजे भ्रतार । तरी काय नर थोडे जाले ॥ ३ ॥

॥ ५२५ ॥ भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सळे । विठ्ठले कृपाळे होसी माये ॥ धृ० ॥ पडिला विसर माझा काय गुणें । कृपाळ हें उणें काय करूं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें जाळूनि संचित । करीं वो उचित भेट देई ॥ २ ॥

॥ ५२६ ॥ तुजविण मज कोण वो सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगे ॥ धृ० ॥ लागलीसे आस पाहा तुझें वास । रात्री वो दिवस लेखीं बोटीं ॥ १ ॥ काम गोड मज न लगे हा धंदा । तुका ह्मणे सदा हेंचि ध्यान ॥ २ ॥

॥ ५२७ ॥ पढियंतें आह्मी तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ॥ धृ० ॥ पाळसील लळे दीन वो वत्सले । कृपाळे विठ्ठले जननिये ॥ १ ॥ जीव भाव तुझ्या ठेवि-येला पायीं । तूंचि सर्वा ठायीं एक आह्मां ॥ २ ॥ दुजियाचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ॥ ३ ॥ सर्वसत्ता एकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ॥ ४ ॥ ह्मणउनी पुढें मांडियेली आळी । थिकोनियां चोळी डोळे तुका ॥ ५ ॥

॥ ५२८ ॥ कोण पर्वकाळ पहासील तीथ । होतें माझें चित्त कासावीस ॥ धृ० ॥ पाठवीं भातुकें भेरीं झडकरीं । नको राखों उरी पांडुरंगा ॥ १ ॥ न धरावा कोप मजवरी कांहीं । अवगुणी अन्यायी ह्मणोनियां ॥ २ ॥ काय रडवीसी नेणतियां पोरां । जाण-तियां थोरां याचिपरी ॥ ३ ॥ काय उभी कर ठेवुनियां कटीं । बुझावीं धाकुटीं लडिवाळें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां पदरासी पिळा । घालीन निराळा नव्हे मग ॥ ५ ॥

॥ ५२९ ॥ कां हो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी । कां मज हिंपुटी करीतसा ॥ धृ० ॥ कंठी प्राण पाहे वचनाची आस । तों दिसे उदास धरिलें ऐसें ॥ १ ॥ येणें काळें बुंथी घेतलीसे खोल । कां नये विटाळ होऊं माझा ॥ २ ॥ लाज वाटे मज ह्मणवितां देवाचा । न पुससी फुकाचा तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ५३० ॥ उचित तें काय जाणावें दुर्बळें । थोरिवेचें काळें तोंड देवा ॥ धृ० ॥ देतां हाका कोणी नाइकती द्वारीं । ओस कोणी घरीं नाहीं ऐसें ॥ १ ॥ आलिया अतीता शब्द समाधान । करितां वचन काय वेंचे ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां साजे हें श्रीहरी । आह्मी निलाजिरीं नव्हों ऐसीं ॥ ३ ॥

॥ ५३१ ॥ आह्मी मागों ऐसें नाहीं तुजपाशीं । जरी तूं भीतोसि पांडुरंगा ॥ धृ० ॥ पाहें विचारूनि आहे तुज ठावें । आह्मी धालों नावें तुझ्या एका ॥ १ ॥ ऋद्धिसिद्धि तुझें मुख्य भांडवल । हें तों आह्मां फोल भक्तीपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाऊं वैकुंठा चालत । बैसोनि निश्चित सुख भोगूं ॥ ३ ॥

॥ ५३२ ॥ न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ धृ० ॥ लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि या ॥ १ ॥ जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझें नाहीं मनीं मानसीं ही ॥ २ ॥ तुका ह्मणे नको रागें जों विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां ॥ ३ ॥

॥ ५३३ ॥ कमोदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥ धृ० ॥ तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आह्मीच तें प्रेमसुख जाणों ॥ १ ॥ माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्ताफळ शिंपी-पोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ३ ॥

॥ ५३४ ॥ काय सांगों तुझ्या चरणांच्या सुखा । अनुभव ठाउका नाहीं तुज ॥ धृ० ॥ बोलतां हें कैसें वाटे खरेंपण । अमृताचे गुण अमृतासी ॥ १ ॥ आह्मी एकएका ग्वाही मायपुतें । जाणों तें निरुतें सुख दोघें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां मोक्षाचा कांटाळा । कां तुह्मी गोपाळा नेणां ऐसें ॥ ३ ॥

॥ ५३५ ॥ देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥ धृ० ॥ तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ १ ॥ मुखें गातों गीत वाजवीतों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळी काळ ॥ ३ ॥

॥ ५३६ ॥ आतां येणेंविण नाहीं आह्मां चाड । कोण बडबड करी वांयां ॥ धृ० ॥ सुख तेंचि दुःख पुण्य पाप खरें । हें तों आह्मां बरें कळों आलें ॥ १ ॥ तुका ह्मणे वाचा वाहिली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥ २ ॥

॥ ५३७ ॥ बोलों अबोलणें मरोनियां जिणें । असोनि नसणें जानि आह्मां ॥ धृ० ॥ भोगीं त्याग जाला संगींच असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥ १ ॥ तुका ह्मणे नव्हे दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा ॥ २ ॥

॥ ५३८ ॥ अधिकार तैसा दावियेले मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥ धृ० ॥ जाळूं नये नांव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥ १ ॥ तुका ह्मणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥ २ ॥

॥ ५३९ ॥ संवसार तीहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्य दारा जया चित्तीं ॥ धृ० ॥ शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं । जनार्दन जगीं होऊनि ठेला ॥ १ ॥ तुका ह्मणे देहें दिला एकसरें । जयासि दुसरें नाहीं मग ॥ २ ॥

॥ ५४० ॥ देहबुद्धि वसे लोभ जया चित्तीं । आपुलें जाणती परावें जे ॥ धृ० ॥ तयासि चालतां पाहिजे सिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ॥ १ ॥ तुका ह्मणे धर्म रक्षाया कारणें । छाया इच्छी उन्हें तापला तो ॥ २ ॥

॥ ५४१ ॥ काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्तिसंहारघडमोडी ॥ धृ० ॥ बीज तो अंकुर आच्छादिला पोटीं । अनंता सेवटीं एकाचिया ॥ १ ॥ तुका ह्मणे शब्दें व्यापिलें आकाश । गुढार हें तैसें कळों नये ॥ २ ॥

॥ ५४२ ॥ आणीक काळें न चले उपाय । धरावे या पाय विठोबाचे ॥ धृ० ॥ अवघेंचि पुण्य असे तया पोटीं । अवघियां तुटी होय पापा ॥ १ ॥ अवघें मोकळें अवघियां काळें । उद्धरती कुळें नरनारी ॥ २ ॥ काळ वेळ नाहीं गर्भवासदुःखें । उच्चारितां मुखें नाम एक ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं न लगे सांडावें । सांगतसें भावें घेती तयां ॥ ४ ॥

॥ ५४३ ॥ कां रे माझा तुज न ये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥ धृ० ॥ अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥ १ ॥ कां हें चित्त नाहीं पावलें विश्रांती । इंद्रियांची गति कुंठेचि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे कां रे धरियेला कोप । पाप सरलें नेणों पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ५४४ ॥ दीनानाथा तुह्मी ब्रिदें चराचर । घेसील कैवार शरणागता ॥ धृ० ॥ पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आह्मा रोकडे कळों आले ॥ १ ॥ आपुल्या दासांचें न साहासी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ॥ २ ॥ चक्र गदा हातीं आयुधें अपार । न्यून तेथें पुरें करूं धावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज भक्तीचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥ ४ ॥

॥ ५४५ ॥ वर्णू महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥ धृ० ॥ ठायींची हे काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळूनि काय सांडूं ॥ १ ॥ नाहीं भाव ऐसा करूं तुह्मी सेवा । जीव वाहूं देवा तोही तुझा ॥ २ ॥ मज माझें कांहीं न दिसे पाहातां । जें तुज अनंता समर्पावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥ ४ ॥

॥ ५४६ ॥ नाहीं सुख मज न लगे हा मान । न राहे हें जन काय करूं ॥ धृ० ॥ देहउपचारें पोळतसे अंग । विषतुल्य चांग मिष्टान्न तें ॥ १ ॥ नाइकवे स्तुति वाणितां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥ २ ॥ तुज पावें ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतुनी ॥ ४ ॥

॥ ५४७ ॥ न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥ धृ० ॥ ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगें ॥ १ ॥ विटंबो शरीर होत कां विपत्ती । परि राहो चित्तीं नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे नासिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेंचि हित ॥ ३ ॥

॥ ५४८ ॥ पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥ धृ० ॥ शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयाचिया ॥ १ ॥ क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥ २ ॥ कवेतिली देहें कापियेलें मांस । गेले वनवासा शुकादिक ॥ ३ ॥ तुका ह्मणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाय जळे ॥ ४ ॥

॥ ५४९ ॥ जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदों जिव्हे ॥ धृ० ॥ सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥ १ ॥ आणिकांची मात नाइकावी कानीं । आणीक नयनीं न पाहावें ॥ २ ॥ चित्ता तुवां पायीं रहावें अखंडित । होउनी निश्चित एकविध ॥ ३ ॥ चला पाय हात हेंचि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबाच्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुह्मां भय काय करी । अमुचा कैवारी नारायण ॥ ५ ॥

॥ ५५० ॥ करिसी तें देवा करीं माझें सुखें । परी मी त्यासी मुखें न ह्मणें संत ॥ धृ० ॥ जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ॥ १ ॥ जगदेव

परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥ २ ॥ तुका ह्मणे भय न धरीं मानसीं । ऐसियाचे शिरीं करितां दंड ॥ ३ ॥

॥ ५५१ ॥ ह्मणविती ऐसे आइकतों संत । न देखीजे होत डोळां कोणी ॥ ध्रु० ॥ ऐसियांचा कोण मानितें विश्वास । निवडे तो रस घाईडाई ॥ १ ॥ पर्जन्याचे काळीं वाहाळाचे नद । ओसरतां बुंद न यारेची ॥ २ ॥ हिऱ्या ऐशा गारा दिसती दुरोन । तुका ह्मणे घन न भेटे तों ॥ ३ ॥

॥ ५५२ ॥ अतिवाद लावी । एक बोट सोंग दावी ॥ ध्रु० ॥ त्याच्या बहुरूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥ १ ॥ प्रतिपादी वाळी । एक पूजी एका छळी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । भूतदया ज्याचे ठायीं ॥ ३ ॥

॥ ५५३ ॥ पोटाचे ते नट पाहों नये छंद । विषयांचे भेद विघ्नरूप ॥ ध्रु० ॥ अर्थी परमार्थ कैसा घडों सके । चित्त लोभी भीके सोंग वांयां ॥ १ ॥ देवाचीं चरित्रें दाखविती लीळा । लाघवाच्या कळा मोहावया ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं राहे अभिलास । दोघां नरकवास सारिखाची ॥ ३ ॥

॥ ५५४ ॥ भुंकती तीं द्यावीं भुंकों । आपण त्यांचें नये शिकों ॥ ध्रु० ॥ भाविकांनीं दुर्जनाचें । मानूं नये कांहीं साचें ॥ १ ॥ होईल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांचें । पाप नाहीं ताडणाचें ॥ ३ ॥

॥ ५५५ ॥ जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥ ध्रु० ॥ नको भोंवतालें जगीं । पाहों जवळी राख अंगीं ॥ १ ॥ कुडयाची संगती । सदा भोजन पंगती ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥ ३ ॥

॥ ५५६ ॥ कांहींच मी नव्हें कोणिये गांवींचा । एकट ठायींचा ठायीं एक ॥ ध्रु० ॥ नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वांयांविण बोलें ॥ १ ॥ नाहीं मज कोणी आपुलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥ २ ॥ नाहीं आह्मां ज्याणें मरावें लागन । आहों अखंडित जैसे तैसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नांवरूप नाहीं आह्मां । वेगळा ह्या कर्मा अकर्मासी ॥ ४ ॥

## लोहगांवास परचक्रवेढा पडला.

॥ ५५७ ॥ न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥ ध्रु० ॥ काय तुह्मी येथें नसालसें जालें । आह्मीं न देखिलें पाहिजे हें ॥ १ ॥ परचक्र कोठें हरिदासांच्या वासें । न देखिजेत देशें राहातिया ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें झालें ॥ ३ ॥

॥ ५५८ ॥ काय म्यां मानावें हरिकथेचें फळ । तरिजे सकळ जनीं ऐसें ॥ ध्रु० ॥ उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र ॥ १ ॥ पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी रोकडें साक्ष आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥ ३ ॥

॥ ९५९ ॥ भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःखी होतां जना न देखवे ॥ धृ० ॥ आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुह्मी दातारा नेणां ऐसें ॥ १ ॥ भजनीं विक्षेप तेंचि पैं मरण । न वजावा क्षण एक वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाव मागें ॥ ३ ॥

॥ ९६० ॥ फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणमोल ॥ धृ० ॥ पायरी प्रतिमा एकचि पाषाण । परि तें महिमान वेगळालें ॥ १ ॥ तुका ह्मणे तैशा नव्हतील परी । संतजना सरी सारिखिया ॥ २ ॥

॥ ९६१ ॥ कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रति पावे ॥ धृ० ॥ आतां माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्यां ॥ १ ॥ कुशळ चतुर येथें न सरते । करितील रिते तर्क मतें ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें पेणें एके घरीं । मज आणि हरि तुह्मां गांठी ॥ ३ ॥

॥ ९६२ ॥ आमचा विनोद तें जगा मरण । करिती भावहीण दखोवेखीं ॥ धृ० ॥ न कळे सतंत हिताचा विचार । तों हे दारोदार खाती फेरे ॥ १ ॥ वंदिलें वंदावें निंदिलें निंदावें । एक गेलें जावें त्याचि वाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणी नाइकें सांगतां । होती यमदूता वरपडे ॥ ३ ॥

॥ ९६३ ॥ दीप घेउनीयां धुंडिती अंधार । भेटे हा विचार अघटित ॥ धृ० ॥ विष्णुदास आह्मी न भ्यों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ॥ १ ॥ उधळितां माती रवि-कळा मळे ॥ हें कैसें न कळे भाग्यहीना ॥ २ ॥ तुका ह्मणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन वाउगेंचि ॥ ३ ॥

॥ ९६४ ॥ नटनाट्यें अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं रंग न पालटे ॥ धृ० ॥ मांडियेला खेळ कौतुक बहुरूप । आपुलें स्वरूप जाणतसों ॥ १ ॥ स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे । भाव दावी पिवळे लाल संगें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी या जनाविरहित ॥ होउनी निश्चिंत क्रीडा करूं ॥ ३ ॥

॥ ९६५ ॥ तुजविण वाणीं आणिकांची थोरी । तरी माझी हरि जिव्हा झडो ॥ धृ० ॥ तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥ १ ॥ नेत्रीं आणिकांसि पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥ २ ॥ कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥ ४ ॥

## स्वामींचे स्त्रीनें स्वामींस कठिण उत्तरें केलीं ते.

॥ ९६६ ॥ मजचि भोंवता केला येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥ धृ० ॥ चालोनियां घरा सर्व सुखें येती । माझी तों फजीती चुकेचि ना ॥ १ ॥ कोणाची बाईल होऊनियां वोढूं । संवसारीं काढूं आपदा किती ॥ २ ॥ काय तरी देऊं तोंडितील पोरें । मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥ कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर । सारवाक्या ढोर शेण नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे रांड न करितां विचार । वाहुनियां भार कुंथे मायां ॥ ५ ॥

पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥ १ ॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ २ ॥ सुख ठेवी आह्मासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥ ३ ॥ आह्मां घाली पाठी-कडे । पुढें कळिकाळाशीं भिडे ॥ ४ ॥ तुका ह्मणे कृपानिधी । आह्मां उतरीं नावे-मधीं ॥ ५ ॥

॥ ५७७ ॥ रवि रश्मिकळा । नये काढितां निराळा ॥ धृ० ॥ तैसा आह्मां जाला भाव अंगीं जडोनि ठेला देव ॥ १ ॥ गोडी साकरेपासुनी । कैसी निवडती दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे नाद उटी । विरोनि जाय नभा पोटीं ॥ ३ ॥

॥ ५७८ ॥ थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥ धृ० ॥ घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥ १ ॥ चित्त ठेवीं ग्वाहीं । आणिकांशीं चाड नाहीं ॥ २ ॥ आपलें तें हित फार । तुका ह्मणे खरें सार ॥ ३ ॥

॥ ५७९ ॥ अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥ धृ० ॥ ह्मणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥ १ ॥ ऊंस कांदा एक आळां । स्वाद गोडीचा निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥ ३ ॥

॥ ५८० ॥ शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघेंची दुःख ॥ धृ० ॥ ह्मणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥ १ ॥ खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्रिविध ताप । जाती मग आपेआप ॥ ३ ॥

॥ ५८१ ॥ गोडीपणें जैसा गुळ । तैसा देव जाला सकळ ॥ धृ० ॥ आतां भजों कवणे परी । देव सबाह्य अंतरीं ॥ १ ॥ उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥ २ ॥ हेम अळं-कारा नामीं । तुका ह्मणे तैसे आह्मी ॥ ३ ॥

॥ ५८२ ॥ परमेष्ठिपदा तुच्छ करिती सर्वदा ॥ धृ० ॥ हेंचि ज्यांचें धन । सदा हरीचें स्मरण ॥ १ ॥ इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ २ ॥ सार्वभौमराज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ३ ॥ पाताळींचें आधिपत्य । ते तों मानिती विपत्य ॥ ४ ॥ योग-सिद्धिसार । ज्यासि वाटे तें असार ॥ ५ ॥ मोक्षायेवढें सुख । सुख नव्हेचि तें दुःख ॥ ६ ॥ तुका ह्मणे हरीविण । त्यासि अवघा वाटे सिण ॥ ७ ॥

॥ ५८३ ॥ मोहोऱ्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥ धृ० ॥ नाहीं तरी त्याचें भक्ष । काय सांगणें तें साक्ष ॥ १ ॥ स्वामीचिया अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥ २ ॥ तुका ह्मणे खोडी । देवमनी न देती दडी ॥ ३ ॥

॥ ५८४ ॥ मजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोष्टा ॥ धृ० ॥ बैस सांडोनि दिमाख । जाय काळें करीं मुख ॥ १ ॥ येथें न सरे चार । हीण आणीक वेव्हार ॥ २ ॥ तुका विष्णुदास । रस जाणता नीरस ॥ ३ ॥

॥ ५८५ ॥ भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत ॥ धृ० ॥ भक्ष्याभक्ष्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥ १ ॥ बहुत बराडी । देवजवळी आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे हें रोकडें । लाभ अधिक दिधो खडे ॥ ३ ॥

॥ ५८६ ॥ गौरव गौरवापुरतें । फळ सत्याचें संकल्प ॥ धृ० ॥ कठिण योगाहूनि

॥ ५६७ ॥ काय नेणों होता दावेदार मेला । वेर तो साधिला होउनि गोहो ॥ धृ० ॥ किती सर्वकाळ सोसावें हें दुःख । किती लोकां मुख वासूं तरी ॥ १ ॥ ह्मणे आपुली आई काय माझें केलें । धड या विठ्ठलें संसाराचें ॥ २ ॥ तुका ह्मणे येती बाइले भसडे । फंदोनियां रडे हांसे कांहीं ॥ ३ ॥

॥ ५६८ ॥ गोणी आली घरा । दाणे खाऊं नेदी पोरां ॥ धृ० ॥ भरी लोकांची पांटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ १ ॥ खवळली पिसी । हाता होंबे जैसी लांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटा । रांडे संचिताचा सांटा ॥ ३ ॥

॥ ५६९ ॥ आतां पोरा काय खासी । गोहो जाला देवलसी ॥ धृ० ॥ डोचकें तिची घातल्या माळा । उदमाचा सांडी चाळा ॥ १ ॥ आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसरार ॥ २ ॥ हातीं टाळ तोंड वासी । गाय देवळीं देवापासीं ॥ ३ ॥ आतां आह्मी करूं काय । न बसे घरीं राणा जाय ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां धीरी । आझुनि नाहीं जालें तरी ॥ ५ ॥

॥ ५७० ॥ बरें जालें गेलें । आजी अवघें मिळालें ॥ धृ० ॥ आतां खाईन पोटभरी । ओल्या कोरड्या भाकरी ॥ १ ॥ किती तरी तोंड । याशीं वाजवूं मी रांड ॥ २ ॥ तुका बाइले मानवला । चीथू करुनियां बोला ॥ ३ ॥

॥ ५७१ ॥ न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंढा ॥ धृ० ॥ उठिलें तें कुटिलें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥ १ ॥ जीवंतचि मेले । लाजा वाटुनियां प्याले ॥ २ ॥ संसाराकडे । न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥ तळमळती यांच्या रांडा । पोलिती जीवा नांवें धोंडा ॥ ४ ॥ तुका ह्मणे बरें जालें । घे गे बाइले लोहिलें ॥ ५ ॥

॥ ५७२ ॥ कोण घरा येतें आमुच्या काशाला । काय द्याचा त्याला नाहीं धंदा ॥ धृ० ॥ देवासाठीं जालें ब्रह्मांड सोइरें । कोमळया उत्तरें काय वेचे ॥ १ ॥ मानें पाच्चा-रितां नव्हे आराणुक । ऐसे येती लोक प्रीतीसाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे रांडे माबडे भूषण । कांतिलेंसें श्वान लागे पाठीं ॥ ३ ॥

॥ ५७३ ॥ भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ धृ० ॥ करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥ १ ॥ काय करिल तया साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ २ ॥ तुका ह्मणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ३ ॥

॥ ५७४ ॥ इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥ धृ० ॥ नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥ १ ॥ मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं स्वादली ॥ २ ॥ तुका ह्मणे काय बोलें । आतां भलें मौन्य ची ॥ ३ ॥

॥ ५७५ ॥ साधनें तरी हींच दोन्ही । जरी कोणी साधील ॥ धृ० ॥ परद्रव्य परनारी । याचा धरीं विटाळ ॥ १ ॥ देवभाग्यें घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥ २ ॥ तुका ह्मणे तें शरीर । गृह भांडार देवाचें ॥ ३ ॥

॥ ५७६ ॥ आह्मासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥ धृ० ॥ मोहें धांवे पाली

पान्हा । नांव घेतां पंढरीराणा ॥ १ ॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ २ ॥ सुख ठेवी आह्मासाठीं । दुःख आपणची घोंटी ॥ ३ ॥ आह्मां घाली पाठी-कडे । पुढें कळिकाळाशीं भिडे ॥ ४ ॥ तुका ह्मणे कृपानिधी । आह्मां उतरी नावे-मधीं ॥ ५ ॥

॥ ५७७ ॥ रवि रश्मिकळा । नये काढितां निराळा ॥ धृ० ॥ तैसा आह्मां जाला भाव अंगीं जडोनि ठेला देव ॥ १ ॥ गोडी साकरेपासुनी । कैसी निवडती दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे नाद उठी । विरोनि जाय नभा पोटीं ॥ ३ ॥

॥ ५७८ ॥ थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥ धृ० ॥ घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥ १ ॥ चित्त ठेवीं ग्वाहीं । आणिकांशीं चाड नाहीं ॥ २ ॥ आपलें तें हित फार । तुका ह्मणे खरें सार ॥ ३ ॥

॥ ५७९ ॥ अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥ धृ० ॥ ह्मणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥ १ ॥ ऊंस कांदा एक आळां । स्वाद गोडीचा निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥ ३ ॥

॥ ५८० ॥ शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघेंची दुःख ॥ धृ० ॥ ह्मणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥ १ ॥ खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्रिविध ताप । जाती मग आपेआप ॥ ३ ॥

॥ ५८१ ॥ गोडीपणें जैसा गुळ । तैसा देव जाला सकळ ॥ धृ० ॥ आतां भजों कवणे परी । देव सबाह्य अंतरीं ॥ १ ॥ उदका वेगळा । नव्हे तरंग निराळा ॥ २ ॥ हेम अळं-कारा नामीं । तुका ह्मणे तैसे आह्मी ॥ ३ ॥

॥ ५८२ ॥ परमेष्ठिपदा तुच्छ करिती सर्वदा ॥ धृ० ॥ हेंचि ज्यांचें धन । सदा हरीचें स्मरण ॥ १ ॥ इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ २ ॥ सार्वभौमराज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ३ ॥ पाताळींचें आधिपत्य । तें तों मानिती विपत्य ॥ ४ ॥ योग-सिद्धिसार । ज्यासि वाटे तें असार ॥ ५ ॥ मोक्षायेवढें सुख । सुख नव्हेचि तें दुःख ॥ ६ ॥ तुका ह्मणे हरीविण । त्यासि अवघा वाटे सिण ॥ ७ ॥

॥ ५८३ ॥ मोहोऱ्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥ धृ० ॥ नाहीं तरी त्याचें भक्ष । काय सांगणें तें साक्ष ॥ १ ॥ स्वामीचिया अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥ २ ॥ तुका ह्मणे खोडी । देवमनी न देती दडी ॥ ३ ॥

॥ ५८४ ॥ मजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोंटा ॥ धृ० ॥ बस सांडोनि दिमाख । जाय काळें करीं मुख ॥ १ ॥ येथें न सरे चार । हीण आणीक वेव्हार ॥ २ ॥ तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥ ३ ॥

॥ ५८५ ॥ भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत ॥ धृ० ॥ धन्यधन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥ १ ॥ बहुत बराडी । देवजवळी आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे हें रोकडें । लाभ अधिक रिघों खडें ॥ ३ ॥

॥ ५८६ ॥ गौरव गौरवापुरतें । फळ सत्याचे संकल्प ॥ धृ० ॥ काढिण योगाहूनि

क्षेम । ओकालिया होतो श्रम ॥ १ ॥ पावलें मरे सिवेपाशीं । क्लेश उरत ते क्लेशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु आणी । कठिण निवालिया रणीं ॥ ३ ॥

॥ ५८७ ॥ न संडी अवगुण । वर्म मानीतसे सिण ॥ धृ० ॥ भोग देतां करिती काई । फुटतां यमदंडें डोई ॥ १ ॥ पापपुण्यझाडा । देतां तेथें मोठी पीडा ॥ २ ॥ तुका ह्मणे बोला । माझ्या सिणती विठ्ठला ॥ ३ ॥

॥ ५८८ ॥ पावे ऐसा नाश । अवघियां दिला त्रास ॥ धृ० ॥ अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ॥ १ ॥ आइताच पाक । संयोगाचा सकळिक ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी । सीमा राहिली होउनी ॥ ३ ॥

॥ ५८९ ॥ दुर्बळ हें अवघें जन । नारायणीं विमुख ॥ धृ० ॥ झाडोनियां हात जाती । पात्र होतीं दंडासी ॥ १ ॥ सिदोरी तें पापपुण्य । सवेंसिण भिकेचा ॥ २ ॥ तुका ह्मणे पडिला वाहो । कैसा पाहा हो लटिक्याचा ॥ ३ ॥

॥ ५९० ॥ वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥ धृ० ॥ जिंकोनियां अहंकार । पावटणी केलें शिर ॥ १ ॥ काळा नाहीं वाव । परा श्रमा कोठें ठाव ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥ ३ ॥

॥ ५९१ ॥ झाड कल्पतरू । न करी याचकीं आव्हेरू ॥ धृ० ॥ तुह्मी सर्वां सर्वोत्तम । ऐसे विसरतां धर्म ॥ १ ॥ परिसा तुमचें देणें । तो त्या जागे अभिमानें ॥ २ ॥ गाऱ्हाण्यानें तुका । गर्जे मारुनियां हाका ॥ ३ ॥

॥ ५९२ ॥ वसवावें घर । देवें बरें निरंतर ॥ धृ० ॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥ १ ॥ संकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । अवघा गोविंदें सुकाळ ॥ ३ ॥

॥ ५९३ ॥ येथील हा ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ धृ० ॥ घरीं देवाचे अबोला । त्यासि तेंचि सवे त्याला ॥ १ ॥ नाहीं पाहावें लागत । एकाएकींच तें रितें ॥ २ ॥ तुका ह्मणे जन । तयामध्यें येवढें भिन्न ॥ ३ ॥

॥ ५९४ ॥ करितां देवार्चन । घरा आले संतजन ॥ धृ० ॥ देव सारावे परते । संत पूजावे आरते ॥ १ ॥ शाळिग्राम विष्णुमूर्ती । संत हो का भलते याती ॥ २ ॥ तुका ह्मणे संधी । अधिक वैष्णवांची मांदी ॥ ३ ॥

॥ ५९५ ॥ ज्याची खरी सेवा । त्याच्या भय काय जीवा ॥ धृ० ॥ करितां स्वामीसवें वाद । अधिक अधिक आनंद ॥ १ ॥ असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥ २ ॥ वदे वाग्देवी । तुका विठ्ठली गौरवी ॥ ३ ॥

॥ ५९६ ॥ देवें जीव धाला । संसार तो कडू झाला ॥ धृ० ॥ तेचि येतील ढेंकर । आनंदाचे हरिहर ॥ १ ॥ वेधी आणिकांस । ऐसा जया अंगीं कस ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक । येणें न लगे आणीक ॥ ३ ॥

॥ ५९७ ॥ नाव साराचेंही सार । शरणागत यमकिंकर ॥ धृ० ॥ उत्तमाउत्तम । वाचे

बोला पुरुषोत्तम ॥ १ ॥ नाम जपतां चंद्रमौळी ॥ नामें तरला वाल्हाकोळी ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्णूं काय ॥ तारक विठोबाचे पाय ॥ ३ ॥

॥ ५९८ ॥ गातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥ धृ० ॥ परि तूं पतितपावन । करीं साच हें वचन ॥ १ ॥ मुखें ह्मणवितों दास । चित्तीं माया लोभ आस ॥ २ ॥ तुका ह्मणे दावीं वेश । तैसा अंतरीं नाहीं लेश ॥ ३ ॥

॥ ५९९ ॥ द्रव्य असतां धर्म न करी । नागविला राजद्वारीं ॥ धृ० ॥ माय त्यासि व्याली जेव्हां । रांड सटवी नव्हती तेव्हां ॥ १ ॥ कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥ २ ॥ भोग स्त्रियेसि देतां लाजे । वस्त्र दासीचें घेउनि निजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाण । नर गाढवाहुनी हीन ॥ ४ ॥

॥ ६०० ॥ मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धनअभिमान ॥ धृ० ॥ ऐशियाची करी सेवा । काय सुख होय जीवा ॥ १ ॥ पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत ॥ २ ॥ विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणी ॥ ३ ॥

॥ ६०१ ॥ एक वेळ प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥ धृ० ॥ अहंकारा नांवें दोष । त्याचें ओस पाडिलें ॥ १ ॥ अनुतापें स्नानविधि । यज्ञसिद्धि देहहोम ॥ २ ॥ जीवशिव होतां चुका । तेथें तुका विनटला ॥ ३ ॥

॥ ६०२ ॥ त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें त्या काई असे ओझें ॥ धृ० ॥ पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥ १ ॥ पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥ २ ॥ तुका ह्मणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ३ ॥

॥ ६०३ ॥ बोली मैंदाची बरवी असे । वाटे अंतरीं घालावे फांसे ॥ धृ० ॥ कैसा वरिवरि दिसताहे चांग । नव्हे भाविक केवळ मांग ॥ १ ॥ टिळा टोपी माळा कंठीं । अंधारीं नेउनि चेंपी घांटी ॥ २ ॥ तुका ह्मणे तो केवळ पुंड । त्यावरि वाजती यमदंड ॥ ३ ॥

॥ ६०४ ॥ दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें ॥ धृ० ॥ हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥ १ ॥ तुह्मी पापा भीतां । आह्मां उपजावया चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । कळिकाळा जिंकी देवा ॥ ३ ॥

॥ ६०५ ॥ करा नारायणा माझ्या दुःखाची खंडणा ॥ धृ० ॥ वृत्ति राखा पायांपाशीं । वस्ती धरूनि मानसीं ॥ १ ॥ पाळोनियां लळा । आतां पाववावें फळा ॥ २ ॥ तुका ह्मणे दीनें । त्यांचा हरतिया सीण ॥ ३ ॥

॥ ६०६ ॥ मी तों दीनाहूनि दीन । माझा तुज अभिमान ॥ धृ० ॥ मी तों आलों शरणागत । माझें करावें स्वहित ॥ १ ॥ दिनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । भलें नव्हे मोकलितां ॥ ३ ॥

॥ ६०७ ॥ सुख वाटे तुझे वर्णितां पवाडे । प्रेम मिठी पडे वदनासी ॥ धृ० ॥ व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी । आला दुराचारी पारधी तो ॥ १ ॥ वृक्षाचिया माथां सोडिला ससाणा । धनुष्यासि बाणा लावियेलें ॥ २ ॥ तये काळीं तुज पक्षी आठवितां । धांवें गा

श्रीपति मायबापा ॥ ३ ॥ उडोनियां जातां ससाना मारील । बैसतां विंधील पारधी तो ॥ ४ ॥ ऐकोनियां धांवा तया पक्षियांचा । धरिला सर्पाच्या वेश वेगीं ॥ ५ ॥ डंखोनि पारधी भुमीसि पाडिला । बाण तो लागला ससान्यासी ॥ ६ ॥ ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा । होसील कोंवसा संकटींचा ॥ ७ ॥ तुका ह्मणे तुझी कीर्ति त्रिभुवना । वेदाचिये वाणी वर्णवेना ॥ ८ ॥

॥ ६०८ ॥ नाहीं दुकळलों अन्ना । परि या मान जनार्दना ॥ धृ० ॥ देव केला सकळ-साक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ॥ १ ॥ भोगी भोगविता । बाळासवें तोचि पिता ॥ २ ॥ कर्म अकर्म जळालें । प्रौढें तुका तें उरलें ॥ ३ ॥

## नाटाचे अभंग.

॥ ६०९ ॥ प्रथम नमन तुज एकदंता । रंगीं रसाळ वोडवीं कथा । मति सौरस करीं प्रबळता । जेणें फिटे आतां अंधकार ॥ धृ० ॥ तुझिये कृपेचें भरितें । आणीक काय राहिलें तेथें । मारग सिद्धाच्यानि पंथें । पाववितसी तेथें तूंचि एक ॥ १ ॥ आरंभा आदि तुझें वंदन । सकळ करितां कारण । देव ऋषि मुनि आदिकरून । ग्रंथ पुराण निर्माणीं ॥ २ ॥ काय वर्णूं तुझी गती । एवढी कैंची मज मती । दिनानाथ तुज ह्मणती । करीं सत्य वचन हेंचि आपुलें ॥ ३ ॥ मज वाहावतां मायेच्या पुरीं । बुडतां डोहीं भवसागरीं । तुज वांचुनि कोण तारी । पाव झडकरी तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६१० ॥ प्रथमारंभीं लंबोदर । सकळ सिद्धींचा दातार । चतुर्भुज फरशधर । न कळे पार वर्णितां ॥ धृ० ॥ तो देव नटला गौरीबाळ । पायीं बांधोनि घागऱ्या घोळ । नारदतुंबरसहित मेळ । सुटला पळ विघ्नांसी ॥ १ ॥ नटारंभीं थाटियला रंग । भुजा नाचवी हालवी अंग । सेंदुरविलेपनें चांग । मुगुटीं नाग मिरविला ॥ २ ॥ जया मानवती देव ऋषि मुनी । पाहातां न पुरे डोळियां धनी । असुर जयाच्या चरणीं । आदी अवसानीं तोचि एक ॥ ३ ॥ सकळां सिद्धींचा दातार । जयाच्या रूपा नाहीं पार । तुका ह्मणे आमुचा दातार । भवसागर तारील हा ॥ ४ ॥

॥ ६११ ॥ विठ्ठल आमचें जीवन । आगमनिगमाचें स्थान । विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यानविसावा ॥ धृ० ॥ विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त । विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥ १ ॥ विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तही पाताळें भरुनी । विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ २ ॥ विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा । विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेलें चाळा विश्व विठ्ठलें ॥ ३ ॥ विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता । विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता । तुका ह्मणे आतां नाहीं दुसरें ॥ ४ ॥

॥ ६१२ ॥ बरवा झाला वेवसाव । पावलों चिंतिलाचि ठाव । दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांती ॥ धृ० ॥ बरवा फळला शकुन । अवघा निवारिला सिण । तुमचें जालिया दरुषण । जन्ममरण नाहीं आतां ॥ १ ॥ बरवें जालें आलों या ठाया । होतें संचित ठायींचा पाया । देहभाव पालटली काया । पडली छाया ब्रह्मींची ॥ २ ॥

जोडिलें न सरे हें धन । अविनाश आनंदघन । अमूर्तमूर्ति मधुसूदन । सम चरण देखियेले ॥ ३ ॥ जुनाट जुगादिचें नाणें । बहुता काळाचें ठेवणें । लोपलें होतें पारिखेपणें । ठावचळण चुकविला ॥ ४ ॥ आतां या जीवाचियासाठीं । न सुटे पडलिया मिठी । तुका ह्मणे सिणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥ ५ ॥

॥ ६१३ ॥ मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंदबुद्धी । तुज म्यां पाठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानिधी मायबापा ॥ धृ० ॥ नाहीं ऐकिलें गाइलें गीत । धरिली लाज सांडिलें हित । नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥ १ ॥ केला करविला नाहीं उपकार । नाहीं दया आली पीडितां पर । करूं नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥ २ ॥ नाहीं केलें तीर्थांचें भ्रमण । पाळिला पिंड करचरण । नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तीचें ॥ ३ ॥ असंगसंग घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय । न कळे हित करावें तें काय । नये बोलूं आठवूं तें ॥ ४ ॥ आप आपण्या घातकर । शत्रु जालों मी दावेदार । तूं तंव कृपेचा सागर । उतरीं पार तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६१४ ॥ आतां पावेन सकळ सुखें । खादलें कवा तें नखें । अवघें सरलें पारिखें । सकळ देखें माहियेरं ॥ धृ० ॥ जवळी विठ्ठल रखुमाई । बहिणी बंधु बाप आई । सकळ गोताचीच साई । पारिखें काई ऐसें नेणिजे ॥ १ ॥ जगत्राकारीं जाली सत्ता । वारोनि गेली पराधीनता । अवघें आपुलेंचि आतां । लाज आणि चिंता दुऱ्हावली ॥ २ ॥ वाटे इच्छा वसे घरीं । आपुले सत्तेचे माहेरीं । करवी तेरा आपण करीं । भीड न धरी चुकल्याची ॥ ३ ॥ सोसिला होता सासुरवास । बहुतांचा बहुत दिवस । बहु कामें पुरविला सोस । आतां उदास आपुल्यातें ॥ ४ ॥ करिती कवतुक लाडें । मज बोलविती कोडें । मायबाप उत्तरें गोडें । बोले बोबडें पुढें तुका ॥ ५ ॥

॥ ६१५ ॥ सर्वसुखाचिया आशा जन्म गेला । क्षण मुक्ती यत्न नाहीं केला । हिंडतां दिशा सीण पावला । मायावेष्टिला जीव माझा ॥ धृ० ॥ माझें स्वहित नेणती कोणी । कांहीं न करितां मजवांचुनी । सज्जन तंव सुखमांडणी । नेणती कोणी आदिअंत ॥ १ ॥ काय सांगों गर्भींची यातना । मज भोगितां नारायणा । मांस मळ मूत्र जाणा । तुज क्षणक्षणा ध्यात असें ॥ २ ॥ मज चालतां प्रयाणकाळीं । असतां न दिसती जवळी । मृत्तिके मृत्तिका कवळी । एकलें मळीं सांचितांचें ॥ ३ ॥ आतां मज ऐसें करीं गा देवा । कांहीं घडे तुझी चरणसेवा । तुका विनवीतसे केशवा । चालवीं दावा संसारें ॥ ४ ॥

॥ ६१६ ॥ अगा ए सावळ्या सगुणा । गुणातीतनाम नारायणा । आमची परिसा विज्ञापना । सांभाळीं दीना आपुलिया ॥ धृ० ॥ बहु या उदराचें कष्ट । आह्मांसि केलें कर्मभ्रष्ट । तुमची चुकविली वाट । करीं वटवट या निमित्यें ॥ १ ॥ जालों पांकिला जनासी । संसाराची आंदणी दासी । न कळे कधीं सोडविसी । दृढपाशीं बहु बांधलों ॥ २ ॥ येथें तों नये आठव कांहीं । विसावा तो क्षण एक नाहीं । पडिलों आणिकें प्रवाहीं । हित तों कांहीं दिसेचि ना ॥ ३ ॥ जीविता बांधिलें वियोगें । हिंडतां प्रवास

वाउगें । कांहीं व्याधि पीडा रोगें । केलिया भोगें तडातोडी ॥ ४ ॥ माझा मीच आम्हीं शत्रू । कैचा पुत्र दारा कैचा मित्रू । कासया घातला पसरू । अहा जगद्गुरू तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६१७ ॥ आतां मज धरवावी शुद्धी । येथुनी परतवावी बुद्धी । ध्यांव सोडवनि कृपानिधी । सांपडलों संधी काळचक्रीं ॥ धृ० ॥ करिसील तरि नव्हे काई । राईच्या डोंगर पर्वत राई । आपुले करुणेची खाई । करीं वो आई मजवरी ॥ १ ॥ मागील काळ अज्ञानपणें । सरला स्वभावें त्या गुणें । नेणें आयुष्य जालें उणें । पुढील पेणें अंतरलें ॥ २ ॥ आतां मज वाटतसे भय । दिवसेंदिवस चालत जाय । येथें म्यां येऊनि केलें काय । नाहीं तुझे पाय आठविले ॥ ३ ॥ करूनि अपराध क्षमा । होतील केले पुरुषोत्तमा । आपुल नामीं द्यावा प्रेमा । सोडवीं भ्रमापासुनियां ॥ ४ ॥ हृदय वसो तुमच्या गुणीं । डाव हा पायांपें चरणीं । करूं हा रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६१८ ॥ जेणें हा जीव दिला दान । तयाचें करीन चिंतन । जगजीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥ धृ० ॥ जो या उभा भींवरेच्या तिरीं । कट धरूनियां करीं । पाउलें समचि साजिरीं । अंतरीं धरोनि राहेन ॥ १ ॥ जो या असुरांचा काळ । भक्तजनप्रतिपाळ । खेळे हीं लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायांवरी ॥ २ ॥ जो या गोपाळांच्या मेळीं । खेळु खेळे वनमाळी । रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा ॥ ३ ॥ जो हा लावण्यपुतळा । जयाचे अंगीं सकळ कळा । जयाचे गळां वैजयंतीमाळा । त्या वेळोवेळां दंडवत ॥ ४ ॥ जयाचें नाम पाप नासी । लक्ष्मी ऐसी जयाची दासी । तो हा तेजःपुंज रासी । सर्वभावें त्यासी तुका शरण ॥ ५ ॥

॥ ६१९ ॥ काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण । ऐसें तुम्ही सांगा संतजन । करा समाधान चित्त माझें ॥ धृ० ॥ काय हें खंडईल कर्म । पारुषतील धर्माधर्म । कासयानें तें कळे वर्म । ह्मणउनी श्रम वाटतसे ॥ १ ॥ काय हो स्थिर राहेल बुद्धी । कांहीं अरिष्ट न येल मधीं । धरिली जाईल ते शुद्धी । शेवट कधीं तों मज न कळे ॥ २ ॥ काय ऐसें पुण्य होईल गांठीं । घालीन पायीं देवाचे मिठी । मज तो करवाळील जगजेठी । दाटइन कंठीं सद्गदित ॥ ३ ॥ काय हे निवतील डोळे । सुख तें देखोनि सोहळे । संचित कैसें तें न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥ ४ ॥ ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ । रात्रिदिवस हेचि तळमळ । तुका ह्मणे नाहीं आपुलें बाळ । जेणें फळ पावें निश्चयेंसी ॥ ५ ॥

॥ ६२० ॥ तूंचि अनाथाचा दाता । दुःख मोह नासावया चिंता । शरण आलों तुज आतां । तारीं कृपावंता मायबापा ॥ धृ० ॥ संतसंगति देईं चरणसेवा । जेणें तुझा विसर न पडावा । हाच भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ॥ १ ॥ मज भाव प्रेम देईं कीर्ती । गुण नाम वर्णावया स्तुती । विघ्नां सोडवूनि हातीं । विनंति माझी परिसावी हे ॥ २ ॥ आणीक कांहीं नाहीं मागणें । सुखसंपत्तिराज्यचाड धन । तें काहीं न पडे तुज जेणें । तुजें भक्तीविण मायबापा ॥ ३ ॥ जोडोनियां कर पायीं ठेवीं माथा । तुका विनवी पंढरिनाथा ॥ रंगीं वोडवावी रंगकथा । पुरवीं व्यथा मायबापा ॥ ४ ॥

॥ ६२१ ॥ संसारीं हें देवी देवतें । कोण तीं पुजी भुतेंकेतें । आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवदान ॥ धृ० ॥ आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल बराडी । कळों ही आली तयाची जोडी ॥ अल्प रोकडी बुद्धि अधरा ॥ १ ॥ दासीचा पाहुनर-उखतें । धणी देईल आपुल्या हातें । करुणाभाषणउचितें । हें तों रितें सतंत शक्तिहीन ॥ २ ॥ काय तें थिल्लरींचें पाणी । ओठ न भिजे न फिटे धणी । लीण तरीं आदीं आव-सानीं । आभे पुरश्चरणीं दिलें फळ ॥ ३ ॥ विलपनें बुजविती तोंड । भार खोल वाहाती उदंड । कराविती आपणयां दंड । ऐसियास भांड ह्मणे देव तों ॥ ४ ॥ तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन । तुका ह्मणे त्याचें करा चिंतन । वंदू चरण येती सकळें ॥ ५ ॥

॥ ६२२ ॥ विषयओढीं भुलले जीव । आतां यांची कोण करील कींव । नुपजे नारा-यणीं भाव । पावोनि ठाव नरदेह ॥ धृ० ॥ कोण सुख धरोनि संसारीं । पडोनि काळाचे आहारीं । माप या लागलें शरीरीं । जालियावरी सळे ओढिती ॥ १ ॥ बापुडीं होतील सेवटीं । आयुष्यासवें जालिया तुटी । भोगिले मागें पुढेंही कोटी । होईल भेटी जन्मासी ॥ २ ॥ जंतिली घाणां बांधोनि डोळे । मागें जोडी भार तेणेंही पोळे । चालिलों किती तें न कळे । दुःखें हारंबळे भूकतान ॥ ३ ॥ एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित । तें हें देह मानुनि अनित्य । न करिती नित्य नामस्मरण ॥ ४ ॥ तुका ह्मणे न वेंचतां मोल । तो हा यासि महाग विठ्ठल । वेंचितां फुकाचेचि बोल । केवढें खोल अभागिया ॥ ५ ॥

॥ ६२३ ॥ आलें हो संसारा तुह्मी एक करा । मुक्तिमारग हळूचि धरा । काळदंड कुंभयातना थोरा । कां रे अघोरा दचकसी ना ॥ धृ० ॥ नाहीं त्या यमासि करुणा । बाहेर काढितां कुडी प्राणा । ओढाळ सांपडे जैं धान्या । चोर यातना धरिजेतां ॥ १ ॥ नाहीं दिलें पावेल कैसा । चालतां पंथ तेणें वळसा । नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेती बंद जैसा धरोनियां ॥ २ ॥ क्षण एक नागीवा पायीं । न चलवे तया करितां कांहीं । ओढिती कांटवणा सोई । अग्निस्तंभीं बाहीं कवटाळविती ॥ ३ ॥ देखोनि अंगें कांपती । त्यें नदीमाजी चालविती । लागे ठाव न लगे बुडविती । वरि मारिती यमदंड ॥ ४ ॥ तानभूक न साहावे वेळ । तो राखिती कितीएक काळ । पिंड पाळूनि कैसा सीतळ । तो तप्तभूमी कवाळ लोळविती ॥ ५ ॥ ह्मणउनी करा कांहीं सायास । व्हावेल तर व्हा रे उदास । करवेल तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ६२४ ॥ न बोलसी तेंही कळलें देवा । लाजसी आपुलिया नांवा । तुज मी नाहीं घालीत गोवा । भीड केशवा कासयाची ॥ धृ० ॥ उतरीं आपुला हा पार । मजवरी बोलोनि उत्तर । माझा तुज नव्हे अंगीकार । मग विचार करीन मी ॥ १ ॥ दात्या आणि मागत्यासीं । धर्मनीति तरी बोलिली ऐसी । यथानशक्ति टाकेल तैसी । बाधी दोघांसी विन्मुखता ॥ २ ॥ ह्मणोनि करितों मी आस । तुझिया वचनाची वास । धीर हा करूनि सायास । न टळें नेमास आपुलिया ॥ ३ ॥ तुह्मी म्यां घेतल्या वांचून । न वजें एथूनि वचन । हाचि माझा नेम सत्य जाण । आहे नाहीं ह्मण तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६२५ ॥ आतां मी न पडें सायासीं । संसारदुःखाचिये पाशीं । शरण रिघेन संतांसी । ठाव पायांपाशीं मागेन त्यां ॥ धृ० ॥ न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधले पाय । आतां मज न विसंबें माय । मोकलूनि धाय विनवीतसें ॥ १ ॥ बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें । त्रिगुण येतील लहरें । तेणें दुःखें थोरें आक्रंदलों ॥ २ ॥ आणीक दुःखें सांगों मी किती । सकळ संसारस्थिती । न साहे पाषाण फुटती । भय चित्तीं कांप भरलासे ॥ ३ ॥ आतां मज न साहवे सर्वथा । संसारगंधीची हे वार्ता । जालों वेडा असोनि जाणता । पावें अनंता तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६२६ ॥ आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरि तारीं मारीं । जवळी अथवा दुरी धरीं । घालीं संसारीं अथवा नको ॥ धृ० ॥ शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहींच नेणें । मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणे रंकाहुनी ॥ १ ॥ मन स्थिर नाहीं माझिये हातीं । इंद्रियें धांवतां नावरती । सकळ खुंटलिया युक्ती । शांति निवृत्ति जवळी नाहीं ॥ २ ॥ सकळ निवेदिला भाव । तुझिये पायीं ठेविला जीव । आतां करीं कळे तो उपाव । तूंचि सर्व ठाव माझा देवा ॥ ३ ॥ राहिलों धरूनि विश्वास । आधार नेटीं तुझी कास । आणीक नेणें मी सायास । तुका ह्मणे यास तुह्मी उचित ॥ ४ ॥

॥ ६२७ ॥ देवा तूं कृपाकरुणासिंधू । होसी मायबाप आमचा बंधू । जीवनसिद्धि साधनासिंधू । तोडिसी भवबंधु काळपाश ॥ धृ० ॥ शरणागता वज्रपंजर । अभयदाना तूं उदार । सकळां देवा तूं अगोचर । होसी अविकार अविनाश ॥ १ ॥ आगमीं स्तुति करितां फार । तेथें मी काय तें गव्हार । जाणावया तुझा हा विचार । नको अंतर देऊं आतां ॥ २ ॥ नेणें भाव परि ह्मणवीं तुझा । नेणें भक्ति परि करितों पूजा । आपुल्या नामाचिया काजा । तुज केशीराजा लागे धांवणें ॥ ३ ॥ तुझिया बळें पंढरीनाथा । जालों निर्भर तुटली व्यथा । घातला भार तुझिया माथां । न भीं सर्वथा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६२८ ॥ कोण सुख धरोनि संसारीं । राहों सांग मज बा हरी । अयऱ्या नाशिवंता परी । चिंता दुरी अंतरसी ॥ धृ० ॥ प्रथम केला गर्भी वास । काय ते सांगावे सायास । दुःख भोगिलें नवही मास । आलों जन्मास येथवरी ॥ १ ॥ बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषयव्यथा । वृद्धपणीं प्रवर्तली चिंता । मरें मागुता जन्म धरीं ॥ २ ॥ क्षण एक तोही नाहीं विसावा । लक्ष चौऱ्याशी घेतल्या धांवा । भोवंडिली पाठी लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥ ३ ॥ आतां पुरे ऐसी भरोवरी । रंक होऊनि राहेन द्वारीं । तुझा दास मी दीन कामारी । तुका ह्मणे करीं कृपा आतां ॥ ४ ॥

॥ ६२९ ॥ सुख या संतसमागमें । नित्य दुनावे तुझिया नामें । वहन होती सकळ कर्मे । सर्वकाळप्रेमें डुलतसों ॥ धृ० ॥ ह्मणोनि नाहीं कांहीं चिंता । तूंचि आमुचा माता-पिता । बहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥ १ ॥ ऐसा हा कळला निर्धार । माझा तुज न पडे विसर । असती देऊनियां धीर । बाह्य अभ्यंतर मजजवळा ॥ २ ॥ दुःख तें कैसें नये स्वमासी । भुक्तिमुक्ति आल्या कामारी दासी । त्यांचे वर्म तूं

आह्मांपाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥ ३ ॥ जेथें तुझ्या कीर्तनाच्या घोष । जळती पापें पळती दोष । काय तें उणें आह्मां आनंदास । सेवूं ब्रह्मरस तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६३० ॥ देवा तूं आमचा कृपाळ । भक्तिप्रतिपाळ दीनवत्सळ । माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥ धृ० ॥ तुज लागली सकळ चिंता । राखणें लागे वांकडें जातां । पुढती निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज ॥ १ ॥ आह्मां भय चिंता नाहीं धाक । जन्म मरण कांहीं एक । जाला इहलोकीं परलोक । आलें सकळैक-वैकुंठ ॥ २ ॥ न कळे दिवस कीं राती । अखंड लागलीसे ज्योती । आनंदलहरीची गती । वर्णू कीर्ति तया सुखा ॥ ३ ॥ तुझिया नामाचीं भूषणें । तीं यें मज लेवविलीं लेणें । तुका ह्मणे तुझियान गुणें । काय तें उणें एक आह्मां ॥ ४ ॥

॥ ६३१ ॥ न पवे सान्निध वाटते चिंता । बरिया बहुतांची सत्ता । नुगवे पडत जातों गुंता । कर्मा बळिवंता सांपडलों ॥ धृ० ॥ बहु भार पडियेला शिरीं । मी हें माझें मजवरी । उघड्या नागविलों चोरीं । घरिच्याघरीं जाणजाणतां ॥ १ ॥ तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां । जाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥ २ ॥ अति हा निकट समय । मग त्यां करावें तें काय । दिवस गेलिया ठाकईल छाय । उरईल हाय रातिकाळीं ॥ ३ ॥ होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता । ठाव तो न दिसे लपतां । बहुत चिंता प्रवर्तली ॥ ४ ॥ ऐसी या संकटाची संधी । धांव घालावी कृपानिधी । तुका ह्मणे माझी बळबुद्धी । सकळ सिद्धी पाय तुझे ॥ ५ ॥

॥ ६३२ ॥ आतां धर्माधर्मी कांहीं उचित । माझे विचारावें हित । तुज मी ठाउका पतित । शरणागत परि जालों ॥ धृ० ॥ येथें राया रंका एकी सरी । नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं । पावलों पाय भलत्या परी । मग बाहेरी न घालावें ॥ १ ॥ ऐसें हें चालत आलें मागें । नाहीं मी बोलत वाउगें । आपुलिया पडिल्या प्रसंगें । कीर्ति हे जगें वाणि-जेते ॥ २ ॥ घालोनियां माथां बैसलों भार । सांडिला लौकिक वेव्हार । आधीं हे विचा-रिली थार । अविनाश पर पद ऐसें ॥ ३ ॥ येथें एक वर्म पाहिजे धीर । परि त्यां लेखिलें असार । देह हें नाशिवंत जाणार । धरिलें सार नाम तुझें ॥ ४ ॥ कली आगाणुक सकळां हातीं । धरावें धरिलें तें चित्तीं । तुका ह्मणे सांगितलें संतीं । देई अंतीं ठाव मज देवा ॥ ५ ॥

॥ ६३३ ॥ बरवें झालें आलों जन्मासी । जोड जोडली मनुष्य देहा ऐसी । महा-लाभाची उत्तम रासी । जेणें सुखासी पात्र होइजे ॥ धृ० ॥ दिलीं इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन । जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ॥ १ ॥ तिळेंतीळ पुण्य सांचा पडे । तरि हें बहुतां जन्मीं जोडे । नाम तुझें वाचेसी आतुडे । समागम घडे संतांचा ॥ २ ॥ ऐसिये पावविलों ठायीं । आतां मी काई होऊं उतराई । येवढा जीव ठेवीन पायीं । तूं माझे आई पांडुरंगे ॥ ३ ॥ फेडियेला डोळियांचा कवळ । धुतला गुणदोषांचा मळ । लावूनि स्तनीं केलों सीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥ ४ ॥ नाहीं या आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा । आला आकारा आमुच्या चाडा । तुका ह्मणे भिडा भक्तीचिया ॥ ५ ॥

॥ ६३४ ॥ अल्प भाव अल्प मती । अल्प आयुष्य नाहीं हातीं । अपराधाची थोकिली मूर्ती । अहो वेदमूर्ती परियेसा ॥ धृ० ॥ किती दोषा देऊं परिहार । गुणदोषें माळिलें अंतर । आदि वर्तमान भविष्याकार । गेला अंतपार ऐसें नाहीं ॥ १ ॥ त्रिविध कर्म चौऱ्याशी फेरा । त्रिविध भोग या शरीरा । कर्मकोठार पांजरा । जन्मजरामरणसांठवण ॥ २ ॥ जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये भिन्न पंच भूतें । रचतें खचतें संचितें । असार रितें फलकट ॥ ३ ॥ पुत्र पत्नी सहोदर । मायबाप गोताचा पसर । मिळतां कांहें लोटतां पूर । आवडी दूर होती खळाळीं ॥ ४ ॥ ह्मणोनि नासावें अज्ञान । इतुलें करीं कृपादान । कृपाळु तूं जनार्दन । धरूनि चरण तुका विनवी ॥ ५ ॥

॥ ६३५ ॥ ऐसी हे गर्जतू वेखरी । केशव मुकुंद मुरारी । राम कृष्ण नामें बरीं । हरी हरी दोष सकळ ॥ धृ० ॥ जनार्दना जगजीवना । विराटस्वरूपा वामना । महशाद्रि मधुसूदना । भवबंधना तोडितिया ॥ १ ॥ चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा । सकळमुगुटमणि शूरा । अहो दातारा जगदानिया ॥ २ ॥ मदनमूर्ती मनमोहना । गोपाळगोपिकारमणा । नटनाट्यकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥ ३ ॥ गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी आणि सर्वजाणा । करोनि अकर्ता आपणा । नेदी अभिमाना आतळों ॥ ४ ॥ कासयानें घडे याची सेवा । काय एक समर्पावें या देवा । वश्य तो नव्हे वांचुनि भावा । पाय जीवावेगळे न करीं तुका ॥ ५ ॥

॥ ६३६ ॥ होतों तें चिंतीत मानसीं । नवस फळले नवसीं । जोडिते नारायणा ऐसी । अविट ज्यासी नाश नाहीं ॥ धृ० ॥ धरिलें जीवीं न सोडीं पाय । आलें या जीवित्वाचें काय । कैं हे पाविजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥ १ ॥ मज तों पडियेली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळें गोवी केली । दृष्टि उघडली बरें जालें ॥ २ ॥ आतां हा सिद्धि पावो भाव । मध्यें चांचल्यें न व्हावा जीव । ऐसी तुह्मां भाकीतसें कींव । कृपाळुवा जगदानिया ॥ ३ ॥ काळों येतें आपुले बुद्धी । ऐसें तों न घडतें कधीं । केवढे आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके ॥ ४ ॥ कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी । प्रीति हे लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥ ५ ॥

॥ ६३७ ॥ तुझिया पार नाहीं गुणां । माझी अल्प मति नारायणा । भवतारका जी सुजाणा । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ धृ० ॥ काय जाणावें म्यां हीनें । तुझिये भक्तीचीं लक्षणें । धड तें तोंड धोऊं नेणें । परि चिंतनें काळ सारीं ॥ १ ॥ न लगीं आणीक कांहीं पिसें । माझिया मना वांयां जाय ऐसें । चालवीं आपुल्या प्रकाशें । हातीं सरिसें धरोनिया ॥ २ ॥ तुज समर्पिली काया । जीवें भावें पंढरीराया । सांभाळीं समविषम डाया । करीं छाया कृपेची ॥ ३ ॥ चतुर तरीं चतुरां राव । जाणता तरीं जीवांचा जीव । न्यून तो कोण एक ठाव । आरुष भाव परि माझा ॥ ४ ॥ होतें तें माझें भांडवल । पायांपें निवेदिलें बोल । आदरा ऐसें पाविजे मोल । तुका ह्मणे साच फोल तूं जाणसी ॥ ५ ॥

॥ ६३८ ॥ कां हो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे फार । अनंत पाव-

र । नव्हेचि थार मज शेवटीं ॥ धृ० ॥ पाप बळिवंत गाढें । तुजही राहीं
। मागील कांहीं राहिलें ओढें । नवल कोडें देखियेलें ॥ १ ॥ काय मानिनी
तुमचें हीनत्ववचन । कीं वृद्ध जाला नारायण । न चले पण आर्धील तों
तां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी । पडदा काय घरच्याघरीं । धरिलें
धरिलें ॥ ३ ॥ नको चाळवूं अनंता । कासया होतोसि नेणता । काय तूं नाहीं
। तुका ह्मणे आतां होईं प्रगट ॥ ४ ॥

॥ मज ते हांसतील संत । जींहीं देखिलेती मूर्तिमंत । ह्मणोनि उद्वेगलें
ह्याच भक्त ऐसा दिसें ॥ धृ० ॥ ध्यानीं म्यां वर्णावेति कैसे । पुढें एकीं स्तुति
। तेथूनि जीव निघत नसें । ऐसिये आसे लागलोंसें ॥ १ ॥ कासया पाडिला
उगाचि वेडा आणि वांकडा । आह्मां लेंकरांसि पीडा । एक मागें जोडा
॥ २ ॥ सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरीतसें पाय । तूं तंव समर्थ
य । काय अन्याय एक माझा ॥ ३ ॥ नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेति
। वचन द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावीं ॥ ४ ॥ बहुत दिवस केला
ाहातां श्रमलों ते वाट । तुका ह्मणे विस्तारलें ताट । काय वीट आला नेणों
; ॥

॥ बरें जालें आजिवरी । नाहीं पडिलों मृत्याचे आहारीं । वांचोन आलों
उरलें तें हरि तुह्मां समर्पण ॥ धृ० ॥ दिला या काळें अवकाश । नाहीं पावलें
ाश । कार्या कारण उरलें शेष । गेलें तें भूस जावो परतें ॥ १ ॥ बुडणें खोटें
ी । स्वप्नीं जाली ओढाताढी । नासली जागृतीच्या घडी । साच जोडी शेवटीं
॥ २ ॥ तुह्मांसि पाववीली हाक । तेणें निरसला धाक । तुमचें भातें हें कवतुक ।
त लोक रक्षावें ॥ ३ ॥ रवीच्या नावें निशीचा नाश । उदय होतांचि प्रकाश ।
ा आह्मां दोष । तूं जगदीश कैवारी ॥ ४ ॥ आतां जळो देह सुख दंभ मान ।
चें साधन । तूं जगदादि नारायण । आलों शरण तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ आतां माझा नेणों परतों भाव । विसावोनि पायीं ठेविला जीव । सकळां
ा ठाव । ऐसा वाव जाला चित्ताठायीं ॥ धृ० ॥ भांडवल गांठीं तरि विश्वास ।
ालों निश्चय दास । न पाहें मागील ते वास । पुढतीं सोस सेवेचाची ॥ १ ॥ आहे
सर्व । मी हें माझें मोडियला गर्व । अकाळीं काळ अवघें पर्व । जाला भरवसा
ा ॥ २ ॥ वेव्हारीं वेव्हारा अनंत । नाहीं यावांचूनी जाणत । तरी हें समाधान
महानी नाहीं येत अंतरा ॥ ३ ॥ करूनि नातळों संसारा । अंग भिन्न राखिला
ळवळा तो जीवनीं खरा । बीजाचा थारा दुरी आघात ॥ ४ ॥ बहु मतापीं-
ठा । होऊनि राहिलों सोंवळा । बैसल्या रूपाचा कळवळा । तुका ह्मणे डोळां
५ ॥

॥ तुळसीमाळा घालुनी कंठीं । उभा विटेवरी जगजेठी । अवलोकोनि पुंड-
। असे भीमातटीं पंढरीराय ॥ धृ० ॥ भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी । रिद्धि-

सिद्धि वोळगती द्वारीं। सुदर्शन घरटी करी। काळ कांपे दुरी धाकें तया ॥ १ ॥ जगज्जननी असे वाम भागीं। भीमकी शोभली अर्धांगीं। जैसी विद्युल्लता झमके मेघीं। दरुषणें भंगी महादोष ॥ २ ॥ सुखसागर परमानंदु। गोपीगोपाळां गोधनां छंदु। पक्षिश्वापदां जयाचा वेधु। वाहे गोविंदु पांवा छंदें ॥ ३ ॥ मुखमंडित चतुर्भुजा। मनमोहन गरुडध्वजा। तुका ह्मणे स्वामी माझा। पावे भक्तिकाजा लवलाहीं ॥ ४ ॥

॥ ६४३ ॥ हातींचें न संडावें देवें। शरण आलों जीवें भावें। आपुलें ऐसें ह्मणावें। करितों जीवें निंबलोण ॥ धृ० ॥ बैसतां संतांचे पंगती। कळों आलें कमळापती। आपुलीं कोणीच नव्हती। निश्चय चित्तीं दृढ जाला ॥ १ ॥ येती तुझिया भजना आड। दाविती प्रपंचाचें कोड। कनिष्ठीं रुचि ठेऊनि गोड। देखत नाड कळतसे ॥ २ ॥ मरती मेलीं नेणों किती। तोचि लाभ तयाचे संगती। ह्मणोनि येतों काकुलती। धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥ ३ ॥ सुखें निंदोत हे जन। न करीं तयांशीं वचन। आदिपिता तूं नारायण। जोडीं चरण तुमचे तें ॥ ४ ॥ आपलें आपण न करूं हित। करूं हें प्रमाण संचित। तरी मी नष्टचि पतित। तुका ह्मणे मज संत हांसती ॥ ५ ॥

॥ ६४४ ॥ बरवें जालें लागलों कारणीं। तुमचे राहिलों चरणीं। फेडीन संतसंगतीं धणी। गर्जइल गुणीं वैखरी ॥ धृ० ॥ न वंचे शरीर सेवेसी। काया वाचा आणि मनेसीं। जालों संताची अंदणी दासी। केला याविशीं निर्धार ॥ १ ॥ जीवनीं राखिला जिव्हाळा। जालों मी मजसीं निराळा। पंचभूतांचा पुतळा। सहज लीळा वर्ततसे ॥ २ ॥ जयाचें जया होईल ठावें। लाहो या साधियला भावें। ऐसे होतें राखियलें जीवें। येथूनि देवें ओवहुनीं ॥ ३ ॥ आस निरसली ये खेपे। अवघे पंथ जाले सोपे। तुमचे दीनबंधु कृपें। दुसरें कांपे सत्ताधाकें ॥ ४ ॥ अंकिलेपणें आनंदरूप। आतळों नये पुण्यपाप। सारूनि ठेविले संकल्प। तुका ह्मणे आपेंआप एकाएकीं ॥ ५ ॥

॥ ६४५ ॥ अवघ्या दशा येणें साधती। मुख्य उपासना सगुणभक्ती। प्रगटे हृदयींची मूर्ती। भावशुद्धि जाणोनियां ॥ धृ० ॥ बीज आणि फळ हरीचें नाम। सकळ पुण्य सकळ धर्म। सकळां कळांचें हें वर्म। निवारी श्रम सकळही ॥ १ ॥ जेथें कीर्तन हें नामघोष। करिती निर्लज्ज हरीचे दास। सकळ वोथंबले रस। तुटती पाश भवबंधाचे ॥ २ ॥ येती अंगा वसती लक्षणें। अंतरीं देवें धरिलें ठाणें। आपणचि येती तयाचे गुणें। जाणें येणें खुंटे वस्तीचें ॥ ३ ॥ न लगे सांडावा आश्रम। उपजले कुळींचे धर्म। आणीक न करावे श्रम। एक पुरे नाम विठोबाचें ॥ ४ ॥ वेदपुरुष नारायण। योगियांचें ब्रह्म शून्य। मुक्त आत्मा परिपूर्ण। तुका ह्मणे सगुण भोळया आह्मां ॥ ५ ॥

*॥ ६४६ ॥ श्रीअनंता मधुसूदना। पद्मनाभा नारायणा। जगव्यापका जनार्दना। आनंदघना अविनाशा ॥ धृ० ॥ सकळदेवा आदिदेवा। कृपाळुवा जी केशवा। महा महानुभवा। सदाशिवा सहजरूपा ॥ १ ॥ चक्रधरा विश्वंभरा। गरुडध्वजा करुणाकरा। सहस्रपादा सहस्रकरा। क्षीरसागरा शेषशयना ॥ २ ॥ कमलनयना कमलापती। कामिनीमोहना मदनमूर्ती। भवतारका धरित्या क्षिती। वामनमूर्ती त्रिविक्रमा ॥ ३ ॥ अगा

सगुणा निर्गुणा। जगज्जनित्या जगज्जीवना। वसुदेवदेवकीनंदना। बाळरांगणा बाळ-
ष्णा ॥ ४ ॥ तुका आला लोटांगणीं। मज ठाव द्यावा जी चरणीं। हेचि करीतसें
नवणी। भवबंधनीं सोडवावें ॥ ५ ॥
॥ ६४७ ॥ आतां येणें बळें पंढरीनाथ। जवळी राहिला तिष्ठत। पाहतां न कळे
याचा अंत। तोचि हृदयांत घालूं आतां ॥ धृ० ॥ विसरोनि आपुला देहपणभाव।
मेंचि भुलविला पंढरीराव। न विचारी याति कुळ नांव। लागावया पाव संतांचे
१ ॥ बरें वर्म आलें आमुचिया हातां। हिंडावें धुंडावें न लगतां। होय अविनाश सहा-
री दाता। चतुर्भुज संता परि धाकें ॥ २ ॥ होय आवडी सानें थोर। रूप सुंदर मनो-
। भक्तिप्रिय लोभापर। करी आदर याचकपणें ॥ ३ ॥ तें वर्म आलें आमुच्या हाता।
गोनि शरण निघालों संता। तुका ह्मणे पंढरीनाथा। न सोडीं आतां जीवें भावें ॥ ४ ॥
॥ ६४८ ॥ माझा तंव खुंटला उपाव। जेणें तुझे आतुडती पाव। करूं भक्ति तरि
हीं भाव। नाहीं हातीं जीव कवणेविशीं ॥ धृ० ॥ धर्म करूं तरि नाहीं चित्त। दान देऊं
रें नाहीं वित्त। नेणें पूजों ब्राह्मण अतीत। नाहीं भूतदया पोटा हातीं ॥ १ ॥ नेणें गुरु-
स्य संतसेवन। जप तप अनुष्ठान। नव्हे वैराग्य वनसेवन। नव्हे दमन इंद्रियांसी ॥ २ ॥
र्थ करूं तरि मन नये सवें। व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें। देव जरि आहे ह्मणों
ासवें। तरि आपपरावें न वंचे ॥ ३ ॥ ह्मणोनि जालों शरणागत। तुझा दास मी
केत। यास कांहीं न लगे संचित। जालों निश्चित तुका ह्मणे ॥ ४ ॥
॥ ६४९ ॥ तरि म्यां आळवावें कोणा। कोण हे पुरवील वासना। तुजवांचूनि नारा-
ा। लावीं स्तना कृपावंते ॥ धृ० ॥ आपुला न विचारीं सिण। न धरीं अंगसंगें भिन्न।
ीकारिलें राखें दीन। देईं जीवदान आवडीचें ॥ १ ॥ माझिया मनासि हे आस। नित्य
ावा ब्रह्मरस। अखंड चरणींचा वास। पुरवीं आस याचकाची ॥ २ ॥ माझिया
चेताचा ठेवा। तेणें हे वाट दाविली देवा। एवढ्या आदराचा हेवा। मागें सेवादान
वडीनें ॥ ३ ॥ आळवीन करुणावचनीं। आणीक गोड न लगे मनीं। निद्रा जागृती
णि स्वप्नीं। धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥ ४ ॥ आतां भेट न भेटतां आहे। किंवा नाहीं
विचारूनि पाहें। लागला झरा अखंड आहे। तुका ह्मणे साहे केलें अंतरीं ॥ ५ ॥
॥ ६५० ॥ हें चि भवरोगाचें औषध। जन्म जरा तुटे व्याध। आणीक कांहीं नव्हे
। करील वध षड्वर्गा ॥ धृ० ॥ सांवळें रूप ल्यावें डोळां। सा चौ अठरांचा गोळा।
र लागों नेदी खळा। नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥ १ ॥ भोजना न द्यावें अन्न। जेणें
ह अनुपान। तरीच घेतल्याचा गुण। होईल जाण सत्य भाव ॥ २ ॥ नये निघों
पुलिया घरा। बाहेर लागों नये वारा। बहु बोलणें तें सारा। संग दुसरा वर्जावा ॥ ३ ॥
त तें एक द्यावें वरी। नवनीताची होईल परी। होईल गुसळिलें तें निवारी। सार
तरी नाहीं तया ॥ ४ ॥ न्हायें अनुतापीं पांघरें दिशा। स्वेद निघों दे अवघी आशा।
सेल मागें होतासी तैसा। तुका ह्मणे दशा भोगीं वैराग्य ॥ ५ ॥
॥ ६५१ ॥ मागुता हाचि जन्म पावसी। भोगिलें सुखदुःख जाणसी। हें तों न घडे दे

सायासीं । कां रे अंध होसी जाणोनियां ॥ धृ० ॥ लक्ष चौऱ्याशी न चुके फेरा । गर्भवासीं यातना थोरा । येऊनि पडसी संदेहपुरा । वोळसा थोरा मायाजाळीं ॥ १ ॥ पशु काय पापपुण्य जाणती । उत्तम मध्यम भोग भोगिती । कांहीं एक उपजतां मरती । बहिरीं अंध होतीं पांगुळ मुकीं ॥ २ ॥ नरदेह निधान सांगलें हातीं । उत्तम सार उत्तम गती । होइन देवाचि ह्मणती ते होती । तरि कां चित्तीं न धरावें ॥ ३ ॥ क्षण एक मन स्थिर करुनी । सावध होईं डोळे उघडोनी । पाहें वेद बोलिले पुराणीं । तुका विनवणी करीतसे ॥ ४ ॥

॥ ६९२ ॥ दास्य करी दासांचें । उणें न साहे तयांचें । वाढिलें ठायींचें । भाणें टाकोनियां धांवे ॥ धृ० ॥ ऐसा कृपेचा सागर । विटे उभा कटीं कर । सर्वस्वें उदार । भक्तांलागीं प्रगटे ॥ १ ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्तांचें भूषण । नाहीं तयाचा सीण । सुख धरिलें लातेचें ॥ २ ॥ सत्यभामा दान करी । उजुर नाहीं अंगीकारी । सेवकाच्या शिरीं । धरूनि चाले पादुका ॥ ३ ॥ राखे द्वारवंटा बळीचा । सारथी जाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥ ४ ॥ भिडा नो बोलवें पुंडलिकाशीं । उभा मर्यादा पाठीशीं । तुका ह्मणे ऐसी । कां रे न भजा माउली ॥ ५ ॥

॥ ६९३ ॥ हरि तैसे हरीचे दास । नाहीं तयां भय मोह चिंता आस । होऊनि राहाती उदास । बळकट कांस भक्तीची ॥ धृ० ॥ धरूनि पाय त्यजिलें जन । न लगे मान मृत्तिकाधन । कंठीं नाम अमृताचें पान । न लगे आन ऐसें जालें ॥ १ ॥ वाव तरी उदंडच पोटीं । क्षीर सिंधु ऐसे जगजेठी । कामक्रोधा न सुटे मिठी । गिन्हे तरी वेठीं राबविती ॥ २ ॥ बळें तरि नागवती काळा । लीन तरि सकळांच्या तळा । उदार देहासी सकळा । जाणोनि कळा सर्व नेणते ॥ ३ ॥ संसार तो तयांचा दास । मोक्ष तें पाहातसे वास । रिद्धिसिद्धि देशवटा त्रास । न शिवति यास वैष्णवजन ॥ ४ ॥ जन्ममृत्युस्वप्नांसारिखें । आप त्यां न दिसे पारखें । तुका ह्मणे अखंडित सुखें । वाणी वदे मुख प्रेमामृताची ॥ ५ ॥

॥ ६९४ ॥ बहुत जाचलों संसारीं । वसें गर्भीं मातेच्या उदरीं । लक्ष चौऱ्याशी योनिद्वारीं । जालों भिकारी याचक ॥ धृ० ॥ जिणें पराधीन आणिकां हातीं । दृढ पाशीं बांधलों संचितीं । प्रारब्ध क्रियमाण सांगाती । भोवंडिती सत्ता आपुलिया ॥ १ ॥ न भरे पोट नाहीं विसांवा । नाहीं नेम एक ठाव गांवा । नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा । लाही जीवा खापरीं तडफडी ॥ २ ॥ काळ बहुत गेले ऐसिया रीती । आणीक पुढें नेणों किती । खंडणा नाहीं पुनरावृत्ती । मज कल्पांतीं तरी वेगळें ॥ ३ ॥ ऐसें दुःख कोण हरील माझें । कोणा भार घालूं आपुलें ओझें । भवसिंधुतारक नाम तुझें । धांवसि काजे आडलिया ॥ ४ ॥ आतां धांव घालीं नारायणा । मजकारणें रंका दीना । गुण न विचारीं अवगुणा । तुका करुणा भाकीतसे ॥ ५ ॥

॥ ६९५ ॥ जंव हें सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाये । तंव तूं आपुलें स्वहित पाहें । तीर्थयात्रे जायें चुकों नको ॥ धृ० ॥ जंव काळ असे दुरी ठेला । तंव तूं हरिगुण गायें आइक वहिला । मनीं भाव धरूनि भला । न वंचें त्याला चुकों नको ॥ १ ॥

जोडोनि धन न घलीं माती । ब्रह्मवृंदें पूजन यती । सत्य आचरण द्या भूतीं । करीं सांगाती चुकों नको ॥ २ ॥ दशा यौवन बाणली अंगीं । पांगिला नव्हे विसयसंगीं । काम क्रोध लोभ मोह त्यागीं । राहें संतसंगीं चुकों नको ॥ ३ ॥ मग तेथें न चले कांहीं । सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं । पुढें संचित जाईल ग्वाही । तुका ह्मणे तेही यम-आज्ञा ॥ ४ ॥

॥ ६५६ ॥ ऐक पांडुरंगा एक मात । कांहीं बोलणें आहे एकांत । आह्मां जरी तारील संचित । तरी उचित काय तुह्में ॥ धृ० ॥ उसनें फेडितां धर्म तो कोण । काय तया मानवेल जन । काय गा मिरवूनि भूषण । वांयां थोरपण जनांमध्यें ॥ १ ॥ अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दानें । उपकार तरी धनमंत्रीपणें । जरी देणेंघेणें नाहीं आशा ॥ २ ॥ शूर तों तयासी बोलिजे जाणा । पाठीशी घालूनि राखे दीना । पार पुण्य नाहीं त्या भूषणा । ऐक नारायणा वचन हें ॥ ३ ॥ आतां पुढें बोलणें तें काई । मज तारिसी तरीच सही । वचन आपुलें सिद्धी नेई । तुका ह्मणे तई मज कळसी ॥ ४ ॥

॥ ६५७ ॥ चांगलें नाम गोमटें रूप । निवती डोळे हरती ताप । विठ्ठल विठ्ठल हा जप । प्रगट स्वल्प अति सार ॥ धृ० ॥ शस्त्र हें निर्वाणींचा बाण । निकट समय अवसान । कोठें योजेल दश दान । खंडी नारायण दुःख चिंतनें ॥ १ ॥ सकळ श्रेष्ठांचें मत । पावे सिद्धि पावबी अनंत । ह्मणोनि व्हावें शरणागत । आहे उचित एवढेंची ॥ २ ॥ ह्मणोनि रुसलों संसारा । सर्प विखार हा पांढरा । तुजशीं अंतर रे दातारा । याचि दोषकारानिमित्त ॥ ३ ॥ येणें मज भोगविल्या खाणी । नसतां छंद लाविला मनीं । माजलों मी माझे भमणीं । जाली बोडणी विटंबना ॥ ४ ॥ पावलों केलियाचा दंड । खाणी भोगिविल्या उदंड । आतां केला पाहिजे खंड । तुका दंडवत घाली देवा ॥ ५ ॥

॥ ६५८ ॥ चांगला तरी पूर्णकाम । गोड तरी याचेंचि नाम । दयाळु तरी अवघा धर्म । भला तरी दासा श्रम होऊं नेदी ॥ धृ० ॥ उदार तरी लक्ष्मीयेसी । झुंझार तरी कळिकाळासी । चतुर तरी गुणांची च रासी । जाणता तयासी तो एक ॥ १ ॥ कुनाट तरी बहु काळा । न कळे जयाची लीळा । नेणता गोवळीं गोवळा । लाघवी अबळाभुलवणा ॥ २ ॥ गांढ्या तरी भावाचा अंकित । बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत । ओंगळ तरी कुब्जेशीं रत । भ्याड अनंत बहु पापा ॥ ३ ॥ खेळ तो येणेंचि खेळावा । नट तो येणेंचि अवगावा । लपोनि जीवीं न कळे जीवा । धरितां देवा मातुडेसी ॥ ४ ॥ उंच तरी बहुतचि उंच । नीच तरी बहुतचि नीच । तुका ह्मणे बोलिलों साच । नाहीं अहाच पूजा केली ॥ ५ ॥

॥ ६५९ ॥ काय आह्मी भक्ति करणें कैसी । काय एक वाहावें तुह्मांसी । अवघा भरोनि उरलासी । वाणीं खाणीं रसीं रूपीं गंधीं ॥ धृ० ॥ कसें करूं इंद्रियां बंधन । पुण्यपापाचें खंडण । काय व्रत करूं आचरण । काय तुजविण उरलें तें ॥ १ ॥ काय डोळे झांकुनियां पाहूं । मंत्रजप काय ध्याऊं । कवणे ठायीं धरूनि भाव । काय तें वाव तुज-

विण ॥ २ ॥ काय हिंडों कवण दिशा । कवणे ठायीं पाय ठेवूं कैसा । काय तूं नव्हेसि न कळे तैसा । काय मी कैसा पाहों आतां ॥ ३ ॥ तुझिया नामाची सकळ । पूजा अर्चन मंत्र माळ । धूप दीप नैवेद्य फळ तांबूल । घेऊं पुष्पांजुळ तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६६० ॥ शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार । शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥ धृ० ॥ शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोंसुलें । शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥ १ ॥ शरीरें विटाळाचें आळें । मायामोहपाशजाळें । पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥ २ ॥ शरीर सकळ हें शुद्ध । शरीर निधींचा ही निध । शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यें भोगी देव शरीरा ॥ ३ ॥ शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणाचा रांधा । शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुधा एक शरीरीं ॥ ४ ॥ शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख न करीं त्याग । नव्हे वोखटें ना चांग । तुका ह्मणे वेग करीं हरिभजनीं ॥ ५ ॥

॥ ६६१ ॥ इतुलें करीं भलत्या परी । परद्रव्य परनारी । सांडुनि अभिलाष अंतरीं । वर्त्ते वेव्हारीं सुखरूप ॥ धृ० ॥ न करीं दंभाचा सायास । शांती राहें बहुवस । जिव्हे सेवीं सुगंधरस । न करीं आळस रामनामीं ॥ १ ॥ जनमित्र होईं सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा । संग न धरावा दुर्जनाचा । करीं संतांचा सायास ॥ २ ॥ करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास । तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखास न पवसी ॥ ३ ॥ धरूनि विश्वास करीं धीर । करितां देव हाचि निर्धार । तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतर तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ६६२ ॥ संसारसिंधु हा दुस्तर । नुलंघवे उलंवितां पार बहुत वाहाविलें दूर । न लगेचि तीर पैल थडी ॥ धृ० ॥ किती जन्म जाला फेरा । गणित नाहीं जी दातारा । पडिलों आवर्तीं भोंवरा । बहुता थोरा वोळसिया ॥ १ ॥ वाढलों परी नेणती बुद्धी । नाहीं परतली धरिली शुद्धी । मग म्यां विचारावें कधीं । ऐसी संधी सांडुनीयां ॥ २ ॥ अनेक खाणीं आहार निद्रा । भयमैथुनाचाचि थारा । बाळत्व तारुण्य जरा । प्रधान पुरा भोग तेथें ॥ ३ ॥ ऐसीं उलंघूनि आलों स्थळें । बहु भोवंडिलों काळें । आतां हें उगवावें जाळें । उजेडा बळें दिवसाच्या ॥ ४ ॥ सांडीन या संसाराची वाट । बहु येणें भोगविले कष्ट । दावी सत्या ऐसें नष्ट । तुका ह्मणे भ्रष्ट जालों देवद्रोही ॥ ५ ॥

॥ ६६३ ॥ विठ्ठल भीमातीरवासी । विठ्ठल पंढरीनिवासी । विठ्ठल पुंडलिकापासीं । कृपाळुनाविसीं उदार ॥ धृ० ॥ विठ्ठल स्मरणा कोंवळा । विठ्ठल गौरवीं आगळा । आधार ब्रह्मांडा सकळा । विठ्ठल लीळाविग्रही ॥ १ ॥ उभाचि परी न मनी सीण । नाहीं उद्धरितां भिन्न । समर्थाचे घरीं एक अन्न । आर्तभूता क्षणोक्षणा सांभाळी ॥ २ ॥ रुचीचे प्रकार । आणितातीं आदरें । कोठेंही न पडे अंतर । थोरां थोर धाकुट्यां धाकुटा ॥ ३ ॥ करितां बळ धरितां नये । झोंबतां डोळे मनें च होय । आपुल्या उद्देशाची सोय । जाणे हृदयनिवासी ॥ ४ ॥ पान्हा तरी आल्या अंतर तेथें । तों नाहीं भरिलें रितें । करितों सेवन आइतें । तुका ह्मणे चित्तें चित्त मेळवूनि ॥ ५ ॥

॥ ६६४ ॥ ताप हें हरण श्रीमुख । हरी भवरोगा ऐसें दुःख । अवलोकितां उपजे सुख । उभें सन्मुख दृष्टीपुढें ॥ धृ० ॥ न पुरे डोळियांचीं धणी । सखोल कृपेचीच खाणी । स्तवितां न पुरे वेदवाणी । तो हा समचरणी कृपानिधी ॥ १ ॥ रामकृष्णध्यान वामन नारसिंहीं । उग्र आणि सौम्य कांहींच नाहीं । सांपडे भरलीये वाही । भाव शुद्ध पाहीं याचें भातुकें ॥ २ ॥ गुणगंभीर चतुर सुजाण । शूर धीर उदार नारायण । व्यापक तरी त्रिभुवन । मनमोहन लावण्य हें ॥ ३ ॥ ठाण हें साजिरें सुंदर । अविनाश अविकार । अनंत आणि अपार । तो हा कटीं कर धरिताहे ॥ ४ ॥ जयाची वाणी सुमनमाळा । परमामृतजिव्हाळा । अनंता अंगीं अनंत कळा । तुका जवळा चरणसेवक ॥ ५ ॥

## कान्होबा० नाट.

॥ ६६५ ॥ अगा ये वैकुंठनायका । अगा ये त्रैलोक्यतारका । अगा जनार्दना जगव्यापका । अगा पाळका भक्तांचिया ॥ धृ० ॥ अगा ये वसुदेवदेवकीनंदना । अगा ये गोपिकारमणा । अगा बळिबंध वामना । अगा निधाना गुणनिधी ॥ १ ॥ अगा ये द्रौपदीबांधवा । अगा ये सखया पांडवा । अगा जीवाचिये जीवा । अगा माधवा मधुसूदना ॥ २ ॥ अगा महेश्वरा महाराजा । अगा श्रीहरि गरुडध्वजा । अगा सुंदरा सहस्रभुजा । पार मी तुझा काय वर्णूं ॥ ३ ॥ अगा अंबऋषिपरंपरा । निरालंबा निर्विकारा । अगा गोवर्धन धरणीधरा । अगा माहेरा दीनाचिया ॥ ४ ॥ अगा धर्मराया धर्मशीळा । कृपासिंधु कृपाळा । अगा प्रेमाचिया कल्लोळा । सकळकळाप्रवीणा ॥ ५ ॥ अगा चतुरा सुजाणा । मधुरागिरा सुलक्षणा । अगा उदारा असुरमर्दना । राखें शरणा तुकयाबंधु ॥ ६ ॥

॥ ६६६ ॥ उभा देखिला भीमातीरीं । कर मिरवले कटावरी । पाउलें तरी समचि साजिरीं । नाम तरी अनंत अतिगोड ॥ धृ० ॥ शंखचक्रांकित भूषणें । जडितमेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपली तेणें रवितेजें ॥ १ ॥ श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिका माळ । दंतओळी हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखरासी ॥ २ ॥ कडीं कडदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे पदक गळां । मृगनाभी रेखिला टिळा । लवती डोळां विद्युल्लता ॥ ३ ॥ सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं ते पावे आतां । तुकयाबंधु ह्मणे रे अच्युता । धन्य ते मातापिता प्रसवली ॥ ४ ॥

॥ ६६७ ॥ एक मागणें हृषिकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मज अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करीं ॥ धृ० ॥ नको तुजी बुद्धि आणिक । रिद्धिसिद्धि परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी ॥ १ ॥ मना येईल तो जन्म देई । भलते कुळीं भलते ठायीं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहुनी तूं न वजें ॥ २ ॥ इतुलें करीं भलत्या परी । भलत्या भावें तुझे द्वारीं । राहेन दास होऊनि कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥ ३ ॥ नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु ह्मणे रे अच्युता । आहेसि तूं दाता दानशूर ॥ ४ ॥

॥ ६६८ ॥ कई देखतां होईन डोळीं । सकळां भूतीं मूर्ति सांवळी । जीवा नांव भूमंडळीं । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ॥ धृ० ॥ ऐसा कृपा करील नारायण । जीव जगाचा होईन । प्रेमसागरीं बुडईन । होईल स्नान अनुतापीं ॥ १ ॥ ऐसा कई येईन दैवास । हृदय नासोनि जाईल आस । सदा संतचरणीं देहाच वास । सेवीन शेष धणीवरी ॥ २ ॥ क नवसा येतील अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वीजळ सागर । वा पूर आनंदाचे ॥ ३ ॥ प्रसन्न दया क्षमा शांती । कई नवविधा होईल भक्ती । भ वैराग्यसंपत्ती । मनोरथ कळती तई पुरले ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे सांग । नव्हे तुजविण निसरेना पांग । ह्मणोनि घातलें साष्टांग । पांडुरंगा वरी चरणा ॥ ५ ॥

॥ ६६९ ॥ तूं बळिया शिरोमणी । आहेसि माजी ये त्रिभुवनीं । रिघालों पाठी तुझी ह्मणउनी । आतां करीन मी असेल तें ॥ धृ० ॥ तूं देवा प्रतापदिनकर । सुरा असुरांचा सुर । महावीरां वीर धनुर्धर । मी तों पामर काय तेथें ॥ १ ॥ कृपासिंधु दीनवत्सल । फोडिली देवाची बंदशाळ । संहारूनि राक्षसदळ । शरणागत राजा स्थापिला ॥ २ ॥ उपक्रम करावा बहुत । तरी तूं जाणसी धर्मनीत । उचित काय तें अनुचित । राखें शरणागत आलों आतां ॥ ३ ॥ किती म्यां विनवावें । शरण आलों जीवें भावें । तुकयाबंधु ह्मणे करावें । क्षेम अवघें येणें काळें ॥ ४ ॥

॥ ६७० ॥ देवा मी चांडाळ चांडाळ । ह्मणतां लागताहे वेळ । नसे पाहातां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ॥ धृ० ॥ जन्मा उपजलियापासुनी । असत्य कर्म तें अझुनी । सत्य आचरण नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥ १ ॥ भक्ति दया अथवा कथा । कानीं न साहवे वार्ता । अखंड विषयांची वेथा । अधम पुरता अधमाहुनी ॥ २ ॥ काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मद मत्सर । यांचें तरी माहेरघर । परउपकार वैरी तैसा ॥ ३ ॥ निंदा द्वेष घात विश्वास । करितां नाहीं केला आळस । करूं नये ते केले संतउपहास । अभक्ष तेंही भक्षिलें ॥ ४ ॥ पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान । बोलों नये घडलें ऐसें अन्योन्यावीण । दासीगमन आदिकरूनी ॥ ५ ॥ कायामनें वाचा इंद्रियांशीं । सकळ पापांचीच राशी । तुकयाबंधु ह्मणे ऐसियासी । आलों हृषिकेशी तुज शरण ॥ ६ ॥

॥ ६७१ ॥ काय काय करितों या मना । परी नाइके नारायणा । करूं नये त्याची करी विवंचना । पतना नेऊं आदरिलें ॥ धृ० ॥ भलतिया सवें धांवे सैराट । वाट आडवाट दरे दरकुट । न विचारी कुडें कांहीं कपट । घात बळकट मांडियेला ॥ १ ॥ न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्त ही पाताळ आकाशा । घाली उडी वळेंचि देखोनि फांसा । केलों या देशा पाहुणा ॥ २ ॥ चेतवूनि इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । बुडविली शुद्ध बुद्धि केली राळ । ऐसें चांडाळ अनिवार हें ॥ ३ ॥ आतां काय ऐसें करावें यासी । बहु जाचिलों केलों कासाविसी । तुकयाबंधु ह्मणे हृषीकेशी । धांव मज ऐसी परी जाली ॥ ४ ॥

## अध्यात्मज्ञान.

॥ ६७२ ॥ अखंडक्षीराब्धी भरितें आलें । अध्यात्मविद्येचें भांडार उघडिलें । सूर्यकोटीस तेज फांकलें । ध्यानीं प्रगटलें भक्तांचिया ॥ धृ० ॥ अनादि ब्रह्मज्ञानाचें गुज । श्रवणीं अवचित पडिलें सहज । परमनिर्वाणाचें बीज । गुंडाळिलें निजसर्वभाग्यें ॥ १ ॥ मंत्र महामंत्र मंगळनिधी । सत्संगदर्शन प्रगटलें आधीं । वैराग्यविवेकाची बुद्धी । नामामृतसिद्धि साधिलें तें ॥ २ ॥ क्षमादयाशांतीचें निजसुख । सच्चित्सुखें बोलला पुंडलिक । अनंतसुखाचा हारिख । उगवला देख पंढरिये ॥ ३ ॥ तेणें भवभक्तीची निरपेक्षता । तेणें भूतदयेची ममता । तुका म्हणे पंढरीनाथा । संग साधुसंतां देईं आतां ॥ ४ ॥

॥ ६७३ ॥ क्षीराब्धिवासा शेषशयना । लीलाविग्रहा गोपिकारमणा । सगुणस्वरूप भक्तभूषणा । गुणनिधाना गुणरूपा ॥ धृ० ॥ अनंत अवतार धरितिया । अखंडस्वरूपा करुणालया । अमरपाळका देवराया । हरीं भवभया भक्तांचिया ॥ १ ॥ सर्वव्यापका सर्वातीता । गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा । भोळ्या भक्तांसि सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचि ना ॥ २ ॥ चित्तचाळका चैतन्यघना । भक्तकैवारी असुरमर्दना । भक्तअभिमानी नारायणा । जगज्जीवना पांडुरंगा ॥ ३ ॥ ब्रह्मादिकांचा निजजनिता । सकळकारण अकर्ता । अणुरेणुव्याप्यभरिता । पावन पतिता तुका म्हणे ॥ ४ ॥

॥ ६७४ ॥ अखंडकर्मा कर्मप्रकाशका । मजसाठीं कां रे जालासि मुका । धर्माधर्मप्रतिपाळका । सर्वचाळका सर्वातीता ॥ धृ० ॥ न देखसी वर्णाश्रममर्यादा । त्याचा सर्वस्वें करिसी कामधंदा । कधीं न लाजसी तूं गोविंदा । कां रे मुकुंदा बोल आतां ॥ १ ॥ मत्स्यकूर्मादिअवतारांसाठीं । श्रमले असतील जगजेठी । करितां घडमोड सृष्टी । जालासि कष्टी काय जाणें ॥ २ ॥ किती म्यां विनवावें श्रीपती । पुन्हा पुन्हा यावें काकुळती । पुरे आतां तुझी संगती । करुणामूर्ति काय आलें ॥ ३ ॥ काय म्यां तुजसी करावें आतां । कां रे कोपलासी पंढरीनाथा । सकळ दुःख निवारिता । पावन पतिता तुका म्हणे ॥ ४ ॥

॥ ६७५ ॥ वासुदेवा दिनानाथा । कमललोचना श्रीअच्युता । निजभक्तांसि सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचि ना ॥ धृ० ॥ विठ्ठला अनंता विश्वपती । विराट्स्वरूपा वामनमूर्ती । ब्रह्मादिकर्ता वैकुंठपती । अगम्यस्थिति वेदशास्त्रा ॥ १ ॥ अद्वैतअखंडभरिता । विश्वबाहु अपरिमिता । विश्वचक्षु विश्वदेवता । आदिपिता ब्रह्मयाचा ॥ २ ॥ भक्ताधीना भवभयभंगा । परमपुरुषा पांडुरंगा । अनादि अखिलअंतरंगा । संगा असंगा वेगळाची ॥ ३ ॥ हें विराट्स्वरूप ओळखियाभक्तांसी । सर्वथा न कळे हृषिकेशी । सगुणरूप धरूनि त्यांसी । लावीं भजनासी तुका म्हणे ॥ ४ ॥

॥ ६७६ ॥ काय खावें आतां कोणीकडे जावें । गांवांत राहावें कोण्या बळें ॥ धृ० ॥ कोपला पाटील गांवचे हे लोक । आतां घाली भीक कोण मज ॥ १ ॥ आतां तेणें चवी सांडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ २ ॥ भल्या लोकीं यास सांगितली

मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे याचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥ ४ ॥

॥ ६७७ ॥ संत मागें पाणी नेदी एक चूळ । दासीस आंघोळ ठेवी पाणी ॥ धृ० ॥ संतासी देखोनी होय पाठमोरा । दासीच्चिया पोरा चुंबन देतो ॥ १ ॥ संतासी देखोनि करितो ढवाळ्या । भावें धुतो चोळ्या दासीच्चिया ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ३ ॥

॥ ६७८ ॥ एक प्रेमगुज ऐकें जगजेठी । आठवली गोष्टी सांगतसें ॥ धृ० ॥ एक मृग दोन्ही पाडसांसहित । आनंदें चरत होती वनीं ॥ १ ॥ अवचिता तेथें पारधी पावला । घेऊनियां आला श्वानें दोन्ही ॥ २ ॥ एकीकडे त्याणें चिरिल्या वागुरा । ठेविलें श्वानपुचा एकीकडे ॥ ३ ॥ एकीकडे तेणें वोणवा लाविला । आपण राहिला एकीकडे ॥ ४ ॥ चहूंकडोनियां मृगें वेढियेली । स्मरों तें लागलीं नाम तुझें ॥ ५ ॥ रामा कृष्णा हरि गोविंदा केशवा । देवाचिया देवा पावें आतां ॥ ६ ॥ कोण रक्षी आतां ऐसिये संकटीं । बापा जगजेठी तुजविण ॥ ७ ॥ आइकोनि तुह्मी तयांचीं वचनें । कृपाअंतःकरणें कळवळिलां ॥ ८ ॥ आज्ञा तये काळीं केली पर्जन्यासी । वेगीं पावकासी विझावावें ॥ ९ ॥ ससें एक तेथें उठवुनी पळविलें । तया पाठीं गेलीं श्वानें दोन्ही ॥ १० ॥ मृगें चमकोनी सत्वर चाललीं । गोविंदें रक्षिलीं ह्मणोनियां ॥ ११ ॥ ऐसा तूं कृपाळु दयाळु आहेसी । आपुल्या भक्तांसी जीवलग ॥ १२ ॥ ऐसी तुह्मी कीर्ति जीवीं आवडती । रखुमाइच्या पति तुका ह्मणे ॥ १३ ॥

॥ ६७९ ॥ आशाबद्ध वक्ता । धाक श्रोतयाच्या चित्ता ॥ धृ० ॥ वांया गेलें तें भजन । उभयतां लोभी मन ॥ १ ॥ बहिर्मुख एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥ २ ॥ माप तैसी गोणी । तुका ह्मणे रितीं दोन्हीं ॥ ३ ॥

॥ ६८० ॥ विठ्ठला रे तूं उदाराचा राव । विठ्ठला तूं जीव या जगाचा ॥ धृ० ॥ विठ्ठला रे तूं उदाराची रासी । विठ्ठला तुजपाशीं सकळसिद्धी ॥ १ ॥ विठ्ठला रे तुझें नाम बहु गोड । विठ्ठला रे कोड पुरविसी ॥ २ ॥ विठ्ठला रे तुझें श्रीमुख चांगलें । विठ्ठला लागलें ध्यान मनीं ॥ ३ ॥ विठ्ठला रे वाचे बोला बहुरस । विठ्ठला रे सोस घेतला जीवें ॥ ४ ॥ विठ्ठला रे शोक करीतसे तुका । विठ्ठला तूं ये कां झडकरी ॥ ५ ॥

॥ ६८१ ॥ बाहिर पडिलों आपुल्या कर्तव्यें । संसारासि जीवें वेटाळिलों ॥ धृ० ॥ एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडिलें ॥ १ ॥ जालीं दोन्ही नामें एकाचि मथनीं । दुसरिया गुणीं वेगळालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे दाखविल्या मुक्ताफळीं । शिंपलेचि स्वस्थळीं खुंटालिया ॥ ३ ॥

॥ ६८२ ॥ बरवा बरवा बरवा रे देवा तूं । जीवाहूनि आवडसी जीवा रे देवा तूं ॥ धृ० ॥ पाहातां वदन संतुष्ट लोचन । जाले आइकतां गुण श्रवण रे देवा ॥ १ ॥ अष्ट अंगें तनु त्रिविध ताप गेला सीण । वर्णितां लक्षण रे देवा ॥ २ ॥ मन जालें उन्मन अनुपम ग्रहण । तुकयाबंधु ह्मणे महिमा नेणें रे ॥ ३ ॥

॥ ६८३ ॥ सोइरियासि करी पाहुणेरु बरा । काढितो ठोंबरा संतांलागीं ॥ ध्रु० ॥ गाईसि देखोनि बदबदा मारी । घोडयाची चाकरी गोड लागे ॥ १ ॥ पानफुल वेश्येसी नेतसे उदंड । देखों नेदी खांड ब्राह्मणासी ॥ २ ॥ बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । माता पितियासी खवडितो ॥ ३ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

॥ ६८४ ॥ सोलीव जें सुख अतिसुखाहुनी । उभें हें अंगणीं वैष्णवांच्या ॥ ध्रु० ॥ वृंदावन सडे चौक रंग माळा । नाचे तो सोहोळा देखोनियां ॥ १ ॥ भूषणमंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥ २ ॥ नामअोघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोक्ष भक्तांचिया मना । नये हा वासना त्याची करी ॥ ४ ॥

॥ ६८५ ॥ तीर्थे केलीं कोटीवरी । नाहीं देखिली पंढरी ॥ ध्रु० ॥ जळो त्याचें ज्यालें-पण । न देखेचि समचरण ॥ १ ॥ योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥ २ ॥ तुका ह्मणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थे घडिलीं पाहीं ॥ ३ ॥

॥ ६८६ ॥ कोणतें कारण राहिलें यामुळें । जें म्यां तुज बळें कष्टवावें ॥ ध्रु० ॥ नाहीं जात जीव नाहीं होत हानी । सहज तें मनीं आठवलें ॥ १ ॥ नाहीं कांहीं चिंता मरतों उपवासी । अथवा त्या ह्मैसी गाई व्हाव्या ॥ २ ॥ हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लाखणीक वरी साच भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा नासिवंतासाटीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥ ४ ॥

॥ ६८७ ॥ रामा अयोध्येच्या राया । दिनानाथा रे सखया ॥ ध्रु० ॥ पाप ताप विघ्न हरीं । दिनानाथा सुख करीं ॥ १ ॥ भिलटीचिया रे उच्छिष्टा । स्वीकारिसी रे तूं भ्रष्टा ॥ २ ॥ मी तों सलगीचें मूल । तुका ह्मणे तूं सखोल ॥ ३ ॥

॥ ६८८ ॥ आमिषाचिये आसे गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावे ॥ ध्रु० ॥ मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ १ ॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका ह्मणे सुखा पार नाहीं ॥ २ ॥

॥ ६८९ ॥ तुजवरी ज्याचें मन । दरुशन दे त्याचें ॥ ध्रु० ॥ कैसा जाती शुद्ध भाव । हात पाव ना वृत्ती ॥ १ ॥ अवधियांचा करूनि मेळा । तुज डोळां राखिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज आड । लपोनि कोड सावीं देवा ॥ ३ ॥

॥ ६९० ॥ विश्वव्यापी माया । तिणें ह्माकुळिलें छाया ॥ ध्रु० ॥ सत्य गेलें भोळया-वारी । अविद्येची चाली थोरी ॥ १ ॥ आपुलेंचि मन । करवी आपणां बंधन ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुह्मी कोडीं हीं उगवा ॥ ३ ॥

॥ ६९१ ॥ पोटीं जन्मती रोग । तरि कां ह्मणावे आप्तवर्ग ॥ ध्रु० ॥ रानीं वसती औषधी । तरि कां ह्मणाव्या निपराधी ॥ १ ॥ तैसें शरीराचें नातें । तुका ह्मणे सर्व आतें ॥ २ ॥

॥ ६९२ ॥ नव्हे शब्द एक देशी । सांडी गवशी कोणाला ॥ ध्रु० ॥ जाली माझी

वैखरी । विश्वंभरी व्यापक ॥ १ ॥ मोकलिलें जावें बाणें । भाता जेणें वाईलें ॥ २ ॥ आतां येथें कैचा तुका । बोले सिक्का स्वामीचा ॥ ३ ॥

॥ ६९३ ॥ गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥ धृ० ॥ हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥ १ ॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नाहीं उतार चढतें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । नाम अमृताची खाणी ॥ ३ ॥

॥ ६९४ ॥ माप ह्मणे मी मवितें । भरी धणी ठेवी रितें ॥ धृ० ॥ देवा अभिमान नको । माझेठायीं देऊं सको ॥ १ ॥ देशीं चाले सिका । रितें कोण लेखी रंका ॥ २ ॥ हातीं सूत्रदोरी । तुका ह्मणे त्याची थोरी ॥ ३ ॥

॥ ६९५ ॥ कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥ धृ० ॥ नेलें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥ १ ॥ कोणाची हे सत्ता । जाली वाचा वदविता ॥ २ ॥ तुका ह्मणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥ ३ ॥

॥ ६९६ ॥ सकळिकांच्या पायां माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥ धृ० ॥ अहो श्रोते वक्ते सकळही जन । बरें पारखुन बांधा गांठी ॥ १ ॥ फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तंव हमाल भारवाही ॥ २ ॥ तुका ह्मणे चाली जाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥ ३ ॥

॥ ६९७ ॥ कोण त्याचा पार पावला धुंडितां । पुढें विचारितां विश्वंभरा ॥ धृ० ॥ अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुति नेती त्याही खुंटलिया ॥ १ ॥ फळांत कीटक येवढें आकाश । ऐसीं तरुवरास अनेक किती ॥ २ ॥ दाविलें अनंतें अर्जुनासि पोटीं । आणिक त्या सृष्टि कृष्णलोक ॥ ३ ॥ तुका ह्मणे लागा संतांचिये कासे । ठाव घेतां कैसे तांचा जीवें ॥ ४ ॥

॥ ६९८ ॥ जें जें कांहीं करितों देवा । तें तें सेवा समर्पे ॥ धृ० ॥ भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ॥ १ ॥ आह्मी तुझें नेणों कोणा । हेंचि मना मन साक्ष ॥ २ ॥ तुका ह्मणे जगन्नाथा । हें अन्यथा नव्हे कीं ॥ ३ ॥

॥ ६९९ ॥ स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ धृ० ॥ परि हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छीतसे ॥ १ ॥ रूप वर्णावया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा जाली नाहीं ॥ ३ ॥

॥ ७०० ॥ तुज वर्णी ऐसा तुज विण नाहीं । दुजा कोणी तीहीं त्रिभुवनीं ॥ धृ० ॥ सहस्रमुखें शेष सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ १ ॥ अव्यक्ता अलक्षा अपारा अनंता । निर्गुणा सचिदा नारायणा ॥ २ ॥ रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी दाविसी आपणा । तरीच नारायणा कळों येसी ॥ ४ ॥

॥ ७०१ ॥ पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या ॥ धृ० ॥ बांधू विठ्ठलसांगडी । पोहुनी जाऊं पैल थडी । अवघे जन गडी । घाला उडी भाई हो ॥ १ ॥ हें तों

अमृत अमृताचें जळ ॥ २ ॥ तुका म्हणे थोरा पुण्यें । ओघ आला

ाणिक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासुनियां ॥ धृ० ॥
रंग ध्यानीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ १ ॥ पडिलें वळण इंद्रियां
निराळा नाहीं दुजा ॥ २ ॥ तुका म्हणे नेत्रीं केलें ओळखण । साजिरें
॥ ३ ॥
तों सर्वभावें अनधिकारी । होइल कैसी परी नेणों देवा ॥ धृ० ॥ दुरा-
ां मनास । होय कासावीस जीव माझा ॥ १ ॥ इंद्रियांची आर्त्री
। त्यांचे रंगीं चित्त रंगलेसे ॥ २ ॥ एकाचेंही मज न घडे दमन ।
ीं राखों ॥ ३ ॥ तुका म्हणे मज तारीं पंढरीराया । नाहीं तरी वांया

ूनियां योगी पाहाती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥ धृ० ॥
हिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ १ ॥ व्यापूनि वेगळें
सकळा अंतरीं निर्विकार ॥ २ ॥ रूप नाहीं रेखा नामही जयासी ।
शिव ध्याय ॥ ३ ॥ अंत नाहीं पार वर्णा नाहीं थार । कुळ याति स्थिर
मचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥ ५ ॥
तें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥ धृ० ॥
सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥ १ ॥ कैसी कीर्ती
आणूं । जाणूं हा कवणू कैसा तुज ॥ २ ॥ कैसा गाऊं गीतीं कैसा
ली स्थिति मति दावीं मज ॥ ३ ॥ तुका म्हणे जैसें दास केलें देवा ।
ाणीं मज ॥ ४ ॥
गमाचें वन । नका शोधूं करूं सीण ॥ धृ० ॥ या रे गौळियांचे घरीं ।
॥ १ ॥ पीडलेती भ्रमें । वाट न कळतां वर्मे ॥ २ ॥ तुका म्हणे आर ।
ार ॥ ३ ॥
बोळीं मना । बुद्धि बुद्धि क्षण क्षणा ॥ धृ० ॥ मीच मज दाखवण
ग्रेंचि धरिलों ॥ १ ॥ जें जें अर्थे उठी । तें तें तया हातें कुंटी ॥ २ ॥
तुका साक्ष उरला दोन्ही ॥ ३ ॥
न लिंपे त्या मेळें । कर्माकर्मा वेगळें ॥ धृ० ॥ तोचि एक त्या
ावलें खुणें ॥ १ ॥ शौच अशौच संधी । तन आळा तनाचि
्यां नाहीं ठाव । तुका म्हणे सहज भाव ॥ ३ ॥
श दरा करील वन । समाधान नाहीं जंव ॥ धृ० ॥ तरी काय तेथें
ाय जोडी तयांसी ॥ १ ॥ रिघतां धांवा पेवामध्यें । जोडे सिद्धि ते
भस्म करील राख । अंतर पाक नाहीं तों ॥ ३ ॥ वर्णाआश्रमाचे धर्म ।
ा ॥ ४ ॥ तुका म्हणे सोंग पाहा । निरसे आस तें हित ॥ ५ ॥

॥ ७१० ॥ तेंही नव्हे जें करितां कांहीं । ध्यातां ध्यायीं तेंही नव्हे ॥ धृ० ॥ तेंही नव्हे जें जाणवी जना । वाटे मना तेंही नव्हे ॥ १ ॥ त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तेंही नव्हे ॥ २ ॥ तेंही नव्हे जें भोंवतें भोंवें । नागवें धांवे तेंही नव्हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे एकचि आहे । सहजि पाहें सहज ॥ ४ ॥

॥ ७११ ॥ बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥ धृ० ॥ नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥ १ ॥ विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ॥ २ ॥ तुका ह्मणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥ ३ ॥

॥ ७१२ ॥ होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥ धृ० ॥ हाचि माझा नेमधर्म । अवघें विठोबाचें नाम ॥ १ ॥ हेचि माझी उपासना । लागेन संतांच्या चरणा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । करीन ते भोळी सेवा ॥ ३ ॥

॥ ७१३ ॥ सांटविला हरी । जींहीं हृदयमंदिरीं ॥ धृ० ॥ त्यांची सरली येरझार । जाला सफळ व्यापार ॥ १ ॥ हरि आला हाता । मग कैंचीं भय चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥ ३ ॥

॥ ७१४ ॥ मोक्ष तुमचा देवा । तुह्मी दुर्लभ तो ठेवा ॥ धृ० ॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥ १ ॥ आपल्या प्रकारा । करा जतन दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । पुरे एकचि शेवटीं ॥ ३ ॥

॥ ७१५ ॥ नामपाठ मुक्ताफळांच्या ओवणी । हें सुख सगुणी अभिनव ॥ धृ० ॥ तरी आह्मी जालों उदास निर्गुणा । भक्तांचिया मना मोक्ष नये ॥ १ ॥ ध्यावें ध्यावें ऐसा येथें उरे भाव । काय ठाया ठाव पुसोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां अभयदान करा । ह्मणा विश्वंभरा दिलें ऐसें ॥ ३ ॥

॥ ७१६ ॥ भवसिंधूचें काय कोडें । दावी वाट चाले पुडें ॥ धृ० ॥ तारूं भला पांडुरंग । पाय भिजों नेदी अंग ॥ १ ॥ मागें उतरिले बहुत । पैल तिरीं साधुसंत ॥ २ ॥ तुका ह्मणे लाग वेगें । जाऊं तयाचिया मागें ॥ ३ ॥

॥ ७१७ ॥ नाहीं साजत हा मोठा । मज अलंकार खोटा ॥ धृ० ॥ असें तुमचा रज-रेण । संतांपायींची वाहाण ॥ १ ॥ नाहीं स्वरूपीं ओळखी । भक्तिभाव करीं देखीं ॥ २ ॥ नाहीं शून्याकारीं । क्षर ओळखीं अक्षरीं ॥ ३ ॥ नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें काई ॥ ४ ॥ कांहीं नव्हे तुका । पायां पडेन हें ऐका ॥ ५ ॥

॥ ७१८ ॥ सत्य साच खरें । नाम विठोबाचें बरें ॥ धृ० ॥ जेणें तुटती बंधनें । उभय-लोकीं कीर्ति जेणें ॥ १ ॥ भाव ज्याचे गांठीं । त्यासी लाभ उठाउठी ॥ २ ॥ तुका ह्मणे भोळा । जिंकूं जाणें कळिकाळा ॥ ३ ॥

॥ ७१९ ॥ सत्य तो आवडे । विकल्पानें भाव उडे ॥ धृ० ॥ आह्मी तुमच्या कृपादानें । जाणों शुद्ध मंद सोनें ॥ १ ॥ आला भोग अंगा । न लवूं उसीर त्या त्यागा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । अंजन ते तुह्मी सेवा ॥ ३ ॥

॥ ७२० ॥ करावें चिंतन । तेंचि बरें न भेटून ॥ धृ० ॥ बरवा अंगीं राहे भाव । तग

तोचि जाणा देव ॥ १ ॥ दर्शनाची उरी । अवस्थाचि अंग धरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मान । तेथें सकळ कारण ॥ ३ ॥

॥ ७२१ ॥ जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवे ॥ धृ० ॥ सहज पूजा याचि नांवें । गळित अभिमानें व्हावें ॥ १ ॥ अवघें भोगितां गोसावी । आदीं आवसानीं जीवी ॥ २ ॥ तुका ह्मणे सिण ॥ न धरितां नव्हे भिन्न ॥ ३ ॥

॥ ७२२ ॥ नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥ धृ० ॥ देह पडो या चिंतनें । विठ्ठलनामसंकीर्तनें ॥ १ ॥ दंभस्थिति भलत्या भावें । मज हरिजन ह्मणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें तरी । मज सांभाळील हरी ॥ २ ॥

॥ ७२३ ॥ नये जरी कांहीं । तरी भलतेंचि वाहीं ॥ धृ० ॥ ह्मणविल्या दास । कोणी न धरी वेठीस ॥ १ ॥ समर्थाच्या नांवें । भलतैसें विकावें ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । वरी असते बहुता ॥ ३ ॥

॥ ७२४ ॥ न संडवे अन्न । मज न सेववे वन ॥ धृ० ॥ ह्मणउनी नारायणा । कींव भाकितों करुणा ॥ १ ॥ नाहीं अधिकार । कांहीं घोकाया अक्षर ॥ २ ॥ तुका ह्मणे थोडें । आयुष्य अवघेंचि कोडें ॥ ३ ॥

॥ ७२५ ॥ एकांचीं उत्तरें । गोड अमृत मधुरें ॥ धृ० ॥ ऐशा देवाच्या विभुती । भिन्न प्रारब्धाची गती ॥ १ ॥ एकांचीं वचनें । कडु अत्यंत तीक्षणें ॥ २ ॥ प्रकाराचें तीन । तुका ह्मणे केलें जन ॥ ३ ॥

॥ ७२६ ॥ वचनेंही नाड । न बोले तें मुकें खोड ॥ धृ० ॥ दोहीं वेगळें तें हित । बोली अबोलणी नीत ॥ १ ॥ अंधार प्रकाशी । जाय दिवस पावे निशी ॥ २ ॥ बीज पृथिवीच्या पोटीं । तुका ह्मणे दावी दृष्टी ॥ ३ ॥

॥ ७२७ ॥ विचारा वांचून । न पवीजे समाधान ॥ धृ० ॥ देह त्रिगुणांचा बांधा । माजी नाहीं गुण सुदा ॥ १ ॥ देवाचिये चाडे । देवा द्यावें जें जें घडे ॥ २ ॥ तुका ह्मणे होतें । बहु गोमटें उजितें ॥ ३ ॥

॥ ७२८ ॥ तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥ धृ० ॥ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ १ ॥ वसों न सके पाप । पळे त्रिविध तो ताप ॥ २ ॥ तुका ह्मणे माया । होय दासी लागे पाया ॥ ३ ॥

॥ ७२९ ॥ मुसावलें अंग । रंगीं मेळविला रंग ॥ धृ० ॥ एकीं एक दृढ जालें । मुळा आपुलिया आलें ॥ १ ॥ सागरीं थेंबुडा । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे नवें । नव्हे जाणावें हें देवें ॥ ३ ॥

॥ ७३० ॥ अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ॥ धृ० ॥ परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ॥ १ ॥ हेंचि प्रायश्चित्त । अनुतापीं न्हाय चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे पापा । शिवों नये अनुतापा ॥ ३ ॥

॥ ७३१ ॥ चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म ॥ धृ० ॥ तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावाचि कारण देवा ॥ १ ॥ तपें इंद्रियां आघात । क्षणें एका वाताहात

॥ २ ॥ मंत्र चळे थोडा । तरि धडचि होय वेडा ॥ ३ ॥ व्रतें करितां सांग ।
चुकतां भंग ॥ ४ ॥ धर्म सत्त्वचि कारण । नाहीं तरीं केला सिण ॥ ५ ॥
आघात । उंचनीच वाताहात ॥ ६ ॥ तुका ह्मणे दुजें । विधिनिषेधाचें ओझें ।
॥ ७३२ ॥ सोडिला संसार । माया तयावरि फार ॥ धृ० ॥ धांवत चाले मा
सुखदुःख साहे अंगें ॥ १ ॥ यानें ध्यावें नाम । तीसीकरणें त्याचें काम ॥
ह्मणे भोळी । विठ्ठलकृपेची कोंवळी ॥ ३ ॥
॥ ७३३ ॥ बैसों खेळूं जेवूं । तेथें नाम तुझें गाऊं ॥ धृ० ॥ रामकृष्णन
घालूं ओवुनियां गळां ॥ १ ॥ विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ॥ २ ॥
आतां । आह्मां जीवन शरणागतां ॥ ३ ॥
॥ ७३४ ॥ पाठीं पोटीं देव । कैचा हरिदासां भेव ॥ धृ० ॥ करा आनंदें
नका आशंकितमन ॥ १ ॥ एथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥ २ ॥
धनी । सपुरता काय वाणी ॥ ३ ॥
॥ ७३५ ॥ मनोमय पूजा । हेचि पढीयें केशीराजा ॥ धृ० ॥ घेतो कल्पने
न मानेती बाह्य रंग ॥ १ ॥ अंतरींचें जाणे । आदिवर्तमान खुणे ॥ २ ॥ तु
कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ॥ ३ ॥
॥ ७३६ ॥ जाणें भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥ धृ० ॥ आ
माझ्या मना । हो कां पंडित शाहाणा ॥ १ ॥ नामरूपीं जडलें चित्त । त्याच
अंकित ॥ २ ॥ तुका ह्मणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥ ३ ॥
॥ ७३७ ॥ याजसाठीं वनांतरा । जातों सांडुनियां घरा ॥ धृ० ॥ माझें दिट
बुद्धि होईल निष्काम ॥ १ ॥ अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥ २ ॥
अहंब्रह्म । आड येऊं नेदीं भ्रम ॥ ३ ॥
॥ ७३८ ॥ बुडतां आवरीं । मज भवाचे सागरीं ॥ धृ० ॥ नको मानूं भा
दोषांचे डोंगर ॥ १ ॥ आहे तें सांभाळीं । तुझी कैसी ब्रीदावळी ॥ २ ॥
दोषी । मी तों पातकांची राशी ॥ ३ ॥
॥ ७३९ ॥ अक्षई तें झालें । आतां न मोडे रचिलें ॥ धृ० ॥ पाया पडिला खं
तेथें पुढें चाली नाहीं ॥ १ ॥ होतें विखुरलें । ताळा जमे झडती आलें ॥ २ ॥
बोली । पुढें कुंठितचि जाली ॥ ३ ॥
॥ ७४० ॥ तुझे थोर थोर । भक्त करिती विचार ॥ धृ० ॥ जपतपादि सा
चिंतवेना मनें ॥ १ ॥ करुणावचनें । म्यां भाकावीं तुह्मां दीनें ॥ २ ॥ तुका ह
माझें थोडें फार ठायीं ॥ ३ ॥
॥ ७४१ ॥ लावूनि काहाळा । सुखें करितों सोहळा ॥ धृ० ॥ सादवीत गे
भय नाहीं सत्य जाणा ॥ १ ॥ गात नाचत विनोदें । टाळघागऱ्यांच्या छंदें ॥
ह्मणे भेव । नाहीं पुढें येतो देव ॥ ३ ॥
॥ ७४२ ॥ मुक्त कासया ह्मणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥ धृ० ॥ सु

कीर्तन । भय विसरलें मन ॥ १ ॥ देखिजेना नास । घालूं कोणावरी कास ॥ २ ॥ तुका ह्मणे साहे । देव आहे तैसा आहे ॥ ३ ॥

॥ ७४३ ॥ ओनाम्याच्या काळें । खडे मांडविले बाळें ॥ धृ० ॥ तेंचि पुढें पुढें काई । मग लागलिया सोई ॥ १ ॥ रज्जु सर्प होता । तोंवरीचि न कळतां ॥ २ ॥ तुका ह्मणे साचें । भय नाहीं बागुलाचें ॥ ३ ॥

॥ ७४४ ॥ आतां पुढें धरीं । माझे आठव वैखरी ॥ धृ० ॥ नको बडबडूं भांडें । कांहीं वाउगें तें रांडें ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल । ऐसे सांडूनियां बोल ॥ २ ॥ तुका ह्मणे आण । तुज स्वामीची हे जाण ॥ ३ ॥

॥ ७४५ ॥ काय नव्हे करितां तुज । आतां राखें माझी लाज ॥ धृ० ॥ मी तों अपराधाचा पांडुरंगा । शिखा अंगुष्ट तोंपाशीं ॥ १ ॥ आहें आहें आहें । मज कृपादृष्टि पाहें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥ ३ ॥

॥ ७४६ ॥ वंदीन मी भूतें । आतां अवघींचि समस्तें ॥ धृ० ॥ तुमची करीन भावना । परोपरीं नारायणा ॥ १ ॥ गाळुनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥ २ ॥ तुका ह्मणे मग । नव्हे दुजयाचा संग ॥ ३ ॥

॥ ७४७ ॥ पूजा पुज्यमान । कथे उभे हरिजन ॥ धृ० ॥ ज्याची कीर्ति वाखाणिती । तेथें ओतली ते मुर्ती ॥ १ ॥ देहाचा विसर । केला आनंदें संचार ॥ २ ॥ गेला अभिमान । लाज बोळविला मान ॥ ३ ॥ शोक मोह चिंता । याची नेणती ते वार्ता ॥ ४ ॥ तुका ह्मणे सखे । विठोबाचे ते सारिखें ॥ ५ ॥

॥ ७४८ ॥ भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ धृ० ॥ धांवे जातीपाशीं जातीं । खुण येरयेरां चित्तीं ॥ १ ॥ हिरा हिरकणी । काढी आंतुनी अहिरणी ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ॥ ३ ॥

॥ ७४९ ॥ वरि बोला रस । कथी ज्ञान मांजी फोंस ॥ धृ० ॥ ऐसे लटिके जे ठक । तयां इह ना पर लोक ॥ १ ॥ परिस एक सांगे । अंगा धुळी हे न लगे ॥ २ ॥ तुका ह्मणे हाडें । कुतऱ्या लाविलें झगडें ॥ ३ ॥

॥ ७५० ॥ हेचि तुझी पूजा । आतां करीन केशीराजा ॥ धृ० ॥ अवघीं तुझीं पदें । नमस्कारीन अभेदें ॥ १ ॥ न वर्जितदिशा । जाय तेथेंचि सरिसा ॥ २ ॥ नव्हे एकदेशी । तुका ह्मणे गुणदोषी ॥ ३ ॥

॥ ७५१ ॥ आपलें तों कांहीं । येथें सांगिजेसें नाहीं ॥धृ०॥ परि हे वाणी वायचळ । छंद करविते बरळ ॥ १ ॥ पंचभूतांचा हा मेळा । देह सत्ययत्वें निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भुली । इच्छा उफराट्या चाली ॥ ३ ॥

॥ ७५२ ॥ विठ्ठल नावाडा फुकाचा । अळविल्या सांटीं वाचा ॥ धृ० ॥ कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥ १ ॥ न पाहे सिदोरी । जाती कुळ न विचारी ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । हाक देतां उठाउठी ॥ ३ ॥

॥ ७५३ ॥ कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥ धृ० ॥ त्यांचा भार वाहे माया ।

करी योगक्षेमचिंता ॥ १ ॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें । असरतां एका भावें ॥ ३ ॥

॥ ७५४ ॥ नेणती वेद श्रुति कोणी । आह्मां भाविकां वांचुनी ॥ धृ० ॥ रूप आवडे आह्मांसी । तैशी जोडी हृषिकेशी ॥ १ ॥ आह्मी भावें बळिवंत । तुज घालूं हृदयांत ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज धाक । देतां पावसील हाक ॥ ३ ॥

॥ ७५५ ॥ मन गुंतलें लुलयां । जाय धांवोनि स्या ठाया ॥ धृ० ॥ मागें परतावी तो बळी । शूर एक भूमंडळीं ॥ १ ॥ येऊनियां घाली घाला । नेणों काय होईल तुला ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें । बहु नाडिले शाहाणे ॥ ३ ॥

॥ ७५६ ॥ घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ धृ० ॥ तुह्मी घ्या रे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥ १ ॥ तुह्मी ऐका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ २ ॥ तेथें धांव घेई । राहें विठोबाचे पायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ४ ॥

॥ ७५७ ॥ धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टि न्याहाळितां ॥ धृ० ॥ बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ॥ १ ॥ सर्वमंगळाचें सार । सुख सिद्धीचें भांडार ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ ३ ॥

॥ ७५८ ॥ जरि मी नव्हतों पतित । तरि तूं पावन कैंचा येथ ॥ धृ० ॥ ह्मणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥ १ ॥ लोहो महिमान परिसा । नाहीं तरी दगड जैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे याचकभावें । कल्पतरु माने पावें ॥ ३ ॥

॥ ७५९ ॥ एक भाव चित्तीं । तरीं न लगे कांहीं युक्ती ॥ धृ० ॥ कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें ॥ १ ॥ आठवचि पुरे । सुख अवघें मोहो रे ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । पूजा इच्छी नारायण ॥ ३ ॥

॥ ७६० ॥ मज संतांचा आधार । तूं एकलें निर्विकार ॥ धृ० ॥ पाहा विचारूनि देवा । नको आह्मांसवें दावा ॥ १ ॥ तुज बोल न बोलवे । आह्मां भांडायाची सवे ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी । ऐक्यभाव उरे उरी ॥ ३ ॥

॥ ७६१ ॥ तुज मागणें तें देवा । आह्मां तुह्मी चरणसेवा ॥ धृ० ॥ आन नेघों देसी तरी । रिद्धिसिद्धि मुक्ति चारी ॥ संतसंगति सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । तेणें पुरे माझें काम ॥ ३ ॥

॥ ७६२ ॥ तुझा शरणागत । जन्मोजन्मींचा अंकित ॥ धृ० ॥ आणीक नेणें कांहीं देवा । तुजवांचूनि केशवा ॥ १ ॥ हेंचि माझें गाणें । तुझें नामसंकीर्तन ॥ २ ॥ तुझ्या नामाचीं भूषणें । तुका ह्मणे ल्यालों लेणें ॥ ३ ॥

॥ ७६३ ॥ उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार ॥ धृ० ॥ तुझें नाम धरिलें कंठीं । केली संसारासी तुटी ॥ १ ॥ आतां नव्हे बाधा । कोणेविशीं कांहीं कदा ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ॥ ३ ॥

॥ ७६४ ॥ क्रियामतिहीन । एक मी गा तुझें दीन ॥ धृ० ॥ देवा करावा सांभाळ ।

वारीं माझी तळमळ ॥ १ ॥ नको माझे ठायीं । गुणदोष घालूं कांहीं ॥ २ ॥ अपराधाच्या कोटी । तुका ह्मणे घालीं पोटीं ॥ ३ ॥

॥ ७६५ ॥ नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ ध्रु० ॥ तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई ॥ १ ॥ वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥ २ ॥ वांजे न होती लेकरें । काय करावें भतारें ॥ ३ ॥ नपुंसका पुरुषासी । काय करील बाईल त्यासी ॥ ४ ॥ प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥ ५ ॥ तुका ह्मणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥ ६ ॥

॥ ७६६ ॥ नवां नवसांचीं । जालों तुह्मासी वाणीचीं ॥ ध्रु० ॥ कोण तुह्मी नाम घेतें । देवा पिंडदान देतें ॥ १ ॥ कोण होतें मागें पुढें । तुझें बोलाया रोकडें ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । कोणा घेतासि वो संगा ॥ ३ ॥

॥ ७६७ ॥ एका बीजा केला नास । मग भोगलें कणीस ॥ ध्रु० ॥ कळे सकळां हा भाव । लाहानथोरांवरी जीव ॥ १ ॥ लाभ नाहीं फुकासाठीं । कष्टाविण जीवासाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥ ३ ॥

॥ ७६८ ॥ आयुष्य गेलें वांयांविण । थोर झाली नागवण ॥ ध्रु० ॥ आतां धांवें धांवें तरी । काय पाहातोसि हरी ॥ १ ॥ माझे तुझे याचि गती । दिवस गेले तोंडीं माती ॥ २ ॥ मन वाव घेऊं नेदी । बुडवूं पाहे भवनदी ॥ ३ ॥ पडिला विषयांच्या घाला । तेणें नागविलें मला ॥ ४ ॥ शरण आलों आतां धांवें । तुका ह्मणे मज पावें ॥ ५ ॥

॥ ७६९ ॥ सोसोनि विपत्ती । जोडी दिली तुह्मी हातीं ॥ ध्रु० ॥ त्याचा हाचि उपकार । अंतीं आह्मांशीं वेव्हार ॥ १ ॥ नामरूपा केला ठाव । तुज कोण ह्मणतें देव ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । तुज ठाव दिला घरीं ॥ ३ ॥

॥ ७७० ॥ आपुलें मागतां । काय नाहीं आह्मां सत्ता ॥ ध्रु० ॥ परि या लोकलाजेकारणें । उरीं ठेविलें बोलणें ॥ १ ॥ येंचि आतां घडी । करूं बैसों तेची फडी ॥ २ ॥ तुका ह्मणे करितों तुला । ठाव नाहींसें विठ्ठला ॥ ३ ॥

॥ ७७१ ॥ असो आतां किती । तुज यावें काकुलती ॥ ध्रु० ॥ माझें प्रारब्ध हें गाढें । तूं बापुडें तयापुढें ॥ १ ॥ सोडवीन आतां । ऐसें तुह्मी पंढरीनाथा ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । तो गांढ्याचे कान पिळी ॥ ३ ॥

॥ ७७२ ॥ काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥ ध्रु० ॥ सर्वसाधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥ १ ॥ योगयागतपें । केलीं तयानें अमूपें ॥ २ ॥ तुका ह्मणे जपा । मंत्र तीअक्षरी सोपा ॥ ३ ॥

॥ ७७३ ॥ हो कां दुराचारी । वाचे नाम जो उचारी ॥ ध्रु० ॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥ १ ॥ नसो भाव चित्तीं । हरिचे गुण गातां गीतीं ॥ २ ॥ करी अनाचार वाचे हरिनामउच्चार ॥ ३ ॥ हो कां भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥ ४ ॥ ह्मणवी हरिचा दास । तुका ह्मणे धन्य त्यास ॥ ५ ॥

॥ ७७४ ॥ हाकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ ध्रु० ॥ ऐसी कृपावंत कोण ।

माझे विठाईवांचून ॥ १ ॥ करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥ २ ॥ तुका ह्मणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ३ ॥

॥ ७७५ ॥ लोह चुंबकाच्या बळें । उभें राहिलें निराळें ॥ धृ० ॥ तैसा तूंचि आह्मां-ठायीं । खेळतोसीं अंतर्बाहीं ॥ १ ॥ भक्ष अग्नीचा तो हीरा । त्यासी वांचवी मोहरा ॥ २ ॥ तुका ह्मणे आधीलपणें । नेली लांकडें चंदनें ॥ ३ ॥

॥ ७७६ ॥ डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ धृ० ॥ तरी ते नव्हति संतजन । तेथें नाहीं आत्मखूण ॥ १ ॥ मेळवूनि नरनारी । शकुन सांगती नानापरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥ ३ ॥

॥ ७७७ ॥ गाढवाचे घोडे । आह्मी करूं दृष्टीपुढें ॥ धृ० ॥ चघळी वाहाणा । माघारिया बांडा सुना ॥ १ ॥ सोंगसंपादणी । तरि करूं शुद्ध वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळ । करूं समयीं निर्मळ ॥ ३ ॥

॥ ७७८ ॥ बाईल मेली मुक्त जाली । देवें माया सोडविली ॥ धृ० ॥ विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ १ ॥ पोर मेलें बरें जालें । देवें मायाविरहित केलें ॥ २ ॥ माता मेली मज देखतां । तुका ह्मणे हरली चिंता ॥ ३ ॥

॥ ७७९ ॥ योग तप याचि नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥ धृ० ॥ करणें तें हेंचि करा । सत्यें बरा व्यापार ॥ १ ॥ तरि खंडे येरझार । निघे भार देहाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे मानामान । हें बंधन नसावें ॥ ३ ॥

॥ ७८० ॥ करी संध्यास्नान । वारी खाउनियां अन्न ॥ धृ० ॥ तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मानीं ॥ १ ॥ मजुराचें धन । विळा दोराचि जतन ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । अधीरासी देव कांहीं ॥ ३ ॥

॥ ७८१ ॥ वाखर घेउनि आलें । त्यासी तरवारेनें हालें ॥ धृ० ॥ नव्हे आपुलें उचित । करुनि टाकावें फजित ॥ १ ॥ अंगुळिया मोडी । त्यासी काय सिलें घोडीं ॥ २ ॥ नपुं-सकासाठीं । तुका ह्मणे न लगे जेठी ॥ ३ ॥

॥ ७८२ ॥ वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥ धृ० ॥ तुजला तें नाहीं ठावें । जेणें अंगेंचि ब्रह्म व्हावें ॥ १ ॥ जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दाचें पांडित्य ॥ २ ॥ गासी तान मान बंध । हाव भाव गीत छंद ॥ ३ ॥ जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ॥ ४ ॥ साधनाच्या ओढी । डोळियांच्या मोडामोडी ॥ ५ ॥ तुका ह्मणे देहीं । संत जाहले विदेही ॥ ६ ॥

॥ ७८३ ॥ प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातों हरी ॥ धृ० ॥ मनेंसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरीराया ॥ १ ॥ सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवी तैसें । आह्मी राहों त्याचे इच्छे ॥ ३ ॥

॥ ७८४ ॥ पाववील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥ धृ० ॥ त्यासी चिंतिलिया मनीं । चिंता करी गंवसणी ॥ १ ॥ पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥ २ ॥ तुका ह्मणे तईं । सिद्धि वोळगती पायीं ॥ ३ ॥

॥ ७८५ ॥ धन्य भावशीळ । ज्याचें हृदय निर्मळ ॥ धृ० ॥ पूजी प्रतिमेचे देव । संत ह्मणती तेथें भाव ॥ १ ॥ विधिनिषेध नेणती । एक निष्ठा धरुनी चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ३ ॥

॥ ७८६ ॥ आधीं च आळशी । वरी गुरूच्या उपदेशी ॥ धृ० ॥ मग त्या कैंची आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥ १ ॥ नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे ते गाढव । घेती मनासवें धांव ॥ ३ ॥

॥ ७८७ ॥ नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी ॥ धृ० ॥ माझे सखे ते सज्जन । भोळे भाविक हरिजन ॥ १ ॥ न धरिती लाज । नाहीं जनासवें काज ॥ २ ॥ तुका ह्मणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ॥ ३ ॥

॥ ७८८ ॥ टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळें पोटासाठीं ॥ धृ० ॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची ॥ १ ॥ कीर्तनाचे वेळे रडे पड लोळे । प्रेमेंविण डोळे गळताती ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे मावेचे मईंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

॥ ७८९ ॥ धन्य देहू गांव पुण्य भूमि गांव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ धृ० ॥ धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ १ ॥ कर कटी उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते माता रखुमादेवी ॥ २ ॥ गरुड पारीं उभा जोडुनियां कर । अश्वत्थ समोर उत्तरामुख ॥ ३ ॥ दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगातीर इंद्रायणी ॥ ४ ॥ लक्ष्मीनारायण बल्लाळाचें वन । तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ५ ॥ विघ्नराज द्वारीं क्षेत्रपाळ बाहेरी । हनमंत शेजारीं सहित दोघे ॥ ६ ॥ तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥ ७ ॥

## शाक्तावर.

॥ ७९० ॥ दंवकाशनि दृष्टि लावुनियां रंग । दावी झगमग डोळ्यांपुढें ॥ धृ० ॥ ह्मणती शिष्यासी लागली समाधी । लटकीचि उपाधी झकविती ॥ १ ॥ दीपाचिया ज्योती कोंडियेलें तेज । उपदेश सांजरात्रीमाजी ॥ २ ॥ रांगोळिया चौक शृंगारूनी वोजा । आवरण पूजा यंत्र करी ॥ ३ ॥ पडदा लावोनियां दीप चहूं कोनीं । बैसोनि आसनीं मुद्रा दावी ॥ ४ ॥ नैवेद्यासी ह्मणे करावें पक्वान्न । पात्रासी दिव्यान्न परवडी ॥ ५ ॥ जाला उपदेश कवळ घ्या रे मुखीं । आपोशन शेखीं बुडविलें ॥ ६ ॥ पाखांड करोनी मांडिली जीविका । बुडवी भाविकां लोकांप्रती ॥ ७ ॥ कायावाचामनें सोडवी संकल्प । गुरु गुरु जप प्रतिपादी ॥ ८ ॥ शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्व भूषणें भोग भोगी ॥ ९ ॥ विधीचा ही लोप बुडविला वेद । शास्त्रांचा ही बोध हरविला ॥ १० ॥ योगाची धारणा नाहीं प्राणायाम । सांडी यम नेम नित्यादिक ॥ ११ ॥ वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप । वाढविलें पाप मतिलंडें ॥ १२ ॥ तुका ह्मणे गेलें गुरुत्व गुख्खाडी । पूर्वजांसी धाडी नर्कवासा ॥ १३ ॥

॥ ७९१ ॥ शाक्त गधडा जये देशीं । तेथें राशी पापाच्या ॥ धृ० ॥ सुकृताचा उदो केला । गोंधळ घाला इंद्रियें ॥ १ ॥ क्रोधरूपें वसे काम । तीचें नाम जपतसे ॥ २ ॥ मद्यभक्षण मागिणजाती । विटाळ चित्तीं सांठविला ॥ ३ ॥ स्तवुनियां पूजी रांड । न लजे भांडा शाढीसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे भगवती । नेइल अंतीं आपणापें ॥ ५ ॥

॥ ७९२ ॥ राजा प्रजा द्वाड देश । शाक्त वास करिती तो ॥ धृ० ॥ अधर्माचें उबड पीक । धर्म रंक त्या गांवीं ॥ १ ॥ न पिके भूमि कांपे भारें । मेघ वारें पीतील ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघीं दुःखें । येती सुखें वस्तीसी ॥ ३ ॥

॥ ७९३ ॥ ऐसें कलियुगाच्या मुळें । जालें धर्माचें वाटोळें ॥ धृ० ॥ सांडुनियां राम-राम । ब्राह्मण ह्मणती दोमदोम ॥ १ ॥ शिवों नये तीं निळीं । वस्त्रें पांघरती काळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वृत्ती । सांडुनी गदा मागत जाती ॥ ३ ॥

॥ ७९४ ॥ अवघ्या पापें घडला एक । उपासक शक्तीचा ॥ धृ० ॥ त्याचा विटाळ नको अंगा । पांडुरंगा माझिया ॥ १ ॥ काम क्रोध मद्य अंगीं । रंगला रंगीं अवगुणी ॥ २ ॥ करितां पाप न धरी शंका । ह्मणे तुका कोणी ही ॥ ३ ॥

॥ ७९५ ॥ वारितां बळें धरितां हातीं । जुलुमें जाती नरकामधीं ॥ धृ० ॥ रंडीदासा-प्रति कांहीं । उपदेश तोही चालेना ॥ १ ॥ जन्म केला वाताहात । थोर घात येठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरीनाथा । तुझी कथा दूषिती ॥ ३ ॥

॥ ७९६ ॥ शाक्तांची शूकरी माय । विष्ठा खाय बिदीची ॥ धृ० ॥ तिची त्या पडली सवे । मागें धांवे ह्मणोनी ॥ १ ॥ शाक्तांचा वाढवी माय । भुंकत जाय वेसदारा ॥ २ ॥ तुका ह्मणे शिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥ ३ ॥

॥ ७९७ ॥ हरिहर सांडुनि देव । धरिती भाव क्षुल्लकीं ॥ धृ० ॥ ऐका त्यांची विटं-बणा । देवपणा भक्तांची ॥ १ ॥ अंगीं कवडे घाली गळां । परडी कळाहीन हातीं ॥ २ ॥ गळां गांठा हिंडे दारीं । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ ३ ॥ माथां सेंदुर दांत खाती । जेंगट हातीं सटवीचें ॥ ४ ॥ पूजिती विकट दोंद । पशु सोंड गजाची ॥ ५ ॥ ऐशा छंदें चुकलीं वाटा । भाव खोटा भजन ॥ ६ ॥ तुका ह्मणे विष्णुशिवा । वांचुनि के[...] भजती ते ॥ ७ ॥

॥ ७९८ ॥ कांद्यासाठीं जालें ज्ञान । तेणें जन नाडिलें ॥ धृ० ॥ कामक्रोध बुचबु[...] भुंके पुची व्यालीची ॥ १ ॥ पूजेलागीं द्रव्य मागें । काय सांगे शिष्यातें ॥ २ ॥ तुक[ा] ह्मणे कैंचें ब्रह्म । अवघा भ्रम विषयांचा ॥ ३ ॥

॥ ७९९ ॥ सांडुनियां पंढरीराव । कवणातें ह्मणों देव ॥ धृ० ॥ बहु लाज वाटे चित्ता । आणिकांतें देव ह्मणतां ॥ १ ॥ सांडूनिया हिरा । कोणें वेचाव्या त्या गारा ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिहर । ऐसी सांडूनियां धुर ॥ ३ ॥

॥ ८०० ॥ बहुतें गेलीं वांयां । न भजतां पंढरीराया ॥ धृ० ॥ करिती कामिकांची सेवा । लागोन मागोन खात्या देवा ॥ १ ॥ अवघियांचा धनी । त्यासी गेलीं विसरोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । पडती यमाचिया हातीं ॥ ३ ॥

॥ ८०१ ॥ असो आतां ऐसा धंदा । तुज गोविंदा आठवूं ॥ धृ० ॥ रक्षिता तूं होसी जरी । तरि काय येरीं करावें ॥ १ ॥ काया वाचा मन पायीं । राहे ठायीं करूं तें ॥ २ ॥ तुका ह्मणे गाइन गीतीं । रूप चित्तीं धरूनियां ॥ ३ ॥

॥ ८०२ ॥ नाहीं आह्मी विष्णुदास । करीत आस कोणांची ॥ धृ० ॥ कां हे नष्ट करिती निंदा । नेणों सदा आमुची ॥ १ ॥ असों भलतें ठायीं मनें ॥ समाधानें आपुलियां ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं देवा । तुझी सेवा धंदा तो ॥ ३ ॥

॥ ८०३ ॥ पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ॥ धृ० ॥ कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपुलें भिकारी अर्थ नेणें ॥ १ ॥ नकळे तें मज पुसती छळुनी । लागतां चरणीं न सोडिती ॥ २ ॥ तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वांठायीं एक मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे खीळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडा वादकांशीं ॥ ४ ॥

॥ ८०४ ॥ कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशळ हे भांड बहू जाले ॥ धृ० ॥ द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें बडबडी । कोरडाची ॥ १ ॥ दंभ करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥ २ ॥ वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । नव्हती अलिप्त देहाहुनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे दंड साहील यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ॥ ४ ॥

॥ ८०५ ॥ विषयाचें सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥ धृ० ॥ मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ॥ १ ॥ असिपत्रीं तरुवरखैराचे इंगळ । निघतील ज्वाळ तेलपाकीं ॥ २ ॥ तप्तभूमीवरि लोळविती पाहीं । अग्निस्तंभ बाहीं कवळविती ॥ ३ ॥ ह्मणऊनि तुका येतो काकुलती । पुरे आतां याती गर्भवास ॥ ४ ॥

॥ ८०६ ॥ अल्प माझी मती । ह्मणोनि येतों काकुलती ॥ धृ० ॥ आतां दाखवा दाखवा । मज पाऊलें केशवा ॥ १ ॥ धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे दया । मज करा अभागिया ॥ ३ ॥

॥ ८०७ ॥ वाट्ठली पाहातां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं वो डोळां ॥ धृ० ॥ तूं माय माउली कृपेची साउली । विठ्ठलें पाहिली वास तुझी ॥ १ ॥ तुका ह्मणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥ २ ॥

॥ ८०८ ॥ देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥ धृ० ॥ ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥ १ ॥ यजन याजन तप व्रतें करिती । विकल्पें नागवती शुद्ध पुण्या ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकूनियां ॥ ३ ॥

॥ ८०९ ॥ तुझें वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुति मौन्यपणें ॥ धृ० ॥ मौन्यपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरि रूप आहे ॥ १ ॥ रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हे झकवे ब्रह्मादिक ॥ २ ॥ ब्रह्मादिकां देवा कर्माची कचाटी । ह्मणोनि

आटाटी फार त्यांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझें गुण नाम रूप । आहेसी अनुप वाणूं काई ॥ ४ ॥

॥ ८१० ॥ मनवाचातीत तुझें हें स्वरूप । ह्मणोनियां माप भक्ति केलें ॥ धृ० ॥ भक्तीचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्वता न मोजवे ॥ १ ॥ योग याग तपें देहाचिया योगें । ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी केशवा करितों ऐसी ॥ ३ ॥

॥ ८११ ॥ देवा ऐसा शिष्य देई । ब्रह्मज्ञानी निपुण पाहीं ॥ धृ० ॥ जो कां भावाचा आगळा । भक्तिप्रेमाचा पुतळा ॥ १ ॥ ऐशा युक्ति ज्याला बाणे । तेथें वैराग्याचें ठाणें ॥ २ ॥ ऐसा जाला हो शरीरी । तुका लिंबलोण करी ॥ ३ ॥

॥ ८१२ ॥ जंववरी नाहीं देखिली पंढरी । तोंवरी वर्णिसी थोरी वैकुंठीची ॥ धृ० ॥ मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनि कामारी दीनरूप ॥ १ ॥ वृंदावन सडे चौक रंग माळा । अभिनव सोहोळा घरोघरीं ॥ २ ॥ नामघोष कथापुराणकीर्तनीं । ओंविया कांडणीं पांडुरंग ॥ ३ ॥ सर्व सुख तेथें असें सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥ ४ ॥ तुका ह्मणे जें न साधे सायासें । तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरी ॥ ५ ॥

॥ ८१३ ॥ दुःख वाटे ऐसी ऐकों नये गोष्टी । जेणें घडे तुटी तुझ्या पायीं ॥ धृ० ॥ येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजित नाइकती ॥ १ ॥ काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ती । दंडूनि पुढती वाटे लावूं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज दावूं नको ऐसें । दृष्टीपुढें पिसें पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ८१४ ॥ सूकरासी विष्ठा माने सावकास । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥ धृ० ॥ तेवीं अभक्तांसी आवडे पाखांड । नलगे त्यां गोड परमार्थ ॥ १ ॥ श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्पा पाजिलिया क्षीर । वमितां विखार विष जालें ॥ ३ ॥

॥ ८१५ ॥ रासभ धुतला महा तीर्थामाजी । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥ धृ० ॥ तेवीं खळा काय केला उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥ १ ॥ सर्पासी पाजिलें शर्करा-पीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे श्वाना क्षिरीचें भोजन । सवेंचि वमन जेवीं तया ॥ ३ ॥

॥ ८१६ ॥ जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषातुल्य ॥ धृ० ॥ तेवीं परमार्थ जीहीं दुराविला । तयालागीं झाला सन्निपात ॥ १ ॥ कामिनी जयाच्या जाहाली नेत्रासी । देखी तो चंद्रासी पीतवर्ण ॥ २ ॥ तुका ह्मणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ३ ॥

॥ ८१७ ॥ आतां असों मना अभक्तांची कथा । न होई दुश्चिता हरिनामीं ॥ धृ० ॥ नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नांवें ॥ १ ॥ प्रभातें न घ्यावें नांव माकडाचें । तैसें अभक्ताचें सर्वकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आठवूं मंगळ । जेणें सर्व काळ सुखरूप ॥ ३ ॥

॥ ८१८ ॥ नाम आठवितां सद्गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥ धृ० ॥ रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांगही गात्रीं प्रेम तुझें ॥ १ ॥ सर्वही शरीर वेचो या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वथा विश्रांति संतांपाईं ॥ ३ ॥

॥ ८१९ ॥ जननी हें जाणें बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ धृ० ॥ अंधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तोचि जाणें ॥ १ ॥ शरणागता जेणें घातलें पाठीशीं । तो जाणें तविशीं राखों तया ॥ २ ॥ कासे लागे तया न लगती सायास । पोहोणारा त्यास पार पावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव विठ्ठलाचे हातीं । दिला त्याची गति तोचि जाणें ॥ ४ ॥

॥ ८२० ॥ नका वाटूं मन विधिनिषेधांसी । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥ धृ० ॥ खाव-लिया अन्ना मासी बोलों नये । अवघेंचि जाये एका घांसे ॥ १ ॥ जोडी हात परी ते बहु कठिण । करितां जतन सांभाळावें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें न मना विषाद । निर्बंधिण व्याध तुटों नये ॥ ३ ॥

॥ ८२१ ॥ नको होऊं देऊं भावीं अभावना । याचि नांवें जाणा बहु दोष ॥ धृ० ॥ मेघवृष्टि येथें होते अनिवार । जिव्हाळ्या उखर लाभ नाड ॥ १ ॥ उत्तम विभागें कनि-ष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें बहु थोडें आहे । आपुलियां पाहें पुढें बरें ॥ ३ ॥

॥ ८२२ ॥ त्याग तंव मज न वदतां केला । कांहींच विठ्ठला मनांतुनी ॥ धृ० ॥ भागलिया आला उबग सहज । न धरितां काज जालें मनीं ॥ १ ॥ देह जड जालें ऋणाच्या आभारें । केलें संवसारें कासावीस ॥ २ ॥ तुका ह्मणे गेला आळसविळस । अकर्तव्य दोष निवारले ॥ ३ ॥

॥ ८२३ ॥ मढें झांकूनियां करिती पेरणी । कुणबियाचे वाणी लवलाहें ॥ धृ० ॥ तयापरी करीं स्वहित आपुलें । जयासी फावलें नरदेह ॥ १ ॥ ओटीच्या परिस मुठीचें तें वाढे । यापरि केवाडें स्वहिताचें ॥ २ ॥ नाहीं काळ सत्ता आपुलिये हातीं । जाणते हे गुंती उगविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहें आपुली सूचना । करितो शहाणा मृत्युलोकीं ॥ ४ ॥

॥ ८२४ ॥ राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥ धृ० ॥ कोणी कोणा एथें न मनी जी फुका । कृपेविण एका स्वामीचिया ॥ १ ॥ शृंगारिलें नाहीं तगोंयेत वरी । उमटे लौकरि जैसें तैसें ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं वसे नारायण । कृपेची ते खूण साम्या येते ॥ ३ ॥

॥ ८२५ ॥ वत्स पळे धेनु धांवे पाठीलागीं । प्रीतीचा तो अंगीं आविर्भाव ॥ धृ० ॥ शिकविलें काय येईल कारणा । सूत्र ओढी मना आणिकाच्या ॥ १ ॥ सांडिलें तें नाहीं घेत मेळवितां । ह्मणऊनि लाता मागें सारी ॥ २ ॥ तुका ह्मणे आग्रह करावा न लगे । सांगतसे अंगें अनुभव ॥ ३ ॥

॥ ८२६ ॥ देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें । सूत्र ओढे दोरें एकाएक ॥ धृ० ॥

आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं देखें सामावलें ॥ १ ॥ आणिकांचें सुख दुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यायें ॥ २ ॥ तुका ह्मणे ठसावलें शुद्ध जाती । शोभाचि पुढती विशेषता ॥ ३ ॥

॥ ८२७ ॥ अवघा वेंचलों इंद्रियांचे ओढीं । जालें तें तें घडी निरोपिलें ॥ धृ० ॥ असावा जी ठावा सेवेसी विचार । आपुला म्यां भार उतरिला ॥ १ ॥ कायावाच्यामनें तोचि निजध्यास । एथें जालों ओस भक्तिभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं येईल धांवणें । तरि नारायणें सांभाळावें ॥ ३ ॥

॥ ८२८ ॥ राहो आतां हेंचि ध्यान । डोळां मन लंपटो ॥ धृ० ॥ कोंडकोंडुनी धरिन जीवें । देहभावें ओंवाळीन ॥ १ ॥ होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे गोजिरिया । विठोबा पायां पडों द्या ॥ ३ ॥

॥ ८२९ ॥ आदि मध्य अंत दाखविला दीपें । हा तों आपणापें यत्न बरा ॥ धृ० ॥ दासत्वें दाविलें धन्याचें भांडार । तों तों नव्हे सार एथूनियां ॥ १ ॥ उपायानें सोस नासला सकळ । सत्ते सत्ताबळें अंगा आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे दृष्टि सकळांचे शिरीं । वचनन्वि करी बैसोनिया ॥ ३ ॥

॥ ८३० ॥ सांठविलें वाण । पैस घातला दुकान ॥ धृ० ॥ जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्धचि जवळी ॥ १ ॥ निवडिलें साचें । उत्तममध्यमकनिष्ठाचें ॥ २ ॥ तुका बैसला दुकानीं । दावी मोला ऐसी वाणी ॥ ३ ॥

॥ ८३१ ॥ लागलिया सुख स्तनां । घाली पान्हा माउली ॥ धृ० ॥ उभयतां आवडी लाडें । कोडें कोड पुरतसे ॥ १ ॥ मेळवितां अंगें अंग । प्रेमें रंग वाढतो ॥ २ ॥ तुका ह्मणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे ॥ ३ ॥

॥ ८३२ ॥ अवगुण तों कोणीं नाहीं प्रतिष्ठिलें । मार्गें होत आले शिष्टाचार ॥ धृ० ॥ दुर्बळाच्या नांवें पिटावा डांगोरा । हा तों नव्हे बरा सत्यवाद ॥ १ ॥ मद्य आणि मधु एकरासी नांवें । तरी कां तें खावें आधारें त्या ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद दृष्टिन्यायें ॥ ३ ॥

॥ ८३३ ॥ भूतीं भगवंत हा तो जाणतों संकेत ॥ धृ० ॥ भारी मोकलितों बाण । ज्याचा त्यासी कळे गुण ॥ १ ॥ करावा उपदेश । निवडोनी तरि दोष ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे । चुकतां आडरानें कांटे ॥ ३ ॥

॥ ८३४ ॥ आह्मां हें कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ॥ धृ० ॥ कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ॥ १ ॥ अविद्येच्या येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे बाण ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्या परी ॥ ३ ॥

॥ ८३५ ॥ दर्पणासी नकटें लाजे । शुद्ध खिजे देखोनी ॥ धृ० ॥ ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसे सुदें विपरीत ॥ १ ॥ अंधळयास काय हिरा । गारांचि तो सारिखा ॥ २ ॥ तुका ह्मणे भुंके सुनें । ठाया नेणें ठाव तो ॥ ३ ॥

॥ ८३६ ॥ नावडे तरि कां येतील हे भांड। घेऊनियां तोंड काळें एथें ॥ धृ० ॥ नासोनियां जाय रस या संगती। खळाचे पंगती नारायणा ॥ १ ॥ तोंडावाटा नक्र काढी अमंगळ। मिष्टान्ना विटाळ करी सुनें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं संतांची मर्यादा। निंदे तोंचि निंदा मायझवा ॥ ३ ॥

॥ ८३७ ॥ लेंकारा आईतें पित्याची जतन। दावी निजधन सर्व जोडी ॥ धृ० ॥ त्यापरि आमचा जालासे सांभाळ। देखिलाचि काळ नाहीं आड ॥ १ ॥ भुकेचें संनिध वसे स्तनपान। उपायाची भिन्न चिंता नाहीं ॥ २ ॥ आळवूनि तुका उभा पैलथडी। घातली या उडी पांडुरंगें ॥ ३ ॥

॥ ८३८ ॥ शुद्ध चर्या हेंचि संताचें पूजन। लागतचि धन नाहीं वित्त ॥ धृ० ॥ सगुणाचे सोई सगुण विश्रांती। आपणचि येती चोजवीत ॥ १ ॥ कीर्तनींचि वोळे कृपेचा वोरस। दुरीपणें वास संनिधता ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म सांगतों सवंगें। मन लावा लागें स्वहित च्या ॥ ३ ॥

॥ ८३९ ॥ जीवींचें जाणावें या नांवें आवडी। हेकड तें ओढी अमंगळ ॥ धृ० ॥ चित्ताच्या संकोचें कांहींच न घडे। अतिशयें वेडेचार तेचि ॥ १ ॥ काळाविण कांहीं नाहीं रुचों येत। करूनि संकेत ठेवियेला ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे वचनें चांचणी। काय बोलवूनि वेळोवेळां ॥ ३ ॥

॥ ८४० ॥ कामातुर चवी सांडी। बरळ तोंडीं बरळे ॥ धृ० ॥ रंगलें तें अंगीं दावी। विष देववी आसडे ॥ १ ॥ धनसोसें लागे वेड। ते बडबड शमेना ॥ २ ॥ तुका ह्मणे वेसनें दोन्ही। नर्कखाणी भोगावया ॥ ३ ॥

॥ ८४१ ॥ कृष्णांजनें जालें सोज्ज्वळ लोचन। तेणें दिलें वान निवडुनी ॥ धृ० ॥ निरोपाच्या मापें करी लडबड। त्याचें त्यानें गोड नारायणें ॥ १ ॥ भाग्यवंताघरीं करितां विश्वासें। कार्य त्यासरिसें होईजेतें ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट भरे बरेवोजा। निज ठाव निजा निजस्थानीं ॥ ३ ॥

॥ ८४२ ॥ मैंद आला पंढरीस। हातीं घेऊनि प्रेमपाश ॥ धृ० ॥ पुढें नाडियलें जग। नेतों लागों नेदी माग ॥ १ ॥ उभारोनी बाहे। दृष्टावृष्टि वेधीताहे ॥ २ ॥ वैकुंठीहुनि पेणें। केलें पंढरीकारणें ॥ ३ ॥ पुंडलिकें थारा। देउनि आणिलें या चोरा ॥ ४ ॥ तुका ह्मणे चला। तुह्मी आह्मी धरूं त्याला ॥ ५ ॥

॥ ८४३ ॥ भांडवी माउली कवतुकें बाळा। आपणा सकळां साक्षित्वेसीं ॥ धृ० ॥ माझी माझी ह्मणे एकएकां मारी। हें तों नाहीं दुरी उभयतां ॥ १ ॥ तुझें थोडें भातें माझें बहु फार। छंद करकर वाद मिथ्या ॥ २ ॥ तुका ह्मणे एके ठायीं आहे वर्म। हेंचि होय श्रम निवारितें ॥ ३ ॥

॥ ८४४ ॥ लटकियाची आशा। होतों पडिलों वळसा। होऊनियां दोषा। पात्र मिथ्या अभिमानें ॥ धृ० ॥ बरवी उघडली दृष्टी। नाहीं तरी होतों कष्टी। आक्रंदते सृष्टी। मात्र या चेष्टांनीं ॥ १ ॥ मरणाची नाहीं शुद्धी। लोभीं प्रवर्तली बुद्धी। परती तों कधीं।

घडेचि ना माघारीं ॥ २ ॥ सांचूनि मरे धन । लावी पोरांसी भांडण । नाहीं नारायण । तुका ह्मणे स्मरीला ॥ ३ ॥

॥ ८४५ ॥ जवळी सुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं ॥ धृ० ॥ भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नासीं काम ॥ १ ॥ सुखाचें शेजार । करूं कां नावडे घर ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवा । कां हा न करीचि बरवा ॥ ३ ॥

॥ ८४६ ॥ बरवें देशावर जालें । काय बोलें बोलावें ॥ धृ० ॥ लाभें लाभ दुणावला । जीव धाला दर्शनें ॥ १ ॥ भाग्यें जाली संतभेटी । आवडी पोटीं होती ते ॥ २ ॥ तुका ह्मणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ३ ॥

॥ ८४७ ॥ सांगतां हें नये सुख । कीर्ति मुख न पुरे ॥ धृ० ॥ आवडीनें सेवन करूं । जीवींचें धरूं जीवींच ॥ १ ॥ उपमा या देतां लाभा । काशा शोभा सारिखीं ॥ २ ॥ तुका ह्मणे नुचलीं डोई । ठेविली पायीं संतांचे ॥ ३ ॥

॥ ८४८ ॥ आपुलाला लाहो करूं । केणें भरूं हा विठ्ठल ॥ धृ० ॥ भाग्य पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥ १ ॥ पुढती कोठें घडे ऐसें । बहुतां दिसें फावलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली जोडी । चरण घडी न विसंबें ॥ ३ ॥

॥ ८४९ ॥ उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ धृ० ॥ संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ १ ॥ संपुष्ट हा हृदयपेटीं । करूनि पोटीं सांठवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ३ ॥

॥ ८५० ॥ आह्मां आपुलें नावडे संचित । परफडे चित्त कळवळयानें ॥ धृ० ॥ न कळतां जाला खोळंब मारगा । जगीं जालों जगा बहुरूपी ॥ १ ॥ कळों आलें बरें उघडलें डोळे । कर्णधार मिळे तरि बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हाल ऐकत करुणा । तरि नारायणा उडी घाला ॥ ३ ॥

॥ ८५१ ॥ बरगासाटीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ॥ धृ० ॥ फजित तो केला लाहे । ताडण साहे गौरव ॥ १ ॥ ओढाळाची ओंगळ ओढी । उगी खोडी नवजाय ॥ २ ॥ तुका फजित करी बुच्या । विसरे कुच्या खोडी तेणें ॥ ३ ॥

॥ ८५२ ॥ धांव घालीं आई । आतां पाहातेसी काई ॥ धृ० ॥ धीर नाहीं माझे पोटीं । जालें वियोगें हिंपुटी ॥ १ ॥ करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥ २ ॥ तुका ह्मणे डोई । कधीं ठेवीन हे पायीं ॥ ३ ॥

॥ ८५३ ॥ तुह्मां ठावा होता देवा । माझे अंतरींचा हेवा ॥ धृ० ॥ होती कायानें सुटका । तरि हे वैकुंठनायका ॥ १ ॥ नसते सांभाळिलें । जरि तुह्मी आश्वासिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपाळुवा । बरवा केला सावाधावा ॥ ३ ॥

॥ ८५४ ॥ देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥ धृ० ॥ पाहातां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ॥ १ ॥ आरुष हे वाणी । गोड करुनी घेतां कानीं ॥ २ ॥ आवडीनें खेळे । तुका पुरवावे सोहाळे ॥ ३ ॥

॥ ८५५ ॥ दर्शनाची आस । आतां न साहे उदास ॥ धृ० ॥ जीव आला पायांपाशीं ।

येथें असें कलिवेरेंसीं ॥ १ ॥ कांहींच नाठवे । ठायीं बैसलें तुटवे ॥ २ ॥ जीव असतां पाहीं । तुका ठकावला ठायीं ॥ ३ ॥

॥ ८५६ ॥ भोगावरि आह्मीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ धृ० ॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाठीं बळा येऊं आतां ॥ १ ॥ काय सांडूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरी काय ठेवूं ॥ २ ॥ केला तरि डोरे वाचेचि कोरडा । बळें द्यावी पीडा स्वमीची ॥ ३ ॥ आवघेंचि वाण आलें तुह्मां घरा । नव्हती मजुरा राजकीर्दी ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाटा ॥ ५ ॥

॥ ८५७ ॥ कां हो एथें काळ आला आह्मां आड । न कां नारायणा नाड करावया ॥ धृ० ॥ कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ॥ १ ॥ कां हो उपजेना द्यावी ऐसी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ॥ २ ॥ पाप काय किंवा जालासी दुर्बळ । मागिल तें बळ नाहीं आतां ॥ ३ ॥ काय जालें देवे निघालें दिवाळें । कीं बांधलासि बळें ऋणेंपायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे कां रे ऐसी केली गोवी । तुझी माझी ठेवी निवडूनियां ॥ ५ ॥

॥ ८५८ ॥ काय देह घालूं करवती कर्मरी । टाकूं या भीतरी अग्निमाजी ॥ धृ० ॥ काय सेवूं वन सीत उष्ण तान । साहों कीं मोहन धरुनी बैसों ॥ १ ॥ काय लावूं अंगीं भस्म उधळण । हिंडूं देश कोण खुंटे चारी ॥ २ ॥ काय त्यजूं अन्न करूनि उपास । काय करूं नास जीवित्वाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय करावा उपाव । एका मनें भाव पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ८५९ ॥ दंभें कीर्ति पोट भरे मानी जन । स्वहित कारण नव्हे कांहीं ॥ धृ० ॥ अंतरती तुझे पाय मज दुरी । धरितां हे थोरी जाणिवेची ॥ १ ॥ पिंडाच्या पाळणें धांवती विकार । मज दावेदार मजमाजी ॥ २ ॥ कैसा करूं घात आपुला आपण । धरूनि गुमान लोकलाज ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज दावी तो सोहळा । देखे पाय डोळां करीं सेवा ॥ ४ ॥

॥ ८६० ॥ धिग जिणें त्याचा स्वामी हीन वर । मरण तें बर अशा जना ॥ धृ० ॥ आइका जी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥ १ ॥ स्वामीच्या धाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें परि भलें ॥ २ ॥ तुका ह्मणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनि अंतर ओळखावें ॥ ३ ॥

॥ ८६१ ॥ आतां गाऊं तुज ओविया मंगळीं । करूं गदारोळी हरिकथा ॥ धृ० ॥ होसी निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥ १ ॥ भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होऊनि राहो ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी वाढवीं लेंकुरें । न राहों अंतरें पायांविण ॥ ३ ॥

॥ ८६२ ॥ सर्व सुखें आजी एथेंचि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥ धृ० ॥ सर्वकाळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥ १ ॥ तुका ह्मणे वाचा राहिली कुंठित । पुढें जालें चित्त समाधान ॥ २ ॥

॥ ८६३ ॥ विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल या चित्तीं बैसलासे ॥ धृ० ॥

विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया । विठ्ठल हे छाया माझी मज ॥ १ ॥ बैसला विठ्ठल जिव्हे-चिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥ २ ॥ सकळां इंद्रियां मन एक प्रधान । तेंही करी ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे या विठ्ठलासी आतां । नये विसंबतां माझें मज ॥ ४ ॥

॥ ८६४ ॥ होय वारकरी । पाहें पाहें रे पंढरी ॥ धृ० ॥ काय करावीं साधनें । फळ अवघेंचि तेणें ॥ १ ॥ अभिमान नुरे । कोड अवघेंचि पुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे डोळां । विठो बैसला सांवळा ॥ ३ ॥

॥ ८६५ ॥ पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥ धृ० ॥ अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ॥ १ ॥ न लगे धन मान । देहभावें उदासीन ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । नासी तात्काळ तें स्थळ ॥ ३ ॥

॥ ८६६ ॥ बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं जाला त्याग अंतरींचा ॥ धृ० ॥ ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मनासी हा ठावा समाचार ॥ १ ॥ जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं । जातों विसरुनि सकळ हें ॥ २ ॥ प्रपंचाबाहेरी नाहीं आलें चित्त । केले करी नित्य वेवसाय ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज भोरप्याचि परी । जालें सोंग वरी आंत तैसें ॥ ४ ॥

॥ ८६७ ॥ ह्मणवितों दास ते नाहीं करणी ॥ आंत वरी दोन्ही भिन्न भाव ॥ धृ० ॥ गातों नाचतों तें दाखवितों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥ १ ॥ पाविजे तें वर्म न कळेचि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥ २ ॥ भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांयां ऐसा दिसें । होईल या हांसें लौकिकाचें ॥ ४ ॥

॥ ८६८ ॥ न कळतां काय करावा उपाय । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥ धृ० ॥ येऊनियां वास करिसी हृदयीं । ऐसें घडे कई कासयानें ॥ १ ॥ साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कैं गा देवा ॥ २ ॥ लटिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येऊनि राहें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडु-रंगा ॥ ४ ॥

॥ ८६९ ॥ चिंतिलें तें मनिंचें जाणें । पुरवी खुणे अंतरींचें ॥ धृ० ॥ रात्री न कळे दिवस न कळे । अंगीं खेळे दैवत हें ॥ १ ॥ नवासियाचे नव रस । भोगी त्यास भिन्न नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे समचि देणें । समचरण उभा असे ॥ ३ ॥

॥ ८७० ॥ उद्धाराचा संदेह नाहीं । याचा कांहीं सेवकां ॥ धृ० ॥ पांडुरंग अभि-मानी । जीवदानी कोंवसा ॥ १ ॥ बुडतां जळीं जळतां अग्नीं । ते प्रसंगीं राखावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मांसाटीं । कृपा पोटीं वागवी ॥ ३ ॥

॥ ८७१ ॥ काय विरक्ति कळे आह्मां । जाणों एका नामा विठोबाच्या ॥ धृ० ॥ नाचों सुखें वैष्णवमेळीं । टाळघोळीं आनंदें ॥ १ ॥ शांति क्षमा दया मी काय जाणें । गोविंद कीर्तनेंवांचूनियां ॥ २ ॥ कासया उदास असों देहावरी । अमृतसागरीं बुडो-

नियां ॥ ३ ॥ कासया एकांत सेवूं तया वना । आनंद तो जनामाजी असे ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मां ऐसा भरवसा । विठ्ठल सरसा चालतसे ॥ ५ ॥

॥ ८७२ ॥ जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमि पुण्य देश ॥ धृ० ॥ दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे यमापाशीं ॥ १ ॥ गरुडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥ २ ॥ सहज तयां जनां छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ ३ ॥ तुळसी वनें रंगमाळा । अवघा वैकुंठसोहळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे भेणें । काळ नये तेणें राणें ॥ ५ ॥

॥ ८७३ ॥ माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरू ॥ धृ० ॥ पढियें देहभावें पुरवितो वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥ १ ॥ मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥ २ ॥ योगक्षेम त्याचें जाणें जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणीं विचारुनी ॥ ४ ॥

॥ ८७४ ॥ सकळ धर्म मज विठोबाचें नाम । आणिक तें वर्म नेणें कांहीं ॥ धृ० ॥ काय जाणों संतां निरविलें देवें । करिती या भावें कृपा मज ॥ १ ॥ तुका ह्मणे माझा कोण अधिकार । तो मज विचार कळों यावा ॥ २ ॥

॥ ८७५ ॥ उदंड शाहाणे होत तर्कवंत । परि या नेणवे अंत विठोबाचा ॥ धृ० ॥ उदंडा अक्षरां करोत भरोवरी । परि तें नेणवे थोरी विठोबाची ॥ १ ॥ तुका ह्मणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते शिण रितें माप ॥ २ ॥

॥ ८७६ ॥ आधारावांचुनी । काय सांगसी काहाणी ॥ धृ० ॥ ठावा नाहीं पंढरीराव । तोंवरी अवघेंचि वाव ॥ १ ॥ मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवा । जाणपण एक सवा ॥ ३ ॥

॥ ८७७ ॥ अनाथांची तुह्मां दया । पंढरीराया येतसे ॥ धृ० ॥ ऐसी ऐकोनियां कीर्ती । बहु विश्रांति पावलों ॥ १ ॥ अनाथांच्या धांवा घरा । नामें करा कुडावा ॥ २ ॥ तुका ह्मणे सवघड हित । ठेवूं चित्त पायांपें ॥ ३ ॥

॥ ८७८ ॥ येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥ धृ० ॥ विषयांचे झणी व्हाल लोलिंगत । चेवलिया अंत न लगे मज ॥ १ ॥ वाहोनियां भार कुंथशील ओझें । तेंचि माझें थीता त्याग ॥ २ ॥ तुका ह्मणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥ ३ ॥

॥ ८७९ ॥ हींच त्यांचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥ धृ० ॥ कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ॥ १ ॥ हाच काळ वर्तमान । साधन ही संपत्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे दिवसरातीं । हेंचि खाती अन्न ते ॥ ३ ॥

॥ ८८० ॥ दीप न देखे अंधारा । आतां हेंचि करा जतन ॥ धृ० ॥ नारायण नारायण । गांठीं धन बळकट ॥ १ ॥ चिंतामणीपाशीं चिंता । तत्वता ही नयेल ॥ २ ॥ तुका ह्मणे उभयलोकीं । हेंचि निकी सामग्री ॥ ३ ॥

॥ ८८१ ॥ धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिली तो ॥ धृ० ॥ संदेहाची सुटली

गांठी । जालें पोटीं शीतळ ॥ १ ॥ भवनदीचा जाला तारा । या उत्तरा प्रसादें ॥ २ ॥ तुका ह्मणे मंगळ आतां । कोण दाता याहुनी ॥ ३ ॥

॥ ८८२ ॥ दिनरजनीं हाचि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥ धृ० ॥ संकल्पिला देह देवा । सकळ हेवा तयेठायीं ॥ १ ॥ नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रियां ॥ २ ॥ कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥ ३ ॥

॥ ८८३ ॥ खरें नानवट निक्षेपींचें जुनें । काढिलें ठेवणें समर्थाचें ॥ धृ० ॥ मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥ १ ॥ कुलालाच्या हातें घटाच्या उत्पत्ती । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवन तें नारायणीं । प्रभा जाते किरणीं प्रकाशाची ॥ ३ ॥

॥ ८८४ ॥ गंगेचिया अंताविण काय चाड । आपुलें तें कोड तृषेपाशीं ॥ धृ० ॥ विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर । घालीं निरंतर हृदयपुटीं ॥ १ ॥ कारण तें असे नवनीता-पाशीं । गबाळ तें सोसी इतर कोण ॥ २ ॥ बाळाचे सोईतें पांस घाली माता । अट्टाहास चिंता नाहीं तया ॥ ३ ॥ गाऊं नाचों करूं आनंदसोहळा । भावचि आगळा नाहीं हाता ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघें जालें एकमय । परलोकींची काय चाड आतां ॥ ५ ॥

॥ ८८५ ॥ स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥ धृ० ॥ आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥ १ ॥ त्यजुनियां आड ठाके लोक-लाज । तें हें दिसे काज अंतरलें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां जेथें जेथें गोवा । तेथें तुह्मी सेवा सांभाळावें ॥ ३ ॥

॥ ८८६ ॥ पडिलों भोंवनी । होतों बहु चिंतवनी ॥ धृ० ॥ होतां चुकलों मारग । लाहो केला लाग वेगें ॥ १ ॥ इंद्रियांचें संदीं । होतों सांपडलों बंदीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें जालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥ ३ ॥

॥ ८८७ ॥ बरें जालें आलीं ज्याचीं त्याच्या घरा । चुकला पान्हेरा ओढाळांचा ॥ धृ० ॥ बहु केलें दुःखी त्यांचिया सांभाळें । आतां तोंड काळें तेणें लोभें ॥ १ ॥ त्यांचिया अन्यायें भोगा माझें अंग । सकळही लाग द्यावा लागे ॥ २ ॥ नाहीं कोठें स्थिर राहों दिलें क्षण । आजिवरी सिण पावलों तों ॥ ३ ॥ वेगळाल्या खोडी केली तडातडी । सांगावया घडी नाहीं सुख ॥ ४ ॥ निरवूनि तुका चालिला गोवारें । देवापाशीं भार सांडवुनी ॥ ५ ॥

॥ ८८८ ॥ न करावी आतां पोटासाटीं चिंता । आहे त्या संचिता माप लागे ॥ धृ० ॥ दृष्टि ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लक उपायीं शिण जाला ॥ १ ॥ येथें तंव नाहीं घेइजेसें सवें । कांहीं नये जीवें वेचों मिथ्या ॥ २ ॥ खंडणेंचि नव्हे उद्वेग वेरझारी । बापुडें संसारीं सदा असों ॥ ३ ॥ शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां सकळांचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ॥ ५ ॥

॥ ८८९ ॥ आमच्या हें आलें भागा । जिव्हार या जगाचें ॥ धृ० ॥ धरूनियां ठेलों जीवें । बळकट भावें एकाविध ॥ १ ॥ आणूनियां केला रूपा । उभा सोपा अवघीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंकित केला । खालीं आला वचनें ॥ ३ ॥

॥ ८९० ॥ खरें भांडवल सांपडलें गांठी । जेणें नये तुटी उरमासी ॥ धृ० ॥ सवंगाचें केणें सांपडलें घरीं । भरूनि वैखरी सांठविलें ॥ १ ॥ घेतां देतां लाभ होतसे सकळां । सदेवां दुर्बळा भाव तैसा ॥ २ ॥ फडा आलिया तो न वजे निरासे । जरि कांहीं त्यास न कळतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां जालीसे निश्चिती । आणिक तें चित्तीं न धरूं दुजें ॥ ४ ॥

॥ ८९१ ॥ परोपरीं दिलें अंग । जालें सांग कारण ॥ धृ० ॥ रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥ १ ॥ पुढती चाली मनालाहो । वाढे देहो संतोष ॥ २ ॥ तुका ह्मणे अरभागीं । जालों जगीं व्यापक ॥ ३ ॥

॥ ८९२ ॥ निवडूनि दिलें नवनीत । संचित ते भोगीत ॥ धृ० ॥ आतां पुढें भावसार । जीवना थार पाहावया ॥ १ ॥ पारखियाचें पडिलें हातीं । चांचपती आंधळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा ॥ ३ ॥

॥ ८९३ ॥ उचित न कळे इंद्रियाचे ओढी । मुखें बडबडी शिकलें तें ॥ धृ० ॥ आपण जाऊन न्यावीं नरकास । बळें बेताळीस कुळें जग ॥ १ ॥ अबोलणें बोले डोळे झाकूनियां । भडभडी वांयां दंभासाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तेथील पारखी । नाचे देखोवेखीं जाणों खरें ॥ ३ ॥

॥ ८९४ ॥ एक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटितां तें तुला येई कैसें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावीं संग प्रारब्धाचा ॥ १ ॥ आणिका संकल्पा नको गोऊं मन । तरीच कारण साध्य होय ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें जाणावें उचित । तरी सहज स्थित येईल कळों ॥ ३ ॥

॥ ८९५ ॥ गावें ह्मणऊनि गीत । धरुनी राहे तैसें चित्त ॥ धृ० ॥ हेंचि थोर अवघड आहे । अन्न देखोनि भूक राहे ॥ १ ॥ ऐकावी म्हुण कथा । राहे तैसें धरुनी चित्ता ॥ २॥ तुका ह्मणे धणी । नव्हे जेविल्यावांचुनी ॥ ३ ॥

॥ ८९६ ॥ कळेल हे खूण । तरि दावी नारायण ॥ धृ० ॥ सत्य संतांपाशीं राहे । येरा भय आड आहे ॥ १ ॥ अणुचिया ऐसें । असें भरलें प्रकाशें ॥ २ ॥ इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजुनी ॥ ३ ॥ तर्क कुतर्क वाटा । नागवण घटपटा ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यावें । डोळां अंजन बरवें ॥ ५ ॥

॥ ८९७ ॥ जातो न येतिया वाटा । काय निरवितो करंटा ॥ धृ० ॥ कैसा जालासे बेश्रम । लाज नाहीं न ह्मणे राम ॥ १ ॥ पाहे वैरियाकडे । डोळे वासुनिया रडे ॥ २ ॥ बांधुनियां यमा हातीं । दिला नाहीं त्याची खंती ॥ ३ ॥ नाहीं यापें काम । ऐसें जाणें तो अधम ॥ ४ ॥ अझुन तरी मुका । कां रे जालासी ह्मणे तुका ॥ ५ ॥

॥ ८९८ ॥ वांटा घेई लवकरी । मागें अंतरसी दुरी । केली भरोवरी । सार नेलीं आणिक ॥ धृ० ॥ ऐसीं भांबावलीं किती । काय जाणों नेणों किती । समय नेणती । मायां भार वाहोनी ॥ १ ॥ माहीं सारिलें तोंवरी । धांव घेई वेग करी । घेतलें पदरीं । फावलें तें

आपुलें ॥ २ ॥ फट लंडी ह्मणे तुका । एक न साहावे धका । तरीच या सुखा । मग कैसा पावसी ॥ ३ ॥

॥ ८९९ ॥ चालावा पंथ तो पाविजे त्या ठाया । ऐकिल्या वांयां वारता त्या ॥ धृ० ॥ ऐका जी वोजे पडतसें पायां । भावाचि ते जाया वाट नव्हे ॥ १ ॥ व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव । सांगतां तो भाव येत नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे आराले । बिंबीं निवळलें तरी भासे ॥ ३ ॥

॥ ९०० ॥ काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ॥ धृ० ॥ जया न फळे उपदेश । धस ऐसा त्या नांवें ॥ १ ॥ काय नाहीं असत जड । दगड तो अबोलणा ॥ २ ॥ तुका ह्मणे कुचर दाणा । तैसा ह्मणा डेंग हा ॥ ३ ॥

॥ ९०१ ॥ देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्या ऐसी केवीं गारगोटी ॥ धृ० ॥ मर्यादा ते जाण अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मुर्त्ती ॥ १ ॥ काय पडिलेंसी लटिक्याचे भरी । वोंवाळुनी थोरी परती सांडीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढें दिसतसे घात । करितों फजित ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ ९०२ ॥ संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवीं ॥ धृ० ॥ भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥ १ ॥ भिक्षा आणि वेवसाव । काला करितो गाढव ॥ २ ॥ करुनी वस्ति बाजारीं । ह्मणवी कासया निस्पृही ॥ ३ ॥ प्रसाद आडुनी कवी । केलें तूप पाणी तेवीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे होई शूर । किंवा निसुर मजूर ॥ ५ ॥

॥ ९०३ ॥ तेज्या इशारती । तटा फोक वरी घेती ॥ धृ० ॥ काय सांगावें त्याहुनी । ऐका रे धरा मनीं ॥ १ ॥ नव्हे भांडखोर । ओढूनि धरूं पदर ॥ २ ॥ तुका ह्मणे तोंड । काळें करा खालीं मुंड ॥ ३ ॥

॥ ९०४ ॥ मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥ धृ० ॥ आचारभ्रष्ट होती लोक कळीं । पुण्य क्षीण बळी जालें पाप ॥ १ ॥ वर्णधर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ २ ॥ वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती करावे फजित । तेचि छंद नित्य बहु होती ॥ ४ ॥

॥ ९०५ ॥ अक्षरांचा श्रम केला । फळा आला तेणें तो ॥ धृ० ॥ अवघियाचा तळ धरी । जीवा उरी नुरउनी ॥ १ ॥ फळलें तें लवे भारें । पिक खरें आलें तई ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । पुढें भाव सारावा ॥ ३ ॥

॥ ९०६ ॥ उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्तशुद्ध बुद्धि ठायीं स्थिर ॥ धृ० ॥ न पलावी धांव मनाचिये ओढी । वचन आवडी संताचिये ॥ १ ॥ अंतरीं या राहे वचनाचा विश्वास । नलगे उपदेश तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ९०७ ॥ जीवन हे मुक्त नर जालें पावन । तजा हो दुर्जनसंगति ही ॥ धृ० ॥ बहुत अन्न विष मोहरीच्या मानें । अवघेंचि तेणें विष होय ॥ १ ॥ तुका ह्मणे आपुलें स्वहित । तैसी करी नीत विचारुनी ॥ २ ॥

॥ ९०८ ॥ द्रव्याचा तो आह्मी धरितों विटाळ । तया पाठीं काळ लाग करी ॥ धृ० ॥ करोनियां हेंचि राहिलों जीवन । एक नारायण नाम ऐसें ॥ १ ॥ तुका ह्मणे हेंचि करूनि जतन । आलियाही दान याचकासी ॥ २ ॥

॥ ९०९ ॥ द्रव्याचिया मार्गे कळिकाळाचा लाग । ह्मणोनियां संग खोटा त्याचा ॥ धृ० ॥ निरयाचें मूळ घालूनियां मार्गें । मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥ १ ॥ आजिच्या प्रसंगें हाचि लाभ घ्यावा । पुढील भार देवावरी घाला ॥ २ ॥ प्रालब्ध कांहीं न पालटे सोसें । तृष्णेचें हें पिसें वांयांविण ॥ ३ ॥ तुका ह्मणे घेई राहे ऐसें धन । सादर श्रवण करोनियां ॥ ४ ॥

॥ ९१० ॥ रडे अळंकार दैन्याचिये कांतीं । उत्तमा विपत्तिसंग घडे ॥ धृ० ॥ एकाविण एक अशोभ्य दातारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ १ ॥ रांधू नेणें तया पुढील आइतें । केलें तें सोइतें वांयां जाय ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंतामणि शेळी गळा । पावे अवकळा ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ ९११ ॥ दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसी ॥ धृ० ॥ कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥ १ ॥ भोग कळों येतों मागिल ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें झांकितील डोळे । भोग देतेवेळे येइल कळों ॥ ३ ॥

॥ ९१२ ॥ सदैव तुह्मां अवघें आहे । हातपाय चालाया ॥ धृ० ॥ मुखीं वाणी कानीं कीर्ती । डोळे मूर्ति देखाया ॥ १ ॥ अंध बाहिर ठकलीं किती । मुकीं होतीं पांगुळें ॥ २ ॥ घरास आगि लावुनी जागा । न पळे तो गा वांचे ना ॥ ३ ॥ तुका ह्मणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ॥ ४ ॥

॥ ९१३ ॥ ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥ धृ० ॥ ह्मणउनी फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडी ॥ १ ॥ संचित प्रारब्ध गाढें । धांवें पुढें क्रियमाण ॥ २ ॥ तुका ह्मणे घुबडा ऐसें । जन्म सरिसें शुकराचें ॥ ३ ॥

॥ ९१४ ॥ सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडे एक ॥ धृ० ॥ संसाराची मज न साहेचि वार्ता । आणिक ह्मणतां माझे कोणी ॥ १ ॥ देहसुख कांहीं बोलिले उपचार । विष तें आदर बंद वाटे ॥ २ ॥ उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासाविस ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं आणिक न साहे । आवडती पाय वैष्णवांचे ॥ ४ ॥

॥ ९१५ ॥ आणिक कांहीं या उत्तराचें काज । नाहीं आतां मज बोलावया ॥ धृ० ॥ भिन्न भेद हे भावनास्वभाव । नव्हे कांहीं देव एकविध ॥ १ ॥ गुण दोष कोणें निवडावें धर्म । कोण जाणें कर्म अकर्म तें ॥ २ ॥ तरिच भलें आतां न करावा संग । दुःखाचा प्रसंग तोडावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुण गाई या देवाचे । घेई माझे वाचे हेचि धणी ॥ ४ ॥

॥ ९१६ ॥ आपुल्या विचार करीन जीवाशीं । काय या जनाशीं चाड मज ॥ धृ० ॥

आपुलें स्वहित जाणती सकळें । निरोधितां बळें दुःख वाटे ॥ १ ॥ आइको नाइको कथा कोणी तरी । जाऊनियां घरीं नि जो सुखें ॥ २ ॥ माझी कोण वोज जाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लावूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाकूं आपुली करुणा। जयाची वासना तया फळे ॥ ४ ॥

॥ ९१७ ॥ धाई अंतरिंच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥ धृ० ॥ विधिनिषेध उर फोडी । जंव नाहीं अनुभवगोडी ॥ १॥ वाढे तळमळ उभयतां । नाहीं देखिलें अनुभवितां ॥ २ ॥ आपुल्या मतें पिसें । परि तें आहे जैसेंतैसें ॥ ३ ॥ साधनाची सिद्धी । मौन करा स्थिर बुद्धी ॥ ४ ॥ तुका ह्मणे वादें । वांयां गेलीं ब्रह्मवृंदें ॥ ५ ॥

॥ ९१८ ॥ कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥ धृ० ॥ कैसी ठकलीं बापुडीं । दंभविषयांचें सांकडीं ॥ १ ॥ भूस उपणुनी केलें काय । हारपलें दोन्ही ठाय ॥ २ ॥ तुका ह्मणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां ॥ ३ ॥

॥ ९१९ ॥ संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ॥ धृ० ॥ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥ १॥ करितों कवतुक बोबडा उत्तरीं । ह्मणीं मजवरि कोप धरा ॥२॥ काय माझी याचि नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तोचि जाणें ॥ ४ ॥

॥ ९२० ॥ चंदनाच्या वासें धरितील नाक । नावडे कनक न घडे हें ॥ धृ० ॥ साकरेची गोडी सारखी सकळां । थोरां मोठ्या बाळां धाकुटियां ॥ १ ॥ तुका ह्मणे माझें चित्त शुद्ध होतें । तरि कां निंदितें जन मज ॥ २ ॥

॥ ९२१ ॥ तुज ऐसा कोण उदाराची रासी । आपुलेंचि देसी पद दासा ॥ धृ०॥ शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥ १ ॥ भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं । अभक्तांच्या परि नावडती ॥ २ ॥ नवजासी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगियांच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसीं ब्रीदें तुझी खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥ ४ ॥

॥ ९२२ ॥ तरि कां नेणतें होतें मागें ऋषी । तींहीं या जनासी दुराविलें ॥धृ०॥ वोळगती जया अष्ट महासिद्धी । ते या जनबुद्धि नातळती ॥ १ ॥ कंदमुळें पाला धातूच्या पोषणा । स्थातील वास राणां तरी केला ॥ २ ॥ लावूनियां नेत्र उगेचि बैसले । न बोलत ठेले मौन्यमुद्रें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ॥ ४ ॥

॥ ९२३ ॥ कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देईल धीर माझ्या जीवा ॥धृ०॥ शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥ १ ॥ कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां ॥ २ ॥ मज हा संदेह झाला दोहीं सवा । भजन करूं देवा किंवा नको ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां दुरावितां जन । किंवा हें मरण भलें दोन्ही ॥ ४ ॥

॥ ९२४ ॥ काय उणें जालें तुज समर्थासी । ऐसा मजपाशीं कोण दोष ॥धृ०॥ जो तूं

माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमधीं ॥ १ ॥ तुजविण रत आणिकांचे ठायीं । ऐसें कोण ग्वाही दावी मज ॥ २ ॥ तुका ह्मणे काय धरुनी गुमान । सांग उगवुन पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ९२५ ॥ काय करूं आन दैवतें । एकाविण पंढरीनाथें ॥ धृ० ॥ सरितां मिळाली सागरीं । आणिकां नांवा कैंचि उरी ॥ १ ॥ अनेक दीपींचा प्रकाश । सूर्य उगवतां नाश ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें दुजें ॥ एकाविण पंढरीराजें ॥ ३ ॥

॥ ९२६ ॥ काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ॥ धृ० ॥ होसी नामाच सारिखा । समजाविली नाहीं लेखा ॥ १ ॥ नाहीं वेचावेच जाला । उरला आहेसी संचला ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें । काय होईल तुझा ओझें ॥ ३ ॥

॥ ९२७ ॥ एकाएकीं हातोफळी । ठाया बळी पावले ते ॥ धृ० ॥ आह्मी देवा शक्तिहीनें । भाकूं तेणें करुणा ॥ १ ॥ पावटणी केला काळ । जया होतें ते ॥ २ ॥ तुका ह्मणे वीर्यावीर । संतधीर समुद्र ॥ ३ ॥

॥ ९२८ ॥ पुढिलाचें इच्छी फळ । नाहीं बळ तें अंगीं ॥ धृ० ॥ संत गेले तया ठाया । देवराया पाववीं ॥ १ ॥ ज्येष्ठांचीं कां आह्मां जोडी । परवडी न लभों ॥ २ ॥ तुका ह्मणे करी कोड । पुरवीं लाड आमुचा ॥ ३ ॥

॥ ९२९ ॥ कैवल्याच्या तुह्मां घरीं । रासी हरि उदंड ॥ धृ० ॥ मजसाठीं कांही वाणी । नव्हे धणी विभागा ॥ १ ॥ सर्वा गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । जालों सांगा सन्मुख ॥ ३ ॥

॥ ९३० ॥ आपलाल्या तुह्मी रूपासी समजा । कासया वरजा आरसिया ॥ धृ० ॥ हें तों नव्हे देहबुद्धीचें कारण । होईल नारायणें दान केलें ॥ १ ॥ बहुचिया बाणें वर्मासी स्पर्शावें । हें तों नाहीं ठावें मोकलिस्या ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु मुखें या वचना । सत्याविण जाणा चाल नाहीं ॥ ३ ॥

॥ ९३१ ॥ न मनावी चिंता तुह्मीं संतजनीं । हिरा स्फटिकमणि कैंचि होय ॥ धृ० ॥ पडिला प्रसंग स्थळा त्या सारिखा । देखिला पारिखा भाव कांहीं ॥ १ ॥ बहुतांसी भय एकाचिया दंडें । बहुत या तोंडें वचनासी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं वैखरी बा सर । करायाचे चार वेडे वेडे ॥ ३ ॥

॥ ९३२ ॥ यथाविधि पूजा करी । सामोग्री तोंवरि हे नाहीं ॥ धृ० ॥ आतां माझा सर्वभार । तूं दातार चालविसी ॥ १ ॥ मंगळ तें तुह्मी जाणा । नारायणा काय तें ॥ २ ॥ तुका ह्मणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ॥ ३ ॥

॥ ९३३ ॥ भवसिंधूचें हें तारूं । मज विचारूं पाहातां ॥ धृ० ॥ चित्तीं तुझे धरिन पाय । सुख काय तें तेथें ॥ १ ॥ माझ्या खुणा मनापाशीं । तें या रसीं बुडालें ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म आलें । हातां भलें हें माझ्या ॥ ३ ॥

॥ ९३४ ॥ पाहातां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक न वजे माझी ॥ धृ० ॥ जिव्हे गोडी तीन अक्षरांचा रस । अमृत जयास पिकें पुढें ॥ १ ॥ श्रवणांची वाट चोखाळ-

लीशुद्ध । गेले भेदाभेद वारोनियां ॥ २ ॥ महामळें मन होतें जें गांदलें । शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ४ ॥

॥ ९३५ ॥ हाचि परमानंद आळंगीन बाहीं । क्षेम देतां ठायीं द्वैत तुटे ॥ धृ० ॥ बोलायासी मात मन निवे हर्षे चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख ॥ १ ॥ जनांत भूषण वैकुंठीं सरता । फावलें स्वहिता सर्वभावें ॥ २ ॥ तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा विठ्ठलचि व्हावा । आणिकी या जीवा चाड नाहीं ॥ ४ ॥

॥ ९३६ ॥ आमुची कृपाळू तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥ धृ० ॥ प्रेमपान्हा स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टि हे निर्मळ अमृताची ॥ १ ॥ भूक तान दुःख वाटों नेदी सीण । अंतरीचा गुण जाणोनियां ॥ २ ॥ आशा तृष्णा माया चिंता दवडी दुरी । ठाव आह्मां करीं खेळावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे लावीं संताचा सांगात । जेथें न पवे हात कळिकाळाचा ॥ ४ ॥

॥ ९३७ ॥ जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेषें संतसंगें ॥ धृ० ॥ पूर्व पुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतरायमूळ नुपजे तेथें ॥ १ ॥ भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतांपायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि रावी मिरासी । बळी संतांपाशीं द्यावा जीव ॥ ३ ॥

॥ ९३८ ॥ आतां कांहीं सोस न करीं आणिक । धरीन तें एक हेंचि दृढ ॥ धृ० ॥ जेणें भवसिंधु उतरिजे पार । तुटे हा दुस्तर गर्भवास ॥ १ ॥ जोडीन ते आतां देवाचे चरण । अविनाश धन परमार्थ ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा जोडला हा देह । मनुष्यपणें इहलोका आलों ॥ ३ ॥

॥ ९३९ ॥ जतन करीन जीवें । शुद्ध भावें करुनी ॥ धृ० ॥ विठ्ठल विठ्ठल हें धन । जीवन अंतकाळींचें ॥ १ ॥ वर्डळ हें संचित सारूं । बरवा करूं उदिम हा ॥ २ ॥ तुका ह्मणे हृदयपेटीं । ये संपुटीं सांठवूं ॥ ३ ॥

॥ ९४० ॥ एवढा प्रभु भावें । तेणें संपुष्टीं राहावें ॥ धृ० ॥ होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥ १ ॥ एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥ २ ॥ आला नांवारूपा । तुका ह्मणे जाला सोपा ॥ ३ ॥

॥ ९४१ ॥ भाग्यें ऐसी जाली जोडी । आतां घडी विसंभेना ॥ धृ० ॥ विटेवरी समचरण । संतीं खूण सांगितली ॥ १ ॥ अवघें आतां काम सारूं । हाचि करूं कैवाड ॥ २ ॥ तुका ह्मणे खंडूं खेपा । पुढें पापापुण्याच्या ॥ ३ ॥

॥ ९४२ ॥ पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आह्मां नारायण तैशापरी ॥ धृ० ॥ सर्वभावें लोभ्या आवडे हें धन । आह्मां नारायण तैशापरी ॥ १ ॥ तुका ह्मणे एकविध जालें मन । विठ्ठलावांचुन नेणें दुजें ॥ २ ॥

॥ ९४३ ॥ विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा । विठ्ठल उभा पाहावा विटेवरी ॥ धृ० ॥ अनाथाचा बंधु विठ्ठल कृपासिंधू । तोडी भवबंधु यमपाश ॥ १ ॥ तोचि शरणागता हा विठ्ठल मुक्तिदाता । विठ्ठल या संतांसमागमें ॥ २ ॥ विठ्ठल गुणनिधि विठ्ठल

ो समाधि विठ्ठलनामें ॥३॥ विठ्ठलाचें नाम घेतां जालें सुख । गोडावलें
१ ॥
ो सांपडविया हातीं । ठावी जाली एक गती । न धरीं भय चित्तीं ।
॥ धृ० ॥ लागे आपणचि हातीं । किव भाकावी काकुलती । करी
ल तें तयाचें ॥ १ ॥ एकलिया भावबळें । कैं सांपडे तो काळें । वैष्णव
ठाके हाकेसी ॥ २ ॥ बांधा माझिया जीवासी । तुका ह्मणे
तयासी । सर्वस्वासी उद्धार ॥ ३ ॥
वैकुंठीं पाहाती । भक्त कैं पां येथें येती । तयां जन्ममरणखंती ।
॥ धृ० ॥ धन्यधन्य हरीचे दास । तयां सुलभ गर्भवास । ब्रह्मादिकां
र्थावास भेटीची ॥ १ ॥ कथाश्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस ।
ाट करजोडोनियां ॥ २ ॥ रिद्धिसिद्धि न पाचारितां । त्या धुंडिती
ायुज्यता । वाट पाहे भक्तांची ॥ ३ ॥ असती जेथें उभे ठेले । सदा
णिक ही उद्धरिलें । महादोषी चांडाळ ॥ ४ ॥ सकळ करिती त्यांची
उदास । धन्यभाग्य त्यांस । तुका ह्मणे दरुषणें ॥ ५ ॥
नें दावी वरी तांबें तयापोटीं । खरियाचें साठीं विकूं पाहे ॥ धृ० ॥
याचें जीवींचें । निवडी दोहींचें वेगळालें ॥ १ ॥ क्षीरा नीरा कैसें होय
भिन्न भिन्न काढी ॥ २ ॥ तुका ह्मणे धीता नागनलाचि खोटा ।
ईल ॥ ३ ॥
ूनि सांगडी बांधली माजासी । पैल थडी कैसी पावे सहजीं ॥ धृ० ॥
गचि करी । आणिकां सांगतां नाइकें तरी ॥ १ ॥ भुकेमेणें विष घेऊं
ाचि घाता करूं पाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे एक चालतील पुढें । तयांसी
। ३ ॥
कारासाठीं बोलों हे उपाय । येणेंविण काय आह्मां चाड ॥ धृ० ॥ बुडतां
ां । येतो कळवळा ह्मणउनी ॥ १ ॥ तुका ह्मणे माझे देखतील डोळे ।
कळों ॥ २ ॥
वे देव तो करावा उपाव । येर तजीं वाव खटपटा ॥ धृ० ॥ होईं बा
गा । वाउगा कां गा शिणसील ॥ १ ॥ जाणिवेच्या भारें भवाब्धिये
कांहीं निघेसी ना ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा पावसील भावें । जाणतां तें
३ ॥
या मुखावाटा नयों हें वचन । व्हावें हें संतान द्रव्य कोणा ॥ धृ० ॥
तनदुःखासी । दोहींमुळें त्यासी तेंचि साधे ॥ १ ॥ नाइकावी निंदा
। सादर या मनें होऊनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे देव असाध्य यामुळें ।
लिया ॥ ३ ॥
व ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित तें ठायीं आपणापें ॥ धृ० ॥

मनासी विचार तोचि साच भाव । व्यापक हा देव अंतर्बाहीं ॥ १ ॥ शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिकें ठायीं ॥ २ ॥ भोगिल्यासी काज अंतरीचें गोड । बाहिरल्या चाड नाहीं रंगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव शुद्ध हें कारण । भाट नारायण होईल त्यांचा ॥ ४ ॥

॥ ९५२ ॥ नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ॥ धृ० ॥ कांहीं न धरावी खंती । हित होईल धरा चित्तीं ॥ १ ॥ खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगतां ॥ २ ॥ ज्याचें तोचि जाणें । मी मापाडें तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ९५३ ॥ वासनेच्या मुखीं आवळूनि भीतें । निर्वाहापुरतें कारण तें ॥ धृ० ॥ या नांवें अंतरा आला नारायण । चित्तसमाधान खुण त्याची ॥ १ ॥ सर्वकाळ शांचि करणें विचार । विवेकीं सादर आत्मत्वाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे जों जों भजनासी वळे । अंग तों तों कळे सन्निधता ॥ ३ ॥

॥ ९५४ ॥ चिंतनें अचिंत राहिलों निश्चळ । तेंचि किती काळ वाढवावें ॥ धृ० ॥ अबोल्याचा काळ आतां ऐशावरी । वचनाची उरी उरली नाहीं ॥ १ ॥ करूं आला तों तों केला लवलाहो । उरोंच संदेहो दिला नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोहें परतेंचि ना मागें ह्मणउनी त्यागें त्याग जाला ॥ ३ ॥

॥ ९५५ ॥ निर्गुणाचें घ्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥ धृ० ॥ तुह्मां आह्मां आतां न पडे यावरी । आहों तेंचि बरी जेथें तेथें ॥ १ ॥ आपणापासुनी नसावें अंतर । वेचिलें उत्तर ह्मणउनी ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगा आली कठिणता । आमच्या अनंता तुह्मां ऐसी ॥ ३ ॥

॥ ९५६ ॥ तुजच पासाव जालोंसों निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ॥ धृ० ॥ पाहावा जी ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचि ना ॥ १ ॥ ठेविलिये ठायीं आज्ञेचें पाळण । करूनि जतन राहिलोंसें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बोलतसें स्पष्ट । जालों क्रियानष्ट तुह्मा ऐसा ॥ ३ ॥

॥ ९५७ ॥ प्रीति भंग माझा केला पांडुरंगा । भक्तिरस सांगा कां जी तुह्मीं ॥ धृ० ॥ ह्मणऊनि कांहीं न ठेवींचि उरी । आलों वर्मावरी एकाएकीं ॥ १ ॥ न देखोंचि कांहीं परती माघारी । उरली ते उरी नाहीं मुळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आला अंतरासी खंड । तरी माझें तोंड खवळिलें ॥ ३ ॥

॥ ९५८ ॥ लटिका ऐसा ह्मणतां देव । संदेहसा वाटतसे ॥ धृ० ॥ ऐसें आलें अनुभवा । मज ही सेवा करितां ॥ १ ॥ शून्याकारी बहु मोळा । भेंडोळा हे पवाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे ताळी नाहीं । एके ठायीं चपळत्वें ॥ ३ ॥

॥ ९५९ ॥ जैशासाठीं तैसें व्हावें । हें बरवें कळलेंसें ॥ धृ० ॥ उदास तूं नारायणा । मीही ह्मणा तुह्मीच ॥ १ ॥ ठका महाठक जोडा । जो धडफुडा लागासी ॥ २ ॥ एकांगेंच भांडे तुका । नाहीं धोका जीवित्वें ॥ ३ ॥

॥ ९६० ॥ बहुतां रीतिं काकुलती । आलों चित्तीं न धराच ॥ धृ० ॥ आतां काशा-

साठीं देवा । मिथ्या हेवा वाढवूं ॥ १ ॥ तुह्मां आह्मां जाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥ २ ॥ तुका ह्मणे लाजिरवाणें । अधीर जिणें इच्छेचें ॥ ३ ॥

॥ ९६१ ॥ आश्चर्य तें एक जालें । मना आलें माझिया ॥ धृ० ॥ मढ्यापाशीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥ १ ॥ न यावा तों कैसा राग । खोटें मग देखोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥ ३ ॥

॥ ९६२ ॥ मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचों ॥ धृ० ॥ लटकियाची न करूं स्तुती । इच्छा चित्तीं धरुनी ॥ १ ॥ हिशोबें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वामिसेवा । येथें हेवा काशाची ॥ ३ ॥

॥ ९६३ ॥ पाठवणें पडणें पायां । उद्धार वांयां काशाचा ॥ धृ० ॥ घडलें तें भेटीसवें । दिसेल बरवें सकळां ॥ १ ॥ न घडतां दृष्टादृष्टी । काय गोष्टी कोरड्या ॥ २ ॥ अबोल्यानें असे तुका । अंतर ऐका साक्षीतें ॥ ३ ॥

॥ ९६४ ॥ अभयाचें स्थळ । तें हें एक अचळ ॥ धृ० ॥ तरि धरिला विश्वास । ठेलों होऊनियां दास ॥ १ ॥ पुरली आवडी । पायीं लागलीसे गोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे कंठीं नाम । अंगीं भरलेंसें प्रेम ॥ ३ ॥

॥ ९६५ ॥ संदेह निरसे तरि रुचिकर । फिक्यासी आदर चवी नाहीं ॥ धृ० ॥ आतां नको मज खोट्यानें फटवूं । कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥ १ ॥ गेला तरि काय जीवाचें सांकडें । वांचउनी पुढें काय काज ॥ २ ॥ तुका ह्मणे कसीं निवडा जी बरें । केलीं तैसीं पोरें आळीपायीं ॥ ३ ॥

॥ ९६६ ॥ वदे वाणी परि दुर्लभ अनुभव । चालीचाचि वाहो बहुतेक ॥ धृ० ॥ आह्मी ऐसें कैसें राहावें निश्चळ । पाठिलागा काळ जितितसे ॥ १ ॥ वाढविला पोट दंभाचे पसारे । येतील माघारे मुदला तोटे ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें आगवितां मना तुमच्या नारायणा अभय करें ॥ ३ ॥

॥ ९६७ ॥ उगेंचि हें मन राहातें निश्चळ ॥ तरि कां तळमळ साट होती ॥ धृ० ॥ काय तुमचीं नेणों कवतुक विंदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥ १ ॥ नानाछंदें आह्मां नाचवावें जीवां । वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी आपुली प्रतिष्ठा । वाढवाया चेष्टा करीतसां ॥ ३ ॥

॥ ९६८ ॥ आह्मी बळकट जालों फिराउनी । तुमच्या वचनीं तुह्मां गोऊं ॥ धृ० ॥ जालें तेव्हां जालें मागील तें मागें । आतां वर्मलागें ठावी जाली ॥ १ ॥ तोडावया अवघ्या चेष्टांचा संबंध । शुद्धापाशीं शुद्ध बुद्ध व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां आत्मत्वाची सोय । आपणाचि होय तैसाचि तूं ॥ ३ ॥

॥ ९६९ ॥ तुह्मी साच नुपेक्षाल हा भरवसा । मज आणसां अधीरसें ॥ धृ० ॥ कासया घातला लांबणी उद्धार । ठेवा करकर वाढनियां ॥ १ ॥ सुटों नये ऐसें कळलें निरुतें । कां घ्यावें मागुतें आळवुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी सभाग्य जी देवा । माझा तुह्मां केवा काय आला ॥ ३ ॥

॥ ९७० ॥ तुह्मां होईल देवा पडिला विसर । आह्मीं तें उत्तर यत्न केलें ॥ धृ० ॥ पतितपावन ब्रीदें मिरविसी । याचा काय देसी झाडा सांग ॥ १ ॥ आहाच मी नव्हें अर्थाचें भुकेलें । भलत्या एका बोलें वारेन त्या ॥ २ ॥ तुका ह्मणे देह देईन सांडणें । सहित अभिमानें ओंवाळुनी ॥ ३ ॥

॥ ९७१ ॥ जडलों अंगाअंगीं । मग ठेवीं प्रसंगीं । कांहीं उरीजोगी । लोकीं आहे पुरती ॥ धृ० ॥ ठेवीं निवारुनी आधीं । अवकाश तोचि बुद्धी । सांपडली संधी । मग बळ कोणासी ॥ १ ॥ गळा बांधेन पायीं । हालों नेदीं ठायिंचा ठायीं । निवाडा तो तई । अवकळा केलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे ठावें । तुह्मी असा जी बरवें । बोभाटाची सवे । मुळीहुनी विठोबा ॥ ३ ॥

॥ ९७२ ॥ आह्मी शक्तिहीनें । कैसें कराल तें नेणें । लिगाडाच्या गुणें । खोळंबला राहिलों ॥ धृ० ॥ माझें मज देईं देवा । असे ठेविला तो ठेवा । नाहीं करीत हेवा । कांहीं अधिक आगळा ॥ १ ॥ नाहीं गळां पडलों ओंड । तुमचें तेंचि माझें तोंड । चौघां चार खंड । लांबणी हे अनुचित ॥ २ ॥ नाहीं येत बळा । आतां तुह्मासी गोपाळ । तुका ह्मणे गळा । उगवा पायां लागतों ॥ ३ ॥

॥ ९७३ ॥ काय कृपेविण घालावें सांकडें । निश्चिंती निवाडें कोण्या एका ॥ धृ० ॥ आहों तैसीं पुढें असों दीनपणें । वेंचूनि वचनें करुणेचीं ॥ १ ॥ धरूं भय आतां काय वाहों चिंता । काय करूं आतां आप्तपण ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी भावहीन जीव । ह्मणउनी देव दुरे दुरी ॥ ३ ॥

॥ ९७४ ॥ नाहीं उल्लंघिलें कोणाचें वचन । मज कां नारायण दुरी जाला ॥ धृ० ॥ अशंकितें मनें करीं आळवण । नाहीं समाधान निश्चितीचें ॥ १ ॥ दासांचा विसर हें तों अनुचित । असे सर्व नीत पायांपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां लाज येत नाहीं । आह्मां चिंताडोहीं बुडवितां ॥ ३ ॥

॥ ९७५ ॥ जीव जायवरी सांडी करी माता । हे तों आश्चर्यता बाळकाची ॥ धृ० ॥ दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून आलें ॥ १ ॥ क्षणक्षणा माझा न द्यावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं वचनासी रुची । फल कटवेंचि तें तें होय ॥ ३ ॥

॥ ९७६ ॥ ह्मणउनी दास नव्हे ऐसा जालों । अनुभवें बोलों स्वामीपुढें ॥ धृ० ॥ कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें । मीच माझ्या वेचें महाहासें ॥ १ ॥ कासयानें गोडी उपजावा विश्वास । प्रीति कांहीं रस वांचूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे अगा चतुरा शिरोमणी । विचारावें मनीं केशीराजा ॥ ३ ॥

॥ ९७७ ॥ काय आतां आह्मीं पोटचि भरावें । जग चाळवावें भक्त म्हूण ॥ धृ० ॥ ऐसा तरि एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासाविस ॥ १ ॥ काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडाजोडी अक्षरांची ॥ २ ॥ तुका ह्मणे काय गुंपोनि दुकाना । राहों नारायणा करुनी घात ॥ ३ ॥

॥ ९७८ ॥ वर्म तरि आह्मां दावा । काय देवा जाणें मी ॥ धृ० ॥ बहुतां रंगीं हीन जालों । तरि आलों शरण ॥ १ ॥ ब्याल जरि तुह्मी धीर । होईल स्थिर मन ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ताबळें । लडिवाळें राखावीं ॥ ३ ॥

॥ ९७९ ॥ सांगों काय नेणा देवा । बोलाची त्या आवडी ॥ धृ० ॥ वांयां मज चुकुर करा । विश्वंभरा विनोदें ॥ १ ॥ आवडीच्या करा ऐसें । अंतर्वासें जाणतसां ॥ २ ॥ तुका ह्मणे समाधानें । होइन मनें मोकळा ॥ ३ ॥

॥ ९८० ॥ निर्धाराचें अवघें गोड । वाटे कोड कौतुक ॥ धृ० ॥ बैसलिया भाव पायीं । बरा तई नाचेन ॥ १ ॥ स्वामि कळे सावधान । तरि मन उल्हासे ॥ २ ॥ तुका ह्मणे आश्वासावें । प्रेम द्यावें विठ्ठले ॥ ३ ॥

॥ ९८१ ॥ जाली तडातोडी । अवघीं पडिलों उघडीं ॥ धृ० ॥ नव्हों कोणांचीच कांहीं । तुझे भरलिया वाहीं ॥ १ ॥ पारुषला संवसार । मोडली बैसण्याची थार ॥ २ ॥ आतां ह्मणे तुका । देवा अंतरें राखों नका ॥ ३ ॥

॥ ९८२ ॥ आधार तो व्हावा । ऐसी आस करीं देवा ॥ धृ० ॥ तुह्मांपाशीं काय उणें । काय वेचे समाधानें ॥ १ ॥ सेवेच्या अभिलाषें । मन बहु जालें पिसें ॥ २ ॥ अरे भक्तपराधीना । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

॥ ९८३ ॥ तुमचा तुह्मीं केला गोवा । आतां चुकवितां देवा ॥ धृ० ॥ कैसें सरे चाळवणें । केलें काशाला शाहाणें ॥ १ ॥ कासया रूपा । नांवा आलेति गा बापा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । न सरे हवालें घालितां ॥ ३ ॥

॥ ९८४ ॥ माझी भक्ति भोळी । एकविध भावबळी ॥ धृ० ॥ मी कां पडेन निराळा । ऐसा सांडूनि सोहळा ॥ १ ॥ आतां अनारिसा । येथें न व्हावें सहसा ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडुनी पाय । पुढें उगा उभा राहे ॥ ३ ॥

॥ ९८५ ॥ आहे तरि सत्ता । ऐसा करितों वारता ॥ धृ० ॥ अंगसंगाचीं उत्तरें सलगीसेवेनें लेंकरें ॥ १ ॥ तरी निकटवासें । असों आशंकेच्या नासें ॥ २ ॥ तुका ह्मणे रुची । येथें भिन्नता कैंची ॥ ३ ॥

॥ ९८६ ॥ काळ सारावा चिंतनें । एकांतवासीं गंगास्नानें । देवाचें पूजन । प्रदक्षणा तुळसीच्या ॥ धृ० ॥ युक्त आहार विहार । नेम इंद्रियांचा सार । नसावी बासर । निद्रा बहु भाषण ॥ १ ॥ परमार्थ महाधन । जोडी देवाचें चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ॥ २ ॥ देह समर्पिजे देवा । भार कांहींच न घ्यावा । होईल आघवा । तुका ह्मणे आनंद ॥ ३ ॥

॥ ९८७ ॥ मऊ मेणाहून आह्मी विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ धृ० ॥ मेले जित असों निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ १ ॥ भले तरि देऊं गांडीची लंगोटी । नाठ्याळाचि गांठी देऊं माथां ॥ २ ॥ मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहुनी ॥ ३ ॥ अमृत तें काय गोड आह्मांपुढें । विष तें बापुडें कडू … नी ॥ ४ ॥

॥ ९८८ ॥ गाढवाचें तानें । पालटलें क्षणक्षणें ॥ धृ० ॥ तैसे अधमाचे गुण । एकविध नाहीं मन ॥ १ ॥ उपजतां बरें दिसे । रूप वाढतां तें नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥ ३ ॥

॥ ९८९ ॥ विटाळ ता परद्रव्य परनारी । येथूनि जो दुरी तो सोंवळा ॥ धृ० ॥ गद्यें पद्यें कांहीं न धरावी उपाधी । स्वाधीनाचि बुद्धि करुनी ठेवा ॥ १ ॥ विचाराचें कांहीं करावें स्वहित । पापपुण्यांचित भांडवल ॥ २ ॥ तुका ह्मणे न लगे जावें वनांतरा । विश्व विश्वंभरा सारिखेंची ॥ ३ ॥

॥ ९९० ॥ कल्पतरु रुया नव्हती बाभुळा । पुरविती फळा इच्छितिया ॥ धृ० ॥ उदंड त्या गाई ह्मैसी आणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनू ॥ १ ॥ तुका ह्मणे देव दाखवील दृष्टी । तयासवें भेटी थोर पुण्य ॥ २ ॥

॥ ९९१ ॥ जळो प्रेमा तैसा रंग । जाय उडोनि पतंग ॥ धृ० ॥ सासूसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ १ ॥ मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥ २ ॥ जैसी वृंदावनकांती । उत्तम धरूं नये हातीं ॥ ३ ॥ बक ध्यान धरी । सोंग करूनि मासे मारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ॥ ५ ॥

॥ ९९२ ॥ वेशा नाहीं बोल अवगुण दुषिले । ऐशा बोला भले ह्मणें शोभा ॥ धृ० ॥ कोण नेणें अन्न जीवाचें जीवन । विषमेळवण विष होय ॥ १ ॥ सोनें शुद्ध नेणें कोण हा विचार । डांकें हीनवर केलें त्यासी ॥ २ ॥ याति शुद्ध परि अधम लक्षण । वांयां गेलें तेणें सोंगें हीं तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर तोचि पावे मान । आणिक मंडण भार वाही ॥ ४ ॥

॥ ९९३ ॥ अणुरणीयां थोकडा । तुका आकाशा एवढा ॥ धृ० ॥ गिळूनि सांडिलें कळिवर । भवभ्रमाचा आकार ॥ १ ॥ सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । उरलों उपकारापुरता ॥ ३ ॥

॥ ९९४ ॥ धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन ॥ धृ० ॥ जाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ॥ १ ॥ जालें समाधान । पायीं विसांवलें मन ॥ २ ॥ तुका ह्मणे आले घरा । तोचि दिवाळीदसरा ॥ ३ ॥

॥ ९९५ ॥ हेंचि माझें धन । तुमचे वंदावे चरण ॥ धृ० ॥ येणें भाग्यें असों जीत । ध्यावें समर्पुनी चित्त ॥ १ ॥ सांभाळिलें देवा । मज अनाथा जी जीवा ॥ २ ॥ जोडूनियां कर । तुका विनवितो किंकर ॥ ३ ॥

॥ ९९६ ॥ फजितखोरा मना किती तुज सांगों । नको कोणा लागों मागें मागें ॥ धृ० ॥ स्नेहवादें दुःख जडलेंसें अंगीं । निष्ठुर हें जगीं प्रेमसुख ॥ १ ॥ निंदा स्तुति कोणी करी दयामाया । न धरीं चाड या सुखदुःखें ॥ २ ॥ योगिराज कां रे न राहाती बैसोनी । एकिये आसनीं याचि गुणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मना पाहें विचारुन । होईं रे कठिण वज्रा ऐसें ॥ ४ ॥

॥ ९९७ ॥ जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं । आवडी हे विधी । निषेधींचि चांगली ॥ धृ० ॥ तूं स्वामि मी सेवक [illegible]

ङणा ॥ १ ॥ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता निराळा ।
वडिली ॥ २ ॥ हिरा शोभला कोंदणें । अळंकारी मिरवे सोनें । एक असतां
जें जाणावें ॥ ३ ॥ उष्णें छाये सुख वाटे । बाळें माते पान्हा फुटे । एकाएक
ुख तें काळीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हित । हेंचि मानी माझें चित्त । नव्हे
ऐसा झाला भरवसा ॥ ५ ॥

मनीं वसे त्याचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसें ॥ धृ० ॥
ऐ येर येरासाठीं । वियोगें ही तुटी नेघे कधीं ॥ १ ॥ भेटीची अपेक्षा वारता
ाव्हे धीर मागुतालें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । साईरे
ाखे ॥ ३ ॥

नव्हे आराणुक परि मनीं वाहे । होईल त्या साहे पांडुरंग ॥ धृ० ॥ पंढ-
ग मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ॥ १ ॥ नसो बळ देह असो
हें चिंतन टाको नको ॥ २ ॥ तुका ह्मणे देह पडो या चिंतनें । पुढें लागे
॥ ३ ॥

कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतें दीन होतों तरी ॥ धृ० ॥ साधन
ो उत्तम । आवडीनें नाम गाईन तें ॥ १ ॥ न पुसतें कोणी कोठेंही असतां ।
ाचिया सुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे जन अव्हेरितें मज । तरी केशीराज
३ ॥

चतुर मी जालों आपुल्या भोंवतां । भावेंविण रिता फुंज अंगीं ॥ धृ० ॥
ां जावें हें तें काई । कामक्रोधें ठायीं वास केला ॥ १ ॥ गुणदोष आले
। भूताच्या मत्सरावरी बुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं उपदेश लोकां ।
ता दोषा ॥ ३ ॥

धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥ धृ० ॥ येथें उपकारासाठीं ।
ीं ॥ १ ॥ लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥ २ ॥ मधुरा वाणी ओठीं ।
पोटीं ॥ ३ ॥

। कुटल्याविण नव्हे मांडा । अळसें धोंडा पडतसे ॥ धृ० ॥ राग नको
डमणी सांगतों ॥ १ ॥ तरटापुढें बरें नाचे । सुतकाचें मुसळ ॥ २ ॥
ी सार । करी फार घाहाणें ॥ ३ ॥

कळों येतें तरि कां नव्हे । पडती गोवे भ्रमाचे ॥ धृ० ॥ जाणतांचि
रिसा मत देवा हें ॥ १ ॥ आविसासाठीं फासा मान । पाडी धनइच्छा ते
ाणे होणार खोटें । कर्म मोठें बळिवंत ॥ ३ ॥

मोकळें मन रसाळ वाणी । याचि गुणीं संपन्न ॥ धृ० ॥ लक्ष्मी ते ऐसा
यावें तरि त्यांनीं ॥ १ ॥ नमन नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ॥ २ ॥
च्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥ ३ ॥

...॥ पोरसावा ॥ धृ० ॥ विसर तो न पडावा ।

माझा देवा तुह्मांसी ॥ १ ॥ पुढें फार बोलों काई । अवघें पायीं विदित ॥ २ ॥ तुका ह्मणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ॥ ३ ॥

॥ १००७ ॥ करितों कवित्व ह्मणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ धृ० ॥ माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥ १ ॥ काय मी पामर जाणें अर्थ भेद । वदवी गोविंद तेंचि वदें ॥ २ ॥ निमित्त मापासी बैसविलों आहें । मी तों कांहीं नव्हे स्वामिसत्ता ॥ ३ ॥ तुका ह्मणे आहें पाईकचि खरा । वागवितों मुद्रा नामाची हे ॥ ४ ॥

॥ १००८ ॥ आह्मीं गावें तुह्मी कोणीं कांहीं न ह्मणावें । ऐसें तंव आह्मां सांगितलें नाहीं देवें ॥ धृ० ॥ ह्मणा रामराम टाळी वाजवा हातें । नाचा डोला प्रेमें आपुलिया स्वहितें ॥ १ ॥ सहज घडे तया आळस करणें तें काई । अमीचें भातुकें हात पोळितां कां पायीं ॥ २ ॥ येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक । हांसे तया घडे ब्रह्महत्यापातक ॥ ३ ॥ जया जैसा भाव निरोपण करावा । येथें नाहीं चाड ताळविताळ या देवा ॥ ४ ॥ सदैव ज्यां कथा काळ घडे श्रवण । तुका ह्मणे येर जन्मा आले पाषाण ॥ ५ ॥

॥ १००९ ॥ देव घ्या कोणी देव घ्या कोणी । आइता आला घर पुसोनी ॥ धृ० ॥ देव नलगे देव नलगे । सांठवणेचे रुधले जागे ॥ १ ॥ देव मंदला देव मंदला । भाव कुडाला काय करूं ॥ २ ॥ देव घ्या फुका देव घ्या फुका । न लगे रुका मोलकांहीं ॥ ३ ॥ दुबळा तुका भावेंविणें । उधारा देव घेतला रुणें ॥ ४ ॥

॥ १०१० ॥ विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वाहावे भार मायां ॥ धृ० ॥ साधनें संकटें सर्वांलागीं सीण । व्हावा लागे क्षीण अहंमान ॥ १ ॥ भाव हा कठीण वज्र हें भेदवे । परि न छेदवे मायाजाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म भजनेंचि सांपडे । येरांसी तों पडे ओस दिशा ॥ ३ ॥

॥ १०११ ॥ कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ॥ धृ० ॥ कोणी व्हा रे अधिकारी । त्यासी हरि देइल ॥ १ ॥ वैराग्याचें बळ । साही खळ जिणावे ॥ २ ॥ उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥ ३ ॥

॥ १०१२ ॥ कायावाचामन ठेविलें गाहाण । घेतलें तुझें रिण जोडीलागीं ॥ धृ० ॥ अवघें आलें आंत पोटा पडिलें यीतें । सारूनि निश्चित जालों देवा ॥ १ ॥ द्यावयासी आतां नाहीं तोळा मासा । आधील भवेशा तुज ठावीं ॥ २ ॥ तुझ्या रिणें गेले बहुत बांधोन । जाले मजहून थोरथोर ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे खंती जें गुंतलें । करूनि आपुलें घेई देवा ॥ ४ ॥

## धुर्वक.

॥ १०१३ ॥ करिसी कीं न करिसी माझा अंगिकार । हा मज विचार पडिला देवा ॥ धृ० ॥ देसी कीं न देसी पायांचें दर्शन । ह्मणऊनि मन स्थिर नाहीं ॥ १ ॥ बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा । ह्मणोनिया ...

तुज माझा आठव । पडिला संदेह ह्मचि मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों कमाईचें हीण । ह्मणऊनि सीण करी देवा ॥ ४ ॥

॥ १०१४ ॥ ऐसा माझा कोण आहे भीडभार । नांवाचा मी फार वांयां गेलों ॥ धृ० ॥ काय सेवा रुजूं आहे सत्ताबळ । तें मज राउळ कृपा करी ॥ १ ॥ काय याति शुद्ध आहे कुळ कर्म । तेणें पडे वर्म तुझे ठायीं ॥ २ ॥ कोण तपोनिध दानधर्मशीळ । अंगीं एक बळ आहे सत्ता ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांयां जालों भूमि भार । होइल विचार काय नेणों ॥ ४ ॥

॥ १०१५ ॥ साच मज काय कळों नये देवा । काय तुझी सेवा काय नव्हे ॥ धृ० ॥ करावें तें बरें जेणें समाधान । सेवावें हें वन न बोलावें ॥ १ ॥ शुद्ध माझा भाव होइल तुझे पायीं । तरिच हें देई निवडुनी ॥ २ ॥ उचित अनुचित कळों आली गोष्टी । तुझे कृपा-दृष्टि पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज पायांसवें चाड । सांगसी तें गोड आहे मज ॥ ४ ॥

॥ १०१६ ॥ नाहीं कांटाळलों परि वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥ धृ० ॥ जन वन आह्मां समानचि जालें । कामक्रोध गेले पावटणी ॥ १ ॥ षडऊर्मि शत्रु जिंतिले अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥ २ ॥ मुख्य धर्म आह्मां सेवकांचा ऐसा । स्वामि करी शिरसा पाळावें तें ॥ ३ ॥ ह्मणऊनि तुका अवलोकुनी पाय । वचनाची पाहे वास एका ॥ ४ ॥

॥ १०१७ ॥ वांयांविण वाढविला हा लौकिक । आणिला लटिक वाद दोघां ॥ धृ० ॥ नाहीं ऐसा जाला देव माझ्या मतें । भुकेलें जेवितें काय जाणें ॥ १ ॥ शब्दज्ञानें गौर-विली हे वैखरी । साच तें अंतरीं बिबेचि ना ॥ २ ॥ जालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मागें कळों येतें ऐसें । न घेतों हें पिसें लावूनियां ॥ ४ ॥

॥ १०१८ ॥ न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मती । परि ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥ धृ० ॥ आगमाचे भेद मी तों काय जाणें । काळ तो चिंतनें सारीतसें ॥ १ ॥ कांहीं नेणें परि ह्मणवितों दास । होइल त्याचा त्यास अभिमान ॥ २ ॥ संसाराची सोय सांडिला मारग । कुराविलें जग एका घायें ॥ ३ ॥ मागिल्या लागाचें केलेंसे खंडण । एकाएकीं मन राखियेलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे अगा रखुमादेवीवरा । भक्तकरुणाकरा सांभाळावें ॥ ५ ॥

॥ १०१९ ॥ इतुलें करीं देवा ऐकें हें वचन । समूळ अभिमान जाळीं माझा ॥ धृ० ॥ इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी । सर्व समदृष्टि तुज देखें ॥ १ ॥ इतुलें करीं देवा विनवितों तुज । संतांचे चरणरज वंदीं माथां ॥ २ ॥ इतुलें करीं देवा ऐकें हे मात । हृदयीं पंढरी-नाथ दिवसरात्रीं ॥ ३ ॥ भलतिया भावें तारीं पंढरीनाथा । तुका ह्मणे आतां शरण आलों ॥ ४ ॥

॥ १०२० ॥ तुझा दास ऐसा ह्मणती लोकपाळ । ह्मणऊनि सांभाळ करीं माझा ॥ धृ० ॥ अनाथाचा नाथ पतितपावन । हें आतां जतन करीं नाम ॥ १ ॥ माझे गुण

दोष पाहातां न लगे अंत । ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥ २ ॥ नेणें तुम्ही कैसी करावी हे सेवा । जाणसी तूं देवा अंतरींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं या कृपेचा सिंधू । तोडीं भव- बंधु माझा देवा ॥ ४ ॥

॥ १०२१ ॥ जाणावें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ धृ० ॥ करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ १ ॥ बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ २ ॥ जावें तें कोठें न जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होतीं पापें आमुच्या मतें ॥ ४ ॥

॥ १०२२ ॥ नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥ धृ० ॥ दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवीन चरणावरी माथा ॥ १ ॥ पाहोनि श्रीमुख देइन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥ २ ॥ पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी न लावीं उशीर । माझें अभ्यंतर जाणोनियां ॥ ४ ॥

॥ १०२३ ॥ मागें शरणागत तारिले बहुत । ह्मणती दीनानाथ तुज देवा ॥ धृ० ॥ पाहिले अपराध नाहीं याति कुळ । तारिला आजामेळ गणिका भिल्ली ॥ १ ॥ अचळपदीं बाळ बसविला धुरू । क्षीराचा सागरु उपमन्या ॥ २ ॥ गजेंद्रपशु नाडियेला जळचरें । भव- सिंधु पार उतरिला ॥ ३ ॥ प्रल्हाद अग्नींत राखिला जळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥ ४ ॥ पांडवां संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ ५ ॥ तुका ह्मणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनियां मात शरण आलों ॥ ६ ॥

॥ १०२४ ॥ तुझा शरणागत जालों मी अंकित । करीं माझें हित पांडुरंगा ॥ धृ० ॥ पतितपावन तुह्मी ब्रीदावळी । ते आतां सांभाळीं मायबापा ॥ १ ॥ अनाथाचा नाथ बोलतील संत । ऐकोनियां मात विश्वासलों ॥ २ ॥ न करावी निरास न धरावें उदास । देईं याचकास कृपादान ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों पातकांची रासी । देईं पायापासीं ठाव देवा ॥ ४ ॥

॥ १०२५ ॥ सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा । न लिपे विटाळा अग्नि जैसा ॥ धृ० ॥ सत्यवादी करी संसार सकळ । अलिप्त कमळ जळीं जैसें ॥ १ ॥ घडे ज्या उपकार भूतांची ते दया । आत्मस्थिति तया अंगीं वसे ॥ २ ॥ नो बोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनि तो जनीं जनार्दन ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म जाणितल्याविण । पावे करितां सीण सांडीमांडी ॥ ४ ॥

॥ १०२६ ॥ कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्में निधान हातीं चढे ॥ धृ० ॥ कुळधर्म भक्ति कुळधर्म गती । कुळधर्म विश्रांति पाववील ॥ १ ॥ कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनाचें ॥ २ ॥ कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरी होय ॥ ४ ॥

॥ १०२७ ॥ पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥ धृ० ॥ सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥ १ ॥ गति

तेंचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ २ ॥ संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क उदास अनर्गळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥ ४ ॥

॥ १०२८ ॥ न वजे वांयां कांहीं ऐकतां हरिकथा । आपण करितां वांयां न वजे ॥ धृ० ॥ न वजे वांयां कांहीं देवळासी जातां । देवासी पूजितां वांयां न वजे ॥ १ ॥ न वजे वांयां कांहीं केलिया तीर्थ । अथवा कां व्रत वांयां न वजे ॥ २ ॥ न वजे वांयां जालें संतांचें दर्शन । शुद्ध आचरण वांयां न वजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव असतां नसतां । सायास करितां वांयां न वजे ॥ ४ ॥

॥ १०२९ ॥ चित्तीं धरीन मी पाउलें सकुमार । सकळ बिढार संपत्तीचें ॥ धृ० ॥ कंठीं धरीन मी नाम अमृताची वल्ली । होईल राहिली शीतळ तनू ॥ १ ॥ पाहेन श्रीमुख साजिरें सुंदर । सकळां अगर लावण्याचें ॥ २ ॥ करीन अंगसंग बाळकाचे परी । बैसेन तोंवरी नुतरीं कडिये ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा केला तैसा होय । धरिलीं मनें सोय विठोबाची ॥ ४ ॥

॥ १०३० ॥ बाळ मातेपाशीं सांगे तानभूक । उपायाचें दुःख काय जाणें ॥ धृ० ॥ तयापरि करीं पाळण हें माझें । घेऊनियां ओझें सकळ भार ॥ १ ॥ कासया गुणदोष आणिसील मना । सर्व नारायणा अपराधी ॥ २ ॥ सेवाहीन दीन पातकांची रासी । आतां विचारिसी काय ऐसें ॥ ३ ॥ जणें काळें पायीं अनुसरलें चित्त । निर्धार हें हित जालें ऐसें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुह्मी तारिलें बहुकां । माझी कांहीं चिंता असों दे वो ॥ ५ ॥

॥ १०३१ ॥ जीवनावांचूनि तळमळी मासा । प्रकार हा तैसा होतो जीवा ॥ धृ० ॥ न संपडे जालें भूमिगत धन । चरफडी मन तयापरी ॥ १ ॥ मातेचा वियोग जालिया हो बाळा । तो कळवळा जाणा देवा ॥ २ ॥ सांगावे ते किती तुह्मांसी प्रकार । सकळांचें सार पाय दावीं ॥ ३ ॥ येचि चितें माझा करपला भीतर । कां नेणों विसर पडिला माझा ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं हें जाणसी सकळ । यावरि कृपाळ होईं देवा ॥ ५ ॥

॥ १०३२ ॥ शरण आलें त्यासी न दावीं हे पाठी । ऐका जगजेठी विज्ञापना ॥ धृ० ॥ अळविती तयांसी उत्तर झडकरी । द्यावें परिसा हरि विज्ञापना ॥ १ ॥ गांजिलियाचें करावें धांवणें । विनंति नारायणें परिसावी हे ॥ २ ॥ भागलियाचा होईं रे विसांवा । परिसावी केशवा विज्ञापना ॥ ३ ॥ अंकिताचा भार वागवावा माथां । परिसावी अनंता विज्ञापना ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मां विसरावें ना देवा । परिसावी हे देवा विज्ञापना ॥ ५ ॥

॥ १०३३ ॥ कोण आह्मां पुसे सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ॥ धृ० ॥ कोणापाशीं आह्मीं सांगावें सुखदुःख । कोण तानभूक निवारील ॥ १ ॥ कोण या तापाच्या करील परिहार । उतरील पार कोण दुजा ॥ २ ॥ कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील ॥ ३ ॥ कोणावरि आह्मीं करावी हे सत्ता । होईल साहाता कोण दुजा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आगा स्वामी सर्व जाणा । दंडवत चरणा तुमच्या देवा ॥ ५ ॥

॥ १०३४ ॥ तेव्हां धालें पोट बैसलों पंगती । आतां आह्मां मुक्ति पांग काई ॥ ध्रु० ॥ धांवा केला आतां येईं वो धांवोन । येथें काई करणें न लगे संदेह ॥ १ ॥ गायनाचा आतां कोठें उरला काळ । आनंदें सकळ भरी आलें ॥ २ ॥ देवाच्या सख्यत्वें विष-मासी ठाव । मध्यें कोठें वाव राहों सके ॥ ३ ॥ तेव्हां जाली अवघी बाधा वाताहात । प्रेम हृदयांत प्रवेशलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मीं जितिलें भरवसा । देव कोठें सासा मोकलितो ॥ ५ ॥

॥ १०३५ ॥ तरि कां पवाडे गर्जती पुराणें । असतां नारायण शक्तिहीन ॥ ध्रु० ॥ कीर्तिविण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वाणीत ना ॥ १ ॥ तरीच ह्मणा तो आहे चिरंजीव । कलियाचा जीव सुखी गुण ॥ २ ॥ चांगलेंपण हें निरुपमता अंगीं । बाणलें श्रीरंगीं ह्मणउनी ॥ ३ ॥ तरीच हा थोर सांगितलें करी । अभिमान हरिपासीं नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तरि करिती याची सेवा । देवापाशीं हेवा नाहीं कुडें ॥ ५ ॥

॥ १०३६ ॥ अविट हें क्षीर हरिकथा माउली । सेविती सेविली वैष्णवजनीं ॥ ध्रु० ॥ अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥ १ ॥ पतित पातकी पावनपं-गती । चतुर्भुज होती देवाऐसे ॥ २ ॥ सर्व सुखें तया मोहोरती ठाया । जेथें साठणी या वैष्णवांची ॥ ३ ॥ निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत । धरूनियां प्रीत गाये नाचे ॥ ४ ॥ तुका ह्मणे केलीं साधनें गाळणी । सुलभ कीर्तनीं होऊनि ठेला ॥ ५ ॥

॥ १०३७ ॥ संसारसोहळे भोगितां सकळ । भक्तां त्याचें बळ विठोबाचें ॥ ध्रु० ॥ भय चिंता धाक न मनिती मनीं । भक्तां चक्रपाणी सांभाळित ॥ १ ॥ पापपुण्य त्यांचें धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्वभावें ॥ २ ॥ नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव भक्तां भार सर्व वाहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देव भक्तां वेळाइत । भक्त ते निश्चिंत त्याचियानें ॥ ४ ॥

॥ १०३८ ॥ देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥ ध्रु० ॥ भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥ १ ॥ देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥ २ ॥ एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तोचि देव देव भक्त ॥ ४ ॥

॥ १०३९ ॥ हुंबरती गाये तयांकडे कान । कैवल्यनिधान देऊनि ठाके ॥ ध्रु० ॥ गोपाळांची पूजा उच्छिष्ट कवळी । तेणें वनमाळी सुखावला ॥ १ ॥ चोरोनियां खाये दूध दहीं लोणी । भावें चक्रपाणि गोविला तो ॥ २ ॥ निष्काम तो जाला कामासी लंपट । गोपिकांची वाट पाहात बैसे ॥ ३ ॥ जगदानी इच्छी तुळसी एकदळ । भावाचा सकळ विकिला तो ॥ ४ ॥ तुका ह्मणे हेंचि चैतन्य सावळें । त्यापुनी निराळें राहिलेंसे ॥ ५ ॥

॥ १०४० ॥ समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सर्व सिद्ध घरीं ॥ ध्रु० ॥ आद-राचे ठायीं बहुच आदर । मागितलें फार तेथें वाढी ॥ १ ॥ न ह्मणे सोयरा सुहृद आव-

श्यक । राजा आणि रंक सारिखाची ॥ २ ॥ भाव देखे तेथें करी लडबड । जडा राखे जड निराळेंची ॥ ३ ॥ कोणी न विसंभे याचकाचा ठाव । विनवुनी देव शंका फेडी ॥ ४ ॥ तुका ह्मणे पोट भरुनी उरवी । धालें ऐसें दावी अनुभवें ॥ ५ ॥

॥ १०४१ ॥ आलें भरा केणें । येरझार चुके जेणें ॥ धृ० ॥ उभें केलें विटेवरी । पेठ इनाम पंढरी ॥ १ ॥ वाहाती मारग । अवघें मोहरिलें जग ॥ २ ॥ तुका ह्मणे माप । खरें आणा माझे बाप ॥ ३ ॥

॥ १०४२ ॥ लक्ष्मीवल्लभा । दिनानाथा पद्मनाभा ॥ धृ० ॥ सुख वसे तुझे पायीं । मज ठेवीं तेचि ठायीं ॥ १ ॥ माझी अल्प हे वासना । तूं तो उदाराचा राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे भोगें । पीडा केली धांव वेगें ॥ ३ ॥

॥ १०४३ ॥ करीं ऐसें जागें । वेळोवेळां पायां लागें ॥ धृ० ॥ प्रेम झोंबो कंठीं । देह धरणिये लोटीं ॥ १ ॥ राहे लोकाचार । पडे अवघा विसर ॥ २ ॥ तुका ह्मणे ध्यावें । तुज व्यभिचारभावें ॥ ३ ॥

॥ १०४४ ॥ टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे ते सांगाती ॥ धृ० ॥ जाल तरी कोणी जागा । करा सिदोरी ते वेगा ॥ १ ॥ जाती सावळीत । तेथें असो द्यावें चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥ ३ ॥

॥ १०४५ ॥ वांयां जातों देवा । नेणें भक्ति करूं सेवा ॥ धृ० ॥ आतां जोडोनियां हात । उभा राहिलों निवांत ॥ १ ॥ करावें तें काय । न कळे अवलोकितों पाय ॥ २ ॥ तुका ह्मणे दान । दिलें पदरीं घेईन ॥ ३ ॥

॥ १०४६ ॥ जीवें खादला दैवतें । माझा येणें महाभूतें । झोंबलें निरुतें । कांहीं करितां न सुटे ॥ धृ० ॥ आतां करूं काय । न चले करितां उपाय । तुह्मां आह्मां सये । विघडाविघड केली ॥ १ ॥ बोलतां दुश्चिती । मी वो पडियेलें भ्रांती । आठव हा चित्तीं । न ये ह्मणतां मी माझे ॥ २ ॥ भलतेंचि चावळे । जना अवघिया वेगळे । नाठवती बाळें । आपपर सारिखें ॥ ३ ॥ नका बोलों सये । मज वचन न साहे । जैसाल त्या राहे । उग्या वाचा खुंटोनी ॥ ४ ॥ तुह्मां आह्मां भेटी । नाहीं जाली जीवेंसाठीं । तुका ह्मणे दृष्टी । पाहा जवळी आहे तो ॥ ५ ॥

॥ १०४७ ॥ जीवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळां ॥ धृ० ॥ आह्मां विठ्ठल एक देव । येर अवघेचि वाव ॥ १ ॥ पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं । वाहूं रखुमाईचा पती ॥ ३ ॥

॥ १०४८ ॥ माझें आराधन । पंढरपुरींचें निधान ॥ धृ० ॥ तया एकाविण दुजें । कांहीं नेणें पंढरीराजें ॥ १ ॥ दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । नव्हे पालट सर्वथा ॥ ३ ॥

॥ १०४९ ॥ आतां आह्मां हेंचि काम । न विसंभावें तुझें नाम । वाहूनियां टाळी । प्रेमसुखें नाचावें ॥ धृ० ॥ अवघी जाली आराणुक । मागें पुढें सकळिक । त्रिपुटीचें दुःख । प्रारब्ध सारिलें ॥ १ ॥ गोदातटें निर्मळें । देव देवांचीं देवळें । संत महंत मेळें ।

दिवस जाय सुखाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरीनाया । आणिक नाहीं मज चिंता । योग-क्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥ ३ ॥

॥ १०५० ॥ चोरटे सुनें मारिलें टाळें । केंउं करी परि न संडी चाळे ॥ धृ० ॥ ऐसें एक दुराचारी गा देवा । आपुलिया जीवा घात करी ॥ १ ॥ नाक गेलें तरि लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कर्म बळिवंत गाढें । नेदी तया पुढेंमागें सरों ॥ ३ ॥

॥ १०५१ ॥ मुनि मुक्त जाले भेणें गर्भवासा । आह्मां विष्णुदासा सुलभ तो ॥ धृ० ॥ अवघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप ह्मणोनियां ॥ १ ॥ पुराणीं उपदेश साधन उद्भट । आह्मां सोपी वाट वैकुंठींची ॥ २ ॥ तुका ह्मणे जनां सकळांसहित । घेऊं अखं-डित प्रेमसुख ॥ ३ ॥

॥ १०५२ ॥ न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥ धृ० ॥ भारें भवनदी उतरवे पार । दुरावती दूर तुमचे पाय ॥ १ ॥ तुका ह्मणे गर्व पुरवील पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ॥ २ ॥

॥ १०५३ ॥ तुमचिये दासांचा दास करूनि ठेवा । आशिर्वाद द्यावा हाचि मज ॥ धृ० ॥ नवविधा काय बोलिली जे भक्ती । द्यावी माझ्या हातीं संतजनीं ॥ १ ॥ तुका ह्मणे तुमच्या पायांच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥ २ ॥

॥ १०५४ ॥ चोर टेंकाचे निघाले चोरी । आपलें तैसें पारखे घरीं ॥ धृ० ॥ नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥ १ ॥ बुद्धिहीन नये कांहींच कारणा । तया-सवें जाणा तेंचि सुख ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं ठाउकें वर्म । तयासी कर्म बोडवलें ॥ ३ ॥

॥ १०५५ ॥ समर्थाचें बाळ कींविलवाणें दिसे । तरि कोणा हांसे जन देवा ॥ धृ० ॥ अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ १ ॥ तुका ह्मणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित जालों तुझा ॥ २ ॥

॥ १०५६ ॥ गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखसवें भेटी केली तेणें ॥ धृ० ॥ सहज गुण जयाचे देहीं । पालट कांहीं नव्हे तया ॥ १ ॥ माकडाचे गळां मोलाचा मणी । घातला चावुनी टाकी थुंकोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळा नावडे हित । अविद्या वाढवी आपुलें मत ॥ ३ ॥

॥ १०५७ ॥ नेणें सुनें चोर पाहुणा मागता । देखुन भलता भुंकतसे ॥ धृ० ॥ शिक-विलें कांहीं न चले तया । बोलियेले वांया बोल जाती ॥ १ ॥ क्षीर ओकूनिया खाय अमंगळ । आपुली ते ढाळ जाऊं नेदी ॥ २ ॥ वंदूं निंदूं काय दुराचार । खळाचा विचार तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १०५८ ॥ जन मानवलें वरी बाह्याल्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं जालों ॥ धृ० ॥ ह्मणऊनि पंढरीनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥ १ ॥ संतां ब्रह्मरूप जालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ॥ २ ॥ तुका ह्मणे मी तों आपणांसी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥ ३ ॥

॥ १०५९ ॥ काम क्रोध माझे जीताती शरीरीं । कोंवळें तें वरी बोलतसें ॥ धृ० कैसा सरता जालों तुझ्या पायीं । पांडुरंगा कांहीं न कळे हें ॥ १ ॥ पुराणींची ख्या वर्तील संत । तैसें नाहीं चित्त शुद्ध जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आणूनि अनुभव दाखवी हें देवा साच खरें ॥ ३ ॥

॥ १०६० ॥ स्तुति करीं जैसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ॥ धृ० तुमचें मी दास संतांचें दुर्बळ । करूनि सांभाळ राखा पायीं ॥ १ ॥ रामकृष्णहरि उच्चारणा । आवडी चरणा विठोबाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे तुमचें सेवितों उच्छिष्ट । करीं धीट होऊनियां ॥ ३ ॥

॥ १०६१ ॥ बहु दुरवरी । वेठीं ओझें होतें शिरीं ॥ धृ० ॥ आतां उतरला भार तुह्मीं केला अंगीकार ॥ १ ॥ बहु काकुलती । आलों मागें किती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा आजि सफळ जाली सेवा ॥ ३ ॥

# पाईक.

॥ १०६२ ॥ पाईकपणें जोतिला सिद्धांत । शूर धरी मात वचन चित्तीं ॥ धृ० पाइकावांचून नव्हे कधीं सुख । प्रजांमध्यें दुःख न सरे पीडा ॥ १ ॥ तरि व्हावें पाईक जिवाचे उदार । सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ॥ २ ॥ पाइकीचें सुख जयां नाहीं ठा धिग त्यांनीं जावें वांयांविण ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका क्षणाचा करार । पाईक अप सुख भोगी ॥ ४ ॥

॥ १०६३ ॥ पाइकीचें सुख पाइकासी ठावें । ह्मणोनियां जीवें केलीं साटीं ॥ धृ० येतां गोळ्या बाण साहिले भडमार । वर्षतां अपार वृष्टिवरी ॥ १ ॥ स्वामीपुढें व्ह पडतां भांडण । मग त्या मंडन शोभा दावी ॥ २ ॥ पाइकांनीं सुख भोगिलें अपार शुद्ध आणि धीर अंतर्बाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे या सिद्धांताच्या खुणा । जाणे तो शाहाण करी तो भोगी ॥ ४ ॥

॥ १०६४ ॥ पाईक तो जाणे पाइकीचा भाव । लाग पगे ठाव चोरवाट ॥ धृ० आपणां राखोनि ठकावें आणिक । घ्यावें सकळिक हरूनियां ॥ १ ॥ येऊं नेदी ला लागों नेदी माग । पाईक त्या जग स्वामी मानी ॥ २ ॥ ऐसें जन केलें पाइकें पाइक । जय कोणी भीक न घालिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे जयाचे पाईक । बळिया तो नाईक त्रैलो कींचा ॥ ४ ॥

॥ १०६५ ॥ पाइकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांटा मोडोनिया ॥ धृ० पारखिया ठायीं घेऊनियां खाणें । आपलें तें जन राखियेलें ॥ १ ॥ आधारेंविण बोलतां चावळे । आपलें तें कळे नव्हे ऐसें ॥ २ ॥ सांडितां मारग मारिती पाईक आणिकांसी शीक लागावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे विश्वा घेऊनि विश्वास । पाईक तयास सुख देती ॥ ४ ॥

॥ १०६६ ॥ पाईक तो प्रजा राखोनियां कुळ । पारखिया मूळ छेदी दुष्टा ॥ धृ०

तो एक पाईक पाइकां नाईक । भाव सकळिक स्वामिकाजीं ॥ १ ॥ तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाइका त्या भिन्न नाहीं स्वामी ॥ २ ॥ विश्वासावांचूनि पाइकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोलिलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे नये स्वामी उणेपण । पाइका जतन करी त्यासी ॥ ४ ॥

॥ १०६७ ॥ धनी ज्या पाइका मानितो आपण । तया भितें जन सकळिक ॥ धृ० ॥ जिवाचे उदार शोभती पाईक । मिरवती नाईक मुगुटमणी ॥ १ ॥ आपुलिया सत्ता स्वामीचें वैभव । भोगिती गौरव सकळ सुख ॥ २ ॥ कमाइची हीणें पडिलीं उदंडें । नाहीं तयां खंड येती जाती ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरि पाइकीच भली । थोडीबहुत केली स्वामिसेवा ॥ ४ ॥

॥ १०६८ ॥ पाइकपणें खरा मुशारा । पाईक तो खरा पाइकीनें ॥ धृ० ॥ पाईक जाणे मारितें अंग । पाइकासी भंग नाहीं तया ॥ १ ॥ एके दोहीं घरीं घेतलें खाणें । पाईक तो पणें निवडला ॥ २ ॥ करूनि कारण स्वामी यश द्यावें । पाइका त्या नांव खरेपण ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठाव पाइकां निराळा । नाहीं स्वामी स्थळा गेल्यावीण ॥ ४ ॥

॥ १०६९ ॥ उंच निंच कैसी पाइकाची ओळी । कोण गांढे बळी निवडिले ॥ धृ० ॥ स्वामिकाजीं एक सर्वस्वें तत्पर । एक ते कुचर आशाबद्ध ॥ १ ॥ प्रसंगावांचूनि आणिती आविर्भाव । पाईक तो नांव मिरवी वांयां ॥ २ ॥ गणतीचे एक उंच निच फार । तयांमध्यें शूर विरळा थोडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वामि जाणे त्यांचा मान । पाईक पाहोन मोल करी ॥ ४ ॥

॥ १०७० ॥ एकाच स्वामीचे पाईक सकळ । जैसें बळ तैसें मोल तया ॥ धृ० ॥ स्वामिपदीं एकां ठाव उंच स्थळीं । एक तीं निराळीं जवळी दुरी ॥ १ ॥ हीन कमाईच्या हीन आन ठाव । उंच सर्व भाव उंचा पद ॥ २ ॥ पाइकपणें तो सर्वत्र सरता । चांग तरी परता गांढ्या ठाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे मरण आहे या सकळां । भेणें अवकळा अभयें मोल ॥ ४ ॥

॥ १०७१ ॥ प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाठीं एकें जैशीं तैशीं ॥ धृ० ॥ आगळें पाऊल आणिकांसी तरी । पळती माघारीं तोंडिजेती ॥ १ ॥ पाठीवरी घाव ह्मणती फटमर । धडा अंगें शूर मान पावे ॥ २ ॥ घेईल वरवडा देहा तो पाईक । मारी सकळिक सर्व हरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नव्हे बोलाचें कारण । कमाईचा पण सिद्धि पावे ॥ ४ ॥

॥ १०७२ ॥ जातीचा पाईक ओळखे पाइका । आदर तो एका त्याचे ठायीं ॥ धृ० ॥ धरितील पोटासाठीं हतियेरें । कळती तीं खरें वेठीचींसीं ॥ १ ॥ जातीचें तें असे खरें घायडाय । पारखिया काय पाशीं लोपे ॥ २ ॥ तुका ह्मणे नमूं देव म्हूण जना । आलियांच्या खुणा जाणतसों ॥ ३ ॥

॥ १०७३ ॥ बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता नाहीं मनुष्यदेह ॥ धृ० ॥ आपुल्या हिताचे न होती सायास । गृहदाराआसधनवित्त ॥ १ ॥ अवचितें निधान लागलें हें हातीं । भोगावी विपत्ति गर्भवास ॥ २ ॥ यावें जावें पुढें ऐसेंचि कारण । भोगावें पतन नरकवास ॥ ३ ॥ तुका ह्मणे धरीं आठव या देहीं । नाहीं तरि कांहीं बरें नव्हे ॥ ४ ॥

॥ १०७४ ॥ आह्मीं पतितांनीं घालावें सांकडें । तुह्मां लागे कोडें उगवणें ॥ धृ० ॥ आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुह्मां हातीं ॥ १ ॥ न घेतां कवडी करा कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥ २ ॥ दयासिंधु नाम पतितपावन । हें आह्मां वचन सांपडलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तूंचि देवा ॥ ४ ॥

॥ १०७५ ॥ जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥ धृ० ॥ हातीं प्रेमा भातुकें । मुखीं घाली कवतुकें । भवसिंधु सुखें । उतरी कासे लावुनी ॥ १ ॥ थोर भक्तांची आस । पाहे भोंवताली वास ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपादानी । फेडी आवडीचें धणी ॥ ३ ॥

॥ १०७६ ॥ अखंड तुझी जया प्रीती । मज दे त्यांची संगती । मग मी कमळापती तुज नाणीं कंटाळा ॥ धृ० ॥ पडोन राहेन ते ठायीं । उगाचि संतांचिये पायीं । न मगें न करीं कांहीं । तुझी आण विठोबा ॥ १ ॥ तुह्मी आह्मी पीडों ज्यानें । दोन्ही वारतील एकानें । बैसलों धरणें । हाका देत दारेशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला । न पाहिजे केला । अवघा माझा आन्हेर ॥ ३ ॥

॥ १०७७ ॥ पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ धृ० ॥ कोण पाहे तयां कडे । वीर विठ्ठलाचे गाढे । अशुभ त्यांपुढें शुभ होउनियां ठाके ॥ १ ॥ प्रेमसुखाचिय रासी । पाप नाहीं ओखदासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ३ ॥

॥ १०७८ ॥ जन देव तरी पायांचि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥ धृ० ॥ अग्नीचें सौजन्य शीतनिवारण । पालवीं बांधोनि नेतां नये ॥ १ ॥ तुका ह्मणे विंचू सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥ २ ॥

॥ १०७९ ॥ भूत भविष्य कळों यावें वर्तमान हें तों भाग्यहीन त्यांची जोडी ॥ धृ० ॥ आह्मीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धें ॥ १ ॥ जगरूढीसाठीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धी ॥ ३ ॥

## घोंगड्या.

॥ १०८० ॥ ठकिलें काळा मारिली दडी । दिली कुडी टाकोनियां ॥ धृ० ॥ पांघुरलों बहु काळें । घोंगडें बळें सांडवलें ॥ १ ॥ नये ऐसा लाग वरी । परतें दुरी लपालें ॥ २ ॥ तुका ह्मणे आड सेवा । लाविला हेवा धांवली ॥ ३ ॥

॥ १०८१ ॥ घोंगडियांचा पालट केला । मुलांमुला आपुल्यांत ॥ धृ० ॥ कान्होबा तो मीच दिसें । लाविलें पिसें संवगडियां ॥ १ ॥ तो बोले मी उगाच बैसें । आनारिसें न दिसे ॥ २ ॥ तुका ह्मणे दिलें सोंग । नेदी व्यंग जाऊं देऊं ॥ ३ ॥

॥ १०८२ ॥ खेळों लागलों सुरकवडी । माझी घोंगडी हारपली ॥ धृ० ॥ कान्होबाचे पडिलों गळां । घेई गोपाळा दे झाडा ॥ १ ॥ मी तों हागे उघडा जालों । अवघ्या आलों बाहेरी ॥ २ ॥ तुका ह्मणे बुद्धि काची । नाहीं ठायींची मजपाशीं ॥ ३ ॥

॥ १०८३ ॥ घोंगडियांची एकी राशी । त्याचपाशीं तेंही होतें ॥ धृ० ॥ माझियाचा माग सांवा । केला गोवा उगवों द्या ॥ १ ॥ व्हावें ऐसें निसंतान । घेईन आन तुजपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे लाहान मोठा । सांडा ताठा हा देवा ॥ ३ ॥

॥ १०८४ ॥ नाहीं तुझे उगा पडत गळां । पुढें गोपाळा जाऊं नको ॥ धृ० ॥ चाहाड तुझे ह्मविन घरीं । बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥ १ ॥ तुह्मां आह्मां पडस होता । सरला आतां बरोबरी ॥ २ ॥ तुका ह्मणे उरती गोठी । पाडिली मिठी न सुटे ॥ ३ ॥

॥ १०८५ ॥ तुह्मां आह्मां उरी तोंवरीं । जनाचारीं ऐसे तैसे ॥ धृ० ॥ माझें घोंगडें टाकुन देई । एके ठायीं मग असों ॥ १ ॥ विरोधानें पडे तुटी । कपट पोटीं नसावें ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं जाणता हरी । मज वेव्हारीं बोलविसी ॥ ३ ॥

॥ १०८६ ॥ मुळींचा तुह्मां लागला चाळा । तो गोपाळा न संडा ॥ धृ० ॥ घ्यावें त्याचें देणेंचि नाहीं । येचि वाहीं देखतसों ॥ १ ॥ माझी तरी घोंगडी मोठी । गांडीची लंगोटी सोडीस ना ॥ २ ॥ तुका ह्मणे म्यां सांडिली आशा । हुंगिला फांसा येथुनियां ॥ ३ ॥

॥ १०८७ ॥ घोंगडियास घातली मिठी । न सोडी साटी केली जीवें ॥ धृ० ॥ हा गे चोर धरा धांवा कोणी । घसंत राहटे चोहूं कोणीं ॥ १ ॥ नोळखवे म्यां धरिला हातीं । देहा दीप माय लाविली वाती ॥ २ ॥ न पावे धावणें मारितो हाका । जनाचारीं तुका नागवला ॥ ३ ॥

॥ १०८८ ॥ आतां मी देवा पांघरों काई । भिकेचें तेंही उरेंचि ना ॥ धृ० ॥ सदैव दुबळें नेणे चोर । देखोनि सुनाट फोडितो घर ॥ १ ॥ नाहीं मजपाशीं फुटकी फोडी । पांचांनी घोंगडी दिली होती ॥ २ ॥ तुका ह्मणे जना वेगळें जालें । एकचि नेलें एकल्याचें ॥ ३ ॥

॥ १०८९ ॥ माझें करित होतों जतन । भीतरिल्या चोरें घेतलें खानें ॥ धृ० ॥ मज आल्याविण आधींच होता । मज न कळतां मजमाजी ॥ १ ॥ घोंगडें नेलें घोंगडें नेलें । उघडें केलें उघडेंची ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरटाचि जाला साव । सहजचि न्याय नाहीं तेथें ॥ ३ ॥

॥ १०९० ॥ घोंगडें नेलें सांगों मी कोणा । दुबळें माझें नाणीत मना ॥ धृ० ॥ पुढें तें मज न मिळे आतां । जवळी सत्ता दाम नाहीं ॥ १ ॥ संटे महाजन ऐका कोणी । घोंगडियाची करा शोधणी ॥ २ ॥ घोंगडियाचा करा बोभाट । तुका ह्मणे जंव भरला हाट ॥ ३ ॥

॥ १०९१ ॥ माझें घोंगडें पडिलें ठायीं । माग तया पायीं सांपडला ॥ धृ० ॥ चोर तो भला चोर तो भला । पाठिसीं घातला पुंडलिकें ॥ १ ॥ चोर कुठोरें एकेचि ठायीं । वेगळें पाहावें न लगे कांहीं ॥ २ ॥ आणिकांचीही चोरली आधीं । माझें तयामधीं मेळविलें ॥ ३ ॥ आपल्या आपण शोधिलें तीहीं । करीन मीही तेंचि परी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझें हितचि जालें । फाटकें जाऊन धडकें आलें ॥ ५ ॥

॥ १०९२ ॥ सर्प भुलोन गुंतला नाद । गारुडियें फांदा घातलासे । हिंडवुनी पोट भरी दारोदारीं । कोंडुनी पेटारी असेरया ॥ धृ० ॥ तैसी परी मज जाली पांडुरंगा । गुंतलों तो मी गा सोडीं आतां । माझें मज कांहीं न चलेसें जालें । कृपा तुज न करितां ॥ १ ॥ आविसें मीन लाबियला गळीं । भक्ष तो गिळी ह्मणउनियां । काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथें बापमाये कवण रया ॥ २ ॥ पक्षी पिलयां पातलें आशा । देखोनियां फांसा गुंते बळें । मरण नेणें माया धांवोनि वोसरे । जीवित्व ना जाली बाळें ॥ ३ ॥ गोडपणें मासी गुंतली लिगाडीं । सांपडे फडफडी अधिकाअधिक । तुका ह्मणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घालीं ॥ ४ ॥

॥ १०९३ ॥ यातिहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायणा ॥ धृ० ॥ काय सुख मज तयाची हे खंती । आपुलाला घेती गुणभाव ॥ १ ॥ द्रव्यामुळें मायां वाहियेली चिंधी । हीन जयामधीं होता गांठी ॥ २ ॥ तुका ह्मणे जन वंदितो वेगळा । मजसी दुर्बळा काय चाड ॥ ३ ॥

॥ १०९४ ॥ शीतळ साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा ॥ धृ० ॥ जाऊनि वोसंगा रिघेन वोरस । लागलें तें इच्छे पीइन वरी ॥ १ ॥ कृपा तनु माझी सांभाळी दुभूनी । अमृतजीवनीं लोटलीसे ॥ २ ॥ आनंदाच्या ठाव नाहीं माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥ ३ ॥ सेर जाये पडे तयेसी सांकडें । सांभाळीत पुढें मागें आस ॥ ४ ॥ तुका ह्मणे चिंता कैसी ते मी नेणें । लडिवाळ तान्हें विठाईचें ॥ ५ ॥

## रामचरित्र.

॥ १०९५ ॥ रामा वनवास । तेणें वसे सर्व देश ॥ धृ० ॥ केलें नामाचें जतन । समर्थ तो नव्हे भिन्न ॥ १ ॥ वनांतरीं रडे । ऐसे पुराणीं पवाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे ऋषिनेम । ऐसा कळोनि कां भ्रम ॥ ३ ॥

॥ १०९६ ॥ राम ह्मणे ग्रासोग्रासीं । तोचि जेविला उपवासी ॥ धृ० ॥ धन्यधन्य तें शरीर । तीर्थांव्रतांचें माहेर ॥ १ ॥ राम ह्मणे करितां धंदा । सुखसमाधि त्या सदा ॥ २ ॥ राम ह्मणे वाट चाली । यज्ञ पाउलापाउलीं ॥ ३ ॥ राम ह्मणे भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या अंगीं ॥ ४ ॥ ऐसा राम जपे नित्य । तुका ह्मणे जीवन्मुक्त ॥ ५ ॥

॥ १०९७ ॥ तारी ऐसें जड । उदकावरी जो दगड ॥ धृ० ॥ तो हा न करी तें काई । कां रे लीन नव्हां पायीं ॥ १ ॥ सीळा मनुष्य जाली । ज्याच्या चरणाचे चाली ॥ २ ॥ वानरां हातीं लंका । घेवविली ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ १०९८ ॥ राम ह्मणतां रामचि होइजे । पदीं बैसोन पदवी घेइजे ॥ धृ० ॥ ऐसें सुख वचनीं आहे । विश्वासें अनुभव पाहें ॥ १ ॥ रामरसाचिया चवी । आन रस रुचती केवीं ॥ २ ॥ तुका ह्मणे चाखोनि सांगें । मज अनुभव आहे अंगें ॥ ३ ॥

॥ १०९९ ॥ रामराम उत्तम अक्षरें । कंठीं धरिलीं आपण शंकरें ॥ धृ० ॥ कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां । हळाहळ शीतळ केलें शिवा देखा ॥ १ ॥ हाचि मंत्र उपदेश

भवानी । तिच्या चुकल्या गर्भादियोनी ॥ २ ॥ जुनाट नागर नीच नवें । तुका ह्मणे म्यां धरिलें जीवें भावें ॥ ३ ॥

॥ ११०० ॥ राम ह्मणतां तरे जाणतां नेणतां । हो का यातिभलता कुळहीन ॥ धृ० ॥ राम ह्मणतां न लगे आणीक सायास । केले महा दोष तेही जळती ॥ १ ॥ राम ह्मणे तया जवळी नये भूत । कैचा यमदूत ह्मणतां राम ॥ २ ॥ राम ह्मणतां तरे भवसिंधुपार । चुके येरझार ह्मणतां राम ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें सुखाचें साधन । सेवीं अमृतपान एका भावें ॥ ४ ॥

॥ ११०१ ॥ पैल आला राम रावणासी सांगती । काय निदसुरा निजलासी भूपती ॥ धृ० ॥ अवघे लंकेमाजी जाले रामाचे दूत । व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत ॥ १ ॥ अवघे अंगलग तुझे वधियेले वीर । होई शरणागत किंवा युद्धासी सादर ॥ २ ॥ तुका ह्मणे एक्या भावें रामेसी भेटी । करूनि घेई आतां संबंधेसी तुटी ॥ ३ ॥

॥ ११०२ ॥ समरांगणा आला । रामें रावण देखिला ॥ धृ० ॥ कैसे भीडतील दोन्ही । नांव सारुनियां रणीं ॥ १ ॥ प्रेमसुखाचें संधान । बाणें निवारिती बाण ॥ २ ॥ तुकयास्वामी रघुनाथ । वर्म जाणोनि केली मात ॥ ३ ॥

॥ ११०३ ॥ केला रावणाचा वध । अवघा तोडिला संबंध ॥ धृ० ॥ लंकाराज्यें बिभीषणा । केली चिरकाळ स्थापना ॥ १ ॥ औदार्याची सीमा । काय वर्णूं रघुरामा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा दाता । रामें सोडविली सीता ॥ ३ ॥

॥ ११०४ ॥ रामरूप केली । रामें कौसल्या माउली ॥ धृ० ॥ राम राहिला मानसीं । ध्यानीं चिंतनीं जयासी ॥ १ ॥ राम होय त्यासी । संदेह नाहीं हा भरवसा ॥ २ ॥ अयोध्येचे लोक । राम जाले सकळीक ॥ ३ ॥ स्मरतां जानकी । रामरूप जाले कपी ॥ ४ ॥ रावणेसी लंका । राम आपण जाला देखा ॥ ५ ॥ ऐसा नित्य राम ध्याय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ६ ॥

॥ ११०५ ॥ आनंदे लोक नरनारी परिवार । शंखभेरीतुरें वाद्यांचे गजर ॥ धृ० ॥ आनंद जाला अयोध्येसी आले रघुनाथ । अवघा जयजयकार आळंगिला भरत ॥ १ ॥ करिती अक्षवाणें ओंवाळिती रघुवीरा । लक्ष्मीसहित लक्ष्मण दुसरा ॥ २ ॥ जालें रामराज्य आनंदलीं सकळें । तुका ह्मणे गाईवत्सें नरनारीबाळें ॥ ३ ॥

॥ ११०६ ॥ जालें रामराज्य काय उणें आह्मांसी । धरणी धरी पीक गाई दोळल्या ह्मैसी ॥ धृ० ॥ राम वेळोवेळां आह्मी गाऊं ओंवियें । दळितां कांडितां जेवितां गे बाईये ॥ १ ॥ स्वप्नींही दुःख कोणी न देखे डोळां । नामाच्या गजरें भय सुटलें काळा ॥ २ ॥ तुका ह्मणे रामें सुख दिलें आपुलें । तयां गर्भवासीं येणें जाणें खुंटलें ॥ ३ ॥

॥ ११०७ ॥ अहल्या जेणें तारिली रामें । गणिका परलोका नेली नामें ॥ धृ० ॥ रामहरे रघुराजहरे । रामहरे महाराजहरे ॥ १ ॥ कंठ शीतळ जपतां शूळपाणी । राम जपतां अविनाशभवानी ॥ २ ॥ तारकमंत्रश्रवण काशी । नाम जपतां वाल्मीक ऋषि ॥ ३ ॥

नामजप बीजमंत्र नळा । सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा ॥ ४ ॥ नामजप जीवन मुनिजना । तुकयास्वामी रघुनंदना ॥ ५ ॥

॥ ११०८ ॥ मी तों अल्प मतिहीन । काय वर्णू तुझे गुण । उदकीं तारिले पाषाण । हें महिमान नामाचें ॥ धृ० ॥ मान चांगलें चांगलें । माझे कंठीं राहो भलें । कपिकुळ उद्धरिलें । मुक्त केलें राक्षसां ॥ १ ॥ द्रोणागिरि कपिहातीं । आणविला सीतापती । थोर केली ख्याती । भरतभेटीसमयीं ॥ २ ॥ शिळा होती मनुष्य जाली । थोर कीर्ति वाखाणिली । लंका दहन केली । हनुमंतें काशानें ॥ ३ ॥ जानकीजीवन । योगियांचें निजध्यान । राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥ ४ ॥

## श्लोकरूपी अभंग.

॥ ११०९ ॥ तुजवांचुनी मागणें काय कोणा । महींमंडळीं विश्वव्यापकजना । जीवभावना पुरवूं कोण जाणे । तुजवांचुनी होत कां रावराणे ॥ धृ० ॥ नसे मोक्षदाता तिहींमाजि लोकां । भवतारकू तूजवांचुनि एका । मनीं मानसीं चिंतितां रूपनाम । पळे पाप ताप भयें नास काम ॥ १ ॥ हरी नाम हें साच तुझें पुराणीं । हरीहातिचें काळ गर्भादियोनी । करूं मुखवाणी कैसी देशधडी । तुजवांचोनि वाणितां व्यर्थ गोडी ॥ २ ॥ भवभंजना व्यापका लोक तिन्ही । तुज वाणितां श्रमला शेषफणी । असो भावें जीव तुझ्या सर्व पायीं । दुजें मागणें आणीक व्यर्थ काई ॥ ३ ॥ दिनानाथ हे साक्ष तूझी जनासी । दिनें तारिलीं पातकी थोर दोषी । तुका राहिला पायिं तो राख देव । असें मागतसे तुझी चरणसेवा ॥ ४ ॥

॥ १११० ॥ उभा भींवरेच्या तिरीं राहिलाहे । असे सन्मुख दक्षिणे मूख वाहे । महापातकांसी पळ कांप थोर । कैसे गर्जती घोष हे नामवीर ॥ धृ० ॥ गुणगंभीर हा धीर हास्यमुख । वदे वदनीं अमृत सर्व सुख । लागलें मुनिवरां हें गोड चित्तीं । देहभावना तुटलियासि खंती ॥ १ ॥ ठसा घातला ये भूमिमाजी थोर । इच्छादाना हा द्यावयासी उदार । जया ओळगती सिद्धि सर्वठायीं । तुझें नाम हें चांगलें गे विठाई ॥ २ ॥ असे ऊघडा हा विटेवरि उभा । कटसूत्र हें धरुनी भक्तिलोभा । पुढें वाट दावी भवसागराची । विठो माउली हे सिद्धसाधकांची ॥ ३ ॥ करावे गुहा धरा पंथ आधीं । जया पार नाहीं सुखा तेंच साधीं । ह्मणे तुका पंढरी सर्व आलें । असे विश्व हें जीवनें त्याचि ज्यालें ॥ ४ ॥

॥ ११११ ॥ धना गुंतलें चित्त माझें मुरारी । मन घेउनी हिंडवी दारोदारी । मरे हिंडतां न पुरे यासि कांहीं । मही ठेंगणी परी तें तृप्त नाहीं ॥ धृ० ॥ न दिसे शुद्ध पाहतां निजमती । पुढें पडिलों इंद्रियां थोर घातीं । जिवा नास त्या संगती दंड बेडी । हरी शीघ्र या दुष्टसंगासि तोडीं ॥ १ ॥ असी आणिकें काय सांगों अनंता । मोहो पापिणी दुष्टमायाममता । क्रोध काम यातना थोर करी । तुजवांचुनी सोडवी कोण हरी ॥ २ ॥ निज देखतां निज हे दूरि जाये । निद्रा आळस दंभ या भीत आहे । तयां वस्ति देहीं नको देउं देवा । तुजवांचुनी आणिक नास्ति हेवा ॥ ३ ॥ करीं घात पात शंका लाज

थोरी । असे सत्य भाव बहू भक्ति दूरी । नको मोकलूं दीनबंधु अनाथा । तुका वीनवी ठेवुनी पायिं माथा ॥ ४ ॥

॥ ११११२ ॥ पैल सांवळें तेज पुंजाळ कैसें । सिरीं तुर्बिली साजिरीं मोरपीसें । इरे त्यासि रे देखतां ताप माया । भजा रे भजा यादवा योगिराया ॥ धृ० ॥ जया कामिनी लुब्धल्या सहस्रसोळा । सुकुमार ह्या गोपिका दिव्य बाळा । शोभे मध्यभागीं कळा चंद्र-कोटी । रुपा मीनली साजिरी माळ कंठीं ॥ १ ॥ असे यादवां श्रेष्ठ हा चक्रपाणी । जया वंदिती कोटि तेहतीस तीन्ही । महाकाळ हे कांपती दैत्य ज्यासी । पाहा सांवळें रूप हें पाप नासी ॥ २ ॥ कसीं पाउलें साजिरीं कुंकुमाचीं । कसी वीट हे लाधली दैवांची । जया चिंतितां अग्नि हा शांति नीवे । धरा मानसीं आपला देहभाव ॥ ३ ॥ मुनी देखतां मूख हें चित्त ध्याय । देह मांडला भाव हा बापमाय । तुक्या लागलें मानसीं देवपीसें । चित्त चोरटें सांवळें रूप कैसें ॥ ४ ॥

॥ ११११३ ॥ असे नांदतू हा हरी सर्वजीवीं । असे व्यापुनी अग्नि हा काष्ठ सर्वी । घटीं बिंबलें बिंब हें ठायिठायीं । तया संगती नासु हा त्यासि नाहीं ॥ धृ० ॥ तन वाचितां क्षीर हें होत नाहीं । पशु भक्षितां पालटे तेंचि देहीं । तया वर्म तो जाणता एक आहे । असे व्यापक व्यापुनी अंतर्बाहे ॥ १ ॥ फळ कर्दळीं सेवटीं येत आहे । असे शोधितां पोकळीमाजी काजे । धीर नाहीं तें वाउगें धीग जालें । फळ पुष्पना यत्न ते व्यर्थ गेले ॥ २ ॥ असें नाम हें दर्पणें सिद्ध केलें । असे बिंब तें या मळा आड ठेलें । कसें शुद्ध नाहीं दिसे साजिरूप । नका वाढवूं सीण हा पुण्यपाप ॥ ३ ॥ करा वर्म ठावें नका सोंग वांयां । तुका वीनवीतो पडों काय पायां । तुज पुत्र दारा धन वासना हे । मग उरलें शेवटीं काय पाहें ॥ ४ ॥

॥ ११११४ ॥ मना सांडि हे वासना दुष्ट खोडी । मती मानसीं एक हे व्यर्थ गोडी । असे होत माझें तुज कांहीं एक । धरीं विठ्ठलीं प्रेम हें पायिं सूख ॥ धृ० ॥ ऐसा सर्वभावें तुज शरण आलों । देहदुःख हें भोगितां फार भ्यालों । भवतारितें दूसरें नाहीं कोणी । गुरु होत कां देव तेहेतीस तीन्ही ॥ १ ॥ जना वासना हे धना थोरि आहे । तुज लागली संगती तेंचि सोये । करीं सर्व संगी परित्यागु ठायीं । तुका विनवीतो मस्तक ठेवुनि पायीं ॥ २ ॥

॥ ११११५ ॥ सुटायाचा कांहीं पाहातों उपाय । तों हे देखें पाय गोवियेले ॥ धृ० ॥ ऐसिया दुःखाचे सांपडलों संदी । हारपली बुद्धि बळ माझें ॥ १ ॥ प्रारब्ध क्रियमाण संचिताचें । वोढत ठायींचें आलें साचें ॥ २ ॥ विधिनिषेधाचे सांपडलों चपे । एकें एक लोपे निवडेना ॥ ३ ॥ सारावें तें वाढे त्याचियाचि अंगें । तृष्णेचिया संगें दुःखी जालों ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां करीं सोडवण । सर्वशक्तिहीन जालों देवा ॥ ५ ॥

॥ ११११६ ॥ भय वाटे पर । न सुटे हा संसार ॥ धृ० ॥ ऐसा पडिलों कांचणी । करीं धांवा ह्मणउनी ॥ १ ॥ विचारितों कांहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । येथें न पुरे दिघावा ॥ ३ ॥

॥ ११२६ ॥ सुरवर येती तीर्थे नित्यकाळ । पेंठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥ धृ० ॥ साक्षभूत नव्हे सांगितली मात । महिमा अत्यद्भुत वर्णवेना ॥ १ ॥ पंचक्रोशीमाजी रीघ नाहीं दोषा । जळती आपैसा अघोर ते ॥ २ ॥ निर्विषय नर चतुर्भुज नारी । अवघा घरोघरीं ब्रह्मानंदू ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्यापें नाहीं पुण्यलेश । जा रे पंढरीस घेई कोटी ॥ ४ ॥

॥ ११२७ ॥ विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड तैसा ॥ धृ० ॥ वादावाद करणें त्यासीं तोंच वरी । गुखाडीची चाड सर तोंच बाहेरी ॥ १ ॥ सौभाग्यसंपन्न हो कां वृद्ध प्रतिष्ठ । चिकरूनि सांडी पायां लागली ते विष्ठ ॥ २ ॥ नाहीं याति कुळ फांसे ओढी तयासी । तुका ह्मणे काय मुद्रासोंग जाळिसी ॥ ३ ॥

॥ ११२८ ॥ देव होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ धृ० ॥ दुष्ट होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ १ ॥ तुका ह्मणे जें दर्पणीं बिंबलें । तें तया बाणलें निश्चयेसीं ॥ २ ॥

॥ ११२९ ॥ कलिधर्म मागें सांगितले संतीं । आचार सांडिती द्विजलोक ॥ धृ० ॥ तेचि काळीं आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेंकती धर्म नव्हे ॥ १ ॥ तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥ २ ॥ देव ह्मणऊनी न येती देऊळा । संसारा वेगळा तरी कां नव्हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥ ४ ॥

॥ ११३० ॥ नमो विष्णुविश्वरूपा मायबापा । अपरा अमुपा पांडुरंगा ॥ धृ० ॥ विनवितों रंक दास मी सेवक । वचन तें एक आइकावें ॥ १ ॥ तुह्मी स्तुति वेद करितां भागला । निवांतचि ठेला नेति नेती ॥ २ ॥ ऋषि मुनि बहु सिद्ध कविजन । वर्णितां ते गुण न सरती ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें काय माझी वाणी । जे तुह्मी वाखाणी कीर्ती देवा ॥ ४ ॥

॥ ११३१ ॥ अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥ धृ० ॥ घातलें वचन न पडेचि खालीं । तूं आह्मां माउली अनाथांची ॥ १ ॥ मज याचकाची पुरवावा आळी । पंढरीनिवासा मायबापा ॥ २ ॥ नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ४ ॥

॥ ११३२ ॥ उदार कृपाळ अनाथांचा नाथ । ऐकसी मात शरणागतां ॥ धृ० ॥ सर्व भार माथां चालविसी त्यांचा । अनुसरलीं वाचा काया मनें ॥ १ ॥ पाचारितां उभा राहासी जवळी । पाहिजे ते काळीं पुरवावें ॥ २ ॥ चालतांही पंथ सांभाळिसी वाटे । वारिसील कांटे खडे हातें ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंता नाहीं तुझ्या दासा । तूं त्यांचा कोंवसा सर्वभावें ॥ ४ ॥

॥ ११३३ ॥ काय कीर्ती करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज ॥ धृ० ॥ मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वांयांविण ॥ १ ॥ होइल थोरपण जाणीवेचा भार । दुरावेन दूर तुझ्या पायीं ॥ २ ॥ अंतरींचा भाव काय कळे लोकां ।

एक मानी एकां देखोवेखीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे पाय आतुडती । ते मज विपत्ति गोड देवा ॥ ४ ॥

॥ ११३४ ॥ मानावया जग व्हावी द्रव्यमाया । नाहीं हे माझिया जीवा चाड ॥ धृ० ॥ तुझ्या पायांसाठीं केली आराणूक । आतां कांहीं एक नको दुजें ॥ १ ॥ करूनियां कृपा करीं अंगीकार । न लवीं उसीर आतां देवा ॥ २ ॥ नव्हे साच कांहीं कळों आलें मना । ह्मणोनि वासना आवरिली ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधि पाववावे ॥ ४ ॥

॥ ११३५ ॥ आतां माझा सर्वभावें हा निर्धार । न करीं विचार आणिकांसी ॥ धृ० ॥ सर्वभावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ १ ॥ लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहीन भरोनि डोळे मुख ॥ २ ॥ निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं । येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ॥ ३ ॥ अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ११३६ ॥ जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आह्मां ॥ धृ० ॥ जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदुःखें ॥ १ ॥ पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणांकारणें कवणें केलीं ॥ २ ॥ आह्मां मरण नाश तूं तंव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूंचि निवडीं हा गुढार । राखवीं साचार तेंचि मज ॥ ४ ॥

॥ ११३७ ॥ यथार्थ वाद सांडुनि उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥ धृ० ॥ चोरा धरितां सांगे कुडोऱ्याचें नांव । दोघांचेही पाव हात जाती ॥ १ ॥ तुका ह्मणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे कांहीं ॥ २ ॥

॥ ११३८ ॥ धीर तो कारण साह्य होतो नारायण । नेदी होऊं सीण वाहों चिंता त्यासांसी ॥ धृ० ॥ सुखें करावें कीर्तन हर्षें गावे हरिचे गुण । वारी सुदर्शन आपणचि कळिकाळ ॥ १ ॥ जीव वेंची माता बाळा जडभारी होतां । तो तों नव्हे दाता प्राकृता त्यासारिखा ॥ २ ॥ हें तों माझ्या अनुभवें अनुभवा आलें जीवें । तुका ह्मणे सत्य व्हावें आहाच नये कारणा ॥ ३ ॥

॥ ११३९ ॥ पुढें आतां कैंचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥ धृ० ॥ सर्वथाही फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥ १ ॥ पांडुरंगा ऐसी नाव । तारूं भाव असतां ॥ २ ॥ तुका ह्मणे चुकती बापा । पुन्हा खेपा सकळा ॥ ३ ॥

॥ ११४० ॥ दूध दहीं ताक पशूचें पाळण । त्यांमध्यें कारण घृतसार ॥ धृ० ॥ तेंचि वर्म आह्मां भाविकांचे हातीं । ह्मणऊनि चित्तीं धरिला राम ॥ १ ॥ लोहो कफ गारा अग्नीच्या काजें । येऱ्हवी तें ओझें कोण वाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे खोरीं पाहारा जतन । ओंवरि हें धन हातीं लागे ॥ ३ ॥

॥ ११४१ ॥ वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ धृ० ॥ करिती घोष जय-

जयकार । जळती दोषांचे डोंगर ॥ १ ॥ क्षमा दया शांती । बाण अभंग हे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । तेचि एक भूमंडळीं ॥ ३ ॥

॥ ११४२ ॥ ऐकें रे जना तुझ्या स्वहिताच्या खुणा । पंढरीचा राणा मनामाजी स्मरावा ॥ धृ० ॥ मग कैचें रे बंधन वाचे गातां नारायण । भवसिंधु तो जाण येचि तीरीं सरेल ॥ १ ॥ दास्य करील कळिकाळ बंद तुटेल मायाजाळ । होतील सकळ रिद्धि-सिद्धि ह्मणियारीं ॥ २ ॥ सकळशास्त्रांचें सार हें वेदांचें गव्हर । पाहातां विचार हाचि करिती पुराणें ॥ ३ ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र चांडाळां आहे अधिकार । बाळें नारीनर आदि करोनि वेश्याही ॥ ४ ॥ तुका ह्मणे अनुभवें आह्मीं पाडियलें ठावें । आणीकही दैवें सुख घेती भाविकें ॥ ५ ॥

॥ ११४३ ॥ न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥ धृ० ॥ अविनाश सुख देईल निर्वाणी । चुकतील खाणी चौऱ्याशींच्या ॥ १ ॥ आणिकियां जीवां होईल उद्धार । ते ही उपकार घडती कोटी ॥ २ ॥ आहिक्य परत्रीं होसील सरता । उच्चारीं रे वाचा रामराम ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥ ४ ॥

॥ ११४४ ॥ कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ॥ धृ० ॥ मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणे ॥ १ ॥ आणीकही भोग आणिकां इंद्रियांचे । नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं ॥ २ ॥ रूप दृष्टि धाय पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां रे नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी करितोसी ॥ ४ ॥

॥ ११४५ ॥ बैसोनि निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल तो अन्नवस्त्रदाता ॥ धृ० ॥ काय आह्मां करणें अधिक सांचुनी । देव जाला ऋणी पुरविता ॥ १ ॥ दयाळ मयाळ जाणे कळवळा । शरणागतां लळा राखों जाणे ॥ २ ॥ न लगे मागणें सांगणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥ ३ ॥ तुका ह्मणे लेईं अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ॥ ४ ॥

॥ ११४६ ॥ सोनियांचा कळस । माजी भरिला सुरारस ॥ धृ० ॥ काय करावें प्रमाण । तुह्मी सांगा संतजन ॥ १ ॥ मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांट ॥ २ ॥ तुका ह्मणे हित । तें मज सांगावें त्वरित ॥ ३ ॥

## शेतावर अभंग.

॥ ११४७ ॥ शेत करा रे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥ धृ० ॥ नाहीं वेठी बेगा सारा । जाहाती नाहीं ह्मणियारा । सरिक नाहीं रे दुसरा । धनी सारा तुझा तूं ॥ १ ॥ जपतप नांगरणी । न लगे आडी दुनवणी ॥ २ ॥ कर्म कुळवणी । न लगे धर्मपाळी सोन्ही ॥ ३ ॥ ज्ञानपाभारी तीं फणी । न लगे करावी पेरणी ॥ ४ ॥ बीज न लगे संचिताचें । पीक पिकलें भयींचें ॥ ५ ॥ नाहीं यमाचें चोरटें । विठ्ठल पागोऱ्याच्या भेटें ॥ ६ ॥ पीक न

॥ ११५५ ॥ हरिसुं मिळ दे एकाहि बेर । पाछें तूं फिर नावे घर ॥ धृ० ॥ मात सुनो बुति आवे मनावन । जाया करति भर जोबन ॥ १ ॥ हरिसुख मोहि कहिया न जाये । तब तूं बुझे आगो पाये ॥ २ ॥ देखहि भाव कछु पकरि हात । मिळाइ तुका प्रभुसात ॥ ३ ॥

॥ ११५६ ॥ क्या कहूं नहीं बुझत लोका । लिजावे जम मारत धका ॥ धृ० ॥ क्या जीवनेकी पकडी आस । हातों लिया नहि तेरा घांस ॥ १ ॥ किसे दिवाने कहता मेरा । कछु जावे तन तूं सब ल्या न्यारा ॥ २ ॥ कहे तुका तू भया दिवाना । आपना बिचार कर ले जना ॥ ३ ॥

॥ ११५७ ॥ कब मरूं पाऊं चरन तुह्मारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥ धृ० ॥ जग रडे ज्याकुं सो मोहि मीठा । मीठा दर आनंदमाहि पैठा ॥ १ ॥ भला पाऊं जनम इन्हे बेर । बस मायाके असंग फेर ॥ २ ॥ कहे तुका धन मानहि दारा । वोहि लिये गुंडलीया पसारा ॥ ३ ॥

॥ ११५८ ॥ दासों पाछें दौरे राम । सोवे खडा आपें मुकाम ॥ धृ० ॥ प्रेमसरडी बांधी गले । खैंच चले उधर ॥ १ ॥ आपने जनसुं भुल न देवे । करहि धर आघें बाट बतावे ॥ २ ॥ तुकाप्रभु दीनदयाला । वारि रे तुज पर हुं गोपाला ॥ ३ ॥

॥ ११५९ ॥ ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोरहि काम ॥ धृ० ॥ इतने गोते काहे खाता । जब तूं आपना भूल न होता ॥ १ ॥ अंतरजामी जानत साचा । मनका एक उपर बाचा ॥ २ ॥ तुकाप्रभु देसबिदेस । भरिया खाली नहि लेस ॥ ३ ॥

॥ ११६० ॥ मेरे रामको नाम जो लेवे बारोंबार । त्याके पाउं मेरे तनकी पैजार ॥ धृ० ॥ हांसत खेलत चालत बाट । खाना खाते सोते खाट ॥ १ ॥ जातनसुं मुजे कछु नहिं प्यार । असतेके नाहिं हेंतु धेड चांभार ॥ २ ॥ ज्याका चित लगा मेरे रामको नाम । कहे तुका मेरा चित लगा त्याके पाव ॥ ३ ॥

॥ ११६१ ॥ आपे तरे त्याकी कोण बराई । औरनकूं भलो नाम घराई ॥ धृ० ॥ काहे भूमि इतना भार राखे । दुभत धेनु नहि दुध चाखे ॥ १ ॥ बरसतें मेघ फलतेंहें बिरखा । कोन काम आपनी उन्होंति रखा ॥ २ ॥ काहे चंदा सुरज खावे फेरा । खिन एक बैठन पावत घेरा ॥ ३ ॥ काहे परिस कंचन करे धातू । नहि मोल तुटत पावत घातू ॥ ४ ॥ कहे तुका उपकार हि काज । सब कररहिया रघुराज ॥ ५ ॥

॥ ११६२ ॥ जग चले उस घाट कोन जाय । नाहिं समजत फिरफिर गोते खाय ॥ धृ० ॥ नाहिं एकदो सकल संसार । जो बुझे सो आगला स्वार ॥ १ ॥ उपर स्वार बैठे कृष्णापीठ । नहि बाचे कोइ जावे लुठ ॥ २ ॥ देखहि डर फेर बैठा तुका । जोबत मारग रामहि एका ॥ ३ ॥

॥ ११६३ ॥ भले रे भाई जिन्हें किया चीज । अछा नहि मिलत बीज ॥ धृ० ॥ फीरत फीरत पाया सारा । मीलत लोले धन किनारा ॥ १ ॥ तीरथ बरथ फिर पाया जोग । नाहिं तलमल तुटत भवरोग ॥ २ ॥ कहे तुका मैं ताको दास । नहि सिरभार चलावे पास ॥ ३ ॥

॥ लाल कमलि वोढे पेनाये । मोसु हरियें कैसें बनाये ॥ धृ० ॥ कहे सखि
सोर । हिरदा हरिका कठिन कठोर ॥ १ ॥ नहिं किया काम कछु लाज ।
बहुत हे भाज ॥ २ ॥ और नामरूप नहिं गोवालिया । तुकाबनु माखन
॥
॥ राम कहो जीवना फल सोही । हरिभजनसुं विनेव न कांई ॥ धृ० ॥
दर कवनकी जोपरी । एकरामबिन सबहि फुकरी ॥ १ ॥ कवनकी काया
ाया । एकरामबिन सबहि जाया ॥ २ ॥ कहे तुका सबहि बनजार । एक-
हें बा सारा ॥ ३ ॥
॥ काहे भुला धनसंपत्तीघोर । रामराम सुन गाउ हो बाप रे ॥ धृ० ॥
सब कहे तूं आपना । जब काल नहीं पाया ठाना ॥ १ ॥ माया मिथ्या
धंदा । तजो अभिमान भजो गोबिंदा ॥ २ ॥ राना रंक डुंगरकी राई ।
करे इलाही ॥ ३ ॥
॥ काहे रोवे आगले मरना । गंव्हार तूं भुला आपना ॥ धृ० ॥ केते मालुम
नव्हे बडे गये सो ॥ १ ॥ बाप भाई लेखा नहीं । पाछे तूंहि चलनार ॥ २ ॥
सिपत भये । खबर पकडो तुका कहे ॥ ३ ॥
८ ॥ क्या मेरे राम कवण सुख सारा । कहकर दे पुछुं दास तुम्हारा ॥ धृ० ॥
की कोन बराई । व्याधपीडादि स काटहि खाई ॥ १ ॥ कीन बचाऊ तों नाम
ाहि छुटा पछतऊं घेरा ॥ २ ॥ कहे तुका नहिं समजत नाम । तुम्हारे शरन हे
त ॥ ३ ॥
॥ देखत आखों झुटा कोरा । तो काहे छोरा बारबार ॥ धृ० ॥ मनसुं
हिये पाख । उपर खाक पसारा ॥ १ ॥ कामक्रोधको संसार । वो सिरभार
२ ॥ कहे तुका वो संन्यास । छोडे आस तनकीही ॥ ३ ॥
० ॥ रामभजन सब सार मिठाई । हरि संताप जनमदुख रांई ॥ धृ० ॥
त सकरपारे । हरते भुक नहिं अंततारे ॥ १ ॥ खावते जग सब चलिजावे ।
फिर पचतावे ॥ २ ॥ कहे तुका रामरस जो पावे । बहुरि फेरा वो कबहु न
॥
१ ॥ बारबार काहे मरत अभागी । बहुरि मरन संक्या तोरेभागी ॥ धृ० ॥
न करते क्या ना होय । भजन भगति करे वैकुंठे जाय ॥ १ ॥ राम नाम मोल
कबरी । वोहि सब माया छुरावत झगरी ॥ २ ॥ कहे तुका मनसुं मिल राखो ।
व्हा नित्य चाखो ॥ ३ ॥
२ ॥ हम उदास तीन्हके सुनाहो लोका । रावणमारके बिभीषण दिई लंका
गोबरधन नखपर गोकुल राखा । बर्सन लागा जब मेघु धाराका ॥ १ ॥
क काल कौंसासुरका । देत डुबाय सब मंगाय गोपिका ॥ २ ॥ खांभ फोड
या कश्यपका । प्रल्हादके लियें कहे भाई तुकयाका ॥ ३ ॥

# साख्या.

॥ ११७३ ॥ तुका बस्तर विचारा क्या करे रे । अंतर भगवान होय । भीतर मैला केंव मिटे रे । मरे उपर धोय ॥ १ ॥

॥ ११७४ ॥ रामराम कहे रे मन औरसुं नहिं काज । बहुत उतारे पार । आघे राख तुकाकी लाज ॥ १ ॥

॥ ११७५ ॥ लोभींकें चित धन बैठे । कामीन चित काम । माताके चित पुत बैठे । तुकाके मन राम ॥ १ ॥

॥ ११७६ ॥ तुका पंखिबहिरन मानुं । बोई जनावर बाग । असंतनकु संत न मानूं । जे वर्मकुं दाग ॥ १ ॥

॥ ११७७ ॥ तुका राम बहुत मिठा रे । भर राखूं शरीर । तनकी करूं नावरि उतारूं पैल तीर ॥ १ ॥

॥ ११७८ ॥ संतन पन्हयां लें खडा । राहूं ठाकुरद्वार । चलत पाछेंहुं फिरों । रज उडत लेऊं सीर ॥ १ ॥

॥ ११७९ ॥ तुकाप्रभु बडो न मनुं न मानूं बडो । जिसपास बहु राम । बलिहारि उस मुखकी । जिसती निकसे राम ॥ १ ॥

॥ ११८० ॥ राम कहे सो मुख भलारे । खाये खीर खांड । हरिबिन मुखको धूल परी रे । क्या जानि उस रांड ॥ १ ॥

॥ ११८१ ॥ राम कहे सो मुख भला रे । बिन रामसे बीख । आब न जानूं रमते बेरों । जब काल लगावे सीख ॥ १ ॥

॥ ११८२ ॥ कहे तुका मैं सवदा बेचूं । लेवेके तन हार । मिठा साधुसंतजनरे । मुरुखके सिर मार ॥ १ ॥

॥ ११८३ ॥ तुका दास तिनका रे । रामभजन निरास । क्या बिचारे पंडित करो रे । हात पसारे आस ॥ १ ॥

॥ ११८४ ॥ तुका प्रीत रामसुं । तैसी मिठी राख । पतंग जाय दीप परे रे । करे तनकी खाक ॥ १ ॥

॥ ११८५ ॥ कहे तुका जग भुला रे । कह्या न मानत कोय हात परे जब कालके । मारत फोरत डोय ॥ १ ॥

॥ ११८६ तुका सुरा नहि सबदका रे । जब कमाई न होये । चोट साहे घनकि रे । हिरा नीबरे तोये ॥ १ ॥

॥ ११८७ ॥ तुका सुरा बहुत कहावे । लडत विरला कोये । एक पावे उंच पदवी । एक खोसा जोये ॥ १ ॥

॥ ११८८ ॥ तुका माऱ्या पेटका । और न जाने कोये । जपता कछु रामन । हरिभगतनकी सोये ॥ १ ॥

॥ काफर सोही आपण बुझे । आला दुनियां भर । कहे तुका तुझें सुनो रे
ा जिन्होंका कठोर ॥ १ ॥
॥ भीस्त न पावे मालथी । पढीया लोक रिझाये । निचा जथें कमतरिन ।
ऌ खाये ॥ १ ॥
॥ फल पाया तो खुस भया । किन्होंसुं न करे बाद । बान न देखें मिरगा
लाया नाद ॥ १ ॥
॥ तुका दास रामका । मनमे एकहि भाव । तो न पालटू आव ॥ अहि
१ ॥
॥ तुका रामसुं चित बांध राखूं । तैसा आपनी हात । धेनु बछरा छोर
र छुटे सात ॥ १ ॥
॥ चितसुं चित जब मिले । तब तनु थंडा होये । तुका मिलनां जिन्होंसुं ।
कोये ॥ १ ॥
॥ चित मिले तो सब मिले । नहिं तो फुकट संग । पानी पथर थेकसी
भिगे अंग ॥ १ ॥
॥ तुका संगत तीन्हसें कहिये । जिनथें सुख दुनाये । दुर्जन तेरा मू
ो प्रेम घटाये ॥ १ ॥
॥ तुका मिलना तो भला । मनसुं मन मिल जाय । उपर उपर माटि
ाकि कोन बराई ॥ १ ॥
॥ तुका कुटुंब छोरे रे । लरके जोरों सिर मुंडाय । जबये इच्छा नहि
ू किया काय ॥ १ ॥
॥ तुका इच्छा मीटई तो । काहा करे जट खाक । मथीया गोला डार-
ाहिं मिले फेरन ताक ॥ १ ॥
॥ कीर मे रे साइंयाके । तुका चलावे पास । सुरा सोहि लेर हमसें । छोरे
॥ १ ॥
॥ कहे तुका भला भया । हुं हुवा संतनका दास । क्या जानूं केते मरता ।
ी मनकी आस ॥ १ ॥
॥ तुका और मिठाई क्या करूं रे । पाले बिकारपिंड । राम कहावे सो
माखन खांडखीर ॥ १ ॥
॥ ह्मणती नाहीं रे संचित । न करीं न करीं ऐसी मात ॥ धृ० ॥ लाहो येई
। जन्म जाऊं नेदीं साचा ॥ २ ॥ गळा पडेल यमफांसीं । मग कैंचा हरि
॥ पुरलासाठीं देहाडा । ऐसें न ह्मणे न ह्मणे मूढा ॥ ३ ॥ नरदेह दुबळा ।
रे चांडाळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे सांगों किती । सेकीं तोंडीं पडेल माती ॥ ५ ॥
॥ संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ धृ० ॥

बहु धड जरी जाली ह्मैस गाय । तरी होईल काय कामधेनू ॥ १ ॥ तुका ह्मणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥ २ ॥

॥ १२०५ ॥ नाहीं संतपण मिळतें हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥ धृ० ॥ नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥ १ ॥ तुका ह्मणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥ २ ॥

॥ १२०६ ॥ नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरीं संदेह कांहीं मनीं ॥ धृ० ॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां । आणोनि संमता संतांचिया ॥ १ ॥ नाम ह्मणे तया आणिक साधन । ऐसें हें वचन बोलों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख पावे या वचनीं । ज्याचीं शुद्ध दोन्हीं मायबापें ॥ ३ ॥

॥ १२०७ ॥ सुखें होतों कोठें घेतली सुती । बांधविला गळा आपुले हातीं ॥ धृ० ॥ काय करूं बहु गुंतलों आतां । नये सरतां मागें पुढें ॥ १ ॥ होतें गांठीं तें सरलें येतां । आणिक माथां ऋण जालें ॥ २ ॥ सोंकरिलियाविण गमाविलें पिक । रांडापोरें भिके लावियेलीं ॥ ३ ॥ बहुतांचीं बहु घेतलीं घरें । न पडे पुरें कांहीं केल्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं न धरावी आस । जावें हें सर्वस्व टाकोनियां ॥ ५ ॥

॥ १२०८ ॥ नं मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरे तें ॥ धृ० ॥ आड आला म्हून फोडियेला डोळा । बळीनें आंधळा शुक्र केला । करी देव तरी काय नव्हे एक । कां तुह्मी पृथक सिणा वांयां ॥ १ ॥ उल्लंघूनियां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेऊनि गेल्या । अवघेचि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखियेली ॥ २ ॥ पितियासी पुत्रें केला वैराकार । प्रल्हादें असुर मारविला ॥ बहुत विघ्नें केलीं तया आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ॥ ३ ॥ गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती । तयांसी दिलें तें कवणासी नाहीं । अवघा अंतर्बाही तोचि जाला ॥ ४ ॥ देव जोडे ते करावें अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें । तुका ह्मणे हा जाणतो कळवळा । ह्मणोनि अजामेळा उद्धरिलें ॥ ५ ॥

॥ १२०९ ॥ अरे गिळिलें हो संसारें । कांहीं तरि राखा खरें । दिला करुणाकरें । मनुष्यदेह सत्संग ॥ धृ० ॥ येथें न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड । उठाउठीं गोड । बीजें बीज वाढवा ॥ १ ॥ केलें तें क्रियमाण । जालें तें संचित ह्मण । प्रारब्ध जाण । उरवरित उरलें तें ॥ २ ॥ चित्त खोटें चालीवरी । रोग भोगाचे अंतरीं । रसने अनावरी । तुका ह्मणे ढुंग वाहे ॥ ३ ॥

॥ १२१० ॥ अभ्र तापलिया कायाचि होमे । तापत्रयें संतप्त होती । संचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके संसारस्थिती ॥ धृ०॥ राहाटघटिका जैसी फिरतांचि राहिली । भरली जाती एके रितीं । साधीं हा प्रपंच पंचाय अन्न । तेणें पावसील निजशांति रे । नारायणनाम नारायणनाम । नित्य करीं काम जिव्हामुखें । जन्मजराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळही दुःखें ॥ १ ॥ शीत उष्ण वन सेवितां कपाट । आसनसमाधि साधीं । तप तीर्थ दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी । भोगाभोग तेथें न

। जन्मजरादुःखव्याधी । साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अवि-
१ ॥ घोकितां अक्षर अभिमानविधी । निषेध लागला पाठी । वाद करितां
ष । होय वज्रलेपो भविष्यति । दूषणाचें मूळ भूषण तुका ह्मणे । सांडीं
रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहें भलतिया स्थिती ॥ ३ ॥

नव्हे गुरुदास्य संसारियां । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां । तैसें नाम
। जया सायास न लगती ॥ धृ० ॥ ह्मणोनि गोड सर्वभावें । आंघोळी
गावें । अर्थचाड जीवें । न लगे भ्यावें संसारा ॥ १ ॥ कर्मा तंव न पुरे
तंव फळदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ॥ २ ॥ न लगे
। आगमनिगमाचें देखणें । अवघें तुका ह्मणे । विठ्ठलनामें आटलें ॥ ३ ॥

नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥ धृ० ॥
त्याचें तो सांभाळी । मग नये काळि अंगावरी ॥ १ ॥ आपलिया इच्छा
री । न बाधी ते थोरीं येणें क्षोभें ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडा देखीचे
तींचें दुःख गांड फाडी ॥ ३ ॥

सत्य सत्यें देतें फळ । नाहीं लागतचि बळ ॥ धृ० ॥ ध्यावे देवाचे ते
ळ उपाय ॥ १ ॥ करावीच चिंता । नाहीं लागत तत्वता ॥ २ ॥ तुका
ण ह्मणवितां बरवें ॥ ३ ॥

साधक जाले कळी । गुरुगुडीची लांब नळी ॥ धृ० ॥ पचीं पडे मद्य-
ी हें साधन ॥ १ ॥ अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडी भर ॥ २ ॥
ळ । पिंड दंड भंगपाळ ॥ ३ ॥ सेवा मानधन । बरे इच्छेनें संपन्न ॥ ४ ॥
ाडी । तुका बोडोनियां सोडी ॥ ५ ॥

मज पाहतां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ सांवीं देवा ॥ धृ० ॥
ासीं न धरे संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ॥ १ ॥ काढा जी आपुलें
। नका लावूं बळें वेड आह्मां ॥ २ ॥ जीव शिव कांहीं ठेवियेलीं नांवें ।
आसोनियां ॥ ३ ॥ सेवेच्या अभिलाषें न धराचि विचार । आह्मां
लें ॥ ४ ॥ आहे तैसें आतां कळलियावरी । परतें सांडा दुरी दुर्जनपण
णे काय छायेचा अभिलाष । हंस पावे नाश तारागणीं ॥ ६ ॥

पंचभूतांचा गोंधळ । केला एकेठायीं मेळ । लाविला सबळ । अहंकार
॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी हें ओझें । देह केवीं रिझे । हें
॥ १ ॥ जीव न देखे मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण ।
शुभा ॥ २ ॥ इच्छा वाढवी ते वेल । खुंटावा तो खरा बोल । तुका ह्मणे
तें पावेल ॥ ३ ॥

पुसावेंसें हेंचि वाटे । जें जें भेटे तयासी ॥ धृ० ॥ देव कृपा करील मज ।
ील ॥ १ ॥ अवधियांचा विसर जाला । हा राहिला उद्योग ॥ २ ॥ तुका
। कोण भेटे सांगेसे ॥ ३ ॥

॥ १२१८ ॥ जाला तुह्मी माझें जाणतें मीपण । येणें माझा खुण मांडियेला ॥ धृ० ॥ खादलें पचे तरिच तें हित । ओकलिया यीत पिंड पीडी ॥ १ ॥ तरि भलें भोगे जोडिलें तें धन । पडिलिया खानें जीवनासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तारीं गा विठ्ठला । नेणतांचि भला दास तुझा ॥ ३ ॥

॥ १२१९ ॥ याती मतिहीन रूपें लीन दीन । आणिक अवगुण जाणोनियां ॥ धृ० ॥ केला त्या विठ्ठलें माझा अंगिकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥ १ ॥ जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचित काळों चित्ता ॥ २ ॥ जालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी नांवाचा अभिमान । ह्मणोनि शरण तारी बळें ॥ ४ ॥

॥ १२२० ॥ बहु उतावीळ भक्तिचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥ धृ० ॥ तुझ्यापायीं मज जालासे विश्वास । ह्मणोनियां आस मोकलिली ॥ १ ॥ ऋषि मुनि सिद्ध साधक अपार । कळला विचार त्यांसी तुझा ॥ २ ॥ नाहीं नास तें सुख दिलें तयांस । जाले जे उदास सर्वभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुख न माये मानसीं । धरिलें जीवेंसीं पाय तुझे ॥ ४ ॥

॥ १२२१ ॥ मायामोहजाळीं होतों सांपडला । परि या विठ्ठला कृपा आली ॥ धृ० ॥ काढूनि बाहेरी ठेविलों निराळा । कवतुक डोळां दाखविलें ॥ १ ॥ नाचे उडे माया करी कवतुक । नाशवंत सुखें साच केलीं ॥ २ ॥ रडे फुंदे दुःखें कुटितील माथा । एकासी रडतां तेंही मरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज वाटतें नवल । मी माझें हे बोल ऐको-नियां ॥ ४ ॥

॥ १२२२ ॥ देहभाव आह्मी राहिलों ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ॥ धृ० ॥ आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तोचि पुढें देव करीतसे ॥ १ ॥ ह्मणउनी नाहीं सुख दुःख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ॥ २ ॥ जालों मी निःसंग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों जयाचे अंकित । तोचि माझें हित सर्व जाणे ॥ ४ ॥

॥ १२२३ ॥ आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरि तें जतन होय देठीं ॥ धृ० ॥ नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धी । व्यभिचारबुद्धि न पवतां ॥ १ ॥ चालिला पंथ तो पाववील ठाया । जरि आड तया नये कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हानि लाभ ॥ ३ ॥

॥ १२२४ ॥ निरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥ धृ० ॥ ह्मणऊनि जीवा न साहे संगती । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ १ ॥ देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला यांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे देव अंतरे ज्यामुळें । आशा-मोहजाळें दुःख वाढे ॥ ३ ॥

॥ १२२५ ॥ तुजशीं संबंधचि खोटा । परता परता रे योटा ॥ धृ० ॥ देवा तुझें काय

घ्यावें । आप आपणां ठकावें ॥ १ ॥ जेथें मुद्दल न ये हातां । त्याज मराव [illegible]
॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥ ३ ॥
॥ १२२६ ॥ याचि हाका तुझे द्वारीं । सदा देखों ऋणकरी ॥ धृ० ॥ [illegible] कारि
खंड दंड । देवा बहु गा तूं लंड ॥ १ ॥ सुखें गोविसी भोजना । [illegible] ॥ २
एकें एक बुझाविसी । तुका ह्मणे ठक होसी ॥ ३ ॥
॥ १२२७ ॥ आह्मी जाणों तुझा भाव । दृढ धरियेले पाव ॥ धृ० ॥ [illegible] चुक
वितां । नेघों थोडें बहु देतां ॥ १ ॥ बहुता दिसाचें तिगाड । [illegible] ॥ २
तुका ह्मणे आतां । ने घों सर्वस्वही देतां ॥ ३ ॥
॥ १२२८ ॥ ऋण वैर हत्या । हें तों न सुटे नेदितां ॥ धृ० ॥ हे कां नेणां पांडुरंगा
तुह्मी सांगतसां जगा ॥ १ ॥ माझा संबंध तो किती । चुकवा [illegible] ॥ २
तुका ह्मणे याचि साठीं । मज न घेतां नये तुटी ॥ ३ ॥
॥ १२२९ ॥ नाहीं मागितला । तुह्मां मान म्यां विठ्ठला ॥ धृ० ॥ [illegible] कराव
फजिती । माझी एवढी जना हातीं ॥ १ ॥ नाहीं केला पोट । पुढें [illegible] ॥ २
तुका ह्मणे धरुनी हात । नाहीं नेलें दिवाणांत ॥ ३ ॥
॥ १२३० ॥ तूं पांढरा स्फटिक मणी । करिसी आणिकां [illegible] ॥ धृ० ॥ ह्मणो
तुझ्या हरा । न येत ठकती दातारा ॥ १ ॥ तुझी ठावी नांदणूक । [illegible] बुडवि
लोक ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचें घेसी । त्यास हेंचि दाखविसी ॥ ३ ॥
॥ १२३१ ॥ बोलतों निकुरें । नव्हेत सलगीचीं उत्तरें ॥ धृ० ॥ [illegible] संतापलें म
परपीडा ऐकोन ॥ १ ॥ अंगावरि आलें । तोंवरि जाईल सोसिलें ॥ २ ॥ तुज भक्त
आण देवा । जरि तुका येथें ठेवा ॥ ३ ॥
॥ १२३२ ॥ बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठवितां चित्तीं [illegible] ॥ धृ
आणिकां उपायां कोण वांटी मन । सुखाचें निधान पांडुरंग ॥ १ ॥ [illegible] गावों न
छंदें वावों टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें एके [illegible] । अ
केला भोळीं भावें उभा ॥ ३ ॥ लंदिका हा केला संवसारसिंधु । [illegible] बंधु न
पुढें ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्याच्या नामाचे अंकित । राहिलों निश्चित [illegible] बळें ॥
॥ १२३३ ॥ न लगे मायेसी बाळें निरवावें । आपुल्या स्वभावें [illegible] त्यासी ॥ धृ
मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथां ॥ १ ॥ [illegible]
त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥ २ ॥ [illegible] गुंतले उम
आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥ ३ ॥ त्याच्या दुःखेपणें [illegible] । लाही
वरी होय जैसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे देह विसरे आपुला । आघात तो [illegible] नेदी ।
॥ १२३४ ॥ ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धी । [illegible] विच्या
॥ धृ० ॥ जयासी नावडे हरिनामकीर्तन । आणीक नृत्य न [illegible] ॥ १ ॥
त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अंत्यजाचा ॥ २ ॥ [illegible] ह्मणे येथें
आनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ट होय ॥ ३ ॥

॥ १२३५ ॥ ब्राह्मण तो याती अंत्यज असतां । मानावा तत्वता निश्चयेसीं ॥ धृ० ॥ रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥ १ ॥ शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे गेल्या षडऊर्मी अंगें । सांडुनियां मग ब्रह्मचि तो ॥ ३ ॥

॥ १२३६ ॥ एक करिती गुरु गुरू । भोंवता भारु शिष्यांचा ॥ धृ० ॥ पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ १ ॥ परस्त्री मद्यपान । पेंडखान माजविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ॥ ३ ॥

॥ १२३७ ॥ एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ॥ धृ० ॥ पाप न लगे धुंडावें । लागेल तेणें तेथें जावें ॥ १ ॥ कांहीं दुसरा विचार । न लगे करावाचि फार ॥ २ ॥ असत्य जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ॥ ३ ॥ सत्य बोले मुखें । तेथें उचंबळती सुखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे दोन्ही । जवळीच लाभहानी ॥ ५ ॥

॥ १२३८ ॥ जळतें संचित । ऐसी आहे धर्म नीत ॥ धृ० ॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय ॥ १ ॥ नेदी कर्म घडों । कोठें आडराणें पडों ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । राहों नेदी ताप जाळ ॥ ३ ॥

॥ १२३९ ॥ संतापाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उर फोडी ॥ धृ० ॥ बासर तो भुंके गाढवाचेपरी । उडे पाठीवरि दंड तेणें ॥ १ ॥ समय नेणे तें वेडें चाह्राटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे काय वांयां चाळवणी । पिटपिटघाणी हागवणेची ॥ ३ ॥

॥ १२४० ॥ घेसी तरी घेईं संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥ धृ० ॥ सर्वभावें त्यांचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥ १ ॥ करिसील तो करीं संतांचा सांगत । आणीक ते मात नको मना ॥ २ ॥ बैससी तरी बैस संतांच मधीं । आणीक ते बुद्धि नको मना ॥ ३ ॥ जासी तरि जाईं संतांचिया गांवा । होईल विसावा तेथें मना ॥ ४ ॥ तुका ह्मणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥ ५ ॥

॥ १२४१ ॥ संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ॥ धृ० ॥ तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥ १ ॥ संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ २ ॥ संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ३ ॥ संतांचा उदीम उपदेशाची पेंठ । प्रेमसुखासाठीं घेती देतीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेथें आणिक नाहीं परी । ह्मणोन भिकारी जालों त्यांचा ॥ ५ ॥

॥ १२४२ ॥ संतांचें सुख जालें या देवा । ह्मणऊनि सेवा करी त्यांची ॥ धृ० ॥ तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥ १ ॥ निर्गुण आकार जाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ॥ २ ॥ तीर्थें त्यांची इच्छा करिती नित्यकाळ । व्हावया निर्मळ आपणांसी ॥ ३ ॥ अष्टमा सिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोणी तया ॥ ४ ॥ तुका ह्मणे ते बळिया शिरोमणी । राहिलों चरणीं निकटवासें ॥ ५ ॥

॥ १२४३ ॥ जो मानी तो देईल काई । न मनी तो नेईल काई ॥ धृ० ॥ आह्मां

विठ्ठल सर्वभूतीं । राहो चित्तीं भलतैसा ॥ १ ॥ आधीन तें जना काई । जल्पें वांयांविण ठायीं ॥ २ ॥ वंदी निंदी तुज तो गा । तुका ह्मणे पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १२४४ ॥ भावबळें कैसा जालासी लहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥ धृ० ॥ तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥ १ ॥ पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आलिंगूनि मिठी देइन पायीं ॥ २ ॥ चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे उत्कंठित वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥ ४ ॥

॥ १२४५ ॥ कृपाळू ह्मणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥ धृ० ॥ आणीक उपाय नेणेंचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥ १ ॥ नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥ २ ॥ कृपा करिसी तरि थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥ ४ ॥

॥ १२४६ ॥ सर्वभावें आलों तुजाचि शरण । कायावाचामनेंसहित देवा ॥ धृ० ॥ आणीक दुसरें नये माझ्या मना । राहिली वासना तुझ्या पायीं ॥ १ ॥ माझिये वारचें कांहीं जडभारी । तुजविण वारी कोण एक ॥ २ ॥ तुझे आह्मी दास आमुचा तूं ऋणी । चालत दुरूनी आलें मागें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां घेतलें धरणें । हिशोबाकारणें भेटी देई ॥ ४ ॥

॥ १२४७ ॥ कई मात माझे ऐकती कान । बोलतां वचन संता मुखीं ॥ धृ० ॥ केला पांडुरंगें तुझा अंगीकार । मग होईल धीर माझ्या जीवा ॥ १ ॥ ह्मणऊनि मुख अवलोकितों पाय । होचि मज आहे थोरी आशा ॥ २ ॥ माझिया मनाचा हाचि विश्वास । न करीं सायास साधनांचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज होईल भरवसा । तरलों मी ऐसा साच भाव ॥ ४ ॥

॥ १२४८ ॥ दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं । कष्टलासी साटीं । भक्तिकाजें विठ्ठला ॥ धृ० ॥ भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा । आह्मालागीं सोपा । दैत्यां काळ कृतांत ॥ १ ॥ होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं । ह्मणोनियां घरीं । गौळियांचे अवतार ॥ २ ॥ केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसि देवा । तुका ह्मणे भावा । साटीं हातीं सांपडसी ॥ ३ ॥

॥ १२४९ ॥ गोड जालें पोट धालें । अवचित वाचे आलें । ह्मणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ॥ धृ० ॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । पातकी चांडाळ । नामासाठीं आपुलियां ॥ १ ॥ चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा । ह्मणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥ २ ॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवीं । तुका ह्मणे दावी । रूप तेंचि अरूपा ॥ ३ ॥

॥ १२५० ॥ आंत हरि बाहेर हरी । हरिनें घरीं कोंडिलें ॥ धृ० ॥ हरिनें कामा घातला चिरा । वित्तवरा मुकविलें ॥ १ ॥ हरिनें जीवें केली सांटी । पाडिली तुटी सकळांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे वेगळा नव्हे । हरि भोंवे भोंवताला ॥ ३ ॥

॥ १२९१ ॥ हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥ धृ० ॥ आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥ १ ॥ पारखियांसी सांगता गोष्टी । घरची कुटी खातील ॥ २ ॥ तुका ह्मणे निवांत राहीं । पाहिलें पाहीं धणीवरी ॥ ३ ॥

## भुपाळ्या.

॥ १२९२ ॥ बोलोनी दाऊं कां तुह्मी नेणा जी देवा । ठेवाल तें ठेवा ठायीं तैसा राहेन ॥ धृ० ॥ पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय । ह्मणऊनि पाय जीवीं धरूनि राहिलों ॥ १ ॥ त्यागें भोगें दुःख काय सांडावें मांडावें । ऐसी धरियेली जीवें माझ्या योरी आशंका ॥ २ ॥ तुका ह्मणे मातें बाळा चुकलिया वनीं । न पवतां जननी दुःख पावे विठ्ठले ॥ ३ ॥

॥ १२९३ ॥ ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ । कां हे कळवळ तुज उमटेचि ना ॥ धृ० ॥ आवो पांडुरंगे पंढरीचे निवासे । लावूनियां आस चाळवूनी ठेविलें ॥ १ ॥ काय जन्मा येवूनियां केली म्यां जोडी । ऐसें घडीघडी चित्तां येतें आठवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे खरा न पवेचि विभाग । धिःकारितें जग हेंचि लाहों हिशोबें ॥ ३ ॥

॥ १२९४ ॥ कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन । काय तुह्मी हीन शक्ति जालीसी दिसे ॥ धृ० ॥ लाज येते मना तुझा ह्मणवितां दास । गोडी नाहीं रस बोलिली यासारिखी ॥ १ ॥ लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें । कळों येतें खरें तुजें एकावरुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी कोणें वदविली वाणी । प्रसादवांचूनि तुमचिया विठ्ठला ॥ ३ ॥

॥ १२९५ ॥ जळो माझें कर्म वांयां केली कटकट । जालें तैसें तंट नाहीं आलें अनुभवा ॥ धृ० ॥ आतां पुढें धीर काय देऊं या मना । ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥ १ ॥ गुणवंत केलों दोष जाणायासाठीं । माझें माझें पोटीं बळकट दूषण ॥ २ ॥ तुका ह्मणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा लळा पाळियेला शेवटीं ॥ ३ ॥

॥ १२९६ ॥ कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख । बहु वाटे दुःख फुटों पाहे हृदय ॥ धृ० ॥ कां जी सासुरवासें मज केलें भगवंता । आपुलिया सत्ता स्वाधीनता ते नाहीं ॥ १ ॥ प्रभातेसि वाटे तुमच्या यावें दर्शना । येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥ २ ॥ येथें अवघे वांयां गेले दिसती सायास । तुका ह्मणे नास दिसे जाल्या वेचाचा ॥ ३ ॥

॥ १२९७ ॥ जळोत तीं येथें उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझी तुमचे पाय ॥ धृ० ॥ आतां मज साह्य येथें करावें देवा । तुह्मीं घेईं सेवा सकळ गोवा उगवुनी ॥ १ ॥ भोगें रोगा जोडोनियां दिलें आणिकां । अरुचि ते हो कां आतां सकळांपासूनी ॥ २ ॥ तुका ह्मणे असो तुझें तुझे मस्तकीं । नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें ॥ ३ ॥

॥ १२९८ ॥ न संगतां तुह्मां कळों येतें अंतर । विश्वीं विश्वंभर परिहारचि न लगे ॥ धृ० ॥ परि हे अनावर आवरितां आवडी । अवसान ते घडी पुरों देत नाहीं ॥ १ ॥

काय उणें मज येथें ठेविलिये ठायीं । पोटा आलों तईंपासूनिया समर्थ ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघी आवरिली वासना । आतां नारायणा दुसरियापासूनि ॥ ३ ॥

॥ १२५९ ॥ तुजसवें आह्मीं अनुसरलों अबळा । नको अंगीं कळा राहों हरी हीन देऊं ॥ धृ० ॥ सासुरवासा भीतों जीव ओढे तुजपाशीं । आतां दोहींविशीं लज्जा राखें आमुची ॥ १ ॥ न कळतां संग जाला सहज खेळतां । प्रवर्तली चिंता मागिलांचियावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे असतां जैसें तैसें बरवें । वचन या भावें वेचुनियां विनटलों ॥ ३ ॥

॥ १२६० ॥ रवि दीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें संतांचेनी ॥ धृ० ॥ त्यांचा महिमा काय वर्णू मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥ १ ॥ तापली चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥ २ ॥ मायबापें पिंड पाळियेला माया । जन्ममरण जाया संतसंग ॥ ३ ॥ संतांचें वचन वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूकनिवारण ॥ ४ ॥ तुका ह्मणे जवळीं न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥ ५ ॥

॥ १२६१ ॥ हरि हरि तुह्मीं ह्मणा रे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥ धृ० ॥ आणिका नका कांहीं गाबाळाचे भरी । पडों येथें थोरी नागवण ॥ १ ॥ भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । ह्मणावा पतित वेळोवेळां ॥ २ ॥ तुका ह्मणे हा तंव कृपेचा सागर । नामासाठीं पार पाववील ॥ ३ ॥

॥ १२६२ ॥ ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजा ॥ धृ० ॥ चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ॥ १ ॥ त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥ २ ॥ तुका ह्मणें ग्रामपशू । केला नाशू आयुष्या ॥ ३ ॥

॥ १२६३ ॥ गांठोळीस धन भाकावी करुणा । दावूनि सज्जना कींव पीडी ॥ धृ० ॥ नाठेळाची भक्ति कुचराचें बळ । कोरडें वोंगळ मार खाय ॥ १ ॥ सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विल्हाळ त्या धोंडी पूजा सावी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धंदधंद सिंदळीचे ॥ ३ ॥

॥ १२६४ ॥ कैसें असोनि ठाउकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणा ॥ धृ० ॥ आतां जागें रे भाई जागें रे । चोर निजल्या नाडूनि भागे रे ॥ १ ॥ आतां नका रे भाई नका रे । आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ॥ २ ॥ तुका ह्मणे एकांच्या घायें । कां रे जाणोनि न धरा भये ॥ ३ ॥

॥ १२६५ ॥ मुद्दल जतन जालें । मग लाभाचें काय आलें ॥ धृ० ॥ घरीं देउनि अंतर गांठी । राखा पारिख्यां न सुटे मिठी ॥ १ ॥ घाला पडे थोडेंच वाटे । काम मैंदाचेंच पेटे ॥ २ ॥ तुका ह्मणे वरदळ खोटें । फांसे अंतरिंच्या कपटें ॥ ३ ॥

॥ १२६६ ॥ मज अंगाच्या अनुभवें । कांई वाईट बरें ठावें ॥ धृ० ॥ जालों दोहींचा देखणा । नये मागें पुढेंही मना ॥ १ ॥ वोस वसती ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥ २ ॥ तुका ह्मणे घेऊं देवा । सर्व करूनि बोळावा ॥ ३ ॥

॥ १२६७ ॥ पाववावें ठाया । ऐसें सवें बोलों तया ॥ धृ० ॥ भावा ऐसी क्रिया राखे ।

खोट्या खोटेपणें वाखे ॥ १ ॥ न ठेवूं अंतर । कांहीं भेदाचा पदर ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें-भावें । सत्या मानविजे देवें ॥ ३ ॥

॥ १२६८ ॥ मोल देऊनियां सांठवावे दोष । नटाचे ते वेष पाहोनियां ॥ धृ० ॥ हरि-दासां मुखें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यें पुण्य विशेषता ॥ १ ॥ हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेशें । पाप त्यासरिसें मात्रागमन ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहा ऐसें जालें जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥ ३ ॥

॥ १२६९ ॥ बहुक्षीदक्षीण । आलों सोसुनियां वन ॥ धृ० ॥ विठोबा विसांवया विसां-वया । पडों देई पायां ॥ १ ॥ बहुतां काकुलती । आलों सोसिली फाजिती ॥ २ ॥ केली तुजसाटीं । तुका ह्मणे येवढी आटी ॥ ३ ॥

॥ १२७० ॥ कांगा धर्म केला । असोन सत्तेचा आपुला ॥ धृ० ॥ उभाउभीं पाय जोडी । आतां फांकों नेदीं घडी ॥ १ ॥ नको सोडूं ठाव । आतां घेऊं नेदीं वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छा । तैसा करीन सरिसा ॥ ३ ॥

॥ १२७१ ॥ तुमची तों भेटी नव्हे ऐसी जाली । कोरडीच बोली ब्रह्मज्ञान ॥ धृ० ॥ आतां न बोलावें ऐसें वाटे देवा । संग न करावा कोणांसवें ॥ १ ॥ तुह्मां निमित्यासी सांपडलें अंग । नेदावा हा संग विचारिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी राहिली वासना । आवडी दर्शनाचीच होती ॥ ३ ॥

॥ १२७२ ॥ आहे तेंचि आह्मी मागों तुजपाशीं । न नव्हों तुज ऐसीं क्रियानष्टें ॥ धृ० ॥ न बोलावीं तींच वर्में बरें दिसे । प्रकट ते कैसे गुण करूं ॥ १ ॥ एका ऐसें एका खावयाचा मोळा । कां तुह्मां गोपाळा नाहीं ऐसा ॥ २ ॥ तुका ह्मणे लोकां नाहीं कळों आलें । करावें आपुलें जतन तों ॥ ३ ॥

॥ १२७३ ॥ आह्मीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥ धृ० ॥ आहे तैसा असों आतां । चितें चिंता वाढते ॥ १ ॥ बोलिल्याचा मानी सीण । भिन्न भिन्न राहावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मांपाशीं । धीराऐसी जतन ॥ ३ ॥

॥ १२७४ ॥ आह्मांपाशीं याचें बळ । कोण काळवरी तों ॥ धृ० ॥ करुनि ठेलों जीवें-साटीं । होय भेटी तोंवरी ॥ १ ॥ लागलों तों न फिरें पाठी । पडिल्या गांठीं वांचूनी ॥ २ ॥ तुका ह्मणे अवकाशें । तुमच्या ऐसें होवया ॥ ३ ॥

॥ १२७५ ॥ बोलिलेंचि बोलें पडपडताळूनी । उपजत मनीं नाहीं शंका ॥ धृ० ॥ बहुतांची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ बुझाविसी ॥ १ ॥ बहुतांच्या भावें वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तों श्रम न वजे वांयां ॥ ३ ॥

॥ १२७६ ॥ कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज ॥ धृ० ॥ आड कांहीं नये दुजें । फळ बीजें आणिलें ॥ १ ॥ उद्वेग ते वांयांविण । कैंचा सीण चिंतनें ॥ २ ॥ तुका ह्मणे गेला श्रम । तुमच्या धर्में पायांच्या ॥ ३ ॥

१२७७ ॥ संसार तो कोण लेखे । आह्मां सखे हरिजन ॥ धृ० ॥ काळ ब्रह्मानंदें सरे ।

संचली ॥ १ ॥ स्वप्नीं तेही नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥ २ ॥ तुका
। होय सरिसें भोजन ॥ ३ ॥

॥ पडियेलों वनीं थोर चिंतवनी । उसीर कां आझूनि लावियेला ॥ धृ० ॥
ा येई गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां ॥ १ ॥ काय तुज नाहीं
शंका । आपुल्या बाळका मोकलितां ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु खंती वाटे
येलें देवा दुरी दिसे ॥ ३ ॥

॥ आपुले गांवींचें न देखेसें जालें । परदेसी एकलें किती कंठूं ॥ धृ० ॥
हें मूळ येतां वाटे । जीवलग भेटे कोणी तरी ॥ १ ॥ पाहातां अवघ्या
ा । सकळही वोसा दृष्टीपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणी न संगे वारता ।
वता पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ जन तरी देखें गुंतलें प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यासी नाहीं ॥ धृ० ॥
गें परतलें मन । घालणीचें रान देखोनियां ॥ १ ॥ इंद्रियांचा गाजे गोंधळ
ोडीतसे डोई अहंकार ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा वासनेच्या आटें । केलीं
ांचीं ॥ ३ ॥

॥ धांवे त्यासी फावे । दुजे उगवूनि गोवे ॥ धृ० ॥ घ्यावें भरूनियां घर ।
झार ॥ १ ॥ धणी उभें केलें । पुंडलिकें या उगलें ॥ २ ॥ तुका ह्मणे ठसा ।
यां ऐसा ॥ ३ ॥

॥ लाहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥ धृ० ॥ ऐरावत रत्न
अंकुशाचा मार ॥ १ ॥ ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥ २ ॥
ाण । व्हावें लाहनाहुनी लाहन ॥ ३ ॥

॥ नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही दावा ॥ धृ० ॥ महा पुरें
। तेथें लव्हाळे राहाती ॥ १ ॥ येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती
तुका ह्मणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ३ ॥

॥ उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥ धृ० ॥
क्री ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ॥ १ ॥ तुका ह्मणे एक
ई । वरकडा वाहीं शोक असे ॥ २ ॥

॥ आवडीच्या मतें करिती भजन । भोग नारायणें ह्मणती केला ॥ धृ० ॥
प्रणे वेगळें तें काय । अर्थासाठीं डोय फोडूं पाहे ॥ १ ॥ लाजे कमंडल
ठा । आणीक यीगळा प्रावरणा ॥ २ ॥ शाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं ।
ां अवघें मुखें ॥ ३ ॥ तुका ह्मणे यांस देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटि
४ ॥

॥ ह्मणतां हरिदास कां रे नाहीं लाज । दीनास महाराज ह्मणसी दीना
य ऐसें पोट न भरे तें गेलें । हालविसी कुले सभेमाजीं ॥ १ ॥ तुका ह्मणे
टंबना । दीन जाला जना कींव भाकी ॥ २ ॥

॥ १२८७ ॥ रिद्धिसिद्धी दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥ धृ० ॥ लोडें बालिस्तें पलंग सुपती । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥ १ ॥ पुसाल तरि आह्मां वैकुंठींचा वास । परि नाहीं राह्यास ठाव कोठें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचें उणें पुरें ॥ ३ ॥

॥ १२८८ ॥ घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥ धृ० ॥ निरें कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥ १ ॥ आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दुरोनी दिसतसे ॥ २ ॥ काम क्रोध लोभ सिणवी बहुत । मेळवूनि आंत काळकूट ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोलें जाये वांयांविण ॥ ४ ॥

॥ १२८९ ॥ अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघीच दान दिली भूमी ॥ धृ० ॥ अवघाचि काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥ १ ॥ अवघींच तीर्थें व्रतें केले याग । अवघेंचि सांग जालें कर्म ॥ २ ॥ अवघेंचि फळ आलें आह्मां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥ ४ ॥

॥ १२९० ॥ मधुरा ऐसी फळें नाहीं । आलीं कांहीं गळती ॥ धृ० ॥ पकदशे येती थोडीं । नास आढी वेचे तो ॥ १ ॥ विरळा पावे । अवघड गोवे सेवटाचे ॥ २ ॥ उंच निंच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी ॥ ३ ॥ झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणी बहु थोडे ॥ ४ ॥ पावेल तो पैल थडी । ह्मणों गडी आपुला ॥ ५ ॥ तुका ह्मणे उभाऱ्यानें । कोण खरें मानितसे ॥ ६ ॥

॥ १२९१ ॥ अवघ्या उपचारा । एक मनाचि दातारा ॥ धृ० ॥ घ्यावी घ्यावी हेचि सेवा । माझी दुर्बळाची देवा ॥ १ ॥ अवघियाचा ठाव । पायांवरि जीवभाव ॥ २ ॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥ ३ ॥

॥ १२९२ ॥ आली सलगी पायांपाशीं । होइल तैसी करीन ॥ धृ० ॥ आणीक आह्मीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥ १ ॥ अवघ्या निरोपणा भाव । हाचि ठाव उरलासे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाळीं लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥ ३ ॥

॥ १२९३ ॥ देह आणि देहसंबंधें निवावीं । इतरें वंदावीं श्वानशूकरें ॥ धृ० ॥ येणें नांवें जाला मी माझ्याचा झाडा । मोहा नांवें खोडा गर्भवास ॥ १ ॥ गृह आणि वित्त स्वदेशा विटावें । इतरा भेटावें श्वापदझाडां ॥ २ ॥ तुका ह्मणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन ॥ ३ ॥

॥ १२९४ ॥ देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कळिवर ओंवाळूनी ॥ धृ० ॥ नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥ १ ॥ करुणावचनीं लाहो एकसरें । नेसवें दुसरें आड येऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥ ३ ॥

॥ १२९५ ॥ देह नव्हे मी हें खरें । उरला उरे विठ्ठल ॥ धृ० ॥ ह्मणऊनि लाहे करा ।

॥ १२८७ ॥ रिद्धिसिद्धी दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥ धृ० ॥ लोडें बालिस्तें पलंग सुपती । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥ १ ॥ पुसाल तरि आह्मां वैकुंठींचा वास । परि नाहीं राह्यास ठाव कोठें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचें उणें पुरें ॥ ३ ॥

॥ १२८८ ॥ घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥ धृ० ॥ निरें कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥ १ ॥ आशा तृष्णा माया काळवूनि दोन्ही । दंभ तो दुरोनी दिसतसे ॥ २ ॥ काम क्रोध लोभ सिपवी बहुत । मेळवूनि आंत काळकूट ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोलें जाये वांयांविण ॥ ४ ॥

॥ १२८९ ॥ अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघीच दान दिली भूमी ॥ धृ० ॥ अवघाचि काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥ १ ॥ अवघींच तीर्थें व्रतें केले याग । अवघेंचि सांग जालें कर्म ॥ २ ॥ अवघेंचि फळ आलें आह्मां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥ ४ ॥

॥ १२९० ॥ महुरा ऐसी फळें नाहीं । आलीं कांहीं गळती ॥ धृ० ॥ पक्वदशे येती थोडीं । नास आढी वेचे तों ॥ १ ॥ विरळा पावे । अवघड गोवे सेवटाचे ॥ २ ॥ उंच निंच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी ॥ ३ ॥ झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणी बहु थोडे ॥ ४ ॥ पावेल तो पैल थडी । ह्मणों गडी आपुला ॥ ५ ॥ तुका ह्मणे उभाऱ्यानें । कोण खरें मानितसे ॥ ६ ॥

॥ १२९१ ॥ अवघ्या उपचारा । एक मनचि दातारा ॥ धृ० ॥ घ्यावी घ्यावी हेचि सेवा । माझी दुर्बळाची देवा ॥ १ ॥ अवघियाचा ठाव । पायांवरि जीवभाव ॥ २ ॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥ ३ ॥

॥ १२९२ ॥ आली सलगी पायांपाशीं । होइल तैसी करीन ॥ धृ० ॥ आणीक आह्मीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥ १ ॥ अवघ्या निरोपणा भाव । हाचि ठाव उरलासे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाळी लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥ ३ ॥

॥ १२९३ ॥ देह आणि देहसंबंधें निरावीं । इतरें वंदावीं श्वानसूकरें ॥ धृ० ॥ येणें नांवें जाला मी माझ्याचा झाडा । मोहा नांवें खोडा गर्भवास ॥ १ ॥ गृह आणि वित्त स्वदेशा विटावें । इतरा भेटावें श्वापदझाडां ॥ २ ॥ तुका ह्मणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन ॥ ३ ॥

॥ १२९४ ॥ देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कळिवर ओंवाळूनी ॥ धृ० ॥ नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥ १ ॥ करुणावचनीं लाहो एकसरें । नेसवें दुसरें आड येऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥ ३ ॥

॥ १२९५ ॥ देह नव्हे मी हें सरे । उरला उरे विठ्ठल ॥ धृ० ॥ ह्मणऊनि लाहो करा ।

काळ सारा चिंतनें ॥ १ ॥ पाळणाची नाहीं चिंता । ठाव रिता देवाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवासाटीं । देव पोटीं पडेल ॥ ३ ॥

॥ १२९६ ॥ पृथक मी सांगों किती । धर्म नीती सकळां ॥ धृ० ॥ अवघियांचा एक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ॥ १ ॥ क्षराअक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥ २ ॥ तुका ह्मणे आगमींचें । मथिलें साचें नवनीत ॥ ३ ॥

॥ १२९७ ॥ पुण्यविक्रा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥ धृ० ॥ आत्महत्यारा हा विषयांचा लोभी । ह्मणावें तें नाभी करवी दंड ॥ १ ॥ नागवला अल्प लोभाचिये साटीं । घेऊनि कांचवटी परिस दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे हात झाडिले परत्रीं । श्रम तोचि श्रोत्रीं वेठी केली ॥ ३ ॥

॥ १२९८ ॥ अंतरींचें ध्यान । मुख्य या नांवें पूजन ॥ धृ० ॥ उपाधि तें अवघें पाप । गोड निरसतां संकल्प ॥ १ ॥ आज्ञा पाळावी हा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे वृत्तीं । अविट हे सहज स्थिति ॥ ३ ॥

॥ १२९९ ॥ मूळ करणें संता । नाहीं मिळत उचिता ॥ धृ० ॥ घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥ १ ॥ सागर सागरीं । सामावेसी कैंची थोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ३ ॥

॥ १३०० ॥ बरवी नामावळी । तुझी महादोषां होळी ॥ धृ० ॥ जालें आह्मांसी जीवन । धणीवरि हें सेवन ॥ १ ॥ सोपें आणि गोड । किती अमृता ही वाड ॥ २ ॥ तुका ह्मणे अच्युता । आमचा कल्पतरु दाता ॥ ३ ॥

॥ १३०१ ॥ तृषाकाळीं उदकें भेटी । पडे मिठी आवडीची ॥ धृ० ॥ ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥ १ ॥ मिष्टान्नाचा योग भुके । ह्मणतां चुके पुरेसें ॥ २ ॥ तुका ह्मणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ३ ॥

॥ १३०२ ॥ कुचराचे श्रवण । गुणदोषांवरि मन ॥ धृ० ॥ असोनियां नसे कथे । मूर्ख अभाग्य तें तेथें ॥ १ ॥ निरर्थक कारणीं । कान डोळे वेची वाणी ॥ २ ॥ पापाचे सांगाती । तोंडीं ओढाळांचे माती ॥ ३ ॥ हिताचिया नांवें । वोस पडिले देहभावें ॥ ४ ॥ फजीत करूनि सांडी । तुका करी बोडाबोडी ॥ ५ ॥

॥ १३०३ ॥ जग तरि आह्मां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ धृ० ॥ येतो तिलाच्या कळवळा । पडती हातीं म्हून काळा ॥ १ ॥ नाहीं कोणी सखा । आह्मां निपराध पारिखा ॥ २ ॥ उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥ ३ ॥

॥ १३०४ ॥ सोपें वर्म आह्मां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनी नाचा ॥ धृ० ॥ समाधीचें सुख सांडा ओंवाळून । ऐसें हें कीर्तन ब्रह्मरस ॥ १ ॥ पुढती घडे घडलें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ २ ॥ उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन पावोनि विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ४ ॥

॥ १३०५ ॥ गंगा न देखे विटाळ । तेंचि रांजणींही जळ ॥ धृ० ॥ अल्पमहत्ता नव्हे

ठरी । विटाळ तो भेद धरी ॥ १ ॥ काय खंडिली भूमिका । वर्णा पायरिका लोकां ॥ २ ॥ तुका ह्मणे अगीविण । बीजें वेगळीं तों भिन्न ॥ ३ ॥

॥ १३०६ ॥ देवावरिल भार । काढूं नये कांहीं पर ॥ धृ० ॥ तानभुके आठवण । घडे तें बरें चिंतन ॥ १ ॥ देखावी निश्चिती । तेचि अंतर श्रीपती ॥ २ ॥ वैभव सकळ । तुका मानितो विटाळ ॥ ३ ॥

॥ १३०७ ॥ थुंकोनियां मान । दंभ करितों कीर्तन ॥ धृ० ॥ जालों उदासीन देहीं । ...काविण चाड नाहीं ॥ १ ॥ अर्थ अनर्थ सारिखा । करूनि ठेविला पारिखा ॥ २ ॥ उपाधिवेगळा । तुका राहिला सोंवळा ॥ ३ ॥

॥ १३०८ ॥ काय ह्याचें घ्यावें । नित्य नित्य कोणें गावें ॥ धृ० ॥ केलें हरिकथेनें ...राज । अंतरोनि जाते निज ॥ १ ॥ काम संसार । अंतरीं हे करकर ॥ २ ॥ तुका ह्मणे ...ड । ऐसे मानिती ते लंड ॥ ३ ॥

॥ १३०९ ॥ वदे साक्षत्वेंसी वाणी । नारायणीं मिश्रित ॥ धृ० ॥ न लगे कांहीं चाच...गावें । जातों भावें पेरीत ॥ १ ॥ भांडार त्या दातियाचें । मी कैचें ये ठायीं ॥ २ ॥ सादा...रीत गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥ ३ ॥

॥ १३१० ॥ ऐसी जिव्हा निकी । विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥ धृ० ॥ जेणें पाविजे उद्धार । तेथें राखावें अंतर ॥ १ ॥ गुंपोनि चावटी । तेथें कोणा लाभे भेटी ॥ २ ॥ तुका ...णे कळा । देवाविण अमंगळा ॥ ३ ॥

॥ १३११ ॥ साजे अळंकार । तरि भोगिता भ्रतार ॥ धृ० ॥ व्यभिचारा टाकम...टेका । उपहास होती लोकां ॥ १ ॥ शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥ २ ॥ तुका ...णे जिणें । शर्तीविण लाजिरवाणें ॥ ३ ॥

॥ १३१२ ॥ मानामान किती । तुझ्या क्षुल्लका संपत्ती ॥ धृ० ॥ जा रे चाळवीं ...पुडीं । कोणी धरिती तीं गोडी ॥ १ ॥ रिद्धिसिद्धी दासी । आह्मीं चुंभळें ...व्हों तैसी ॥ २ ॥ तुका ह्मणे ठका । ऐसें नागविलें लोकां ॥ ३ ॥

॥ १३१३ ॥ पाहातोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥ धृ० ॥ वरि ठेवूं दे मस्तक । ठेलों जोडूनि हस्तक ॥ १ ॥ बरवें करीं सम । नको भंगों देऊं प्रेम ॥ २ ॥ तुका ह्मणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ३ ॥

॥ १३१४ ॥ भक्त ऐसे जाणाजे देहीं उदास । गेले आशापाश निवारुनी ॥ धृ० ॥ विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥ १ ॥ निर्वाणीं गोविंद ...से मागेंपुढें ॥ कांहींच सांकडें पडों नेदी ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य कर्मा व्हावें साह्य । ...तलिया भये नर्का जाणें ॥ ३ ॥

॥ १३१५ ॥ तोंच हीं क्षुल्लकें सखीं सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखी तों ॥ धृ० ॥ नारा...ण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥ १ ॥ रवि नुगवे तों दीपिकांचें ...ाज ॥ प्रकाशें तें तेज सहज लोपे ॥ २ ॥ तुका ह्मणे देहसंबंध संचितें । कारण निरुतें ...ारायणीं ॥ ३ ॥

सरी । विटाळ तो भेद धरी ॥ १ ॥ काय खंडिली भूमिका । वर्णा पायरिका लोकां ॥ २ ॥ तुका ह्मणे अगीविण । बीजें वेगळीं तों भिन्न ॥ ३ ॥

॥ १३०६ ॥ देवावरिल भार । काढूं नये कांहीं पर ॥ धृ० ॥ तानभुके आठवण । घडे तें बरें चिंतन ॥ १ ॥ देखावी निश्चिती । तेचि अंतर श्रीपती ॥ २ ॥ वैभव सकळ । तुका मानितो विटाळ ॥ ३ ॥

॥ १३०७ ॥ थुंकोनियां मान । दंभ करितों कीर्तन ॥ धृ० ॥ जालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ॥ १ ॥ अर्थ अनर्थ सारिखा । करूनि ठेविला पारिखा ॥ २ ॥ उपाधिवेगळा । तुका राहिला सोंवळा ॥ ३ ॥

॥ १३०८ ॥ काय ह्याचें घ्यावें । नित्य नित्य कोणें गावें ॥ धृ० ॥ केलें हरिकथेनें वाज । अंतरोनि जाते निज ॥ १ ॥ काम संसार । अंतरीं हे करकर ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंड । ऐसे मानिती ते लंड ॥ ३ ॥

॥ १३०९ ॥ वदे साक्षत्वेंसीं वाणी । नारायणीं मिश्रित ॥ धृ० ॥ न लगे कांहीं चाचपावें । जातों भावें पेरीत ॥ १ ॥ भांडार त्या दातियाचें । मी कैचें ये ठायीं ॥ २ ॥ सातावीत गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥ ३ ॥

॥ १३१० ॥ ऐसी जिव्हा निकी । विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥ धृ० ॥ जेणें पाविजे उद्धार । तेथें राखावें अंतर ॥ १ ॥ गुंपोनि चावटी । तेथें कोणा लाभे भेटी ॥ २ ॥ तुका ह्मणे काळा । देवाविण अमंगळा ॥ ३ ॥

॥ १३११ ॥ साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ॥ धृ० ॥ व्यभिचारा टाकमटिका । उपहास होती लोकां ॥ १ ॥ शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें । शर्तीविण लाजिरवाणें ॥ ३ ॥

॥ १३१२ ॥ मानामान किती । तुझ्या क्षुल्लका संपत्ती ॥ धृ० ॥ जा रे चाळवीं बापुडीं । कोणी धरिती तीं गोडी ॥ १ ॥ रिद्धिसिद्धी देसी । आह्मीं चुंभळें नव्हों तैसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ठका । ऐसें नागविलें लोकां ॥ ३ ॥

॥ १३१३ ॥ पाहातोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥ धृ० ॥ वरि ठेवूं दे मस्तक । ठेलों जोडूनि हस्तक ॥ १ ॥ बरवें करीं सम । नको भंगों देऊं प्रेम ॥ २ ॥ तुका ह्मणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ३ ॥

॥ १३१४ ॥ भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारुनी ॥ धृ० ॥ विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥ १ ॥ निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भये नर्का जाणें ॥ ३ ॥

॥ १३१५ ॥ तोंच हीं क्षुल्लकें सखीं सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखी तों ॥ धृ० ॥ नारायण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥ १ ॥ रवि नुगवे तों दीपिकांचें काज ॥ प्रकाशें तें तेज सहज लोपे ॥ २ ॥ तुका ह्मणे देहसंबंध संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥ ३ ॥

॥ १३१६ ॥ यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कारिया कारणा । पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥ धृ० ॥ एक परी पडिलें भागीं । फळ बीजाचिये अंगीं । धन्य तोचि जगीं । आदि अंत सांभाळी ॥ १ ॥ आवश्यक तो शेवट । मागें अवघी खटपट । चालों जाणे वाट । ऐसा विरळ एखादा ॥ २ ॥ तुका होवोनि निराळा । क्षराअक्षरावेगळा । पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें ॥ ३ ॥

॥ १३१७ ॥ वेदपुरुष तरि नेती कां वचन । निवडूनि भिन्न दाखविलें ॥ धृ० ॥ तुझीं वर्में तूंचि दावूनि अनंता । होतोसि नेणता कोण्या गुणें ॥ १ ॥ यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग । उणें पडतां अंग क्षोभ घडे ॥ २ ॥ वससी तूं या भूतांचे अंतरीं । तरि कां भेद हरी दावियेला ॥ ३ ॥ तपतीर्थाटणें तुझें मूर्तिदान । तरि कां अभिमान आड येतो ॥ ४ ॥ आतां क्षमा कीजे विनवितो तुका । देऊनियां हाका उभा द्वारीं ॥ ५ ॥

## लोहागांवीं स्वामींच्या अंगावर उन पाणी घातलें ते.

॥ १३१८ ॥ जळे माझी काया लागला वोणवा । धांव रे केशवा मायबापा ॥ धृ० ॥ पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन जालें ॥ १ ॥ फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहातोसी काय हृदय माझें ॥ २ ॥ घेऊनि जीवन धावें लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी तूं होसी जननी । आणीक निर्वाणीं कोण राखे ॥ ४ ॥

॥ १३१९ ॥ अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ धृ० ॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याती ॥ १ ॥ ऐसा हा निवाडा जालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ २ ॥ तुका ह्मणे आगी लागो थोरपणा । दृष्टी त्या दुर्जना न पडो माझी ॥ ३ ॥

## नामदेव व पांडुरंग यांनीं स्वप्नांत येऊन स्वामींस कवित्व करण्याची आज्ञा केली ते.

॥ १३२० ॥ नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥ धृ० ॥ सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥ १ ॥ माप टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥ २ ॥ प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले शेवटी लावी तुका ॥ ३ ॥

॥ १३२१ ॥ द्याल ठाव तरि राहेन संगती । संतांचे पंगती पायांपाशीं ॥ धृ० ॥ आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥ १ ॥ सेवटील स्थळ नीच माझी वृत्ती । आधारें विश्रांती पावईन ॥ २ ॥ नामदेवापायीं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥ ३ ॥

॥ १३२२ ॥ त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणां जोगें । एक जातां लागें । एक

पाठी लागतें ॥ धृ० ॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ । करितां कोल्हाळ । कृपे खांवा हरि बाहे ॥ १ ॥ पापपुण्यात्मयाच्या शक्ती । असती योजिल्या श्रीपती । यावें काकुलती । तेथें सत्तानायेका ॥ २ ॥ तुका उभा पैल थडी । तरि हे प्रकाश निवडी । घातल्या सांगडी । तापे पेटी हाकारी ॥ ३ ॥

॥ १३२३ ॥ देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंती ॥ धृ० ॥ जैसा भाव तैसें फळ । स्वातीतोय एक जळ ॥ १ ॥ पाहे सांगे आणि जेवी । अंतर महदंतर सेवी ॥ २ ॥ तुका ह्मणे हिरा । पारखियां मूढां गारा ॥ ३ ॥

॥ १३२४ ॥ अनुभवें अनुभव अवघाचि साधिला । तरि स्थिरावला मनु ठायीं ॥ धृ० ॥ पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनियां ॥ १ ॥ एकचि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजी त्रयीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जिंकिला संसार । होऊनि किंकर विठोबाचे ॥ ३ ॥

॥ १३२५ ॥ ऐसिया संपत्ति आह्मां संवसारी । भोगाचिया परि काय सांगों ॥ धृ० ॥ काम तो कामना भोगीतसे देवा । आलिंगणें हेवा चरण चुंबीं ॥ १ ॥ शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें तें पाप भेदबुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहें तिकडे सारिखें । आपुलें पारिखें निरसलें ॥ ३ ॥

॥ १३२६ ॥ राम राज्य राम प्रजा लोकपाळ । एकचि सकळ दुजें नाहीं ॥ धृ० ॥ मंगळावांचूनि उमटेना वाणी । अखंडचि खाणी एकी रासी ॥ १ ॥ मोडलें हें स्वामी भावबाधा सेवा । वाढवावा हेवा कोणा अंगें ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघें दुमदुमिलें देवें । उरलें तें गावें हेंचि आतां ॥ ३ ॥

॥ १३२७ ॥ निवडोनि वाण काढिले निराळे । प्रमाण डोहळे यावरि ते ॥ धृ० ॥ जयाचा विभाग तयासीच फळे । देखणें निराळें कौतुकासी ॥ १ ॥ शूर तो ओळखे घायडायहात । येरां होइल मात सांगायासी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी केळवते वाणी । केला निजस्थानीं जाणवसा ॥ ३ ॥

॥ १३२८ ॥ याजसाठीं केला होता अट्टाहास । शेवटाचा दिस गोड व्हावा ॥ धृ० ॥ आतां निश्चिंतीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥ १ ॥ कवतुक वाटे जालिया वेचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥ ३ ॥

॥ १३२९ ॥ भक्तीचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ॥ धृ० ॥ माउलीचे माग बाळकांची हरी । एका सूत्रें दोरी ओढवसे ॥ १ ॥ जेथील जें मागे तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥ २ ॥ सेवेचिये सत्ते धनीच सेवक । आपुलें तें एक न वंची कांहीं ॥ ३ ॥ आदिअंताठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे मग सप्तासन ॥ ४ ॥ भावाकळ तुका जाला एकाएकीं । देवच लौकिकीं अवघा केला ॥ ५ ॥

॥ १३३० ॥ सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैचा घडे ॥ धृ० ॥ अजनाचें सोई अगा परिहार । नेणत्यां सादर चित्त कथे ॥ १ ॥ नाइकवे कानीं साधन

तो गाय हरुषें गीत ॥ २ ॥ नव्हे अराणूक जावयासी वना । वेध कामिमना ॥ ३ ॥ काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगळ अष्टप्रहर ॥ ४ ॥ ाह्मी खेळों भातुकुलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥ ५ ॥

॥ जाणपण बरें देवाचिये शिरीं । आह्मी ऐसीं बरीं नेणतींच ॥ धृ० ॥ रुचे कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥ १ ॥ आशंकेची बाधा नाहीं लडि- र वरि खेळा समबुद्धि ॥ २ ॥ तुका ह्मणे दिशा मोकळया सकळा । अव- ठाव जाला ॥ ३ ॥

। वचनांचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥ धृ० ॥ गें उरों नेणें खंती । मिळाल्या बहुती फांकलिया ॥ १ ॥ उद्यींच अस्त ल्पनेचा केला जागेपणें ॥ २ ॥ जाणवूनि गेला हांडोरियां पोरां । सावध तुका ॥ ३ ॥

# स्वामि व संत यांचा वैराग्याविषयीं संवाद.

। याति शूद्र वंश केला वेवसाव । आदि तो हा देव कुळपूज्य ॥ धृ० ॥ रे पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुह्मीं संतीं ॥ १ ॥ संवसारें जालों अति- मायबाप सेखीं क्रमिलिया ॥ २ ॥ दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री न्न करितां मेली ॥ ३ ॥ लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखें ॥ ४ ॥ देवांचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ५ ॥ र करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ६ ॥ कांहीं पाठ केलीं । विश्वासें आदरें करोनियां ॥ ७ ॥ गातीं पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें रोनियां ॥ ८ ॥ संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ा तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनी ॥ १० ॥ वचन मानिलें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ ११ ॥ सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । ं बहुमतां ॥ १२ ॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ यावरिया जाली कवित्वाची स्फूर्ती । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १४ ॥ ंहीं पाडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १५ ॥ बुडविल्या वह्या । केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥ विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल ुरे ॥ १७ ॥ आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे । नारायण उपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ १९ ॥ तुका ह्मणे वल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २० ॥

ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित । काय काजें प्रीत । ें ॥ धृ० ॥ माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं । एकांचिये खीं मानिती ॥ १ ॥ बहु पीडिलों संसारें । मोडीं पुसें पिटीं ढोरें । न पडतां ें राहिलों ॥ २ ॥ सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तेंही । त्याग

केला नाहीं । दिलें द्विजा याचकां ॥ ३ ॥ प्रियापुत्रबंधू । यांचा तोडिला संबंधू । सहज जालों मंदू । भाग्यहीन करंटा ॥ ४ ॥ तोंड न दाखवे जना । शिरे सांदी भरें राना । एकांत तो जाणा । तयासाठीं लागला ॥ ५ ॥ पोटें पिटिलों काहारें । दया नाहीं या विचारें । बोलावितां बरें । सहज ह्मणें या साठीं ॥ ६ ॥ सहज वडिलां होती सेवा । ह्मणोनि पूजितों या देवा । तुका ह्मणे भावा । साठीं ह्मणी द्या कोणी ॥ ७ ॥

॥ १३३५ ॥ बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ धृ० ॥ अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ १ ॥ बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ २ ॥ बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ३ ॥ बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ४ ॥ बरें जालें तुझें केलें देवाईल । लेकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ६ ॥

॥ १३३६ ॥ बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ धृ० ॥ येणें सोसें मन जालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥ १ ॥ बंधनापासूनि उकलली गांठी । देतां आली मिठी सावकाशें ॥ २ ॥ तुका ह्मणे देह भारिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥ ३ ॥

॥ १३३७ ॥ मीचि मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥ धृ० ॥ आतां पुरले नवस । निरसोनी गेली आस ॥ १ ॥ जालों बरा बळी । गेलों मरोनि ते काळीं ॥ २ ॥ दोहींकडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥ ३ ॥

॥ १३३८ ॥ जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥ धृ० ॥ आधीं आपण यां नासी । तारे उतरे ये कसी ॥ १ ॥ ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें हें निश्चयें उत्तर ॥ २ ॥ तुका ह्मणे ते उन्मनी । नास कराया कारणीं ॥ ३ ॥

॥ १३३९ ॥ साधनांच्या कळा आकार आकृती । कारण नवनीतीं मथनाचें ॥ धृ० ॥ पक्षियासी नाहीं मारगीं आडताळा । अंतरिक्षीं फळासीचि पावे ॥ १ ॥ भक्तीची जोडी ते उखत्याचि साठीं । उगेंपुरें तुटी तेथें नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें सांचत सांचणी । आजि जाली धणी एकसरें ॥ ३ ॥

॥ १३४० ॥ नाहीं येथें वाणी । सकळां वर्णीं घ्यावी धणी ॥ धृ० ॥ जालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यासी दावी रंग ॥ १ ॥ एका भावाचा एकांत । पीक पिकला अनंत ॥ २ ॥ तुका खळे दाणीं । करी बैसोनी वांटणी ॥ ३ ॥

॥ १३४१ ॥ ठेविलें जतन । करूनियां निज धन ॥ धृ० ॥ जया पासाव उत्पत्ती । तें हें बीज धरिलें हातीं ॥ १ ॥ निवडिलें वरळा भूस । सार आइन जिनस ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥ ३ ॥

॥ १३४२ ॥ भ्रमणा पाउलें वेंचिलीं तीं वाव । प्रवेशतां ठाव एक द्वार ॥ धृ० ॥ सार तीं पाउलें विठोबाचीं जीवीं । कोणीं न विसंभावीं क्षणभरी ॥ १ ॥ सुलभ हें केलें सकळां

जीवन । फुंकावेंचि कान न लगेसें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें सकळही कोड । पुरे मूळ खोड विस्ताराचें ॥ ३ ॥

॥ १३४३ ॥ कांहीं जाणों नये पांडुरंगाविण । पाविजेल सीण संदेहानें ॥ धृ० ॥ भलतिया नांवें आळविला पिता । तरि तो जाणता कळवळा ॥ १ ॥ अळंकार जातो गौरवितां वाणी । सर्वगात्रा धणी हरिकथा ॥ २ ॥ तुका ह्मणे उपजे विव्हाळें आवडी । करावा तो घडी घडी लाहो ॥ ३ ॥

॥ १३४४ ॥ बीजापोटीं पाहे फळ । विध न करितां सकळ ॥ धृ० ॥ तया मूर्ख ह्मणावें वेडें । कैसें तुटेल सांकडें ॥ १ ॥ दावितिया वाट । वेठी धरूं पाहे चाट ॥ २ ॥ पुढिल्या उपाया । तुका ह्मणे राखे काया ॥ ३ ॥

॥ १३४५ ॥ मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ धृ० ॥ वेदा निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥ १ ॥ अगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥ ३ ॥

॥ १३४६ ॥ वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥ धृ० ॥ ऐसें सांगा मजपाशीं । संतां निरवितो येविशीं ॥ १ ॥ असा जीं प्रवीण । ग्रंथीं कळे शुद्धहीण ॥ २ ॥ तुका ह्मणे लोपें । सत्याचिया घडतीं पापें ॥ ३ ॥

॥ १३४७ ॥ ज्या ज्या आह्मांपाशीं होतील ज्या शक्ती । तेणें हा श्रीपति अळंकारूं ॥ धृ० ॥ अवघा पायांपाशीं दिला जीवभाव । जन्ममरणा ठाव पुसियेला ॥ १ ॥ ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें उरला विठ्ठल । खाये बोले बोल गाये नाचे ॥ ३ ॥

॥ १३४८ ॥ आह्मी आळिकरें । प्रेमसुखाचीं लेंकुरें ॥ धृ० ॥ पायीं गोविली वासना । तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥ १ ॥ येतां पाहें मुळा । वाट पंढरीच्या डोळां ॥ २ ॥ तुका ह्मणे स्थळें । मग मी पाहीन सकळें ॥ ३ ॥

॥ १३४९ ॥ आइत्याची रासी । आली पाकसिद्धिपाशीं ॥ धृ० ॥ आतां सांडोनि भोजन । भिके जावें वेडेपण ॥ १ ॥ उसंतिली वाट । मागें परतावें फुकट ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । वेचों बैसोन ठाकणीं ॥ ३ ॥

॥ १३५० ॥ धन्य शुद्ध जाती । धरीं लौकरी परती ॥ धृ० ॥ ऐकिलें तेंचि कानीं । होय परिपाक मनीं ॥ १ ॥ कळवळा पोटीं । सावधान हितासाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । त्याचा तोचि जाणा देव ॥ ३ ॥

॥ १३५१ ॥ जीवित्व तें किती । हेंचि धरितां बरें चित्तीं ॥ धृ० ॥ संत सुमनें उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ॥ १ ॥ विसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडी । होय जतन रोकडी ॥ ३ ॥

॥ १३५२ ॥ अभिमानाची स्वामिनी शांती । महत्त्व घेती सकळ ॥ धृ० ॥ कळोनि हीं न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥ १ ॥ सर्व सत्ता करितां धीर । वीर्या वीर आगळा ॥ २ ॥ तुका ह्मणे तिखट तिखें । मृदसखें आवडी ॥ ३ ॥

॥ १३५३ ॥ भोजन तें पाशांतीचें । निंचें उंचें उसाळी ॥ धृ० ॥ जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिता ॥ १ ॥ कल्पना ते देवाविण । न करी भिन्न इतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पावे मूर्ती । ते निश्चिंती मापली ॥ ३ ॥

॥ १३५४ ॥ पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥ धृ० ॥ कारण तें हेंचि करीं । चित्तीं पांडुरंग धरीं ॥ १ ॥ प्रारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे बळ । बुद्धि वेचूनि सकळ ॥ ३ ॥

॥ १३५५ ॥ बहुतां जन्मांअंतीं । जोडी लागली हे हातीं ॥ धृ० ॥ मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ १ ॥ बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणे । ऐसे भले ते शाहाणे ॥ ३ ॥

॥ १३५६ ॥ रूप नांवें माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयावरी ॥ धृ० ॥ सींव वाटे परि न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ १ ॥ पोटा आलें तिच्या लोळे मांडयांवरी । पारखी न करी खंती चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तीसाठीं हरिहर । अरूपीचें क्षरविभाग हें ॥ ३ ॥

॥ १३५७ ॥ लेंकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥ धृ० ॥ आह्मां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिती ॥ १ ॥ वचनाचा घेईन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरवलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ॥ ३ ॥

॥ १३५८ ॥ आर्तभूतांप्रती । उत्तम योजाव्या त्या शक्ती ॥ धृ० ॥ फळ आणि समाधान । तेथें उत्तम कारण ॥ १ ॥ अल्पें तो संतोषी । स्थळीं सांपडे उदेसी ॥ २ ॥ सहज संगम । तुका ह्मणे तो उत्तम ॥ ३ ॥

॥ १३५९ ॥ मुळाचिया मुळें । दुःखें वाढती सकळें ॥ धृ० ॥ ऐसा योगियांचा धर्म । नव्हे वाढवावा श्रम ॥ १ ॥ न कळे आवडी । कोण आहे कैसी घडी ॥ २ ॥ तुका ह्मणे थीत । दुःख पाववावें चित्त ॥ ३ ॥

॥ १३६० ॥ भाग्यवंता हेंचि काम । मापी नाम वैखरी ॥ धृ० ॥ आनंदाची पुष्टि अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ १ ॥ पिकविलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥ २ ॥ तुका करी प्रणिपात । दंडवत आचारियां ॥ ३ ॥

॥ १३६१ ॥ लटिकें तें रुचे । साच कोणाही न पचे ॥ धृ० ॥ ऐसा माजल्याचा गुण । भोगें काळीं येइल सीण ॥ १ ॥ वाढवी ममता । नाहीं वर पडला तो वृता ॥ २ ॥ कांहीं न मनीं हेकड । तुका उपदेश माकड ॥ ३ ॥

॥ १३६२ ॥ कौतुकाची सृष्टी । कौतुकेंचि केलें कष्टी ॥ धृ० ॥ मोडें तरी भलें खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ॥ १ ॥ जाणणियासाठीं । भय सामावलें पोटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे चेता । होणें तें तूंच आइता ॥ ३ ॥

॥ १३६३ ॥ भोवंडीं सरिसें । अवघें भोंवतेंचि दिसे ॥ धृ० ॥ ठायीं राहिल्या निश्चळ ।

आहे अचळीं अचळ ॥ १ ॥ एक हाकेचा कपाटीं । तेथें आणिक नाद उठी ॥ २ ॥ अभ्रें धांवें शशी । तुका ह्मणे दुसरें भासी ॥ ३ ॥

॥ १३६४ ॥ नव्हों आह्मी आजिकालीचीं । काचीं कुचीं चाळवणी ॥ धृ० ॥ एके ठायीं मूळ डाळ । ठावा सकळ आहेसी ॥ १ ॥ तुमचें आमचेंसें कांहीं । भिन्न नाहीं वांटलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेथें असें । तेथें दिसें तुमचासा ॥ ३ ॥

॥ १३६५ ॥ योग्याची संपदा त्याग आणि शांती । उभयलोकीं कीर्ति सोहळा मान ॥ धृ०॥ येरयेरांवरी जायांचें उसिणें । भाग्यस्थळीं देणें झाडावेसीं ॥ १ ॥ केलिया फावला ठायींचा तो लाहो । तृष्णेचा तो काहो काल्हवितो ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल ॥ ३ ॥

॥ १३६६ ॥ मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ॥ धृ० ॥ नासोनियां गेली खंती । सहजस्थिति भोगाचे ॥ १ ॥ न देखेंसें जालें भ्रम । आलें वर्म हाता हें ॥ २ ॥ तुका ह्मणे केंचि कींव । कोठें जीव निराळा ॥ ३ ॥

॥ १३६७ ॥ नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥ धृ० ॥ काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचाराचें ॥ १ ॥ कांपवूनि टिरी शूरत्वाची मात । केलें वाताहात उचित काळें ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मळ स्तुति होता ॥ ३ ॥

॥ १३६८ ॥ नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥ धृ० ॥ मातेचिये खांदीं बाळ नेणें सीण । भावना त्या भिन्न मुंडाविया ॥ १ ॥ नको गुंपों भोगीं नको पडों त्यागीं । लावूनि सरें अंगीं देवाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ३ ॥

॥ १३६९ ॥ अवघी मिथ्या आटी । राम नाहीं तंव कंठीं ॥ धृ० ॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥ १ ॥ सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळें दंडे ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें भागा । देऊनि चित्तीं पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १३७० ॥ न सांगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥ धृ० ॥ उगींच लागतील पाठीं । होतीं रितींच हिंपुटीं ॥ १ ॥ शिकविल्या गोष्टी । शिकोन न धरिती पोटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सीण । होइल अनुभवाविण ॥ ३ ॥

॥ १३७१ ॥ जातिविजातींची व्हावयासी भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥ धृ० ॥ होणार तें घडो होणाराच्या गुणें । होइल नारायणें निर्मिलें तें ॥ १ ॥ व्याघ्राचिये भुकें वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥ २ ॥ तुका ह्मणे न करी विचार पुरता । गरज्याची मातापिता खर ॥ ३ ॥

॥ १३७२ ॥ शाहाणियां पुरे एकचि वचन । विशारती खूण तेचि त्यासी ॥ धृ० ॥ उपदेश असे बहुतां कारणें । घेतला तो मनें पाहिजे हा ॥ १ ॥ फांसावेना तरि दुःख घेसें वाव । मग होतो जीव कासाविस ॥ २ ॥ तुका ह्मणे नको राग धरूं झोंडा । नुघडितां पीडा होइल डोळे ॥ ३ ॥

॥ १३७३ ॥ अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥ धृ० ॥ रूपाच्या आठवें दोन्हीही आपण । वियोग तो क्षण होत नाहीं ॥ १ ॥ पूजा तरि चित्तें कल्पा तें ब्रह्मांड । आहाच तो खंड एकदेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा अनुभव यापरी । डोई पायांवरी ठेवितसें ॥ ३ ॥

॥ १३७४ ॥ नटनाट्य तुह्मी केलें याचसाठीं । कवतुकें दृष्टि निववावी ॥ धृ० ॥ नाहीं तरि काय कळलेंचि आहे । वाघ आणि गाय लांकडाची ॥ १ ॥ अभेदचि असे मांडियेलें खेळा । केल्या दीपकळा बहु एकी ॥ २ ॥ तुका ह्मणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरें तें ॥ ३ ॥

॥ १३७५ ॥ रवीचा प्रकाश । तोंचि निशी घडे नाश । जाल्या बहुवस । तरि त्या काय दीपिका ॥ धृ० ॥ आतां हाचि वसो जीवीं । माझे अंतरीं गोसावीं । होऊं येती ठावीं । काय वर्मे याच्यानें ॥ १ ॥ सर्वे असतां धणी । आड येऊं न शके कोणी । न लगे विनवणी । पृथकाची करावी ॥ २ ॥ जन्माचिया गती । येणें अवघ्या खुंटती । कारण ते प्रीती । तुका ह्मणे जवळी ॥ ३ ॥

॥ १३७६ ॥ ऐसें सांडूनियां धुरे । किविलवाणी दिसां कां रे । कामें उर भरे । हातीं तुरे मृत्तिका ॥ धृ० ॥ उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ १ ॥ न लगे पुसावी चाकरी । कोणी वकील ये घरीं । त्याचा तो चाकरी । पारपत्य सकळ ॥ २ ॥ नाहीं आडकाठी । तुका ह्मणे जातां भेटी । न बोलतां मिठी । उगीच पायीं घालावी ॥ ३ ॥

॥ १३७७ ॥ उपकारी असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ धृ० ॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥ १ ॥ जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसी । निखळचि रासी गुणांचीच ॥ २ ॥ तुका ह्मणे देव तयांचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥ ३ ॥

॥ १३७८ ॥ कोणा पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं ब्रह्मादिक दुराविलें ॥ धृ० ॥ ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरींच खुणा प्रकटोनी ॥ १ ॥ बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ २ ॥ तुका ह्मणे मग नये वृत्ति वरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ३ ॥

॥ १३७९ ॥ क्षणक्षणां सांभाळितों । साक्षी होतों आपुला ॥ धृ० ॥ न घडावी पायीं तुटी । मन मुठी घातलें ॥ १ ॥ विचारतों वचनां आधीं । धरूनि शुद्धि ठेविली ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें भ्यालों । तरी जालों जागृत ॥ ३ ॥

॥ १३८० ॥ आणूनियां मना । आवघ्या धांडोळिल्या खुणा । देखिला तो राणा । पंढरपूर निवासी ॥ धृ० ॥ यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वांयां जाय । देखिले ते पाय । सम जीवीं राहाती ॥ १ ॥ तो देखावा हा विध । चिंतनें तें कार्यसिद्ध । आणिकां संबंध । नाहीं पर्वकाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळ । होती क्षणेंचि निर्मळ । जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ॥ ३ ॥

॥ १३७३ ॥ अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥ धृ० ॥ रूपाच्या आठवें दोन्हीही आपण । वियोग तो क्षण होत नाहीं ॥ १ ॥ पूजा तरि चित्तें कल्पा तें ब्रह्मांड । आहाच तो खंड एकदेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा अनुभव यापरी । डोई पायांवरी ठेवितसें ॥ ३ ॥

॥ १३७४ ॥ नटनाट्य तुह्मी केलें याचसाठीं । कवतुकें दृष्टि निववावी ॥ धृ० ॥ नाहीं तरि काय कळलेंचि आहे । वाघ आणि गाय लांकडाची ॥ १ ॥ अभेदचि असे मांडियेलें खेळा । केल्या दीपकळा बहु एकी ॥ २ ॥ तुका ह्मणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरें तें ॥ ३ ॥

॥ १३७५ ॥ रवीचा प्रकाश । तोंचि निशी घडे नाश । जाल्या बहुवस । तरि त्या काय दीपिका ॥ धृ० ॥ आतां हाचि वसो जीवीं । माझे अंतरीं गोसावीं । होऊं येती ठावीं । काय वर्मे याच्यानें ॥ १ ॥ सर्वे असतां धणी । आड येऊं न शके कोणी । न लगे विनवणी । पृथकाची करावी ॥ २ ॥ जन्माचिया गती । येणें अवघ्या खुंटती । कारण ते प्रीती । तुका ह्मणे जवळी ॥ ३ ॥

॥ १३७६ ॥ ऐसें सांडूनियां धुरे । किविलवाणी दिसां कां रे । कामें उर भरे । हातीं नुरे मृत्तिका ॥ धृ० ॥ उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ १ ॥ न लगे पुसावी चाकरी । कोणी वकील ये घरीं । त्याचा तो चाकरी । पारपत्य सकळ ॥ २ ॥ नाहीं आडकाठी । तुका ह्मणे जातां भेटी । न बोलतां मिठी । उगीच पायीं घालावी ॥ ३ ॥

॥ १३७७ ॥ उपकारी असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ धृ० ॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥ १ ॥ जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसी । निखळचि रासी गुणांचीच ॥ २ ॥ तुका ह्मणे देव तयांचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥ ३ ॥

॥ १३७८ ॥ कोणा पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं द्वंद्वादिक दुराविलें ॥ धृ० ॥ ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरींच खुणा प्रकटोनी ॥ १ ॥ बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ २ ॥ तुका ह्मणे मग नये वृत्ति वरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ३ ॥

॥ १३७९ ॥ क्षणक्षणां सांभाळितों । साक्षी होतों आपुला ॥ धृ० ॥ न घडावी पायीं तुटी । मन मुठी घातलें ॥ १ ॥ विचारतों वचनां आधीं । धरूनि शुद्धि ठेविली ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें भ्यालों । तरी जालों जागृत ॥ ३ ॥

॥ १३८० ॥ आणूनियां मना । आवघ्या धांडोळिल्या खुणा । देखिला तो राणा । पंढरपूर निवासी ॥ धृ० ॥ यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वांयां जाय । देखिले ते पाय । सम जीवीं राहाती ॥ १ ॥ तो देखावा हा विध । चिंतनें तें कार्यसिद्ध । आणिकां संबंध । नाहीं पर्वकाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळ । होती क्षणेंचि निर्मळ । जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ॥ ३ ॥

॥ धरितां ये पंढरीची वाट । नाहीं संकट मुक्तीचें ॥ धृ० ॥ यतीं देव
ानंदें उत्साहें ॥ १ ॥ नृत्यछंदें उडती रज । जे सहज चालतां ॥ २ ॥ तुका
ेकें । वैष्णव निकें संभ्रम ॥ ३ ॥

॥ नाम घेतां निवे । जिव्हे अमृतचि स्रवे । होताती बरवे । ऐसे शकुन
०॥ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें । केलिया विठ्ठलें । ऐसी
ी ॥ १ ॥ जालें भोजनसें दिसे । चिरा पडोनि ठेला इच्छे । घालियाच्या
ेती उद्गार ॥ २ ॥ सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा । तुका ह्मणे
ां नाहीं आनंदा ॥ ३ ॥

॥ रुचि रुचि घेऊं गोडी । प्रेमसुखें जाली जोडी ॥ धृ० ॥ काळ जाऊं
चतूं विठोबाच्या पाया ॥ १ ॥ करूं भजन भोजन । धणी वरू नारायण
ह्मणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ॥ ३ ॥

॥ वेळोवेळां हेंचि सांगें । दान मागें जगासी ॥ धृ० ॥ विठ्ठल हे मंगळवाणी ।
ाती ॥ १ ॥ वेचतसे पळें पळ । केलें बळ पाहिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे दुश्चित
फुका नाड हा ॥ ३ ॥

॥ आणिक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगा सारिखें ॥ धृ० ॥ दैवत ये भूमं-
काळीं पाववितें ॥ १ ॥ कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध दावी स्थळासी
त्रींचें तीर्थी नासे । तीर्थी वसे वज्रलेप ॥ ३ ॥ पांडुरंगींचे पांडुरंगीं । पाप
॥ ४ ॥ ऐसें हरें गिरिजेप्रती । गुह्य स्थिति सांगितली ॥ ५ ॥ तुका ह्मणे
र्वत्र हें दैवत ॥ ६ ॥

। पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥ धृ० ॥ नव्हती हे भाटाचे बोल ।
कवित्व ॥ १ ॥ भावें घ्या रे भावें घ्या रे । एकदा जा रे पंढरिये ॥ २ ॥ भाग्यें
्यदेहा । तो हा पाहा विठ्ठल ॥ ३ ॥ पापपुण्या करील झाडा । बाइल पीडा
४ ॥ घ्यावी हातीं टाळदिंडी । गावे तोंडीं गुणवाद ॥ ५ ॥ तुका ह्मणे घटा-
वाटा शोधाव्या ॥ ६ ॥

॥ कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥ धृ० ॥ अनंता काळें
ुलभ भोळीं भाविकां ॥ १ ॥ प्रायश्चित्तें पडती पायां । गाती नयां वैष्णवां
ह्मणे तुपजे दोष । करा घोष आनंदें ॥ ३ ॥

॥ पाहा रे हें दैवत कैसें । भक्तिपिसें भाविक ॥ धृ० ॥ पाचारिल्या
ऐसें सेवे बराडी ॥ १ ॥ शुष्ककाष्ठीं गुरुगुरी । लाज हरि न धरी ॥ २ ॥
र्धनारी । ऐसीं धरी रूपडीं ॥ ३ ॥

। बहुत सोसिले मागें न कळतां । पुढती काय आतां अंध व्हावें ॥ धृ० ॥
गीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्ना चांचपडों ॥ १ ॥ कोण होईल तो
क । आपणचि हाक देइल हाके ॥ २ ॥ तुका ह्मणे दिली चेवचूनि खुनी ।
नि नाहीं छळ ॥ ३ ॥

॥ १३९० ॥ आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसें दिलें साचें करोनियां ॥ ध्रु० ॥ सुजियासी तंव अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथें ॥ १ ॥ एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणेंची ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं उगवू जाणसी । कुशळ येविशीं तुह्मी देवा ॥ ३ ॥

॥ १३९१ ॥ अस्त नाहीं आतां एकचि मोहोरा । पासूनि अंधारा दुरि जालों ॥ ध्रु० ॥ साक्षत्वें या जालों गुणाचा देखणा । करीं नारायणा तरी खरें ॥ १ ॥ आठवें विसरु पडियेला मागें । आलें तेंचि भागें यत्न केलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा विनोद देवासी । आह्मी तुह्मां ऐसीं दोन्ही नव्हों ॥ ३ ॥

॥ १३९२ ॥ क्षर अक्षर हे तुमचे विभाग । कासयानें जग दुरी धरा ॥ ध्रु० ॥ तैसें आह्मी नेणों पालटोंच कांहीं । त्यागिल्याची नाहीं मागें चाड ॥ १ ॥ प्रतिपादितां तूं समविषमाचा । प्रसार तो याचा पापपुण्य ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां नाना अवगणीं । लागे संपादणी लटिक्याची ॥ ३ ॥

॥ १३९३ ॥ सर्वरसीं मिनलें चित्त । अखंडित आनंदू ॥ ध्रु० ॥ गोत पति विश्वंभरीं । जाला हरि सोयरा ॥ १ ॥ वोळखी ते एका नांवें । इतरभावें खंडणा ॥ २ ॥ तुका ह्मणे नांवें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥ ३ ॥

॥ १३९४ ॥ मीं हें ऐसें काय जाती । अवघड किती पाहातां ॥ ध्रु० ॥ नाहीं होत उल्लंघन । नसतां भिन्न दुसरें ॥ १ ॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टीखालें अंतर ॥ २ ॥ तुका ह्मणे सवें देव । घेतां ठाव दावील ॥ ३ ॥

॥ १३९५ ॥ कवीश्वरांचा तो आह्मासी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥ ध्रु० ॥ दंभाचे आवडी बाहिराट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥ १ ॥ सोन्यासेजारीं तो लाखेची जतन । सतंत ते गुण जैसे तैसे ॥ २ ॥ सेव्यसेवकता न पडतां ठावी । तुका ह्मणे गोवी पावती हीं ॥ ३ ॥

॥ १३९६ ॥ वाढलियां मान न मनावी निश्चिती । भूतांचिये प्रीति भूतपण ॥ ध्रु० ॥ ह्मणऊनि मना लावावी कांचणी । इंद्रियांचे ह्मणी ओढी भरे ॥ १ ॥ एका एकपणें एकाचिये अंगीं । लागे रंग रंगीं मिळालिया ॥ २ ॥ तुका ह्मणे देव निष्काम निराळा । जीवदशे चाळा चळणांचा ॥ ३ ॥

॥ १३९७ ॥ माया साक्षी आह्मी नेणों भीड भार । आप आणि पर नाहीं दोन्ही ॥ ध्रु० ॥ सत्याचिये साटीं अवघाचि भरे । नावडे व्यापार तुटीचा तो ॥ १ ॥ पोभाळितां चोरे अंतरींचें दुःख । लांसें फांसें मुख उघडावें ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे स्फितीच्या हा ठाव । निवाड्यासी देव साक्षी केला ॥ ३ ॥

॥ १३९८ ॥ संता आवडे तो काळाचाही काळ । समर्थाचें बाळ जेवीं समर्थ ॥ ध्रु० ॥ परिसतां तेथें नाहीं एकविणें । मोहें न पवे सीण ऐसें राखे ॥ १ ॥ केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखे दुसरें नाशा मूळ ॥ २ ॥ तुका ह्मणे मुख्य कल्पतरुछाया । काय नाहीं दया तये ठायीं ॥ ३ ॥

तांच्या धिःकारें अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परी ॥ धृ० ॥
वांयां संवसार । गेला भरतार मोकलितां ॥ १ ॥ मूक राखे तया फळा
र लक्षणें राखों जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे सायास तो एके ठायीं । दीप
बरें ॥ ३ ॥

ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । आभ्यासासी सांग कार्यसिद्धी ॥ धृ० ॥
नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंच वरी ॥ १ ॥ दोरें चिरा कापे पडिला
सें सेवनीं विष पडे ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंचा बैसण्यासी ठाव । जठरीं
एकीं ॥ ३ ॥

अमर आहां अमर आहां । खरें कीं पाहा खोटें हें ॥ धृ० ॥ न ह्मणा देह
ा भरवसा कळेल ॥ १ ॥ कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें
रे देवचि बरें । तुका ह्मणे खरें तुह्मी ॥ ३ ॥

काम नाहीं काम नाहीं । जालों पाहीं रिकामा ॥ धृ० ॥ कावल्या या
श्चळ द्रष्टा बैसोनी ॥ १ ॥ नसत्या छंदें नसत्या छंदें । अवघे विनोदें विन्ह-
काएकीं एकाएकीं । तुका लोकीं निराळा ॥ ३ ॥

हातीं घेऊनियां काठी । तुका लागला कळिवरा पाठीं ॥ धृ० ॥ भेऊनि
नीं । माणसें जाळीं ते ठाकणीं ॥ १ ॥ काडिलें तें भोंडें । नागील उपचा-
। नाहीं वाटों आला भेव । सुख दुःख भोगितां देव ॥ ३ ॥ आजसाठीं हें
कासियेलें मन ॥ ४ ॥ तुका ह्मणे अनुभव बरा । नाहीं तरी घ्यास्त होय

कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ धृ० ॥ प्रेमाछंदें नाचे
देहभाव ॥ १ ॥ एकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयरा ॥ २ ॥ तुका
। गेला भेव त्या काळें ॥ ३ ॥

न बोलेसी करा वाचा । उपाधीचा संबंध ॥ धृ० ॥ एका तुमच्या नामा-
क्षीण कळतसे ॥ १ ॥ संकल्पाचे ओढी मन । पापपुण्य समर्थी ॥ २ ॥
ायणीं । पावो वाणी विसांवा ॥ ३ ॥

प्रारब्धा हातीं जन । सुख सीण पावतसे ॥ धृ० ॥ करितां वायाळाचा
ा माखावें ॥ १ ॥ आविसा अंगें पीडा वसे । त्यागें असे बहु सुख
ह्मणे जीव भ्याला । अवघ्या आला बाहेरी ॥ ३ ॥

आशा ते करविते बुद्धीचा लोप । संदेह तें पाप कैसें नव्हे ॥ धृ० ॥
ग करावा विचार । प्रसन्न तें सार मन ग्वाही ॥ १ ॥ नांवें रूपें अंगीं
ठ । होतें त्या निर्मळ शुद्धबुद्ध ॥ २ ॥ अंधळ्यानें नये डोळ्याची चाली ।
ली तुका बोले ॥ ३ ॥

जळो आतां नांव रूप । माझें पाप गांठीचें ॥ धृ० ॥ संतांचिया चरण-

रजें । उतरूं ओझें मातीचें ॥ १ ॥ लटिकियाचा अभिमान । होता सीण पाववित ॥ २ ॥ तुका ह्मणे अरूपींचें । सुख साचें निनांवें ॥ ३ ॥

॥ १४०९ ॥ निंदा स्तुति करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥ धृ० ॥ जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥ १ ॥ शृंगारिलें मढें । जीवेंविण जैसें कुडें ॥ २ ॥ तुका ह्मणे रागें । भलतें चावळे वाउगें ॥ ३ ॥

॥ १४१० ॥ भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ धृ० ॥ देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥ १ ॥ जगा घालावें सांकडें । दीन होउनी बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥ २ ॥ काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ३ ॥

॥ १४११ ॥ भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ॥ धृ० ॥ योगभाग्यें घरा येती । सर्व शक्ति चालत ॥ १ ॥ पित्याचें जें काय धन । पुत्रा कोण वंचील ॥ २ ॥ तुका ह्मणे कडे बैसों । तेणें असों निर्भर ॥ ३ ॥

॥ १४१२ ॥ कोरडचा गोष्टी चटक्या बोल । शिकल्या सांगे नाहीं ओल ॥ धृ० ॥ कोण यांचें मना आणी । ऐकों कानीं नाइकोनी ॥ १ ॥ घरोघरीं सांगती ज्ञान । भूस सिणें कांडिती ॥ २ ॥ तुका ह्मणे आपुल्या मतीं । काय रितीं पोकळें ॥ ३ ॥

॥ १४१३ ॥ नव्हतियाचा सोस होता । झडो आतां पदर ॥ धृ० ॥ देखणें तें देखिलें । आतां भलें साक्षित्वें ॥ १ ॥ लाभें कळों आली हानी । राहों दोन्हीं निराळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे एकाएकीं । हा कां लोकीं पसारा ॥ ३ ॥

॥ १४१४ ॥ सोसें वाढे दोष । जाला न पालटे कस ॥ धृ० ॥ ऐसें बरवें वचन । करितां तें नारायण ॥ १ ॥ असे प्रारब्ध नेमें । श्रमचि उरे श्रमें ॥ २ ॥ सुख देते शांती तुका ह्मणे धरितां चित्तीं ॥ ३ ॥

॥ १४१५ ॥ काय शरीरापें काम । कृपा साधावया सप्रेम । उचिताचे धर्म । भागा आले ते करूं ॥ धृ० ॥ देईन हाक नारायणा । तें तों नाकळे बंधना । पंढरीचा राणा । आइकोन धांवेल ॥ १ ॥ सातांपांचांचें गोठलें । प्रारब्धें आकारलें । आतां हें संचलें । असो भोगा सांभाळीं ॥ २ ॥ फावली ते बरवी संधी । सावधान करूं बुद्धी । तुका ह्मणे मधीं । कोठें नेघें विसावा ॥ ३ ॥

॥ १४१६ ॥ न लगे देशकाळ । मंत्रविधानें सकळ । मनेंचि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ॥ धृ० ॥ येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥ १ ॥ कल्पनेचा साक्षी । तरि आदरेंचि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥ २ ॥ घेणें तरि भाव । लक्षी दासांचा उपाव । तुका ह्मणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥ ३ ॥

॥ १४१७ ॥ नाहीं आलें भक्तिसुख अनुभवा । तो मी ज्ञान देवा काय करूं ॥ धृ० ॥ नसावें जी तुह्मी कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥ १ ॥ एकाएकीं मन

नेदी समाधान। देखिल्या चरण वांचूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे वाचा गुणीं लांचावली। न राहे उगली मौन्य मज ॥ ३ ॥

॥ १४१८ ॥ मागतां विभाग। कोठें लपाल जी मग ॥ धृ० ॥ संत साक्षी या वचना। त्यांसी ठाऊकिया खुणा ॥ १ ॥ होईन धरणेकरी। मग मी रिघों नेदीं बाहेरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मी अक्षर। तुज देवपणाचा भार ॥ ३ ॥

॥ १४१९ ॥ मिटवण्याचे धनी। तुह्मी व्यवसाय जनीं ॥ धृ० ॥ कोण पडे ये लिगाडीं। केली तैसीं उगवा कोडीं ॥ १ ॥ केलें सांगितलें काम। दिले पाळूनियां धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां। असो तुमचें तुमचे माथां ॥ ३ ॥

॥ १४२० ॥ समर्पिली वाणी। पांडुरंगीं घेते धणी ॥ धृ० ॥ पूजा होते मुक्ताफळीं। रस ओविया मंगळीं ॥ १ ॥ धार अखंडित। ओघ चालियेला नित्य ॥ २ ॥ पूर्णाहुति जीवें। तुका घेऊनि ठेला भावें ॥ ३ ॥

॥ १४२१ ॥ अवघाचि आकार ग्रासियेला काळें। एकचि निराळें हरीचें नाम ॥ धृ० ॥ धरूनि राहिलों अविनाश कंठीं। जीवन हें पोटीं सांठविलें ॥ १ ॥ शरीरसंपत्ति मृगजळभान। जाईल नासोन खरें नव्हे ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां उपाधीच्या नांवें। आणियेला देवें वीट मज ॥ ३ ॥

॥ १४२२ ॥ बोलणेंचि नाहीं। आतां देवाविण कांहीं ॥ धृ० ॥ एकसरें केला नेम। देवा दिले क्रोध काम ॥ १ ॥ पाहेन ते पाय। जोंवरि हे दृष्टि धाय ॥ २ ॥ तुका ह्मणे मनें। हेचि संकल्प वाहाणें ॥ ३ ॥

॥ १४२३ ॥ येथूनियां ठाव। अवघे लक्षायाचे भाव ॥ धृ० ॥ उंची देवाचे चरण। तेथें जालें अधिष्ठान ॥ १ ॥ आघातावेगळा। असे ठाव हा निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे स्थळ। धरूनि राहिलों अचळ ॥ ३ ॥

॥ १४२४ ॥ भरला दिसे हाट। अवघी वाढली खटपट। संचिताचे वाट। वाटाऊनि फांकती ॥ धृ० ॥ भोगा ऐसे ठायाठाव। कर्मा त्रिविधाचे भाव। द्रष्टा येथें देव। विरहित संकल्पा ॥ १ ॥ दिला पाडूनियां धडा। पापपुण्यांचा निवाडा। आचरती गोडा। आचरणें आपुलाल्या ॥ २ ॥ तुका ह्मणे पराधीनें। जालीं ओढलिया ऋणें। तुटती बंधनें। जरि देवा आळविते ॥ ३ ॥

॥ १४२५ ॥ आला भागासी तो करीं वेवसाव। परि राहो भाव तुझ्या पायीं ॥ धृ० ॥ काय चाले तुह्मीं बांधलें दातारा। वाहिलिया भारा उसंतितों ॥ १ ॥ शरीर तें करी शरीराचे धर्म। नको देऊं मर्म चुकों मना ॥ २ ॥ चळण फिरवी ठाव बहुवस। न घडो आळस चिंतनाचा ॥ ३ ॥ इंद्रियें करोत आपुले व्यापार। आवडीसी थार देईं पायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको देऊं काळा हातीं। येतां काकुळती ह्मणवूनी ॥ ५ ॥

॥ १४२६ ॥ आह्मां अवघें भांडवल। येथें विठ्ठल एकला ॥ धृ० ॥ कायावाचामनोभावें। येथें जीवें वेचलों ॥ १ ॥ परतें कांहीं नेणें दुजें। तत्त्वबीजें पाऊलें ॥ २ ॥ तुका ह्मणे संतसंगें। येणें रंगें रंगलों ॥ ३ ॥

॥ १४२७ ॥ साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगिकार खऱ्या मोलें ॥ धृ० ॥ भोगाचे सांभाळीं द्यावें कळिवर । संचिताची थार मोडूनियां ॥ १ ॥ महत्त्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें नष्टां पंचभूतां ॥ २ ॥ तुका ह्मणे मग कैंचा संवसार । जयाचा आदर तेंचि व्हावें ॥ ३ ॥

॥ १४२८ ॥ निर्वैर होणें साधनाचें मूळ । वेर ते विल्हाळ सांडीमांडी ॥ धृ० ॥ नाहीं चालों येत सोंगसंपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥ १ ॥ त्यागा नांव तरी निर्विष-यवासना । कार्यकारणा पुरते विधी ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांव जोडी सत्यत्वेंशीं ॥ ३ ॥

॥ १४२९ ॥ पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं या विषयांचे ॥ धृ० ॥ ठेवूनियां लोभीं लोभ । जाला क्षोभ आत्मत्वीं ॥ १ ॥ केला आणिकां वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ३ ॥

॥ १४३० ॥ कां जी धरिलें नाम । तुह्मी असोनी निष्काम ॥ धृ० ॥ कोणां सांगतसां ज्ञान । ठकाठकीचें लक्षण ॥ १ ॥ आवडीनें नाचें । आहे तरी पुढें साचें ॥ २ ॥ तुका ह्मणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥ ३ ॥

॥ १४३१ ॥ खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ धृ० ॥ ऐसे फुकाचे उपाय । सांडूनियां वांयां जाय ॥ १ ॥ पर उपकार । एका वचनाचा फार ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥ ३ ॥

॥ १४३२ ॥ दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥ धृ० ॥ पावे धांवोनियां घरा । राहे धरोनियां थारा ॥ १ ॥ कीर्तनाचे वाटे । बराडिया ऐसा लोटे ॥ २ ॥ तुका ह्मणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥ ३ ॥

॥ १४३३ ॥ शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखें ॥ धृ० ॥ त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥ १ ॥ त्यात्रें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य सांगें । येोत रागें येती ते ॥ ३ ॥

॥ १४३४ ॥ माझी मेलीं बहुवरी । तूं कां जैसा तैसा हरी ॥ धृ० ॥ विठो कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥ १ ॥ तुज देखतांचि माझा । बाप गेला आजा पणजा ॥ २ ॥ आह्मां लागलेंसे पाठीं । बालत्व तारुण्य काठी ॥ ३ ॥ तुज फावलें तें मागें । कोणी नसतां वादिलागें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुझ्या अंगीं । मज देखिल लागलीं अवघीं ॥ ५ ॥

॥ १४३५ ॥ आणीक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥ धृ० ॥ विठ्ठलवांचूनि आणीक जे वाणी । नाइकें मी कानीं आपुलिया ॥ १ ॥ समा-धानासाठीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ॥ २ ॥ जिवाहूनि मज तेचि आवडती । आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें तोचि जाणे हित । आणिकांच्या चित्त नेदीं बोला ॥ ४ ॥

॥ १४३६ ॥ आशा हे समूळ खाणोनी काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥ धृ० ॥ नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ॥ १ ॥ आशा मारू-

नियां जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे जरीं योगाची तांतडी । आशेची बीबुडी करीं आधीं ॥ ३ ॥

॥ १४३७ ॥ निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥ धृ० ॥ निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकांची ॥ १ ॥ तुका ह्मणे ऐसा कोणें उपेक्षिला । नाहीं ऐकिला ऐसा कोणीं ॥ २ ॥

॥ १४३८ ॥ नामाचें चिंतन प्रगट पसारा । असाल तें करा जेथें तेथें ॥ धृ० ॥ सोडविल माझा स्वामी निश्चयेसीं । प्रतिज्ञा हे दासीं केली आह्मीं ॥ १ ॥ गुण दोष नाहीं पाहात कीर्तनीं । प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥ २ ॥ तुका ह्मणे कडु वाटतो प्रपंच । रोकडे रोमांच कंठ दाटे ॥ ३ ॥

॥ १४३९ ॥ नाम ह्मणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करिती कांहीं । बधिर व्हावें त्याचे ठायीं । दुष्ट वचन वाक्य तें ॥ धृ० ॥ जयाचें राहिलें मानसीं । तेंचि पावलें तयासी । चांचपडतां मेलीं पिसीं । भलतैसीं वाचाळें ॥ १ ॥ नवविधीच्या निषेध । जेणें मुखें करिती वाद । जन्मा आले निंद्य । शूकरयाती संसारा ॥ २ ॥ काय सांगों [illegible] वेळां । आठव नाहीं चांडाळा । नामासाटीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ॥ ३ ॥ आपुलिया नामासाठीं । लागे शंखासुरापाठीं । फोडोनियां पोटीं । वेद चारी [illegible] ॥ ४ ॥ जगीं प्रसिद्ध हे बोली । नामें गणिका तारिली । आणिकेंही उद्धरिलीं । पातकी महादोषी ॥ ५ ॥ जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या चित्तीं । जळतां बुडतां घातीं । राखे हातीं विषाचे ॥ ६ ॥ काय सांगों ऐशीं किती । तुका ह्मणे नामख्याती । नरकाप्रति जाती । निषेधिती तीं एकें ॥ ७ ॥

॥ १४४० ॥ किती या काळाचा सोसावा वळसा । लागला सरिसा पाठोवाठीं ॥ धृ० ॥ लक्ष चौऱ्याशींची करा सोडवण । रिघा या शरण पांडुरंगा ॥ १ ॥ उपजल्या पिंडा मरण सांगातें । मरतें उपजतें सर्वेचि तें ॥ २ ॥ तुका ह्मणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी फुटलिया ॥ ३ ॥

॥ १४४१ ॥ गासी तरि एक विठ्ठलचि गाई । नाहीं तरि ठायीं राहें उगा ॥ धृ० ॥ अद्वैतीं तों नाहीं बोलाचें कारण । जाणीवेचा श्रम करिसी वांयां ॥ १ ॥ तुका ह्मणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ॥ २ ॥

॥ १४४२ ॥ जयाचिये वाचे नये हा विठ्ठल । त्याचे मज बोल नावडती ॥ धृ० ॥ शत्रु तो म्यां केला न ह्मणे आपुला । जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें ॥ १ ॥ जयासीं नावडे विठोबाचें नाम । तो जाणा अधम तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ १४४३ ॥ आह्मांसी तों नाहीं आणिक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ॥ धृ० ॥ घालूनियां कास करितों कैवाड । वागों नेदीं आड कळिकाळासी ॥ १ ॥ अबद्ध वांकडें जैशातैशा परी । वाचे हरि हरि उच्चारावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां सांपडलें निज । सकळां हें बीज पुराणांचें ॥ ३ ॥

॥ १४४४ ॥ जीव तोचि देव भोजन ते भक्ती । मरण तेचि मुक्ति [illegible]

॥ धृ० ॥ पिंडाच्या पोषकीं नागविलें जन । लटिकें पुराण केले वेद ॥ १ ॥ मना आला तैसा करिती विचार । ह्मणती संसार नाहीं पुन्हा ॥ २ ॥ तुका ह्मणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ॥ ३ ॥

॥ १४४५ ॥ भक्तांचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ॥ धृ० ॥ जाणोनी नेणते जाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥ १ ॥ अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥ २ ॥ टाळ घोष कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें तों आहे तयां ठावें । जिहीं एक्या भावें जाणीतलें ॥ ४ ॥

॥ १४४६ ॥ आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासिलिया पूज्य होइजेतें ॥ धृ० ॥ अधीरासी नाहीं चालों जातां मान । दुर्लभ दर्शन धीर त्याचें ॥ १ ॥ तुका ह्मणे नाहीं आणिकांसी बोल । वांयां जाय मोल बुद्धीपाशीं ॥ २ ॥

॥ १४४७ ॥ चिंतनें सरे तो धन्य जाणा काळ । सगळ मंगळ मंगळाचें ॥ धृ० ॥ संवसारसिंधु नाहीं हरिदासां । गर्भवास कैसा नेणती ते ॥ १ ॥ जनवन ऐसे कृपेच्या सागरें । दाटला आभारें पांडुरंग ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा भक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परि एक ॥ ३ ॥

॥ १४४८ ॥ मोक्षाचें आह्मांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ॥ धृ० ॥ भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥ १ ॥ ज्याचें त्यासी देणें कोणतें उचित । मानूनियां हित घेतों सुख ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें देई संवसार । आवडीसी थार करीं माझे ॥ ३ ॥

॥ १४४९ ॥ चिंतनासी न लगे वेळ । सर्व काळ करावें ॥ धृ० ॥ सदा वाचे नारायण । तें वदन मंगळ ॥ १ ॥ पढिये सर्वोत्तम भाव । येथें वाव पसारा ॥ २ ॥ ऐसें उपदेशी तुका । अवघ्या लोकां सकळां ॥ ३ ॥

॥ १४५० ॥ अंतराय पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तोचि बाधी ॥ धृ० ॥ बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय तुझा देवा ॥ १ ॥ अखंड तें खंडे संकल्पीं विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वीं विश्वंभर बसे । राहों ऐसें दशे सुखरूप ॥ ३ ॥

॥ १४५१ ॥ एकाचिया घाट्या टोके । एक फिके उपचार ॥ धृ० ॥ ऐसी सवे गोवळिया । भाव तया पढियंता ॥ १ ॥ एकाचें तें उच्छिष्ट खाय । एका जाय ठकवुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु सोपें । बहु रूपें अनंत ॥ ३ ॥

॥ १४५२ ॥ कोठें नाहीं अधिकार । गेले नर वांयां ते ॥ धृ० ॥ ऐका हें सोपें वर्म । न लगे श्रम चिंतना ॥ १ ॥ मृत्याचिये अंगीं छाये । उपायेचि खुंटतां ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे जन । येथें मन असों द्या ॥ ३ ॥

॥ १४५३ ॥ ज्यानें ज्यानें जैसें ध्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥ धृ० ॥ सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ १ ॥ अवघें साकरेचें अंग । नये व्यंग निवडितां ॥ २ ॥ तुका ह्मणे जें जें करी । तें तें हरि भोगितां ॥ ३ ॥

आचरती कर्मे । तेथें काळें कर्मधर्मे ॥ धृ० ॥ खेळे गोवळियांसवें । वें साहावें ॥ १ ॥ यमसुखें घांस । मंत्रपूजेसी उदास ॥ २ ॥ तुका ह्मणे ाहीं सवें करी ॥ ३ ॥

नामाचे पवाडे बोलती पुराणें । होऊनि कीर्तन तोचि ठेला ॥ धृ० ॥ ठीं आगळा हा मंत्र । आवडीचे स्तोत्र सदा घोकी ॥ १ ॥ आगळें हें सार । ब्रह्मकर्मानाम एक तुझें ॥ २ ॥ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं म मुखीं ॥ ३ ॥ परिक्षिती मृत्यु साती दिवसांचा । मुक्त जाला वाचा ॥ कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामा आधीं ॥ ५ ॥ तुज ह्मणे वेद । तुका ह्मणे भेद नाहीं नांवा ॥ ६ ॥

भूतदयापरत्वें जया तया परी । संत नमस्कारीं सर्वभावें ॥ धृ० ॥ ाचा धरीसील ताठा । तरी जासी वाटा यमपंथें ॥ १ ॥ हिरा परिस मोहरा ण । नव्हे परि जन संतां तैसीं ॥ २ ॥ सरितां वाहाळां गंगे सागरा समान । अधम नाहीं ॥ ३ ॥ आणिक अमुप होती तारांगणें । रविशशिमानें लेखूं का ह्मण नाहीं नरमता अंगीं । नव्हे तें फिरंगी कठिण लोह ॥ ५ ॥

। आणिक कांहीं मज नावडे मात । एका पंढरिनाथावांचूनियां ॥ धृ० ॥ ा आवडे कीर्तन । तें मज श्रवण गोड लागे ॥ १ ॥ तुका ह्मणे संत ह्मणोत ापरतें न मनी कांहीं ॥ २ ॥

ठेवा जाणीव गुंडून । येथें भावचि प्रमाण ॥ धृ० ॥ एका अनुसरल्या जाणें पंढरिराज ॥ १ ॥ तर्कवितर्कासी । वाव न लगे सायासी ॥ २ ॥ तुका । अवघा बोलती तो सीण ॥ ३ ॥

। येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥ धृ० ॥ तोचि ध्यावा करूनि रितें कळिवर ॥ १ ॥ षडऊर्मी हृदयांत । यांचा अंत पुरवुनी ॥ २ ॥ टे भास । तेथें वास करी तो ॥ ३ ॥

। मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहासंगीं लज्जा चिंत पावे शांति धरूनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ १ ॥ तुका डाच विचार । परि हे प्रकार नागविती ॥ २ ॥

कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणिक नाहीं ॥ धृ० ॥ वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतां ॥ १ ॥ शब्दज्ञानी एक आपुलाल्या वेदांत भिन्नभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे एक भाव न धरिती । पडिली हे माती ॥ ३ ॥

। देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ती । तया इच्छा गती । हेंचि ॥ धृ० ॥ या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । रिद्धिसिद्धि द्वारीं । कर ॥ १ ॥ नको वैकुंठीचा वास । असे तया सुखा नास । अद्भुत हा रस ।

कथाकाळीं नामाचा ॥ २ ॥ माझ्या नामाचा महिमा । तुज न कळे रे मेघश्यामा । तुका ह्मणे आह्मा । जन्म गोड यासाठीं ॥ ३ ॥

॥ १४६३ ॥ न पूजीं आणिकां देवां न करीं त्यांची सेवा । न मनीं या केशवाविण दुजें ॥ धृ० ॥ काय उणें जालें मज तयापायीं । तें मी मागों कांई कवणासी ॥ १ ॥ आणिकाची कीर्ति नाइकें न बोलें । चाड या विठ्ठलेंविण नाहीं ॥ २ ॥ न पाहें लोचनीं श्रीमुखावांचुनी । पंढरी सांडूनि न वजें कोठें ॥ ३ ॥ न करीं कांहीं आस मुक्तीचे सायास । न भें संसारास येतां जातां ॥ ४ ॥ तुका ह्मणे कांहीं व्हावें ऐसें जीवा । नाहीं या केशवाविण दुजें ॥ ५ ॥

॥ १४६४ ॥ नव्हे खळवादी मताच पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ॥ धृ० ॥ साक्षत्वेंसी मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ॥ १ ॥ नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ॥ २ ॥ तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वांयां श्रमों नये ॥ ३ ॥

॥ १४६५ ॥ याचि नांवें दोष । राहे अंतरी किल्मिष ॥ धृ० ॥ मना अंगीं पुण्य पाप । शुभ उत्तम संकल्प ॥ १ ॥ बिजाऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । शुद्ध करावें हे नित ॥ ३ ॥

॥ १४६६ ॥ कुशळ वक्ता नव्हे जाणीव श्रोता । राहे भाव चित्ता धरूनियां ॥ धृ० ॥ धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥ १ ॥ न धोवी तोंड न करी अंघोळी । जपे सदाकाळीं रामराम ॥ २ ॥ जप तप ध्यान नेणे योग युक्ती । कृपाळु जो भूतीं दयावंत ॥ ३ ॥ तुका ह्मणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता जीवाहूनी ॥ ४ ॥

॥ १४६७ ॥ काळाचिया सत्ता ते नाहीं घटिका । पंढरीनायका आठवितां ॥ धृ० ॥ सदाकाळ गणना करी आयुष्याची । कथेचे वेळेची आज्ञा नाहीं ॥ १ ॥ या कारणें माझ्या विठोबाची कीर्ती । आहे हे त्रिजगतीं थोर वाट ॥ २ ॥ तुका ह्मणे जन्मा आलियांचें फळ । स्मरावा गोपाळ तेंचि खरें ॥ ३ ॥

॥ १४६८ ॥ घरोघरीं बहु जाले कवी । नेणे प्रसादाची चवी ॥ धृ० ॥ लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ॥ १ ॥ काढावें आइतें । तेंचि जोडावें स्वहितें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । परि होताती अंधळे ॥ ३ ॥

॥ १४६९ ॥ नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥ धृ० ॥ ह्मणऊनि बरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥ १ ॥ नये होऊं कदा निंदकाची भेटी । जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिये दृष्टि पाप वाढे ॥ ३ ॥

॥ १४७० ॥ कथा करोनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नरकवास ॥ धृ० ॥ रवरव कुंभपाक भोगिती यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥ १ ॥ असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ॥ २ ॥ तुका ह्मणे तया नरक न चुकती । सांपडले हातीं यमाचिया ॥ ३ ॥

॥ १४७१ ॥ नाइकावे कानीं तयाचे ते बोल । भक्तीविण फोल ज्ञान सांगे ॥ धृ० ॥ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण । दुःख पावे सीण श्रोता वक्ता ॥ १ ॥ अहं ब्रह्म ह्मणोनि पाळीतसे पिंडा । नो बोलावें भांडा तया सवें ॥ २ ॥ वेदबाह्य लंड बोले जो पाषांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खंडी देवभक्तपण । वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो ॥ ४ ॥

॥ १४७२ ॥ वेदविहित तुह्मी आइका हो कर्मे । बोलतों तीं वर्मे संतांपुढें ॥ धृ० ॥ च्यारी वर्ण जाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं विभागिलें ॥ १ ॥ प्रथम पाउलीं पावविला पंथ । आदि मध्य अंत भेद नाहीं ॥ २ ॥ आंबे बोरी वड बाभुळा चंदन । गुणागुणें भिन्न अग्नि एक ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन उन्मन जों होय । तोंवरि हे सोय विधि पाळीं ॥ ४ ॥

॥ १४७३ ॥ तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥ धृ० ॥ तें आह्मीं देखिलें आपुल्या नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥ १ ॥ जीवांचें जीवन सुखाचें सेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥ २ ॥ जनाचा जनिता कृपेचा सागर । दीनां लोभापर दुष्टां काळ ॥ ३ ॥ सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तेंचि असे ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं श्रुती आतुडलें । आह्मां सांपडलें गीतीं गातां ॥ ५ ॥

॥ १४७४ ॥ माझे मनोरथ पावविले सिद्धी । तई पायीं बुद्धि स्थिरावली ॥ धृ० ॥ समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ॥ १ ॥ त्रिविध तापाचें जालेंसे दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥ २ ॥ महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगा अंगीं संग अखंडित ॥ ३ ॥ जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामावलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे माप भरी आलें सिगे ॥ धारबोळ गंगे पूर वाहे ॥ ५ ॥

॥ १४७५ ॥ कृपेचें उत्तर देवाचा प्रसाद । आनंदीं आनंद वाढवावा ॥ धृ० ॥ बहुतांच्या भाग्यें लागलें जाहाज । येथें आतां काज लवलाहे ॥ १ ॥ अलभ्य तें आलें दारावरी फुका । येथें आतां चुका न पाहिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे जिव्हाश्रवणाच्या द्वारें । माप भरा बरें सिगेवरी ॥ ३ ॥

॥ १४७६ ॥ पापपुण्यसुखदुःखाचीं मंडळें । एक एका बळें वाव घेती ॥ धृ० ॥ कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचवितो काळ जीवांसी तो ॥ १ ॥ स्वर्गाचिया भोगें सरतां नरक । मागें पुढें एक एक दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे भय उपजलें मना । घेंई नारायणा कडिये मज ॥ ३ ॥

॥ १४७७ ॥ वचना फिरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥ धृ० ॥ केला आतां अंगिकार । न मनीं भार समर्थ ॥ १ ॥ संसाराचा नाहीं पांग । देव सांग सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे कीर्ति वाणूं । मध्यें नाणूं संकल्प ॥ ३ ॥

॥ १४७८ ॥ कथा करोनियां मोल ज्यापें घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ॥ धृ० ॥ ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंड स्मरा रामराम ॥ १ ॥ मधुरवाणीच्या नका पडों

भरी । जाल यमपुरी भोगावया ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरी जिणें धिग त्याचें ॥ ३ ॥

॥ १४७९ ॥ गोड नांवें क्षीर । परि साकरेचा धीर ॥ धृ० ॥ तैसें जाणा ब्रह्मज्ञान । बापुडें तें भक्तीविण ॥ १ ॥ रुचि नेदी अन्न । ज्यांत नसतां लवण ॥ २ ॥ अंधळ्याचे श्रम । शिकविल्याचेंचि नाम ॥ ३ ॥ तुका ह्मणे तारा । नांवें तंबुऱ्याच्या सारा ॥ ४ ॥

॥ १४८० ॥ नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ धृ० ॥ हेंचि शूरत्वाचें अंग । हरि आणिला श्रीरंग ॥ १ ॥ अवघा जाला पण । लवण सकळां कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे पाणी । पाताळ तें परि खणी ॥ ३ ॥

॥ १४८१ ॥ आपुल्या महिमानें । धातु परिसें केलें सोनें ॥ धृ० ॥ तैसें न मनीं माझें आतां । गुणदोष पंढरिनाथा ॥ १ ॥ गांवाखालील वाहाळ । गंगा न मनी अमंगळ ॥ २ ॥ तुका ह्मणे माती । केली कस्तुरीनें सरती ॥ ३ ॥

॥ १४८२ ॥ आशाबद्ध वक्ता । भय श्रोतियाच्या चित्ता ॥ धृ० ॥ गातो तेंचि नाहीं ठावें । तोंड वासी कांहीं द्यावें ॥ १ ॥ जालें लोभाचें मांजर । भीक मागे दारोदार ॥ २ ॥ माप आणि गोणी । तुका ह्मणे रितीं दोन्ही ॥ ३ ॥

॥ १४८३ ॥ तक्र शिष्या मान । दुग्धा ह्मणे नारायण ॥ धृ० ॥ ऐशीं ज्ञानाचीं डोबडें । आशा विटंबिलीं मूढें ॥ १ ॥ उपदेश तो जगा । आपण सोवळा इतका मागा ॥ २ ॥ रसनाशिश्नाचे अंकित । तुका ह्मणे वरदळ स्फीत ॥ ३ ॥

॥ १४८४ ॥ ब्रह्मचारी धर्म घोकावें अक्षर । आश्रमीं विचार षट्कर्मे ॥ धृ० ॥ वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग । सन्यास तो त्याग संकल्पाचा ॥ १ ॥ परम हंस तरी जाणे सहज वर्म । येथें याती धर्म कुळ नाहीं ॥ २ ॥ बोलें वर्म जो चाले या विरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा तो सीण दुःख पावे ॥ ४ ॥

॥ १४८५ ॥ आह्मी क्षेत्रीचे सन्यासी । देहभरित हृषिकेशी । नाहीं केली ऐशी । आशाकामबोहरी ॥ धृ० ॥ आलें अयाचित अंगा । सहज तें आह्मां भागा । शाला पांडुरंगा । ऐसा करितां निश्चिती ॥ १ ॥ दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडण । बंदीं बंद कौपिन । बहिरवास औठडें ॥ २ ॥ काळें साधियेला काळ । मन करूनि निश्चळ । लौकिकीं विटाळ । धरूनि असों एकांत ॥ ३ ॥ कार्यकारणाची चाली । वाचावाचत्वें नेमिली । एका नेमें चाली । स्वरूपींच राहाणें ॥ ४ ॥ नव्हे वेषधारी । तुका आहाच वरवरी । आहे तैसीं बरीं । खंडें निवडितों वेदांचीं ॥ ५ ॥

॥ १४८६ ॥ निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोपी गुहा ॥ धृ० ॥ कोठेंही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ॥ १ ॥ नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धि इंद्रियें दमी ॥ २ ॥ तुका ह्मणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणांची गोवी उगवूनि ॥ ३ ॥

॥ १४८७ ॥ जैसीं तैसीं तरी । शरणागतें तुह्मी हरी ॥ धृ० ॥ आतां न पाहिजे केलें ।

ापुलें ॥१॥ शुद्ध नाहीं चित्त । परि ह्मणवितों भक्त ॥ २ ॥ मज कोण पुसे ांगे तुझें तुका ॥ ३ ॥

नाशवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम ॥ धृ० ॥ े कोट्यान हे कोटी । नामें हे वैकुंठीं बैसविले ॥ १ ॥ नामापरतें सार ं । तें कां तुह्मी मनीं आठवाना ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम वेदांसी आगळें । ें फुकासाटीं ॥ ३ ॥

आळवितां बाळें । मातेतें सुख आगळें ॥ धृ० ॥ द्यावें आवडी आतुकें । तुकें ॥ १ ॥ लेववूनि अळंकार । दृष्टि करावी सादर ॥ २ ॥ आपुलिये पर्वी । वंदी ॥ ३ ॥ नेदी लागों दिठी । उचलोनी लावी कंठीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे द्या वो पद्मनाभा ॥ ५ ॥

तप तीर्थ दान व्रत आचरण । गातां हरिगुण वारूं नये ॥ धृ० ॥ कोटि ाहुली पाहातीं । त्या तया घडती ब्रह्महत्या ॥ १ ॥ आपुलिया पापें न सुटे गा काळें ऐसें निस्तरल ॥ २ ॥ व्हावें साह्य तया न घालावें भय । फुका- भ घात ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित माना या वचना । सुख दुःख जाणा साधे

देवासाठीं जाणा तयासीच्च आटी । असेल ज्या गांठीं पुण्यराशी ॥ धृ० ॥ ीं बळें वाराणसी । गेला आला त्यासी अर्ध पुण्य ॥ १ ॥ कथे निद्राभंग ीं । तया सुखा धणी पार नाहीं ॥ २ ॥ यागीं ऋण द्यावें द्यावें सुख लाहीं । नाहीं उभयतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म जाणोनी करावें । एक न घालावें ॥

अग्निमाजी पडे धातू । लीन होऊनि राहे आंतू । होय शुद्ध नपवे घातू । ॥ धृ० ॥ बाह्यरंगाचें कारण । मिथ्या अवघेंचि भाषण । गर्व ताठा हे सर्वे वाहातसे ॥ १ ॥ पुरें मातलिया नदी । लव्हा नांदे जीवनसंधी । वृक्ष ी । परि तो कधीं भंगेना ॥ २ ॥ हस्ती परदळा जो भंगी । तया पायीं न ण जाय संगी । पाणीवाणी तयेच्या ॥ ३ ॥ पिटितां घेणें वरि सैरा । तया शा काय तगती गारा । तया थोरा होउनी ॥ ४ ॥ लीन दीन हेंचि सार । पार । बुडे माथां भार । तुका ह्मणे वाहोनी ॥ ५ ॥

आह्मी वीर झुंझार । करूं जमदाढे मार । तापटिले भार । मोड आला ० ॥ जाला हाहाकार । आलें हांकीत झुंझार । शंखचक्रांचे शृंगार । कंठीं ॥ १ ॥ रामनामांकित बाण । गोपी लाविला चंदन । झळकती निशाणें । ाका ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । जालों जिंकोनी निश्चळ । पावला सकळ । भामचा ॥ ३ ॥

आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजना ॥ धृ० ॥ आहे ापुले हातीं । आणिकां ठेविती काय बोल ॥ १ ॥ जाणतिया पाठीं लागला

उपाध । नेणतां तो सिद्ध भोजनासी ॥ २ ॥ तुका ह्मणे भय बांधलेंसें गांठी । चोर लागे पाठी दुम तया॥ ३ ॥

॥ १४९५ ॥ आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी । धड तें नासोनि भलता टाकी ॥ धृ० ॥ सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं ॥ १ ॥ ओल शुद्ध काळी काळें जिरें बीज । कैंचें लागे निज हाता तेथें ॥ २ ॥ एक गहूं करिती अनेक प्रकार । सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे विषा रुचि एका हातीं । पाधानी नासिती नवनीत ॥ ४ ॥

॥ १४९६ ॥ वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥ धृ० ॥ कोण दम ऐसा आहे याचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ १ ॥ काय मानूनियां राहिलें निश्चिती । काय जाब देती यमदूतां ॥ २ ॥ कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ३ ॥ काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यासी काय जाणों ॥ ४ ॥ कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ५ ॥ काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे कांहीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥ ७ ॥

॥ १४९७ ॥ काय एकां जालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण ॥ धृ० ॥ देखतील डोळां ऐकतील कानीं । बोलिलें पुराणीं तेंही ठावें ॥ १ ॥ काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥ २ ॥ कां हें कळों नये आपुलें आपणा । बाळत्व तारुण्य वृद्धदशा ॥ ३ ॥ कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणा आलें ॥ ४ ॥ कां हें जन्म वांयां घातलें उत्तम । कां हे रामराम न ह्मणती ॥ ५ ॥ काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥ ६ ॥ काय करिती हे बांधलिया काळें । तुका ह्मणे बळें वज्रपाशीं ॥ ७ ॥

॥ १४९८ ॥ जुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्यां ॥ धृ० ॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्यां मनीं बैसलासे ॥ १ ॥ ऊर्ध्व पुंड्र भाळीं कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे शंखचक्रांचे शृंगार । नामामृतसार मुखामाजी ॥ ३ ॥

॥ १४९९ ॥ जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छितसे ॥ धृ० ॥ संचितासी जाय मिळोनियां खोडी । पतनाचे ओढीवरी हांव ॥ १ ॥ बांधलें गांठी तें लागलें भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ॥ २ ॥ तुका ह्मणे जया गांवां जाणे जया । पुसोनियां तया वाट चाले ॥ ३ ॥

॥ १५०० ॥ मानी भक्तांचे उपकार । ऋणीया ह्मणवी निरंतर । केला निर्गुणीं आकार । कीर्त मुखें वर्णितां ॥ धृ० ॥ ह्मणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा । जाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडावया ॥ १ ॥ अंबऋषीकारणें । जन्म घेतले नारायणें । एवढें भक्तीचें लहणें । दास्य करी हा दासाचें ॥ २ ॥ ह्मणियें करितां शंका न धरी । रक्षपाळ बळिच्या द्वारीं । भक्तीचा आभारी । रीग न पुरे जावया ॥ ३ ॥

अर्जुनाचे रथवारू । ते वागवी सर्वेश्वरू । एवढे भक्तीचे उपकारू । मागें मागें हिंडतसे ॥ ४ ॥ पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउलीं विटेवरी । न वजे कट करीं । धरूनि तेथें राहिला ॥ ५ ॥ भावभक्तीचा अंकित । नाम साजे दिनानाथ । ह्मणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनी ॥ ६ ॥

॥ १५०१ ॥ सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥ धृ० ॥ त्यांचा आह्मांसी कंटाळा । पाहों नावडती डोळां ॥ १ ॥ रिद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥ ३ ॥

॥ १५०२ ॥ ठाकलोंसें द्वारीं । उभें याचक भिकारी ॥ धृ० ॥ मज भीक कांहीं देवा । प्रेमभातुकें पाठवा ॥ १ ॥ याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥ २ ॥ तुका ह्मणे दान । सेवा घेतल्यावांचुन ॥ ३ ॥

## सदाशिवावर.

॥ १५०३ ॥ काय धर्म नीत । तुह्मां शिकवावें हित ॥ धृ० ॥ अवघें रचियेलें देव्हा । लीळा ब्रह्मांड सकळा ॥ १ ॥ नाम महादेव । येथें निवडला भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे वेळे । माझें तुह्मां कां न कळे ॥ ३ ॥

॥ १५०४ ॥ भांडावें तें गोड । पुरे सकळही कोड ॥ धृ० ॥ ऐसा परींचा या मोळा । ठावा निकटां जवळां ॥ १ ॥ हाक देतां दारीं । येती जवळी सामोरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे शिवें । मागितलें हातीं द्यावें ॥ ३ ॥

॥ १५०५ ॥ ऐसें कां जालें तें मजही न कळे । कीर्तनाचे रळेपळे जगीं ॥ धृ० ॥ कैसें तुह्मां देवा वाटतसे बरें । संतांचीं उत्तरें लाजविलीं ॥ १ ॥ भाविकां कंटक करिताती पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम निर्वाणीचा बाण । याचा अभिमान नाहीं तुह्मां ॥ ३ ॥

॥ १५०६ ॥ तुह्मी बैसलेती निर्गुणाचे खोळे । आह्मां कां हे डोळे कान दिले ॥ धृ० ॥ नाइकवे तुझी अपकीर्ति देवा । अव्हेरली सेवा न देखवे ॥ १ ॥ आपुले पोटीं तों राखियेला वाव । आह्मांसी कां भाव अल्प दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःखी असें हें कळों द्या । पुढिलिया धंद्या मन नेघे ॥ ३ ॥

॥ १५०७ ॥ सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥ धृ० ॥ सारा अवघें गाबाळ । डोळ्या आडील पडळ ॥ १ ॥ शुद्ध भावाविण । जो जो केला तो तो सीण ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । परि होताती अंधळे ॥ ३ ॥

॥ १५०८ ॥ अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ धृ० ॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ १ ॥ माझी कोणी न धरो शंका । हों कां लोकां निर्द्वंद्व ॥ २ ॥ तुका ह्मणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥ ३ ॥

॥ १५०९ ॥ सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ धृ० ॥ येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ १ ॥ अंतरींचें बीज जाणे कळ-

वळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळघडी आल्याविण ॥ ३ ॥

॥ १५१० ॥ काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ धृ० ॥ थोरींव सांडिली आपुली परिसें । नेणें सिवों कैसें लोखंडासी ॥ १ ॥ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती उपकारें ॥ २ ॥ भूतांची दया हें भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ४ ॥

॥ १५११ ॥ जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ॥ धृ० ॥ तुह्मी सांभाळिलों संतीं । भय निवारली खंती ॥ १ ॥ कृतकृत्य जालों । इच्छा केली ते पावलों ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । आतां करूं न शके बळ ॥ ३ ॥

॥ १५१२ ॥ काय पुण्यराशी । गेल्या भेदूनि आकाशीं ॥ धृ० ॥ तुह्मी जालेति कृपाळ । माझा केला जी सांभाळ ॥ १ ॥ काय बोळलें संचित । ऐसें नेणें अगणित ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें । काय केलें नारायणें ॥ ३ ॥

॥ १५१३ ॥ असें येथींचिया दीनें । भाग्यहीन सकळां ॥ धृ० ॥ भांडवल एवढें गांठीं । नाम कंठीं धरियेलें ॥ १ ॥ आणिक तें तुजें कांहीं । मज नाहीं यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला कोणें । एवढा नेणें लौकिक ॥ ३ ॥

॥ १५१४ ॥ गायें नाचें वायें टाळी । साधन कळीं उत्तम हें ॥ धृ० ॥ काय जाणों उरले किती । नाव ऐती या बैसा ॥ १ ॥ सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ॥ ३ ॥

॥ १५१५ ॥ सर्वकाळ माझे चित्तीं । हेचि खंती राहिली ॥ धृ० ॥ बैसलें तें रूप डोळां । वेळोवेळां आठवे ॥ १ ॥ वेव्हाराची सरली मात । अखंडित अनुसंधान ॥ २ ॥ तुका ह्मणे वेध जाला । अंगा आला श्रीरंग ॥ ३ ॥

॥ १५१६ ॥ जैसें दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे ॥ धृ० ॥ दुःख पावायाचें मूळ । रहणी ठाव नाहीं ताळ ॥ १ ॥ माळामुद्रांवरी । कैचा सोंगें जोडे हरी ॥ २ ॥ तुका ह्मणे देखें । ऐसे परींचीं बहुतेकें ॥ ३ ॥

॥ १५१७ ॥ अवघा तो शकुन । हृदयीं देवाचे चरण ॥ धृ० ॥ येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥ १ ॥ संग हरीच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे हरीच्या दासां । शुभकाळ अवघ्या दिशा ॥ ३ ॥

॥ १५१८ ॥ ब्रह्मरूपाचीं कर्में ब्रह्मरूप । विरहित संकल्प होतीं जाती ॥ धृ० ॥ ठेविलिया दिसे रंगाऐसी शिळा । उपाधि निराळा स्फटिक मणी ॥ १ ॥ नानाभाषामतें आळविती बाळा । प्रबोध तो मूळा जननीठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें नमन जाणतियां । लागतसें पायां वेळोवेळां ॥ ३ ॥

॥ १५१९ ॥ नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥ धृ० ॥ वाऱ्या हातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ति मुख त्याचें नारायण ॥ १ ॥ प्रभा आणि रवि

ान । उदयीं तंव जन सकळ साक्षी ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा सत्याचा
नीता नाश नाहीं पुन्हा ॥ ३ ॥

तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥ धृ० ॥ तैसे
इती साबडे । एकाचिया पडे पायां एक ॥ १ ॥ अक्षरें आणिती अंगासी
ठा ते गौरव पूज्य व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे विधिनिषेधाचे डोहीं । पडिले
कधीं ॥ ३ ॥

पटे ढाळूं आह्मी विष्णुदास जगीं । लागों नेदूं अंगीं पापपुण्य ॥ धृ० ॥
सदा सर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥ १ ॥ बळिवंत जेणें रचिलें
ां त्याचें बळ अंकितांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी देखतचि नाहीं । देवा-
सरें तें ॥ ३ ॥

। कथेचा उलंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओंळखा तो
ाया जीऊन जाला भूमि भार । अनउपकार माते कुसी ॥ १ ॥ निद्रेचा
गीं वीट । त्याचे पोटीं कीट कुपथ्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे दोन्ही बुडविलीं
तोंड काळें कथेमाजी ॥ ३ ॥

। सांडोनियां दों अक्षरां । काय करूं हा पसारा । विधिनिषेधाचा
ातारा नातुडसी ॥ धृ० ॥ ह्मणोनि बोबडया उत्तरीं । वाचे जपें निरंतरीं ।
। भवसागरीं तारूं तें ॥ १ ॥ सर्वमय ऐसें वेदांचें वचन । भ्रांति गर्जती
आणिक ध्यान । रे साधन मज चाड ॥ २ ॥ शेवटीं ब्रह्मार्पण । याचि
ा । काना मात्रा वांयांविण । तुका ह्मणे बिंदुलीं ॥ ३ ॥

। हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधुपार उतरलों ॥ धृ० ॥ फावलें
। पायीं संतां विनटलों ॥ १ ॥ हरिनामाचा शस्त्र घोडा । संसार गाढा
। हरिनामाचीं धनुष्यकांडें । विन्मुख तोंडें कळिकाळ ॥ ३ ॥ येणोंचि बळें
। हरीचे नामीं लोकीं तिहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों साचे । श्रीविठ्ठलाचे

। नव्हें हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी । ऐकावी कानीं संतजनीं ॥ धृ० ॥ आरुष
वा प्रसाद । करविला वाद तैसा केला ॥ १ ॥ देहपिंड दान दिला एकसरें ।
रं टांकसाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे झरा लागला नवनीत । सेविलिया हित पोट

॥ घटीं अलिप्त असे रवी । अग्नि काष्ठामाजी जेवी । तैसा नारायण जीवीं ।
ानें ॥ धृ० ॥ भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं । विचित्र ये
ाला गोसावी ॥ १ ॥ देह संकल्पासारिखें । एक एकांसी पारिखें । सुख
। अंगीं कर्में त्रिविध ॥ २ ॥ तुका ह्मणे कोडें । न कळे तयासी सांकडें ।
वाडें । उगवे केलें विंदान ॥ ३ ॥
॥ सद्गदित कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥ धृ० ॥ चिंतनाचा एक लाहो ।

तुमच्या अहो विठ्ठला ॥ १ ॥ नेत्रीं जळ वाहो सदा । आनंदाचे रोमांच ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपादान । इच्छी मन हें जोडी ॥ ३ ॥

॥ १९२८ ॥ जेथें देखें तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ धृ० ॥ डोळां बैसलें बैसलें । ध्यान राहोनि संचलें ॥ १ ॥ सरसावलें मन । केलें सोज्वळ लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्रें । आतां असिजेत देवें ॥ ३ ॥

॥ १९२९ ॥ तान्हे तान्ह प्याली । भूक भुकेनें खादली ॥ धृ० ॥ जथें तेंच नाहीं जालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥ १ ॥ वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पायीं ॥ २ ॥ शेष उरला तुका । जीवा जीवीं जाला चुका ॥ ३ ॥

॥ १९३० ॥ पाणिपात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥ धृ० ॥ आवश्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥ १ ॥ भिक्षा कामधेनुऐशी । अवकाशीं शयन ॥ २ ॥ पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं ॥ ३ ॥

॥ १९३१ ॥ विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ धृ० ॥ माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥ १ ॥ लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे गंगासागरसंगमीं । अवघ्या जाल्या ऊर्मि एकमय ॥ ३ ॥

॥ १९३२ ॥ कृष्णरामनाम मांडीं पांवोळी । तेणें होइल होळी पापा धुनी ॥ धृ० ॥ ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥ १ ॥ जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस उरे मागुताली ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणीं चुकतील ॥ ३ ॥

॥ १९३३ ॥ परमार्थी तो न ह्मणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥ धृ० ॥ थोडाचि स्फुलिंग बहुत दावाग्नी । वाढतां इंधनीं वाढविला ॥ १ ॥ पितियानें जैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देवें वसे ॥ २ ॥ तुका ह्मणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ३ ॥

॥ १९३४ ॥ ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥ धृ० ॥ देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥ १ ॥ कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ २ ॥ तुका ह्मणे भेदाभेद । गेले वाद खंडोनी ॥ ३ ॥

॥ १९३५ ॥ सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेदकाम निवारुनी ॥ धृ० ॥ न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया ॥ १ ॥ देवाचीच नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे भावेंचि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥ ३ ॥

॥ १९३६ ॥ ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ धृ० ॥ ह्मणोनियां ऐसे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ १ ॥ वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकांमधीं ॥ २ ॥ पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा

तुमच्या अहो विठ्ठला ॥ १ ॥ नेत्रीं जळ वाहो सदां । आनंदाचे रोमांच ॥ २ ॥ तुका म्हणे कृपावान । इच्छीं मन हे जोडी ॥ ३ ॥

॥ १५२८ ॥ जेथें देखें तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ धृ० ॥ डोळां बैसलें बैसलें । ध्यान राहोनि संचलें ॥ १ ॥ सरसावलें मन । केलें सोज्वळ लोचन ॥ २ ॥ तुका म्हणे सत्रें । आतां असिजेत देवें ॥ ३ ॥

॥ १५२९ ॥ तान्हे तान्ह प्याली । भूक भुकेनें खादली ॥ धृ० ॥ जयें तेत्र नाहीं जालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥ १ ॥ वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पायीं ॥ २ ॥ शेष उरला तुका । जीवा जीवीं जाला चुका ॥ ३ ॥

॥ १५३० ॥ पाणिपात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥ धृ० ॥ आवश्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥ १ ॥ भिक्षा कामधेनुऐशी । अवकाशीं शयन ॥ २ ॥ पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं ॥ ३ ॥

॥ १५३१ ॥ विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ धृ० ॥ माझी मज झाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥ १ ॥ लाभाचिया सोसें पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा ॥ २ ॥ तुका म्हणे गंगासागरसंगमीं । अवघ्या जाल्या ऊर्मि एकमय ॥ ३ ॥

॥ १५३२ ॥ कृष्णरामनाम मांडीं पांवोळी । तेणें होइल होळी पापा धुनी ॥ धृ० ॥ ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥ १ ॥ जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस उरे मागुताली ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती खाणी चुकतील ॥ ३ ॥

॥ १५३३ ॥ परमार्थी तो न म्हणावा आपुला । सलगी धाकुला हळूं नये ॥ धृ० ॥ थोडाचि स्फुलिंग बहुत दावाग्नी । वाढतां इंधनीं वाढविला ॥ १ ॥ पितियानें जैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देवें वसे ॥ २ ॥ तुका म्हणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ३ ॥

॥ १५३४ ॥ ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥ धृ० ॥ देव नया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥ १ ॥ कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ २ ॥ तुका म्हणे भेदाभेद । गेले वाद खंडोनी ॥ ३ ॥

॥ १५३५ ॥ सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेदकाम निवारुनी ॥ धृ० ॥ न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया ॥ १ ॥ देवाचींच नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥ २ ॥ तुका म्हणे आहे भावेंचि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥ ३ ॥

॥ १५३६ ॥ ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ धृ० ॥ म्हणोनियां ऐसे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ १ ॥ वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकांमधीं ॥ २ ॥ पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा

विपरीत ॥ ३ ॥ आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करती रागें गुरगुरू ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज कोणाचा पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां ॥ ५ ॥

॥ १५३७ ॥ पंढरीची वाट पाहें निरंतर । निडळावरी कर ठेवूनियां ॥ धृ० ॥ जातियां निरोप पाठवीं माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥ १ ॥ पैल कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिखें चतुर्भुज ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवां पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १५३८ ॥ ऐसी जोडी करा राम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥ धृ० ॥ नासिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा सीण तेंचि फळ ॥ १ ॥ नाव धड करा सहस्रां नामांची । जे भवसिंधूची थडी पात्रे ॥ २ ॥ तुका ह्मणे काळा हाणा तोंडावरी । आता भरा हरिरामबाणीं ॥ ३ ॥

॥ १५३९ ॥ पाहें मजकडे भरोनियां दृष्टी । बहुत हिंपुटी जालों माते ॥ धृ० ॥ करावेंसें वाटे जीवा स्तनपान । नव्हे हें वचन शृंगारिक ॥ १ ॥ सत्यासाठीं माझी शब्दविवेचना । जोडिल्या वचनाचें तें नव्हे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी कळवळ्याची कींव । भागलासे जीव कर्तव्यानें ॥ ३ ॥

॥ १५४० ॥ तुज ह्मणतील कृपेचा सागर । तरि कां केला धीर पांडुरंगा ॥ धृ० ॥ आझुनी कां नये तुज माझी दया । काय देवराया पाहातोसी ॥ १ ॥ आळवितों जैसें पाडस कुरंगिणी । पीडिलिया वनीं तानभूक ॥ २ ॥ प्रेमरसपान्हा पाजीं माझे आई धांवें वो विठाई वोरसोनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें कोण हरी दुःख । तुजविण एक पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १५४१ ॥ भक्ति तों कठिण शुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ धृ० ॥ जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत । पायाविण भिंत तांतडीची ॥ १ ॥ कामावलें तरि पाका ओझें घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥ २ ॥ तुका ह्मणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥ ३ ॥

॥ १५४२ ॥ पापी ह्मणों तरि आठवितों पाय । दोष बळी काय तयाहुनी ॥ धृ० ॥ ऐशा विचाराचे घालूनि कोंडणी । काय चक्रपाणी निजलेती ॥ १ ॥ एकवेळ जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें कैसें नेलें दुःख ॥ २ ॥ तुका ह्मणे अहो वैकुंठनायका । चिंता कां सेवका तुमचिया ॥ ३ ॥

॥ १५४३ ॥ उगविल्या गुंती । ऐशा मागें नेणों किती ॥ धृ० ॥ ख्याति केली अजामेळें । होतें निघालें दिवाळें ॥ १ ॥ मोकलिला प्रायश्चित्तीं । कोणी न धरिती हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्त वाट । वैकुंठींची घडघडाट ॥ ३ ॥

॥ १५४४ ॥ सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्णा ॥ धृ० ॥ पुण्य पर्वकाळ तीर्थेंही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ॥ १ ॥ अवघेंचि लाभ बैसलिया घरा । येतीं भाव धरा एके ठायीं ॥ २ ॥ शेळ्या मेंढ्या गाई सेवा घेती ह्मैसी ।

कामधेनु तैसी नव्हे एक ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभची ॥ ४ ॥

॥ १५४५ ॥ पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥ धृ० ॥ तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील रासी पातकाच्या ॥ १ ॥ देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ २ ॥ काय त्यां उरलें वेगळें आणिक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ४ ॥

॥ १५४६ ॥ पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । जालिया भेटी हरिदासांची ॥ धृ० ॥ ऐसें बळ नाहीं आणिकांचे अंगीं । तपें तीर्थें जगीं दानें व्रतें ॥ १ ॥ चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचें माथां ॥ २ ॥ भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥३॥ तुका ह्मणे मन जालें समाधान । देखिले चरण वैष्णवांचे ॥४॥

॥ १५४७ ॥ येणें बोधें आह्मी असों सर्वकाळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ धृ० ॥ आह्मी भूमीवरी एक दइवांचे । निधान हें वाचे सांपडलें ॥ १ ॥ तरतील कुळें दोन्ही उभयतां । गातां आइकतां सुखरूप ॥२॥ न चळे हा मंत्र न ह्मणों यातिकुळ । न लगे काळ वेळ विचारावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा विठ्ठल विसांवा । सांठवीन हांवा हृदयांत ॥ ४ ॥

॥ १५४८ ॥ बहुतां जन्मींचें संचित । सबळ होय जरि बहुत । तरिच होय हरिभक्त । कृपावंत मानसीं ॥ धृ० ॥ ह्मणवी ह्मणियारा तयांचा । दास आपुल्या दासांचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥१॥ असे भूतदया मानसीं । अवघा देखे हृषीकेशी । जीवें न विसंबे त्यासी । मागें मागें हिंडतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्विकार । शरणागतां वज्रपंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म चुकलें ॥ ३ ॥

॥ १५४९ ॥ तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥ धृ० ॥ लुटा लुटा संतजन । अमुप हें रासी धन ॥ १ ॥ जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ २ ॥ तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥ ३ ॥

॥ १५५० ॥ आळवीन स्वरें । कैशा मधुरा उत्तरें ॥ धृ० ॥ यें वो यें वो पांडुरंगे । प्रेमपान्हा मज दें गे ॥ १ ॥ पसरूनि चोंची वचनें हीं करुणेचीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । आह्मी लडिवाळें आळीं ॥ ३ ॥

॥ १५५१ ॥ सकाळिकांचें समाधान । नव्हे देखिल्यावांचुन ॥ धृ० ॥ रूप दाखवीं रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥ १ ॥ शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ॥ २॥ तुका ह्मणे कान्हा । भूक लागली नयनां ॥ ३ ॥

॥ १५५२ ॥ पतितपावना । दिनानाथा नारायणा ॥ धृ० ॥ तुझें रूप माझे मनीं । राहो नाम जपो वाणी ॥ १ ॥ ब्रह्मांडनायका । भक्तजनाच्या पाळका ॥ २ ॥ जी वांचिया जीवा । तुका ह्मणे देवदेवा ॥ ३ ॥

॥ १५५३ ॥ करीं हेंचि काम । मना जपें राम राम ॥ धृ० ॥ लागो हाचि छंद । मना गोविंद गोविंद ॥ १ ॥ तुका ह्मणे मना । मज भीक द्यावी दीना ॥ २ ॥

ुलिया लाजा । धांवे भक्तांचिया काजा ॥ धृ० ॥ नाम धरिलें द्विना-
ा व्रत ॥ १ ॥ आघात निवारी । छाया पितांबरें करी ॥ २ ॥ उभा
ो याजसाटीं ॥ ३ ॥
ावया भक्तिकाज । नाहीं लाज हा धरित ॥ धृ० ॥ ऐसियासी शरण
ा वंची ॥ १ ॥ भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षिलें ॥ २ ॥ तुका
म्यां चित्तीं धरियेला ॥ ३ ॥
चरे वनांतरीं । चित्त बाळ कापें घरीं ॥ धृ० ॥ तैसें करीं वो माझे
खें पायीं ॥ १ ॥ काढितां तळमळी । जीवनाबाहेर मासोळी ॥ २ ॥
ोवाप्राणांची आवडी ॥ ३ ॥
नाची कोणां न घडावी निंदा । साक्षात गोविंदा नाहीं त्याचें ॥ धृ० ॥
अवतार । भक्तां अभयंकर खळां कष्ट ॥ १ ॥ दुर्वास हा छळों आला
त्यासी जाळित फिरे ॥ २ ॥ द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांती ।
केलें ॥ ३ ॥ न साहेचि बब्रु पांडवां पारिखा । धुडाविला सखा
ा ह्मणे अंगीं राखिली दुर्गंधी । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥ ५ ॥
ासी आवडी हरिनामांचीं । तोचि एक बहु शुची ॥ धृ० ॥ जपतो
वे वर्णांमाजी द्विज ॥ १ ॥ तुका ह्मणे वर्णां धर्म । अवघें आहे सम

ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥ धृ० ॥ आह्मां विठ्ठल
ळिया धन ॥ १ ॥ विठ्ठल हे वाणी । अमृत हे संजिवनी ॥ २ ॥ रंगला
ल सर्वांगें ॥ ३ ॥
ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापा निर्मूळ ॥ धृ० ॥ भाग्यवंता छंद
ऐकती ॥ १ ॥ विठ्ठल हें दैवत भोळें । चाड काळें न धरावी ॥ २ ॥
ती । विठ्ठल चित्तीं ते शुद्ध ॥ ३ ॥
गे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे ॥ धृ० ॥ मग तो हो का
करोनि ब्रह्मादिक ॥ १ ॥ नाहीं विठ्ठल जया ठावा । तोही डोळां न
ा ह्मणे नाहीं । त्याची भीड मज कांहीं ॥ ३ ॥
त पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हा ॥ धृ० ॥
अटाहासें । जंव काळाऐसें जालें नाहीं ॥ १ ॥ मरणांची तंव गांठोडी
चे वरि माप भरी ॥ २ ॥ तुका ह्मणे धिग वाहाती मारग । अंगा
ी ॥ ३ ॥
तांसी तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अव्हेरितो ॥ धृ० ॥
जावें ठाया । होतसे घात या दुर्बळाचा ॥ १ ॥ भावहीना आड येतसे
सी चुका घालावया ॥ २ ॥ तुका ह्मणे जया संकोच दर्शनें । तया
वत ॥ ३ ॥

॥ १५६४ ॥ संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय जाणतेनो घड ॥ धृ० ॥ हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें । काय तेथें गोडें निवडावीं ॥ १ ॥ ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला सेटीं विचार त्या ॥ ३ ॥

॥ १५६५ ॥ जातीचें तें चढे प्रेम । पक्षी स्मरे राम राम ॥ धृ० ॥ तें काय गुण लागती येरां । कागा पिंजरा शोभेना ॥ १ ॥ शिकविलें तें सुजात सोसी । मग तयासी मोल चढे ॥ २ ॥ तुका ह्मणे वेषधारी । हिजड्या नारी नव्हेती ॥ ३ ॥

॥ १५६६ ॥ वसोनि थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥ धृ० ॥ नाहीं देखिला ना ठावा । तोंड पिटी करी हांवा ॥ १ ॥ फुगतें काउळें । ह्मणे मी राजहंसा आगळें ॥ २ ॥ गजाहूनि खर । ह्मणे चांगला मी फार ॥ ३ ॥ मुलाम्याचें नाणें । तुका ह्मणे नव्हे सोनें ॥ ४ ॥

॥ १५६७ ॥ मुक्त होता परि बळें जाला बद्ध । घेऊनियां छंद माझें माझें ॥ धृ० ॥ पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणे कोण करिता तो ॥ १ ॥ तुका ह्मणे वांयां गेलें वांयां विण । जैसा मृगशीण मृगजळीं ॥ २ ॥

॥ १५६८ ॥ पंढरियें माझें माहेर साजणी । ओवियें कांडणीं गाऊं गीत ॥ धृ० ॥ राही रखुमाई सत्यभामा माता । पांडुरंग पिता माहियेर ॥ १ ॥ उद्धव अक्रूर व्यास आंबऋषी । भाई नारदासी गोरविन ॥ २ ॥ गरुड बंधु लडिवाळ पुंडलिक । यांचें कवतुक वाटे मज ॥ ३ ॥ मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओवियेसी ॥ ४ ॥ निवृत्ति ज्ञान देव सोपान चांगया । जिवलगा माझिया नामदेवा ॥ ५ ॥ नागोजन मित्रा नरहरि सोनारा । रोहिदास कबिरा सोईरिया ॥ ६ ॥ परसो भागवता सुरदास सांवता । गाईन नेणतां सकळांसी ॥ ७ ॥ चोखामेळा संत जिवाचे सोइरे । न पडे विसर यांचा घडी ॥ ८ ॥ जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाटका कान्हया मिराबाई ॥ ९ ॥ आणिकही संत महानुभाव मुनी । सकळां चरणीं जीव माझा ॥ १० ॥ आनंदें ओविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी ॥ ११ ॥ तुका ह्मणे माझा बळिया बापमाय । हर्षें नांदों सये घराचारी ॥ १२ ॥

॥ १५६९ ॥ पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥ धृ० ॥ पोटाभेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥ १ ॥ जप तप अनुष्ठान । पोटासाठीं जाले दीन ॥ २ ॥ पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥ ३ ॥ पोट काशियानें भरे । तुका ह्मणे झुरझुरूं मरे ॥ ४ ॥

## आरत्या.

॥ १५७० ॥ जगदीश जगदीश तुज ह्मणती । परि या जनामाजी असशील युक्ती । पुण्यपापविरहित सकळां अधिपती । दृष्टा परि नळणी अलिप्त गती ॥ धृ० ॥ जय देव जय देव जय पंढरिनाथा । श्रीपंढरिनाथा । नुरे पाप विठ्ठल ह्मणतां सर्वथा ॥ १ ॥

ाम तुज नेणती कोणी । परि तूं भावभक्ति जवळीच दोन्ही । नेणतां
ाते पूजेनी । न माये ब्रह्मांडीं संपुष्टशयनीं ॥ २ ॥ असुरां काळ भासे
। पसरी मुख एक चावितो धुडें । भक्ता शरणागता चाले तो पुढें । दावी
नेही वांकडें ॥ ३ ॥ एकाएकीं बहु विस्तरला सुखें । खेळे त्याची लीळा
कें । तेथें नरनारी कवण बाळकें । काय पापपुण्य कवण सुखदुःखें ॥ ४ ॥
तूंचि जाणशी एक । बद्ध मोक्ष प्राप्त आणि सुखदुःख । आणों ह्मणतां
बहुतेकें । तुका ह्मणे शरण आलों मज राखें ॥ ५ ॥
॥ दैत्यभारें पीडिली पृथ्वी बाळा । ह्मणोनि तुज येणें जाले गोपाळा ।
ळक उत्सव सोहळा । मंगळें तुज गाती आबळ बाळा ॥ धृ० ॥ जय देव
गरुडध्वजा । श्रीगरुडध्वजा । आरती ओवाळूं तुज भक्तिकाजा ॥ १ ॥
म नाहीं जयासी । चिंतितां तैसाचि होसी तयांसी । मत्स्य कूर्म वराह नरसिंह
असुरां काळ म्हूण ठाके ध्यानासी ॥ २ ॥ सहस्र रूपें नाम सांवळा ना
नेती तुज ह्मणती विश्वंभरा । जीवनां जीवन तूंचि होसी दातारा । न कळे
कां सुरवरां ॥ ३ ॥ संतां महंतां घरीं ह्मणवी ह्मणियारा । शंखचक्रगदा आयु-
। सुदर्शन घरटी फिरे अवश्वरा । सकुमार ना स्थूळ होंनि गोजिरा ॥ ४ ॥
ें न घडे पूजन । सकळही गंगा जाल्या तुजपासून । उत्पत्ति प्रळय तूंचि
ठण । धरूनि राहिला तुका निश्चयीं चरण ॥ ५ ॥
॥ काय तुझा महिमा वर्णूं मी किती । नाममात्रें भवपाश तुटती । पाहातां
ष्णुमूर्ती । कोटिकुळां सहित जे उद्धरती ॥ धृ० ॥ जय देव जय देव जय
श्रीपंढरिराया । करुनियां कुरवंडी सांडीन काया ॥ १ ॥ मंगळआरतीच्या थोर
ाणि द्यावया नाहीं उपमा । श्रीमुखासहित देखे जो कर्मा । वाहन सुटे जैसा
तमा ॥ २ ॥ धन्य व्रतकाळ हे एकादशी । जागरण उपवास घडे जयांसी ।
जन एकाभावेंसी । नित्यमुक्त पूज्य तिहीं लोकांसी ॥ ३ ॥ न घडे वांया काळ
ाती । असे तुझा वास तयांच्या चित्तीं । धाले सुखें सदा प्रेमें डुल्लती । तीर्थें
तयांचा पाहाती ॥ ४ ॥ देव भक्त तूंचि जालासी दोन्ही । वाढावया सुख
नीं । जड जीवां उद्धार होय लागोनी । शरण तुका वंदी पाउलें दोन्ही ॥ ५ ॥
॥ कंसरायें गर्भ वधियेले सात । ह्मणोनि गोकुळासी आले अनंत । द्यावया
लें हेंचि निमित्त । असुर संहारूनि तारावे भक्त ॥ धृ० ॥ जय देव जय देव
रूपा । श्रीविश्वरूपा । ओवाळीन तुज देहदीपें बापा ॥ १ ॥ स्थूळरूप होऊनि
नें । जैसा भाव तैसा तयांकारणें । दैत्यांसी भासला सिंह गर्जनें । काळासी
यशोदेसी तान्हें ॥ २ ॥ अनंत वर्णी कोणा न कळेचि पार । सगुण कीं निर्गुण
र । पांगलीं साही अठरा करितां वेव्हार । तो वळितसे गौळियांचें खिल्लार
तिस कोटि तिहीं देवासीं श्रेष्ठ । पाउलें पाताळीं नेणती स्वर्ग मुगुट । गिळिलीं
तरि न भरेचि पोट । तो खाउन धाला गोपाळाचें उच्छिष्ट ॥ ४ ॥ महिमा वर्णूं

सरि पांगलिया श्रुती । सिणला शेष चिरल्या जिव्हा करितां स्तुती । भावेंविण कांहीं न चलेचि युक्ती । राखें शरण तुकयाबंधु करी विनंती ॥ ५ ॥

॥ १५७४ ॥ परमानंदा परम पुरुषोत्तमरामा । अच्युता अनंता हरि मेघश्यामा । अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा । अकळकळा कमळापती न कळे महिमा ॥ धृ० ॥ जय देव जय देव जय जी श्रीपती । मंगळशुभदायका करीन आरती ॥ १ ॥ गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा । गिरिधरकर भवसागरतारक दधिमथना । मधुसूदन मुनिजीवन धरणीश्रमहरणा । दीनवत्सळ सकळां मूळ जय जयनिधाना ॥ २ ॥ विश्वंभरा सर्वेश्वर जगदाधारा । चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा । सुखसागर गुणआगर मुगुटमणी शूरा । कल्याणकैवल्यमूर्ति मनोहरा ॥ ३ ॥ गरुडासना शेषशयना नरहरी । नारायण ध्याना सुरवरहरगौरी । नंदा नंदनवंदन त्रिभुवनांभीतरी । अनंतनामीं ठसा अवतारांवरी ॥ ४ ॥ सगुणनिर्गुणसाक्ष श्रीमंत संतां । भगवाना भगवंता कालकृतांता । उत्पत्तिपाळणपासून संहारणसत्ता । शरण तुकयाबंधु तारीं रिति बहुतां ॥ ५ ॥

॥ १५७५ ॥ पंढरि पुण्यभूमि भीमा दक्षिणवाहिनी । तीर्थ हें चंद्रभागा महापातकां धुनी । उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ॥ धृ० ॥ जय देवा पांडुरंगा जय अनाथनाथा । आरती ओंवाळीन तुह्मां लक्ष्मीकांता ॥ १ ॥ नित्य नवा सोहळा हो महावाद्यांचा गजर । सन्मुख गरुड पारीं उभा जोडूनि कर । मंडितचतुर्भुजा कटीं मिरवती कर ॥ २ ॥ हरिनाम कीर्तन हो आनंद महाद्वारीं । नाचती प्रेमसुखें नर तेथिंच्या नारी । जीवन्मुख लोक नित्य पाहाती हरी ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी हो गरुडटकयां भार । गर्जती नामघोषें महावैष्णववीर । पापासी रीग नाहीं असुर कांपती सुर ॥ ४ ॥ हें सुख पुंडलिकें कसें आणिलें बापें । निर्गुण साकारलें आह्मांलागीं हें सोपें । ह्मणोनि चरण धरोनि तुका राहिला सुखें ॥ ५ ॥

॥ १५७६ ॥ अवतार गोकुळीं हो जन तारावयासी । लावण्यरूपडें हें तेजपुंजाळरासी । उगवतां कोटि बिंबें रवि लोपले शशी । उत्साव सुरवरां मही थोर मानसीं ॥ धृ० ॥ जय देवा कृष्णनाथा जय रखुमाईकांता । आरती ओंवाळीन तुह्मां देवकीसुता । जय देवा कृष्णनाथा ॥ १ ॥ वसुदेवदेवकीची बंद फोडुनी शाळ । होउनी विश्वजनिता तया पोटिंचा बाळ । दैत्य हे त्रासियेले समूळ कंसासी काळ । राजया उग्रसेना केला मथुरापाळ ॥ २ ॥ राखतां गोधनें हो इंद्र कोपला भारी । मेघ जो कडाडिला शिळा वर्षतां धारीं । राखिलें गोकुळ हें नखीं धरिला गिरी । निर्भय लोकपाळ अवतरले हरी ॥ ३ ॥ कौतुक पाहावया माव ब्रह्मयानें केली । वत्सेंही चोरूनियां सत्यलोकासि नेलीं । गोपाळ गाईवत्सें दोहीं ठायीं राखिलीं । सुखाचा प्रेमसिंधु अनाथांची माउली ॥ ४ ॥ तारिलें भक्तजना दैत्य निर्दाळुनी । पांडवां साहकारी आडल्यां निर्वाणी । गुण मी काय वर्णूं मति केवढी वाणी । विनवितो दास तुका ठाव देई चरणीं ॥ ५ ॥

॥ १५७७ ॥ सुंदर अंगकांति मुखभाळ सुरेख । बाणली उटी अंगीं टिळा साजिरी रेख । मस्तकीं मुगुट कानीं कुंडलां तेज फांके । आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ॥ धृ० ॥

जय देवा चतुर्भुजा जय लावण्यतेजा । आरती ओंवाळीन भवतारिया हा वोजा ॥ १ ॥ जय० ॥ उदार जुंझार हा जया वाणिती श्रुती । परतल्या नेति ह्मणती तयां नकळे गती । भाट हा चतुर्मुखें अनुवाद करिती । पांगलीं साही अठरा रूप न गती ॥ २ ॥ ऐकोनि रूप ऐसें तुजलागीं धुंडिती । बोडकें नग्न एक निराहार यती । साधनें योग नाना तपें दारुण किती । सांडिलें सुख दिली संसारा शांती ॥ ३ ॥ भरूनि माजी लोकां तिहीं नांदसि एक । कामिनी मनमोहना रूप नाम अनेक । नासति नाममात्रें भवपातकें शोक । पाउलें वंदिति सिद्ध आणि साधक ॥ ४ ॥ उपमा द्यावयासी दुजें काय हें तुज । तत्त्वासि तत्त्वसार मूळ जालासी बीज । खेळसि बाळलीला अवतार सहज । विनवितो दास तुका कर जोडोनि तुज ॥ ५ ॥

॥ १५७८ ॥ सकुमार मुखकमळ निजसारनिर्मळ । सांवळी सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ । झळकती दिव्य तेजें दंत माज पातळ । मिरवाले मयुरपत्रें मुगुट कुंडलें माळ ॥ १ ॥ जय देवा जगदीश्वरा । धन्य रखुमाईवरा । आरती करीन काया । ओंवाळिन सुंदरा । ॥ धृ० ॥ जय० ॥ गोजिरें ठाणमान भुजा मंडित चारी । शोभति शंखचक्रगदापद्म मोहरी । हृदयीं ब्रह्मपद वाणलें शृंगारीं । गर्जति चरणीं वांकी कंठ कोकिळास्वरीं ॥ २ ॥ घवघवित उटी अंगीं बावन चंदनांची । ललाटीं कस्तुरीचा कास पितांबराची । कटिसूत्र वरि साजिरें प्रभा वर मोतियांची । संगीत सकळ मुद्रा पाउलें कुंकुमाची ॥ ३ ॥ सौभाग्यसुख सागर गुणलावण्यखाणी । लाघवी दीनवत्सल विश्व लाविलें ध्यानीं । आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनी । धन्य ते प्रसवली ऐसिया नंदपत्नी ॥ ४ ॥ वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेती । रविकोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती । उदार सुर गंभीर पूर्ण आनंदमूर्ती । तुकयाबंधु ह्मणे स्तवूं मी काय किती ॥ ५ ॥

॥ १५७९ ॥ महा जी महादेवा महाकाळमर्दना । मांडियेलें उग्र तप महादीप्त दारुणा । परिधान व्याघ्रांबर चिता भस्मलेपना । स्मशान क्रीडास्थळ तुह्मां जी त्रिनयना ॥ १ ॥ जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा । आरती ओंवाळिन कैवल्यदातारा ॥ जय० ॥ धृ० ॥ रुद्र हें नाम तुह्मां उग्र संहारासी । शंकर शिव भोळा उदार सर्वस्वीं । उदक बेलपत्र टाळी वाहिल्या देसी । आपुलें पद दासां ठाव देई कैलासीं ॥ २ ॥ त्रैलोक्यव्यापका हो जन आणि विजन । विराटस्वरूप हें तुझें साजिरें ध्यान । करितो वेद स्तुति कीर्ति मुखें आपण । जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ॥ ३ ॥ बोलतां नाम महिमा असे आश्चर्य जगीं । उपदेश केल्यानंतरें पापें पळती वेगीं । हरहर वाणी गर्जे प्रेम संचरे अंगीं । राहिली दृष्टि चरणीं रंग मीनला रंगीं ॥ ४ ॥ पुजूनि लिंग उभा तुका जोडोनी हात । करितो विज्ञापना परिसावी हे मात । अखंड राहूं द्यावें माझें चरणीं चित्त । घातले साष्टांग मागे मस्तकीं हात ॥ ५ ॥

॥ १५८० ॥ अवतारनामभेद गणा आदि अगाद । जयासि पार नाहीं पुढें खुंटला वाद । एकचि दंत शोभे मुख विक्राळ दोंद । ब्रह्मांडामाजि दावी अनंत हे छंद ॥ १ ॥ जय जया गणपति ओंवाळिन आरती । साजिऱ्या सरळ भुजा फरशकमळ शोभती ॥ धृ० ॥ हे मही ठेंगणी हो तुज नृत्यनायका । भोंवरि फेर देतां असुर मर्दिले एकां । घातले तोडरीं

हो भक्तजनपाळका । सहस्र नाम तुज भुक्तिमुक्तिदायका ॥ २ ॥ सुंदर शोभला हो रूपें लोपलीं तेजें । उपमा काय देऊं असे आणिक दुजें । रविशशितारागणें जयामाजी सहजें । उदरीं सामावलीं जया ब्रह्मांडबीजें ॥ ३ ॥ वर्णितां शेष लीळा तया भागलीं मुखें । पांगुळले वेद चारी कैसे राहिलें सुखें । अवतार जन्मला हो लिंगनाभी या मुखें । अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखें ॥ ४ ॥ विश्व हें रूप तुझें हस्त पाद मुखडें । ऐसाचि भाव देई तया नाचतां पुढें । धूप दीप पंचारति ओंवाळिन निवाडें । राखें या शरणागता तुका खेळतां लाडें ॥ ५ ॥

॥ १५८१ ॥ कनकाच्या परियेळीं उजळूनि आरती । रत्नदीपशोभा कैशा पाजळल्या ज्योती ॥ १ ॥ ओंवाळूं गे माये सबाह्य साजिरा । राहिरखुमाईसत्यभामेच्या वरा ॥ धृ० ॥ मंडितचतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें । श्रीमुखाची शोभा पाहातां तेज फांकलें ॥ २ ॥ वैजयंती माळ गळां शोभे श्रीमंत । शंखचक्रगदापद्म आयुधें शोभत ॥ ३ ॥ सांवळा सकुमार जैसा कर्दळीगाभा । चरणीचीं नेपुरें वांकी गर्जती नभा ॥ ४ ॥ ओंवाळितां मन हें उभें ठाकलें ठायीं । समदृष्टि समाधि तुकया लागली पायीं ॥ ५ ॥

॥ १५८२ ॥ भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योती । पंचप्राण जीवेंभावें ओंवाळूं आरती ॥ १ ॥ ओंवाळूं आरती माझ्या पंढरिनाथा । दोन्ही कर जोडोनि चरणीं ठेविन माथा ॥ धृ० ॥ काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती । कोटि ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ॥ २ ॥ राही रखुमाबाई दोहीं दों बाहीं । मयूर पिच्छचामरें ढाळिती ठायीं ठायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे दीप घेऊनि उन्मनति शोभा । विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ४ ॥

॥ १५८३ ॥ धन्य दिवस आजि दर्शन संतांचें । नांदे तया घरीं दैवत पंढरीचें ॥ धृ० ॥ धन्य पुण्य रूप कैसा जाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥ १ ॥ धन्य पूर्व पुण्य वोढवलें निरुतें । संतांचें दर्शन जालें भाग्यें बहुतें ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य आह्मां जोडली जोडी । संतांचे चरण आतां जीवें न सोडीं ॥ ३ ॥

॥ १५८४ ॥ गाऊं वाणूं तुज विठो तुझा करूं अनुवाद । जिकडे पाहें तिकडे सर्वमय गोविंद ॥ धृ० ॥ आनंद रे विठोबा जाला माझे मनीं । देखिले लोचनीं विटेसहित पाउलें ॥ १ ॥ न करीं तपसाधनें रे मुक्तीचे सायास । हाचि जन्मोजन्मीं गोड भक्तीचा रस ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां प्रेमा उणें तें काई । पंढरीचा राणा सांठविला ह्रदयीं ॥ ३ ॥

॥ १५८५ ॥ मागणें तें एक तुजप्रति आहे । देशी तरि पाहें पांडुरंगा ॥ धृ० ॥ या संतांसी निरवीं हें मज देईं । आणिक तुजें कांहीं न मागें तुज ॥ १ ॥ तुका ह्मणे आतां उदार होईं । मज ठेवीं पायीं संतांचिया ॥ २ ॥

## स्वामींनीं काया ब्रह्म केली ते.

॥ १५८६ ॥ सोधितांचि नये । ह्मणोनि वोळगतों पाये ॥ धृ० ॥ आतां दिसों नये जना । ऐसें करा नारायणा ॥ १ ॥ परतोनि मन । गेलें ठायींचि मुरोन ॥ २ ॥ विसरला तुका । बोलों चालों जाला मुका ॥ ३ ॥

॥ १५८७ ॥ रज्जुसर्पाकार । भासयेलें जगडंबर ॥ धृ० ॥ ह्मणोनि आठवती पाय । घेतों आलाय बलाय ॥ १ ॥ दृश्य द्रुमाकार लाणी । केलों सर्वस्वासी धणी ॥ २ ॥ तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनि उरला लोकां ॥ ३ ॥

॥ १५८८ ॥ ह्मणवितों दास । परि मी असें उदास ॥ धृ० ॥ हाचि निश्चय माझा । परि मी निश्चयाहुनी दुजा ॥ १ ॥ सरतें कर्तृत्व माझ्यानें । परि मी त्याहीहून भिन्न ॥ २ ॥ तुका तुकासी तुकला । तुका तुकाहुनी निराळा ॥ ३ ॥

॥ १५८९ ॥ घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिति सांडवीन ॥ धृ० ॥ ब्रह्मभूत होते कायाच कीर्तनीं । भाग्य तरी ऋणि देवा ऐसा ॥ १ ॥ तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडु स्वर्गवास करिन भोग ॥ २ ॥ सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजविन ॥ ३ ॥ भक्तिभाग्यप्रेमा साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ४ ॥ धन्य ह्मणवीन येह लोकीं लोकां । भाग्य आह्मी तुका देखियेला ॥ ५ ॥

॥ १५९० ॥ संसाराच अंगीं अवघींच व्यसनें । आह्मी या कीर्तनें शुद्ध जालों ॥ धृ० ॥ आतां हें सोंवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें ॥ १ ॥ ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥ ३ ॥

॥ १५९१ ॥ तुह्मी सनकादिक संत । ह्मणवितां कृपावंत ॥ धृ० ॥ एवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ॥ १ ॥ भाकूनि करुणा । विनवा वैकुंठींचा राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आठवा । मूळ लवकरी पाठवा ॥ ३ ॥

॥ १५९२ ॥ आपुल्या माहेरा जाईन मी आतां । निरोप या संतां हातीं आला ॥ धृ० ॥ सुख दुःख माझें ऐकिलें कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥ १ ॥ करुनी सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसें एकें न्यावयासी ॥ २ ॥ त्याची पंथें माझें लागलेंसें चित्त । वाट पाहें नित्य माहेराची ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलिया मायबाप ॥ ४ ॥

॥ १५९३ ॥ चिन्हें उमटती अंगीं । शकुना जोगीं उत्तम ॥ धृ० ॥ आठवला बापमाय । येइल काय मूळ नेणों ॥ १ ॥ उत्कंठित जालें मन । तेचि खुण तेथिची ॥ २ ॥ तुका ह्मणे काम वारीं । आळस घरीं करमेना ॥ ३ ॥

॥ १५९४ ॥ आरोनियां पाहे वाट । कटकट सोसेना ॥ धृ० ॥ आलियांस पुसें मात । तेथें चित्त लागलें ॥ १ ॥ दळीं कांहीं लोकांऐसें । परि मी नसें ते ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पिसें । तेथें तैसें असेल ॥ ३ ॥

॥ १५९५ ॥ येथीलिया अनुभवें । कळों जीवें हें येतसे ॥ धृ० ॥ दोहीं ठायीं एक जीव । माझी कींव त्या अंगीं ॥ १ ॥ भूक भुकेचि खाउनी धाय । नाहीं हाय अन्नाची ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख जालें । अंतर धालें त्यागुणें ॥ ३ ॥

॥ १५९६ ॥ पल आले हरी । शंख चक्र शोभे करीं ॥ धृ० ॥ गरुड येतो फडत्कारें । नाभी नाभी ह्मणे स्वरें ॥ १ ॥ मुगुटकुंडलांच्या दीप्ती । तेजें लोपला गभस्ती ॥ २ ॥

मेघश्यामवर्ण हरी । मूर्ति डोळस साजिरी ॥ ३ ॥ चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रुळती ॥ ४ ॥ पितांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ५ ॥ तुका जालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ ॥ ६ ॥

॥ १५९७ ॥ शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ धृ० ॥ नाभीं नाभीं भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥ १ ॥ दुरूनि येतां दिसे दृष्टी ॥ धाकें दोष पळती सृष्टी ॥ २ ॥ तुका देखोनि एकला । वैकुंठींहूनि हरि आला ॥ ३ ॥

॥ १५९८ ॥ पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥धृ०॥ आला पंढरीचा राणा । दिसतील त्याच्या खुणा । सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरती ॥ १ ॥ उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥ २ ॥ तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥ ३ ॥

॥ १५९९ ॥ चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥ धृ० ॥ तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं । फेडावया धणी । प्रेमसुखी आजी ॥ १ ॥ पुढें आले कृपावंत । मायबाप साधुसंत ॥ २ ॥ तुका आळंगिला बाहीं । ठेविला विठोबाचे पायीं ॥ ३ ॥

॥ १६०० ॥ पाहुणे घरासी । आजि आले ऋषीकेशी ॥ धृ० ॥ काय करूं उपचार । कोंप मोडकी जर्जर । कण्या दरदर । पाण्यामाजी रांधिल्या ॥ १ ॥ घरीं मोडकिया बाजा । वरि वाकळांच्या शेजा ॥ २ ॥ मुखशुद्धि तुळसी दळ । तुका ह्मणे मी दुर्बळ ॥ ३ ॥

॥ १६०१ ॥ संतीं केला अंगिकार । त्यासी अभिमान थोर ॥ धृ० ॥ कांहीं ठेविलें चरणीं । घेतीं तेंचि पुरवुनी । तुका पायवणी । घेऊनियां निराळा ॥ १ ॥ नसतां कांहीं संचित । भेटी जाली अवचित ॥२॥ देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥ ३ ॥

॥ १६०२ ॥ अवघियांच्या आलों मुळें । एका वेळे न्यावया ॥ धृ० ॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें । आधीं ठावें करितों ॥ १ ॥ जोंवरि ते घटिका दुरी । आहे उरी तो काळ ॥ २ ॥ मंगळाचे वेळे उभे । असों शोभे सावध ॥ ३ ॥ अवघियांचा योग घडे । तरी जोडे श्लाघ्यता ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाहें वाट । बहु आट करुनी ॥ ५ ॥

॥ १६०३ ॥ सकळही माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुह्मी ॥ धृ० ॥ कर्मधर्में तुह्मां असावें कल्याण । घ्या माझें वचन आशीर्वाद ॥ १ ॥ वाढवूनि दिलों एकाचिये हातीं । सकळ निश्चिंती जाली तेथें ॥ २ ॥ आतां मज जाणें प्राणेश्वरासवें । माझिया भावें अनुसरलों ॥ ३ ॥ वाढवितां लोभ होईल उसीर । अवघींच स्थिर करा ठायीं ॥ ४ ॥ धर्म अर्थ काम जाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाता हात ॥ ५ ॥ तुका ह्मणे आतां जाली हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥ ६ ॥

॥ १६०४ ॥ बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें पुण्य कोण माझें गांठी ॥ धृ० ॥ जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी । काळक्षेप आह्मी करूं कोठें ॥ १ ॥ न घडे यावरि न धरवे धीर । पीडतां राष्ट्र देखोनि जग ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी दिसे मोकलिलें । काय आतां आलें जीवित्वाचें ॥ ३ ॥

॥ १६०५ ॥ करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ धृ० ॥ अवघें एकमय । राज्य

मेघश्यामवर्ण हरी । मूर्ति डोळस साजिरी ॥ ३ ॥ चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रुळती ॥ ४ ॥ पितांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ५ ॥ तुका जालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ ॥ ६ ॥

॥ १५९७ ॥ शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ धृ० ॥ नाभी नाभी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥ १ ॥ दुरूनि येतां दिसे दृष्टी ॥ धाकें दोष पळती सृष्टी ॥ २ ॥ तुका देखोनि एकला । वैकुंठींहूनि हरि आला ॥ ३ ॥

॥ १५९८ ॥ पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥धृ०॥ आला पंढरीचा राणा। दिसतील त्याच्या खुणा । सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरती ॥ १ ॥ उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥ २ ॥ तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥ ३ ॥

॥ १५९९ ॥ चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥ धृ० ॥ तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं । फेडावया धणी । प्रेमसुखी आजी ॥ १ ॥ पुढें आले कृपावंत । मायबाप साधुसंत ॥ २ ॥ तुका आळंगिला बाहीं । ठेविला विठोबाचे पायीं ॥ ३ ॥

॥ १६०० ॥ पाहुणे घरासी । आजि आले हृषीकेशी ॥ धृ० ॥ काय करूं उपचार। कोंप मोडकी जर्जर । कण्या दरदर । पाण्यामाजी रांधिल्या ॥ १ ॥ घरीं मोडकिया बाजा । वरि वाकळांच्या शेजा ॥ २ ॥ मुखशुद्धि तुळसी दळ । तुका ह्मणे मी दुर्बळ ॥ ३ ॥

॥ १६०१ ॥ संतीं केला अंगिकार । त्यासी अभिमान थोर ॥ धृ० ॥ कांहीं ठेविलें चरणीं । घेतीं तेंचि पुरवुनी । तुका पायवणी । घेऊनियां निराळा ॥ १ ॥ नसतां कांहीं संचित । भेटी जाली अवचित ॥२॥ देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥ ३ ॥

॥ १६०२ ॥ अवघियांच्या आलों मुळें । एका वेळे न्यावया ॥ धृ० ॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें । आधीं ठावें करितों ॥ १ ॥ जोंवरि ते घटिका दुरी । आहे उरी तो काळ ॥ २ ॥ मंगळाचे वेळे उभे । असों शोभे सावध ॥ ३ ॥ अवघियांचा योग घडे । तरी जोडे श्लाघ्यता ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाहें वाट । बहु आट करुनी ॥ ५ ॥

॥ १६०३ ॥ सकळही माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुह्मी ॥ धृ० ॥ कर्मधर्मे तुह्मां असावें कल्याण । द्या माझें वचन आशीर्वाद ॥ १ ॥ वाढवूनि दिलों एकाच्रिये हातीं । सकळ निश्चिती जाली तेथें ॥ २ ॥ आतां मज जाणें प्राणेश्वरासवें । माझिया भावें अनुसरलों ॥ ३ ॥ वाढवितां लोभ होईल उसीर । अवघीच स्थिर करा ठायीं ॥ ४ ॥ धर्म अर्थ काम जाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाता हात ॥ ५ ॥ तुका ह्मणे आतां जाली हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥ ६ ॥

॥ १६०४ ॥ बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें पुण्य कोण माझें गांठीं ॥ धृ० ॥ जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी । काळक्षेप आह्मी करूं कोठें ॥ १ ॥ न घडे यावरि न धरवे धीर । पीडतां राष्ट्र देखोनि जग ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी दिसे मोकलिलें । काय आतां आलें जीवित्वाचें ॥ ३ ॥

॥ १६०५ ॥ करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ धृ० ॥ अवघें एकमय । राज्य

ये ॥ १ ॥ दुजयाची सत्ता । न चलेसी जाली आतां ॥ २ ॥ आतां नाहीं
ारपला लोकां ॥ ३ ॥

आह्मी जातों तुह्मी कृपा असों द्यावी । सकळा सांगावी विनंति माझी
ःवेळ जाला उभा पांडुरंग । वैकुंठा श्रीरंग बोलावितो ॥ १ ॥ अंतकाळीं
· पावला । कुडीसहित जाला गुप्त तुका ॥ २ ॥

तुका उतरला तुकीं । नवल जालें तिहीं लोकीं ॥ धृ० ॥ नित्य करितों
माझें अनुष्ठान ॥ १ ॥ तुका बैसला विमानीं । संत पाहाती लोचनीं ॥ २ ॥
्केला । तुका वैकुंठासी नेला ॥ ३ ॥

न देखिजे ऐसें केलें । या विठ्ठलें दुःखासी ॥ धृ० ॥ कृपेचिये सिंहासनीं ।
ुविलें ॥ १ ॥ वाजता तो नलगे वारा । क्षीरसागरा शयनीं ॥ २ ॥ तुका
र्थी । मज पायीं राखिलें ॥ ३ ॥

वारणसीपर्यंत असों सुखरूप । सांगावा निरोप संतांसी हा ॥ धृ० ॥
ां जाणें निजधामा । सवें असे आह्मां गरुड हा ॥ १ ॥ कृपा असों द्यावी
। जातसों माहेरी तुका ह्मणे ॥ २ ॥

१५७१ एकाहत्तरीं विरोधनामसंवत्सरीं फाल्गुन वद्य द्वितीया
सोमवारीं प्रथमप्रहरीं तुकोबा गुप्त जाले.

## ज्ञान.

जाती पंढरीस । ह्मणे जाईन तयास ॥ धृ० ॥ तया आहे संवसार । ऐसे
॥ १ ॥ असों नसों भाव । जो हा देखे पंढरिराव ॥ २ ॥ चंद्रभागे न्हाती ।
ते याती ॥ ३ ॥

धरियेली सोंगें । येणें अवघीं पांडुरंगें ॥ धृ० ॥ तें हें ब्रह्म विटेवरी । उभें
॥ १ ॥ अंतर्य्यामी आहे । धांडोळितां कोठें नोहे ॥ २ ॥ योगयागतपें ।
नजपें ॥ ३ ॥ दिलें नेदी जसी । भोग सकळ ज्या होती ॥ ४ ॥ अवघी
ाका ह्मणे दासां साहे ॥ ५ ॥

ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥ धृ० ॥ तो हा पंढरीचा
ा चौं अठरां जणां ॥ १ ॥ चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति कामारी दासी
ती जावें । तुका ह्मणे ज्याच्या नांवें ॥ ३ ॥

ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन्य पडे ॥ धृ० ॥ तेथें माझी वाचा
ावया स्तुती ॥ १ ॥ सिणली सहस्र तोंडें । शेषफणी ऐसें धेडें ॥ २ ॥ तुका
। सिंधु न पुरे शाही ॥ ३ ॥

देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥ धृ० ॥ न
व्हे कांहीं । विष तेंही अमृत पाहीं ॥ १ ॥ न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे
॥ २ ॥ तुका ह्मणे नारायण । येतां गोळ्या वारी बाण ॥ ३ ॥

॥ १६१५ ॥ कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया। वेळ कां सखया लावियेला ॥ धृ० ॥ दिनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें। नको पाहों केलें पापपुण्य ॥ १ ॥ पतितपावन ब्रीदें चराचर। पातकी अपार उद्धरिले ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे द्रौपदीच्या धांवा। केला तैसा मला पावें आतां ॥ ३ ॥

॥ १६१६ ॥ कोठें गुंतलासी कोणांच्या धांवया। आली देवराया निद्रा तुज ॥ धृ० ॥ कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें। न सुटती मुखें गोपिकांचीं ॥ १ ॥ काय पडिलें तुज कोणाचें संकट। दुरी पंथ वाट न चालवे ॥ २ ॥ काय माझे तुज गुण दोष दिसती। ह्मणोनि श्रीपति कोपलासी ॥ ३ ॥ काय जालें सांग माझिया कपाळा। उरला जीव डोळां तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १६१७ ॥ परस्त्रीतें ह्मणतां माता। चित्त लाजवितें चित्ता ॥ धृ० ॥ काय बोलोनियां तोंडें। मनामाजी कानकोंडें ॥ १ ॥ धर्मधारिष्टगोष्टी सांगे। उष्ट्या हातें नुडवीं काग ॥ २ ॥ जें जें कर्म वसे अंगीं। तें तें आठवें प्रसंगीं ॥ ३ ॥ बोले तैसा चाले। तुका ह्मणे तो अमोल ॥ ४ ॥

॥ १६१८ ॥ असत्य वचन होतां सर्व जोडी। जरी लग्नघडी परउपकार ॥ धृ० ॥ जाईल पतना यासि संदेह नाहीं। साक्ष आहे कांहीं सांगतों तें ॥ १ ॥ वदविलें मुखें नारायणें धर्मा। अंगुष्ठ त्या कर्मासाटीं गेला ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां सांभाळा रे पुढें। अंतरीचें कुडें देइल दुःख ॥ ३ ॥

॥ १६१९ ॥ जळों त्याचें तोंड। ऐसी कां ते व्याली रांड ॥ धृ० ॥ सदा भोवयासी गांठी। क्रोध धडधडीत पोटीं ॥ १ ॥ फोडिली गोंवरी। ऐसी दिसे तोंडावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं। चित्ता समासान कांहीं ॥ ३ ॥

॥ १६२० ॥ तोंडें खाये फार। पादे बोचा करी मार ॥ धृ० ॥ एक ऐसे ते शाहाणे। आपुले अधीन तें नेणें ॥ १ ॥ कुले घालूनि उघडे। रागें पाहे लोकांकडे ॥ २ ॥ खेळे द्यूतकर्म। मग बोंबली जुलूम ॥ ३ ॥ निजतां आला मोहो। वीतां ह्मणे मेला गोहो ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांनीं। मनुष्यपणा केली हानी ॥ ५ ॥

॥ १६२१ ॥ पतिव्रता नेणे आणिकांची स्तुती। सर्वभावें पति ध्यानीं मनीं ॥ धृ० ॥ तैसें माझें मन एकाविध जालें। नावडे विठ्ठलेंविण दुजें ॥ १ ॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा। गाय ते कोकिळा वसंतेंसी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळ मातेपुढें नाचे। बोल आणिकांचे नावडती ॥ ३ ॥

॥ १६२२ ॥ पंडित ह्मणतां थोर सुख। परि तो पाहातां अवघा मूर्ख ॥ धृ० ॥ काय करावें घोकिलें। वेदपठण वांयां गेलें ॥ १ ॥ वेदीं सांगितलें तें न करी। सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥ २ ॥ तुका देखे जीवीं शिव। हाचि तर्थींचा अनुभव ॥ ३ ॥

॥ १६२३ ॥ पंडित तोचि एक भला। नित्य भजे जो विठ्ठला ॥ धृ० ॥ अवघें सम ब्रह्म पाहे। सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ १ ॥ रितां नाहीं कोणी ठाव। सर्वां भूतीं वासुदेव ॥ २ ॥ तुका ह्मणे तोचि दास। त्या देखिल्या जाती दोष ॥ ३ ॥

॥ १६२४ ॥ ऐका पंडितजन । तुमचे वंदितों चरण ॥ धृ० ॥ नका करूं नरस्तुती । माझी परिसा हे विनंती ॥ १ ॥ अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धाधीन ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । सुखें वेचा नारायणीं ॥ ३ ॥

॥ १६२५ ॥ विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चारा ॥ धृ० ॥ विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥ १ ॥ विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥ २ ॥ विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥ ३ ॥

॥ १६२६ ॥ काय तुझें वेचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥ धृ० ॥ काय तुझें रूप घेतों मी चोरोनी । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥ १ ॥ काय तुझें आह्मां करावें वैकुंठ । भेऊं नको भेट आतां मज ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी नलगे वसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ॥ ३ ॥

॥ १६२७ ॥ संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर तें यमपुरी ॥ धृ० ॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें जना होय पीडा ॥ १ ॥ संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिताचि नर्कवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तो नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ॥ ३ ॥

॥ १६२८ ॥ आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥ धृ० ॥ हरिश्चंद्र तारा राणी । वाहे डोंबा घरीं पाणी ॥ १ ॥ पांडवांचा साहाकारी । राज्यावरोनि केले दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे उगेचि राहा । होईल तें सहज पाहा ॥ ३ ॥

॥ १६२९ ॥ निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥ धृ० ॥ उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे नाना छंदें गोविंद हा ॥ १ ॥ मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं ॥ ३ ॥

॥ १६३० ॥ काम क्रोध आह्मी वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ॥ धृ० ॥ आतां कोण पाहे मागें परतोनी । गेले हारपोनि देहभाव ॥ १ ॥ रिद्धिसिद्धि सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी विठोबाचे दास । करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥

॥ १६३१ ॥ उठाउठीं अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥ धृ० ॥ तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥ १ ॥ अश्रूचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ॥ २ ॥ तुका ह्मणे काला । कोठें अभेद देखिला ॥ ३ ॥

॥ १६३२ ॥ पंढरी पंढरी । ह्मणतां पापाची बोहरी ॥ धृ० ॥ धन्य धन्य जगीं ठाव । होतो नामाचा उत्साव ॥ १ ॥ रिद्धिसिद्धि लोटांगणीं । प्रेमासुखाचिया खाणी ॥ २ ॥ अधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ १६३३ ॥ अल्प माझी मती । ह्मणोनि येतों काकुलती ॥ धृ० ॥ आतां दाखवा दाखवा । मज पाउलें केशवा ॥ १ ॥ धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे दया । मज करा अभागिया ॥ ३ ॥

॥ १६३४ ॥ भार घालीं देवा । न लगे देश डोई घ्यावा ॥ धृ० ॥ देह प्रारब्धा आधीन ।

सोसें अधिक वाढे सीण ॥ १ ॥ व्यवसाय निमित्त । फळ देतसे संचित ॥ २ ॥ तुका ह्मणे फिरे । भोंवडीनें दम जिरे ॥ ३ ॥

॥ १६३५ ॥ भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करुनी ठेवा ॥ धृ० ॥ शांति धरणें जिवासाटीं । दशा उत्तम गोमटी ॥ १ ॥ देह लेखावें असार । सत्य परउपकार ॥ २ ॥ तुका ह्मणे हे मिरासी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥ ३ ॥

॥ १६३६ ॥ येथें बोलोनियां काय । व्हावा गुरु तरि जाय ॥ धृ० ॥ मज न साहे वांकडें । ये विठ्ठलकथेपुढें ॥ १ ॥ ऐकोनी मरसी कथा । जंव आहेसि तूं जीता ॥ २ ॥ दुरमतीची चाड । तेणें न करावी बडबड ॥ ३ ॥ पुसेल कोणी त्यास । जा रे करीं उपदेश ॥ ४ ॥ आह्मी विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शीर ॥ ५ ॥ घेऊं पुढती जन्म । वाणूं कीर्त मुखें नाम ॥ ६ ॥ तुका ह्मणे मुक्ती । नाहीं आसचि ये चित्तीं ॥ ७ ॥

॥ १६३७ ॥ अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥ धृ० ॥ मदें माते तया नाहीं देहभाव । आपुलें अवयव अवरितां ॥ १ ॥ आणिकांची वाणी वेद तेणें मुखें। उपचारदुःखें नाठवती ॥ २ ॥ तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाह्य रंग तो विठ्ठल । अंतर निवालें ब्रह्मरसें ॥ ४ ॥

॥ १६३८ ॥ ब्रह्मरसगोडी तयांसी फावली । वासना निमाली सकळ ज्यांची ॥ धृ० ॥ नाहीं त्यां विटाळ अखंड सोंवळीं । उपाधीवेगळीं जाणिवेच्या ॥ १ ॥ मन हें निश्चळ जालें एके ठायीं । तयां उणें काई निजसुखा ॥ २ ॥ तींचि पुण्यवंतें परउपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांचे पायीं पायपोस । होऊनियां वास करिन तेथें ॥ ४ ॥

॥ १६३९ ॥ जैसें तैसें राहे देवाचें हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥ धृ० ॥ दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यासी ॥ १ ॥ मागों नेणे परी माय जाणे वर्म । बाळा नेदी श्रम पावों कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥ ३ ॥

॥ १६४० ॥ आह्मां हरिच्या दासां कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥ धृ० ॥ देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥ १ ॥ जैसा केला तैसा होय । धांवे सोय धरोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥ ३ ॥

॥ १६४१ ॥ पर द्रव्य पर नारीचा अभिलास । तेथूनि हारास सर्वभाग्या ॥ धृ० ॥ घटिका दिवस मास वर्षें लागती तीन । बांधलें पतन गांठोडीस ॥ १ ॥ पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसी ॥ २ ॥ तुका ह्मणे एकां तडताथवड । काळ लागे नाड परी खरा ॥ ३ ॥

॥ १६४२ ॥ समर्थाचें केलें । कोणां जाईल मोडिलें ॥ धृ० ॥ वांयां करावी ते उरे । खटपट सोस पुरे ॥ १ ॥ ठेविला जो ठेवा । आपुलाला तैसा खावा ॥ २ ॥ ज्याचें त्याचे हातीं । भुंके तयाची फजिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोटी । बाळे जाले शूळ पोटीं ॥ ४ ॥

॥ १६४३ ॥ हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ॥ धृ० ॥ याचा धरीन अभि-

मौन । करीन आपुलें जतन ॥ १ ॥ देऊनियां जीव । बळी साधिला हा डाव ॥ २ ॥ तुक
ह्मणे देवा । जुन्हाद हे माझी सेवा ॥ ३ ॥

॥ १६४४ ॥ नेणे गति काय कवण अधोगती । मानिली निश्चिती तुझ्या पाय
॥ धृ० ॥ कर्म धर्म कोण नेणें हा उपाव । तुझ्या पायीं भाव ठेवियेला ॥ १ ॥ नेणें निरू
पाप पुण्य नेणें काय । ह्मणऊनि पाय धरिले तुझे ॥ २ ॥ वेडा मी अविचार न कळे
विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज करितां नव्हे काय । माझा
उपाय कवण तेथें ॥ ४ ॥

॥ १६४५ ॥ तुझा ह्मणऊनि जालों उतराई । त्याचें वर्म काई तें मी नेणें ॥ धृ०
हातीं धरोनियां दावीं मज वाट । पुढें कोण नीट तेंचि देवा ॥ १ ॥ देवभक्तपण करावे
जतन । दोहीं पक्षीं जाण तूंचि बळी ॥ २ ॥ अभिमानें तुज लागली हे लाज । शरणागत
काज करावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु नेणता मी फार । ह्मणऊनि विचार जाण
विला ॥ ४ ॥

॥ १६४६ ॥ मारगीं चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥ धृ०
सर्व सुख लागे घेऊनियां पाठी । आवडीचा कंठीं रस ओती ॥ १ ॥ पितांबरें छाय
करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि करावे जीवन । वाचे
नारायण तान भूक ॥ ३ ॥

॥ १६४७ ॥ जालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥ धृ० ॥ ठाव द्यावा पाय
पाशीं । मी तों पातकांची राशी ॥ १ ॥ सकळ ही गोवा । माझा उगवूनि देवा ॥ २
तुका ह्मणे भय । करा जवळी तें नये ॥ ३ ॥

॥ १६४८ ॥ अंतरींचें जाणां । तरि कां येऊं दिलें मना ॥ धृ० ॥ तुमची करावी स्य
सेवा । आतां अव्हेरितां देवा ॥ १ ॥ नव्हती मोडामोडी । केली मागें तेचि घडी ॥ २
तुका ह्मणे दिला वाव । पायीं लागों दिला भाव ॥ ३ ॥

॥ १६४९ ॥ पवित्र होईन चरित्रउच्चारें । रूपाच्या आधारें गोजिरिया ॥ धृ०
आपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठी । पायीं घालीं मिठी पाहें डोळां ॥ १ ॥ गाईन ओविय
शिष्टांच्या आधारें । सारीन विचारें आयुष्या या ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझें नाम नारायणा
ठेवीन मी मना आपुलिया ॥ ३ ॥

॥ १६५० ॥ काय ऐसा जन्म जावा वांयांविण । कांहीं तरी ऋण असो माथा ॥ धृ०
कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥ १ ॥ बाता एका तरी
जन्माच्या शेवटीं । कृपाळुवा पोटीं होइल दया ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं फांको तरी देत
सर्वांचें उचित सांपडलें ॥ ३ ॥

॥ १६५१ ॥ नाहीं कोणी दिस जात वांयांविण । साध्य नाहीं सीण नाटिकाचें
॥ धृ० ॥ एकाचियें माथा असावें निमित्त । नसो नाहीं हित कपाळीं तें ॥ १ ॥ कांहीं
एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्में कळे
येती कांहीं । ओळखीं जे नाहीं होईल ते ॥ ३ ॥

॥ १६९२ ॥ काय करील तें नव्हे विश्वंभर । सेवकां दारिद्र लाज नाहीं ॥ धृ० ॥ मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणे ॥ १ ॥ नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणों किती वांयां गेले । तयां उद्धरिलें पांडुरंगें ॥ ३ ॥

॥ १६९३ ॥ संध्या करितोसी केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥ धृ० ॥ किती या सांगावें करूनि फजित । खळ नेणें हित जवळी तें ॥ १ ॥ माजल्या न कळे उचित तें काय । न द्यावें तें खाय द्यावें सांडी ॥ २ ॥ तुका ह्मणे घेती भिंती सवें डोकें । वावसी तीं एकें अंधारलीं ॥ ३ ॥

॥ १६९४ ॥ दुधाचे घागरी मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ धृ० ॥ तैसें खळां मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥ १ ॥ काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वांयां गेलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैशी संवसर्गें ॥ ३ ॥

॥ १६९५ ॥ सांगावें तें बरें असतें हें पोटीं । दुःख देते खोटी बुद्धि मग ॥ धृ० ॥ आपला आपण करावा वेव्हार । जिंकोनि अंतर मन ग्वाही ॥ १ ॥ नाहीं मागें येत बोलिलें वचन । पावावा तो सीण बरा मग ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु भ्यालों खटपटे । आतां देवा खोटे शब्द पुरे ॥ ३ ॥

## वाराणसीचे यात्रेबरोबर स्वामींचें भागीरथीस पत्र.

॥ १६९६ ॥ परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥ धृ० ॥ भागीरथी महादोष निवारणी । सकळा स्वामिणी तीर्थांचिये ॥ १ ॥ जीतां भुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तिरीं । अहिक्यपरत्रीं सुखरूप ॥ २ ॥ तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठविलें ॥ ३ ॥

॥ १६९७ ॥ तुह्मी विश्वनाथ । दीनरंक मी अनाथ ॥ धृ० ॥ कृपा कराल तें थोडी । पायां पडिलों बराडी ॥ १ ॥ काय उणें तुह्मांपाशीं । मी तों अल्पेंचि संतोषी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । कांहीं भातुकें पाठवा ॥ ३ ॥

॥ १६९८ ॥ पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥ धृ० ॥ माझें जालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥ १ ॥ केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ३ ॥

॥ १६९९ ॥ मथुरेच्या राया । माझें दंडवत पायां ॥ धृ० ॥ तुमचे कृपेचें पोषणें । माझा समाचार घेणें ॥ १ ॥ नाम धरिलें कंठीं । असें आर्तभूत पोटीं ॥ २ ॥ जीवींचें तें जाणा । तुका ह्मणे नारायणा ॥ ३ ॥

॥ १६६० ॥ जाय तिकडे लागे पाठीं । नाहीं तुटी आठवाची ॥ धृ० ॥ हरूनियां नेलें चित्त । माझें थीत भांवडल ॥ १ ॥ दावूनियां रूप डोळां । मन चाळा लावियेलें ॥ २ ॥ आणिक तोंडा पडिली मिठी । कान गोष्टी नाइकती ॥ ३ ॥ बोलिल्याचा

आठव न घडे । वाणी ओढे ते सोई ॥ ४ ॥ तुका ह्मणे प्रेमधगी । भरली अंगीं अखंड ॥ ५ ॥

॥ १६६१ ॥ नको ऐसें जालें अन्न । भूक तान ते गेली ॥ धृ० ॥ गोविंदाची आवडी जीवा । करीन सेवा धणीवरी ॥ १ ॥ राहिलें तें राहो काम । सकळ धर्म देहीचे ॥ २ ॥ देह धरिला त्याचें फळ । आणिक काळ धन्य हा ॥ ३ ॥ जाऊं नेदीं करितां सोस । क्षमा शेष करवीन ॥ ४ ॥ तुका ह्मणे याच साठीं । आतां साटी जीवाची ॥ ५ ॥

॥ १६६२ ॥ वाट पाहें हरि कां नये आह्मुनी । निष्ठुर कां मनीं धरियेलें ॥ धृ० ॥ काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ॥ १ ॥ नाहीं माझा धांवा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ॥ २ ॥ नाहीं आलें कळों अंतरा अंतर । कृपावंत फार ऐकतों ॥ ३ ॥ बहुता दिवसांचें राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुरवाळिलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे देई एकवेळा भेटी । शीतळ हें पोटीं होइल मग ॥ ५ ॥

॥ १६६३ ॥ नाहीं दिलें कधीं कठिण उत्तर । तरी कां अंतर पडियेलें ॥ धृ० ॥ ह्मणउनी आतां वियोग न साहे । लांचावलें देह संघट्टणें ॥ १ ॥ वेळोवेळां वाचे आठवितों नाम । अधिकचि प्रेम चढे घेतां ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगे जननिये । घेऊनि कडिये बुझाविलें ॥ ३ ॥

॥ १६६४ ॥ आतां न करीं सोस । सेवीन हा ब्रह्मरस ॥ धृ० ॥ आह्मां लक्षण अमृत । ब्रह्मपदींचें निश्चित ॥ १ ॥ तुमचा निज ठेवा । आह्मी पाडियेला ठावा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवराया । आतां लपालेती वांयां ॥ ३ ॥

॥ १६६५ ॥ जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहसी ॥ धृ० ॥ ऐसा पसरीन भाव । रिता नाहीं कोणी ठाव ॥ १ ॥ चित्त जडलें पायीं । पाळती हें ठायीं ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटीं । देव घालुनी सांगें गोष्टी ॥ ३ ॥

॥ १६६६ ॥ सांपडला हातीं । तरी जाली हे निश्चिंती ॥ धृ० ॥ नाहीं धांवा घेत मन । इंद्रियांचें समाधान ॥ १ ॥ सांडियेला हेवा । अवघा संचिताचा ठेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे काम । निरसूनियां घेतों नाम ॥ ३ ॥

॥ १६६७ ॥ मुक्तिपांग नाहीं विष्णुचीया दासा । संसार तो कैसा न देखती ॥ धृ० ॥ बैसला गोविंद जडोनियां चित्तीं । आदि तेचि अंतीं अवसानीं ॥ १ ॥ भोग नारायणा देऊनि निराळीं । ओंवियां मंगळीं तोचि गाती ॥ २ ॥ बळ बुद्धि त्यांची उपकारासाठीं । अमृत तें पोटीं सांठवलें ॥ ३ ॥ दयावंत तरी देवाच सारिखीं । आपुलीं पारखीं नोळखती ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांच्या जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती ते ॥ ५ ॥

॥ १६६८ ॥ सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं । वैष्णवां चरणीं होइन जोडा ॥ धृ० ॥ ऐसें जन्म आतां मज देई देवा । आवडी हे जीवा सर्व काळ ॥ १ ॥ त्यांचे चरणरज येती अंगावरी । वंदीन ते शिरीं जाइन मागें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें राहिलासे भाव । सकळही वाव जाणोनियां ॥ ३ ॥

॥ १६६९ ॥ क्षेम देयाला हो । स्फुरताती दंड बाहो ॥ धृ० ॥ आतां झडझडां चालें ।

येई उचलूं पाउलें ॥ १ ॥ सांडीं हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आई । श्रीरंगे विठाबाई ॥ ३ ॥

॥ १६७० ॥ जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगे ॥ धृ० ॥ कंठ कंठा मिळों येई । माझा वोरस तूं घेई ॥ १ ॥ नको पितांबर । सांवरूं हे अळंकार ॥ २ ॥ टाकीं वो मातुकें लौकिकाचें कवतुकें ॥ ३ ॥ हातां पायां नको । कांहीं वेगळालें राखों ॥ ४ ॥ तुका ह्मणे यावरी । मग सुखें अळंकारीं ॥ ५ ॥

॥ १६७१ ॥ कृपेचा ओलावा । दिसें वेगळाचि देवा ॥ धृ० ॥ मी हें इच्छितसें साचें । न लगे फुकटशाई काचें ॥ १ ॥ जेणें जाय कळसा । पाया उत्तम तो तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । तुझ्या अवघिया परी ॥ ३ ॥

॥ १६७२ ॥ दावूनियां कोणां कांहीं । तेंचि वाहीं चाळविलीं ॥ धृ० ॥ तैसें नको करूं देवा । शुद्धभावा माझिया ॥ १ ॥ रिद्धिसिद्धि ऐसीं आड । येती नाड नागवूं ॥ २ ॥ उद-काऐसी दावूनि ओढी । उर फोडी झळई ॥ ३ ॥ दर्पणींचें दिलें धन । दिसे पण चरफड ॥ ४ ॥ तुका ह्मणे पायांसाठीं । करीं आटी कळों द्या ॥ ५ ॥

॥ १६७३ ॥ काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥ धृ० ॥ आवडीनें गळां मिठी । घाली उठी बैसवी ॥ १ ॥ लावूं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ॥ २ ॥ भातु-काचें भातें दावी । आपुलें लावी त्यास जी ॥ ३ ॥ माझें थोडें त्याचें फार । उत्तर हें वाढवी ॥ ४ ॥ तुका ह्मणे नारायणा । तुह्मी जाणां बुझावूं ॥ ५ ॥

॥ १६७४ ॥ तरीं आह्मी तुझी धरियेली कास । नाहीं कोणी दास वांयां गेला ॥ धृ० ॥ आगा पंढरीशा उभ्या विटेवरी । येई लवकरी धांवें नेटें ॥ १ ॥ पाववितों तुज उभी करोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज बहु कान डोळे । कां हे माझे वेळे ऐसी परी ॥ ३ ॥

॥ १६७५ ॥ करावा कांटाळा नव्हे हें उचित । आधींच कां प्रीत लावियेली ॥ धृ० ॥ जाणतसां तुह्मीं रूपाचें लाघव । आपुलें तें जीव घेतें ऐसा ॥ १ ॥ काय ह्मणऊनि आलेती आकारा । आह्मां उजगरा करावया ॥ २ ॥ तुका ह्मणे भीड होती आजवरी । आतां देवा उरी कोण ठेवी ॥ ३ ॥

॥ १६७६ ॥ धरूनि पालव असुडीन करें । मग काय बरें दिसे लोकीं ॥ धृ० ॥ काय तें विचारा ठायींचें आपणा । जो हा नारायणा अवकाश ॥ १ ॥ अंतर पायांसी तों वरी या गोष्टी । पडिलियां मिठी हालों नेदीं ॥ २ ॥ रुसलेती तरी होइल बुझावणी । तांतडी करूनि साधावें हें ॥ ३ ॥ सांपडलियां आधीं कारणासी ठाव । येथें करूं भाव दृढ आतां ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुझें ठाउकें बोभाट । मग खटपट चुकली ते ॥ ५ ॥

॥ १६७७ ॥ निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग । आहे लागभाग ठायींचाची ॥ धृ० ॥ तूं माझा जनिता तूं माझा जनिता । रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥ १ ॥ मुळीच्या ठेवण्या आहे अधिकार । दुरावोनि दूर गेलों होतों ॥ २ ॥ पोटींच्या आठवा पडिला विसर । कांहीं

काळे । राती करा झांकुनी डोळे ॥ १ ॥ चालोनि आड वाटे । पायीं मोडविले कांटे २ ॥ तुका ह्मणे कोणा । बोल ठेवितो शाहाणा ॥ ३ ॥

॥ १६८८ ॥ आह्मी न देखों अवगुणां । पापी पवित्र शाहाणा ॥ धृ० ॥ अवघीं रूपें ॥ं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥ १ ॥ मज भक्तीसवें चाड । नेणें पाषाण धातु वाड २ ॥ तुका ह्मणे घोटीं । विष अमृत तुजसाठीं ॥ ३ ॥

॥ १६८९ ॥ मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड । घेतां वाटे गोड नाम तुझें ॥ धृ० ॥ गतें लेंकरूं आवडीचें तान्हें । बोलतों वचनें आवडीनें ॥ १ ॥ भक्ति नेणें कांहीं वैराग्य नाहीं । घातला विठाई भार तुज ॥ २ ॥ तुका ह्मणे नाचें निर्लज्ज होउनी । नाहीं माझे नीं दुजा भाव ॥ ३ ॥

॥ १६९० ॥ काय माझी संत पाहाती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥ धृ० ॥ ारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ॥ १ ॥ बोबड्या उत्तरीं ह्मणें रेहरी । आणिक भिकारी नेणें दुजें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी विठ्ठलाचे दास । करितों मी ास उच्छिष्टाची ॥ ३ ॥

॥ १६९१ ॥ जीवाचें जीवन अमृताची तनू । ब्रह्मांड भूषणू नारायण ॥ धृ० ॥ ुखाचा सांगात अंतकासी अंत । निजांचा निवांत नारायण ॥ १ ॥ गोडाचेंही गोड र्षाचेंही कोड । प्रीतीचाही लाड नारायण ॥ २ ॥ भावाचा निज भाव नांवांचाही ांव । अवघा पंढरिराव अवतरलासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जें हें साराचें हें सार । माझा अंगिकार तेणें केला ॥ ४ ॥

॥ १६९२ ॥ आतां मी सर्वथा नव्हे गा दुर्बळ । यातिहीनकुळ दैन्यवाणा ॥ धृ० ॥ ाय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ॥ १ ॥ बापुडा मी नव्हें दुर्बळ गणा । पांगिला हा कोणा आणिकांसी ॥ २ ॥ दुष्ट नव्हों आह्मी अभागी अनाथ । ामुचा समर्थ कैवारी हा ॥ ३ ॥ संवसार आह्मां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला ाकें ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों निर्भर मानसीं । जोडलिया रासी सुखाचिया ॥ ५ ॥

॥ १६९३ ॥ केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ॥ धृ० ॥ देवचि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥ १ ॥ त्यागिल्याचें ध्यान ाहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥ २ ॥ तुका ह्मणे आपआपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुह्मां ॥ ३ ॥

॥ १६९४ ॥ हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि सेवा देवाची हे ॥ धृ० ॥ आवडी विठ्ठल गाईजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा ॥ १ ॥ आणिकां अंतरीं न द्यावे वसती । करावी हे शांती वासनेची ॥ २ ॥ तुका ह्मणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचूं नये ॥ ३ ॥

॥ १६९५ ॥ हो कां नर अथवा नारी । ज्यांचा आवडता हरी ॥ धृ० ॥ ते मज विठोबासमान । नमूं आवडी ते जन ॥ १ ॥ ज्याचें अंतर निर्मळ । त्याचें सबाह्य कोमळ ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । जिव्हें प्रेम वोसंडावें ॥ ३ ॥

॥ १६९६ ॥ हरीची हरिकथा नावडे जया । अधम ह्मणतां तया वेळ लागे । मनुष्य-देहीं तया नाट लागलें । अघोर साधिलें कुंभपाक ॥ धृ० ॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होऊन पडिला नाहीं । उपजे मरोनि वेळोवेळां भांड । परि लाज लंड न धरी कांहीं ॥ १ ॥ ऐसियाची माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी । देवधर्माविण चांडाळ हा नर । न साहे भूमि भार क्षणभरी ॥ २ ॥ राम ह्मणतां तुझें काय तें वेचलें । कां हित आपुलें न विचारिसी । जन्मोजन्मींचा होईल नरकीं । तुका ह्मणे चुकी जरी यासी ॥ ३ ॥

॥ १६९७ ॥ उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आईकिली ॥ धृ० ॥ आतां काय ब्रीद सांडील आपुलें । ठायींचें धरिलें जाणोनियां ॥ १ ॥ माझ्या दोषासाठीं होइल पाठमोरा । ऐसा कोण पुरा भोग बळी ॥ २ ॥ तुका ह्मणे रूप आमुच्या कैवारें । धरिलें गोजिरें चतुर्भुज ॥ ३ ॥

॥ १६९८ ॥ आवडीसारिखें संपादिलें सोंग । अनंत हें मग जालें नाम ॥ धृ० ॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचाही साक्षी ॥ १ ॥ हातें जेवी एक मुखीं मागे घांस । माउली जयास तैसी बाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें ध्यान विटेवरी । तैसी-च गोजिरी दिसे मूर्ती ॥ ३ ॥

॥ १६९९ ॥ धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ धृ० ॥ धन्य जालों आतां यासि संदेह नाहीं । न पडों या वाहीं काळा हातीं ॥ १ ॥ ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगती सर्वकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट धालेंचि न धाये । खादलेंचि खायें आवडीनें ॥ ३ ॥

॥ १७०० ॥ आवडी न पुरे सेवितां न सरे । पडियेली धुरेसवें गांठी ॥ धृ० ॥ न पुरे हा जन्म हें सुख सांठितां । पुढतीही आतां हेंचि मागों ॥ १ ॥ मारगाची चिंता पालखी बैसतां । नाहीं उसंतितां कोसपेणी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूक तान ॥ ३ ॥

॥ १७०१ ॥ नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । ह्मणऊनि मन स्थिरावलें ॥ धृ० ॥ धरियेलीं जीवीं पाउलें कोमळीं । केली एकावळी नाममाळा ॥ १ ॥ शीतळ होऊनियां पावलों विश्रांती । न साहे पुढती घाली चित्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे जाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ३ ॥

॥ १७०२ ॥ मायबापापुढें लाडिकें लेंकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥ धृ० ॥ कृपावंता घाली प्रेमपान्हारस । वोळली ओरस पांडुरंग ॥ १ ॥ नाहीं धीर खुंटी जवळी हुंबरे । ठायींच पाखर कवाळिते ॥ २ ॥ तुका ह्मणे मज होऊं नेदी सीण । कळों नेदी भिन्न आहे ऐसें ॥ ३ ॥

॥ १७०३ ॥ आठवों नेदी आवडी आणिक । भरूनियां लोक तिन्ही राहे ॥ धृ० ॥ मन धांवे तेथें तिचेंचि दुभतें । संपूर्ण आइतें सर्वकाळ ॥ १ ॥ न लगे वळावीं इंद्रियें

तां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे समपाउलाचा खुंट । केला वळ-
हालों नेंदी ॥ ३ ॥
१७०४ ॥ उत्तम घालावें आमुच्यिये मुखीं । निवारावें दुःखी होऊनि तें ॥ धृ० ॥ न
न वजे जवळुणी दुरी । मागें पुढें वारी घातपात ॥ १ ॥ नाहीं शंका असो भलतिये
ों । मावळले पाहीं द्वैताद्वैत ॥ २ ॥ तुका ह्मणे भार घेतला विठ्ठलें । अंतरीं भरलें
रूप ॥ ३ ॥
१७०५ ॥ आह्मां अळंकार मुद्रांचे शृंगार । तुळसीचे हार वाहों कंठीं ॥ धृ० ॥
के डिंगर पंढरिरायाचे । निरंतर वाचे नामघोष ॥ १ ॥ आह्मां आणिकांची चाड़चि
ाहीं । सर्व सुखें पायीं विठोबाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी नेणोंचि या मुक्ती ।
विण चित्तीं दुजें नाहीं ॥ ३ ॥
। १७०६ ॥ चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ धृ० ॥ डोळे निवतील कान ।
तेथें समाधान ॥ १ ॥ संतां महंतां होतील भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ २ ॥
ीर्थांचें माहेर । सर्वसुखाचें भांडार ॥ ३ ॥ जन्म नाहीं रे आणिक । तुका ह्मणे माझी
॥ ४ ॥
। १७०७ ॥ पैल घरीं जाली चोरी । देहा करी बोंब ॥ धृ० ॥ हाबा हाबा करिसी
। फिराऊनि नेय्यां वायें ॥ १ ॥ सांडूनियां शुद्धी । निजलासी गेली बुद्धी ॥ २ ॥
ीं तुझा काढिला बुर । वगळें भावा घातलें दूर ॥ ३ ॥ भलतियासी देसी वाव । लाहीसे
वहा ठाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे अझूनि तरी । उरलें तें जतन करीं ॥ ५ ॥
। १७०८ ॥ किती वेळा खादला दगा । अझून कां गा जागसी ना ॥ धृ० ॥ लाज
हीं हिंडतां गांवें । दुःख नवें नित्य नित्य ॥ १ ॥ सवें चोरा हातीं फांसे । देखतां कैसें
दुखसी ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडिती वाट । तळपट करावया ॥ ३ ॥
॥ १७०९ ॥ मुद्दलामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥ धृ० ॥ आणिकांची कां
ज नाहीं । आळसा जिहीं तजिलें ॥ १ ॥ एके सांते सरिखीं वित्तें । हानि हित वेग-
ळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हित धरा । नव्हे पुरा गांवढाळ ॥ ३ ॥
॥ १७१० ॥ निरोप सांगतां । न धरीं भय न करीं चिंता ॥ धृ० ॥ असो ज्याचें
ाचे माथां । आपण करावी ते कथा ॥ १ ॥ उतरावा भार । किंवा न व्हावें सादर ॥ २ ॥
का ह्मणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥ ३ ॥
॥ १७११ ॥ शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥ धृ० ॥ केला न संडी कैवाड ।
वेंसाटीं तों हे होड ॥ १ ॥ धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे
े । दासां रक्षितो निर्धारीं ॥ ३ ॥
॥ १७१२ ॥ हरिच्या दासा भये । ऐसें बोलों तेंही नये ॥ धृ० ॥ राहोनियां आड ।
भा देव पुरवी कोड ॥ १ ॥ हरिच्या दासा चिंता । अघटित हे वार्ता ॥ २ ॥ खावें ल्यावें
ावें । तुका ह्मणे पुरवावें ॥ ३ ॥
॥ १७१३ ॥ दासां सर्व काळ । तेथें सुखाचे कल्लोळ ॥ धृ० ॥ जेथें वसती हरिदास ।

पुण्य विके पापा नास ॥ १ ॥ फिरे सुदर्शन । घेऊनियां नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । होय ह्मणियारा कामारी ॥ ३ ॥

॥ १७१४ ॥ आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥ धृ० ॥ मायबापाची लाडकीं । कळों आलें हें लौकिकीं ॥ १ ॥ नाहीं निपराद । कोणां आह्मांमध्यें भेद ॥ २ ॥ तुका ह्मणे मान । अवघें आमचें हें धन ॥ ३ ॥

॥ १७१५ ॥ काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न । खरा विलेपन चंदनाचें ॥ धृ० ॥ नको नको देवा खळाची संगती । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥ १ ॥ काय सेज बाज माकडा विलास । अळंकारा नास करुनी टाकी ॥ २ ॥ तुका ह्मणे काय पाजूनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥ ३ ॥

॥ १७१६ ॥ आनंदें एकांतीं प्रेमें वोसंडत । घेऊं अगणित प्रेमसुख ॥ धृ० ॥ गोप्य धन नये वारा लागों यास । पाहों नेदूं वास दुर्जनासी ॥ १ ॥ ह्मणी दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ॥ २ ॥ तुका ह्मणे हें बहु सकुमार । न साहावे भार वचनाचा ॥ ३ ॥

॥ १७१७ ॥ मोक्षपदें तुच्छ केलीं याकारणें । आह्मां जन्म घेणें युगायुगीं ॥ धृ० ॥ विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढतीपुढती आस सेवावें हें ॥ १ ॥ देवा हातीं रूप धरविला आकार । नेदूं निराकरी होऊं त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त निवांत राहिलें । ध्याईं तीं पाउलें विटेवरि ॥ ३ ॥

॥ १७१८ ॥ नको बोलों भांडा । खीळ घालुन बैस तोंडा ॥ धृ० ॥ ऐक विठोबाचे गुण । करीं सादर श्रवण ॥ १ ॥ प्रेमसुखा आड । काय वाजतें चाभाड ॥ २ ॥ तुका ह्मणे हिता । कां रे नागवसी थीता ॥ ३ ॥

॥ १७१९ ॥ अति आलें उत्तम वेश्येचें लावण्य । परि ते सवासीण न ह्मणावी ॥ धृ० ॥ उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल भाव थोरपण ॥ १ ॥ शूरत्वावांचूनि शूरांमाजी ठाव । नाहीं आविर्भाव आणिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे सोंग पोटाचे उपाय । कारण कमाईविण नाहीं ॥ ३ ॥

॥ १७२० ॥ शूरां साजती हतियारें । गांढ्यां हांसतील पोरें ॥ धृ० ॥ काय केली विटंबण । मोतीं नासिकावांचुन ॥ १ ॥ पतिव्रते रूप साजे । सिंदळ काजळ लेतां लाजे ॥ २ ॥ दासी पत्नी सुता । नव्हे सरी एक पिता ॥ ३ ॥ मान बुद्धिमंतां । थोर न मनिती पिता ॥ ४ ॥ तुका ह्मणे तरी । भांत शुद्ध दंडे वरी ॥ ५ ॥

॥ १७२१ ॥ काय केलें जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥ धृ० ॥ हा तों ठायींचा विचार । आहे यातिवैराकार ॥ १ ॥ श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ॥ २ ॥ तुका ह्मणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥ ३ ॥

॥ १७२२ ॥ वाइटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥ धृ० ॥ एकाविण एका । कैचें मोल होतें फुका ॥ १ ॥ विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥ २ ॥ काळिमेनें

ज्योती । दिवस काळों आला राती ॥ ३ ॥ उंच निच गारा । हिरा परिस मोहरा ॥ ४ ॥ तुका ह्मणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ५ ॥

॥ १७२३ ॥ असो खळ ऐसे फार । आह्मां त्यांचे उपकार ॥ धृ० ॥ करिती पातकांची धुनीं । मोल न घेतां साबणीं ॥ १ ॥ फुकाचे मजुर । ओझें वागविती भार ॥ २ ॥ पार उतरुन ह्मणे तुका । आह्मां आपण जाती नरका ॥ ३ ॥

॥ १७२४ ॥ संत पंढरीस जातों । निरोप धाडीं तया हातीं ॥ धृ० ॥ माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥ १ ॥ केरसुणी महाद्वारीं । ते मी असें निरंतरीं ॥ २ ॥ तुमच पायीं पायतन । मोंचे माझे तन मन ॥ ३ ॥ तांबुलाची पिंकधरणी । ते मी असें मुख पसरुनी ॥ ४ ॥ तुमची विष्टा पंढरीराया । ते सारसुबी माझी काया ॥ ५ ॥ लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥ ६ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥ ७ ॥

॥ १७२५ ॥ इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ॥ धृ० ॥ यांचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाहीं ॥ १ ॥ सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले जाणतां ॥ २ ॥ पिंड पाळितां ओसरे । अवघी घेऊनि मागें सरे ॥ ३ ॥ करितां उपचार । कोणां नाहीं उपकार ॥ ४ ॥ अल्प जीवन करीं । तुका ह्मणे साधीं हरी ॥ ५ ॥

॥ १७२६ ॥ यज्ञनिमित्त तें शरिरासी बंधन । कां रे तृष्णा वांयांविण वाढविली ॥ धृ० ॥ नव्हे ते भक्ति परलोकसाधन । विषयांनीं बंधन केलें तुज ॥ १ ॥ आशा धरूनि फळाची । तीर्थीं व्रतीं मुक्ति कैंची ॥ २ ॥ तुका ह्मणे सिणसी वांयां । शरण न वजतां पंढरिराया ॥ ३ ॥

॥ १७२७ ॥ संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं लगती न सायास । तरी कां आळस करिसी ह्मणी ॥ धृ० ॥ ऐसें हें सार कां नेघेसी फुकाचें । काय तुझें वेचे मोल तया ॥ १ ॥ पुत्रस्नेहें शोक करी आजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथांच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलूनि परलोका ॥ २ ॥ अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम राम उच्चारिलें । तंव त्या दिनानाथ कृपा आली । त्यानें तियेसि वैकुंठा नेलें ॥ ३ ॥ अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे । तुका ह्मणे भावें स्मरा राम राम । कोण जाणे तये दशे ॥ ४ ॥

॥ १७२८ ॥ दुष्टाचें चित्त न भिने अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला । पालथे घागरी घातलें जीवन । न धरीच जाण तेंही त्याला ॥ धृ० ॥ जन्मा येऊनि तेणें पतनचि साधिलें । तमोगुणें व्यापिलें जया नरा । जळो जळो हें त्याचें ज्यालेपण । कासया हें आलें संवसारा ॥ १ ॥ पाषाण जीवनीं असतां कल्पवरी । पाहातां अंतरीं कोरडा तो । कुचर मुग नयेचि पाका । पाहातां सारिखा होतां तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे असे उपाय सकळां । न चले या खळा प्रयत्न कांहीं । ह्मणऊनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व हित ॥ ३ ॥

॥ १७२९ ॥ कासियानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह माझा फेडीं आतां

ज्योती । दिवस कळों आला राती ॥ ३ ॥ उंच निंच गारा । हिरा परिस मोहरा ॥ ४ ॥ तुका ह्मणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ५ ॥

॥ १७२३ ॥ असो खळ ऐसे फार । आह्मां त्यांचे उपकार ॥ धृ० ॥ करिती पात्र-कांची धुनीं । मोल न घेतां साबणीं ॥ १ ॥ फुकाचे मजुर । ओझें वागविती भार ॥ २ ॥ पार उतरुन ह्मणे तुका । आह्मां आपण जाती नरका ॥ ३ ॥

॥ १७२४ ॥ संत पंढरीस जातों । निरोप धाडीं तया हातीं ॥ धृ० ॥ माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥ १ ॥ केरसुणी महाद्वारीं । ते मी असें निरंतरीं ॥ २ ॥ तुमच पायीं पायतन । मोंचे माझे तन मन ॥ ३ ॥ तांबुलाची पिकधरणी । ते मी असें मुख पसरुनी ॥ ४ ॥ तुमची विष्ठा पंढरीराया । ते सारखी माझी काया ॥ ५ ॥ लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥ ६ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥ ७ ॥

॥ १७२५ ॥ इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ॥ धृ० ॥ यांचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाहीं ॥ १ ॥ सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले जाणतां ॥ २ ॥ पिंड पाळितां ओसरे । अवघी घेऊनि मागें सरे ॥ ३ ॥ करितां उपचार । कोणा नाहीं उपकार ॥ ४ ॥ अल्प जीवन करीं । तुका ह्मणे साधीं हरी ॥ ५ ॥

॥ १७२६ ॥ यज्ञनिमित्त तें शरिरासी बंधन । कां रे तृष्णा वांयांविण वाढविली ॥ धृ० ॥ नव्हे ते भक्ति परलोकसाधन । विषयांनीं बंधन केलें तुज ॥ १ ॥ आशा धरूनिया फळाची । तीर्थीं व्रतीं मुक्ति कैंची ॥ २ ॥ तुका ह्मणे सिणसी वांयां । शरण न वजता पंढरिराया ॥ ३ ॥

॥ १७२७ ॥ संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं लगती न सायास । तरी कां आळस करिसी ह्मणी ॥ धृ० ॥ ऐसें हें सार कां नेघेसी फुकाचें । काय तुझें वेचे मोल तया ॥ १ ॥ पुत्रस्नेहें शोक करी आजा-मेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथांच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलूनि इरलोका ॥ २ ॥ अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम राम उच्चारिलें । तंव त्या दैनानाथ कृपा आली । त्यानें तियेसि वैकुंठा नेलें ॥ ३ ॥ अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे । तुका ह्मणे भावें स्मरा राम राम । कोण जाणे तये इशे ॥ ४ ॥

॥ १७२८ ॥ दुष्टाचें चित्त न भिने अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला । पालथे घागरी घातलें जीवन । न धरीच जाण तेंही त्याला ॥ धृ० ॥ जन्मा येऊनि तेणें पतनचि साधिलें । तमोगुणें व्यापिलें जया नरा । जळो जळो हें त्याचें ज्यालेपण । कासया हें आलें संव-सारा ॥ १ ॥ पाषाण जीवनीं असतां कल्पवरी । पाहातां अंतरीं कोरडा तो । कुचर मुग येचि पाका । पाहातां सारिखा होतां तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे असे उपाय सकळां । न चले या खळा प्रयत्न कांहीं । ह्मणऊनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व ीत ॥ ३ ॥

॥ १७२९ ॥ कासियानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह माझा फेडीं आतां

॥ धृ० ॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें वेचे देवा ॥ १ ॥ गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥ २ ॥ फळदाता तूंच तांबोल अक्षता । तरी काय आतां वाहों तुज ॥ ३ ॥ वाहूं दक्षिणा जरी धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दुजें काई ॥ ४ ॥ गातां तूं ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया थार नाहीं कोठें ॥ ५ ॥ तुका ह्मणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरी ॥ ६ ॥

॥ १७३० ॥ गातां आइकतां कांटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥ धृ० ॥ रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिलें कासया मुख कान ॥ १ ॥ विषयाच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ॥ २ ॥ वेचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ॥ ३ ॥ तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्ट लाभें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मग केला साहे दंड । नाइकती लंड सांगितलें ॥ ५ ॥

॥ १७३१ ॥ तुझें ह्मणवितां काय नास जाला । ऐकें बा विठ्ला कीर्ति तुझी ॥ धृ० ॥ परि तुज नाहीं आमचे उपाकार । नामरूपा थार केलियाचे ॥ १ ॥ समुळीं संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥ २ ॥ लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यांसी नाहीं थार ऐसें केलें ॥ ३ ॥ मृत्तिका पाषाण तैसें केलें धन । आपले ते कोण पर नेणों ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों देहासी उदार । आणिक विचार काय तेथें ॥ ५ ॥

॥ १७३२ ॥ जाऊनियां तीर्था काय तुवां केलें चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ धृ० ॥ अंतरींचें शुद्ध कासयानें जालें । भूषण त्वां केलें आपणया ॥ १ ॥ वृंदावन फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदां तुझी ॥ ३ ॥

॥ १७३३ ॥ बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥ धृ० ॥ येऊनि अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥ १ ॥ राम कृष्ण हरि मुकुंद मुरारि । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होइल भाव एकविध ॥ ३ ॥

॥ १७३४ ॥ धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरिये ॥ धृ० ॥ न पवीजे केल्या तपांचिया रासी । तें जनलोकांसी दाखविलें ॥ १ ॥ सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥ २ ॥ विष्णुपद गया रामधाम काशी । अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ या नास अहंकाराचा ॥ ४ ॥

॥ १७३५ ॥ धन्य ते पंढरी धन्य भिमातीर । आणियेलें सार पुंडलिकें ॥ धृ० ॥ धन्य तेहि लोक अवघा दैवांचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥ १ ॥ धन्य तेही भूमि धन्य तरुवर । धन्य तें सरोवर तीर्थरूप ॥ २ ॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भवन गर्जतसे ॥ ३ ॥ धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरला ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन्य संसारातें आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ५ ॥

॥ १७३६ ॥ मायबाप करिती चिंता । पोर नाइके सांगतां ॥ धृ० ॥ नको जाऊं देउ-

ळासी । नेतो बागुल लोकांसी ॥ १ ॥ कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दें लावी भीक ॥ २ ॥ वैष्णवां संगती । हातीं पडलीं नेणों किती ॥ ३ ॥ आह्मा कैंचा मग । करिसी उघडि-यांचा संग ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाणें नरका । त्यांचा उपदेश आइका ॥ ५ ॥

॥ १७३७ ॥ मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥ धृ० ॥ आतां तूं उदास नव्हें नारायणा । धांवें मज दीना गांजियेलें ॥ १ ॥ धांव घालीं पुढें इंद्रि-यांचे ओढी । केलें तडातोडी चित्त माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा न चले सायास । राहिलों हे आस धरुनी तुझी ॥ ३ ॥

॥ १७३८ ॥ मागतियाचे दोनिच कर । अमित भांडार दातियाचें ॥ धृ० ॥ काय करूं आतां कासयांत भरूं । हा मज विचारू पडियेला ॥ १ ॥ एकें सांठवणें प्रेमें वोसंडलीं । जिव्हा हे भागली करितां माप ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आहे तेथें असों । अंखूनियां बैसों पायांपाशीं ॥ ३ ॥

॥ १७३९ ॥ जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥ धृ० ॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ १ ॥ सुखाची विश्रांती । उमटे मातेचिये चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी बहु कृपावंत ॥ ३ ॥

॥ १७४० ॥ यावें माहेरास । हेंच सर्वकाळ आस ॥ धृ० ॥ घ्यावी उच्छिष्टाची धणी । तीर्थ इच्छीं पायवणी ॥ १ ॥ भोग उभा आड । आहे तोंवरीच नाड ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । माझें सिद्धि पाववावें ॥ ३ ॥

॥ १७४१ ॥ लेंकराचें हित । वाहे माउलीचें चित्त ॥ धृ० ॥ ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभेंविण प्रीती ॥ १ ॥ पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वही साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें । तैसें तुह्मां संतां ओझें ॥ ३ ॥

॥ १७४२ ॥ आह्मां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥ धृ० ॥ जालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळें ॥ १ ॥ आह्मीं जना भ्यावें । तरि कां न लाजिजे देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे देश । जाला देवाविण ओस ॥ ३ ॥

॥ १७४३ ॥ तुह्मी पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥ धृ० ॥ आतां बाधूं न शके काळ । जालीं विषम शीतळ ॥ १ ॥ भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भये । आतां स्वप्नींही तें नये ॥ ३ ॥

॥ १७४४ ॥ काळाचेंही काळ । आह्मी विठोबाचे लडिवाळ ॥ धृ० ॥ करूं सत्ता सर्वा ठायीं । वसों निकटवासें पायीं ॥ १ ॥ ऐसी कोणाची वैखरी । वदे आमुचे समोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाण । हातीं हरिनाम तीक्ष्ण ॥ ३ ॥

॥ १७४५ ॥ जन्मा येऊन उदार जाला । उद्धार केला वंशाचा । मेळवूनि धन मेळवी माती । सदा विपत्ति भोगितसे ॥ धृ० ॥ नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखि-लिया । धर्म करितां ऐके कानीं । बांधे निर्दोनि डोकियासी ॥ १ ॥ घरा ब्याही पाहुणा आला । ह्मणे त्याला बरें नाहीं । तुमचे गावीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ॥ २ ॥ उजवूं किती होतिल पोरें । मरतां बरें ह्मणे यांसी । ह्मणऊनि देवा नवस करी । सर्वी

व्हासी । नेतो बागुल लोकांसी ॥ १ ॥ कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दें लावी भीक ॥ २ ॥ वैष्णवां संगती । हातीं पडलीं नेणों किती ॥ ३ ॥ आह्मा कैंचा मग । करिसी उघडियांचा संग ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाणें नरका । त्यांचा उपदेश आइका ॥ ५ ॥

॥ १७३७ ॥ मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥ धृ० ॥ आतां तूं उदास नव्हें नारायणा । धांवें मज दीना गांजियेलें ॥ १ ॥ धांव घालीं पुढें इंद्रियांचे ओढी । केलें तडातोडी चित्त माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा न चले सायास । राहिलों हे आस धरुनी तुझी ॥ ३ ॥

॥ १७३८ ॥ मागतियाचे दोनिच कर । अमित भांडार दातियाचें ॥ धृ० ॥ काय करूं आतां कासयांत भरूं । हा मज विचारू पडियेला ॥ १ ॥ एकें सांठवणें प्रेमें वोसंडलीं । जिव्हा हे भागली करितां माप ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आहे तेथें असों । अंखूनियां बैसों पायांपाशीं ॥ ३ ॥

॥ १७३९ ॥ जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥ धृ० ॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ १ ॥ सुखाची विश्रांती । उमटे मातेचिये चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी बहु कृपावंत ॥ ३ ॥

॥ १७४० ॥ यावें माहेरास । हेंच सर्वकाळ आस ॥ धृ० ॥ घ्यावी उच्छिष्टाची धणी । तीर्थ इच्छीं पायवणी ॥ १ ॥ भोग उभा आड । आहे तोंवरीच नाड ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । माझें सिद्धि पाववावें ॥ ३ ॥

॥ १७४१ ॥ लेंकराचें हित । वाहे माउलीचें चित्त ॥ धृ० ॥ ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभेंविण प्रीती ॥ १ ॥ पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वही साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें । तैसें तुह्मां संतां ओझें ॥ ३ ॥

॥ १७४२ ॥ आह्मां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥ धृ० ॥ जालों पोरटीं निढळें । नाहीं ठाव बुड आळें ॥ १ ॥ आह्मीं जना भ्यावें । तरि कां न लाजिजे देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे देश । जाला देवाविण ओस ॥ ३ ॥

॥ १७४३ ॥ तुह्मी पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥ धृ० ॥ आतां बाधूं न शके काळ । जालीं विषम शीतळ ॥ १ ॥ भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भये । आतां स्वप्नींही तें नये ॥ ३ ॥

॥ १७४४ ॥ काळाचेही काळ । आह्मी विठोबाचे लडिवाळ ॥ धृ० ॥ करूं सत्ता सर्वां ठायीं । वसों निकटवासें पायीं ॥ १ ॥ ऐसी कोणाची वैखरी । वदे आमुचे समोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाण । हातीं हरिनाम तीक्ष्ण ॥ ३ ॥

॥ १७४५ ॥ जन्मा येऊन उदार जाला । उद्धार केला वंशाचा । मेळवूनि धन मेळवी माती । सदा विपत्ति भोगितसे ॥ धृ० ॥ नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलिया । धर्म करितां ऐके कानीं । बांधे नेसोनि डोकियासी ॥ १ ॥ घरा ग्याही पाहुणा आला । ह्मणे त्याला बरें नाहीं । तुमचे गावीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ॥ २ ॥ दवडूं किती होतिल पोरें । मरतां बरें ह्मणे यांसी । ह्मणऊनि देवा नवस करी । सवी

घरींहूनि बोनें ॥ ३ ॥ पर्वकाळीं भट घरासी आला । बोंब घाला ह्मणे पोरां । तुमच्या उणा होईल वांटा । काळ पिठासी आला ॥ ४ ॥ दाढी करितां अडका गेला । घरांत आला बाइलेपें । ह्मणे आतां उगवीं मोडी । डोई बोडीं आपुली ॥ ५ ॥ तीर्थ स्वप्नीं नेणें गंगा । पूजन लिंगा गांवींचिया । आडकुनी द्वार बैसे द्वारीं । आल्या घर ह्मणे ओस ॥ ६ ॥ तुका ह्मणे ऐसे आहेत गा हरी । याही तारीं जीवांसी । माझ्या भय वाटे चित्तीं । नरका जाती ह्मणोनी ॥ ७ ॥

॥ १७४६ ॥ जाणे वर्तमान । परि तें न वारे त्याच्यानें ॥ धृ० ॥ तोही कारणांचा दास । देव ह्मणवितां पावे नास ॥ १ ॥ वेचीं अनुष्ठान । सिद्धि कराया प्रसन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें । मुद्दल गेलें हाटवेचें ॥ ३ ॥

॥ १७४७ ॥ घातला दुकान । पढीये तैसा आहे वान ॥ धृ० ॥ आह्मी भांडारी देवाचे । घ्यावें द्यावें माप वाचे ॥ १ ॥ उगवूं जाणों मोडी । जाली नव्हे त्याची जोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे पुडी । मोल तैसी खरी कुडी ॥ ३ ॥

॥ १७४८ ॥ सादाविलें एका । सरें अवघियां लोकां ॥ धृ० ॥ आतां आवडीचे हातीं । भेद नाहीं ये पंगती ॥ १ ॥ मोकळीच पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा । आहे ढसाळ वेव्हारा ॥ ३ ॥

॥ १७४९ ॥ तडामोडी करा । परि उत्तम तें भरा ॥ धृ० ॥ जेणें खंडे एके खेपे । जाय तेथें लाभें वोपे ॥ १ ॥ दाविल्या सारिखें । मागें नसावें पारिखें ॥ २ ॥ मागें पुढें ऋण । तुका ह्मणे फिटे हीण ॥ ३ ॥

॥ १७५० ॥ नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ॥ धृ० ॥ जाय तेथें पावे मान । चाले बोलिलें वचन ॥ १ ॥ राहों नेदी बाकी । दान ज्याचें त्यासी टाकी ॥ २ ॥ होवा वाटे जना । तुका ह्मणे साठीं गुणा ॥ ३ ॥

## अनघडसिद्धाच्या शब्दांनीं रामेश्वरभटाचा दाह झाला तत्शमनार्थ.

॥ १७५१ ॥ चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे न खाती सर्प तया ॥ धृ० ॥ विष तें अमृत अघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ १ ॥ दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ २ ॥ आवडेल जीवां जीवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपा केली नारायणें । जाणिजेते येणें अनुभवें ॥ ४ ॥

॥ १७५२ ॥ लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥ धृ० ॥ मोजूनि झिजलों मापाचिया परी । जाळावी हे थोरी लाभाविण ॥ १ ॥ कोमळ कंटक तीक्षण अगरीं । पोचट ते वरी अंगकांती ॥ २ ॥ चित्रींचें लेप शृंगारिलें निकें । जीवें-विण फिकें रूप त्याचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिसें वांयां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ४ ॥

॥ १७५३ ॥ बोलविसी माझें मुख । परि या जना वाटे दुःख ॥ धृ० ॥ जया जयाची आवडी । तया लागों तें चरफडी ॥ १ ॥ कठीण देतां काढा । जल्पे रोगी मेळवी दाढा ॥ २ ॥ खाऊं नये तेंचि मागे । निवारितां रडों लागे ॥ ३ ॥ वैद्या भीड काय । अतित्याई जीवें जाय ॥ ४ ॥ नये भिडा सांगों आन । पथ्य औषधा कारण ॥ ५ ॥ धन माया पुत्र दारा । हे तों आवडी नरका भारा ॥ ६ ॥ तुका ह्मणे यांत । आवडे ते करा मात ॥ ७ ॥

॥ १७५४ ॥ पतिव्रते आनंद मनीं । सिदळ खोंचे व्यभिचारवचनीं ॥ धृ० ॥ जळो वर्म लागों आगी । शुद्धपण भलें जगीं ॥ १ ॥ सुख पुराणीं आचारशीळा । दुःख वाटे अनर्गळा ॥ २ ॥ शूरा उल्हास अंगीं । गांढ्या मरण ते प्रसंगीं ॥ ३ ॥ शुद्ध सोनें उजळे अगी । हीन काळें धांवे रंगीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तोचि हिरा । घनघायें निवडे पुरा ॥ ५ ॥

॥ १७५५ ॥ चालिती आड वाटा । आणिकां दाविती जे नीटा ॥ धृ० ॥ न मनीं तयांचे उपकार । नाहीं जोडा तो गव्हार ॥ १ ॥ विष सेवूनि वारी मागें । प्राण जातां जेणें संगें ॥ २ ॥ बुडतां हाक मारी । ठाव नाहीं आणिकां वारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे न करीं हिका । गुण घेऊन अवगुण टाका ॥ ४ ॥

॥ १७५६ ॥ कुळींचें दैवत ज्याचें पंढरीनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ॥ धृ० ॥ शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करीं भलते ठायीं दास तुझा ॥ १ ॥ पंढरीस कोणी जाती वारिकरी । होईन त्यांचे घरीं पशुयाती ॥ २ ॥ विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतन त्याचे पायीं ॥ ३ ॥ तुळसीवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचे घरीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गति चाड मज ॥ ५ ॥

॥ १७५७ ॥ अवघिया चाडा कुंठित करुनी । लावीं आपुलीच गोडी । आशा मनसा तृष्णा कल्पना । करूनियां देशधडी । मीतूंपणापासाव गुंतलों । मिथ्या संकल्प तो माझा तोडीं । तुझिये चरणीं माझे दोन्ही पक्ष । अवघी करुनी दाखवीं पिंडी रे रे ॥ १ ॥ माझें साच काय केलें मृगजळ । वर्णा याति कुळ अभिमान । कुमारी भातुकें खेळती कवतुकें । काय त्यांचें साचपण ॥ धृ० ॥ वेगळाल्या भावें चित्ता तडातोडी । केलों देशधडी मायाजाळें । गोत वित्त माय बाप बहिणी सुत । बंधुवर्ग माझीं बाळें । एका एक न धरी संबंध पुरलिया । पातलिया जवळी काळें । जाणोनियां त्याग सर्वस्वें केला । सांभाळीं आपुलें जाळें ॥ २ ॥ एका जवळी धरी आणिकां अंतरी । तीं काय सोयरीं नव्हतीं माझीं । एकाचें पाळण एकासी भांडण । चाड कवणिये काजीं । अधिक असे उणें कवण कवण्या गुणें । हे भाव न कळेचि तुझी । ह्मणोनि चिंतनीं राहिलों श्रीपती । तुका ह्मणे भाक माझी ॥ ३ ॥

॥ १७५८ ॥ आणिकां छळावया जालासी शाहाणा । स्वहिता घातलें खानें । आडिके पैके करूनि सायास । कृपणें सांचलें धन । न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याती तयाचा गुण । तारुण्यदशे अधम मातला । दवडी हात पाय

कान ॥ १ ॥ काय जालें यांस वांयां कां ठकलें । हातीं सांपडलें टाकीतसे । घेउनी स्फटिकमणी टाकी चिंतामणी । नागवलें आपुलें इच्छें ॥ धृ० ॥ सिद्धीं सेविती अधम । पात्रासारिखें फळ । सिंपिला मोतीं जन्मलें स्वातीं । वरुषलें सर्वत्र जळ । कापुस पट नयेचि कारणा । तयास पातला काळ । तेंचि भुजंगें धरिलें कंठीं । मा विष जालें त्याची गरळ ॥ २ ॥ भक्षूनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलूनि केळें । घालुनीया घसा अंगोळिया ॥ वांतीं करूं पाहे बळें । कुंथावयाची आवडी वांयां । उन्हवणी रडवी बळें । तुका ह्मणे जे जैसें करिती । ते पावती तसींच फळें ॥ ३ ॥

॥ १७५९ ॥ चंदनाचे गांवीं सर्पांची वसती । भोगिती ते होती द्वीपांतरीं ॥ धृ० ॥ एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥ १ ॥ क्षीराची वसति अशुद्ध सेवावें । जवळी तें जावें भोगें दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरे देवा ॥ ३ ॥

॥ १७६० ॥ तुज दिलें आतां करीं यत्न याचा । जीवभाववाचाकायामन ॥ धृ० ॥ भागलों दातारा सीण जाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥ १ ॥ नेणतां सोसिली तयाची आटणी । नव्हतांही कोणी कांहीं माझी ॥ २ ॥ वर्म नेणें दिशा हिंडती मोकट । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥ ३ ॥ येरझारिफेरा सिणलों सायासीं । आतां हृषीकेशी अंगिकारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे मन इंद्रियांचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥ ५ ॥

॥ १७६१ ॥ स्वयें पाक करी । संशय तोंचि धरी । संदेहासागरीं । आणिक परी बुडती ॥ धृ० ॥ जाणे विरळा एक । जालें तथींचें हें सुख । देखिले बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥ १ ॥ तोंचि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचीं मुळें । नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिले ॥ २ ॥ तोंचि साधी संधी । सावध त्रिकाळ जो बुद्धी । संदेहाचा संधी । वेठी आणिक धरियेले ॥ ३ ॥ अखंड तें ध्यान । समबुद्धि समाधान । सोंग वांयांविण । ते झांकून बैसती ॥ ४ ॥ करणें जयासाठीं । जो नातुडे कवणे आटी । तुका ह्मणे साटी । चित्तवित्तेंवांचुनी ॥ ५ ॥

॥ १७६२ ॥ माझिया संचिता । वृद्ध देखोनि बळिवंता । पळसी पंढरिनाथा । भेणें आतां तयाच्या ॥ धृ० ॥ तरि मज कळलासी । नव्हतां भेटी जाणीवेसी । एक संपादिसी । मान करिसी लोकांत ॥ १ ॥ तरि हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें । काय तुज म्यां कोडें । रे सांकडें घालावें ॥ २ ॥ भोगाधीपति क्रियमाण । तें तुज नागवें आझून । तरि कां वांयांविण । तुज म्यां सीण करावा ॥ ३ ॥ तुज नव्हतां माझें कांहीं । परि मी न संडीं भक्तिसोई । हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥ ४ ॥ तूं भितोसि माझिया दोषा । कांहीं मागणें ते आशा । तुका ह्मणे एसा । कांहीं न धरीं संकोच ॥ ५ ॥

॥ १७६३ ॥ लोकमान देहसुख । संपत्तिउपभोग अनेक । विटंबना दुःख । तुझिये भेटीवांचुनी ॥ धृ० ॥ तरी मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट । थोर पुण्यें वीट । तुज दैवेंचि लाधली ॥ १ ॥ काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें मावेचें मापाडें । भेटीविण कुडें । तुझिये अवघें मज वाटे ॥ २ ॥ आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा

उद्धार । न देखतां धीर । चतुर्भुज मज नाहीं ॥ ३ ॥ रिद्धिसिद्धि काय करूं । अथवा अगम्य विचारू । भेटीविण भारू । तुझिये वाटे मज यांचा ॥ ४ ॥ तुजवांचूनि कांहीं व्हावें । ऐसें नको माझिया जीवें । तुका ह्मणे द्यावें । दरुषन पायांचें ॥ ५ ॥

॥ १७६४ ॥ तुझा ह्मणवून तुज नेणें । ऐसें काय माझें जिणें ॥ धृ० ॥ तरि मज कवणाचा आधार । करोनियां राहों धीर ॥ १ ॥ काय शब्दींचि ऐकिला । भेटी नव्हतां गा विठ्ठला ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । अभय देईं पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ १७६५ ॥ उद्धवअक्रूरासी । आणिक व्यासअंबऋषी । रुक्मांगदप्रल्हादासी । दाविलें तें दाखवीं ॥ धृ० ॥ तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण । उतावेळ मन । तयाकारणें तेथें ॥ १ ॥ जनकश्रुतदेवा करीं । कैसा शोभलासी हरी । विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुकें ॥ २ ॥ पांडवां अकांतीं । तेथें पावसी स्मरती । घातलें द्रौपदी । यागीं बिरडें चोळीचें ॥ ३ ॥ करी गोपींचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख । दावीं तेंचि मुख । दृष्टि माझ्या आपुलें ॥ ४ ॥ तरि तूं अनाथाचा दाता । मागतियां शरणागता । तुका ह्मणे आतां । कोड पुरवीं हें माझें ॥ ५ ॥

॥ १७६६ ॥ मागता भिकारी जालों तुझे द्वारीं । देईं मज हरि कृपादान ॥ धृ० ॥ प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचरावें हृदयामाजी ॥ १ ॥ सर्वभावें शरण आलों पांडुरंगा । कृपाळु तूं जगामाजी एक ॥ २ ॥ तापत्रयें माझी तापविली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ॥ ३ ॥ संबंधीं जनवाद पिडलों परोपरी । अंतरलों दुरी तुजसीं तेणें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां तुझा शरणागत । करावें सनाथ मायबापा ॥ ५ ॥

॥ १७६७ ॥ भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं ॥ धृ० ॥ न मनी नाम न मनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासा ॥ १ ॥ नाहीं चाड देवाची कांहीं । छळणें टोंके तस्करघाई ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शभंग ॥ ३ ॥

॥ १७६८ ॥ दिनदिन शंका वाटे । आयुष्य नेणवतां गाडें ॥ धृ० ॥ कैसीं भुललीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥ १ ॥ विसरलीं मरण । त्याची नाहीं आठवण ॥ २ ॥ देखत देखत पाहीं । तुका ह्मणे आठव नाहीं ॥ ३ ॥

॥ १७६९ ॥ माझें मज आतां न देखें निरसतां । ह्मणऊन आधार केला । संसाराची आस सांडुनि लौकिक । जीव भाव तुज दिला । नव्हतीं माझीं कोणीं मी कवणाचा । अर्थ मोहो सांडवला । तारीं मारीं करीं भलतें दातारा । होऊन तुझा आतां ठेलों रे ॥ १ ॥ असो माझें कोडें तुज हें सांकडें । मी असेन निवाडें सुखरूप । बाळकासी चिंता काय पोटवेया । जया शिरीं मायबाप ॥ धृ० ॥ पापपुण्यें श्रुति आटिल्या । शास्त्रांस न लगेचि ठाव । विधिनिषेधें गोंविलीं पुराणें । वेदांसी तो अहंभाव । ओंकाराचें मूळ व्यापिलें माया । तेथें न धरेच भाव । ह्मणऊन कावाड सांडिलें उपसतां । धरिलें तुझेंचि नांव ॥ २ ॥ तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों । सर्व आशा तुझे पायीं । तप तीर्थ दान करूं कवणा । हातीं आधीन तें मज काई । आह्निकें परत्रें चाड नाहीं सर्वथा । जन्म सदा मज देईं । मायामोहपाश करीं विष तैसें । तुका ह्मणे माझ्याठायीं ॥ ३ ॥

॥ १७७० ॥ तुझें नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळही ॥ धृ० ॥ रसना येरां रसां विटे । घेतां घोट अधिक हे ॥ १ ॥ आणिका रसें मरण गांठी । येणें तुटी संसारें ॥ २ ॥ तुका ह्मणे आहार जाला । हा विठ्ठला आह्मांसी ॥ ३ ॥.

॥ १७७१ ॥ धालों सुखें ढेंकर देऊं । उमटे जेवूं तोंवरी ॥ धृ० ॥ क्रीडा करूं निरंजनी । न पुरे धणी हरिसवें ॥ १ ॥ अवघें खेळों अवघ्यामधीं । डाई न पडों ऐसी बुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे वांचवितां । आह्मां सत्ता समर्थ ॥ ३ ॥

॥ १७७२ ॥ एकल्या नव्हे खेळ चांग । धरिला संग ह्मणउनी ॥ धृ० ॥ उमटे तेव्हां कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥ १ ॥ दुसरा परी एक ऐसा । न वजे रिसा निकुरें ही ॥ २ ॥ तुका ह्मणे कळल्यां कळे । येर खेळे खेळ ह्मूण ॥ ३ ॥

॥ १७७३ ॥ बोलविलें जेणें । तोचि याचें गुह्य जाणें ॥ धृ० ॥ मी तों काबाडाचा धनी । जेवूं मागावें थिकोनी ॥ १ ॥ मजुराच्या हातें । माप जालें गेलें रितें ॥ २ ॥ जाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥ ३ ॥ मायबापासवें । बाळें कौतुकें खेळावें ॥ ४ ॥ जैसा करिती धंदा । तैसा पडोनियां छंदा ॥ ५ ॥ त्याच्या साच गाई ह्मैशी । येणें खेळावें मातीशीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे बोल । माझा बोलतो विठ्ठल ॥ ७ ॥

॥ १७७४ ॥ कां हो तुह्मी माझी वदविली वाणी । नेदा हे निवडूनि पांडुरंगा ॥ धृ० ॥ आणीक म्यां कोणा पुसावा विचार । मुळीं संवसार दुराविला ॥ १ ॥ स्वामिसेवा ह्मूण घेतली पदरीं । सांगितलें करी कारण तें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥ ३ ॥

॥ १७७५ ॥ सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी हा प्राण जाय त्याचा ॥ धृ० ॥ आणिकांचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं टळों नये ॥ १ ॥ समय सांभाळूनी आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी ह्मणवावें सेवक । खादलें तें अन्न हक होय ॥ ३ ॥

॥ १७७६ ॥ नये पुसों आज्ञा केली एकसरें । आह्मांसी दुसरें आतां नाहीं ॥ धृ० ॥ ज्याचे तो बळिवंत सर्व निवारिता । आह्मां काय चिंता करणें लागे ॥ १ ॥ बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया ॥ २ ॥ तुका ह्मणे मज होईल वारिता । तरी काय सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥

॥ १७७७ ॥ बळिवंत आह्मी समर्थाचे दास । घातलिया कास कळिकाळासी ॥ धृ० ॥ तेथें मानसाचा कोण आला पाड । उलंघोनि जड गेलों आधीं ॥ १ ॥ संसाराचे बळी साधिलें निधान । मारिले दुर्जन षड्वर्ग ॥ २ ॥ तुका ह्मणे एक उरला धरिता ठाव । येर केले वाव तृणवत ॥ ३ ॥

॥ १७७८ ॥ एका गावें आह्मीं विठोबाचें नाम । आणिकांपें काम नाहीं आतां ॥ धृ० ॥ मोडूनियां वाटा सूक्ष्म सगर । केला राज्यभार चाले ऐसा ॥ १ ॥ लावूनि मृदंग टाळश्रुतिघोष । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ॥ २ ॥ तुका ह्मणे महापातकी पतित । ऐसियांचें हित हेळामात्रें ॥ ३ ॥

॥ १७७९ ॥ वाचेच्या चापल्यें बहु जालों कुशळ । नाहीं बीजमूळ हाता आलें ॥ धृ० ॥ ह्मणोनि पंढरिराया दुःखी होतें मन । अंतरींचें कोण जाणें माझें ॥ १ ॥ पूज्य जालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥ २ ॥ तुका ह्मणे खूण न कळेचि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥ ३ ॥

॥ १७८० ॥ आतां काढाकाढी करीं बा पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥ धृ० ॥ जाणतां बैसलों दगडाचे नावे । तिचा धर्म ध्यावे प्राण हाची ॥ १ ॥ मनाचा स्वभाव इंद्रियांचे ओढी । पतनाचे जोडी वरी हांव ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली अंधळ्याची परी । आतां मज हरि वाट दावीं ॥ ३ ॥

॥ १७८१ ॥ सज्जन तो शब्द सत्य जो मानी । छळी दुर्जन आणिकांसी ॥ धृ० ॥ एक गुण तो केला दोंठायीं । ज्याचा त्यास पाहीं जैसा तैसा ॥ १ ॥ भाविक शब्द बोले वाणीचा । लटिका वाचा वाचाळ तो ॥ २ ॥ परउपकार घडे तो भला ! नाठ्याळ तया दया नाहीं ॥ ३ ॥ जाणीवंत तो पायरी जाणे । अधम तो नेणे खुंट जैसा ॥ ४ ॥ हित तें अनहित केलें कैसें । तुका ह्मणे पिसें लागलें यास ॥ ५ ॥

॥ १७८२ ॥ तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा तेचि घडी झडो माझी ॥ धृ० ॥ हें मज देईं हें मज देईं । आणिक तुजें कांहीं न मागें तुज ॥ १ ॥ बहिर कान तुझी कीर्ति नाइकतां । पाय न देखतां जात डोळे ॥ २ ॥ मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग तें चांडाळ जळो जळो ॥ ३ ॥ हातपाय तेणें पंथें न चलतां । जावे ते अनंता गळोनियां ॥ ४ ॥ तुजविण जिणें नाहीं मज चाड । तुका ह्मणे गोड नाम तुझें ॥ ५ ॥

॥ १७८३ ॥ ह्मणसी होउनी निश्चिंता । हरूनियां अवघी चिंता । मग जाऊं एकांता । भजन करूं । संसारसंभ्रमें आशा लागे पाठीं । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ॥ धृ० ॥ सेकीं नाडसील नाडसील । विषयसंग अवघा नाडसील ।
मागुता पडसील भवडोहीं ॥ १ ॥ शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं कधीं आराणूक । करिती तडातोडी आंत बाह्यात्कारीं । ऐसे जाती चारी दिवस वेगीं ॥ २ ॥ मोलाची घडी जाते वांयांविण । न मिळे मोल धन देतां कोडी । जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका ह्मणे हाय करिसी मग ॥ ३ ॥ + + + + +

॥ १७८४ ॥ कनवाळू कृपाळू भक्तांलागीं मोहीं । गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई ॥ धृ० ॥ पांडुरंगे येवो पांडुरंगे । जीवाचे जिवलगे ये वो पांडुरंगे ॥ १ ॥ भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । अंबऋषीकारणें जन्म दाहा घेतले ॥ २ ॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ३ ॥ उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं । पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ॥ ४ ॥ कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रहरणीं वस्त्रें कैसी जाली माउली ॥ ५ ॥ दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं । धांवसी लवलाहीं शाखादेठ घेउनी ॥ ६ ॥ कृपाळू माउली भुक्तिमुक्तिभांडार । करीं माझा अंगिकार तुका ह्मणे विठ्ठले ॥ ७ ॥

॥ १७८५ ॥ कवणा पाषाणासी धरूनि भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां । ह्मणऊनि निश्चित राहिलों मनीं । तूंचि सर्वां खाणीं देखोनियां ॥ धृ० ॥ कवणाचें कारण न लगेचि कांहीं । सर्वां सर्वां ठायीं तूं मज एक । कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें काई न दिसे देवा ॥ १ ॥ जळें जळ काय धोविलें एक । कवण तें पातक हरलें तेथें । पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ २ ॥ पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य । तुका ह्मणे जीत पिंड तुह्मां हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥ ३ ॥

॥ १७८६ ॥ सिणलों दातारा करितां वेरझारा । आतां सोडवीं संसारापासोनियां ॥ धृ० ॥ न सुटेचि बाकी नव्हे झाडापाडा । घातलोंसें खोडा हाडांचिया ॥ १ ॥ मायबापें माझीं जीवाचीं सांगातीं । तीं देतील हातीं काळाचिया ॥ २ ॥ पडताळुनी सुरी बैसली सेजारीं । यमफासा करीं घेऊनियां ॥ ३ ॥ पाठीं पोटीं एकें लागलीं सरसीं । नेती नरकापाशीं ओढूनियां ॥ ४ ॥ जन साह्यभूत असे या सकळां । मी एक निराळा परदेशी ॥ ५ ॥ कोणां काकुळती नाहीं कोणे परी । तुजविण हरि कृपाळुवा ॥ ६ ॥ तुका ह्मणे मज तुझाची भरंवसा । ह्मणऊनि आशा मोकलिली ॥ ७ ॥

॥ १७८७ ॥ देवाचा भक्त तो देवासी गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची । कवणाचा सोइरा नव्हेच सांगाती । अवघियां हातीं अंतरला ॥ धृ० ॥ निष्काम वेडें ह्मणती बापुडें । अवघियां सांकडें जाला कैसा । माझें ऐसें तया न ह्मणती कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥ १ ॥ प्रातःस्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी । कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । ह्मणती या चांडाळा काय जालें ॥ २ ॥ गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती आई बाप भाऊ । घरीं बाइल ह्मणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ मरता तरी ॥ ३ ॥ जन्मोनि जाला अवघियां वेगळा । ह्मणोनि गोपाळा दुर्लभ तो । तुका ह्मणे जो संसारा रुसला । तेणेंचि टाकिला सिद्धपंथ ॥ ४ ॥

॥ १७८८ ॥ कस्तुरी भिनली जये मृत्तिके । तयेसी आणिकें कैसी सरी ॥ धृ० ॥ लोखंडाचे अंगीं लागला परिस । तया आणिकास कैसी सरी ॥ १ ॥ तुका ह्मणे मी न वजें यातीवरी । पूज्यमान करीं वैष्णवांसी ॥ २ ॥

॥ १७८९ ॥ अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥ धृ० ॥ सकळां जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ १ ॥ ज्ञान सकळांमाजी आहे साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥ २ ॥ काय मुद्रा कराळ्या कराव्या सांगतां । दीप न लगतां उन्मनीचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥ ४ ॥

॥ १७९० ॥ मेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितों कोपाल संत झणी ॥ धृ० ॥ नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें व्यापूनियां ॥ १ ॥ मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥ २ ॥ राम कृष्ण हरि मुकुंद मुरारी ।

बोबड्या उत्तरीं हेंचि ध्यान ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥ ४ ॥

॥ १७९१ ॥ देवासी लागे सकळांसी पोसावें । आह्मां न लगे खावें काय चिंता ॥ धृ० ॥ देवा विचारावें लागे पापपुण्य । अह्मासी हें जन अवघें भलें ॥ १ ॥ देवासी उत्पत्ति लागला संहार । आह्मां नाहीं फार थोडें कांहीं ॥ २ ॥ देवासी काम लागला धंदा । आह्मासी ते सदा रिकामिक ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी भले देवाहुन । विचारितां गुण सर्वभावें ॥ ४ ॥

॥ १७९२ ॥ घेईन मी जन्म याजसाठीं देवा । तुह्मी चरणसेवा साधावया ॥ धृ० ॥ हरिनामकीर्तन संतांचें पूजन । घालूं लोटांगण महाद्वारीं ॥ १ ॥ आनंदें निर्भर असों भलते ठायीं । सुखदुःखें नाहीं चाड आह्मां ॥ २ ॥ आणिक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्व भावें ॥ ३ ॥ मोक्ष आह्मां घरीं कामारी तें दासी । होय सांगों तैसीं तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १७९३ ॥ देवा तुज मज पण । पाहों आगळा तो कोण ॥ धृ० ॥ तरी साच मी पतित तूंच खोटा दिनानाथ । ग्वाही साधुसंत जन करूनि अंगीं लावीन ॥ १ ॥ आह्मी धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छेद ॥ २ ॥ न चले तुझें कांहीं त्यास । आह्मी बळकाविले दोष ॥ ३ ॥ दिशा भरल्या माझ्या मनें । लपालासी त्याच्या भेणें ॥ ४ ॥ तुका ह्मणे चित्त । करी तुह्मी माझी नीत ॥ ५ ॥

॥ १७९४ ॥ लापनिकशब्दें नातुडे हा देव । मनिंचे गुह्य भाव शुद्ध बोला ॥ धृ० ॥ अंतरिंचा भेद जाणें परमानंद । जयासी संवाद करणें लागे ॥ १ ॥ तुका ह्मणे जरी आपुलें स्वहित । तरी करी चित्त शुद्धभावें ॥ २ ॥

॥ १७९५ ॥ नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां सिद्ध । जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥ धृ० ॥ काया करिसी वांयां लटिकाचि पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ १ ॥ मीच देव ऐसें सांगसी या लोकां । विषयांच्या सुखा टाकोनियां ॥ २ ॥ अमृताची गोडी पुढिलां सांगसी । आपण उपवासी मरोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरि राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥ ४ ॥

॥ १७९६ ॥ गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं । अवगुण तो कांहीं अमृतासी ॥ धृ० ॥ रवि दीप काळिमा काय जाणे हिरा । आणिकां तिमिरा नाश तेणें ॥ १ ॥ कर्पूरकांडणी काय कोंडा कणी ॥ सिंधू मिळवणी काय चाले ॥ २ ॥ परिस चिंतामणि आणिकांचा गुणी । पालटे लागोनी नव्हे तैसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसे जाणा संतजन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ४ ॥

॥ १७९७ ॥ परिस काय धातु परिस काय धातू । फेडितो निभ्रांतु लोहपांगू ॥ धृ० ॥ काय तयाहूनि जालासी बापुडें । फेडितां सांकडें माझें एक ॥ १ ॥ कल्पतरु कोड पुरवितो रोकडा । चिंतामणि खडा चिंतिलें तें ॥ २ ॥ चंदनाच्या वासें वसतां चंदन ।

होती काष्ठ आन वृक्षयाती ॥ ३ ॥ काय त्याचें उणें जालें त्यासी देतां । विचारीं अनंता तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १७९८ ॥ तोडुनी पुष्पवटिका फळवृक्ष याती । बाभळा राखती करुनी सार ॥ धृ० ॥ कोण हित तेणें देखिलें आपुलें । आणीक पाहिलें सुख काई ॥ १ ॥ धान्यें बीजें जेणें जाळिलीं सकळें । पेरितो काळें जिरें बीज ॥ २ ॥ मोडोनियां वाटा पुढिलांची सोय । आड रानें जाय घेउनी लोकां ॥ ३ ॥ विषाचें अमृत ठेवूनियां नाम । करितो अधम ब्रह्महत्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यास नाइके सांगतां । तया हाल करितां पाप नाहीं ॥ ५ ॥

॥ १७९९ ॥ संसाराच्या भेणें । पळों न लाहेसें केलें ॥ धृ० ॥ जेथें तेथें आपण आहे । आह्मीं करावें तें काये ॥ १ ॥ एकांतांसी ठाव । तिहीं लोकां नाहीं वाव ॥ २ ॥ गांवा जातों ऐसें । न लगे ह्मणावें तें कैसें ॥ ३ ॥ स्वप्नाचे परी । जागा पाहे तंव घरीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे काये । तुह्मीं घेतलें म्यां आहे ॥ ५ ॥

॥ १८०० ॥ आण काय सादर । विशीं आह्मां कां निष्ठुर ॥ धृ० ॥ केलें भक्त तैसें देई । तुह्मां प्रेम माझ्याठायीं ॥ १ ॥ काय पंगतीस कोंडा । एकांतासी साकरमांडा ॥ २ ॥ काय एकपण । पोटां घालूनि गांठी खुण ॥ ३ ॥ काय द्यावें ऐसें । तया आपण अनारिसें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मधीं । आतां तोडूं भेद बुद्धी ॥ ५ ॥

॥ १८०१ ॥ चित्त तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ॥ धृ० ॥ परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥ १ ॥ आह्मी सर्वस्वें उदार । तुज देऊनियां धीर ॥ २ ॥ इंद्रियांची होळी । संवसार दिला बळी ॥ ३ ॥ न पडे विसर । तुह्मा आह्मां निरंतर ॥ ४ ॥ प्रेम एकासाठीं । तुका ह्मणे न वेंचे गांठी ॥ ५ ॥

॥ १८०२ ॥ आह्मी पतित ह्मणोनि तुज आलों शरण । करितों चिंतन दिवस रात्रीं । नाहीं तरी मज काय होती चाड । धरावया भीड तुज चित्तीं ॥ १ ॥ आह्मा न तारावें तुह्मी काय करावें । सांगी जो जी भावें नारायणा ॥ धृ० ॥ अन्याय एकाच्या अंगिकार करणें । तया हातीं देणें लाज तेची ॥ २ ॥ काय तें शूरत्व मिरवूनि बोलणें । जनामाजी दावणें बळरया ॥ ३ ॥ पोह्या अन्नछत्र घालूनियां घरीं । दंडितो बाहेरी आलियासी । नव्हे कीर्त कांहीं न माने लोकां । काय विटंबना तैसी ॥ ४ ॥ प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण । पहातां दर्पण साक्ष काई । तुका ह्मणे तरी आह्मां कां न कळे । तरलों किंवा आह्मी नाहीं ॥ ५ ॥

॥ १८०३ ॥ काग बग रिठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥ धृ० ॥ तो मज दावा तो मज दावा । नंदानंदन जीवा आवडे तो ॥ १ ॥ गोवर्धन गिरी उच्चलिला करीं । गोकुळ भीतरी राखियेलें ॥ २ ॥ वधुनी भौमासुरा आणिल्या गोपांगना । राज्य उग्रसेना मथुरेचें ॥ ३ ॥ पांडव जोहरीं राखिले कुसरी । विवराभीतरीं चालविले ॥ ४ ॥ तुका ह्मणे हा भक्तांचा कृपाळ । दुष्टजना काळ नारायण ॥ ५ ॥

॥ १८०४ ॥ तुजविण देवा । कोणा ह्मणे माझी जिव्हा ॥ धृ० ॥ तरि हे हो कां शत-

खंड । पडो झडोनियां रांड ॥ १ ॥ कांहीं इच्छेसाठीं । करिल वळवळ करंटी ॥ २ ॥ तुका ह्मणे कर । कटीं तयाचा विसर ॥ ३ ॥

॥ १८०५ ॥ आह्मां सर्वभावें हेंचि काम । न विसंभावें तुझें नाम ॥ धृ० ॥ न लगे करावी हे चिंता । तरणें करणें काय आतां ॥ १ ॥ आसनीं भोजनीं शयनीं । तुजें नाहीं ध्यानीं मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपानिधी । माझी तोडिली उपाधी ॥ ३ ॥

॥ १८०६ ॥ नव्हे कांहीं कवणाचा । भाव जाणवला साचा ॥ धृ० ॥ ह्मणोनि तुझ्या पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ १ ॥ शरीर जायाचें कोंपट । याची काय खटपट ॥ २ ॥ तुका ह्मणे वांयांविण । देवा कळों आला सीण ॥ ३ ॥

॥ १८०७ ॥ रज्जु धरूनियां हातीं । भेडसाविलीं नेणतीं । कळों येतां चित्तीं । दोरी दोघां सारिखी ॥ धृ० ॥ तुह्मांआह्मांमध्यें हरी । जाली होती तैसी परी । मृगजळाच्या पुरीं । ठाव पाहों तरावया ॥ १ ॥ सरी चिताक भोंवरी । अळंकाराचिया परी । नामें जाली दुरी । एक सोनें आटितां ॥ २ ॥ पिसांचीं पारवीं । करोनि बाजागिरी दावी । तुका ह्मणे तेवीं । मज नको चाळवूं ॥ ३ ॥

॥ १८०८ ॥ नेघें तुझें नाम । न करीं सांगितलें काम ॥ धृ० ॥ वाढे वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥ १ ॥ आतां तुझ्या घरा । कोण करी येरझारा ॥ २ ॥ तुका ह्मणे ठायीं । मजपाशीं काय नाहीं ॥ ३ ॥

॥ १८०९ ॥ व्यवहार तो खोटा । आतां न वजों तुझ्या वाटा ॥ धृ० ॥ एका नामा नाहीं ताळ । केली सहस्रांची माळ ॥ १ ॥ पाहों जातां घाई । खेळसी लपंडाई ॥ २ ॥ तुका ह्मणे चार । बहु करितोसी फार ॥ ३ ॥

॥ १८१० ॥ लटिकाचि केला । सोंग पसारा दाविला ॥ धृ० ॥ अवघा बुडालासी ऋणें । बहुतांचें देणें घेणें ॥ १ ॥ लावियेलीं चाळा । बहु दावूनि पुतळा ॥ २ ॥ तुका ह्मणे हात । आह्मी आवरिली मात ॥ ३ ॥

॥ १८११ ॥ दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥ धृ० ॥ थोंटा झोडा शिरोमणी । भेटलासी नागवणी ॥ १ ॥ सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी थार ॥ २ ॥ तुका ह्मणे काय । तुझें घ्यावें उरे हाय ॥ ३ ॥

॥ १८१२ ॥ लाज ना विचार । बाजारी तूं भांडखोर ॥ धृ० ॥ ऐसें ज्याणें व्हावें । त्याची गांठी तुजसवें ॥ १ ॥ फेडिसी लंगोटी । घेसी सकळांसी तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरा । तुला आप ना दुसरा ॥ ३ ॥

॥ १८१३ ॥ ठाव नाहीं बुड । घरें वसविसी कुड ॥ धृ० ॥ भलते ठायीं तुझा वास । सदा एरवी उदास ॥ १ ॥ जागा ना निजेला । धाला ना भुकेला ॥ २ ॥ न पुसतां भलें । तुका ह्मणे बुझें बोलें ॥ ३ ॥

॥ १८१४ ॥ श्वाना दिली सवे । पायांभोंवतें तें भोंवे ॥ धृ० ॥ तैसी जाली मज परी । वसे निकट सेजारीं ॥ १ ॥ जेवितां जवळी । येऊनियां पुच्छ घोळी ॥ २ ॥ कोपेल तो धनी । तुका ह्मणे नेणें मनीं ॥ ३ ॥

वटवट केली । न विचारितां मना आली ॥ धृ० ॥ मज कराल तें क्षमा ।
तमा ॥ १ ॥ उचित न कळे । जिव्हा भलतेंचि बरळे ॥ २ ॥ तुका ह्मणे
वी चाड नाहीं ॥ ३ ॥

जीवें व्हावें साटी । पडे संवसारें तुटी ॥ धृ० ॥ ऐशीं बोलिलों वचनें ।
प्रण ॥ १ ॥ नाहीं जन्मा आलों । करील ऐसें नेदीं बोलों ॥ २ ॥ ठाव
ह्मणे खुंटी येणें ॥ ३ ॥

मातां पंढरिराया । माझ्या निरसावें भया ॥ धृ० ॥ मनीं राहिली आशंका ।
'का ॥ १ ॥ ठेवा माथां हात । कांहीं बोला अभयमात ॥ २ ॥ तुका ह्मणे
करा पुढें ॥ ३ ॥

कवतुकवाणें । बोलों बोबड्या वचनें ॥ धृ० ॥ हें तों नसावें अंतरीं ।
ुरी ॥ १ ॥ स्तुति तैसी निंदा । माना समचि गोविंदा ॥ २ ॥ तुका
तुह्मी शिकविलें ॥ ३ ॥

असो मागें जालें । पुढें गोड तें चांगलें ॥ धृ० ॥ आतां माझे मनीं ।
मनीं ॥ १ ॥ नेदीं अवसान । करितां नामाचें चिंतन ॥ २ ॥ तुका
आधींच गोविलें ॥ ३ ॥

ातेविण बाळा । आणिक न मानें सोहळा ॥ धृ० ॥ तैसें जालें माझ्या
पंढरिनाथा ॥ १ ॥ वाट पाहे मेघा बिंदू । नेघे चातक सरिता सिंधू
निशीं । ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥ ३ ॥ जीवनाविण मत्स्य । जैसें
४ ॥ पतिव्रते जिणें । भ्रताराच्या वर्त्तमानें ॥ ५ ॥ कृपणाचें धन ।
न ॥ ६ ॥ तुका ह्मणे काय । तुजविण प्राण राहे ॥ ७ ॥

ुज ऐसा कोणी न देखें उदार । अभयदानशूर पांडुरंगा ॥ धृ० ॥ शरण
वारिसी दोष । न मागतां त्यांस अढळ देसी ॥ १ ॥ धांवसी आडणी
कइवारें देवा भक्तांचिया ॥ २ ॥ दोष त्यांचे जाळी कल्पकोटीवरी ।
ापुलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज वाणूं कैशा परी । एक मुख हरि
। ॥

ाय तुझे उपकार पांडुरंगा । सांगों मी या जगामाजी आतां ॥ धृ० ॥
ानि संचित । दिलें अवचित आणूनियां ॥ १ ॥ घडल्या दोषांचे न
ी यास थोरी कृपा देवा ॥ २ ॥ नव्हतें ठाउकें आइकिलें नाहीं । न
देलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे याच्या उपकारासाठीं । नाहीं माझे गांठीं

ाळूनियां जन सांडी मज दुरी । करिसील हरि ऐसें कधीं ॥ धृ० ॥
ानि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥ १ ॥ नावडती जीवा
आवडी ते फार एकांताची ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी धरितो वासना ।
ह्य मज ॥ ३ ॥

॥ १८२४ ॥ सांगतों या मना तें माझें नाइके । घातावरी टेंके चांडाळ हें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि पाहे तरतें बुडतें । न लाहे पुरतें बळ करूं ॥ १ ॥ काय तें संचित न कळे पाहातां । मतिमंदचित्ता उपजतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पाहोनियां वेगीं पार टाकीं ॥ ३ ॥

॥ १८२५ ॥ आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाईच्या ॥ धृ० ॥ आचरावे दोष हे आह्मां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥ १ ॥ आह्मी तों आपुलें केलेंसें जतन । घडो तुह्मांकून घडेल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ३ ॥

॥ १८२६ ॥ मुखें बोलावें तें जीविंचें जाणसी । विदित पायांपाशीं सर्व आहे ॥ धृ० ॥ आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणां तुह्मी त्याचा ॥ १ ॥ आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वांहीं पडों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ३ ॥

॥ १८२७ ॥ कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥ धृ० ॥ नवल हे लीळा करित्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥ १ ॥ लोभालोभ एका धनाचिये ठायीं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक न विचारी प्रकार । योजे तेंचि सार यथाकाळें ॥ ३ ॥

॥ १८२८ ॥ बांधे सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोविती आपणां बळें ॥धृ०॥ भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भाव पालटिला ॥ १ ॥ घरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई घेऊनि फोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा गेलीं विसरोन । आतां वर्म कोण दावी यांसी ॥ ३ ॥

॥ १८२९ ॥ कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ धृ० ॥ कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ १ ॥ कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ २ ॥ कवण तें रूप कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ३ ॥ सर्वा ठायीं तूंचि सर्वही जालासी । तुका ह्मणे यासी दुजें नव्हे ॥ ४ ॥

॥ १८३० ॥ जेथें देखें तेथें तुझींच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें । रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें । जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी । सकळ देव पाट जाले । सदा पर्वकाळ सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥ १ ॥ अवघा आह्मां तूंच जालासी देवा । संसार हेवा कामधंदा । न लगे जाणें कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥ धृ० ॥ वाचा बोले ते तुझेचि गुणवाद । मंत्रजप कथा स्तुती । भोजनारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती । चालतां प्रदक्षिण निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रती । देखोन दृष्टि परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मुर्ती ॥ २ ॥ महाल मंदिरें माडया तन्जाल्या तीर्थरूप बावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें ।

॥ १८२४ ॥ सांगतों या मना तें माझें नाइके । घातावरी टेंके चांडाळ हें ॥ धृ० ॥ ... झणऊनि पाहे तरतें बुडतें । न लाहे पुरतें बळ करूं ॥ १ ॥ काय तें संचित न ... पाहातां । मतिमंदचित्ता उपजतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पाहीं ... वेगीं पार टाकीं ॥ ३ ॥

॥ १८२५ ॥ आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाई ... ॥ धृ० ॥ आचरावे दोष हें आह्मां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥ १ ॥ आह्मी ... आपुलें केलेंसें जतन । घडो तुह्मांकून घडेल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विठो चतुर ... राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ३ ॥

॥ १८२६ ॥ मुखें बोलावें तें जीविचें जाणसी । विदित पायांपाशीं सर्व ... ॥ धृ० ॥ आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणां तुह्मी त्याचा ॥ ... आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वांहीं पडों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे ... दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ३ ॥

॥ १८२७ ॥ कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥ ... नवल हे लीळा करित्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥ १ ॥ लोभालोभ ... धनाचिये ठायीं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक न वि... प्रकार । योजे तेंचि सार यथाकाळें ॥ ३ ॥

॥ १८२८ ॥ बांधे सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोविती आपणा बळें । ... भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भाव पालटिला ॥ १ ॥ घरांत रिघावें ... चिये सोई । भिंतीसवें डोई घेऊनि फोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा गेलीं विसरोन । ... वर्म कोण दावी यांसी ॥ ३ ॥

॥ १८२९ ॥ कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ... कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ १ ॥ कवण भो... कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ २ ॥ कवण तें रूप कवण अरू... न कळे कृपावंता माव तुझी ॥ ३ ॥ सर्वां ठायीं तूंचि सर्वही जालासी । तुका... यासी दुजें नव्हे ॥ ४ ॥

॥ १८३० ॥ जेथें देखें तेथें तुझींच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें । रूप गुण ... अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें । जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी । ... देव पाट जालें । सदा पर्वकाळ सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥ १ ॥ अवघा ... तूंच जालासी देवा । संसार हेवा कामधंदा । न लगे जाणें कोठें कांहींच करणें । ... नाम ध्यान सदा ॥ धृ० ॥ वाचा बोले ते तुझेचि गुणवाद । मंत्रजप कथा स्तुती । ... सारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती । चालतां प्रदक्षिण निद्रा ... गण । दंडवत तुजप्रती । देखोन दृष्टि परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मुर्ती । ... जाल्या तीर्थरूप बावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें । महाल मंदिरें माळव...

। अवघीं देव देवाइलें । ऐकें कानीं त्या हरिनामध्वनी । नाना शब्द होत
ग्रणे या विठोबाचे दास । सदा प्रेमसुखें धाले ॥ ३ ॥

जे दोष घडले न फिटे करितां कांहीं । सरते तुझ्या पायीं जाले तैसे
। कां हो करूं नये अंगिकार । जालेती निष्ठुर पांडुरंगा ॥ १ ॥ यातिहीन नये
। तयां दिलें पद वैकुंठींचें ॥ २ ॥ तुका ह्मणे कां एकांचा आभार । घेसी
होनियां ॥ ३ ॥

हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ॥ धृ० ॥ ह्मणोनि
ं । घरटी जागे घालितसे ॥ १ ॥ निर्लज्ज भोजें नाचत रंगीं । भरलें
॥ २ ॥ तुका ह्मणे विकलें देवें । आपण भावें संवसाटी ॥ ३ ॥

। साधन संपत्ति हेंचि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥ धृ० ॥
। माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ॥ १ ॥ वैष्णवांचा संग रामनाम
भूषणें अळंकार ॥ २ ॥ भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडीच चाली
३ ॥ मायबाप दोघें पाहातील वाट । ठेवूनियां कटीं कर उभीं ॥ ४ ॥ तुका
खेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥ ५ ॥

। यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी । वेद-
ाती कोणी । चोवीस ठेंगणी धांडोळितां ॥ १ ॥ आतां मज क्षमा करावें
ते केसवा बोलियेलों ॥ धृ० ॥ सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार । न
वेदां श्रुतीं । तो आह्मी भावें केलासी लहान । ठेवूनियां नांवें पाचारितों
मुखें शेष सीणला स्तवितां । पार न कळतां ब्रह्मा ठेला । तेथें माझी देह-
। थोर मी अन्यायी तुका ह्मणे ॥ ३ ॥

। कृष्ण गातां गीतीं कृष्ण ध्यातां चित्तीं । तेही कृष्ण होती कृष्णध्यानें
सनीं शयनीं भोजनीं जेवितां । ह्मणारे भोगिता नारायण ॥ १ ॥ ओंविये
नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥ २ ॥ नर नारी याति हो कोणी
एका प्रीति नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका भावें भजा हरी । कांति वे
क ॥ ४ ॥

। डोळियां पाझर कंठ माझा दाटे । येऊं देईं भेटे पांडुरंगे ॥ धृ० ॥ बहु
निरास कां केलें । वो गुंतलें चित्त तुझें ॥ १ ॥ बहु धंदा तुज नाहीं वो आठव ।
व माझा कंठीं ॥ २ ॥ पंढरीस जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं
तुजविण कोण सांवा धांवा करी । येवो झडकरी पांडुरंगे ॥ ४ ॥ काय तुझी
ठवरी । कृपाळू कांपरी विसरलासी ॥ ५ ॥ एक वेळ माझा धरूनि आठव ।
वो न्यावयासी ॥ ६ ॥

॥ अधिक कोंडितां चरफडी । भलतीकडे घाली उडी ॥ धृ० ॥ काय
आतां । कां विसरतें पंढरिनाथा । करी संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती
। नावडे श्रवण । धांवे विषय अवलोकुन ॥ २ ॥ बहुत चंचळ चापळ ।

॥ १८२४ ॥ सांगतों या मना तें माझें नाइके । घातावरी टेंके चांडाळ हें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि पाहे तरतें बुडतें । न लाहे पुरतें बळ करूं ॥ १ ॥ काय तें संचित न कळे पाहातां । मतिमंदचित्ता उपजतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें बळ नाहीं अंगीं । पाहोनियां वेगीं पार टाकीं ॥ ३ ॥

॥ १८२५ ॥ आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाईच्या ॥ धृ० ॥ आचरावे दोष हें आह्मां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥ १ ॥ आह्मी तों आपुलें केलेंसें जतन । घडो तुह्मांकून घडेल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ३ ॥

॥ १८२६ ॥ मुखें बोलावें तें जीविंचें जाणसी । विदित पायांपाशीं सर्व आहे ॥ धृ० ॥ आतां हेंचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणां तुह्मी त्याचा ॥ १ ॥ आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वांहीं पडों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ३ ॥

॥ १८२७ ॥ कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥ धृ० ॥ नवल हे लीळा करित्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥ १ ॥ लोभालोभ एका धनाचिये ठायीं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक न विचारी प्रकार । योजे तेंचि सार यथाकाळें ॥ ३ ॥

॥ १८२८ ॥ बांधे सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोविती आपणां बळें ॥ धृ० ॥ भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भाव पालटिला ॥ १ ॥ घरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई घेऊनि फोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा गेलीं विसरोन । आतां वर्म कोण दावी यांसी ॥ ३ ॥

॥ १८२९ ॥ कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ धृ० ॥ कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ १ ॥ कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ २ ॥ कवण तें रूप कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ३ ॥ सर्वां ठायीं तूंचि सर्वही जालासी । तुका ह्मणे यासी दुजें नव्हे ॥ ४ ॥

॥ १८३० ॥ जेथें देखें तेथें तुझींच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें । रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें । जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी । सकळ दैव पाट जालें । सदा पर्वकाळ सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥ १ ॥ अवघा आह्मां तूंच जालासी देवा । संसार हेवा कामधंदा । न लगे जाणें कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥ धृ० ॥ वाचा बोले ते तुझेचि गुणवाद । मंत्रजप कथा स्तुती । भोजन सारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती । चालतां प्रदक्षिण निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रती । देखोन दृष्टि परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मुर्ती ॥ २ ॥ जाल्या तीर्थरूप बावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें । महाल मंदिरें माडय़ा तन-

। झोपड्या अवघीं देव देवाइलें । ऐकें कानीं त्या हरिनामध्वनी । नाना शब्द होत
ले । तुका ह्मणे या विठोबाचे दास । सदा प्रेमसुखें धाले ॥ ३ ॥
॥ १८३१ ॥ जे दोष घडले न फिटे करितां कांहीं । सरते तुझ्या पायीं जाले तैसे
धृ० ॥ माझा कां हो करूं नये अंगिकार । जालेती निष्ठुर पांडुरंगा ॥ १ ॥ यातिहीन नये
तों ज्या वेद । तयां दिलें पद वैकुंठींचें ॥ २ ॥ तुका ह्मणे कां एकाचा आभार । घेसी
थां भार वाहोनियां ॥ ३ ॥
॥ १८३२ ॥ हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ॥ धृ० ॥ ह्मणोनि
डे मागें मागें । घरटी जागे घालितसे ॥ १ ॥ निर्लज्ज भोजें नाचत रंगीं । भरलें
गीं प्रेमाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे विकलें देवें । आपण भावें संवसाटी ॥ ३ ॥
॥ १८३३ ॥ साधन संपत्ति हेंचि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥ धृ० ॥
तिळ हा पंथ माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ॥ १ ॥ वैष्णवांचा संग रामनाम
णें । मंडित भूषणें अळंकार ॥ २ ॥ भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडीच चाली
वें पायीं ॥ ३ ॥ मायबाप दोघें पाहातील वाट । ठेवूनियां कटीं कर उभीं ॥ ४ ॥ तुका
णे केव्हां देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥ ५ ॥
॥ १८३४ ॥ यथार्थवादें तुज न वर्णवे कदा । बोलतों ते निंदा करितों तुझी । वेद-
ति तुज नेणती कोणी । चोवीस ठेंगणीं धांडोळितां ॥ १ ॥ आतां मज क्षमा करावें
ा । सलगी ते केसवा बोलियेलों ॥ धृ० ॥ सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार । न
ळे हा पार वेदां श्रुतीं । तो आह्मी भावें केलासी लहान । ठेवूनियां नांवें पाचारितों
२ ॥ सहस्रमुखें शेष सीणला स्तवितां । पार न कळतां ब्रह्मा ठेला । तेथें माझी देह-
द्धि ते काई । थोर मी अन्यायी तुका ह्मणे ॥ ३ ॥
॥ १८३५ ॥ कृष्ण गातां गीतीं कृष्ण ध्यातां चित्तीं । तेही कृष्ण होती कृष्णध्यानें
धृ० ॥ आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । ह्मणारे भोगिता नारायण ॥ १ ॥ ओंविये
ळणीं गावा नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥ २ ॥ नर नारी याति हो कोणी
लतीं । भावें एका प्रीति नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका भावें भजा हरी । कांति ते
सरी रूप एक ॥ ४ ॥
॥ १८३६ ॥ डोळियां पाझर कंठ माझा दाटे । येऊं देईं भेटे पांडुरंगे ॥ धृ० ॥ बहु
स टाकिलें निरास कां केलें । वो गुंतलें चित्त तुझें ॥ १ ॥ बहु धंदा तुज नाहीं वो आठव ।
हिलासे जीव माझा कंठीं ॥ २ ॥ पंढरीस जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं
ाडीं ॥ ३ ॥ तुजविण कोण सांवा धांवा करी । येवो झडकरी पांडुरंगे ॥ ४ ॥ काय तुझी
ाट पाहें कोठवरी । कृपाळू कांपरी विसरलासी ॥ ५ ॥ एक वेळ माझा धरूनि आठव ।
का ह्मणे ये वो न्यावयासी ॥ ६ ॥
॥ १८३७ ॥ अधिक कोंडितां चरफडी । भलतीकडे घाली उडी ॥ धृ० ॥ काय
रूं या मना आतां । कां विसरतें पंढरिनाथा । करी संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती
१ ॥ भजन नावडे श्रवण । धांवे विषय अवलोकुन ॥ २ ॥ बहुत चंचळ चपळ ।

जातां येतां न लगे वेळ ॥ ३ ॥ किती राखों दोनी काळ । निजलिया जागे वेळ ॥ ४ ॥ मज राखें आतां । तुका ह्मणे पंढरिनाथा ॥ ५ ॥

॥ १८३८ ॥ कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ॥ धृ० ॥ करीं यापरि स्वहित विचारूनि धर्म नीत ॥ १ ॥ देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥ २ ॥ विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ॥ ३ ॥ हत्या क्षत्रधर्म । नव्हे निष्काम तें कर्म ॥ ४ ॥ तुका ह्मणे संतीं । करूनि ठेविली आइती ॥ ५ ॥

॥ १८३९ ॥ पडोनियां राहीं । उगाच संतांचिये पायीं ॥ धृ० ॥ न लगे पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करीं भावें ॥ १ ॥ सहज ते स्थिति । उपदेश परयुक्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । जवळी धरूनि आणी देव ॥ ३ ॥

॥ १८४० ॥ देवाचे घरीं देवें केली चोरी । देवें देव नागवूनि केला भिकारी ॥ धृ० ॥ धांवणियां धांवा धावणियां धांवा । मागचि नाहीं जावें कवणिया गांवा ॥ १ ॥ सवेंचि होता चोर घरिचिया घरीं । फावलियावरी केलें अवघें वाटोळें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें कोणींच नाहीं । नागवलें कोण गेलें कोणाचें काई ॥ ३ ॥

॥ १८४१ ॥ अवघेंचि निजों नका अवघिये ठायीं । वेळ अवेळ तरी सांभाळावी कांहीं ॥ धृ० ॥ जतन करा रे जतन करा । वाळूं पाहे घरावरी घाला चोरटें ॥ १ ॥ सीतरिलीं फार खाती भोंवताले फेरे । गेलें नये हातां सेकीं तळमळ उरे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी करूं आपलें जतन । न लगे कांहीं कोणां द्यावें उघडा रे कान ॥ ३ ॥

॥ १८४२ ॥ काळोखी खाऊन कैवाड केला धीर । आपुलिया हितें जाले जनामध्यें शूर ॥ धृ० ॥ कां रे तुह्मी नेणां कां रे तुह्मी नेणां । अल्पसुखासाठीं पडशी विपत्तीच्या घाणां ॥ १ ॥ नाहीं ऐसी लाज काय तयांपें आगळें । काय नव्हे केलें आपुलिया बळें ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी सुख अवघेंचि बरें । जतन करून हीं आपुलालीं ढोरें ॥ ३ ॥

॥ १८४३ ॥ जाय परतें काय आणिला कांटाळा । बोला एक वेळा ऐसें तरी ॥ धृ० ॥ कां हो केलें तुह्मी निष्ठुर देवा । मानेना हे सेवा करितों ते ॥ १ ॥ भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मापासूनि अंतर । न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ३ ॥

॥ १८४४ ॥ अनुभवें कळों येतें पांडुरंगा । रुसावें तें कां गा तुह्मांवरी ॥ धृ० ॥ आवरितां चित्त नावरे दुर्जन । घात करी मन माझें मज ॥ १ ॥ अंतरीं संसार भक्ति बाह्याकार । ह्मणोनि अंतर तुझ्या पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे काय करूं नेणें वर्म । आलें तैसें कर्म सोसूं पुढें ॥ ३ ॥

॥ १८४५ ॥ तुजकरितां होतें आनाचें आन । तारिले पाषाण उदकीं देवा ॥ धृ० ॥ कां नये कैवार करूं अंगिकार । माझा बहु भार जड जाला ॥ १ ॥ चुकलासी ह्मणों तरी जीवांचाही जीव । रिता नाहीं ठाव उरों दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें काय सत्ताबळ । माझें परि कृपाळ आहां तुह्मी ॥ ३ ॥

॥ १८४६ ॥ फळ देंठींहून झडे । मग मागुतें न जोडे ॥ धृ० ॥ ह्मणोनि तांतडी

खोटी । कारण उचिताचे पोटीं ।। १ ।। पुढें चढे हात । त्याग मागिलां उचित ।। २ ।। तुका ह्मणे रणीं । नये पाहों परतोनी ।। ३ ।।

।। १८४७ ।। अगी देखोनियां सती । अंगीं रोमांच उठती ।। धृ० ।। हा तो नव्हे उपदेश । सुख अंतरीं उल्हास ।। १ ।। वित्तगोतांकडे । चित्त न घाली न रडे ।। २ ।। आठवूनि एका । उडी घाली ह्मणे तुका ।। ३ ।।

।। १८४८ ।। फळ पिके देठीं । निमित्य वारियाची भेटी ।। धृ० ।। हा तों अनुभव रोकडा । कळों येतो खरा कुडा ।। १ ।। तोडिलिया बळें । वांयां जाती काची फळें ।। २ ।। तुका ह्मणे मन । तेथें आपुलें कारण ।। ३ ।।

।। १८४९ ।। हालवूनि खुंट । आधीं करावा बळकट ।। धृ० ।। मग तयाच्या आधारें । करणें अवघेंचि बरें ।। १ ।। सुख दुःख साहे । हर्षामर्षी भंगा नये ।। २ ।। तुका ह्मणे जीवें । आधीं मरोनि राहावें ।। ३ ।।

।। १८५० ।। धांवें माते सोई । बाळ न विचारितां कांहीं ।। धृ० ।। मग त्याचें जाणें निकें । अंग वोडवी कौतुकें ।। १ ।। नेणें सर्प दोरी । अगी भलतें हातीं धरी ।। २ ।। तीविणें तें नेणे । आणिक कांहीं तुका ह्मणे ।। ३ ।।

।। १८५१ ।। भोग द्यावे देवा । त्याग भोगींच बरवा ।। धृ० ।। आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ।। १ ।। योजे यथाकाळें । उत्तम पाला कंदें मुळें ।। २ ।। वंचक त्यासी दोष । तुका ह्मणे मिथ्या सोस ।। ३ ।।

।। १८५२ ।। पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ।। धृ० ।। मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ती ।। १ ।। नव्हे हा उपदेश । तुमचें बडबडिलों शेष ।। २ ।। तुमचें कृपेचें पोषणें । जन्मोजन्मीं तुका ह्मणे ।। ३ ।।

।। १८५३ ।। जायांचें अंगुलें लेतां नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविलें ।। धृ० ।। घुसळितां ताक कांडितां भूस । साध्य नाहीं क्लेश जाती वांया ।। १ ।। तुका ह्मणे नाहीं स्वता भांडवल । भिकेचें तें फोल बीज नव्हे ।। २ ।।

।। १८५४ ।। न बोलावें परि पडिला प्रसंग । हाकलिते जग तुझ्या नामें ।। धृ० ।। लटिकेंचि सोंग मांडिला पसारा । भिकारी तूं खरा कळों आलें ।। १ ।। निलाजिरीं आह्मी करोनियां धीर । राहिलों आधार धरूनियां ।। २ ।। कैसा नेणों आतां करिसी शेवट । केली कटकट त्याची पुढें ।। ३ ।। तुका ह्मणे कांहीं न बोलसी देवा । उचित हे सेवा घेसी माझी ।। ४ ।।

।। १८५५ ।। नाहीं जालें मोल कळे देतां काळीं । कोण पाहों बळी दोघांमध्यें ।। धृ० ।। आह्मी तरी जालों जीवासी उदार । कैंचा हा धीर तुजपाशीं ।। १ ।। बहु चाळविलें मागें आजिवरी । आतां पुढें हरि जाऊं नेदीं ।। २ ।। नव्हती जों भेटी नामाची ओळखी । ह्मणऊनि दुःखी बहु जालों ।। ३ ।। तुका ह्मणे कांहीं राहों नेदी बाकी । एकवेळा चुकी जाली आतां ।। ४ ।।

।। १८५६ ।। कैसा कृपाळु हें न कळसी देवा । न बोलसी सेवा घेसी माझी ।। धृ० ।।

काय ऐसें बळ आहे तुजपाशीं । पाहों हा रिघसी कोणा आड ॥ १ ॥ पाडियेला ठायीं तुझा थारा मारा । अवघा हातारा लपसी तो ॥ २ ॥ आतां तुह्मां आह्मां उरी तोचि बरें । काय हीं उत्तरें वाढवुनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज साह्य जाले संत । ह्मणऊनि मात फावली हे ॥ ४ ॥

॥ १८५७ ॥ चुकलिया आह्मां करितसां दंड । हाकासी कां खंड पांडुरंगा ॥ धृ० ॥ चाळविलीं एकें रिद्धिसिद्धीवरी । तैसा मी भिकारी नव्हें देवा ॥ १ ॥ कां मी येथें गुंतों मांडूनि पसारा । मागुता हातारा दंभासाठीं ॥ २ ॥ केलें म्यां जतन आपुलें वचन । ठायींचें धरून होतों पोटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ताळा घातला आडाखीं । ठावें होतें सेकीं आडविसी ॥ ४ ॥

॥ १८५८ ॥ कृपावंता कोप न धरावा चित्तीं । छळू वक्रोक्ती स्तुति करूं ॥ धृ० ॥ आह्मी तुझा पार काय जाणों देवा । नेणों कैसी सेवा करावी ते ॥ १ ॥ अनंता अरूपा अलक्षा अच्युता । निर्गुणा सचिता सर्वोत्तमा ॥ २ ॥ चांगलीं हीं नामें घेतलीं ठेवून । जालासी लाहान भक्तिकाजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझ्या पायांवरी सदा । मस्तक गोविंदा असो माझा ॥ ४ ॥

॥ १८५९ ॥ आतां तुझा भाव कळों आला देवा । ठकूनियां सेवा घेसी माझी ॥ धृ० ॥ टाकूनि सांकडें आपुलिये माथां । घातला या संतावरी भार ॥ १ ॥ स्तुति करवूनि पिटिला डांगोरा । तें कोण हातारा साच करी ॥ २ ॥ जातीचे वाणी मी पोटींचें कुडें । नका मजपुढें ठकाठकी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं आलें अनुभवा । आधींच मी देवा कैसें नाचों ॥ ४ ॥

॥ १८६० ॥ जन पूजी याचा मज कां आभार । हा तुह्मी विचार जाणा देवा ॥ धृ० ॥ पत्र कोण मानी वंदितील सिक्का । गौरव सेवका त्याचि मुळें ॥ १ ॥ मी मीपणें होतों जनामधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥ २ ॥ आतां तूं भोगिता सर्व नारायणा । नको आह्मां दीनां पीडा करूं ॥ ३ ॥ आपुलिया हातें देसील सुधारा । तुका ह्मणे खरा तोचि आह्मा ॥ ४ ॥

॥ १८६१ ॥ आमची कां नये तुह्मासी करुणा । किती नारायणा आळवावें ॥ धृ० ॥ काय जाणा तुह्मी दुर्बळाचें जिणें । वैभवाच्या गुणें आपुलीया ॥ १ ॥ देती घेती करिती खटपटा आणिकें । निराळा कौतुकें पाहोनिया ॥ २ ॥ दिवस बोटीं आह्मीं धरियेलें माप । वाहातों संकल्प स्वहिताचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मग देसी कोण्या काळें । चुकुर दुर्बळें होतों आह्मीं ॥ ४ ॥

॥ १८६२ ॥ तुह्मां आह्मां तुटी होईल यावरी । ऐसें मज हरि दिसतसे ॥ धृ० ॥ वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥ १ ॥ सारिलें संचित होतें गांठी कांहीं । पुढें ऋण तेंही नेदी कोणी ॥ २ ॥ जावेंचि न लगे कोणाचिया घरा । उडाला पातेरा तुझ्या संगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां हाचि लाभ जाला । मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १८६३ ॥ देव मजुर देव मजुर । नाहीं उजुर सेवेपुढें ॥ धृ० ॥ देव गांढ्याळ देव गांढ्याळ । देखोनियां बळ लपतसे ॥ १ ॥ देव तर काई देव तर काई । तुका ह्मणे राई तरी मोठी ॥ २ ॥

॥ १८६४ ॥ देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥ धृ० ॥ देव उदार देव उदार । थोड्यासाठीं फार देऊं जाणे ॥ १ ॥ देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥ २ ॥

॥ १८६५ ॥ देव बासर देव बासर । असे निरंतर जेथें तेथें ॥ धृ० ॥ देव खोळंबा देव खोळंबा । मज झळंबा म्हूण कोंडी ॥ १ ॥ देव लागट देव लागट । लाविलिया चट जीवीं जडे ॥ २ ॥ देव बावळा देव बावळा । भावें जवळा लुडबुडी ॥ ३ ॥ देव न व्हावा देव न व्हावा । तुका ह्मणे गोवा करी कामीं ॥ ४ ॥

॥ १८६६ ॥ देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥ धृ० ॥ देव अकुळी देव अकुळी । भलते ठायीं सोयरीक ॥ १ ॥ देव लिगाड्या देव लिगाड्या । तुका ह्मणे भाड्या दंभें ठकी ॥ २ ॥

॥ १८६७ ॥ देव बराडी देव बराडी । घाली देठासाठीं उडी ॥ धृ० ॥ देव भ्याड देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥ १ ॥ देव भाविक भाविक । होय दासांचा सेवक ॥ २ ॥ देव होया देव होया । जैसा ह्मणे तैसा तया ॥ ३ ॥ देव लाहान लाहान । तुका ह्मणे अनुरेण ॥ ४ ॥

॥ १८६८ ॥ देव भला देव भला । मिळोनि जाय जैसा त्याला ॥ धृ० ॥ देव उदार उदार । देतां नाहीं थोडें फार ॥ १ ॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥ २ ॥ देव व्हावा देव व्हावा । आवडे तो सर्वा जीवा ॥ ३ ॥ देव चांगला चांगला । तुका चरणीं लागला ॥ ४ ॥

॥ १८६९ ॥ देव पाहों देव पाहों । उंचे ठायीं उभे राहों ॥ धृ० ॥ देव देखिला देखिला । तो नाहीं कोणा भ्याला ॥ १ ॥ देवा कांहीं मागों मागों । जीव भाव त्यासी सांगों ॥ २ ॥ देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचिये खुणे ॥ ३ ॥ देव कातर कातर । तुका ह्मणे अभ्यंतर ॥ ४ ॥

॥ १८७० ॥ देव आमचा आमचा । जीव सकळ जीवांचा ॥ धृ० ॥ देव आहे देव आहे । जवळी आह्मां अंतरबाहे ॥ १ ॥ देव गोड देव गोड । पुरवी कोडाचेंही कोड ॥ २ ॥ देव आह्मां राखे राखे । घाली कळिकाळासी काखे ॥ ३ ॥ देव दयाळ देव दयाळ । करी तुक्याचा सांभाळ ॥ ४ ॥

॥ १८७१ ॥ जाऊं देवाचिया गांवा । देव देईल विसांवा ॥ धृ० ॥ देवा सांगों सुखदुःख । देव निवारील भूक ॥ १ ॥ घालूं देवासीच भार । देव सुखाचा सागर ॥ २ ॥ राहों जवळी देवापाशीं । आतां जडोनि पायांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी बाळें । या देवाचीं लडिवाळें ॥ ४ ॥

॥ १८७२ ॥ प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी ॥ धृ० ॥ प्रेमें यावें तया गांवा ।

चोजवीत या वैष्णवां ॥ १ ॥ प्रेम पाठी लागे बळें । भक्त देखोनियां भोळे ॥ २ ॥ प्रेम न वजे दवडितां । शिरे बळें जेथें कथा ॥ ३ ॥ तुका ह्मणे थोर आशा । प्रेमा घरीं विष्णुदासां ॥ ४ ॥

॥ १८७३ ॥ संत मानितील मज । तेणें वाटतसे लाज ॥ धृ० ॥ तुह्मी कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥ १ ॥ गोविलों थोरिवा । दुःख वाटतसे जीवा ॥ २ ॥ तुका ह्मणे माया । अवरा हे पंढरिराया ॥ ३ ॥

॥ १८७४ ॥ नाहीं तुह्मी केला । अंगिकार तो विठ्ठला ॥ धृ० ॥ सोंगें न पवीजे थडी । माजी फुटकी सांगडी ॥ १ ॥ प्रेम नाहीं अंगीं । भले ह्मणविलें जगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । मज वांयां कां चाळवा ॥ ३ ॥

॥ १८७५ ॥ आतां चक्रधरा । ह्मणी आह्मांस अव्हेरा ॥ धृ० ॥ तुमचीं ह्मणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ॥ १ ॥ काळ आह्मां खाय । तरी तुझें नांव जाय ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आतां पण सिद्धि न्यावा ॥ ३ ॥

॥ १८७६ ॥ मज ऐसें कोण उद्धरिलें सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसां ॥ धृ० ॥ हातींच्या कांकणा कायसा आरिसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥ १ ॥ धन्वंतरी हरि रोग्याचिये वेथे । तें तों कांहीं येथें न देखिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाउगें कोण मानी ॥ ३ ॥

॥ १८७७ ॥ काय तें सामर्थ्य न चले या काळें । काय जालीं बळें शक्तिहीन ॥ धृ० ॥ माझिया संचितें आणिलासी हरी । जाले तुजवरी वरिष्ठ तें ॥ १ ॥ काय गमाविली सुदर्शन गदा । तो बोला गोविंदा लाजतसां ॥ २ ॥ तुका ह्मणे काय ब्रीदाचें तें काम । सांडा परतें नाम दिनानाथ ॥ ३ ॥

॥ १८७८ ॥ बळ बुद्धि वेचूनियां शक्ती । उदक चालवावें युक्ती ॥ धृ० ॥ नाहीं चळण तया अंगीं । धांवें लवणामागें वेगीं ॥ १ ॥ पाट मोट कळा । भरित पखाला सागळा ॥ २ ॥ बीजा ज्यासी घ्यावें । तुका ह्मणे तैसें व्हावें ॥ ३ ॥

॥ १८७९ ॥ न ह्मणे साना थोर । दुष्ट पापी अथवा चोर ॥ धृ० ॥ सकळां ग्रावी एकी चवी । तान हरूनि निववी ॥ १ ॥ न ह्मणे दिवस राती । सर्व काळ सर्वां भूतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे झारी । घेतां तांब्यानें खापरी ॥ ३ ॥

॥ १८८० ॥ इच्छा चाड नाहीं । न धरी संकोचही कांहीं ॥ धृ० ॥ उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥ १ ॥ मोहरी कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥ ३ ॥

॥ १८८१ ॥ तरले ते मागें आपुलीया सत्ता । कमाई अनंता करूनियां ॥ धृ० ॥ उसणें फेडितां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य तुह्मी त्यांसी ॥ १ ॥ मज ऐसा कोण सांगा वांयां गेला । तो तुह्मी तारिला पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे नांवासारिखी करणी । न देखें हें मनीं समजावें ॥ ३ ॥

॥ १८८२ ॥ कवणांची आंडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण ॥ धृ० ॥

स दुरदुरांतरें । सांडी एकसरें केली माझी ॥ १ ॥ आइकोन माझे नायकसी
ोनियां खोळ बुंथी घेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे एके गांवींची वसती । ह्मणऊनि
देवा ॥ ३ ॥

३ ॥ आळवितां कंठ शोकला भीतर । आयुष्य वेचे धीर नाहीं मना ॥ धृ० ॥
नये हें तुझ्या अंतरा । दिनाच्या माहेरा पांडुरंगा ॥ १ ॥ धन दिसे डोळा दृग-
। भोग ते शरीरीं विष जाले ॥ २ ॥ चुकलों काय तें मज क्षमा करीं । आलिं-
प्रम द्यावें ॥ ३ ॥ अवस्था राहिली रूपाची अंतरीं । बाहेर भीतरी सर्व काळ
का ह्मणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आतां ॥ ५ ॥

## शिवाजीनें स्वामींस न्यावयास मंडळी पाठविली ते.

४ ॥ दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ धृ० ॥ आतां येथें पंढरि-
गोविसी कासया ॥ १ ॥ मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्टा ॥ २ ॥
देवा । माझें सोडववणें धांवा ॥ ३ ॥

५ ॥ नावड जें चित्ता । तेंचि होसी पुरविता ॥ धृ० ॥ कां रे पुरविली पाठी ।
ो जीवेंसाठीं ॥ १ ॥ न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ २ ॥ सेवावा एकांत
लावी मात ॥ ३ ॥ जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥ तुका ह्मणे सत्ता ।
ा पंढरिनाथा ॥ ५ ॥

६ ॥ विरंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ती ॥ धृ० ॥
ाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेंसी ॥ १ ॥ ऐसा तुझा प्रेमा
एक । पाहूनियां लेख पत्रिकींचे ॥ २ ॥ शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्र-
विश्वाचें कीं ॥ ३ ॥ व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनि मोकळा जालासी
हेहता लागला आमुच्चिये भेटी । पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ५ ॥ याचें हें
गा भूपती । लिहिली विनंति हेताची हे ॥ ६ ॥ अरण्यवासी आह्मी फिरों
दर्शनही हीन अमंगळ ॥ ७ ॥ वस्त्राविण काया आलीसे मळीन । अन्नरहित
हारी ॥ ८ ॥ रोडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा
का ह्मणे माझी विनंति सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥ १० ॥

७ ॥ ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे । हे त्या करुणा आहे हृदयस्थाची
हों कींविलवाणें नाहीं आह्मी दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ १ ॥ पांडुरंग आह्मां
ासिता । आणिकांची कथा काय तेथें ॥ २ ॥ तुझी भेट घेणें काय हें मागणें ।
शून्य केलें आह्मीं ॥ ३ ॥ निराशेचा गांव दिधला आह्मांसी । प्रवृत्तिमार्गासी
॥ ४ ॥ पतिव्रतेचें हें मन पति भेटो । तसे आह्मी विठोमाजी नांदों ॥ ५ ॥
ट्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझेंही तयामाजी ॥ ६ ॥ तुजही विठ्ठल ऐसेंचि
रि एक आलें आडवें हें ॥ ७ ॥ सद्गुरु श्रीरामदासाचें भूषण । तेथें घालीं मन

प्रेम न चळों नको ॥ ८ ॥ बहुतां ठायीं वृत्ति चाळवली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें । विष्णु- तुका ह्मणे बापा चातुर्यसागरा । भक्तिभाव तारा भाविकांसी ॥ १० ॥

॥ १८८८ ॥ तुह्मांपाशीं आह्मी येऊनियां काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥ धृ० ॥ मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासी हे थार चिंध्या बिदी ॥ १ ॥ निद्रेसी आह्मणे उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ २ ॥ तेथें काय करणें कवणाची आस । वांयां होय नाश आयुष्याचा ॥ ३ ॥ राजगृहा यावें मानाचिये आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥ रायाचिये घरीं भाग्यवंता मान । इतरां सामान्या मान नाहीं ॥ ५ ॥ देखोनियां वस्त्रें भूषणांचें जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ६ ॥ ऐकोनियां मानाल उदासता जरी । तरी आह्मां हरि उपेक्षीना ॥ ७ ॥ आतां हेंचि तुह्मा सांगणें कौतुक । भिक्षे ऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥ तपव्रतयाग महां भले जन । आशाबद्ध हीन वर्तताती ॥ ९ ॥ तुका ह्मणे तुह्मी श्रीमंत मानाचे । पूर्वींच देवांचे हरिभक्त ॥ १० ॥

॥ १८८९ ॥ आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥ धृ० ॥ जेणें योगें तुह्मां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ १ ॥ निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ति चित्तीं आणूं नका ॥ २ ॥ परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनियां ॥ ३ ॥ सांगणें न लगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ४ ॥ हेंचि ऐकोनियां चित्त समाधान । आणिक दर्शनें चाड नाहीं ॥ ५ ॥ येऊनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥ एकहोनी कर्मैं जाणोनियां वर्मे । आपुलिया धर्में राहूं आतां ॥ ७ ॥ कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वां भूतीं देख एक आत्मा ॥ ८ ॥ आत्मारामीं मन ठेवुनियां राहें । रामदासीं पाहें आपणेयां ॥ ९ ॥ तुका ह्मणे राया धन्य जन्म क्षिती । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुह्मी ॥ १० ॥

॥ १८९० ॥ आतां हे विनवणी प्रधान अष्टक । प्रभूसी विवेक समजावा ॥ धृ० ॥ प्रतिनिधि मानरक्षक चतुर । सात्विकाचें घर तुह्मांपाशीं ॥ १ ॥ मजुमुचे धणी लेखनकारक । पत्रींचा विवेक समजावा ॥ २ ॥ पेशवे सुरनिस चिटणिस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापती ॥ ३ ॥ भूषण पंडितराय विद्याधन । वैद्याराजा नमन माझें असे ॥ ४ ॥ पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनी । विवंचोनी श्रवणीं घाला तया ॥ ५ ॥ सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥ यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वांयां जाऊं नेदी ॥ ७ ॥ भिडेसाठीं बोला गाळूनि अर्थातें । अनर्थकारी तुमतें होईल तेणें ॥ ८ ॥ तुका ह्मणे तुह्मां नमन अधिकाऱ्या । सांगणें तें राया पत्र माझें ॥ ९ ॥

॥ १८९१ ॥ जाणोनि अंतर । टाळिसील करकर ॥ धृ० ॥ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ १ ॥ उठविसी दारीं । धरणें एखादिया परी ॥ २ ॥ तुका ह्मणे पायें । कैसे सोडीन ते पाहें ॥ ३ ॥

॥ १८९२ ॥ नाहीं विचारित । मेघ हा गणहारी सेत ॥ धृ० ॥ नये पाहों त्याचा अंत । ठेवी करणापें चित्त ॥ १ ॥ वर्जीत गंगा । नाहीं उत्तम अधम जगा ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । नाहीं अग्नीसी विटाळ ॥ ३ ॥

॥ १८९३ ॥ काय दिला देवा । आह्मां विठ्ठलचि व्हावा ॥ धृ० ॥ तुह्मी कळलेती उदार । साटीं परिसाची गार ॥ १ ॥ जीव दिला तरी । वचना माझ्या नये सरी ॥ २ ॥ तुका ह्मणे धन । आह्मां गोमासासमान ॥ ३ ॥

॥ १८९४ ॥ पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥ धृ० ॥ पुढें उरे खातां देतां । नव्हे खंडण मवितां ॥ १ ॥ खोलीं पडे ओली बीज । तरींच हातीं लागे निज ॥ २ ॥ तुका ह्मणे धनी । विठ्ठल अक्षरें हीं तिन्ही ॥ ३ ॥

॥ १८९५ ॥ मुंगी आणि राव । आह्मां सारखाची जीव ॥ धृ० ॥ गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ १ ॥ सोनें आणि माती । आह्मां समान हें चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें । घरा वैकुंठ सगळें ॥ ३ ॥

॥ १८९६ ॥ तिहीं त्रिभुवनीं । आह्मी वैभवाचे धनी ॥ धृ० ॥ हातां आले घाव डाव । आमचा मायबाप देव ॥ १ ॥ काय त्रिभवनीं बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । अवघी आमुचीच आतां ॥ ३ ॥

॥ १८९७ ॥ आह्मी तेणें सुखी । ह्मणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ धृ० ॥ तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ १ ॥ कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ २ ॥ ह्मणवा हरिचे दास । तुका ह्मणे मज हे आस ॥ ३ ॥

॥ १८९८ ॥ नाहीं काष्ठाचा गुमान । गोवी भ्रमरा सुमन ॥ धृ० ॥ प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ १ ॥ पदरीं घालीं पिळा । बाप निर्बळ साटीं बाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । भेणें देवें आकारावें ॥ ३ ॥

॥ १८९९ ॥ भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥ धृ० ॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥ १ ॥ बैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥ ३ ॥

॥ १९०० ॥ भावाचिया बळें । आह्मी निर्भर दुर्बळें ॥ धृ० ॥ नाहीं आणिकांची सत्ता । सदा समाधान चित्ता ॥ १ ॥ तर्का नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ॥ २ ॥ एकछत्री राज । तुक्या पांडुरंगीं काज ॥ ३ ॥

॥ १९०१ ॥ सत्तावर्त्ते मन । पाळी विठ्ठलाची आन ॥ धृ० ॥ आज्ञा वाहोनियां शिरीं । सांगितलें तेंचि करीं ॥ १ ॥ सरलीसे धांव । न लगे वाढवावी हांव ॥ २ ॥ आहे नाहीं त्याचें । तुका ह्मणे कळे साचें ॥ ३ ॥

॥ १९०२ ॥ खावें ल्यावें द्यावें । जमाखर्च तुझ्या नांवें ॥ धृ० ॥ आतां चुकली खटपट । झाड्या पाड्याचा बोभाट ॥ १ ॥ आहे नाहीं त्याचें । आह्मां काम सांगायाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंता । भार वाहे तुझ्या माथां ॥ ३ ॥

॥ १९०३ ॥ आतां बरें जालें । माझे माथांचें निघालें ॥ धृ० ॥ चुकली हे मरमर । भार माथांचे डोंगर ॥ १ ॥ नसतां कांहीं जोडी । करिती बहुतें तडातोडी ॥ २ ॥ जाला झाडापाडा । तुका ह्मणे गेली पीडा ॥ ३ ॥

॥ १९०४ ॥ संचितचि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ॥ धृ० ॥ आतां पुरे हे चाकरी ।

राहों बैसोनियां घरीं ॥ १ ॥ नाहीं काम हातीं । आराणुक दिवसराती ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । पुरे पराधीन आतां ॥ ३ ॥

॥ १९०५ ॥ ज्याचें गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥ धृ० ॥ तरीच जोडिलें तें भोगे । कांहीं आघात न लगे ॥ १ ॥ वाढवावी थोरी । मुखें ह्मणे तुझे हरी ॥ २ ॥ तुका ह्मणे हे गोमटी । दासा न घालावी तुटी ॥ ३ ॥

॥ १९०६ ॥ माझा तुह्मी देवा केला अंगिकार । हें मज साचार कैसें कळे ॥ धृ० ॥ कां हो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहें तैसा ॥ १ ॥ लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरि ठकाठकीं ॥ ३ ॥

॥ १९०७ ॥ तोंडें बोलावें तें तरी वाटे खरें । जीव येरयेरें वंचिजेना ॥ धृ० ॥ हें तुह्मां सांगणें काय उगवुनी । जावें समजोनि पांडुरंगा ॥ १ ॥ जेविल्याची खूण वाढिल्या अंतरीं । प्रीतीनें हे धरी चाली तेथें ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु परीचे आदर । अत्यंत वेव्हार संपादणी ॥ ३ ॥

॥ १९०८ ॥ न पालटे एक । भोळा भक्तचि भाविक ॥ धृ० ॥ येरां नास आहे पुढें । पुण्य सरतां उघडें ॥ १ ॥ नेणें गर्भवास । एक विष्णूचाचि दास ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ३ ॥

## स्वामींचें पंढरिनाथास पत्र.

॥ १९०९ ॥ कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात । चाल तुज पंढरिनाथ बोलावितो ॥ धृ० ॥ मग मी न धरीं आस मागील बोभाट । वेगीं धरिन वाट माहेराची ॥ १ ॥ निरांजलें चित्त करितें तळमळ । केधवा देखती मूळ आलें डोळे ॥ २ ॥ तुका ह्मणे कई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥ ३ ॥

॥ १९१० ॥ कां माझा विसर पडिला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥ धृ० ॥ कैसा कंठूनियां राहों संवसार । काय एक धीर देऊं मना ॥ १ ॥ नाहीं निरोपाची पावली वारता । करावी ते चिंता ऐसी कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे एक वेचूनि वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥ ३ ॥

॥ १९११ ॥ कांहीं माझे कळों आले गुणदोष । ह्मणऊनि उदास धरिलें ऐसें ॥ धृ० ॥ नाहीं तरी येथें न घडे अनुचित । नाहीं ऐसी रीत तया घरीं ॥ १ ॥ कळावें तें मन आपुलीया सवें । ठायींचें हे घ्यावें विचारुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज अव्हेरिलें देवें माझिया कर्तव्यें बुद्धीचिया ॥ ३ ॥

॥ १९१२ ॥ नव्हे धीर कांहीं पाठवूं निरोप । आला तरी कोप येऊं सुखें ॥ धृ० कोपोनियां तरी देईल उत्तर । जैसें तैसें पर फिरावुनी ॥ १ ॥ नाहीं तया तरी काय एक पोर । मज तों माहेर आणिक नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे असे तयामध्यें हित । आपण निवांत असों नये ॥ ३ ॥

॥ १९१३ ॥ आतां पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥ धृ० ॥ काय करूं आतां न गमेसें जालें । बहुत सोसिलें बहु दिस ॥ १ ॥ घर लागे पाठी चित्ता उभे वारे । आपुलें तें झुरे पाहावया ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव गेला तरी जाव । धरिला तो देव भाव सिद्धी ॥ ३ ॥

॥ १९१४ ॥ विनवीजे ऐसें भाग्य नाहीं देवा । पायांशीं केशवा सलगी केली ॥ धृ० ॥ धीटपणें पत्र लिहिलें आवडी । पार नेणें थोडी मति माझी ॥ १ ॥ जेथें देवा तुझा न कळेचि पार । तेथें मी पामर काय वाणूं ॥ २ ॥ जैसे तैसे माझे बोल अंगिकारीं । बोबड्या उत्तरीं गौरवितों ॥ ३ ॥ तुका ह्मणे विटेवरि जीं पाउलें । तेथें म्यां ठेविलें मस्तक हें ॥ ४ ॥

॥ १९१५ ॥ देवांच्याही देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याति त्रिभुवनीं ॥ धृ० ॥ पातकांच्या राशी नासितोसी नामें । जळतील कर्मे महा दोष ॥ १ ॥ सर्व सुखें तुझ्या वोळगती पायीं । रिद्धि सिद्धि ठायीं मुक्ति चारी ॥ २ ॥ इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीत गीतां छंद वार्ता टाळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जड जीव शक्तिहीन । त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १९१६ ॥ काय जालें नेणों माझिया कपाळा । न देखिजे डोळां मूळ येतां ॥ धृ० ॥ बहु दिवस पाहें वचनाची वास । धरिलें उदास पांडुरंगा ॥ १ ॥ नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसें तों उतर निष्ठुर न पाहिजे ॥ २ ॥ पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहूनि गोविंदा जरूरसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें वेचाचें सांकडें । देणें घेणें पुढें तोही धाक ॥ ४ ॥

॥ १९१७ ॥ एवढा संकोच तरि कां व्यालासी । आह्मी कोणांपाशीं तोंड वासूं ॥ धृ० ॥ कोण मज पुसे सिणलें भागलें । जरी मोकलिलें तुह्मीं देवा ॥ १ ॥ कवणाची वाट पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जीवलग ॥ २ ॥ कोण जाणे माझे जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मीं देखिली निश्चिती । काय माझे चित्तीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १९१८ ॥ देई डोळे भेटी न धरीं संकोच । न घालीं कांहीं वेच तुजवरी ॥ धृ० ॥ तुज बुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतां थोडें ॥ १ ॥ फार थोडें कांहीं करूनि पातळ । त्याजमध्यें काळ कडे लावूं ॥ २ ॥ आहे माझी तेचि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां लेंकरांची जाती । भेटावया खंती वाटतसे ॥ ४ ॥

॥ १९१९ ॥ सीण भाग हरे तर्थीच्या निरोपें । देखिलीया रूप उरी नुरे ॥ धृ० ॥ इंद्रियांची धांव होईल कुंठित । पावेल हें चित्त समाधान ॥ १ ॥ माहेर आहेसें लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥ २ ॥ आस नाहीं परि उरी बरी वाटे । आपलें तें भेटे आपणासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी अविट आवडी । खंडण तांतडी होऊं नेदीं ॥ ४ ॥

॥ १९२० ॥ धरितों वासना परि नय फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥ धृ० ॥

तळमळी चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीच्चिया ॥ १ ॥ प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥ २ ॥ जातों तळा येतों मागुताला वरी । वोळशाचे फेरी सांपडलों ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु करितों विचार । उतरें डोंगर एक चढें ॥ ४ ॥

॥ १९२१ ॥ कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हें न कळे पाप यांचें ॥ धृ० ॥ पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥ १ ॥ कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेम कां हस्तक न पवती ॥ २ ॥ कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होईना जिव्हा कीर्ती ॥ ३ ॥ तुका ह्मणे कई जाऊनि मोटळें । पडेन हा लोळें महाद्वारीं ॥ ४ ॥

॥ १९२२ ॥ काय पोरें जालीं फार । किंवा न साहे करकर ॥ धृ० ॥ ह्मणऊनि केली सांडी । घांस घेऊं न ल्हां तोंडीं ॥ १ ॥ करूं कलागती । तुज भांडणें भोंवतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे टांचें । घरीं जालेंसेवरोचें ॥ ३ ॥

॥ १९२३ ॥ कांहीं चिंतेविण । नाहीं उपजत सीण ॥ धृ० ॥ तरी हा पडिला विसर । माझा तुह्मां जाला भार ॥ १ ॥ आली कांहीं तुटी । गेली सुटोनियां गांठी ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥ ३ ॥

॥ १९२४ ॥ निरोपासी वेचें । काय बोलतां फुकाचें ॥ धृ० ॥ परि हें नेघेवेचि यश । भेओं नको सुखी आस ॥ १ ॥ सुख समाधानें । कोण पाहे देणें घेणें ॥ २ ॥ न लगे निरोपासी मोल । तुका ह्मणे वेचे बोल ॥ ३ ॥

॥ १९२५ ॥ जोडीच्या हव्यासें । लागे धनाचेंचि पिसें ॥ धृ० ॥ मग आणिक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥ १ ॥ पाहे रुक्याकडे । मग अवघें ओस पडे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुला बहुतांचि हेवा ॥ ३ ॥

॥ १९२६ ॥ मविलें मविती । नेणों रासी पडिल्या किती ॥ धृ० ॥ परि तूं धालाचि न धासी । आलें उभाउभीं घेसी ॥ १ ॥ अवघ्यां अवघा काळ । वाटा पांहाती सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । अराणुक तुज कांहीं ॥ ३ ॥

॥ १९२७ ॥ न बैससी खालीं । सम उभाच पाउलीं ॥ धृ० ॥ ऐसे जाले बहुत दिस । जालीं युगें अठ्ठाविस ॥ १ ॥ नाहीं भाग सीण । अराणूक एक क्षण ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । मापें केलीं देतीं घेतीं ॥ ३ ॥

॥ १९२८ ॥ जोडी कोणांसाठीं । एवढी करितोसी आटी ॥ धृ० ॥ जरी हें आह्मां नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥ १ ॥ करूनि जतन । कोणा देसी हें धन ॥ २ ॥ आमचे तळमळे । तुझें होईल वाटोळें ॥ ३ ॥ घेसील हा श्राप । माझा होऊनियां बाप ॥ ४ ॥ तुका ह्मणे उसी । आतां न ठेवीं यावरी ॥ ५ ॥

॥ १९२९ ॥ करूनि चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥ धृ० ॥ जरि तूं होऊनि उदास । माझी बुडविसी आस ॥ १ ॥ येथें न करीं काम । मुखें नेघें तुझें नाम ॥ २ ॥ तुका ह्मणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥ ३ ॥

॥ १९३० ॥ समर्थाचे पोटीं । आह्मी जन्मलों करंटीं ॥ धृ० ॥ ऐसी जाली जगीं

कीर्ती । तुझ्या नामाची फजिती ॥ १ ॥ येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ न्याया ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें । आतां खोटें जीवपणें ॥ ३ ॥

॥ १९३१ ॥ पुढें तरी चित्ता । काय येईल तें आतां ॥ धृ० ॥ मज सांगोनियां धाडीं । वाट पाहातों बराडी ॥ १ ॥ कंठीं धरिला प्राण । पायांपाशीं आलें मन ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥ ३ ॥

॥ १९३२ ॥ कैंचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥ धृ० ॥ जें या मनासी आवरूं । आंत पोटीं वाव धरूं ॥ १ ॥ कैंची शुद्ध मती । भांडवल ऐसें हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगा । कोण दशा आली सांगा ॥ ३ ॥

॥ १९३३ ॥ समर्पक वाणी । नाहीं ऐकिजेसी कानीं ॥ धृ० ॥ आतां भावें करूनि साचा । पायां पडिलों विठोबाच्या ॥ १ ॥ न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे विनंती । विनविली धरा चित्तीं ॥ ३ ॥

॥ १९३४ ॥ येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥ धृ० ॥ घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥ १ ॥ पत्र हातीं दिलें । जया जेथें पाठविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे येती । आइन सामोरा पुढती ॥ ३ ॥

॥ १९३५ ॥ रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥ धृ० ॥ तैसें माझें दंडवत । निरोप सांगतील संत ॥ १ ॥ पडे दंडकाठी । देह भलतीसवा लोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥ ३ ॥

॥ १९३६ ॥ तुह्मी संतजनी । माझी करावी विनवणी ॥ धृ० ॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥ १ ॥ भाका बहुतां रीतीं । माझी कीव काकुलती ॥ २ ॥ न देखे पंढरी । तुका चरण विटेवरी ॥ ३ ॥

॥ १९३७ ॥ होइल कृपादान । तरी मी येईन धांवोन ॥ धृ० ॥ होती संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ १ ॥ रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे ताप । हरती देखोनियां बाप ॥ ३ ॥

॥ १९३८ ॥ परिसोनि उत्तर । जाब देईजे सत्वर ॥ धृ० ॥ जरी तूं होसी कृपावंत । तरि हा बोलावीं पतित ॥ १ ॥ नाणीं कांहीं मना । करूनि पापाचा उगाणा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । काय शक्ति तुझे पायीं ॥ ३ ॥

॥ १९३९ ॥ ऐकोनियां कीर्ती । ऐसी वाटती विश्रांती ॥ धृ० ॥ माते सुख डोळां पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥ १ ॥ बोलतां ये वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे धांवे । वासना ते रस घ्यावे ॥ ३ ॥

॥ १९४० ॥ किती करूं शोक । पुढें वाढे दुःखें दुःख ॥ धृ० ॥ आतां जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥ १ ॥ पुण्य होतें गांठी । तरि कां लागती हे आटी ॥ २ ॥ तुका ह्मणे बळ । माझी राहिली तळमळ ॥ ३ ॥

॥ १९४१ ॥ करील आबाळी । माझ्या दांताची कसाळी ॥ धृ० ॥ जासी एखादा

मरोन । पाठी लागेल हें जन ॥ १ ॥ घरीं लागे कलह । नाहीं जात तो शीतळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥ ३ ॥

॥ १९४२ ॥ आतां आशीर्वाद । माझा असो सुखें नांद ॥ धृ० ॥ ह्मणसी कोणा तरी काळें । आहेतसी माझीं बाळें ॥ १ ॥ दुरी दूरांतर । तरी येसी समाचार ॥ २ ॥ नेसी कधीं तरी । तुका ह्मणे लाज हरी ॥ ३ ॥

॥ १९४३ ॥ आतां हे सेवटीं । माझी आइकावी गोष्टी ॥ धृ० ॥ आतां द्यावा वचनाचा । जाब कळे तैसा याचा ॥ १ ॥ आतां करकर । पुढें न करीं उत्तर ॥ २ ॥ तुका ह्मणे ठसा । तुझा आहे राखें तैसा ॥ ३ ॥

॥ १९४४ ॥ बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ धृ० ॥ क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ १ ॥ स्तुति निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥ २ ॥ तुका ह्मणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥ ३ ॥

॥ १९४५ ॥ माहेरिंचा काय येईल निरोप । ह्मणऊनि झोंप नाहीं डोळां ॥ धृ० ॥ वाट पाहें आस धरूनियां जीवीं । निडळा हे ठेवीं वरी बाहे ॥ १ ॥ बोटवरी माप लेखितों दिवस । होतों कासावीस धीर नाहीं ॥ २ ॥ काय नेणों संतां पडेल विसर । कीं नव्हे सादर मायबाप ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें होईल दाटणी । कोण माझें आणी मना तेथें ॥ ४ ॥

॥ १९४६ ॥ परि तो आहे कृपेचा सागर । तोंवरी अंतर पडों नेदी ॥ धृ० ॥ बहुकानदृष्टी आइके देखणा । पुरोनियां जना उरलासे ॥ १ ॥ सांगितल्याविणें जाणे अंतरिंचें । पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥ २ ॥ बहुमुखें कीर्ति आइकिली कानीं । विश्वासही मनीं आहे माझ्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं जात वांयांविण । पाळितो वचन बोलिलों तें ॥ ४॥

॥ १९४७ ॥ यावरि न कळे संचित आपुलें । कैसें वोढवलें होइल पुढें ॥ धृ० ॥ करील विक्षेप धाडितां मुळासी । किंवा धाडा ऐसी तांतडी हे ॥ १ ॥ जोंवरी हे डोळां देखें वारकरी । तों हें भरोवरी करी चित्त ॥ २ ॥ आस वाढविते बुद्धीचे तरंग । मनाचेही वेग वावडती ॥ ३ ॥ तुका ह्मणे होतील निश्चळ । इंद्रियें सकळ निरोपानें ॥ ४ ॥

॥ १९४८ ॥ होईल निरोप घेतला यावरी । राउळाभीतरीं जाऊनियां ॥ धृ० ॥ करूनियां दधिमंगळभोजन । प्रयाण शकुनसुमुहूर्तें ॥ १ ॥ होतील दाटले सद्गदित कंठीं । भरतें या पोटीं वियोगाचें ॥ २ ॥ येरयेरां भेटी क्षेम आलिंगनें । केलीं समाधानें होतीं संतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चाली न साहे मनास । पाहाती कळस परपरतों ॥ ४ ॥

॥ १९४९ ॥ ऐसी ते सांडिली होईल पंढरी । येत वारकरी होते वाटे ॥ धृ० ॥ देखिले सोहळे होती आठवत । चालती ते मात करूनियां ॥ १ ॥ केली आइकिली होईल जे कथा । राहिलें तें चित्ता होइल प्रेम ॥ २ ॥ गरुडटके टाळ मृदंग पताका । सांगती ते एकां एक सुख ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां येती लवलाहीं । आलिंगूनि बाहीं देइन क्षेम ॥ ४ ॥

॥ १९५० ॥ क्षेम मायबाप पुसेन हें आधीं । न घालीं हें मधीं सुख दुःख ॥ धृ० ॥ न

करीं तांतडी आपणांपासुनी । आइकेन कानीं सांगती तें ॥ १ ॥ अंतरींचें संत जाणतील गुज । निरोप तो मज सांगतील ॥ २ ॥ पायांवरी डोई ठेवीन आदरें । प्रीतिपडिभरें आलिंगून ॥ ३ ॥ तुका ह्मणे काया करीन कुरवंडी । ओंवाळून सांडीं त्यांवरुन ॥ ४ ॥

॥ १९९१ ॥ होइल माझी संतीं भाकिली करुणा । जे त्या नारायणा मनीं बैसे ॥ धृ० ॥ शृंगारूनि माझीं बोबडीं उत्तरें । होतील विस्तारें सांगितलीं ॥ १ ॥ क्षेम आहे ऐसें होइल सांगितलें । पाहिजे धाडिलें शीघ्र मूळ ॥ २ ॥ अवस्था जे माझी ठावी आहे संतां । होइल कृपावंता निरोपिली ॥ ३ ॥ तुका ह्मणे सवें येईल मुऱ्हाळी । किंवा कांहीं उरी राखतील ॥ ४ ॥

॥ १९९२ ॥ दोहींमध्यें एक घडेल विश्वासें । भातुकें सरिसें मूळ तरी ॥ धृ० ॥ करिती निरास निःशेष न घडे । कांहीं तरी ओढे चित्त माये ॥ १ ॥ लौकिकाची तरी धरितील लाज । काय माझ्या काज आचरणें ॥ २ ॥ अथवा कोणाचें घेणें लागे रीण । नाहीं तरी हीनकर्मी कांहीं ॥ ३ ॥ व्यालीचिये अंगीं असती वेधना । तुका ह्मणे मना मन साक्ष ॥ ४ ॥

॥ १९९३ ॥ बैसतां कोणापें नाहीं समाधान । विवरे हें मन तेचि सोई ॥ धृ० ॥ घडी घडी मज आठवे माहेर । न पडे विसर क्षणभरी ॥ १ ॥ नो बोलावें ऐसा करितो विचार । प्रसंगीं तों फार आठवतें ॥ २ ॥ इंद्रियांसी वाहो पडिली ते चाली । होती विसांवली योचि ठायीं ॥ ३ ॥ एकसरें सोस माहेरासी जावें । तुका ह्मणे जीवें घेतलासे ॥ ४ ॥

॥ १९९४ ॥ नाहीं हानि परी न राहावे निसुर । न पडे विसर काय करूं ॥ धृ० ॥ पुसाविसी वाटे मात कापडियां । पाठविती न्याया मूळ मज ॥ १ ॥ आणिक या मना नावडे सोहळा । करितें टकळा माहेरींचा ॥ २ ॥ बहु कामें केलें बहु कासावीस । बहु जाले दिस भेटी नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें न कळे अंतर । अवस्था तों फार होते मज ॥ ४ ॥

॥ १९९५ ॥ तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें । जों नाहीं बरवें कळों आलें ॥ धृ० ॥ कोणाचिया मुखें तट नाहीं मागें । वचन वाउगें बोलों नये ॥ १ ॥ दिसे हानि परी निरास न घडे । हे तंव रोकडे अनुभव ॥ २ ॥ आपुलीया भोगें होईल उशीर । तोंवरि कां धीर केला नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे गोड करील सेवट । पाहिली ते वाट ठायीं आहे ॥ ४ ॥

॥ १९९६ ॥ माहेरींचें आलें तें मज माहेर । सुखाचें उत्तर करिन त्यासी ॥ धृ० ॥ पायांवरी माथा आळिंगीन बाहीं । घेईन लवलाहीं पायवणी ॥ १ ॥ सुख समाचार पुसेन सकळ । कैसा पर्वकाळ आहे त्यास ॥ २ ॥ आपुले जीवींचें सुखदुःख भावें । सांगेन अघवें आहे तैसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वीट नेघें आवडीचा । बोलिलींच वाचा बोलवीन ॥ ४ ॥

॥ १९९७ ॥ वियोग न घडे सन्निध वसलें । अखंड राहिलें होय चित्तीं ॥ धृ० ॥ विसरु न पडे विकल्प न घडे । आलें तें आवडे तया पंथें ॥ १ ॥ कामाचा विसर

नाठव शरीर । रसना मधुर नेणे फिकें ॥ २ ॥ निरोपासी काज
निवडितां एक नये मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित चित्तें ओढियेलें ।
येणें ॥ ४ ॥

॥ १९५८ ॥ आतां माझे सखे येती वारकरी । जीवा आस थोरी ल
सांगतील माझ्या निरोपाची मात । सकळ वृत्तांत माहेरींचा ॥ १ ॥
काय होतें केणें । काय काय कोणें सांठविलें ॥ २ ॥ मागणें तें काय
पुसेन तें सुखें आहेतसीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय सांगती तें कानीं
धरुनी राहें ॥ ४ ॥

॥ १९५९ ॥ काय करावें ऱ्यां केले ते विचार । घडेल साचार का
काय मन नाहीं धरीत आवडी । प्रारब्धीं जोडी तेचि खरी ॥ १ ॥
रांधिलें चाखोनी । तें हें करीं मनीं विवंचना ॥ २ ॥ आणिकही त्यास
बहु असे जिणें ओढीचेंही ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां बोळविल्यावरी
केली नाहीं ॥ ४ ॥

॥ १९६० ॥ आह्मां आराणुक संवसारा हातीं । पडिली नव्हती आ
पुत्रदाराधन होता मनीं धंदा । गोवियेलों सदा होतों कामें ॥ १ ॥
कपाळ । राहिलें सकळ आवरोनी ॥ २ ॥ मागें पुढें कांहीं न दिसे पा
चिंता उपजली ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाट पाह्याचें कारण । येथींचि
भाग्य ॥ ४ ॥

॥ १९६१ ॥ बहु दिस नाहीं माहेरिंची भेटी । जाली होती तुटी ऱ्या
आपुलाल्या होतों गुंतलों व्यासंगें । नाहीं त्या प्रसंगें आठवलें ॥ १
जडती जडलें । आहे तें आपुलें आपणापें ॥ २ ॥ बहु निरोपाचें पावलें
एक पर तेंही ॥ ३ ॥ काय जाणों मोह होईल सांडिला । बहु दिस तुटला तु

॥ १९६२ ॥ होतीं नेणों जालीं कठिणें कठीण । जवळीच मन मनें
आह्मी होतों सोई सांडिला मारग । घडिलें तें मग तिकूनही ॥ १ ॥
पुढिलांची सांडी । न चाली तें कोंडी मायबापा ॥ २ ॥ आह्मां नाहीं
आठव । त्यांचा बहु जीव विखुरला ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें धर्माचें म
अंतर आह्मांकुनी ॥ ४ ॥

॥ १९६३ ॥ आतां करावा कां सोस वांयांविण । लटिकाचि सीण मना
असेल तें कळों येईल लौकरी । आतां वारकरी आल्यापाठीं ॥ १ ॥ बहु वि
पातलें । धीराचें राहिलें फळ पोटीं ॥ २ ॥ चालिलें तें ठाव पावेल सेवटीं
पाउलांची ॥ ३ ॥ तुका ह्मणे आसे लागतसे जीव । ह्मणऊनि कींव भाकी

॥ १९६४ ॥ भागलेती देवा । माझा नमस्कार घ्यावा ॥ धृ० ॥ तुह्मी क्षे
बाळ अवघे गोपाळ ॥ १ ॥ मारगीं चालतां । श्रमलेती येतां जातां ॥ २ ॥
कांहीं । कृपा आहे माझ्या ठायीं ॥ ३ ॥

॥ १९६५ ॥ घालूनियां ज्योती । वाट पाहें दिवसराती ॥ धृ० ॥ बहु उतावीळ मन । तुमचें व्हावें दरुषन ॥ १ ॥ आलों बोळवीत । तैसें याचि पंथें चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे पेणी । येतां जातां दिवस गणी ॥ ३ ॥

॥ १९६६ ॥ आजि दिवस धन्य । तुमचें जालें दरुषन ॥ धृ० ॥ सांगा माहेरींची मात । अवघा विस्तारीं वृत्तांत ॥ १ ॥ आइकतों मन । करुनी सादर श्रवण ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । माझा सकळ संभ्रम ॥ ३ ॥

॥ १९६७ ॥ बोलिली तीं काय । माझा बाप आणि माय ॥ धृ० ॥ ऐसें सांगा जी झडकरी । तुह्मी सखे वारकरी ॥ १ ॥ पत्राचें वचन । काय दिलें फिरावुन ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । मना आणिलें कीं नाहीं ॥ ३ ॥

॥ १९६८ ॥ काय पाठविलें । सांगा भातुकें विठ्ठलें ॥ धृ० ॥ आसे लागलासे जीव । काय केली माझी कींव ॥ १ ॥ फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगा । कैसें आर्त पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १९६९ ॥ आजिचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें । सुखी जालें मन कल्पवेना ॥ धृ० ॥ आर्तभूत माझा जीव जयांसाठीं । त्यांच्या जाल्या भेटी पायांसवें ॥ १ ॥ वाट्टुली पाहातां सिणले नयन । बहु होतें मन आर्तभूत ॥ २ ॥ माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर । होइल समाचार सांगती तो ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी निवारला ताप । फळले संकल्प संत आले ॥ ४ ॥

॥ १९७० ॥ आजि बरवें जालें । माझें माहेर भेटलें ॥ धृ० ॥ डोळां देखिले सज्जन । निवारला भाग सीण ॥ १ ॥ धन्य जालों आतां । क्षेम देऊनियां संतां ॥ २ ॥ इच्छेचें पावलों । तुका ह्मणे धन्य जालों ॥ ३ ॥

॥ १९७१ ॥ वोरसोनि येती । वत्सें धेनुवेच्या चित्तीं ॥ धृ० ॥ माझा कराया सांभाळ । वोरसोनियां कृपाळ ॥ १ ॥ स्नेहें भूक तान । विसरती जाले सीण ॥ २ ॥ तुका ह्मणे कौतुकें । दिलें प्रेमाचें भातुकें ॥ ३ ॥

॥ १९७२ ॥ आलें तें आधीं खाईन भातुकें । मग कवतुकें गाइन ओव्या ॥ धृ० ॥ सांगितला आधीं आइकों निरोप । होइल माझा बाप पुसे तो तें ॥ १ ॥ तुका ह्मणे माझे सखे वारकरी । आले हे माहेरीहुन आजी ॥ २ ॥

॥ १९७३ ॥ आमुप जोडल्या सुखाचिया रासी । पार त्या भाग्यासी नाहीं आतां ॥ धृ० ॥ काय सांगों सुख जालें आलिंगनें । निवाली दर्शनें कांति माझी ॥ १ ॥ तुका ह्मणे यांच्या उपकारासाठीं । नाहीं माझे गांठीं कांहीं एक ॥ २ ॥

॥ १९७४ ॥ पवित्र व्हावया घालीन लोळणी । ठेवीन चरणीं मस्तक हें ॥ धृ० ॥ जोडोनि हस्तक करीन विनवणी । घेइन पायवणी धोवोनियां ॥ १ ॥ तुका ह्मणे माझें भांडवल सुचें । संतां हें ठायींचें ठावें आहे ॥ २ ॥

॥ १९७५ ॥ मना एक करीं । ह्मणे जाईन पंढरी । उभा विटेवरी । तो पाहिन सांवळा ॥ धृ० ॥ करीन सांगसी तें काम । जरी जपसी हें नाम । नित्य वाचे राम । हरिकृष्ण

गोविंदा ॥ १ ॥ लागें संतांचिया पायां । कथे उल्हास गावया । आलों मागावया । शरण देईं उचित ॥ २ ॥ नाचें रंगीं वाहे टाळी । होय सादर ते काळीं । तुका ह्मणे मळी । सांडूनियां अंतरीं ॥ ३ ॥

॥ १९७६ ॥ न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं त्रिपुटीं । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनी ॥ १ ॥ भाविक गे माये भोळें गुणाचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ धृ० ॥ जो नातुडे कवणिये परी । तपें दानें व्रतें थोरी । ह्मणतां वाचे हरी । रामकृष्ण गोविंदा ॥ २ ॥ चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं । करूनियां साटी । चित्त प्रेम दोहींची ॥ ३ ॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ४ ॥ ऐसा भक्तांचा ऋणी । पाहातां आगमीं पुराणीं । नाहीं तुका ह्मणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ५ ॥

॥ १९७७ ॥ स्वल्प वाट चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ धृ० ॥ तुह्मी आह्मी खेळीमेळीं । गदा रोळी आनंदें ॥ १ ॥ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥ ३ ॥

॥ १९७८ ॥ आनंदाच्या कोटी । सांठवल्या आह्मां पोटीं ॥ धृ० ॥ प्रेम चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ १ ॥ अखंड खंडेना जीवन । रामकृष्ण नारायण ॥ २ ॥ थडी आहिक्य परत्र । तुका ह्मणे सम तीर ॥ ३ ॥

॥ १९७९ ॥ चाहाडाची माता । व्यभिचारीण तत्त्वता ॥ धृ० ॥ पाहे संतांचें उणें । छिद्र छळावया सुनें ॥ १ ॥ जाणों त्याच्या बाचें । कांहीं सोडिलें गांठीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥ ३ ॥

॥ १९८० ॥ सापें ज्यासी खावें । तेणें प्राणासी मुकावें ॥ धृ० ॥ काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंकी जन ॥ १ ॥ विंचु हाणी नांगी । अग्न लावी आणिकां अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती । नरका पाउलीं चालती ॥ ३ ॥

## स्वामींचा स्त्रीला उपदेश.

॥ १९८१ ॥ पिकल्या शेताचा आह्मां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग ॥ धृ० ॥ सत्तर टके बाकी उरली मागे तो हा । मागें झडले दाहा आजिवरी ॥ १ ॥ हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज । माजघरीं बाजे बैसलासे ॥ २ ॥ मज यासी भांडतां जाब नेदी बळें । ह्मणे एका वेळे घ्याल वांटा ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्त्रिये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ॥ ४ ॥

॥ १९८२ ॥ करितां विचार अवघें एक राज्य । तुजा कोण मज पाठीं घाली ॥ धृ० ॥ कोण्या रीति जावें आह्मी वो पळोनी । मोकळे अंगणीं मागें पुढें ॥ १ ॥ काय तें गव्हाणें हिंडावीं वो किती । दूत ते लागती याचे पाठीं ॥ २ ॥ कोठें याची करूं गेलों कुळवाडी । आतां हा न सोडी जीवें आह्मां ॥ ३ ॥ होऊनि बेबाख येथेंचि राहावें । देईल तें खावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १९८३ ॥ नागवूनि एकें नागवींच केलीं । फिरोनियां आलीं नाहीं येथें ॥ धृ० ॥ भेणें सुती कोणी न घेती पालवीं । करूनियां गोवी निसंतान ॥ १ ॥ एकें तीं गोविलीं घेऊनि जमान । हांसतील जन लोक तयां ॥ २ ॥ सरले तयांसी घाली वैकुंठीं । न सोडी हे साटी जीवें जाली ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों जाणोनि नेणतीं । सांपडलों हातीं याचे आह्मी ॥ ४ ॥

॥ १९८४ ॥ आतां तूं तयास होईं वो उदास । आरंभला नास माझ्या जीवा ॥ धृ० ॥ जरूर हें जालें मज कां नावडे । उपास रोकडे येती आतां ॥ १ ॥ बरें म्यां तुझिया जीवाचें तें काय । व्हावें तें हें पाहें विचारुनी ॥ २ ॥ तुज मज तुटी नव्हे या विचारें । सहित लेंकुरें राहों सुखें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी तुझा माझा संग । घडेल वियोग कधीं नव्हे ॥ ४ ॥

॥ १९८५ ॥ काय करूं आतां माझिया संचिता । तेणें जीवविता साटी केली ॥ धृ० ॥ न ह्मणावें कोणी माझें हें करणें । हुकूम तो येणें देवें केला ॥ १ ॥ करूनि मोकळा सोडिलों भिकारी । पुरविली तरी पाठी माझी ॥ २ ॥ पाणिया भोंपळा जेवावया पानें । लाविलीं वो येणें देवें आह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी नाहीं वो करुणा । आहे नागवणा ठावा मज ॥ ४ ॥

॥ १९८६ ॥ नको धरूं आस व्हावें या बाळांस । निर्माण तें त्यांस त्यांचें आहे ॥ धृ० ॥ आपुला तूं गळा घेईं उगवुनी । चुकवीं जाचणी गर्भवास ॥ १ ॥ ऐवज देखोनि बांधितील गळा । ह्मणोनि निराळा पळतसें ॥ २ ॥ देखोनियां त्यांचा अवघड मार । कांपे थरथर जीव माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी आहे माझी चाड । तरी करीं वाड चित्त आतां ॥ ४ ॥

॥ १९८७ ॥ भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥ धृ० ॥ ह्मणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेंकुरें जालीं मज ॥ १ ॥ आस निरसूनि कठिण हें मन । करीं वो समान वज्र तैसें ॥ २ ॥ किंचित हें सुख टाकीं वो थुंकोनी । पावसील धनी परमानंद ॥ ३ ॥ तुका ह्मणे थोर चुकती सायास । भवबंधपाश तुटोनियां ॥ ४ ॥

॥ १९८८ ॥ ऐक हें सुख होईल दोघांसी । सोहळा हे ऋषि करिती देव ॥ धृ० ॥ जडितविमानें बैसविती मानें । गंधर्वांचें गाणें नामघोष ॥ १ ॥ संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्वसुखा पुरे कोड तेथें ॥ २ ॥ आलिंगूनि लोळों त्यांच्या पायांवरी । जाऊं तेथवरी मायबापें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया सुखा वर्णूं काय । जेव्हां बापमाय देखें डोळां ॥ ४ ॥

॥ १९८९ ॥ देव पाहावया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत ॥ धृ० ॥ दिन शुद्ध सोम सकाळीं पातला । द्वादशी घडला पर्वकाळ ॥ १ ॥ द्विजां पाचारूनि शुद्ध करीं मन । देईं वो हें दान यथाविध ॥ २ ॥ नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुरी सांगतों पाल्हाळीं । परी तो जवळी आहे आह्मां ॥ ४ ॥

॥ १९९० ॥ सुख हें नावडे आह्मां कोणा बळें । नेणसी अंधळे जालीसी तूं ॥ धृ० ॥ भूक तान कैसी राहिली निश्चळ । खुंटलें चपळ मन ठायीं ॥ १ ॥ द्रव्य जीवाहूनि आवडे या जना । आह्मांसी पाषाणाहूनि हीन ॥ २ ॥ सोइरे सज्जन जन आणि वन । अवघें

समान काय गुणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां जवळीच आहे । सुख दुःख साहे पांडुरंग ॥ ४ ॥

॥ १९९१ ॥ गुरुकृपे मज बोलविलें देवें । होईल हें घ्यावें हित कांहीं ॥ धृ० ॥ सत्य देवें माझा केला अंगिकार । आणिक विचार नाहीं आतां ॥ १ ॥ होई बळकट घालूनियां कास । ह्याचि उपदेश तुज आतां ॥ २ ॥ सडा संमार्जन तुळसीवृंदावन । अतितपूजन ब्राह्मणाचें ॥ ३ ॥ वैष्णवांची दासी होईं सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥ ४ ॥ पूर्णबोध स्त्रीभ्रतारसंवाद । धन्य जिहीं वाद आइकिला ॥ ५ ॥ तुका ह्मणे आहे पांडुरंगकथा । तरेल जो चित्ता धरील कोणी ॥ ६ ॥

॥ १९९२ ॥ खडा खाळी साकर । जाला नामाचाचि फेर । न दिसे अंतर । गोडी ठायीं निवडितां ॥ धृ० ॥ तुह्मी आह्मी पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा । चाळविलें जगा । मी हें माझें यासाठीं ॥ १ ॥ पायीं हातीं नाकीं शिरीं । हेम राहे अळंकारीं । मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें ॥ २ ॥ निजलिया लाभ हानी । तोंच खरी ते स्वप्नीं । तुका ह्मणे दोन्ही । निवारलीं जागतां ॥ ३ ॥

॥ १९९३ ॥ आह्मी जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव । बीज नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥ धृ० ॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आह्मी आप । आपणासी देखिलें ॥ १ ॥ एके ठायीं घरिच्याघरीं । न कळतां जाली चोरी । तेथें तेंचि दुरी । जाणें येणें खुंटलें ॥ २ ॥ तुका ह्मणे धरूनि हातीं । उर ठेविली मागुती एकांतीं लोकांतीं । देवभक्तिसोहळा ॥ ३ ॥

॥ १९९४ ॥ कांहीं बोलिलों बोबडें । मायबापा तुह्मांपुढें । सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥ धृ० ॥ काय जाणावा महिमा । तुमचा म्यां पुरुषोत्तमा । आवडीनें सीमा । सांडविली मज हातीं ॥ १ ॥ घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें बापासी न भ्यावें । काय म्यां सांगावें । आहे ठावें तुह्मासी ॥ २ ॥ काय ह्मणे देवा । प्रेम लोभ न संडावा । पाळिला पाळावा । लळा पुढती आगळा ॥ ३ ॥

॥ १९९५ ॥ बहु भितों जाणपणा । आड न यो नारायणा । घेइन प्रेमपान्हा । भक्तिसुख निवाडें ॥ धृ० ॥ यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं । काला भात दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ १ ॥ निमिषार्ध संतसंगती । वास वैकुंठीं कल्पांतीं । मोक्षपदें होती । ते विश्रांति बापुडी ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि देईं । मीतूंपणा खंड नाहीं । बोलिलों त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥ ३ ॥

॥ १९९६ ॥ देवा आतां ऐसा करीं उपकार । देहाचा विसर पाडीं मज ॥ धृ० ॥ तरींच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥ १ ॥ ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ॥ २ ॥ आस भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ॥ ३ ॥ मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देईं ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको वरपंग देवा । घेईं माझी सेवा भावशुद्ध ॥ ५ ॥

॥ १९९७ ॥ तुज न करितां काय नव्हे एक । हे तों सत्कालिक संतवाणी ॥ धृ० ॥

भार करीं कइवार । उतरीं हा पार भवसिंधु ॥ १ ॥ उचित अनुचित पापपु-
। हा तों नये मला निवडितां ॥ २ ॥ कुंठित राहिली बोलतां बोलतां । पार न
णी पुढें ॥ ३ ॥ पुसतांही कोणा न कळे हें गुज । राखें आतां लाज पांडुरंगा
का ह्मणे बहु पाहिलें या जीवें । वर्म जालें जी ठावें नाम तुझें ॥ ५ ॥
८ ॥ मज त्याची भीड तुलंघवे देवा । जो ह्मणे केशवा दास तुझा ॥ धृ० ॥
डती बहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥ १ ॥ सांडूनियां लाज
यांपुढें । आइकती कोडें नाम तुझें ॥ २ ॥ न लगे उपचार होईन भिकारी ।
या घरीं उष्टावळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाणों उचित अनुचित । विचारूनि हित
॥ ४ ॥
९ ॥ तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ धृ० ॥
धा तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां ॥ १ ॥ मन स्थिर ठेलें
श्वळ । हें तों माझें बळ नव्हें देवा ॥ २ ॥ पापपुण्य भेद नासिले तिमिर । त्रिगुण
ांडियेले ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा
॥ ४ ॥
०० ॥ जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ धृ० ॥
टे आह्मी तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ १ ॥ बोलों जातां बरळ
नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥ २ ॥ अवघे जन मज जाले लोकपाळ ।
काळ प्राणसखे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां खेळतों कौतुकें । जालें तुझें सुख
॥ ४ ॥
०१ ॥ जालें पीक आह्मां अवघा सुकाळ । वेळ अवघा काळ प्रेमसुख ॥ धृ० ॥
राणुक अवघियांपासुन । अवघा गेला सीण भाग आतां ॥ १ ॥ अवघा जाला
क पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ॥ २ ॥ अवघेचि आह्मी त्यालों अळे-
भलोंहि फार अवघ्यांवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी सर्वांचे दास । करणें न लगे
णिकांची ॥ ४ ॥
०२ ॥ साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण सेवकें स्वामिसत्ता ॥ धृ० ॥
जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्मरसें अलिप्त त्या ॥ १ ॥ सांगणें तें नाहीं करणें
मोलही वचन बाध जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां भांडवल हातीं । येरझारा
वढियें ॥ ३ ॥
०३ ॥ शुभ जाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥ धृ० ॥
या दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे तेही ॥ १ ॥ सुख दुःखाहुनी
परीत । देतील आघात हितफळें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आह्मांसी हें भलें ।
जाले जीव जंत ॥ ३ ॥
०४ ॥ पाप पुण्य-दोन्ही वाहाती मारग । स्वर्गनर्कभोग यांची येणीं ॥ धृ० ॥
ड एक न लगे पुसावें । जेविल्या देखावें मार्गे भूक ॥ १ ॥ राहाटी पडिलें

भरोनियां रितीं । होतील मागुतीं येतीं जातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी खेळतियांमधीं । नाहीं केली बुद्धि स्थिर पाहों ॥ ३ ॥

॥ २००५ ॥ हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव देहीं ॥ धृ० ॥ हाचि एक धर्म निज बीजवर्म । हेंचि जाळी कर्मे केलीं महा ॥ १ ॥ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ २ ॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका ह्मणे गंगे मिळणी सिंधू ॥ ३ ॥

॥ २००६ ॥ माझिये जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी भेडावया ॥ धृ० ॥ आवडे ज्या हरि अंतरापासुनी । ऐसियांचें मनीं आर्त माझे ॥ १ ॥ तयालागीं जीव होतो कासाविस । पाहातील वास नयन हे ॥ २ ॥ सुफळ हा जन्म होईल तेथुन । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तोचि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरी ॥ ४ ॥

॥ २००७ ॥ आमुचें जीवन हें कथामृत । आणिकही संतसमागम ॥ धृ० ॥ सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ १ ॥ धालिया ढेंकर येती आनंदाचे । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥ २ ॥ पिकलें स्वरूप आलिया घुमरी । रासी ते अंबरीं न समाये ॥ ३ ॥ मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २००८ ॥ जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥ धृ० ॥ संचित सारूनि बांधिलें धरणें । तुंबिलें जीवन साक्षेपें हें ॥ १ ॥ शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाही एक जालें ॥ २ ॥ बीज तो अंकुर पत्र शाखा फळें । प्राप्तबीज मुळें अवघें नासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाच्या परवडी होती जाती ॥ ४ ॥

॥ २००९ ॥ भक्तिभाव आह्मी बांधिलासे गांठी । साटावितों हाटीं घ्या रे कोणी ॥ धृ० ॥ सुखाचिया पेंठे घातला दुकान । मांडियेलें वान रामनाम ॥ १ ॥ सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवसिंधू ॥ २ ॥ मागें भाग्यवंत जालें थोर थोर । तिहीं केला फार हाचि सांठा ॥ ३ ॥ खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका ह्मणे चित्त शुद्ध करीं ॥ ४ ॥

॥ २०१० ॥ पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भुमी ॥ धृ० ॥ बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभहानितुटी ज्याची तया ॥ १ ॥ दीपाचिये अंगीं नाहीं दुजाभाव । धणी चोर साव सारिखेची ॥ २ ॥ काउळें ढोंपरा कंकर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ॥ ४ ॥

॥ २०११ ॥ धीर तो कारण एकविधभाव । पतिव्रते नाहो सर्वभावें ॥ धृ० ॥ चातक हे जळ न पाहाती वृष्टी । वाट पाहे कंठी प्राण मेघा ॥ १ ॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्तउदयाची ॥ २ ॥ धेनु येऊं नेदी जवळी आणिकां । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेम प्राणांसवेंसाटी । तरीच या गोष्टी विठोबाची ॥ ४ ॥

२ ॥ नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥ धृ० ॥ धरिल
ुरावलीं करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥ १ ॥ रामनामीं जिहीं धरिल कीं-
तिहीं भवपाश तोडियेले ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसें कीं-
कानीं ॥ ३ ॥
३ ॥ वैष्णवांची कीर्ति गाइली पुराणीं । साही अठरांजणीं चहूं वेदीं ॥ धृ० ॥ शंकर
ो दावा ग्रंथांचे वाचक । कर्मठ धार्मिक पुण्यशील ॥ १ ॥ आदिनाथ शंकर
ेश्वर । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मुगुटमणी हे भक्ती ।
विश्रांति आरतिया ॥ ३ ॥
१४ ॥ बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुह्मां ठावें जातिकुळ ॥ धृ० ॥ करा
हीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरी ॥ १ ॥ वाचेचा चाळक जाला त्याची
ेत ते धर्म मजपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे घडे अपराध नेणतां । द्यावा मज आतां
ीं ॥ ३ ॥
१५ ॥ संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं परोवरी लोळतसें ॥ धृ० ॥ चर-
त लागती अंगास । तेणें बेताळीस उद्धरती ॥ १ ॥ उच्छिष्ट हें जमा करूनि पत्रा-
ालीन कवळी मुखामाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे मी आणिक विचार । नेणें हेंचि
ीतसें ॥ ३ ॥
१६ ॥ एक शेरा अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥ धृ० ॥ कां रे तृष्णा वाढ-
बांधवूनि मोहपाशीं ॥ १ ॥ औट हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥ २ ॥
ो श्रम । एक विसरतां राम ॥ ३ ॥
१७ ॥ आलें धरायेच पेंठे । पुढें मागुतें न भेटे ॥ धृ० ॥ होसी फजिती बरपडा ।
ऱ्यासीचे वेढा ॥ १ ॥ नाहीं कोणाचा सांगात । दुःख भोगितां आघात ॥ २ ॥
ुलाची वाट । कोणां सांगावा बोभाट ॥ ३ ॥ जुंतिजेसी घाणां । नाहीं मारित्या
॥ ४ ॥ तुका ह्मणे हित पाहें । जोंवरि हें हातीं आहे ॥ ५ ॥
१८ ॥ लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी । मनुष्यदेहा ऐसी ।
ोडी जोडिली ॥ धृ० ॥ वेंचूं हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें । जालिया
। लाहो हेवा जोडीचा ॥ १ ॥ घेऊनि माप हातीं । काळ मोवी दिवस रातीं । चोर
ती । पुढें तैसें पळावें ॥ २ ॥ हित सावकासें । ह्मणे करीन तें पिसें । हातीं काय
ुका ह्मणे नेणसी ॥ ३ ॥
०१९ ॥ सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥ धृ० ॥ मनें धरिला अभिलास
ातली पायांस ॥ १ ॥ होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥ २ ॥ तुका ह्मणे
लाभें लाभ दुणावला ॥ ३ ॥
०२० ॥ झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कइंचा ॥ धृ० ॥ जो हें माप तोडें
सळे जाली ते आवरी ॥ १ ॥ जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥ २ ॥
ह्मणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥ ३ ॥

भरोनियां रितीं । होतील मागुतीं येतीं जातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी खेळतियांमधीं । नाहीं केली बुद्धि स्थिर पाहों ॥ ३ ॥

॥ २००५ ॥ हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव देही ॥ धृ० ॥ हाचि एक धर्म निज बीजवर्म । हेंचि जाळी कर्में केलीं महा ॥ १ ॥ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ २ ॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका ह्मणे गंगे मिळणी सिंधू ॥ ३ ॥

॥ २००६ ॥ माझिये जातीचें मज भेटो कोणी । आवडीची धणी भेडावया ॥ धृ० ॥ आवडे ज्या हरि अंतरापासुनी । ऐसियांचें मनीं आर्त माझे ॥ १ ॥ तयालागीं जीव होतो कासाविस । पाहातील वास नयन हे ॥ २ ॥ सुफळ हा जन्म होईल तेथुन । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तोचि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरी ॥ ४ ॥

॥ २००७ ॥ आमुचें जीवन हें कथामृत । आणिकही संतसमागम ॥ धृ० ॥ सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ १ ॥ धालिया ढेंकर येती आनंदाचे । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥ २ ॥ पिकलें स्वरूप आलिया घुमरी । रासी ते अंबरीं न समाये ॥ ३ ॥ मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २००८ ॥ जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥ धृ० ॥ संचित सारूनि बांधिलें धरणें । तुंबिलें जीवन साक्षेपें हें ॥ १ ॥ शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाही एक जालें ॥ २ ॥ बीज तो अंकुर पत्र शाखा फळें । प्राप्तबीज मुळें अवघें नासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाच्या परवडी होती जाती ॥ ४ ॥

॥ २००९ ॥ भक्तिभाव आह्मीं बांधिलासे गांठीं । साठवितों हाटीं घ्या रे कोणी ॥ धृ० ॥ सुखाचिया पेंठे घातला दुकान । मांडियेलें वान रामनाम ॥ १ ॥ सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवसिंधू ॥ २ ॥ मागें भाग्यवंत जाले थोर थोर । तिहीं केला फार हाचि सांठा ॥ ३ ॥ खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका ह्मणे चित्त शुद्ध करीं ॥ ४ ॥

॥ २०१० ॥ पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भुमी ॥ धृ० ॥ बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभहानितुटी ज्याची तया ॥ १ ॥ दीपाचिये अंगीं नाहीं दुजाभाव । धणी चोर साव सारिखेची ॥ २ ॥ काउळें ढोंपरा कंकर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ॥ ४ ॥

॥ २०११ ॥ धीर तो कारण एकविधभाव । पतिव्रते नाहो सर्वभावें ॥ धृ० ॥ चातक हे जळ न पाहाती दृष्टी । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥ १ ॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्तउदयाची ॥ २ ॥ धेनु येऊं नेदी जवळी आणिकां । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेम प्राणांसवेंसाटीं । तरीच या गोष्टी विठोबाची ॥ ४ ॥

॥ २०१२ ॥ नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥ धृ० ॥ आणिकें दुरावलीं करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥ १ ॥ रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥ ३ ॥

॥ २०१३ ॥ वैष्णवांची कीर्ति गाइली पुराणीं । साही अठरांजणीं चहूं वेदीं ॥ धृ० ॥ ऐसे कोणी दावा ग्रंथांचे वाचक । कर्मठ धार्मिक पुण्यशील ॥ १ ॥ आदिनाथ शंकर नारद मुनीश्वर । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मुगुटमणी हे भक्ती । आणिक विश्रांति आरतिया ॥ ३ ॥

॥ २०१४ ॥ बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुह्मां ठावें जातिकुळ ॥ धृ० ॥ करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरी ॥ १ ॥ वाचेचा चाळक जाला दावी वर्म । उचित तें धर्म मजपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे घडे अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥ ३ ॥

॥ २०१५ ॥ संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं परोवरीं लोळतसें ॥ धृ० ॥ चरणींचे रज लागती अंगास । तेणें बेताळीस उद्धरती ॥ १ ॥ उच्छिष्ट हें जमा करूनि पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ॥ २ ॥ तुका ह्मणे मी आणिक विचार । नेणें हेंचि सार मानीतसें ॥ ३ ॥

॥ २०१६ ॥ एक शेरा अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥ धृ० ॥ कां रे तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥ १ ॥ औट हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥ २ ॥ तुका ह्मणे श्रम । एक विसरतां राम ॥ ३ ॥

॥ २०१७ ॥ आलें धरायेच पेंठे । पुढें मागुतें न भेटे ॥ धृ० ॥ होसी फजिती वरपडा । लक्ष चौऱ्यासींचे वेढां ॥ १ ॥ नाहीं कोणाचा सांगात । दुःख भोगितां आघात ॥ २ ॥ एका पाउलाची वाट । कोणां सांगावा बोभाट ॥ ३ ॥ जुंतिजेसी घाणां । नाहीं मारित्या करुणा ॥ ४ ॥ तुका ह्मणे हित पाहें । जोंवरि हें हातीं आहे ॥ ५ ॥

॥ २०१८ ॥ लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी । मनुष्यदेहा ऐसी । उत्तम जोडी जोडिली ॥ धृ० ॥ घेई हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें । जालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ॥ १ ॥ घेऊनि माप हातीं । काळ मोवी दिवस राती । चोर लाग घेती । पुढें तैसें पळावें ॥ २ ॥ हित सावकासें । ह्मणे करीन तें पिसें । हातीं काय ऐसें । तुका ह्मणे नेणसी ॥ ३ ॥

॥ २०१९ ॥ सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥ धृ० ॥ मनें धरिला अभिलास । मिठी घातली पायांस ॥ १ ॥ होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । लाभें लाभ दुणावला ॥ ३ ॥

॥ २०२० ॥ झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कइंचा ॥ धृ० ॥ जो हें माप तोंडें धरी । सळे जाली ते आवरी ॥ १ ॥ जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥ २ ॥ तुका ह्मणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥ ३ ॥

॥ २०२१ ॥ आह्मी बोलों तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ॥ धृ० ॥ काय परिहाराचें काम । जाणें अंतरींचें राम ॥ १ ॥ कळोनियां काय चाड । माझी लोकांसी बडबड ॥ २ ॥ कारण सर्वे एका । अवघें आहे ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ २०२२ ॥ उमटे तें ठायीं । तुझे निरोपावें पायीं ॥ धृ० ॥ आह्मीं करावें चिंतन । तुझें नामसंकीर्तन ॥ १ ॥ भोजन भोजनाच्या काळीं । मागों करूनियां आळी ॥ २ ॥ तुका ह्मणे माथां । भार तुझ्या पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ २०२३ ॥ केला पण सांडी । ऐसियासी ह्मणती लंडी ॥ धृ० ॥ आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥ १ ॥ आपला निवाड । आपणचि करितां गोड ॥ २ ॥ तुह्मीं आह्मीं देवा । बोलिला बोल सिद्धि न्यावा ॥ ३ ॥ असे धुरे उणें । मागें सरे तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २०२४ ॥ न व्हावें तें जालें । तुह्मां आह्मांसी लागलें ॥ धृ० ॥ आतां हालमाकलमें । भांडोनियां काढूं वर्मे ॥ १ ॥ पाटोळयासवेंसाठीं । दिली रगट्याची गांठी ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । आणूनियां करिन सरी ॥ ३ ॥

॥ २०२५ ॥ पतितमिरासी । ते म्यां धरिली जीवेंसी ॥ धृ० ॥ आतां बळिया सांग कोण । ग्वाही तुझें माझें मन ॥ १ ॥ पावनाचा ठसा । दावीं मज तुझा कैसा ॥ २ ॥ वाव तुका ह्मणे जालें । रोख पाहिजे दाविलें ॥ ३ ॥

॥ २०२६ ॥ करितां वेरझारा । उभा न राहासी वेव्हारा ॥ धृ० ॥ हे तों झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥ १ ॥ आरोगुनी मुग । बैसलासी जैसा बग ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । बुडविलीं आळवितीं ॥ ३ ॥

॥ २०२७ ॥ नाहीं देणें घेणें । गोवी केली अभिमानें ॥ धृ० ॥ आतां कां हो निवडूं नेदां । पांडुरंगा येवढा धंदा ॥ १ ॥ पांचांमधीं जावें । थोड्यासाठीं फजित व्हावें ॥ २ ॥ तुज ऐसी नाहीं । पांडुरंगा आह्मी कांहीं ॥ ३ ॥ टाकूं तो वेव्हार । तुज बहु करकर ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां । निवडूं संतां हें देखतां ॥ ५ ॥

॥ २०२८ ॥ सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ ॥ धृ० ॥ नको पृथकाचे भरी । पडों एक मूळ धरीं ॥ १ ॥ पाणचोऱ्याचें दार । वरिल दाटावें तें थोर ॥ २ ॥ वश जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥ ३ ॥ एक चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ॥ ४ ॥ तुका ह्मणे धांवा । आहे पंढरी विसांवा ॥ ५ ॥

॥ २०२९ ॥ करूं याची कथा नामाचा गजर । आह्मां संवसार काय करी ॥ धृ० ॥ ह्मणवूं हरीचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तयाभेणें कळिकाळ ॥ १ ॥ आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥ २ ॥ तुका ह्मणे करूं ऐसियांचा संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥ ३ ॥

॥ २०३० ॥ काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥ धृ० ॥ अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥ १ ॥ काय उंदीर नाहीं धांवीं । राख लावी गाढव ॥ २ ॥ तुका ह्मणे सुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ३ ॥

॥ २०३१ ॥ मद्दें मातलें नागवें नाचे । अनुचित वाचे बडबडी ॥ ध्रु० ॥ आतां शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी धीट ॥ १ ॥ माने आंगासी तें बळि-त गाढें । काय वेड्यापुढें धर्मनीत ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें येईल तो नाश । अंगावरि घाव उमटतां ॥ ३ ॥

॥ २०३२ ॥ सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥ ध्रु० ॥ परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥ १ ॥ अमृतें सागर भरवती गंगा । ह्मणवेल उगा राहें काळा ॥ २ ॥ भूत भविष्य काळा येईल वर्तमान । करवती प्रसन्न रिद्धिसिद्धी ॥ ३ ॥ स्थान मान काळों येती योगमुद्रा । नेदवेल थारा ब्रह्मांडासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे मोक्ष राहे आलीकडे । इतर बापुडें काय तेथें ॥ ५ ॥

॥ २०३३ ॥ भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेविती कवतुकें धणीवरी ॥ ध्रु० ॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती तीं पदें सकुमारें ॥ १ ॥ विसरले मुक्ति भक्ति-अभिलासें । ओढत सरिसें सुख आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं मागायाची आस । पांडु-रंग त्यांस विसंबेना ॥ ३ ॥

॥ २०३४ ॥ भक्तां समागमें सर्वभावें हरी । सर्व काम करी न सांगतां ॥ ध्रु० ॥ सांठवला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥ १ ॥ मागण्याची वास पाहे मुखा-कडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि ते कांहीं न मागती ॥ ३ ॥

॥ २०३५ ॥ प्रेमअमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ ध्रु० ॥ सकळही तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ १ ॥ सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप माजी तया ॥ २ ॥ तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ३ ॥

॥ २०३६ ॥ कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे. ॥ ध्रु० ॥ काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥ १ ॥ नष्टदुष्ट-पण कवणाचें वाणू । तयाहून अणु अधिक माझें ॥ २ ॥ कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिये ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी भांडवलें पुरता । तुजसी पंढरिनाथा लावियेलें ॥ ४ ॥

॥ २०३७ ॥ काळ जवळिच उभा नेणां । घाली झांपडी खुंटी कानां ॥ ध्रु० ॥ कैसा हुशार सावध राहीं । आपुला तूं अपुलेठायीं ॥ १ ॥ काळ जवळिच उभा पाहीं । नेदि कोणासि देऊं कांहीं ॥ २ ॥ काळें पुरविली पाठी । वरुषें जालीं तरी साठी ॥ ३ ॥ काळ भोंवताला भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ॥ ४ ॥ तुका ह्मणे काळा । कर्म मिळतें तें जाळा ॥ ५ ॥

॥ २०३८ ॥ दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्यलाभ पुण्य त्याचें ॥ ध्रु० ॥ धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकांवारी ॥ १ ॥ मळ खाये संवदणी । करी आणिकांची उजळणी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचा । प्रीति आदर करा साचा ॥ ३ ॥

॥ २०३९ ॥ साहोनियां टांकिघाये । पाषाण देवचि जाला पाहे ॥ धृ० ॥ तया रीति दृढ मन । करीं साधाया कारण ॥ १ ॥ बाण शस्त्र साहे गोळी । शूरां ठाव उंच स्थळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सती । अग्नि न देखे ज्या रीती ॥ ३ ॥

॥ २०४० ॥ तेणें वेशें माझी चोरिली अंगें । मानावया जग आत्मपणें । नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें । भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एकचिपणें । विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं । भागलीं तुटित तेणें ॥ १ ॥ आतां त्यांसी काय चाले माझें बळ । जालोंसें दुर्बळ सत्वहीन । दग्ध पट दिसे संगीत बरवंट । काय त्याचें कारण ॥ धृ० ॥ आळसें दृष्टि न पाहे आपुलें । एकचि देखिलें सर्वरूप । मानामान तेथें खुंटोनि राहिलें । पिशुन तो कोण बाप । ज्योति ना अंधार अवघा एकंकार । तेथें काय पुण्यपाप । विठ्ठलावांचुनी कांहींच नावडे । वेगळाल्या भावें रूप ॥ २ ॥ बळबडि-वार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया । सुखदुःखाची वार्ता नाइके । अंतरलों दुरी तया । मीतूंपणनिष्काम होउनी । राहिलों आपुलिया ठायां । तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका ह्मणे देवराया ॥ ३ ॥

॥ २०४१ ॥ कथा पुराण ऐकतां । झोपें नाथिलें तत्त्वता । खाटेवरि पडतां । व्यापी चिंता तळमळ ॥ धृ० ॥ ऐसी गहन कर्मगती । काय तयासी रडती । जाले जाणते जो चित्तीं । कांहीं नेघे आपुला ॥ १ ॥ उदक लावितां न धरे । चिंता करी केव्हां सरे । जाऊं नका धीरें । ह्मणे करितां ढवाळ्या ॥ २ ॥ जवळी गोंचिड क्षीरा । जैसी कमळणी दर्दुरा । तुका ह्मणे दुरा । देशत्यागें तयासी ॥ ३ ॥

॥ २०४२ ॥ संदेह बाधक आपआपणयांतें । रज्जुसर्पवत भासतसे । भेऊनियां काय देखिलें येणें । मारें घायेंविण लोळतसे ॥ धृ० ॥ आपणचि तारी आपणाचि मारी । आपण उद्धरी । आपणयां शुकनळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥ १ ॥ पापपुण्य कैसे भांजिले अंक । दशकाचा एक उरविला । जाणोनियां काय होतोसी नेणता । शून्या ठाव रिता नाहीं नाहीं ॥ २ ॥ दुरा दृष्टि पाहें न्याहाळुनी । मृगजला पाणी न ह्मणे चाडा । धांवतांचि फुटे नव्हे समाधान । तुका ह्मणे जाण पावे पीडा ॥ ३ ॥

॥ २०४३ ॥ कथे उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥ धृ० ॥ येथें तो पातकी न येतांच भला । रणीं कुचराला काय चाले ॥ १ ॥ कथे बैसोनी आणिक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साच मध्यभागीं ॥ ३ ॥

॥ २०४४ ॥ नावडे ज्या कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे वोजा ॥ धृ० ॥ तो असे जवळी गोंचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाय तया दुरी ॥ १ ॥ नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ २ ॥ तुका ह्मणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ३ ॥

॥ २०४५ ॥ जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें भेत ॥ धृ० ॥ कैसा पाहे चर्मदृष्टी ।

॥ २०३९ ॥ साहोनियां टांकिघाये । पाषाण देवचि जाला पाहे ॥ धृ० ॥ तया रीति दृढ मन । करीं साधाया कारण ॥ १ ॥ बाण शस्त्र साहे गोळी । शूरां ठाव उंच स्थळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सती । अग्न न देखे ज्या रीती ॥ ३ ॥

॥ २०४० ॥ तेणें वेशें माझी चोरिलीं अंगें । मानावया जग आत्मपणें । नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें । भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एकचिपणें । विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं । भागलीं तुटित तेणें ॥ १ ॥ आतां त्यांसी काय चाले माझें बळ । जालोंसें दुर्बळ सत्त्वहीन । दग्ध पट दिसे संगीत बरवंट । काय त्याचें कारण ॥ धृ० ॥ आळसें दृष्टि न पाहे आपुलें । एकचि देखिलें सर्वरूप । मानामान तेथें खुंटोनि राहिलें । पिशुन तो कोण बाप । ज्योति ना अंधार अवघा एकंकार । तेथें काय पुण्यपाप । विठ्ठलावांचुनी कांहींच नावडे । वेगळाल्या भावें रूप ॥ २ ॥ बळबडिवार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया । सुखदुःखाची वार्ता नाइके । अंतरलों दुरी तया । मीतूंपणनिष्काम होउनी । राहिलों आपुलिया ठायां । तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका ह्मणे देवराया ॥ ३ ॥

॥ २०४१ ॥ कथा पुराण ऐकतां । झोपें नाथिलें तत्त्वता । खाटेवरि पडतां । व्यापी चिंता तळमळ ॥ धृ० ॥ ऐसी गहन कर्मगती । काय तयासी रडती । जाले जाणते जो चित्तीं । कांहीं नेघे आपुला ॥ १ ॥ उदक लावितां न धरे । चिंता करी केव्हां सरे । जाऊं नका धीरें । ह्मणे करितां ढवाळ्या ॥ २ ॥ जवळी गोंचिड क्षीरा । जैसी कमळणी दर्दुरा । तुका ह्मणे दुरा । देशत्यागें तयासी ॥ ३ ॥

॥ २०४२ ॥ संदेह बाधक आपआपणयांतें । रज्जुसर्पवत भासतसे । भेऊनियां काय देखिलें येणें । मारें घायेंविण लोळतसे ॥ धृ० ॥ आपणचि तारी आपणचि मारी । आपण उद्धरी । आपणयां शुकनळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥ १ ॥ पापपुण्य कैसे भाजिले अंक । दशकाचा एक उरविला । जाणोनियां काय होतोसी नेणता । शून्या ठाव रिता नाहीं नाहीं ॥ २ ॥ दुरा दृष्टि पाहें न्याहाळुनी । मृगजळा पाणी न ह्मणे चाडा । धांवतांचि फुटे नव्हे समाधान । तुका ह्मणे जाण पावे पीडा ॥ ३ ॥

॥ २०४३ ॥ कथे उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥ धृ० ॥ येथें तो पातकी न येतांच भला । रणीं कुचराला काय चाले ॥ १ ॥ कथे बैसोनी आणिक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साच मध्यभागीं ॥ ३ ॥

॥ २०४४ ॥ नावडे ज्या कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे वोजा ॥ धृ० ॥ तो असे जवळी गोंचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाय तया दुरी ॥ १ ॥ नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ २ ॥ तुका ह्मणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ३ ॥

॥ २०४५ ॥ जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ॥ धृ० ॥ कैसा पाहे चर्मदृष्टी ।

स्नेहाच्या शेवटीं ॥ १ ॥ कां तेलेंसें श्वान । तैसें दिशा हिंडे मन ॥ २ ॥ त्याचे कानीं । कोण बोंब तुका ह्मणे ॥ ३ ॥

२०४६ ॥ दुर्बळा वाणीच्या एक दोनि सिद्धी । सदैवा समाधि विश्वरूपीं ॥ धृ० ॥ त्याचें वांयां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ ॥ १ ॥ तीर्थ देव दुरी तया हीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे एक वाहाती मोळिया । आगळिया घरा येती ॥ ३ ॥

२०४७ ॥ परिमळें काष्ठ ताजवां तुळविलें । आणिक नांवांचीं थोडीं । एक तीं वें उभविलीं ढवळारें । एकाचिया कुड मेडी । एक दीनरूप आणितीं मोळिया । ते बांधोनि माडी । अवघियां बाजार एकचि जाला । मांविकलीं आपुल्या पाडीं ॥ गुण तो सार रूपमध्यकार । अवगुण तो फार पीडीतसे ॥ धृ० ॥ एक गुणें ळे असती । अमोल्य नांवाचे खडे । एक समर्थ दुर्बळा घरीं । फार मोलाचे थोडे । झगझग करिती वाळवंटीं । कोणी न पाहाती तयांकडे । सभाग्य संपन्न आपुलाले । मायेक दैन्य बापुडें ॥ २ ॥ एक नामें रूपें सारिख्या असती । अनेक प्रकार याती । चिया संचितें जैसें आलें पुढें । तयाची तैसीच गती । एक उंचपदीं बैसोनि सुखें । करवी एका हातीं । तुका ह्मणे कां मानिती सुख । चुकलिया वांया खंती ॥ ३ ॥

२०४८ ॥ नाहीं आह्मां शत्रु सासुरें पिशुन । दाटलें हें घन माहियेर ॥ धृ० ॥ पाहें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ॥ १ ॥ लज्जा भय कांहीं आह्मां चिंता । सर्वसुखें पायीं वोळगती ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी सदैवाचीं बाळें । जालों लडिसकळांचीं ॥ ३ ॥

२०४९ ॥ गर्भीं असतां बाळा । कोण पाळी त्याचा लळा ॥ धृ० ॥ कैसा लाघवी थारी । कृपाळूवा माझा हरी ॥ १ ॥ सर्प पिलीं वितांचि खाय । वांचलिया कोण माय ॥ गगनीं लागला कोसेरा । कोण पुरवी तेथें चारा ॥ ३ ॥ पोटीं पाषाणांचे जीव । जीव त्याचा भाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे निश्चळ राहें । होईल तें सहज पाहें ॥ ५ ॥

२०५० ॥ न ह्मणे कवणा सिद्ध साधक गव्हार । अवघा विश्वंभर वांचूनियां ० ॥ ऐसें माझे बुद्धि काया वाचा मन । लावीं तुझें ध्यान पांडुरंगा ॥ १ ॥ गातां ण शंका माझ्या मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ॥ २ ॥ देईं चरणसेवा भूतांचें । वर्णा अभिमान सांडवुनी ॥ ३ ॥ आशापाश माझी तोडीं माया चिंता । तुजव्यथा नको कांहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे सर्व भाव तुझे पायीं । राहे ऐसें देईं प्रेम ॥ ५ ॥

२०५१ ॥ अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ धृ० ॥ काय उरलें तया पण । ल तें नाम गुण ॥ १ ॥ लोह लागे परिसा अंगीं । तोही भूषण जाला जगीं ॥ २ ॥ ता ओहळा ओघा । गंगे मिळोनि जाल्या गंगा ॥ ३ ॥ चंदनाच्या वासें । तरु चंदन स्पर्शे ॥ ४ ॥ तुका जडला संतां पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ५ ॥

२०५२ ॥ ऐशा भाग्यें जालों । तरी धन्य जन्मा आलों ॥ धृ० ॥ रुळे तळीले

पायरी । संत पाय देती वरी ॥ १ ॥ प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें । तया हरतील दुःखें ॥ ३ ॥

॥ २०५३ ॥ करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ धृ० ॥ माथां पडती संत-पाय । सुख कैवल्य तें काय ॥ १ ॥ ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारितां कांहीं ॥ २॥ तुका ह्मणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥ ३ ॥

॥ २०५४ ॥ वेद जया गाती । आह्मां तयाची संगतीं ॥ धृ० ॥ नाम धरियेलें कंठीं । अवघा सांठविला पोटीं ॥ १ ॥ ओंकाराचें बीज । हातीं आमुचे तें निज ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु मोठें । अणुरेणियां धाकुटें ॥ ३ ॥

॥ २०५५ ॥ तूं श्रीयेचा पती । माझी बहु हीन याती ॥ धृ० ॥ दोघे असों एके ठायीं । माझा माथा तुझे पायीं ॥ १ ॥ माझ्या दीनपणा पार । नाहीं बहु तूं उदार ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । मी ओहोळ तूं गंगा ॥ ३ ॥

॥ २०५६ ॥ मी याचक तूं दाता । काय सत्य पाहों आतां ॥ धृ० ॥ म्यां तों पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥ १ ॥ आह्मी घ्यावें नाम । तुह्मां समाधान काम ॥ २॥ तुका ह्मणे देवराजा । वाद खंडी तुझा माझा ॥ ३ ॥

॥ २०५७ ॥ तुझे पोटीं वाव । व्हावा ऐसा माझा भाव ॥ धृ० ॥ करीं वासनेसारिखें । प्राण फुटे येणें दुःखें ॥ १ ॥ अहंकार खोटे । वाटे श्वापदांचे थाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे आई । हातीं धरूनि संग देई ॥ ३ ॥

॥ २०५८ ॥ दारीं परोवरी । कुडीं कवाडीं मी घरीं ॥ धृ० ॥ तुमच्या लागलों पोषणा । अवघे ठायीं नारायणा ॥ १ ॥ नेदीं खाऊं जेवूं । हातींतोंडींचेंही घेऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं । जडलों ठायींचा सलगी ॥ ३ ॥

॥ २०५९ ॥ मज कोणी कांहीं करी । उमटे तुमचे अंतरीं ॥ धृ० ॥ व्याला वाढविलें ह्मणून । मज सुख तुज सीण ॥ १ ॥ माझें पोट धालें । तुझें अंगीं उमटलें ॥ २ ॥ तुका ह्मणे खेळें । तेथें तुमचिया बळें ॥ ३ ॥

॥ २०६० ॥ जोडोनियां कर । उभा राहिलों समोर ॥ धृ० ॥ हेंचि माझें भांडवल । जाणें कारण विठ्ठल ॥ १ ॥ भाकितों करुणा । आतां नुपेक्षावें दीना ॥ २ ॥ तुका ह्मणे डोई । ठेवीं वेळोवेळां पायीं ॥ ३ ॥

॥ २०६१ ॥ आह्मी घ्यावें तुझें नाम । तुह्मी आह्मां द्यावें प्रेम ॥ धृ० ॥ ऐसें निवडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥ १ ॥ माझी डोई पायांवरी । तुह्मी न धरावी दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥ ३ ॥

॥ २०६२ ॥ वारिलें लिगाड । बहु दिसांचें हें जाड ॥ धृ० ॥ न बोलावें ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुलें ॥ १ ॥ जाला चौघांचार । गेला खंडोनि वेव्हार ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । करीन ते घ्यावी सेवा ॥ ३ ॥

॥ २०६३ ॥ पायरवे अन्न । मग करी क्षीणक्षीण ॥ धृ० ॥ ऐसे होतीं घातपात । लाभे-

विण संगें थीत ॥ १ ॥ जन्माची जोडी । वाताहात एके घडी ॥ २ ॥ तुका ह्मणे शंका । हित आड या लौकिका ॥ ३ ॥

॥ २०६४ ॥ आह्मां वैष्णवांचा । नेम काया मनें वाचा ॥ धृ० ॥ धीर धरूं जीवासाठीं । येऊं नेदूं लाभा तुटी ॥ १ ॥ उचित समय । लाज निवारावें भय ॥ २ ॥ तुका ह्मणे कळा । जाणों नेम नाहीं बाळा ॥ ३ ॥

॥ २०६५ ॥ उलंघिली लाज । तेणें साधियेलें काज ॥ धृ० ॥ सुखें नाचे पैलतीरीं । गेलों भवाचे सागरीं ॥ १ ॥ नामाची सांगडी । सुखें बांधली आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे लोकां । उरली वाचा मारीं हाका ॥ ३ ॥

॥ २०६६ ॥ बैसलोंसें दारीं । धरणें कोंडोनि भिकारी ॥ धृ० ॥ आतां कोठें हालों नेदी । बरी सांपडली संदी ॥ १ ॥ किती वेरझारा । मागें घातलिया घरा ॥ २ ॥ माझें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥ ३ ॥ भांडावें तें किती । बहु सोसिली फजिती ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं । लाज तुझे अंगीं कांहीं ॥ ५ ॥

॥ २०६७ ॥ जालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥ धृ० ॥ नाहीं लागों दिलें अंगा । आड ठाकलों मी जगा ॥ १ ॥ करूनियां नीती । दिल्याप्रमाणें चालती ॥ २ ॥ हातीं दंड काठी । उभा जिवाचिये साटीं ॥ ३ ॥ बळ बुद्धि युक्ती । तुज दिल्या सर्व शक्ती ॥ ४ ॥ तुका ह्मणे खरा । आतां घेईन मुशारा ॥ ५ ॥

॥ २०६८ ॥ फळाची तों पोटीं । घडे वियोगें ही भेटी ॥ धृ० ॥ करावें चिंतन । सार तेंचि आठवण ॥ १ ॥ चित्त चिंता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । पावे अंतरींची सेवा ॥ ३ ॥

॥ २०६९ ॥ दुर्बळाचें कोण । ऐके घालूनियां मन । राहिलें कारण । तयावांचूनि काय तें ॥ धृ० ॥ कळों आलें अनुभवें । पांडुरंगा माझ्या जीवें । न संगतां ठावें । पडे चर्या देखोनी ॥ १ ॥ काम क्रोध माझ्या देहीं । भेदाभेद गेले नाहीं । होतें तेथें कांहीं । तुज कृपा करितां ॥ २ ॥ हें तों नव्हे उचित । उपेक्षावें शरणागत । तुका ह्मणे रीत । तुमची आह्मां न कळे ॥ ३ ॥

॥ २०७० ॥ आह्मी भाव जाणों देवा । न कळती तुह्मिया मावा । गणिकेच्या कुढावा । पतना न्यावा दशरथ ॥ धृ० ॥ तरी ग्यां काय गा करावें । कोण्या रीति तुज पावें । न संगतां ठावें । तुह्मांविण न पडे ॥ १ ॥ दोनी फाकलिया वाटा । गोवी केली घटापटा । नव्हे धीर फांटा । आड रानें भरती ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे डोळे । तुझे देखती चाळे । आतां येणें वेळे । चरण जीवें न सोडीं ॥ ३ ॥

॥ २०७१ ॥ वेरझारीं जाला सीण । बहु केलें खेदक्षीण । भांडणासी दिन । आजी येथें फावला ॥ धृ० ॥ आतां काय भीड भार । धरूनियां लोकाचार । बुडवूनि वेव्हार । सरोबरी करावी ॥ १ ॥ आलें बहुतांच्या मना । कां रे न होसी शाहाणा । मुळींच्या वचना । आह्मी जागों आपुल्या ॥ २ ॥ तुका ह्मणे चौघांमधीं । तुज नेलें होतें आधीं । आतां नाहीं मधीं । उरी कांहीं राहिली ॥ ३ ॥

॥ २०७२ ॥ कल्पतरूखालीं । फळें येती मागितलीं ॥ धृ० ॥ तेथें बैसल्याचा भाव । विचारूनि बोलें ठाव ॥ १ ॥ द्यावें तें उत्तर । येतो प्रतित्याचा फेर ॥ २ ॥ तुका ह्मणे मनीं । आपुल्याच लाभहानी ॥ ३ ॥

॥ २०७३ ॥ रंगलें या रंगें पालट न धरी । खेवलें अंतरीं पालटेना ॥ धृ० ॥ सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें कैसे शोभा देती ॥ १ ॥ पवित्र जालें तें न लिंपे विटाळा । नेदी बैसों मळा आडवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें काळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ॥ ३ ॥

॥ २०७४ ॥ जगा काळ खाय । आह्मी माथां दिले पाय ॥ धृ० ॥ नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंग करी साहे ॥ १ ॥ हरिच्या गुणें धाला । होता खातचि भुकेला ॥ २ ॥ तुका ह्मणे हळू । जाला कढत शीतळू ॥ ३ ॥

॥ २०७५ ॥ ब्रह्मरस घेई काढा । जेणें पीडा वारेल ॥ धृ० ॥ पथ्य नाम विठोबाचें । आणिक वाचे न सेवीं ॥ १ ॥ भवरोगाऐसें जाय । आणिक काय क्षुल्लकें ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे बाधा । आणिक कदा भूतांची ॥ ३ ॥

॥ २०७६ ॥ अंगें अनुभव जाला मज । संतरजचरणांचा ॥ धृ० ॥ सुखी जालों या सेवनें । दुःख नेणें यावरी ॥ १ ॥ निर्माल्याचें तुळसीदळ । विष्णुजवळ चरणींचें ॥ २ ॥ तुका ह्मणे भावसार । करूनि फार मिश्रित ॥ ३ ॥

॥ २०७७ ॥ वैद्य एक पंढरिराव । अंतर्भाव तो जाणें ॥ धृ० ॥ रोगाऐशा द्याव्या वल्ली । जाणें जाली बाधा ते ॥ १ ॥ नेदी रुका वेचों मोल । पाहे बोल प्रीतीचे ॥ २ ॥ तुका ह्मणे दयावंता । सदा चिंता दीनांची ॥ ३ ॥

॥ २०७८ ॥ करितां कोणाचेंही काज । नाहीं लाज देवासी ॥ धृ० ॥ बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधू ॥ १ ॥ करूनि आराणुक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥ २ ॥ बोलें तैसी करणी करी । तुका ह्मणे एक हरी ॥ ३ ॥

॥ २०७९ ॥ उभें चंद्रभागे तीरीं । कट धरोनियां करीं । पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥ धृ० ॥ त्याचा छंद माझ्या जीवा । काया वाचा मनें हेवा । संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥ १ ॥ रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे । मस्तक नावडे । उठों पायांवरोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । ज्याचें नासी क्रोध काम । हरि भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥ ३ ॥

॥ २०८० ॥ आह्मां हेंचि भांडवल । ह्मणों विठ्ठल विठ्ठल ॥ धृ० ॥ सुखें तरों भवनदी । संगें वैष्णवांची मांदी ॥ १ ॥ बाखराचें वाण । सांडूं हें जेवूं जेवण ॥ २ ॥ न लगे वारंवार । तुका ह्मणे वेरझार ॥ ३ ॥

॥ २०८१ ॥ आतां माझ्या भावा । अंतराय नको देवा ॥ धृ० ॥ आलें भागा तें करितों । तुझें नाम उच्चारितों ॥ १ ॥ दृढ माझें मन । येथें राखावें बांधोन ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे । नको फुटों देऊं फांटे ॥ ३ ॥

॥ २०८२ ॥ काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें ॥ धृ० ॥ करी अक्षरांची

ावडीचे साटीं ॥ १ ॥ निंदी कोणां स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥ २ ॥
। जळो जळो त्याचें तोंड ॥ ३ ॥

मागणें तें मागों देवा । करूं भक्ति त्याची सेवा ॥ धृ० ॥ काय उणें
द्धिसिद्धि ज्याच्या दासी ॥१॥ कायावाचामन । करूं देवा हें अर्पण ॥ २ ॥
भर । ज्याच्यानें हे चराचर ॥ ३ ॥

चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥ धृ० ॥ असे भक्तांचिये
सांगतां करी ॥ १ ॥ अनाथाचा बंधू । असे अंगीं हा संबंधू ॥ २ ॥
। देवा सत्ता राबवावें ॥ ३ ॥

कर्कशसंगती । दुःख उदंड फजिती ॥ धृ० ॥ नाहीं इह ना परलोक ॥
रंक ॥ १ ॥ वचन सेंटावरी । त्याचें ठेवूनि धिक्कारी ॥ २ ॥ तुका ह्मणे
डेली कपाळीं कुऱ्हाडी ॥ ३ ॥

बीज पेरे सेतीं । मग गाडेवरी वाहाती ॥ धृ० ॥ वांयां गेलें ऐसें दिसे ॥
गीं वसे ॥ १ ॥ पाल्याची जतन । तरि प्रांतीं येती कण ॥ २ ॥ तुका
दक देतां लाभे फळा ॥ ३ ॥

जाणावें तें सार । नाहीं तरी दगा फार ॥ धृ० ॥ डोळे झांकिलिया रवी ॥
जेवीं ॥ १ ॥ बहुथोड्या आड । निवारितां लाभें जाड ॥ २ ॥ तुका ह्मणे
चें अंधारें ॥ ३ ॥

मुळीं नेणपण । जाला तरी अभिमान ॥ धृ० ॥ वांयां जावें हेंचि खरें ॥
कारें ॥ १ ॥ आराणुक नाहीं कधीं । जाली तरि भेदबुद्धी ॥ २ ॥ अंतरलीं
णे नाहीं ठाव ॥ ३ ॥

संवसारसांते आले हो आइका । तुटीचें तें नका केणें भरूं ॥ धृ० ॥
ाळ अवघे विचारा । पारखी ते करा साह्य येथें ॥ १ ॥ शृंगारिलें दिसे न
ोविला पदर उगवेना ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटें गुंपतां विसारें । हातींचिया
॥ ३ ॥

सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ॥ धृ० ॥ पुढें
टले माग । भांबावलें जग आडरानें ॥ १ ॥ वेचल्याचा पाहे बरावरि
ा निधडा पुढिलीया ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी दाखवावी वाणी । ते घ्यावी
ों ॥ ३ ॥

बुद्धिमंदा शिरीं । भार फजिती पदरीं ॥ धृ० ॥ जाय तेथें अपमान ॥
ी जन ॥ १ ॥ खरियाचा पाड । मागें लावावें लिगाड ॥ २ ॥ तुका ह्मणे
ं भरोवरी ॥ ३ ॥

पूर्वजांसी नर्का । जाणें तें एक आइका ॥ धृ० ॥ निंदा करावी चाहाडी ।
ावडी ॥ १ ॥ मात्रागमना ऐसी । जोडी पातकांची रासी ॥ २ ॥ तुका
भपाकाची ते नीट ॥ ३ ॥

॥ २०९३ ॥ देहा लावी वात । पालव घाली जाली रात ॥ धृ० ॥ वेडी ते वेडी बहुसच वेडी । चाखतां गोडी चवी नेणें ॥ १ ॥ कडिये मूल भोंवतें भोंये । मोकलूनि रडे धाये ॥ २ ॥ लेंकरें वित्त पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥ ३ ॥ आपुली शुद्धि जया नाहीं । आणिकांची ते जाणें काई ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें जन । नर्का जातां राखे कोण ॥ ५ ॥

॥ २०९४ ॥ आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥ धृ० ॥ जें जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥ १ ॥ ठायीं पडिलिया तेंचि लागे खावें । ठायींचें विचारुनी ॥ २ ॥ बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस केळ कैंचें लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा कांहीं बोल नाहीं । तुह्मा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥ ४ ॥

॥ २०९५ ॥ अडचणीचें द्वार । बाहिर माजी पैस फार ॥ धृ० ॥ काय करावें तें मौन्य । दाही दिशा हिंडे मन ॥ १ ॥ बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥ २ ॥ नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥ ३ ॥ सारविलें निकें । वरि माजी अवघें फिकें ॥ ४ ॥ तुका ह्मणे अंतीं । कांहीं न लगेचि हातीं ॥ ५ ॥

॥ २०९६ ॥ लय लक्षूनियां जालों ह्मणती देव । तोंही नव्हे भाव सत्य जाणा ॥ धृ० ॥ जालों बहुश्रुत न लगे आतां कांहीं । नको राहूं तेंही निश्चितीनें ॥ १ ॥ तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥ २ ॥ कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी होईल निष्काम । तरिच होय राम देखे डोळां ॥ ४ ॥

॥ २०९७ ॥ पुरली धांव कडिये घेईं । पुढें पायीं न चलवीं ॥ धृ० ॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगें जिवलगे ॥ १ ॥ अवघी निवारावी भुक । अवघ्या दुःख जन्माचें ॥ २ ॥ तुका ह्मणे बोलवेना । लावीं स्तनां ईश्वरे ॥ ३ ॥

॥ २०९८ ॥ जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥ धृ० ॥ आतां तूंचि बाह्यात्कारीं । अवघ्यापरी जालासी ॥ १ ॥ नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वसांगे । पांडुरंगे दयाळे ॥ ३ ॥

॥ २०९९ ॥ जेथें माझी दृष्टि जाय । तेथें पाय भावीन ॥ धृ० ॥ असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥ १ ॥ अवघाच अवघे देसी । सुखरासी संपन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥ ३ ॥

॥ २१०० ॥ नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ॥ धृ० ॥ भला भला पुंडलिका । मानलासी जनलोकां ॥ १ ॥ कोण्या काळें सुखा । ऐसा कोण पावता ॥ २ ॥ आवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालें । भूमि वैकुंठ आणिलें ॥ ४ ॥

॥ २१०१ ॥ अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ॥ धृ० ॥ जीव देऊनियां बळी । अवघीं तारिलीं दुर्बळीं । केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥ १ ॥ कांहीं

॥ २०९३ ॥ देहा लावी वात । पालव घाली जाली रात ॥ धृ० ॥ वेडी ते वेडी बहुतच वेडी । चाखतां गोडी चवी नेणें ॥ १ ॥ कडिये मूल भोंवतें भोंये । मोकलूनि रडे धाये ॥ २ ॥ लेंकरें वित्त पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥ ३ ॥ आपुली शुद्धि जया नाहीं । आणिकांची ते जाणें काई ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें जन । नर्का जातां राखे कोण ॥ ५ ॥

॥ २०९४ ॥ आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥ धृ० ॥ जें जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥ १ ॥ ठायीं पडिलिया तेंचि लागे खावें । ठायींचें विचारुनी ॥ २ ॥ बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस केळ केंचें लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा कांहीं बोल नाहीं । तुझा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥ ४ ॥

॥ २०९५ ॥ अडचणीचें दार । बाहेर माजी पैस फार ॥ धृ० ॥ काय करावें तें मौन्य । दाही दिशा हिंडे मन ॥ १ ॥ बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥ २ ॥ नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥ ३ ॥ सारविलें निकें । वरि माजी अवघें फिकें ॥ ४ ॥ तुका ह्मणे अंतीं । कांहीं न लगेचि हातीं ॥ ५ ॥

॥ २०९६ ॥ लय लक्षूनियां जालों ह्मणती देव । तोंही नव्हे भाव सत्य जाणा ॥ धृ० ॥ जालों बहुश्रुत न लगे आतां कांहीं । नको राहूं तेंही निश्चितीनें ॥ १ ॥ तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥ २ ॥ कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी होईल निष्काम । तरिच होय राम देखे डोळां ॥ ४ ॥

॥ २०९७ ॥ पुरली धांव कडिये घेई । पुढें पायीं न चलवीं ॥ धृ० ॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगें जिवलगे ॥ १ ॥ अवघी निवारावी भुक । अवघ्या दुःख जन्माचें ॥ २ ॥ तुका ह्मणे बोलवेना । लावी स्तनां ईश्वरे ॥ ३ ॥

॥ २०९८ ॥ जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥ धृ० ॥ आतां तूंचि बाह्यात्कारीं । अवघ्यापरी जालासी ॥ १ ॥ नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वसांगे । पांडुरंगे दयाळे ॥ ३ ॥

॥ २०९९ ॥ जेथें माझी दृष्टि जाय । तेथें पाय भावीन ॥ धृ० ॥ असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥ १ ॥ अवघाच अवघे देसी । सुखरासी संपन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥ ३ ॥

॥ २१०० ॥ नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ॥ धृ० ॥ भला भला पुंडलिका । मानलासी जनलोकां ॥ १ ॥ कोण्या काळें सुखा । ऐसा कोण पावता ॥ २ ॥ आवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालें । भूमि वैकुंठ आणिलें ॥ ४ ॥

॥ २१०१ ॥ अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ॥ धृ० ॥ जीव देऊनियां बळी । अवघीं तारिलीं दुर्बळीं । केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥ १ ॥ कांहीं

न मगे याची गती । लुटवितो जगा हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तराजा । कोण वर्णी पार तुझा ॥ ३ ॥

॥ २१०२ ॥ प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्तांचा अंकिला ॥ धृ० ॥ न पुसतां जातां नये । खालीं बैसतांही भिये ॥ १ ॥ अवघा त्याचा होत । जीव भावाही सहित ॥ २ ॥ वदे उपचाराची वाणी । कांहीं माग ह्मणउनी ॥ ३ ॥ उदासीनाच्या लागें । तुका ह्मणे धांवे मागें ॥ ४ ॥

॥ २१०३ ॥ कांहीं न मागती देवा । त्यांची करूं धांवे सेवा ॥ धृ० ॥ हळूहळू फेडी ऋण । होऊनियां रूपें दीन ॥ १ ॥ होऊं न सके वेगळा । क्षण एक त्यां निराळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तिभाव । हाचि देवाचाही देव ॥ ३ ॥

॥ २१०४ ॥ जाणें अंतरिंचा भाव । तोचि करितो उपाव ॥ धृ० ॥ न लगे सांगावें मागावें । जीवें भावें अनुसरावें । अविनाश घ्यावें । फळ धीर धरोनी ॥ १ ॥ बाळा न मागतां भोजन । माता घाली पाचारुन ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी । एकीं लंघियेले गिरी ॥ ३ ॥

॥ २१०५ ॥ आह्मी नाचों तेणें सुखें । वाऊं टाळी गातों मुखें ॥ धृ० ॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी लळा ॥ १ ॥ आह्मां जाला हा निर्धार । मागें तारिले अपार ॥ २ ॥ तुका ह्मणे संतीं । वर्म दिलें आह्मां हातीं ॥ ३ ॥

॥ २१०६ ॥ जालों निर्भर मानसीं । ह्मणऊनि कळलासी ॥ धृ० ॥ तुझे ह्मणविती त्यांस । भय चिंता नाहीं आस ॥ १ ॥ चुकविसी पाश । गर्भवासयातना ॥ २ ॥ तुझें जाणोनियां वर्म । कंठीं धरियेलें नाम ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेणें सुखें । विसरलों जन्म-दुःख ॥ ४ ॥

॥ २१०७ ॥ नको दुष्टसंग । पडे भजनामधीं भंग ॥ धृ० ॥ काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ॥ १ ॥ तुज निषेधितां । मज न साहे सर्वथा ॥ २ ॥ एका माझ्या जीवें । वाद करूं कोणासवें ॥ ३ ॥ तुझे वर्णू गुण । कीं हे राखों दुष्टजन ॥ ४ ॥ काय करूं एका । मुखें सांग ह्मणे तुका ॥ ५ ॥

॥ २१०८ ॥ विठ्ठल माझी माय । आह्मां सुखा उणें काय ॥ धृ० ॥ घेतों अमृताची धनी । प्रेम वोसंडलें स्तनीं ॥ १ ॥ क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंत । ठेवीं आह्मांपाशीं चित्त ॥ ३ ॥

॥ २१०९ ॥ भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर जाले ॥ धृ० ॥ हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ १ ॥ महा दोष आला त्रास । जन्ममरणा केला नास ॥ २ ॥ सहस्रनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ ३ ॥ नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचुन ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धि या कामारी ॥ ५ ॥

॥ २११० ॥ पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥ धृ० ॥ काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥ १ ॥ स्वहित कारण माव-वेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ॥ २ ॥ थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कां

रे मरसी जातां ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां रे सकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ॥ ४ ॥

॥ २१११ ॥ कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ धृ० ॥ नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ १ ॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ॥ २ ॥ त्याची निंदा करी त्याची कुष्ठ वाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम ध्यावें ॥ ४ ॥

॥ २११२ ॥ टाळघोळ सुख नामाचा गजर । घोषें जयजयकार ब्रह्मानंदू ॥ धृ० ॥ गरुडटके दिंडी पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥ १ ॥ आनंदें वैष्णव जाती लोटांगणी । एक एकाहुनी भद्रजाती ॥ २ ॥ तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोपे वैकुंठासी जाता । रामकृष्ण कथा हेचि वाटे ॥ ४ ॥

॥ २११३ ॥ देखोवेखीं करिती गुरू । नाहीं ठाउका विचारू ॥ धृ० ॥ वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ॥ १ ॥ शिकों कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणा हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥ ३ ॥

॥ २११४ ॥ भाग्यवंत ह्मणो तयां । शरण गेले पंढरिराया ॥ धृ० ॥ तरले तरले हा भरंवसा । नामधारकांचा ठसा ॥ १ ॥ भुक्तिमुक्तीचें तें स्थळ । भोळेभाविका निर्मळ ॥ २ ॥ गाइलें पुराणीं । तुका ह्मणे वेदवाणी ॥ ३ ॥

॥ २११५ ॥ जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दुरी ॥ धृ० ॥ न लगे द्यावा परिहार । या कोरडें उत्तर । असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥ १ ॥ अवघें जाणें सूत्रधारी । कोण नाचे कोणें परी ॥ २ ॥ तुका ह्मणे बुद्धी । ज्याची तेच तया सिद्धी ॥ ३ ॥

॥ २११६ ॥ नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥ धृ० ॥ मुंगियांच्या मुखा गजाचा आहार । न साहावे भार जाय जीवें ॥ १ ॥ तुका ह्मणे आधीं करावा विचार । शूरपणें तीर मोकलावा ॥ २ ॥

॥ २११७ ॥ तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तये घरीं ॥ धृ० ॥ पंढरीचोहोटां घातला दुकान । मांडियेले वान आवडीचे ॥ १ ॥ आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ॥ २ ॥ मुक्ति कोणी तेथें हातीं नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतसज्जन भाग्याचे । अनंता जन्मींचे सांटेकरी ॥ ४ ॥

॥ २११८ ॥ दुःखाचिये सांटीं तेथें मिळे सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥ धृ० ॥ उदाचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥ १ ॥ जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आळिंगी आवडी करूनियां ॥ २ ॥ शीण घेऊनियां प्रेम देतो सांटी । न विचारी तुटी लाभा कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे असों अनाथ दुबळीं । आह्मांसी तो पाळी पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २११९ ॥ आणिक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥ धृ० ॥

रे मरसी जातां ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां रे सकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ॥ ४ ॥

॥ २१११ ॥ कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ धृ० ॥ नीचियें कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ १ ॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ॥ २ ॥ त्याची निंदा करी त्याची कुष्ठ वाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम ध्यावें ॥ ४ ॥

॥ २११२ ॥ टाळघोळ सुख नामाचा गजर । घोषें जयजयकार ब्रह्मानंदू ॥ धृ० ॥ गरुडटके दिंडी पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥ १ ॥ आनंदें वैष्णव जाती लोटांगणी । एक एकाहुनी भद्रजाती ॥ २ ॥ तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोपे वैकुंठासी जाता । रामकृष्ण कथा हेचि वाटो ॥ ४ ॥

॥ २११३ ॥ देखोवेखीं करिती गुरू । नाहीं ठाउका विचारू ॥ धृ० ॥ वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ॥ १ ॥ शिकों कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणा हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥ ३ ॥

॥ २११४ ॥ भाग्यवंत ह्मणों तयां । शरण गेले पंढरिराया ॥ धृ० ॥ तरले तरले हा भरंवसा । नामधारकांचा ठसा ॥ १ ॥ भुक्तिमुक्तीचें तें स्थळ । भोळेभाविका निर्मळ ॥ २ ॥ गाइलें पुराणीं । तुका ह्मणे वेदवाणी ॥ ३ ॥

॥ २११५ ॥ जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दुरी ॥ धृ० ॥ न लगे द्यावा परिहार । या कोरडें उत्तर । असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥ १ ॥ अवघें जाणें सूत्रधारी । कोण नाचे कोणें परी ॥ २ ॥ तुका ह्मणे बुद्धी । ज्याची तेच तया सिद्धी ॥ ३ ॥

॥ २११६ ॥ नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥ धृ० ॥ मुंगियांच्या मुखा गजाचा आहार । न साहावे भार जाय जीवें ॥ १ ॥ तुका ह्मणे आधीं करावा विचार । शूरपणें तीर मोकलावा ॥ २ ॥

॥ २११७ ॥ तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तये घरीं ॥ धृ० ॥ पंढरीचोहोटां घातला दुकान । मांडियेले वान आवडीचे ॥ १ ॥ आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ॥ २ ॥ मुक्ति कोणी तेथें हातीं नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतसज्जन भाग्याचें । अनंता जन्मींचे सांटेकरी ॥ ४ ॥

॥ २११८ ॥ दुःखाचिये साटीं तेथें मिळे सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥ धृ० ॥ उदाचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥ १ ॥ जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आळिंगी आवडी करूनियां ॥ २ ॥ शीण वेऊनियां प्रेम देतो साटीं । न विचारी तुटी लाभा कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे असों अनाथ दुबळीं । आह्मांसी तो पाळी पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २११९ ॥ आणिक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥ धृ० ॥

मुखा तेंचि गोड श्रवणां आवडी । चित्त माझें ओढी तुझे पायीं ॥ १ ॥ जये परी नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आइकतां ॥ २ ॥ आणिकांचें मज ह्मणवितां लाज । वाटे हें सहज न बोलावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज तूंच आवडसी । सर्वभावेंविशीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २१२० ॥ कळेल हें तैसें गाईन मी तुज । जनासवें काज काय माझें ॥ धृ० ॥ करीन मी स्तुति आपुले आवडी । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा ॥ १ ॥ होऊनि निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ॥ २ ॥ काय करूं कळा शुक्ति या कुसरी । जाणिवेच्या परि सकळिका ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २१२१ ॥ तयासी नेणतीं बहु आवडती । होय जयां चित्तीं एक भाव ॥ धृ० ॥ उपमन्यु धुरु हे काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥ १ ॥ कोळी भिल्ल पशु श्वापदें अपारें । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥ २ ॥ काय तीं गोपाळें चांगलीं शाहाणीं । तयां चक्रपाणी जेवी सवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोळा भाविक हा देव । आह्मी त्याचे पाव धरूनी ठेलों ॥ ४ ॥

॥ २१२२ ॥ न लगे पाहावें अबद्ध वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥ धृ० ॥ नाहीं वेळ नाहीं पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥ १ ॥ पुराणींही कोठें न मिळे पाहातां । तैशीं या अनंता ठेवूं नामें ॥ २ ॥ आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद कथाकाळीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी आनंदेंचि धालों । आनंदेंचि ल्यालों अळंकार ॥ ४ ॥

॥ २१२३ ॥ दैन्य दुःख आह्मां न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ॥ धृ० ॥ सर्व सुखें येती मानें लोटांगणीं । कोण यांसी आणी दृष्टीपुढें ॥ १ ॥ आमुची आवडी संतसमागम । आणिक त्या नाम विठोबाचें ॥ २ ॥ आमचें मागणें मागों त्याची सेवा । मोक्षाची निर्दैवा कोणा चाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोटीं सांठविला देव । न्यून तो हा भाव कोण आह्मां ॥ ४ ॥

॥ २१२४ ॥ काळतोंडा सुना । भलतें चोरूनि करी जना ॥ धृ० ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळूनि वर्ते मन ॥ १ ॥ मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे थीत । नागवला नव्हे हित ॥ ३ ॥

॥ २१२५ ॥ विठ्ठल मुक्तिदाता । नव्हे मरो हें बोलता ॥ धृ० ॥ मज न साहावें कानीं । विष उत्तर लागे मनीं ॥ १ ॥ हरिकथेतें धिक्कारी । शत्रु माझा तो वैरी ॥ २ ॥ सुनकाळतोंडा । जो या देवा ह्मणे धोंडा ॥ ३ ॥ अहं ह्मणे ब्रह्म । नेणें भक्तीचें तें वर्म ॥ ४ ॥ तुका ह्मणे क्षण । नको तयाचें दर्षण ॥ ५ ॥

॥ २१२६ ॥ यमपुरी त्याणीं वसविली जाणा । उच्छेद भजना विधि केला ॥ धृ० ॥ अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥ १ ॥ काय ते नेणते होते मागें ऋषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥ २ ॥ द्रव्य दारा कोणें स्थापियेलें धन ।

वृक्षा फळ आहे अमोलिक । हातां नये तैसा वांयांच तळमळी । भावेंविण भोळीं ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ २२९१ ॥ मेघवृष्टीनें करावा उपदेश परि गुरूनें न करावा शिष्य । वांटा लाभे त्यास केल्या अर्धकर्माचा ॥ धृ० ॥ द्रव्य वेचावें अन्नछत्रीं भूतीं द्यावें सर्वत्र । नेदावा हा पुत्र उत्तमयाती पोसणा ॥ १ ॥ बीज न पेरावें खडकीं ओल नाहीं ज्याचे बुडखीं । यीतां ठके सेखीं पाठी लागे दिवाण ॥ २ ॥ गुज बोलावें संतांशीं पत्नि राखावी जैसी सासी । लाड देतां तियेसी वांटा पावे कर्माचा ॥ ३ ॥ शुद्ध कसूनि पाहावें वरि रंगा न भुलावें । तुका ह्मणे घ्यावें जया नये तुटी तें ॥ ४ ॥

॥ २२९२ ॥ नावडावें जन नावडावा मान । करूनि प्रमाण तूंचि होईं ॥ धृ० ॥ सोडवूनि देहसंबंध व्यसनें । ऐसी नारायणें कृपा कीजे ॥ १ ॥ नावडावें रूप नावडावे रस । अवघी राहो आस पायांपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुलिया सत्ता । करूनि अनंता ठेवा ऐसें ॥ ३ ॥

॥ २२९३ ॥ उपाधिवेगळे तुह्मी निर्विकार । कांहींच संसार तुह्मां नाहीं ॥ धृ० ॥ ऐसें मज करुनी ठेवा नारायणा । समूळ वासना नुरवावी ॥ १ ॥ निसंग तुह्मांसी राहणें एकट । नाहीं कटकट साहों येत ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं मिळों येत शिळा । रंगासी सकळा स्फटिकाची ॥ ३ ॥

॥ २२९४ ॥ माहार माते चपणी भरे । न कळे खरें पुढील ॥ धृ० ॥ वोंगळ अधमाचें गुण । जातां घडी न लगेची ॥ १ ॥ श्वान झोळी स्वामिसत्ता । कोप येतां उतरे ॥ २ ॥ तुका ह्मणे गुमान कां । सांगों लोकां अधमासी ॥ ३ ॥

॥ २२९५ ॥ डोळयामध्यें जैसें कणू । अणु तेंहि न समाये ॥ धृ० ॥ तैसें शुद्ध करीं हित । नका चित्त बाटवूं ॥ १ ॥ आपल्याचा कळवळा । आणिका बाळावरि नये ॥ २ ॥ तुका ह्मणे बीज मुडा । जैशा चाडा पिकाच्या ॥ ३ ॥

॥ २२९६ ॥ मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ॥ धृ० ॥ वैष्णवांचा माल खरा । तुरतुरा वस्तुसी ॥ १ ॥ भस्म दंड न लगे काठी । तीर्थां आटी भ्रमण ॥ २ ॥ तुका ह्मणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ३ ॥

॥ २२९७ ॥ आगी लागो तया सुखा । जेणें हरि नये मुखा ॥ धृ० ॥ मज होत कां विपत्ती । पांडुरंग राहो चित्तीं ॥ १ ॥ जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कुळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ ३ ॥

॥ २२९८ ॥ आतां न ह्मणे मी माझें । नेघें भार कांहीं ओझें ॥ धृ० ॥ तूंचि तारिता मारिता । कळों आलासी निरुता ॥ १ ॥ अवघा तूंचि जनार्दन । संत बोलती वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । तुझ्या रिगालों वोसंगा ॥ ३ ॥

॥ २२९९ ॥ समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥ धृ० ॥ ह्मणऊनि कोणीं न करावा आळस । ह्मणा रात्रीदिवस रामराम ॥ १ ॥ सकळही शास्त्रें पठण करितां वेद । सरी नये गोविंदनामें एकें ॥ २ ॥ सकळही तीर्थें प्रयाग काशी ।

करितां नामाशीं तुळेति ना ॥ ३ ॥ कर्वतीं कमेरी देहासी दंडण । करितां समान नये नामा ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचें ॥ ५ ॥

॥ २३०० ॥ अवघ्या वाटा जाल्या क्षीण कळीं न घडे साधन । उचित विधि विधान न कळे न घडे सर्वथा ॥ धृ० ॥ भक्तिपंथ बहु सोपा पुण्य नागवया पापा । येणें जाणें खेपा येणेंचि एक खंडती ॥ १ ॥ उभारोनि बाहे विठो पालवीत आहे । दासां मीच्चि साहे मुखें बोले आपुल्या ॥ २ ॥ भाविक विश्वासी पार उतरिलें त्यांसी । तुका ह्मणे नासी कुतर्क्याचे कपाळीं ॥ ३ ॥

॥ २३०१ ॥ आह्मीं नामाचे धारक नेणों प्रकार आणिक । सर्व भावें एक विठ्ठलचि प्रमाण ॥ धृ० ॥ न लगे जाणावें नेणावें गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख घ्यावें वैष्णवांचे संगती ॥ १ ॥ भावबळें घालूं कास लज्जा चिंता दवडूं आस । पायीं निजध्यास ह्मणों दास विष्णूचे ॥ २ ॥ भय नाहीं जन्म घेतां मोक्षपदा हाणों लाता । तुका ह्मणे सत्ता धरूं निकट सेवेची ॥ ३ ॥

॥ २३०२ ॥ आह्मी हरिचे संवगडे जुने ठायींचे वेडे बागडे । हातीं धरुनी कडे पाठीसवें वागविलों ॥ धृ० ॥ ह्मणोनि भिन्न भेद नाहीं देवा आह्मां एकदेहीं । नाहीं जालों कहीं एका एक वेगळे ॥ १ ॥ निद्रा करितां होतों पायीं सवेंचि लंका घेतली तई । वानरें गोवळ गाई सवें चारित फिरतसों ॥ २ ॥ आह्मां नामाचें चिंतन रामकृष्ण नारायण । तुका ह्मणे क्षण खातां जेवितां न विसंभों ॥ ३ ॥

॥ २३०३ ॥ मागें बहुतां जन्मीं हेंचि करित आलों आह्मी । भवतापश्रमी दुःखें पीडिलीं निववूं त्यां ॥ धृ० ॥ गर्जो हरिचे पवाडे मिळों वैष्णव बागडे । पाश्नर रोकडे काढूं पाषाणामध्यें ॥ १ ॥ भाव शुद्ध नामावळी हर्षें नाचों पिटूं टाळी । घालूं पायां तळीं कळिकाळ त्याबळें ॥ २ ॥ कामक्रोध बंदखाणी तुका ह्मणे दिले दोन्ही । इंद्रियांचे धणी आह्मी जालों गोसावी ॥ ३ ॥

॥ २३०४ ॥ अमर तूं खरा । नव्हे कैसा मी दातारा ॥ धृ० ॥ चाल जाऊं संतांपुढें । वाद सांगेन निवाडें ॥ १ ॥ तुज नांव जर नाहीं । तर माझें दाव काई ॥ २ ॥ तुज रूप नाहीं । तर माझें दाव काई ॥ ३ ॥ खेळसी तूं लीळा । तेथें मी काय वेगळा ॥ ४ ॥ साच्च तूं लटिका । तैसा मीही ह्मणे तुका ॥ ५ ॥

॥ २३०५ ॥ मंत्र चळे पिसें लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें ॥ धृ० ॥ अशौच तो बाधी आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ॥ १ ॥ रागज्ञानघात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ॥ २ ॥ आणिकां भजना बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥ ४ ॥

॥ २३०६ ॥ नव्हती ते संत करितां कवित्व । संताचे ते आप्त नव्हती संत ॥ धृ० ॥ येथें नाहीं वेशसरतें आड नांवें । निवडे घावडाव व्हावा अंगीं ॥ १ ॥ नव्हती ते संत धरितां भोंपळा । करितां वाकळा प्रावरण ॥ २ ॥ नव्हती ते संत करितां कीर्तन ।

सांगतां पुराणें नव्हती संत ॥ ३ ॥ नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥ ४ ॥ नव्हती संत करितां तप तीर्थाटणें । सेविलिया वन नव्हती संत ॥ ५ ॥ नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्मउद्धूळणें नव्हती संत ॥ ६ ॥ तुका ह्मणे नाहीं निरसला देह । तों अवघे हे संसारिक ॥ ७ ॥

॥ २३०७ ॥ हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ धृ० ॥ गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥ १ ॥ न लगे मुक्ति आणि संपदा । संतसंग देईं सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे गर्भवासीं । सुखें घालावें आह्मासी ॥ ३ ॥

॥ २३०८ ॥ भाग्यवंता हे परवडी । करिती जोडी जन्माची ॥ धृ० ॥ आपुलाल्या काळें भावें । जें ज्या व्हावें तें आहे ॥ १ ॥ इच्छाभोजनाचा दाता । न लगे चिंता करावी ॥ २ ॥ तुका ह्मणे आल्या थाऱ्या । वस्तु बऱ्या मोलाच्या ॥ ३ ॥

॥ २३०९ ॥ वंचूनियां पिंड । भाता दान करी लंड ॥ धृ० ॥ जैसी याची चाली वरी । तैसा अंतरला दुरी ॥ १ ॥ मेला राखे दिस । ज्यालेपण जालें वोस ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । लोभें न पुरेचि सेवा ॥ ३ ॥

॥ २३१० ॥ अधीरा माझ्या मना ऐकें एकी मात । तूं कां रे दुश्चित निरंतर ॥ धृ० ॥ हेचि चिंता काय खावें ह्मणऊनी । भले तुजहूनि पक्षिराज ॥ १ ॥ पाहा तें चातक नेघे भूमिजळा । वरुषे उन्हाळा मेघ तया ॥ २ ॥ सकळयातींमध्यें ठक हा सोनार । त्याघरीं व्यापार झारियाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळीं वनीं जीव एक । तयापाशीं लेख काय असे ॥ ४ ॥

॥ २३११ ॥ कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ॥ धृ० ॥ बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपति सवें दोन्ही ॥ १ ॥ फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥ २ ॥ तेणें तुझी काय केली चिंता । राहे त्या अनंता आठवुनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ४ ॥

॥ २३१२ ॥ उदार कृपाळा पतितपावना । ब्रीदें नारायणा साच तुझीं ॥ धृ० ॥ वर्णिलासी जैसा जाणतां नेणतां । तैसा तूं अनंता साच होसी ॥ १ ॥ देख्यां काळ भक्तां मेघश्याममूर्ती । चतुर्भुज हातीं शंख चक्र ॥ २ ॥ काम इच्छा तयां तैसा होसी राणी । यशोदेच्या स्तनीं पान करी ॥ ३ ॥ होऊनि सकळ कांहींच न होसी । तुका ह्मणे यासी वेद ग्वाही ॥ ४ ॥

॥ २३१३ ॥ ऐका संतजन उत्तरें माझे बोबडे बोल । करी लाड तुह्मांपुढें हो कोणी ह्मणी कोपाल ॥ धृ० ॥ उपाय साधन आइका कोण गति अवगती । दृढ बैसोनि सादर तुह्मी धरावें चित्तीं ॥ १ ॥ धर्म तयासी घडे रे ज्याचें स्वाधीन भाज । कर्म तयासी जोडे रे भीत नाहीं लाज ॥ २ ॥ पुण्य तें जाणां रे भाइनो परउपकाराचें । परपीडा परनिंदा रे खरें पाप तयाचें ॥ ३ ॥ लाभ तयासी जाला रे मुखीं देव उचारी । प्रपंचापाठी गुंतला हाणी त्यासीच थोरी ॥ ४ ॥ सुख तें जाणा रे भाइनो संतसमागम । दुःख तें जाणा रे भाइनो सम तेथें विषम ॥ ५ ॥ साधन तयासी साधे रे ज्याची स्वाधीन बुद्धी । पराधिनासी आहे

घात रे थोर जाण संबंधी ॥ ६॥ मान पावे तो आगळा मुख्य इंद्रियें राखे। अपमानी तो अधररसस्वाद चाखे ॥ ७॥ जाणता तयासी बोलिजे जाणें समाधान। नेणता तयासी बोलिजे वाद करी भूषण ॥ ८॥ भला तोचि एक जाणा रे गयावर्जन करी। बुरा धन नष्ट मेळवी परद्वार जो करी ॥ ९॥ आचारी अन्न काढी रे गाई अतितभाग। अनाचारी करी भोजन ग्वाही नसतां संग ॥ १०॥ स्वहित तेणेंचि केलें रे भूतीं देखिला देव। अनहित तयाचें जालें रे आणि अहंभाव ॥ ११॥ धन्य जन्मा तेचि आले रे एक हरिचे दास। धिग ते विषयीं गुंतले केला आयुष्या नास ॥ १२॥ जोहरी तोचि एक जाणा रे जाणें सिद्धलक्षण। वेडसरु तो भुले रे वरवळभूषणें ॥ १३॥ बळियाढा तोचि जाणा रे भक्ति दृढ शरीरीं। गांड्या तयासी बोलिजे एक भाव न धरी ॥ १४॥ खोल तो वचन गुरूचें जो गिळूनि बैसे। उथळ धीर नाहीं अंगीं रे ह्मणे होईल कैसें ॥ १५॥ उदार तो जीवभाव रे ठेवी देवाचे पायीं। कृपण तयासी बोलिजे पडे उपाधिडाई ॥ १६॥ चांगलेंपण तेंचि रे ज्याचें अंतर शुद्ध। वोंगळ मळिण अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ॥ १७॥ गोड तेंचि एक आहे रे सार विठ्ठलनाम। कडु तो संसार रे लक्षचौऱ्याशी जन्म ॥ १८॥ तुका ह्मणे मना धरी रे संतसंगतिसोई। न लगे कांहीं करावें राहें विठ्ठलपायीं ॥ १९॥

## येकाखडी.

॥ २३१४॥ करावा कैवाड। नाहीं तरी आला नाड ॥ धृ०॥ स्मरा पंढरीचा देव। मनीं धरोनियां भाव ॥ १॥ खचविलें काळें। उगवा लवलाहें जाळें ॥ २॥ गजर नामाचा। करा लवलाहें वाचा ॥ ३॥ घरटी चक्रफेरा। जन्ममृत्याचा भोंवरा ॥ ४॥ नानाहव्यासांची जोडी। तृष्णा करी देशधडी ॥ ५॥ चरणीं ठेवा चित्त। ह्मणवा देवाचे अंकित ॥ ६॥ छंद नानापरी। कळा न पविजे हरी ॥ ७॥ जगाचा जनिता। भुक्तिमुक्तीचाही दाता ॥ ८॥ झणी माझें माझें। भार वागविसी ओझें ॥ ९॥ यांची कां रे गेली बुद्धी। नाहीं तरायाची शुद्धी ॥ १०॥ टणक धाकुलीं। अवघीं सरती विठ्ठलीं ॥ ११॥ ठसा त्रिभुवनीं। उदार हा शिरोमणी ॥ १२॥ डगमगी तो वांयां जाय। धीर नाहीं गोता खाय ॥ १३॥ ढळों नये जरी। लाभ घरिच्चिया घरीं ॥ १४॥ नाहीं ऐसें राहे। कांहीं नासिवंत देहे ॥ १५॥ तरणा भाग्यवंत। नदे हरिकीर्तनांत ॥ १६॥ थडी टाकी पैलतीर। वाहे टोके होय वीर ॥ १७॥ दया तिचें नांव। अहंकार जाय जंव ॥ १८॥ धनधान्य हेवा। नाडे कुटुंबाची सेवा ॥ १९॥ नाम गोविंदाचें। घ्या रे हेंचि भाग्य साचें ॥ २०॥ परउपकारा। वेचा शक्ति निदा वारा ॥ २१॥ फळ भोग इच्छा। देव आहे जयां तैसा ॥ २२॥ बरवा ऐसा छंद। वाचे गोविंद गोविंद ॥ २३॥ भविष्याचे माथां। भजन न घ्यावें सर्वथा ॥ २४॥ माग लागला न संडीं। अवसें माती घाली तोंडीं ॥ २५॥ यश कीर्ति मान। तरी जोडे नारायण ॥ २६॥ रवि लोपे तेजें। जरी हारपे हें दुजें ॥ २७॥ लकार लाविला। असतां नसतांचि उगला ॥ २८॥ वासनेची धाडी। बंद खोडया नाडया बेडी ॥ २९॥ सरतें न कळे। काय झांकियेले डोळे ॥ ३०॥ खंती ते न धरा।

होणें गाढव कुतरा ॥ ३१ ॥ सायासाच्या जोडी । पिके काढियेल्या पेडी ॥ ३२ ॥ हातीं हित आहे । परि न करिसी पाहें ॥ ३३ ॥ अळंकार लेणें । ल्या रे तुळसीमुद्राभूषणें ॥ ३४ ॥ ख्याति केली विष्णुदासीं । तुका ह्मणे पाहा कैसी ॥ ३५ ॥

॥ २३१५ ॥ देवें देऊळ सेविलें । उदक कोरडेंचि ठेविलें ॥ धृ० ॥ नव्हे मत गूढ उमानें कांहीं । तूं आपआपणापें पाहीं ॥ १ ॥ पाठें पूर वोसंडला । सरिता सागर तुंबोनि ठेला ॥ २ ॥ वांजेघरीं बाळ तान्हा । एक बाळी दों कानां ॥ ३ ॥ तुका ह्मणे पैस । अनुभविया ठावा गोडीरस ॥ ४ ॥

## लोहगांवीं मेलेलें मूल जीवंत केलें तें.

॥ २३१६ ॥ अशक्य तों तुह्मां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥ धृ० ॥ मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावूं नये ॥ १ ॥ थोर भाग्य आह्मी समर्थाचे दासे । ह्मणवितों दास काय थोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे निववावे डोळे । दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ३ ॥

॥ २३१७ ॥ दाता तो एक जाणा । नारायणा स्मरवी ॥ धृ० ॥ आणिक नासिवंतें काय । न सरे हाय ज्यांच्यानें ॥ १ ॥ यावें तयां काकुलती । जे दाविती सुपंथ ॥ २ ॥ तुका ह्मणे उरी नुरे । त्याचे खरे उपकार ॥ ३ ॥

## अलंकापुरीं ब्राह्मणाचे बेचाळीस दिवस उपवास व त्याजला तुकोबापाशीं जाण्याचा दृष्टांत.

॥ २३१८ ॥ श्रीपंढरीशा पतितपावना । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ धृ० ॥ अनाथां जीवांचा तूं काजकैवारी । ऐसी चराचरीं ब्रिदावळी ॥ १ ॥ न संगतां कळे अंतरींचें गुज । आतां तुझी लाज तुज देवा ॥ २ ॥ आळिकर ज्याचें करिसी समाधान । अभयाचें दान देऊनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूंचि खेळें दोहीं ठायीं । नसेल तो देई धीर मना ॥ ४ ॥

॥ २३१९ ॥ अगा ये उदारा अगा विश्वंभरा । रखुमाईच्या वरा पांडुरंगा ॥ धृ० ॥ अगा सर्वोत्तमा अगा कृष्णा रामा । अगा मेघःश्यामा विश्वजनित्या ॥ १ ॥ अगा कृपावंता जीवन तूं दाता । अगा सर्वसत्ता धरितया ॥ २ ॥ अगा सर्वजाणाअगा नारायणा । करुणावचना चित्त द्यावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं अधिकार तैसी । सरती पायांपाशीं केली मागें ॥ ४ ॥

॥ २३२० ॥ नव्हें दास खरा । परि जाला हा डांगोरा ॥ धृ० ॥ यासी काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ॥ १ ॥ नाहीं पुण्यगांठी । जे हें वेचूं कोणासाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कां उपाधी । वाढविली कृपानिधी ॥ ३ ॥

॥ २३२१ ॥ तुजविण सत्ता । नाहीं वाचा वदविता ॥ धृ० ॥ ऐसे आह्मी जाणों दास । ह्मणोनि जालों उदास ॥ १ ॥ तुह्मी दिला धीर । तेणें मन झालें स्थिर ॥ २ ॥ तुका ह्मणे आड । केलों मी हें तुह्मां कोड ॥ ३ ॥

॥ २३२२ ॥ काय मी जाणता । तुह्माहुनि आनंता ॥ धृ० ॥ जो हा करूं अतिशय । कां तुह्मां दया नये ॥ १ ॥ काय तुज नाहीं कृपा । विश्वाचिया मायबापा ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । माझी वदे तुह्मांहूनी ॥ ३ ॥

॥ २३२३ ॥ काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविलें धरणें ॥ धृ० ॥ ऐकोनियां लिखित । म्हूण जाणवली हे मात ॥ १ ॥ तरी जाणे धणी । वदे सेवकाची वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवा । होतां सांभाळावें देवा ॥ ३ ॥

॥ २३२४ ॥ ठेवूनियां डोई । पायीं जालों उतराई ॥ धृ० ॥ कारण तें तुह्मी जाणां । मी तराळ नारायणा ॥ १ ॥ प्रसंगीं वचन । दिलें तेंचि खावें अन्न ॥ २ ॥ तुका ह्मणे भार । तुह्मी जाणां थोडा फार ॥ ३ ॥

## उपदेश.

॥ २३२५ ॥ नको कांहीं पडों ग्रंथाचिये भरीं । शीघ्र व्रत करीं हेंचि एक ॥ धृ० ॥ देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥ १ ॥ साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥ २ ॥ उधाराचा मोक्ष होय नव्हे ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥ ३ ॥ रोकडी पातली अंगसंगें जरा । आतां उजगरा कोठवरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे घालीं नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

॥ २३२६ ॥ नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोळें । आणूनि निराळें द्यावें हातीं ॥ धृ० ॥ इंद्रियांचा जय साधूनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥ १ ॥ उपास पारणीं अक्षरांची आटी । सत्कर्मी शेवटीं असे फळ ॥ २ ॥ आवरें संकल्प वारीं अतिशय । सहज तें काय दुःख जाण ॥ ३ ॥ स्वप्नींच्या घायें विवळसी वांयां । रडे रडतियासवें मिथ्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे फळ आहे मूळापाशीं । शरण देवासी जाय वेगीं ॥ ५ ॥

॥ २३२७ ॥ त्यजिलें भेटवी आणूनि वासना । दाविल्याचें जना काय काज ॥ धृ० ॥ आळवावें देव भाकूनि करुणा । आपुलिया मना साक्ष करीं ॥ १ ॥ नाहीं जावें यावें लागत । आहे साक्षभूत अंतरींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे हा आहे कृपासिंधू । तोडी भवबंधु तात्काळिक ॥ ३ ॥

॥ २३२८ ॥ गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ धृ० ॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ १ ॥ आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे आळी । जेवी नुरेचि वेगळी ॥ ३ ॥

॥ २३२९ ॥ ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥ धृ० ॥ ह्मणऊनि अवघें सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ १ ॥ सम खूण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥ २ ॥ तुका ह्मणे नभा । परता अनुचाही गाभा ॥ ३ ॥

॥ २३३० ॥ पाहूनियां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥ धृ० ॥ नाहीं तरि वांयां केली तोंडपिटी । उरी ते शेवटीं उरलीसे ॥ १ ॥ पढोनियां वेद हरिगुण गावे । ठावें तें जाणावें तेव्हां जालें ॥ २ ॥ तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धी । स्थिर राहे

बुद्धि हरिच्या नामीं ॥ ३ ॥ यागयाज्ञादिक काय दानधर्म । तरि फळ नाम कंठीं राहे ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको काबाडाचे भरी । पडों सार धरीं हेंचि एक ॥ ५ ॥

॥ २३३१ ॥ सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥ धृ० ॥ त्याचें दिलें त्यासी । घावें फळ आपणासी ॥ १ ॥ आहे हा आधार । नाम त्याचें विश्वंभर ॥ २ ॥ नाहीं रिता ठाव । तुका ह्मणे पसरीं भाव ॥ ३ ॥

॥ २३३२ ॥ संकोचोनि काय जालासी लहान । घेई अपोशण ब्रह्मांडाचें ॥ धृ० ॥ करोनि पारणें आंचवें संसारा । उशीर उशिरा लावूं नको ॥ १ ॥ घरकुलानें होता पडिला अंधार । तेणें केलें फार कासाविस ॥ २ ॥ झुगारूनि दुरी लपविलें काखे । तुका ह्मणे वाखे कौतुकाचे ॥ ३ ॥

॥ २३३३ ॥ माझ्या बापें मज दिधलें भातुकें । ह्मणोनि कवतुकें क्रीडा करी ॥ धृ० ॥ केली आळी पुढें बोलिलों वचन । उत्तम हें ज्ञान आलें त्याचें ॥ १ ॥ घेऊनि विभाग जावें लवलाह्या । आलेति या ठाया आपुलीया ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञानदेवीं समुदाय । करावा मी पाय येईन वंदूं ॥ ३ ॥

॥ २३३४ ॥ ज्ञानियांचा गुरु राजा महाराव । ह्मणती ज्ञानदेव ऐसें तुह्मां ॥ धृ० ॥ मज पामरा हें काय थोरपण । पायींची वाहाण पायीं बरी ॥ १ ॥ ब्रह्मादिक जेथें तुह्मां वोळगणें । इतर तुळणें काय पुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें युक्तीची ते खोली । ह्मणोनि ठेविली पायीं डोई ॥ ३ ॥

॥ २३३५ ॥ बोलिलीं लेंकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥ धृ० ॥ करा क्षमा अपराध । महाराज तुह्मी सिद्ध ॥ १ ॥ नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञानेश्वरा । राखा पायापें किंकरा ॥ ३ ॥

॥ २३३६ ॥ काय तुह्मी जाणा । करूं अव्हेर नारायणा ॥ धृ० ॥ तरी या लटिक्याची गोही । निवडली दुसरे ठायीं ॥ १ ॥ कळों अंतरींचा गुण । नये फिटल्यावांचुन ॥ २ ॥ आणिलें अनुभवा । जनाच्या हें ज्ञानदेवा ॥ ३ ॥ आणिक कोणी भिती । त्यांच्या चिंतनें विश्रांती ॥ ४ ॥ तुका ह्मणे बीज पोटीं । फळ तैसेंचि शेवटीं ॥ ५ ॥

॥ २३३७ ॥ अविश्वासी याचें शरीर सुतकी । विटाळ पातकी भेद वाही ॥ धृ० ॥ काय त्याचा वेल जाईल मांडवा । होता तैसा ठेवा आला पुढें ॥ १ ॥ मातेचा संकल्प व्हावा राजबिंडा । कपाळींचा धोंडा उभा ठाके ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसा कुचराचा दाणा । परिपाकीं अन्ना न मिळे जैसा ॥ ३ ॥

॥ २३३८ ॥ तामसाचीं तपें पापाची सिदोरी । तमोगुणें भरी घातले ते ॥ धृ० ॥ राज्यमदा आड सुखाची संपत्ती । उल्लंघूनि जाती निरयगांवा ॥ १ ॥ इंद्रियें दमिलीं इच्छा जीती जीवीं । नागविती ठावीं नाहीं पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिभजनावांचुन । करिती तीं सीण पाहों नये ॥ ३ ॥

॥ २३३९ ॥ हरिकथेवांचून इच्छिती स्वहित । हरिजन चित्त न घला तेथें ॥ धृ० ॥ जाइल भंगोन आपुला विश्वास । होईल या नास कारणांचा ॥ १ ॥ ज्याचिया बैसावें

जनपंगाती । त्याचिया संगती तैसें खावें ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जालेति जाणते ।
ही परते थोर तुह्मी ॥ ३ ॥
॥ २३४० ॥ सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हुंतूंपण कामा नये ॥ धृ० ॥ घेईल
व कां सारिल परतें । भंगलिया चित्तें सांदीजेना ॥ १ ॥ खद्योतें दावावी रवी कवडि
ट । आपुलेंचि नीट उसंतावें ॥ २ ॥ तुका ह्मणे तो ज्ञानाचा सागर । परि नेदी अगा
जों भेटें ॥ ३ ॥
॥ २३४१ ॥ जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥ धृ० ॥
ील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥ १ ॥ जेणें हे घातली मुक्तीची
ांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें सुखा काय उणें । राहे समा-
नें चित्ताचिया ॥ ३ ॥
॥ २३४२ ॥ बहुतां छंदाचें बहु वसे जन । नये वांटूं मन त्यांच्या संगें ॥ धृ० ॥
ावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥ १ ॥ सुखाची समाधि
रिकथा माउली । विश्रांति साउली सिणलियांची ॥ २ ॥ तुका ह्मणे बुडे बांधोनि ढुंगण ।
ें काय कोड धांवायाचें ॥ ३ ॥
॥ २३४३ ॥ हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥ धृ० ॥ त्याची वाणी अमंगळ ।
ान उंदराचें बीळ ॥ १ ॥ सांडूनि हा रस । करिती आणिक सायास ॥ २ ॥ तुका ह्मणे
सीं । वांयां गेलीं क्रिती ऐसीं ॥ ३ ॥
॥ २३४४ ॥ प्रेम अमृताची धार । वाहे देवाही समोर ॥ धृ० ॥ ऊर्ध्ववाहिनी हरि-
था । मुगुटमणि सकळां तीर्थां ॥ १ ॥ शिवाचें जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥ २ ॥
का ह्मणे हरी । इची स्तुति वाणी थोरी ॥ ३ ॥
॥ २३४५ ॥ आतां माझ्या मना । इची घडो उपासना ॥ धृ० ॥ ऐसें करीं पांडुरंगा ।
बोसंडेसें अंगा ॥ १ ॥ सर्व काळ नये । वाचे विट आड भये ॥ २ ॥ तुका वैष्णवां-
ातीं । हेंचि भजन पंगती ॥ ३ ॥
॥ २३४६ ॥ उपास कराडी । तिहीं करावीं बापुडीं ॥ धृ० ॥ आह्मी विठोबाचे दास ।
वता झुगारिली आस ॥ १ ॥ भक्तीच्या उत्कर्षें । नाहीं मुक्तीचें तें पिसें ॥ २ ॥ तुका
णे बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ ३ ॥
॥ २३४७ ॥ करविली तैसी केली कटकट । वांकडें कीं नीट देव जाणे ॥ धृ० ॥
ोणाकारणें हें जालेंसे निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥ १ ॥ तुका ह्मणे मी वाह
भिमाना वेगळा । घालूनि गोपाळा भार असें ॥ २ ॥
॥ २३४८ ॥ तुह्मी येथें पाठविला धरणेकरी । त्याची जाली परि आइका ते ॥ धृ० ॥
तां काय पुढें वाढवूनि विस्तार । जाला समाचार आइका तो ॥ १ ॥ देवाचे उचित
कादश अभंग । महाफळ त्याग करुनी गेला ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा समर्पूनि पायीं ।
लों उतराई ठावें असो ॥ ३ ॥
॥ २३४९ ॥ मरण माझें मरोन गेलें । मज केलें अमर ॥ धृ० ॥ ठाव पुसिलें बुड

पुसिलें । चोस वोसलें देहभावा ॥ १ ॥ आला होता गेला पुर । धरिला धीर जीवनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बुनादीचें । जालें साचें उजवणें ॥ ३ ॥

॥ २३५० ॥ माझे लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥ धृ० ॥ गोष्टी न करीं नांव नेघें । गेलों दोघें खंडोनी ॥ १ ॥ स्तुतिसमवेत निंदा । केला धंदा उदंड ॥ २ ॥ तुका ह्मणे निवांत ठेलों । वेचित आलों जीवित्व ॥ ३ ॥

॥ २३५१ ॥ लवविलें तया सवें लवे जाती । अभिमाना हातीं सांपडेना ॥ धृ० ॥ भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ॥ १ ॥ अर्चन वंदन नवविधा भक्ती । दया क्षमा शांति तया ठायीं ॥२॥ तये गांवीं नाहीं दुःखाची वसती । अवघाचि भूतीं नारायण ॥ ३ ॥ अवघेंचि जालें सोंवळें ब्रह्मांड । विटाळाचें तोंड न देखती ॥ ४ ॥ तुका ह्मणे गाजे वैकुंठीं सोहळा । याही भूमंडळामाजी कीर्ती ॥ ५ ॥

॥ २३५२ ॥ पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणिक न करीं तीर्थव्रत ॥ धृ० ॥ व्रत एकादशी करिन उपवासी । गाइन अहर्निशीं मुखीं नाम ॥ १ ॥ नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचें तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ २३५३ ॥ संपदा सोहळा नावडे मनाला । करी तें टकळा पंढरीचा ॥ धृ० ॥ जावें पंढरिसी आवडी मनासी । कधीं एकादशी आषाढी हे ॥ १ ॥ तुका ह्मणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥ २ ॥

॥ २३५४ ॥ कथनीं पठणीं करूनि काय । वांचूनि रहणी वांयां जाय ॥ धृ० ॥ मुखीं वाणी अमृतगोडी । मिथ्या भुकें चरफडी ॥ १ ॥ पिळणी पाक करितां दगडा । काय जडा होय तें ॥२॥ मधू मेळवूनि माशी । आणिका सांसी पारधिया ॥ ३ ॥ मेळऊनि धन मेळवी माती । लोभ्या हातीं तेंचि मुखीं ॥ ४ ॥ आपलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ५ ॥

॥ २३५५ ॥ उमटती वाणी । वाटे नामाचिया ध्वनी ॥ धृ० ॥ बरें सेवन उपकारा । द्यावें द्यावें या उत्तरा ॥ १ ॥ सरळ आणि मृद । कथा पाहावी ते ऊर्ध्व ॥ २ ॥ गात जात तुका । हाचि उपदेश आइका ॥ ३ ॥

॥ २३५६ ॥ कथाकाळींची मर्यादा सांगतों ते भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा हेंचि एक आवडे ॥ धृ० ॥ टाळ वाद्य गीत नृत्य अंतःकरणें प्रेमभरित । वाणितां तो कीर्त तद्भवनें लेखावा ॥ १ ॥ नये आळसें मोडूं अंग कथे कानवडें ढुंग । हेळणेचा रंग दावी तो चांडाळ ॥ २ ॥ तोंडीं विडा माने ताठा थोरपणें घाली गेंठा । चित्त नेदी नामपाठा गोष्टी लावी तो चांडाळ ॥ ३ ॥ कथे इच्छी मान दावूनियां थोरपण । रजा संकोच न लुगडीं सांवरी तो चांडाळ ॥ ४ ॥ आपण बैसे बाजेवरी सामान्य हरिच्या दासां धरी । तरि तो सुळावरी वाहिजे निश्चयेसीं ॥ ५ ॥ येतां न करी नमस्कार कर जोडोनियां नम्र । न ह्मणतां थोर आणिकां खेटी तो चांडाळ ॥ ६ ॥ तुका विनवी जना कथे नाणावें अवगुणा । करा नारायणा ऋणी समर्पक भावें ॥ ७ ॥

॥ २३५७ ॥ कथा देवाचें ध्यान कथा साधना मंडण । कथें ऐसें पुण्य आणिक

॥ धृ० ॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥ १ ॥ मंत्र स्वल्प
ां वाचे मना । ह्मणतां नारायणा क्षणें जळती महादोष ॥ २ ॥ भावें
र तरे तारी आणिक जन । भेटे नारायण संदेह नाहीं ह्मणे तुका ॥ ३ ॥
। कथा त्रिवेणीसंगम देव भक्त आणि नाम । तेथींचें उत्तम चरणरज
॥ जळती दोषांचे डोंगर शुद्ध होती नारी नर । गाती ऐकती सादर जे
ा ॥ १ ॥ तीर्थें तया ठाया येती पुनीत व्हावया । पर्वकाळ पायां तळीं वसे
॥ अनुपम्य हा महिमा नाहीं द्यावया उपमा । तुका ह्मणे ब्रह्मा नेणे वर्णूं या

सांडूनि कीर्तन न करीं आणिक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं
रडीचें आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पायां याचि लागीं ॥ १ ॥
यां विठ्ठल ह्मणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा तुवें न्यावें
ं निजधामा आपुलिया ॥ ३ ॥
। जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ॥ धृ० ॥ हेंचि बळिवंत गाढें ।
दंडीपुढें ॥ १ ॥ कळि पापाची हे मूर्ती । नामखड्ग घेऊं हातीं ॥ २ ॥ तुका
बळें दमामें ही लावूं ॥ ३ ॥
। यम सांगे दूतां तुह्मां नाहीं तेथें सत्ता । जेथें होय कथा सदा घोष
० ॥ नका जाऊं तया गांवा नामधारकाच्या शिवा । सुदर्शन यावा घरटी फिरे
चक्र गदा घेउनी हरि उभा असे त्यांचे द्वारीं । लक्ष्मी कामारी रिद्धिसिद्धी
। ते बळियाशिरोमणी हरिभक्त ये मेदिनी । तुका ह्मणे कानीं यम सांगे
।

। कान्हया रे जगजेठी । देईं भेटी एकवेळे ॥ धृ० ॥ काय मोकलिलें
ांनीं वेढिलें ॥ १ ॥ येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें ॥ २ ॥ तुका
ागें । एवढ्या वेगें अंतरला ॥ ३ ॥
। आपुल्या आह्मी पुसिलें नाहीं । तुज कांहीं कारणें ॥ धृ० ॥ मागें मागें
। कांहीं बोलों यासाठीं ॥ १ ॥ बहुत दिस होतें मनीं । घ्यावी धणी एकांतीं
ह्मणे उभा राहें । कान्हो पाहें मजकडे ॥ ३ ॥
धन्य बा ह्या ऐशा नारी । घरीं दारीं नांदती ॥ धृ० ॥ चोरूनियां तुज-
त्यांसी न कळतां ॥ १ ॥ दोन्हीं ठायीं समाधान । सम कठिण बहुतची ॥ २ ॥
वासाठीं । दुर्लभ भेटी ते देवा ॥ ३ ॥
। उदासीना पावल्या वेगीं । अंगा अंगीं जडलिया ॥ धृ० ॥ वेधाळिला
मयूरफेरीं नाचती ॥ १ ॥ मना आले करिती चार । त्या फार हा एकला
ह्मणे नारायणीं । निरंजनीं मीनलिया ॥ ३ ॥
। विषमाची शंका वाटे । सारिखें भेटे तरी सुख ॥ धृ० ॥ ह्मणऊनि

चोरिलें जना। आल्या राना एकांतीं ॥ १ ॥ दुजियासी कळों नये। जथा सोय नाहीं हे ॥ २ ॥ तुका ह्मणे मोकळें मन। नारायण भोगासी ॥ ३ ॥

॥ २३६७ ॥ आलिंगन कंठाकंठीं। पडे मिठी सर्वांगें ॥ धृ० ॥ न घडे मागें परतें मन। नारायण संभोगी ॥ १ ॥ वचनासी वचन मिळे। रिघती डोळे डोळियांत ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतर्ध्यानीं। जीव जीवनीं विराल्या ॥ ३ ॥

॥ २३६८ ॥ कोणी सुना कोणी लेंकी। कोणी एकी सतंता ॥ धृ० ॥ अवघियांची जगनिंद। जाली धिंद सारखी ॥ १ ॥ अवघ्या अवघ्या चोरा। विना वरा मायबापा ॥ २ ॥ तुका ह्मणे करा सेवा। आलें जीवावर तरी ॥ ३ ॥

॥ २३६९ ॥ येथील जे एक घडी। तये जोडी पार नाहीं ॥ धृ० ॥ किती त्यांचा सासुरवास। कैंचा रस हा तेथें ॥ १ ॥ अवघे दिवस गेले कामा। नाहीं जन्मा खंडण ॥ २ ॥ तुका ह्मणे रतल्या जनीं। सोडा ह्मणी कान्होबा ॥ ३ ॥

॥ २३७० ॥ चिंता नाहीं गांवीं विष्णुदासांचिये। घोष जयजयकार सदा ॥ धृ० ॥ नारायण घरीं सांठविलें धन। अवघेंचि वाण तया पोटीं ॥ १ ॥ सवंग सकळां पुरे धणी-वरी। सेवावया नारी नर बाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें आनंदू। गोविंदें गोविंदू पिक-विला ॥ ३ ॥

॥ २३७१ ॥ करिती तया वेवसाव आहे। येथें व्हारे साहे एकां एक ॥ धृ० ॥ गातां आइकतां समानचि घडे। लाभें लाभ जोडे विशेषता ॥ १ ॥ प्रेमाचें भरतें भातें घ्यावें अंगीं। नटे टाळी रंगीं शूरत्वेंसी ॥ २ ॥ तुका ह्मणे बहुजन्मांचें खंडण। होईल हा सीण निवारोनी ॥ ३ ॥

## स्वामींचे नांवाबद्दल सालोमालोचें नांव घालणें.

॥ २३७२ ॥ नाहीं घाटावें लागत। एका सितें कळे भात ॥ धृ० ॥ क्षीर निवडतें पाणी। चोंची हंसाचिये आणी ॥ १ ॥ आंगडें फाडुनी घोंगडें करी। अवकळा तये परी ॥ २ ॥ तुका ह्मणे कण। भूसीं निवडे कैंचा सीण ॥ ३ ॥

॥ २३७३ ॥ सालोमालो हरिचे दास। ह्मणऊन केला अवघा नास ॥ धृ० ॥ अवघें बजमंगळ केलें। ह्मणती एकांचें आपुलें ॥ १ ॥ मोडूनि संतांचीं वचनें। करिती आपणां भूषणें ॥ २ ॥ तुका ह्मणे कवी। जगामधीं रूढ दावी ॥ ३ ॥

॥ २३७४ ॥ जायाचे अळंकार। बुडवूनि होती चोर ॥ धृ० ॥ त्यांसी ताडणाची पूजा। योग घडे बऱ्या वोजा ॥ १ ॥ अभिलाषाच्या सुखें। अंतीं होती काळीं मुखें ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरा। होय भूषण मातेरा ॥ ३ ॥

॥ २३७५ ॥ कालवूनि विष। केला अमृताचा नास ॥ धृ० ॥ ऐशा अभाग्याच्या बुद्धी। सत्य लोपी नाहीं शुद्धी ॥ १ ॥ नाक कापुनी लावी सोनें। कोण अळंकार तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे बावी। मोडूनि मदार बांधावी ॥ ३ ॥

॥ २३७६ ॥ कण भुसाच्या आधारें। परि तें निवडितां बरें ॥ धृ० ॥ काय घोंघाणिया

घाणी । ताकामध्यें घाटी लोणी ॥ १ ॥ सुइणीपुढें चेंटा । काय लपविसी चाटा ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञान । दिमाकाची भनभन ॥ ३ ॥

॥ २३७७ ॥ विकेल तेथें विका । माती नांव ठेवूनि बुका ॥ धृ० ॥ हा तो निवाड्याचा ठाव । खऱ्या खोट्या निवडी भाव ॥ १ ॥ गव्हवारें हा विधी । पोट वाढविलें चिंधी ॥ २ ॥ लावूं जाणें विल्हे । तुका साच आणिक कल्हे ॥ ३ ॥

॥ २३७८ ॥ विषयीं अद्वये । त्यासी आह्मां सिवों नये ॥ धृ० ॥ देव तेथुनी निराळा । असे निष्काम वेगळा ॥ १ ॥ वासनेची बुंथी । तेथें कैंची ब्रह्मस्थिती ॥ २ ॥ तुका ह्मणे असतां देहीं । तेथें नाहीं जमती ॥ ३ ॥

॥ २३७९ ॥ नमितों या देवा । माझी एके ठायीं सेवा ॥ धृ० ॥ गुणअवगुण निवाडा । ह्मैस ह्मैस रेडा रेडा ॥ १ ॥ जनीं जनार्दन । साक्ष त्यासी लोटांगण ॥ २ ॥ तुका ह्मणे खडे । निवडूं दळणीं घडघडे ॥ ३ ॥

॥ २३८० ॥ जीव जीती जीवना संगें । मत्स्या मरण त्या वियोगें ॥ धृ० ॥ जया चित्तीं जैसा भाव । तयां जवळि तैसा देव ॥ १ ॥ सकळां पढिये भानू । परि त्या कमळाचें जीवनू ॥ २ ॥ तुका ह्मणे माता । वाहे तान्ह्याची चिंता ॥ ३ ॥

॥ २३८१ ॥ मुंगीचिया घरा कोण जाय मूळ । देखोनियां गूळ धांव घाली ॥ धृ० ॥ याचकाविण काय खोळंबला दाता । तोची धांवे हिता आपुलिया ॥ १ ॥ उदक अन्न काय ह्मणे मज खा ये । भुकेला तो जाये चोजवीत ॥ २ ॥ व्याधी पीडिला धांवे वैद्याचिया घरा । दुःखाच्या परिहारा आपुलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ॥ ४ ॥

॥ २३८२ ॥ जन्मांतरिंचा परिट न्हावी । जात ठावी त्यानें ते ॥ धृ० ॥ वाखर जैसा चरचरी । तोंड करी संवदणी ॥ १ ॥ पूर्व जन्म शिखासूत्र । मळ मूत्र अंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे करिती निंदा । धुवटधंदा पुढिलांचा ॥ ३ ॥

॥ २३८३ ॥ नाम दूषी त्याचें नको दरशन । विष तें वचन वाटे मज ॥ धृ० ॥ अमंगळ वाणी नाइकवे कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें ॥ १ ॥ काय साच लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥ २ ॥ काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आतां या जिभेसी काय करूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत न मनिती त्यांस । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ४ ॥

॥ २३८४ ॥ येऊनि नरदेहा झांकितील डोळे । बळेंचि अंधळे होती लोक ॥ धृ० ॥ उजेडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणोनियां ॥ १ ॥ बहु फेरे आले सोसोनि वोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥ २ ॥ तुका ह्मणे जाऊं सादावित वाट । भेटे तरी भेटो कोणी तरी ॥ ३ ॥

॥ २३८५ ॥ नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई ॥ धृ० ॥ बळिया माझा पंढरिराव । जो या देवांचाही देव ॥ १ ॥ रंडी चंडी शक्ती । मद्यमांसातें भक्षिती ॥ २ ॥ बहिरव खंडेराव । रोटीसुटीसाठीं देव ॥ ३ ॥ गणोबा विक्राळ । लाडुमोदकांचा काळ

॥ ४ ॥ मुंज्या म्हैसासुरें । हें तों कोण लेखी पोरें ॥ ५ ॥ वेताळें फेताळें । जळो त्यांचें तोंड काळें ॥ ६ ॥ तुका ह्मणे चित्तीं । धरा रखुमाईचा पती ॥ ७ ॥

॥ २३८६ ॥ पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥ धृ० ॥ मग तो होऊं नेदी सीण । आड घाली सुदर्शन ॥ १ ॥ नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥ २ ॥ तुका ह्मणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ ३ ॥

॥ २३८७ ॥ मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न वंचे तें ॥ धृ० ॥ रुसोनियां पळे सांडूनियां ताट । मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ १ ॥ भांडवल आह्मां आळी करावी हे । आपणचि माये धांवसील ॥ २ ॥ तुका ह्मणे आळी करूनियां निकी । देसील भातुकी बुझाउनी ॥ ३ ॥

॥ २३८८ ॥ नागर गोडें बाळरूप । तें स्वरूप काळीचें ॥ धृ० ॥ गाईगोपाळांच्या संगें । आलें लागें पुंडलिका ॥ १ ॥ तें हें ध्यान दिगंबर । कटीं कर मिरवती ॥ २ ॥ नेणपणें उगेंचि उभें । भक्तिलोभें राहिलें ॥ ३ ॥ नेणे वरदळाचा मान । विटे चरण सम उभे ॥ ४ ॥ सहज कटावरी हात । दहींभात शिदोरी ॥ ५ ॥ मोहरी पांवा गांजिवा पाठीं । धरिली काठी ज्या काळें ॥ ६ ॥ रम्य स्थळ चंद्रभागा । पांडुरंगा क्रीडेसी ॥ ७ ॥ भीमा दक्षणमुख वाहे । दृष्टि पाहे समोर ॥ ८ ॥ तारावेसे मूढ लोक । दिली भाक पुंडलिका ॥ ९ ॥ तुका ह्मणे वैकुंठवासी । भक्तांपासीं राहिला ॥ १० ॥

॥ २३८९ ॥ विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास । तो वसे उदास नरकामध्यें ॥ धृ० ॥ तयासी बोलतां होईल विटाळ । नव जाये तो जळस्नान करितां ॥ १ ॥ विठ्ठलनामाची नाहीं ज्या आवडी । त्याची काळ घडी लेखिताहे ॥ २ ॥ तुका ह्मणे मज विठोबाची आण । जरी प्रतिवचन करिन त्यासी ॥ ३ ॥

॥ २३९० ॥ तया घडले सकळ नेम । मुखीं विठोबाचें नाम ॥ धृ० ॥ कांहीं न लगे सिणावें आणिक वेगळाल्या भावें । वाचे उच्चारावें रामकृष्णगोविंदा ॥ १ ॥ फळ पावाल अवलिळा । भोग वैकुंठ सोहळा ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या नांवें । तोचि होइजे स्वभावें ॥ ३ ॥

॥ २३९१ ॥ पुराणप्रसिद्ध सीमा । नामतारकमहिमा ॥ धृ० ॥ मागें जाळी महा दोष । पुढें नाहीं गर्भवास ॥ १ ॥ जें निंदिलें शास्त्रें । वंद्य जाले नाममात्रें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं नाम ठसा ॥ ३ ॥

॥ २३९२ ॥ नाम घेतां न लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ धृ० ॥ दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावें राम राम ॥ १ ॥ नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींचि सरती ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । चैतन्य निजधाम ॥ ३ ॥

॥ २३९३ ॥ नाम घेतां वांयां गेला । ऐसा कोणें आईकिला ॥ धृ० ॥ सांगा विनवितों तुह्मांसी । संत महंत सिद्ध ऋषी ॥ १ ॥ नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ॥ २ ॥ सलगीच्या उत्तरा । तुका ह्मणे क्षमा करा ॥ ३ ॥

॥ २३९४ ॥ फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर सदैव ॥ धृ० ॥ नाहीं गर्भवास

र जळती दोषांचे ॥ १ ॥ उदंड भावें उदंड घ्यावें । नाम गावें आवडी ॥ २ ॥
रिच्या घरीं । देशा उरीं न सीणीजे ॥ ३ ॥

॥ प्रीति नाहीं राया वर्जिली ते कांता । परि तिची सत्ता जगावरी ॥ धृ० ॥
लों तरी तुझे भक्त । वास यमदूत न पाहाती ॥ १ ॥ राजयाचा पुत्र अप-
तो काय आणिकां दंडवेल ॥ २ ॥ बाहातरी खोडी परि देवमणी कंठीं । तैसा
गे तुका ॥ ३ ॥

॥ करावा उद्धार किंवा घ्यावी हारी । एका बोला स्थिरी राहें देवा ॥ धृ० ॥
। होईल संदेह । अवघेंचि आहे मूळ पायीं ॥ १ ॥ राहिलों चिकटून कांहींचि
णा नेणों काळें उदय भाग्य ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु उद्वेगला जीव । भाकी-
राया ॥ ३ ॥

॥ आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूं नये ॥ धृ० ॥ मग
निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक ॥ १ ॥ भयाचिये पोटीं दुःखा-
। शरण देवासी जातां भलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे काय त्या करितां ।
आतां विश्वंभर ॥ ३ ॥

॥ भोग तो न घडे संचितावांचुनी । करावें तें मनीं समाधान ॥ धृ० ॥
ीं मानूं नये खेद । ह्मणावा गोविंद वेळोवेळां ॥ १ ॥ आणिकां रुसावें न
आपुल्या संचितावांचूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे भार घातलिया वरी । होईल
यण ॥ ३ ॥

॥ निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें । साधन बरवें हेंचि एक ॥ धृ० ॥ तरीच
रिल नारायण । बडबड तो सीण येणेंविण ॥ १ ॥ सोइरे पिशुन समानचि
पर ओढे उपकारी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त जालिया निर्मळ । तरिच सकळ
३ ॥

॥ दिली चाले वाचा । क्षय मागिल्या तपाचा ॥ धृ० ॥ रिद्धि सिद्धि येती
करिती पसारा ॥ १ ॥ मानदंभासाठीं । पडे देवासवें तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे
वेठीच्या निर्दैवा ॥ ३ ॥

॥ तापल्यावांचून नव्हे अळंकार । पिटूनियां सार उरलें तें ॥ धृ० ॥ मग
व्हे शुद्ध जाती । नासें शत्रु होती मित्र तेची ॥ १ ॥ कळिवर बरें भोगूं
फांसिलें तें रोगा हातीं सुटे ॥ २ ॥ तुका ह्मणे मन करावें पाठेळ । साहा-
सेजेवरी ॥ ३ ॥

। पाठेळ करितां न साहावे वारा । साहेलिया ढोरा गोणी चाले ॥ धृ० ॥
ण हेचि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावे ॥ १ ॥ नवनीत तोंवरी कढ-
। निश्चळ होउनी राहे मग ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी जग टाकी पायां ।
पायां जन मग ॥ ३ ॥

। कावळियासी नाहीं दया उपकार । काळिमा अंतर विटाळसें ॥ धृ०

तैसें कुधनाचें जिणें अमंगळ । घाणेरी वोंगळ वदे वाणी ॥ १ ॥ कडु भोंपळ्याचा उपचारें पाक । सेविल्या तिडीक कपाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे विष सांडूं नेणें साप । आदरें तें पाप त्याचे ठायीं ॥ ३ ॥

॥ २४०४ ॥ लाभ खरा नये तुटी । नाहीं आडखळा भेटी ॥ धृ० ॥ जाय अवघिया देशा । येथें संचलासी तैसा ॥ १ ॥ मग न लगे पारखी । अवघीं सकट सारखीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वोळे । रूपें भुलविले डोळे ॥ ३ ॥

॥ २४०५ ॥ नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उसंती ॥ धृ० ॥ जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ १ ॥ वचनाचा न करीं गोवा । रिघें देवासीं शरण ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ॥ ३ ॥

॥ २४०६ ॥ बुद्धिहीनां जडजीवां । नको देवा उपेक्षूं ॥ धृ० ॥ परिसावी हे विज्ञापना । आह्मां दीनां दासांची ॥ १ ॥ चिंतूनियां आले पाय । त्यांसी काय वंचन ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरुषोत्तमा । करीं क्षमा अपराध ॥ ३ ॥

॥ २४०७ ॥ ह्मणउनी काकुळती । येतों पुढतों पुढती । तुह्मां असे हातीं । कमळापति भांडार ॥ धृ० ॥ फेडूं आलेती दरिद्र । तरि न लगे उशीर । पुरे अभयंकर । ठाया ठाव रंकाशी ॥ १ ॥ कोठें न घाली धांव । याजसाठीं तजिली हांव । घेऊं नेदी वाव । मना केला विरोध ॥ २ ॥ कारणांच्या गुणें । वेळ काळ तोही नेणें । तुमच्या कीर्तनें । तुका तुह्मां जागवी ॥ ३ ॥

॥ २४०८ ॥ बहु नांवें ठेविलीं स्तुतीचे आवडी । बहुत या गोडी आली रसा ॥ धृ० ॥ बहु सोसें सेवन केलें बहुवस । बहु आला दिस गोमट्याचा ॥ १ ॥ बहुतां पुरला बहुतां उरला । बहुतांचा केला बहु नट ॥ २ ॥ बहु तुका जाला निकट वृत्ती । बहु काकुलती येऊनियां ॥ ३ ॥

॥ २४०९ ॥ इहलोकीं आह्मां वस्तीचें पेणें । उदासीन तेणें देहभावा ॥ धृ० ॥ काय पुरतें कारण मारगीं । उलंघूनि वेगीं जावें स्थळा ॥ १ ॥ सोंगसंपादणी चालवितों वेव्हार । अत्यंतीं आदरें नाहीं गोवा ॥ २ ॥ तुका ह्मणे वेंच लाविला संचिता । होइल घेतां देतां लाभ कोणा ॥ ३ ॥

॥ २४१० ॥ रोजकीर्दी जमा धरुनी सकळ । खताविला काळ बराबरी ॥ धृ० ॥ नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड । हुजराती ते गोड सेवा रुजू ॥ १ ॥ चोरासाठीं रदबदल आटाहास । जळो जिणें दास्य बहुताचें ॥ २ ॥ सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाड्यापाशीं गुंपों नेणें ॥ ३ ॥

॥ २४११ ॥ विविधकर्माचे वेगळाले भाव । निवडूनि ठाव दाखविला ॥ धृ० ॥ आलियाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख गौरव संतां अंगीं ॥ १ ॥ हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं पापपुण्य खंती । झाड्याची हुजती हातां आली ॥ ३ ॥

॥ २४१२ ॥ साकरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आह्मां जोडी वैष्णवांची ॥ धृ० ॥

तैसें कुधनाचें जिणें अमंगळ । घाणेरी वोंगळ वदे वाणी ॥ १ ॥ कडु भोंपळ्याचा उपचारें पाक । सेविल्या तिडीक कपाळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे विष सांडूं नेणें साप । आदरें तें पाप त्याचे ठायीं ॥ ३ ॥

॥ २४०४ ॥ लाभ खरा नये तुटी । नाहीं आडखळा भेटी ॥ धृ० ॥ जाय अवघिया देशा । येथें संचलासी तैसा ॥ १ ॥ मग न लगे पारखी । अवघीं सकट सारखीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वोळे । रूपें भुलविले डोळे ॥ ३ ॥

॥ २४०५ ॥ नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उसंती ॥ धृ० ॥ जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ १ ॥ वचनाचा न करीं गोवा । रिघें देवासीं शरण ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ॥ ३ ॥

॥ २४०६ ॥ बुद्धिहीनां जडजीवां । नको देवा उपेक्षूं ॥ धृ० ॥ परिसावी हे विज्ञापना । आह्मां दीना दासांची ॥ १ ॥ चितूनियां आले पाय । त्यांसी काय वंचन ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरुषोत्तमा । करीं क्षमा अपराध ॥ ३ ॥

॥ २४०७ ॥ ह्मणउनी काकुळती । येतों पुढतों पुढती । तुह्मां असे हातीं । कमळापति भांडार ॥ धृ० ॥ फेडूं आलेती दरिद्र । तरि न लगे उशीर । पुरे अभयंकर । ठाया ठाव रंकाशी ॥ १ ॥ कोठें न घाली धांव । याजसाठीं तजिली हांव । घेऊं नेदी वाव । मना केला विरोध ॥ २ ॥ कारणांच्या गुणें । वेळ काळ तोही नेणें । तुमच्या कीर्तनें । तुका तुह्मां जागवी ॥ ३ ॥

॥ २४०८ ॥ बहु नांवें ठेविलीं स्तुतीचे आवडी । बहुत या गोडी आली रसा ॥ धृ० ॥ बहु सोसें सेवन केलें बहुवस । बहु आला दिस गोमट्याचा ॥ १ ॥ बहुतां पुरला बहुतां उरला । बहुतांचा केला बहु नट ॥ २ ॥ बहु तुका जाला निकट वृत्ती । बहु काकुलती येऊनियां ॥ ३ ॥

॥ २४०९ ॥ इहलोकीं आह्मां वस्तीचें पेणें । उदासीन तेणें देहभावा ॥ धृ० ॥ काय पुरतें कारण मारगीं । उलंघूनि वेगीं जावें स्थळा ॥ १ ॥ सोंगसंपादणी चालवितों वेव्हार । अत्यंत आदरें नाहीं गोवा ॥ २ ॥ तुका ह्मणे वेंच लाविला संचिता । होइल घेतां देतां लाभ कोणा ॥ ३ ॥

॥ २४१० ॥ रोजकीर्दी जमा धरुनी सकळ । खताविला काळ बराबरी ॥ धृ० ॥ नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड । हुजराती ते गोड सेवा रुजू ॥ १ ॥ चोरासाठीं रदबदल आटाहास । जळो जिणें दास्य बहुताचें ॥ २ ॥ सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाड्यापाशीं गुंपों नेणें ॥ ३ ॥

॥ २४११ ॥ त्रिविधकर्मांचे वेगळाले भाव । निवडूनि ठाव दाखविला ॥ धृ० ॥ आलियाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख गौरव संतां अंगीं ॥ १ ॥ हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं पापपुण्य खंती । झाड्याची हुजती हातां आली ॥ ३ ॥

॥ २४१२ ॥ साकरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आह्मां जोडी वैष्णवांची ॥ धृ० ॥

मोक्ष गांठीं असे ठेविला बांधोनी । सोस तो भजनीं आवडीचा ॥ १ ॥ भोजनाची चिंता माय वाहे बाळा । आम्हां तरी खेळावरि चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी देहउपकारें । गाऊं निरंतर नाचों लागों ॥ ३ ॥

॥ २४१३ ॥ सुखें घेऊं जन्मांतरें । एक बरें इहलोकीं ॥ धृ० ॥ पंढरीचे वारकरी । होतां थोरी जोडी हे ॥ १ ॥ हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवावरुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला त्याग । सर्वसंग ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ २४१४ ॥ करूं जातां सन्निधान । क्षणि जन पालटे ॥ धृ० ॥ आतां गोमटे ते पाय । तुझे माय विठ्ठले ॥ १ ॥ हरिदासांचा समागम । अंगीं प्रेम विसांवे ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि मन । इच्छादान मागतसें ॥ ३ ॥

॥ २४१५ ॥ क्षीर मागे तया रायतें वाढी । पाधानी गधडी ऐशा नांवें ॥ धृ० ॥ समयो जाणां समयो जाणां । भलतें नाणां भलतेथें ॥ १ ॥ अमंगळ वाणी वदवी मंगळी । अशुभ वोंगळी शोभन तें ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें समयो ठाया ठाव । राहाडी ते वाव नरकाडी ॥ ३ ॥

॥ २४१६ ॥ विंचा पीडी नांगी । ज्याचा दोष त्याचे अंगीं ॥ धृ० ॥ केला पाहिजे विचार । मन मित्र रावेदार ॥ १ ॥ मधुरा उत्तरीं । रांवा खेळे उरावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे रेडा । सुखें जाती ऐशा पीडा ॥ ३ ॥

॥ २४१७ ॥ तीर्थीची अपेक्षा स्थळीं वाढे धर्म । जाणावें तें वर्म बहु पुण्य ॥ धृ० ॥ बहु बरी ऐसी भाविकांची जोडी । काळ नाहीं घडी जात वांयां ॥ १ ॥ करूनि चिंतन करवावें आणिकां । तो या जाला लोकां नांव जगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे परउपकारी । त्यांच्या पायांवरी डोई माझी ॥ ३ ॥

॥ २४१८ ॥ भयाची तों आह्मां चित्तीं । राहो खंती सकेना ॥ धृ० ॥ समर्पिलों जीवें भावें । काशा भ्यावें कारणें ॥ १ ॥ करीन तें कवतुकें अवघें निकें शोभेल ॥ २ ॥ तुका ह्मणे माप भरूं । दिस सारूं कवतुकें ॥ ३ ॥

॥ २४१९ ॥ पाचारितां धांवे । ऐसी ठायींची हे सवे ॥ धृ० ॥ बोले करुणा वचनीं । करी कृपा लावी स्तनीं ॥ १ ॥ जाणे कळवळा । भावसिद्धींचा जिव्हाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम । मागें मागें धांवें प्रेम ॥ ३ ॥

॥ २४२० ॥ कां जी माझे जीवीं । आळस ठेविला गोसावीं ॥ धृ० ॥ येवढा घात आणिक काय । चिंतनासी अंतराय ॥ १ ॥ देहआत्म वंदी । केला घात कुबुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । कळवळी वाटे सीण ॥ ३ ॥

॥ २४२१ ॥ दर्शनाचें आर्त जीवा । बहु देवा राहिलें ॥ धृ० ॥ आतां जाणसी तें करीं । विश्वंभरीं काय उणें ॥ १ ॥ येथें जरी उरे चिंता । कोण दाता याहुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणवलें । आह्मां भलें एवढेंच ॥ ३ ॥

॥ २४२२ ॥ बैसों पाठमोरीं । मना वाटे तैसें करीं ॥ धृ० ॥ परि तूं जाणसी आवडी ।

बाळा बहुतांची परवडी ॥ १ ॥ आपुलाल्या इच्छा । मागों जया व्हावें जैशा ॥ २ ॥ तुका ह्मणे आई । नव्हसी उदास विठाई ॥ ३ ॥

॥ २४२३ ॥ विश्वंभरा वोळे । बहुत हात कान डोळे ॥ धृ० ॥ जेथें असे तेथें देखे । मागितलें तें आइके ॥ १ ॥ जें जें वाटे गोड । तैसें पुरवितो कोड ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । कांहीं पडों नेदी तुटी ॥ ३ ॥

॥ २४२४ ॥ दाटे कंठ लागे डोळियां पाझर । गुणाची अपार वृष्टि वरी ॥ धृ० ॥ तेणें सुखें छंदें घेईन सोहळा । होऊनि निराळा पापपुण्या ॥ १ ॥ तुझ्या मोहें पडो मागील विसर । आलापें सुस्वर करिन कंठ ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे सौरस । तुह्मांविण रस गोड नव्हे ॥ ३ ॥

॥ २४२५ ॥ पसरूनि राहिलों बाहो । सोयी अहो तुमचिये ॥ धृ० ॥ आतां यावें लागवेगें । पांडुरंगे धांवत ॥ १ ॥ बैसायाची इच्छा कडे । चाली खडे रुपताती ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपाळुवा । करीन सेवा लागली ॥ ३ ॥

॥ २४२६ ॥ आह्मी जालों एकविध । सुद्या सुदें असावें ॥ धृ० ॥ यावरी तुमचा मोळा । तो गोपाळा अकळ ॥ १ ॥ घेतलें तें उसनें द्यावें । कांहीं भावें विशेषें ॥ २ ॥ तुका ह्मणे क्रियानष्ट । तरी कष्ट घेतसां ॥ ३ ॥

॥ २४२७ ॥ आह्मीं आर्तभूत जिवीं । तुह्मी गोसावी तों उदास ॥ धृ० ॥ वादावाद समर्थाशीं । काशानशीं करावा ॥ १ ॥ आह्मी मरों वेरझारीं । स्वामी घरीं बैसले ॥ २ ॥ तुका ह्मणे करितां वाद । कांहीं भेद कळेना ॥ ३ ॥

॥ २४२८ ॥ पुसावें तें ठाईं आपुल्या आपण । अहंकारा शून्य घालूनिया ॥ धृ० ॥ येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान तें ॥ १ ॥ फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ । उपनांवें मूळ न पालटे ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे गव्हाचे प्रकार । सोनें अलंकार मिथ्या नांव ॥ ३ ॥

॥ २४२९ ॥ माझी आतां सत्ता आहे । तुह्मां पायां हे वरती ॥ धृ० ॥ एकाविण नेणें दुजा । पंढरिराजा सर्वांगें ॥ १ ॥ पुरवावी केली आळी । जे जे काळीं मागेन तें ॥ २ ॥ तुका ह्मणे सुटसी कैसा । धरूनि दिशा राहिलों ॥ ३ ॥

॥ २४३० ॥ फावलें तुह्मां मागें । नवतों लागें पावलों ॥ धृ० ॥ आलों आतां उभा राहें । जवळीं पाहें सन्मुख ॥ १ ॥ घरीं होती गोवी जाली । कामें बोली न घडेची ॥ २ ॥ तुका ह्मणे धडफुडा । जालों झाडा देईं देवा ॥ ३ ॥

॥ २४३१ ॥ आतां नये बोलों अव्हेराची मात । बाळावरि चित्त असों द्यावें ॥ धृ० ॥ तुज कां सांगणें लागे हा प्रकार । परि हें उत्तर आवडीचें ॥ १ ॥ न वंचीं वो कांहीं एकही प्रकार । आपणां अंतर नका मज ॥ २ ॥ तुका ह्मणे मोहो राखावा सतंत । नये पाहों अंत पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ २४३२ ॥ करूनि राहों जरी आत्माचि प्रमाण । निश्चळ नव्हे मन काय करूं ॥ धृ० ॥ जेवलिया विण काशाचे ढेंकर । शब्दाचे प्रकार शब्दचि ते ॥ १ ॥ पुरे पुरे

आतां तुमचें ब्रह्मज्ञान । आह्मासी चरण न सोडणें ॥ २ ॥ विरोधें विरोध वाढे पुढतो-पुढती । वासनेचे हातीं गर्भवास ॥ ३ ॥ सांडीमांडीअंगीं वसे पुण्यपाप । बंधन संकल्प याचि नांवें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मुक्तता मोकळी । ऐसा कोण बळी निरसी देह ॥ ५ ॥

॥ २४३३ ॥ तुमचे स्तुतियोग्य कोठें माझी वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ धृ० ॥ भक्तिभाग्य तरी नेदीं तुळसीदळ । जोडूनि अंजुळ उभा असें ॥ १ ॥ कैचें भाग्य ऐसें पाविजे सन्निध । नेणें पाळूं विध करुणा भाकीं ॥ २ ॥ संतांचे सेवटीं उच्छिष्टाची आस । करूनियां वास पाहातसें ॥ ३ ॥ करीं इच्छा मज ह्मणोत आपुलें । एखादिया बोलें निमित्याच्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे शरण आलों हें साधन । करितों चिंतन रात्रदिवस ॥ ५ ॥

॥ २४३४ ॥ सर्वविशीं आह्मीं हेचि जोडी केली । स्वामीची साधिली चरणसेवा ॥ धृ० ॥ पाहिलेंचि नाहीं मागें परतोनी । जिंकिला तो क्षणीं क्षण काळ ॥ १ ॥ नाहीं पडों दिला विचाराचा गोवा । नाहीं पाठी हेवा येऊं दिला ॥ २ ॥ केला लाग वेगीं अवघीचि तांतडी । भावना ते कुडी दुराविली ॥ ३ ॥ कोठें मग ऐसें होतें सावकास । जळो तया आस वेव्हाराची ॥ ४ ॥ तुका ह्मणे लाभ घेतला पालवीं । आतां नाहीं गोवी कशाचीही ॥ ५ ॥

॥ २४३५ ॥ येणें मुखें तुझे वर्णीं गुण नाम । तेंचि मज प्रेम देईं देवा ॥ धृ० ॥ डोळे भरूनियां पाहें तुझें मुख । तेंचि मज सुख देईं देवा ॥ १ ॥ कान भरोनियां ऐकें तुझी कीर्ती । ते मज विश्रांति देईं देवा ॥ २ ॥ वाहें रंगीं टाळी नाचेन उदास । देईं हातांस पायां बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा सकळ देहभाव । आणिक नको ठाव चिंतू यासी ॥ ४ ॥

॥ २४३६ ॥ तूं माझा मायबाप सकळ वित्त गोत । तूंचि माझें हितकरिता देवा ॥ धृ० ॥ तूंचि माझा देव तूंचि माझा जीव । तूंचि माझा भाव पांडुरंगा ॥ १ ॥ तूंचि माझा आचार तूंचि माझा विचार । तूंचि सर्व भार चालविसी ॥ २ ॥ सर्व भावें मज तूं होसी प्रमाण । ऐसी तुझी आण वाहातसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज विकला जीवभाव । कळे तो उपाव करीं आतां ॥ ४ ॥

॥ २४३७ ॥ वारंवार तुज द्यावया आठव । आइक तो भाव माझा कैसा ॥ धृ० ॥ गेले मग नये फिरोन दिवस । पुढिलांची आस गणित नाहीं ॥ १ ॥ गुणा अवगुणांचे पडती आघात । तेणें होय चित्त कासावीस ॥ २ ॥ कांहीं एक तुझा न देखों आधार । ह्मणउनी धीर नाहीं जीवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं ब्रह्मांडाचा जीव । तरि कां आह्मी कींव भाकीतसों ॥ ४ ॥

॥ २४३८ ॥ असोत हे तुझे प्रकार सकळ । काय खळखळ करावी हे ॥ धृ० ॥ आमुचें स्वहित जाणतसों आह्मी । तुझें वर्म नामीं आहे तुझ्या ॥ १ ॥ विचारितां आयुष्य जातें वांयांविण । रोज नागवण पडतसे ॥ २ ॥ राहेन मी तुझे पाय आठवुनी । आणिक तें मनीं येऊं नेदीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें येसी अनायासें । थोर तुज पिसें कीर्तनाचें ॥ ४ ॥

॥ २४३९ ॥ विष्णुदासां भोग । जरी आह्मां पीडी रोग ॥ धृ० ॥ तरि हें दिसे लाजि-

रवाणें । काय तुह्मांसी सांगणें ॥ १ ॥ आह्मां काळें खावें । बोलिलें तें वांया जावें ॥ २ ॥ तुका ह्मणे दास । आह्मी भोगूं गर्भवास ॥ ३ ॥

॥ २४४० ॥ भावें गावें गीत । शुद्ध करूनियां चित्त ॥ धृ० ॥ तुज व्हावा आहे देव । तरि हा सुलभ उपाव ॥ १ ॥ आणिकांचें कानीं । गुण दोष मना नाणीं ॥ २ ॥ मस्तक ठेंगणा । करीं संतांच्या चरणा ॥ ३ ॥ वेचीं तें वचन । जेणें राहे समाधान ॥ ४ ॥ तुका ह्मणे फार । थोडा तरी परउपकार ॥ ५ ॥

॥ २४४१ ॥ वचन तें नाहीं तोडीत शरीरा । भेदत अंतरा वज्राऐसें ॥ धृ० ॥ कांहीं न सहावें काशाही कारणें । संदेह निधानें देह बळी ॥ १ ॥ नाहीं शब्द मुखीं लागत तिखट । नाहीं जड होत पोट तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी गिळे अहंकार । तरी वसे घर नारायण ॥ ३ ॥

॥ २४४२ ॥ नव्हो आतां जीवीं कपटवसती । मग काकुळती कोणा यावें ॥ धृ० ॥ सत्याचिये मापें गाठीं नये नाड । आदि अंत गोड नारायण ॥१॥ चोखटिया नाहीं विटाळाचा आघात । साच तें साचांत सांचा पडे ॥ २ ॥ विचारिली वाट उसंत सीतळ । बुद्धीपुढें बळ तृणतुल्य ॥ ३ ॥ आहाराच्या घासें पचोनियां जिरे । वासनाही उरे उर्वरीत ॥ ४ ॥ तुका ह्मणे ताळा घालावा वचनीं । तूं माझी जननी पांडुरंगे ॥ ५ ॥

॥ २४४३ ॥ नव्हतीं हीं माझी जायाचीं भूषणें । असे नारायणें उचित केलें ॥ धृ० ॥ शब्दाच्या वोवोनी रत्नाचियां माळा । मुळींचा जिव्हाळा झरवणी ॥ १ ॥ अर्थांतरीं असे अनुभवसेवन । परिपाकीं मन साक्ष येथें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज सरतें परतें । हें नाहीं अनंतें उरो दिलें ॥ ३ ॥

॥ २४४४ ॥ सहज लीळा मी साक्षी याचा । नये वंचूं वाचा ऐसें जालें ॥ धृ० ॥ उपक्रमें वदे निशब्दाची वाणी । जें कोठें बंधनीं गुंपों नेणें ॥ १ ॥ तम नासी परि वेव्हारा वेगळा । रविप्रभाकळा वर्ते जन ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें गेला अतिशय । आतां पुन्हा नये तोंड दावूं ॥ ३ ॥

॥ २४४५ ॥ बोलाल या आतां आपुल्यापुरतें । मज या अनंतें गोवियेलें ॥ धृ० ॥ झाडिला न सोडी शांतींचा पालव । वेधी वेधें जीव वेधियेला ॥ १ ॥ तुमचे ते शब्द कोरडिया गोष्टी । मज सर्वें मिठी अंगसंगें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां होईल हे परी । अनुभव वरी येईल मग ॥ ३ ॥

॥ २४४६ ॥ जैसा तुह्मी दुरी आह्मां । तैसा राहा अंतरें ॥ धृ० ॥ नका येऊं देऊं आळ । अंगीं गोपाळ जडलासे ॥ १ ॥ अवघा हाचि राखा काळ । त्रिकाळचि भोवता ॥ २ ॥ तुका ह्मणे मज ऐसा । होतां पिसा जगनिंद्य ॥ ३ ॥

॥ २४४७ ॥ सतीचें तें घेतां वाण । बहु कठिण परिणामीं ॥ धृ० ॥ जिवासाठीं गौरव वाढे । आहाच जोडे तें नव्हे ॥ १ ॥ जरि होय उघडी वृष्टी । तरि गोष्टी युद्धाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगा येतां । तरी सत्ता धैर्याची ॥ ३ ॥

॥ २४४८ ॥ आडवा तो उभा । असे दाटोनियां प्रभा ॥ धृ० ॥ दव नाहीं एकविध ।

एक भाव असे शुद्ध ॥ १ ॥ भेदाभेद आटी । नाहीं फार कोठें तुटी ॥ २ ॥ तुका
गोवा । उगवा वेव्हाराचा हेवा ॥ ३ ॥

॥ २४४९ ॥ एका बोटाची निशाणी । परीपाक नाहीं मनीं ॥ धृ० ॥ तरि तें संपा
सोंग । कारणावांचूनियां व्यंग ॥ १ ॥ वैष्णवांचा धर्म । जग विष्णु नेणें वर्म ॥
अतिशयें पाप । तुका सत्य करी माप ॥ ३ ॥

॥ २४५० ॥ सत्यत्वेंशीं घेणें भक्तीचा अनुभव । स्वामीचा गौरव इच्छीतसें ॥ धृ
मग तें अवीट न भंगे साचारें। पावलें विस्तारें फिरों नेणें ॥ १ ॥ वाणी वदे त्याचा कोण
विश्वास । अभयें करें दास सत्य तई ॥ २ ॥ तुका ह्मणे आधीं न तांतडी । पायीं
जोडी तेणें शुद्ध ॥ ३ ॥

॥ २४५१ ॥ सर्वात्मकपण । माझें हिरोनि नेतो कोण ॥ धृ० ॥ मनीं भक्ती
आवडी । हेवा व्हावी ऐशी जोडी ॥ १ ॥ घेईन जन्मांतरें । हेंचि करावया खरें ॥
तुका ह्मणे देवा । ऋणी करूनि ठेवूं सेवा ॥ ३ ॥

॥ २४५२ ॥ आणितां त्या गती । हंस काउळे न होती ॥ धृ० ॥ सांडा सां
मठारे । येथें गांठीसवें धुरें ॥ १ ॥ नाकेविण मोती । उभ्या बाचारें फजिती ॥ २ ॥ तु
दाज तुका । येथें कोणी फुंदों नका ॥ ३ ॥

॥ २४५३ ॥ ढेंकणासी बाज गड । उतरचढ केवढी ॥ धृ० ॥ होता तैसा कळों भ
आला वाव अंतरींचा ॥ १ ॥ बोरामध्यें वसें अळी । अठोळीच भोंवती ॥ २ ॥ प
साठीं वेंची चणे । राजा ह्मणे तोंडें मी ॥ ३ ॥ बेडकानें चिखल खावा । काय ठ
सागर ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें आहे । काय पाहे त्यांत तें ॥ ५ ॥

॥ २४५४ ॥ धांव धांव गरुडध्वजा । आह्मां अनाथांच्या काजा ॥ धृ० ॥ बहु उ
कासावीस । ह्मणोनि पाहे तुह्मी वास ॥ १ ॥ पाहें पाहें त्या मारगें । कोणी येतें मा
लागें ॥ २ ॥ असोनियां ऐसा । तुज सारिखा कोंवसा ॥ ३ ॥ न लवावा उशीर । ने
कां हा केला धीर ॥ ४ ॥ तुका ह्मणे चाली । नको चालूं धांव घाली ॥ ५ ॥

॥ २४५५ ॥ पांडुरंगे पांडुरंगे । माझे गंगे माउलिये ॥ धृ० ॥ पान्हां घाली प्रेमधा
पूर क्षीरा लोटों दे ॥ १ ॥ अंगें अंग मेळउनी । करीं धणी फेडाया ॥ २ ॥ तुका
घेइन उड्या । सांडिन कुड्या भावना ॥ ३ ॥

॥ २४५६ ॥ गजइंद्र पशु आपें मोकलिला । तो तुज स्मरला पांडुरंगा ॥ धृ
त्यासाठीं गरुड सांडुनि धांवसी । माया झळंबसी दिनानाथा ॥ १ ॥ धेनु वत्सावरी
घाली जैसी । तैसें गजेंद्रासी सोडविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रीद बांधलें यासाठीं । भक्त
संकटीं रक्षावया ॥ ३ ॥

॥ २४५७ ॥ चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥ धृ० ॥ न करीं आणि
साधन । कष्टसी कां वांयांविण ॥ १ ॥ अठरा पुराणांचे पोटीं । नामाविण नाहीं क
॥ २ ॥ गीता जेणें उपदेशिली । ते ही विटेवरी माउली ॥ ३ ॥ तुका ह्मणे सार धरीं
वाचे हरिनाम उच्चारीं ॥ ४ ॥

॥ २४५८ ॥ पाहातां ठायाठाव । जातो अंतरोनि देव ॥ धृ० ॥ नये वाटों गुणदोषीं । मना जतन येविशीं ॥ १ ॥ त्रिविधदेह परिचारा । जनीं जनार्दन खरा ॥ २ ॥ तुका ह्मणे धीरें । विण कैसें होतें बरें ॥ ३ ॥

॥ २४५९ ॥ नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें ॥ धृ० ॥ न लगे सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ १ ॥ ठायींच बैसोनि करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ २ ॥ रामकृष्णहरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ३ ॥ याविण असतां आणिक साधन । वाहातसे आण विठोबाची ॥ ४ ॥ तुका ह्मणे सोपें आहे सर्वांहुनी । शाहाणा तो धणी घेतो येथें ॥ ५ ॥

॥ २४६० ॥ भाविकांचें काज अंगें देव करी । काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥ धृ० ॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं । आवडी तयांची मोठी देवा ॥ १ ॥ काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ॥ २ ॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसीं आवडती लडिवाळें । जाणीवेचें काळें तोंड देवा ॥ ४ ॥

॥ २४६१ ॥ सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचे विटेवरी ॥ धृ० ॥ डोळियांची धणी पाहातां न पुरे । तया लागीं झुरे मन माझें ॥ १ ॥ आन गोड कांहीं न लगे संसारीं । राहिले अंतरीं पाय तुझे ॥ २ ॥ प्राण रिघों पाहे कुडी हे सांडुनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥ ३ ॥ चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तुका ह्मणे येणें गरुडध्वजें ॥ ४ ॥

॥ २४६२ ॥ ऐका ऐका भाविकजन । कोण कोण व्हाल ते ॥ धृ० ॥ तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो ॥ १ ॥ नका शोधूं मतांतरें । नुमगे खरें बुडाल ॥ २ ॥ कलिमध्यें दास तुका । जातो लोकां सांगत ॥ ३ ॥

॥ २४६३ ॥ आपुलिया अंगें तोडी मायाजाळ । ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ॥ धृ० ॥ रांडापोरें त्याग करी कुटुंबाचा । नावरे हे वाचा आणि मन ॥ १ ॥ हर्षामर्ष जों हे नाहीं जों जिराले । तोंवरि हे केले चार त्यांनीं ॥ २ ॥ मुक्त जालों ऐसें बोलों जाये मुखें । तुका ह्मणे दुःखें बांधला तो ॥ ३ ॥

॥ २४६४ ॥ आलिया अतीता ह्मणतसां पुढारें । आपुलें रोकडें सत्त्व जाय ॥ धृ० ॥ काय त्याचा भार घेऊनि मस्तकीं । हीनकर्मी लोकीं ह्मणावया ॥ १ ॥ दारीं हाका कैसें करवतें भोजन । रुचि तरी अन्न कैसें देतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ध्वज उभारिला कर । ते शक्ति उदार काय जाली ॥ ३ ॥

॥ २४६५ ॥ जेथें लक्ष्मीचा वास । गंगा आली पापा नास ॥ धृ० ॥ तें म्यां हृदयीं धरिलें । ताप हरण पाउलें ॥ १ ॥ सेवा केली संतजनीं । सुखें राहिले लपोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे वांकी । भाट जाली तिहीं लोकीं ॥ ३ ॥

॥ २४६६ ॥ रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ धृ० ॥ देहभाव हरपला । तुज पाहातां विठ्ठला ॥ १ ॥ कळों नये सुखदुःख । तान हरपली भूक ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ३ ॥

॥ २४६७ ॥ जाणतें लेंकरूं । माता लागे दूर धरूं ॥ धृ० ॥ तैसें न करीं कृपावंते पांडुरंगे माझे माते ॥ १ ॥ नाहीं मुक्ताफळा । भेटी मागुती त्या जळा ॥ २ ॥ तुका ह्मणे लोणी । ताक सांडी निवडुनी ॥ ३ ॥

॥ २४६८ ॥ तुजविण कोणां । शरण जाऊं नारायणा ॥ धृ० ॥ ऐसा न देखें मी कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥ पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ॥ २ ॥ तुका ह्मणे ठायीं । जडून ठेलों तुझ्या पायीं ॥ ३ ॥

॥ २४६९ ॥ ऐसें भाग्य कई लाहाता होईन । अवघें देखें जन ब्रह्मरूप ॥ धृ० ॥ मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलावती ॥ १ ॥ शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त संगीं कामादिकां ॥ २ ॥ विवेकासहित वैराग्याचें बळ । धग्धगितो-ज्ज्वाळ अग्नि जैसा ॥ ३ ॥ भक्ति नवविधा भावशुद्ध बरी । अळंकारावरी मुगुटमणी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी पुरवी वासना । कोण नारायणा तुजविण ॥ ५ ॥

॥ २४७० ॥ कासया करावे तपाचे डोंगर । आणिक अपार दुःखरासी ॥ धृ० ॥ कासया फिरावे अनेक ते देश । दावितील आस पुढें लाभ ॥ १ ॥ कासया पुजावीं अनेक दैवतें । पोटभरे तेथें लाभ नाहीं ॥ २ ॥ कासया करावे मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुकासाठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे करीं कीर्तन पसारा । लाभ येईल घरा पाहिजे तो ॥ ४ ॥

॥ २४७१ ॥ वैष्णवमुनिविप्रांचा सन्मान । करावा आपण घेऊं नये ॥ धृ० ॥ प्रभु जाला तरी संसाराचा दास । विहित तयासी यांची सेवा ॥ १ ॥ तुका ह्मणे हे आशी-र्वादें बळी । जाईल तो छळी नरकायासीं ॥ २ ॥

॥ २४७२ ॥ देव वसे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥ धृ० ॥ ऐसें आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥ १ ॥ हरिजनासी भेटी । नहो अंगेसंगें तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें । भलें संतसंघट्टणें ॥ ३ ॥

॥ २४७३ ॥ भागसीण गेला । माझा सकळ विठ्ठला ॥ धृ० ॥ तुझा ह्मणवितों दास । केली उच्छिष्टाची आस ॥ १ ॥ राहिली तळमळ । तई पासोनी सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे धालें । पोट ऐसें कळों आलें ॥ ३ ॥

॥ २४७४ ॥ रायाचें सेवक । सेवटीचें पीडी रंक ॥ धृ० ॥ हा तों हिणाव कवणा । कां हो नेणां नारायणा ॥ १ ॥ परिसेंसी भेटी । नव्हे लोहोपणा तुटी ॥ २ ॥ तुझें नाम कंठीं । तुक्या काळासवें भेटी ॥ ३ ॥

॥ २४७५ ॥ सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा । माझ्या पांडुरंगा सारिकें तें ॥ धृ० ॥ न लगे हिंडणें मुंडणें तें कांहीं । साधनाची नाहीं आटाआटी ॥ १ ॥ चंद्रभागे स्नान विध तो हरिकथा । समाधान चित्ता सर्वकाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे काला वैकुंठीं दुर्लभ । विशेष तो लाभ संतसंग ॥ ३ ॥

॥ २४७६ ॥ नसतां अधिकार उपदेशासी बळात्कार । तरि ते केले हो चार माकडा आणि गारोडी ॥ धृ० ॥ धन धान्य राज्य बोल वृथा रंजवणें फोल । नाहीं तेथें ओल

बीज वेंची मूर्ख तो ॥ १ ॥ नये बांधों गांठी पररा आणी ऐसी बुद्धी । ...
शिष्टाचारअनुभव ॥ २ ॥ उपदेशी तुका मेघ वृष्टीनें आइका । संकल्पासी ...
तें उत्तम ॥ ३ ॥

॥ २४७७ ॥ घालूनियां मापीं । देवभक्त बैसले जपीं ॥ धृ० ॥ तैसी होते ...
निजनिजाची मुर्कुंडी ॥ १ ॥ अमुपीं उखतें । आपण वोस आपण यावे ...
आतां जाला । उगवे संकोच वहिला ॥ ३ ॥ अखंड नेलें वेठी । भार ...
॥ ४ ॥ आडकिला झोंपा । रिता कळिवराचा खोंपा ॥ ५ ॥ गोदातीरीं ...
करविते ह्राड ॥ ६ ॥ तुका ह्मणे बळें । उपदेशाचें तोंड काळें ॥ ७ ॥

॥ २४७८ ॥ उंबरांतील कीटका । हेंचि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥ धृ० ॥ ऐसे ...
झाडीं । ऐशीं झाडें किती नव खंडीं ॥ १ ॥ हेंचि ब्रह्मांड आह्मांसी । ...
अंडें कैसीं ॥ २ ॥ विराटाचे अंगीं तैसें । मोजूं जातां अगणित केश ॥ ३ ...
टाच्या कोटी । सांठवल्या ज्याच्या पोटीं ॥ ४ ॥ तो हा नंदाचा बाळक ...
ह्मणवी परमानंद ॥ ५ ॥ ऐशी अगम्य ईश्वरी लीळा । ब्रह्मानंदीं साम्य तुका ...

॥ २४७९ ॥ ब्रह्मज्ञान जरी एके दिवसीं कळे । तात्काळ हा गळे अभि...
अभिमान लागे शुकाचिये पाठीं । व्यासें उपराटी दृष्टि केली ॥ २ ॥ जन...
विला तेणें । अभिमान नाणें खोटें केलें ॥ २ ॥ खोटें करूनियां लाविला ...
शिखरासी शुक गेला ॥ ३ ॥ जाऊनियां तेणें साधिली समाधी । तुका ह...
आह्मीं ॥ ४ ॥

॥ २४८० ॥ सहज पावतां भगवंतीं परि हीं विकल्पें परतीं । फुका...
आठवण कां न धरिती ॥ धृ० ॥ हरि व्यापक सर्वगत हें तंव मुख्यत्वें वेदां...
चित्त असों द्यावें सावध ॥ १ ॥ विरजाहोम याचि नांवें देह नव्हे मी जाण...
जी यावें वरी लागे संकल्पा ॥ २ ॥ कामक्रोधें देह मळिण स्वाहाकारीं केंचें ...
पूजियेला यज्ञ मनमुंडण नव्हेची ॥ ३ ॥ अनन्यभक्तीचे उपाय ते या वि...
ध्याइल तो काय जाणें चुको मारग ॥ ४ ॥ आतां सांगे तुका एक तुह्मी ...
सांडीमांडी धोका शरण रिघतां गोमटें ॥ ५ ॥

॥ २४८१ ॥ आह्मीं जाणावें तें काई तुझें वर्म कोणे ठायीं । अंतप...
श्रुति बोलती ॥ धृ० ॥ होई मज तैसा मज तैसा साना सकुमार हृषीकेशा ...
आशा भुजा चारी दाखवीं ॥ १ ॥ खालता सप्तही पाताळा वरता स्वर्गाहूनि ...
तो मी मशक डोळां कैसा पाहों आपुल्या ॥ २ ॥ मज असे हा भरवसा ...
तयां तैसा । पंढरीनिवासा तुका ह्मणे गा विठोबा ॥ ३ ॥

॥ २४८२ ॥ वृक्ष वल्ली आह्मां सोयरीं वनचरें । पक्षी हीं सुस्वरें आळवि...
येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुण दोष अंगा येत ॥ १ ॥ आ...
पृथिवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करी ॥ २ ॥ कंथाकुमंडलु देहउपचा...

वितो वारा अवसरू ॥ ३ ॥ हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवूं रुची ॥ ४ ॥ तुका ह्मणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणासी ॥ ५ ॥

॥ २४८३ ॥ अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं ऐसें धेंडें ॥ धृ० ॥ तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ॥ १ ॥ मारी दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ३ ॥

॥ २४८४ ॥ सावधान ऐसें काय तें विचारा । आले हो संसारा सकळही ॥ धृ० ॥ अंतीं समयाचा करणें विचार । वेचती सादर घटिका पळें ॥ १ ॥ मंगळ हें नोहे कन्या-पुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपाट ॥ २ ॥ तुका ह्मणे देव अंतरला दुरी । डोळिया अंधारी पडलीसे ॥ ३ ॥

॥ २४८५ ॥ लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ॥ धृ० ॥ तैसा समरस जालों । तुजमाजी हरपलों ॥ १ ॥ अग्निकर्पुराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥ २ ॥ तुका ह्मणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥ ३ ॥

॥ २४८६ ॥ सुख नाहीं कोठें आलिया संसारीं । वांयां हांवभरी होऊं नका ॥ धृ० ॥ दुःखबांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाहीं कोठें ॥ १ ॥ चवदा कल्पेंवरी आयुष्य जयाला । परि तो राहिला ताटीखालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे वेगीं जाय सुटोनियां । धरूनि हृदयामाजी हरी ॥ ३ ॥

॥ २४८७ ॥ तुजकारितां नव्हे ऐसें कांहीं नाहीं । डोंगराची राई रंक राणा ॥ धृ० ॥ अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगा ॥ १ ॥ सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निराहारी दुर्वासा नवल नव्हे ॥ २ ॥ पंचभ्रतार द्रौपदी सती । करितां पितृशांति पुण्यधर्मा ॥ ३ ॥ दशरथा पातकें ब्रह्महत्ये ऐसीं । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा ॥ ४ ॥ मुनेश्वरा नाहीं दोष अणुमात्र । भांडवितां सूत्र वध होती ॥ ५ ॥ तुका ह्मणे माझे दोष ते कायीं । सरता तुझे पायीं जालों देवा ॥ ६ ॥

## पाळणा.

॥ २४८८ ॥ जननिया बाळका रे घातलें पाळणा । पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहूं कोणा । अखंड जडियेल्या तया ढाळ अंगणा । वैखरी धरूनि हातीं भाव दावीं खेळणा ॥ धृ० ॥ निजीं रे निजीं आतां । ह्मणोनि परिये दे माता । खेळतां कष्टलासी बाळा तूं रे नेणतां । निजीं रे निजीं आतां ॥ १ ॥ खेळतां बाहेरि रे मुला लोकांच्या सवें । बागुल काळतोंडा नाहीं नेतो तें ठावें । खेळतां दुश्चित्ता रे देखोनि तें न्यावें । ह्मणोनि सांगें तुज शीघ्र वचन पाळावें ॥ २ ॥ संचित मागें तुज शुद्ध होतें सांगातीं । तेणें तुज वांचविलें वेरझारिया हातीं । आणिक नेलीं मागें काय जाणों तीं किती । आलासि येथ-वरि थोरपुण्यें बहुतीं ॥ ३ ॥ खेळतां शुक देवा तो रे लागला पाठीं । लपाला वरुषें बारा तिये मातेचे पोटीं । रिघतां बाहेरि रे पळे घेऊनि कासोटी । तेचि परि जाली स्वामी भेणें रिघें कपाटीं ॥ ४ ॥ खेळतां चक्रवर्ती जनका लागला धाक । पडिला अग्नीमाजी पाव

त्यजिलीं नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे पडिलों पुंडलिका-पाशीं । धांव हृषीकेशी आळिंगीं मज ॥ ३ ॥

॥ २४९६ ॥ इंद्रियांची दिनें । आह्मी केलों नारायणें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि ऐसें सोसी । काय सांगों कोणांपाशीं ॥ १ ॥ नाहीं अंगीं बळ । त्याग करींसा सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे मोटें । प्रारब्ध होतें खोटें ॥ ३ ॥

॥ २४९७ ॥ हातीं धरूं जावें । तेणें परतेंचि व्हावें ॥ धृ० ॥ ऐसा कां हो आला वांटा । हीन भाग्याचा करंटा ॥ १ ॥ देव ना संसार । दोहीं ठायीं नाहीं थार ॥ २ ॥ तुका ह्मणे पीक । भूमि न दे न मिळे भीक ॥ ३ ॥

॥ २४९८ ॥ मोलें घातलें रडाया । नाहीं असुं आणि माया ॥ धृ० ॥ तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥ १ ॥ वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ॥ २ ॥ काजव्याच्या ज्योती । तुका ह्मणे न लगे वाती ॥ ३ ॥

॥ २४९९ ॥ तरिच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥ धृ० ॥ नाहीं तरि काय थोडीं । श्वानशूकरें बापुडीं ॥ १ ॥ ज्याल्याचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ॥ २ ॥ तुका ह्मणे भले । ज्याच्या नांवें मानवले ॥ ३ ॥

## ळळतें.

॥ २५०० ॥ देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥ धृ० ॥ मी तों सांगतसें भावें । असो ठावें सकळां ॥ १ ॥ निराकारी ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ॥ ३ ॥

॥ २५०१ ॥ न कळे माव मुनि मागे एकी अंतुरी । साठी संवत्सरा जन्म तया उदरीं ॥ धृ० ॥ कैसा आकळे गे माये चपळ वो । त्रिभुवनव्यापक सकळ वो ॥ १ ॥ हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा । गरुडा विटंबना रूपा सत्यभामेच्या ॥ २ ॥ द्रौपदीचा भेद पुरविला समयीं । ऋषि फळवनीं देठीं लावितां ठायीं ॥ ३ ॥ अर्जुनाच्या रथीं कपि स्तंभीं ठेविला । दोहीं पैज तेथें गर्व हरी दावुला ॥ ४ ॥ भावभक्ति सत्त्वगुण जाला दुर्जना । तुका ह्मणे सकळां छंदे खेळे आपणा ॥ ५ ॥

॥ २५०२ ॥ उदारा कृपाळा अगा देवांच्या देवा । तुजसवें पण आतां आमुचा दावा ॥ धृ० ॥ कैसा जासी सांग आतां मजपासुनी । केलें घाताघात दिलें संसारा पाणी ॥ १ ॥ अवघीं आवरूनि तुझे लाविलीं पाठीं । आतां त्या विसर सोहंकोहंच्या गोष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां चरणीं घातली मिठी । पडिली ते पडो तुह्मा आह्मांसी तुटी ॥ ३ ॥

॥ २५०३ ॥ जाली होती काया । बहु मळीन देवराया ॥ धृ० ॥ तुमच्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥ १ ॥ अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा केला तोडा ॥ २ ॥ तुका ह्मणे देह पायीं । ठेवूनि झालों उतराई ॥ ३ ॥

॥ २५०४ ॥ आजि आनंदु रे एकी परमानंदु रे । जया श्रुति नेति नेति ह्मणती गोविंदु रे ॥ धृ० ॥ विठोबाचीं वेडीं आह्मां आनंदु सदा । गाऊं नाचों वाऊं टाळी रंजवूं गोविंदा

जळत एक । भरलासे कांप अंगीं सुख नाठवे दुःख । आपपर तेंही नाहीं देहभाव सकळिक ॥ ५ ॥ सिभ्रीया चक्रवर्ती कव पडिली अवचिती । धीट तो न भे तया मास कापिलें हातीं । टाकिलें तयावरी खुणें गोविला अंतीं । पावला मायबाप हिरोन घेतला हातीं ॥ ६ ॥ बांधलें अजामेळा वेश्यागणिका कैसी । मारिली हाक धाकें कळलें मायबापासी । घातली धांव नेटें वेगीं पावला त्यासी । हिरोनि नेलीं दोघें आपणयां तीं पासीं ॥ ७ ॥ धरुनी आठवू रे बाळा राहें निश्चळ । खेळतां दुश्चिता रे नको जाऊं बरळ । टोंकताहे तुजलागीं दिवस लेखुनी काळ । मग नेदी आळवूं रे नेत्रीं घालीं पडळ ॥ ८ ॥ ऐसी ती कृपावंतें बाळा मोहिलें चित्त । सुस्वरें कंठ गाय मधुर आणि संगीत । तेणें तेंचि चित्त राहे होऊनियां निवांत । पावली तुका ह्मणे नाहीं विश्वास ते घात ॥ ९ ॥

॥ २४८९ ॥ उभ्या बाजारांत कथा । हे तों नावडे पंढरिनाथा ॥ धृ० ॥ अवघें पोटासाठीं ढोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ १ ॥ लावी अनुसंधान । कांहीं देईल ह्मणउन ॥ २ ॥ काय केलें रांडलेंका । तुला राजी नाहीं तुका ॥ ३ ॥

॥ २४९० ॥ असोत लोकांचे बोल शिरावरी । माझी मज बरी विठाबाई ॥ धृ० ॥ आपंगिलें मज आहे ते कृपाळू । बहुत कनवाळु अंतरींची ॥ १ ॥ वेदशास्त्रें जिसी वर्णिती पुराणें । तिचें मी पोसणें लडिवाळ ॥ २ ॥ जिचें नाम कामधेनु कल्पतरू । तिचें मी लेकरूं तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २४९१ ॥ वाराणसी गया पाहिली द्वारका । परि नये तुका पंढरीच्या ॥ धृ० ॥ पंढरीसी नाहीं कोणा अभिमान । पायां पडे जन एकमेकां ॥ १ ॥ तुका ह्मणे जाय एकवेळ पंढरी । तयाचिये घरीं यम नये ॥ २ ॥

॥ २४९२ ॥ सांडूनियां सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥ धृ० ॥ पाहूनियां झाडें वरबडूनि पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥ १ ॥ वेंचूनिया चिंध्या भरूनियां धागा । गुंडाळूनि ढुंगा आळवावें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥ ३ ॥

॥ २४९३ ॥ दह्यांचियां अंगीं निघे ताक लोणी । एका मोलें दोन्ही मागों नये ॥ धृ० ॥ आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें । दोहींसी समान पाहों नये ॥ १ ॥ पृथ्वीचा पोटीं हिरा गारगोटी । दोहींसी संसाटी करूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे संत आणि जन । दोहींसी समान भजूं नये ॥ ३ ॥

॥ २४९४ ॥ तेरा दिवस जाले निश्चक्र करितां । न पवसी अनंता मायबापा ॥ धृ० ॥ पाषाणांची खोळ घेऊनि बैसलासी । काय हृषीकेशी जालें तुज ॥ १ ॥ तुजवरी आतां प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥ २ ॥ फार विठाबाई धरिली तुझी आस । करीन जीव नास पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन चंद्रभागे ॥ ४ ॥

॥ २४९५ ॥ लोक फार वाखा अमंगळ जाला । त्याचा त्याग केला पांडुरंगा ॥ धृ० ॥ विषयां वंचलों मीपणा मुकलों । शरण तुज आलों पांडुरंगा ॥ १ ॥ घरदार अवघीं

त्यजिलीं नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे पडिलों पुंडलिकापाशीं । धांव हृषीकेशी आळिंगीं मज ॥ ३ ॥

॥ २४९६ ॥ इंद्रियांची दिनें । आह्मी केलों नारायणें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि ऐसें सोसी । काय सांगों कोणांपाशीं ॥ १ ॥ नाहीं अंगीं बळ । त्याग करींसा सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे मोटें । प्रारब्ध होतें खोटें ॥ ३ ॥

॥ २४९७ ॥ हातीं धरूं जावें । तेणें परतेंचि व्हावें ॥ धृ० ॥ ऐसा कां हो आला वांटा । हीन भाग्याचा करंटा ॥ १ ॥ देव ना संसार । दोहीं ठायीं नाहीं थार ॥ २ ॥ तुका ह्मणे पीक । भूमि न दे न मिळे भीक ॥ ३ ॥

॥ २४९८ ॥ मोलें घातलें रडाया । नाहीं असुं आणि माया ॥ धृ० ॥ तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥ १ ॥ वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ॥ २ ॥ काजळ्याच्या ज्योती । तुका ह्मणे न लगे वाती ॥ ३ ॥

॥ २४९९ ॥ तरिच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥ धृ० ॥ नाहीं तरि काय थोडीं । श्वानशूकरें बापुडीं ॥ १ ॥ ज्याल्याचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ॥ २ ॥ तुका ह्मणे भले । ज्याच्या नांवें मानवले ॥ ३ ॥

## ळळतें.

॥ २५०० ॥ देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥ धृ० ॥ मी तों सांगतसें भावें । असो ठावें सकळां ॥ १ ॥ निराकारी ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ॥ ३ ॥

॥ २५०१ ॥ न कळे माव मुनि मागे एकी अंतुरी । साठी संवत्सरा जन्म तया उदरीं ॥ धृ० ॥ कैसा आकळे गे माये चपळ वो । त्रिभुवनव्यापक सकळ वो ॥ १ ॥ हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा । गरुडा विटंबना रूपा सत्यभामेच्या ॥ २ ॥ द्रौपदीचा भेद पुरविला समयीं । ऋषि फळवनीं देंठीं लावितां ठायीं ॥ ३ ॥ अर्जुनाच्या रथीं कपि स्तंभीं ठेविला । दोहीं पैज तेथें गर्व हरी दावुला ॥ ४ ॥ भावभक्ति सत्त्वगुण जाला दुर्जना । तुका ह्मणे सकळां छंदे खेळे आपणा ॥ ५ ॥

॥ २५०२ ॥ उदारा कृपाळा अगा देवांच्या देवा । तुजसवें पण आतां आमुचा दावा ॥ धृ० ॥ कैसा जासी सांग आतां मजपासुनी । केलें वाताहात दिलें संसारा पाणी ॥ १ ॥ अवघीं आवरूनि तुझे लाविलीं पाठीं । आतां त्या विसर सोहंकोहंच्या गोष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां चरणीं घातली मिठी । पडिली ते पडो तुह्मा आह्मांसी तुटी ॥ ३ ॥

॥ २५०३ ॥ जाली होती काया । बहु मळीन देवराया ॥ धृ० ॥ तुमच्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥ १ ॥ अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा केला तोडा ॥ २ ॥ तुका ह्मणे देह पायीं । ठेवूनि झालों उतराई ॥ ३ ॥

॥ २५०४ ॥ आजि आनंदु रे एकी परमानंदु रे । जया श्रुति नेति नेति ह्मणती गोविंदु रे ॥ धृ० ॥ विठोबाचीं वेडीं आह्मां आनंदु सदा । गाऊं नाचों वाऊं टाळी रंजवूं गोविंदा

आतां कडवाड । वारीन हे आड कामक्रोध ॥ २ ॥ तुका ह्मणे जाळीं अळसाची धाडी । नव्हती आली जोडी कळों साच ॥ ३ ॥

॥ २९२३ ॥ जालें समाधान । तुमचे धरिले चरण ॥ धृ० ॥ आतां उठावेंसें मना । येत नाहीं नारायणा ॥ १ ॥ सुरवाडिकपणें । येथें सांपडलें केणें ॥ २ ॥ तुका ह्मणे भाग । गेला निवारला लाग ॥ ३ ॥

॥ २९२४ ॥ मुखाकडे वास । पाहें करूनियां आस ॥ धृ० ॥ आतां होईल ते शिरीं । मनोगत आज्ञा धरीं ॥ १ ॥ तुह्मीं अंगिकार । केला पाहिजे हें सार ॥ २ ॥ तुका ह्मणे द्वारीं । उभें याचक मी हरी ॥ ३ ॥

॥ २९२५ ॥ नाहीं माथां भार । तुह्मी घेत हा विचार ॥ धृ० ॥ जाणोनियां ऐसें केलें । तुरिल अंगेसी लाविलें ॥ १ ॥ आतां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडी घडीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुरी । देवा खोटी ऐसी उरी ॥ ३ ॥

॥ २९२६ ॥ माझें जड भारी । आतां अवघें तुह्मांवरी ॥ धृ० ॥ जालों अंकित अंकिला । तुमच्या मुकलों मागिला ॥ १ ॥ करितों जें काम । माझी सेवा तुझें नाम ॥ २ ॥ तुका पायां लागे । कांहीं नेदी ना न मगे ॥ ३ ॥

॥ २९२७ ॥ तुह्मी आह्मी भले आतां । जालों चिंता काशाची ॥ धृ० ॥ आपुलाले आलों स्थळीं । मौन कळी वाढेना ॥ १ ॥ सहज जें मनीं होतें । तें उचितें घडलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नसतें अंगा । येत संगा सारिखें ॥ ३ ॥

॥ २९२८ ॥ चित्ता ऐसी नको देऊं आठवण । जेणें देवाचे चरण अंतरें तें ॥ धृ० ॥ आलिया वचनें रामनामध्वनी । ऐकावीं कानीं ऐसीं गोडें ॥ १ ॥ मत्सराचा ठाव शरीरीं नसावा । लाभेंविण जीवा दुःख देतो ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे अंतर शीतळ । शांतीचें तें बळ क्षमा अंगीं ॥ ३ ॥

॥ २९२९ ॥ कोण पुण्य कोणा गांठीं । ज्यासी ऐसियांची भेटी ॥ धृ० ॥ जिहीं हरि धरिला मनीं । दिलें संसारासी पाणी ॥ १ ॥ कोण हा भाग्याचा । ऐसियांसीं बोले वाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचे भेटी । होय संसारासी तुटी ॥ ३ ॥

॥ २९३० ॥ तरिच हा जीव संसारीं उदास । धरिला विश्वास तुह्मां सोई ॥ धृ० ॥ एके जातीविण नाहीं कळवळा । ओढली गोपाळा सूत्रदोरी ॥ १ ॥ फुटतसे प्राण क्षणाच्या विसरें । हें तों परस्परें सारिखेंची ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा संदेह निवारला ॥ ३ ॥

॥ २९३१ ॥ किती विवंचना करीतसें जीवीं । मन धांवडवी दाही दिशा ॥ धृ० ॥ कोणा एका भावें तुह्मी अंगिकार । करावा विचार याच साठीं ॥ १ ॥ इतर ते आतां लाभ तुच्छ जाले । अनुभवा आले गुणागुण ॥ २ ॥ तुका ह्मणे लागो अखंड समाधी । जावें प्रेमबोधीं बुडोनियां ॥ ३ ॥

॥ २९३२ ॥ दिक चिया नाहीं संसारसंबंधा । तुटेना या बाधा भवरोगाची ॥ धृ० ॥ तांतडीत करीं ह्मणऊनि तांतडी । साधिली ते घडी सोनियाची ॥ १ ॥ संकल्पाच्या

बीजें इंद्रियांची चाली । प्रारब्ध तें घाली गर्भवासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बीजें जाळुनी सकळ । करावा गोपाळ आपुला तो ॥ ३ ॥

॥ २५३३ ॥ आतां होइन धरणेकरी । भीतरीच कोंडीन ॥ धृ० ॥ नाहीं केली जीवें-साठीं । तों कां गोष्टी रुचे ते ॥ १ ॥ आधीं निर्धार तो सार । मग भार सोसीन ॥ २ ॥ तुका ह्मणे खाऊं जेवूं । नेदूं होऊं वेगळा ॥ ३ ॥

॥ २५३४ ॥ होइल तरि पुसापुसी । उत्तर त्यासी योजावें ॥ धृ० ॥ तोंवरि मी पुढें कांहीं । आपुलें नाहीं घालीत ॥ १ ॥ जाणोनियां अंतर देव । जेव्हां भेव फेडील ॥ २ ॥ तुका ह्मणे धरिला हातीं । करील खंती वेगळें ॥ ३ ॥

॥ २५३५ ॥ हा तों नव्हे कांहीं निराशेचा ठाव । भलें पोटीं वाव राखिलिया ॥ धृ० ॥ विश्वंभरें विश्व सामाविलें पोटीं । तेथेंचि शेवटीं आह्मी असों ॥ १ ॥ नेणतां चिंतन करितों अंतरीं । तेथें अभ्यंतरीं उमटेल ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा स्वामी अबोलणा । पुरवूं खुणे खुणा जाणतसों ॥ ३ ॥

॥ २५३६ ॥ निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोंवळा सगुणें प्रतिपाळी ॥ धृ० ॥ केलाच करावा केला कइवाड । होईल तें गोड न परेते ॥ १ ॥ मथिलिया लागे नवनीत हाता । नासे वितळितां आहाच तें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्त ॥ ३ ॥

॥ २५३७ ॥ बहु देव बरें जालें । नसतें गेलें सोंवळें ॥ धृ० ॥ धोवटाशीं पडिली गांठी । जगजेठीप्रसादें ॥ १ ॥ गादल्याचा जाला जाडा । गेली पीडा विकल्प ॥ २ ॥ तुका ह्मणे वरावरी । निर्मळ करी निर्मळा ॥ ३ ॥

॥ २५३८ ॥ स्वामित्वाचीं वर्में असोनि जवळी । वाहों जावें मोळी गुणांसवें ॥ धृ० ॥ कावाडापासूनि सोडवा दातारा । कांहीं नका भारा पात्र करूं ॥ १ ॥ धन-वंत्र्याचिये अंगीं सत्ताबळ । व्याधि तो सकळ तोडावया ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें मोड्यासी कोंपट । सांडव्याची वाट विसरावी ॥ ३ ॥

॥ २५३९ ॥ ऋणाच्या परिहारा जालों वोळगणा । द्यावी नारायणा वासलाती ॥ धृ० ॥ जालों उतराई शरीरसंकल्पें । चुकों द्यावीं पापें सकळही ॥ १ ॥ आजिवरि होतों धरून जिवासी । व्याजें कासाविसी बहु केलें ॥ २ ॥ तुका ह्मणे मना आणिला म्यां भाव । तुमचा तेथें ठाव आहे देवा ॥ ३ ॥

॥ २५४० ॥ येणें पांगें पायांपाशीं । निश्चयेंसी राहेन ॥ धृ० ॥ सांगितली करीन सेवा । सकळ देवा दास्यत्व ॥ १ ॥ बंधनाची तुटली बेडी । हेचि जोडी मग आह्मां ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे क्षण । पायांविण वेगळा ॥ ३ ॥

॥ २५४१ ॥ आपुल्या आपण उगवा लिगाड । काय माझें जड करुन घ्याल ॥ धृ० ॥ उद्धारासी काय उधाराचें काम । वाढवूंचि श्रम नये देवा ॥ १ ॥ करा आतां मजसाठीं वाड पोट । ठाव नाहीं तंट जालें लोकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बाकी झडलियावरी । न पडे व्यवहारीं संचिताचे ॥ ३ ॥

॥ २५४२ ॥ सर्व संगीं विट आला । तूं एकला आवडसी ॥ धृ० ॥ दिली आतां पायीं मिठी । जगजेठी न सोडीं ॥ १ ॥ बहु जालों खेदक्षीण । येणें सीण तो नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे गेलो त्रास । बहु त्या आस स्थळाची ॥ ३ ॥

॥ २५४३ ॥ शीतळ तें शीतळाहुनी । पायवणी चरणींचें ॥ धृ० ॥ सेवन हें घिर धरीं । अंतरींही वरदळा ॥ १ ॥ अवघेंचि नासी पाप । तीर्थ बाप माझ्याचें ॥ २ ॥ बैसोनियां तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला ॥ ३ ॥

॥ २५४४ ॥ गोदे कांठीं होता आड । करूनि कोड कवतुकें ॥ धृ० ॥ देखण्यांनीं एक केलें । आइत्या नेलें जिवनापें ॥ १ ॥ राखोनियां ठाव । अल्प जीव लावुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे फिटे धनी । हे सज्जनीं विश्रांती ॥ ३ ॥

॥ २५४५ ॥ न पाहें माघारें आतां परतोनी । संसारापासूनि विटला जीव ॥ धृ० ॥ सामोरें येऊनि कवळीं दातारा । काळाच्या हाकारा न साहावे ॥ १ ॥ सावधान चित्त होईल आधारें । खेळतांही बरें वाटईल ॥ २ ॥ तुका ह्मणे कंठ दाटला या सोसें । न पवेंचि कैसें जवळी हें ॥ ३ ॥

॥ २५४६ ॥ मथनीचें नवनीत । सर्व हितकारक ॥ धृ० ॥ दंडवत दंडा परी । मागें उरी उरवावी ॥ १ ॥ वचनाचा तो पसरु काई । तांतडी डोईपार्शीच ॥ २ ॥ तुका ह्मणे जगजेठी । लावीं कंठीं उचलुनी ॥ ३ ॥

॥ २५४७ ॥ अन्नचिताचि हातीं ठेवा । दिला सेवा न करितां ॥ धृ० ॥ भाग्य फळलें जाली भेटी । नेघें तुटी यावरी ॥ १ ॥ दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आतां यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे वांटा जाला । बोलों बोली देवासीं ॥ ३ ॥

॥ २५४८ ॥ समर्थाची धरिली कास । आतां नाश काशाचा ॥ धृ० ॥ धांवें पावें करीन लाहो । तुमचा आहो विठ्ठला ॥ १ ॥ न लगे मज पाहाणें दिशा । हाकेसरिसा ओढसी ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे धीर । तुह्मां स्थिर दयेनें ॥ ३ ॥

॥ २५४९ ॥ करूं तैसें पाठांतर । करुणाकर भाषण ॥ धृ० ॥ जिहीं केला मूर्तिमंत । ऐसे संतप्रसाद ॥ १ ॥ सोज्ज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागीला ॥ २ ॥ तुका ह्मणे घेऊं धांवा । करूं हांवा ते जोडी ॥ ३ ॥

॥ २५५० ॥ अचळ न चळे ऐसें जालें मन । धरूनि निज खुण राहिलोंसें ॥ धृ० ॥ ध्यावडी बैसली गुणांची अंतरीं । करूं धणीवरी सेवन तें ॥ १ ॥ एकविध भाव नव्हे अभावना । आणिकिया गुणां न मिळवे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें पडिलें आहारीं । ध्यान विटेवरी ठाकलें तें ॥ ३ ॥

॥ २५५१ ॥ काय तुह्मी थोरी वर्णूं मी पामर । होसी दयाकर कृपासिंधू ॥ धृ० ॥ तुज ऐसी दया नाहीं आणिकासी । ऐसें हृषीकेशी नवल एक ॥ १ ॥ कुरुक्षेत्रभूमीवरी पक्षी व्याले । तृणामाजी केलें कोठें त्यांनीं ॥ २ ॥ अकस्मात तेथें रणखांब रोविला । युद्धाच्या नेमिला ठाव तेथें ॥ ३ ॥ कौरव पांडव दळभार दोन्ही । झुंजावया रणीं आले तेथें ॥ ४ ॥ तये काळीं तुज पक्षी आठविती । पाव बा श्रीपति ह्मणोनियां ॥ ५ ॥ हस्ती घोडे रथ

अर्थे धांवतील । पाषाण होतील शतचूर्ण ॥ ६ ॥ ऐसिये आक्रांतीं वांचों कैसे परी । धांव आ श्रीहरि लवलाहें ॥ ७ ॥ टाकोनियां पिलीं कैसें जावें आतां । पावें जगन्नाथा लवलाहीं ॥ ८ ॥ आली तिये काळीं कृपा तुझ्या चित्ता । अनाथांच्या नाथा नारायणा ॥ ९ ॥ एका गजाचिया कंठीं घंटा होती । पाडिली अवचिती तयांवरी ॥ १० ॥ अठरा दिवस तेथें द्वंद्वयुद्ध जालें । वारा ऊन लागलें नाहीं तया ॥ ११ ॥ झुंज जाल्यावरी दाविलें अर्जुना । तुह्मी नारायणा पक्षियांसी ॥ १२ ॥ पाहें आपुलिया दासां म्यां राखिलें । रणीं वांचविलें कैशा परी ॥ १३ ॥ ऐसी तुज माया आपुल्या भक्तांची । माउली आमुची तुका ह्मणे ॥ १४ ॥

॥ २९९२ ॥ वैष्णवां संगती सुख वाटे जीवा । आणिक मी देवा कांहीं नेणें ॥ धृ० ॥ गायें नाचें उडें आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ॥ १ ॥ लाज भय शंका दुरा-विला मान । न कळे साधन यापरतें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुल्या सायासें । आह्मां जगदीशें सांभाळावें ॥ ३ ॥

॥ २९९३ ॥ शरण शरण वाणी । शरण त्रिवाचा विनवणी ॥ धृ० ॥ स्तुति न पुरे हे वाचा । सत्य दास मी दासांचा ॥ १ ॥ देह सांभाळुन । पायांवरी लोटांगण ॥ २ ॥ विनवी तुका संतां दीन । नव्हे गोरवें उत्तीर्ण ॥ ३ ॥

॥ २९९४ ॥ लेंकरा लेववी माता अळंकार । नाहीं अंतपार आवडीसी ॥ धृ० ॥ कृपेचें पोसणें तुमचें मी दीन । आजि संतजन मायबाप ॥ १ ॥ आरुषा उत्तरीं संतोषे माउली । कवळूनि घाली हृदयांत ॥ २ ॥ पोटा आलें त्याचे नेणें गुणदोष । कल्याणचि असे असावें हें ॥ ३ ॥ मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघें गंगा काई परतों जाणे ॥ ४ ॥ तुका ह्मणे कोठें उदार मेघां शक्ती । माझी तृषा किती चातकाची ॥ ५ ॥

॥ २९९५ ॥ शुक्ति तंव जाल्या कुंठित सकळा । उरली हे कळा जीवनाची ॥ धृ० ॥ संतचरणीं भावें ठेविलें मस्तक । जोडोनि हस्तक राहिलोंसें ॥ १ ॥ जाणपणें नेणें कांहींचि प्रकार । साक्षी तें अंतर अंतरासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी केलें अभयदान । तेणें समाधान राहिलेंसे ॥ ३ ॥

॥ २९९६ ॥ हागे आलों कोणी ह्मणे बुडतिया । तेणें किती तया बळ चढे ॥ धृ० ॥ तुह्मी तंव भार घेतला सकळ । आश्वासिलों बाळ अभयकरें ॥ १ ॥ भुकेलिया आस दावितां निर्धार । किती होय धीर समाधान ॥ २ ॥ तुका ह्मणे दिली चिंतामणीसाटीं । उचित कांचवटी दंडवत ॥ ३ ॥

॥ २९९७ ॥ कैसा तीं देखिला होसील गोपाळीं । पुण्यवंतीं डोळीं नारायणा ॥ धृ० ॥ तेणें लोभें जीव जालासे बराडी । आह्मी ऐशी जोडी कई लाभों ॥ १ ॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवें श्रीमुख अनुभवितां ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे देसी आलिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥ ३ ॥

॥ २९९८ ॥ कासया या लोभें केलें आर्तभूत । सांगा माझें चित्त नारायणा ॥ धृ० ॥ चातकाचे परि एकचि निर्धार । लक्षभेदीतीर फिरों नेणें ॥ १ ॥ सांवळें रूपडें चतुर्भुज

मूर्ती । कृष्णनाम चित्तीं संकल्प हा ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं आवडीसी ठाव । नको माझा भाव भंगों देऊं ॥ ३ ॥

॥ २५५९ ॥ काय माझा पण होईल लटिका । ब्रिदावळी लोकां दाविली ते ॥ धृ० ॥ खरी करूनियां देईं माझी आळी । येऊनि कुरवाळीं पांडुरंगे ॥ १ ॥ आणिक त्यां कोणा ह्मणवावें हातीं । नये काकुलती दुजियासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज येथेंचि ओळखी । होईन तो सुखी पायांनींच ॥ ३ ॥

॥ २५६० ॥ तुह्मां आह्मां जंव जालिया समान । तेथें कोणां कोण सनमानी ॥ धृ० ॥ उरी तों राहिलें गोमटें गौरव । ओढे माझा जीव पायांपाशीं ॥ १ ॥ नेणपणें आह्मी आळवूं चोरसें । बोलावितों रसें शब्दरत्नें ॥ २ ॥ तुका ह्मणे लळे पाळीं वो विठ्ठले । कां हे उरविले भेदाभेद ॥ ३ ॥

॥ २५६१ ॥ नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळ्याचा वाद करीतसें ॥ धृ० ॥ कासयानें बळ करूं पायांपाशीं । भाकावी ते दासीं करुणा आह्मीं ॥ १ ॥ काय मज चाड असे या लौकिकें । परि असे निकें अनुभवाचें ॥ २ ॥ लांचावल्यासाठीं वचनाची आळी । टकळ्यानें घोळी जवळी मन ॥ ३ ॥ वाटतसे आस पुरविसी ऐसें । तरि अंगीं पिसें लावियेलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी येथेंचि आवडी । श्रीमुखाची जोडी इच्छीतसें ॥ ५ ॥

॥ २५६२ ॥ ह्मणउनी लवलाहें । पाय आहें चिंतित ॥ धृ० ॥ पाठिलागा येतो काळ । तूं कृपाळ माउली ॥ १ ॥ बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं जननी । ये निर्वाणीं विठ्ठले ॥ ३ ॥

॥ २५६३ ॥ जेणें वाढे अपकीर्ती । सर्वार्थीं तें वर्जावें ॥ धृ० ॥ सत्य रुचे भलेपण । वचन तें जगासी ॥ १ ॥ होइजे तें शुद्ध त्यागें । वाउगें तें सारावें ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटें वर्म । नित्यकर्म काळिमा ॥ ३ ॥

॥ २५६४ ॥ याची सवे लागली जीवा । गोडी हेवा संगाचा ॥ धृ० ॥ परतें न सरवे दुरी । क्षण हरीपासुनी ॥ १ ॥ जालें तरीं काय तंट । आतां चट न संडे ॥ २ ॥ तुका ह्मणे चक्रचाळे । वेड बळें लाविलें ॥ ३ ॥

॥ २५६५ ॥ याचा तंव हाचि मोळा । देखिला डोळा उदंड ॥ धृ० ॥ नेदी मना फिरों मागें । अंगा अंगें संचरे ॥ १ ॥ कांगा याची नेणा खोडी । जीभा जोडी करितसां ॥ २ ॥ पांघरे तें बहु काळें । घोंगडेंही ठायींचें ॥ ३ ॥ अंगीं वसेचि ना लाज । न ह्मणे भाज कोणाची ॥ ४ ॥ सर्वसाक्षी अबोल्यानें । दुश्चित कोणें नसावें ॥ ५ ॥ तुका ह्मणे धरिला हातीं । मग निश्चिंती हरीनें ॥ ६ ॥

॥ २५६६ ॥ प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥ धृ० ॥ तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घरबुडी ॥ १ ॥ बहुतां ऐसें केलें मागें । लाग लागें लागेना ॥ २ ॥ हो कां नर अथवा नारी । लाहान थोरीं आदर ॥ ३ ॥ जालें वेगळें लोकीं पुरे । मग तुरे समूळ ॥ ४ ॥ कळेना तो आहे कैसा । कोणी दिशा बहु थोडा ॥ ५ ॥ तुका ह्मणे दुसऱ्या भावें । छायें नांवें न देखवे ॥ ६ ॥

॥ २५६७ ॥ न संडावा आतां ऐसें वाटे ठाव । भयाशीं उपाव रक्षणाचा ॥ धृ० ॥ ह्मणऊनि मनें वळियेलें मन । कारियेकारण चाड नाहीं ॥ १ ॥ नानाची उपाधि करूनियां मूळ । राखतां विटाळ तेंचि व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें न वेचे वचन । निजीं निजखूण सांपडली ॥ ३ ॥

॥ २५६८ ॥ सत्तेचें भोजन समर्थी आतुडे । सेवनही घडे रुचिनेसी ॥ धृ० ॥ वर्में श्रम नेला जालें एकमय । हृदयस्थीं सोय संग जाला ॥ १ ॥ कोथळीस जमा पडिलें संचित । मापल्याचा वित्त नेम जाला ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी ऐसा जालों आतां । करीन ते सत्ता माझी आहे ॥ ३ ॥

॥ २५६९ ॥ देईल तें उणें नाहीं । याचे कांहीं पदरीं ॥ धृ० ॥ पाहिजे तें संचित आतां । येथें सत्ता करावया ॥ १ ॥ गुणां ऐसा भरणा भरी । जो जें विचारी तें लाभे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवीं देव । फळे भाव आपुला ॥ ३ ॥

॥ २५७० ॥ तेव्हां होतों भोगाधीन । तुह्मां भिन्न पासुनी ॥ धृ० ॥ आतां बोलों नये ऐसें । आनारिसें वेगळें ॥ १ ॥ सन्मुख जालों स्वामीकडे । भव औठडे निराळे ॥ २ ॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥ ३ ॥ सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं ते वंचेना ॥ ४ ॥ तुमची सेवा धरिली कास । केला नास प्रपंचा ॥ ५ ॥ तुका ह्मणे जाणोनि वर्म । कर्माकर्में ठेविली ॥ ६ ॥

॥ २५७१ ॥ केला कईवाड संतांच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ॥ धृ० ॥ काय जीवित्वाची धरूनियां आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥ १ ॥ अबाळीनें जावें निश्चितीच्या ठायां । रांडा रोटा वांयां करूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी देतां तें निधान । भिकेसाठीं कोण राज्य देतो ॥ ३ ॥

॥ २५७२ ॥ संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभीं अनुभव असिजेतें ॥ धृ० ॥ जैसीं तैसीं असो पुढिलांचें सोई । धरिती हातीं पायीं आचारिये ॥ १ ॥ उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलांची सदा दया चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तरीं सज्जनाची कीर्ती । पुरवावी आर्ति निर्बळांची ॥ ३ ॥

॥ २५७३ ॥ करितां विचार सांपडलें वर्म । समूळ निश्रम परिहाराचें ॥ धृ० ॥ मज घेऊनियां आपणांसी द्यावें । साटीं जीवें जीवें नारायणा ॥ १ ॥ उरी नाहीं मग पडदा कां आला । स्वमुखेंचि भला करितां वाद ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें खरें देणें घेणें । तुह्मा साक्षी जाणें अंतरींचें ॥ ३ ॥

॥ २५७४ ॥ कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥ धृ० ॥ बरवें जालें शरण गेलों । उगविलों संकटीं ॥ १ ॥ आणिला रूपाही बळें । करूनि खळें हरिदासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ॥ ३ ॥

॥ २५७५ ॥ आतां देह अवसान । हें जतन तोंवरी ॥ धृ० ॥ गाऊं नाचों गदा रोळें । जिकों बळें संसार ॥ १ ॥ याचि जीऊं अभिमानें । सेवाधनें बळकट ॥ २ ॥ तुका ह्मणे न सरें मागें । होईन लागें आगळा ॥ ३ ॥

॥ २५७६ ॥ ज्यानें आड यावें कांहीं । त्याचें नाहीं बळ आतां ॥ धृ० ॥ मन येथें साह्य जालें । हरिच्या धालें गुणवादीं ॥ १ ॥ चुकुर तो गेला काळ । जालें बळ संगाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे धरूं सत्ता । होईल आतां करूं तें ॥ ३ ॥

॥ २५७७ ॥ देवासी तो पुरे एकभाव गांठीं । तोचि त्याचे मिठी देईल पायीं ॥ धृ० ॥ पाहोनि राहीन कवतुक निराळा । मी मज वेगळा होऊनियां ॥ १ ॥ कांहीं नेघें शिरीं निमित्त्याचा भार । न लगे उत्तर वेचावेंची ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें पडिलिया गांठीं । मग नाहीं मिठी सुटों येत ॥ ३ ॥

॥ २५७८ ॥ लौकिकासाठीं या पसाऱ्याचा गोवा । कांहीं नाहीं देवा लागों येत ॥ धृ० ॥ ठेवावा माथा तो तुचलावा पायीं । ठायींच्चि ये ठायीं हालों नये ॥ १ ॥ ढवळिल्या मनें वितळिलें रूप । नांव ऐसें पाप उपाधीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे देव प्रीतीनें कवळी । ठेवील जवळी उठवुनी ॥ ३ ॥

॥ २५७९ ॥ नाहीं होत भार घातल्या उदास । पुरवावी आस सकळही ॥ धृ० ॥ ऐसा नाहीं मज एकाचा अनुभव । धरिला तो भाव उद्धरील ॥ १ ॥ उतावळि असे शरणागतकाजें । धांवा केशीराजे आइकतां ॥ २ ॥ तुका ह्मणे हित चिंतन भरंवसा । नेदी गर्भवासा येऊं देवा ॥ ३ ॥

॥ २५८० ॥ उपजों मरों हे तों आमुची मिरासी । हें तूं निवारिसी तरी थोर ॥ धृ० ॥ उभा राहीं करीं खरा खोटा वाद । आह्मी जालों निंद्य लंडीपणें ॥ १ ॥ उभयतां आहे करणें समान । तुह्मां ऐसा ह्मणे मीही देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे हातीं सांपडलें वर्म । अवघाची भ्रम फेडिन आतां ॥ ३ ॥

॥ २५८१ ॥ मेलियांच्या रांडा इच्छितील करूं । लाज नाहीं धरूं प्रीति कैसी ॥ धृ० ॥ मागिलां पुढिलां एक सरोबरी । काळाची पेटारी खांदा वाहे ॥ १ ॥ आन दिसे परी मरणेंचि खरें । सांपळा उंदिरें सामाविलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली मनाची परती । निवळली ज्योती दिसों आली ॥ ३ ॥

॥ २५८२ ॥ निष्ठुर मी जालों अतिवादागुणें । हें कां नारायणें नेणिजेल ॥ धृ० ॥ सांडियेली तुह्मी गोत परिसोय । फोडविली डोय कर्मा हातीं ॥ १ ॥ सांपडोनि संदी केली जीवेंसाठीं । घ्यावयासि तुटी कारण हें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज काय ह्मणों उणें । नाहीं अभिमानें चाड देवा ॥ ३ ॥

॥ २५८३ ॥ माझें माझ्या हातां आलें । आतां भलें सकळ ॥ धृ० ॥ काशासाठीं विषम थारा । तो अंतरा विटाळ ॥ १ ॥ जाली तया दुःखें तुटी । मागिल पोटीं नसावें ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्धकुळ । तेथें मळ काशाचा ॥ ३ ॥

॥ २५८४ ॥ समर्थपणें हे करा संपादणी । नसतेंचि मनीं धरिल्याची ॥ धृ० ॥ दुसऱ्याचें येथें नाहीं चालों येत । तरि मीं निवांत पाय पाहें ॥ १ ॥ खोटियाचें खरें खरियाचें खोटें । मानलें गोमटें तुह्मांसी तें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां सर्व करितां वाव । होईजेतें निंद्य जनीं देवा ॥ ३ ॥

॥ २५८५ ॥ तुह्मां आह्मांसवें न पडावी गांठी । आलेति जगजेठी काळीं आतां ॥ धृ० ॥ किती ह्मणों आतां वाइटा वाइट । शिवों नये वीट आल्यावरी ॥ १ ॥ बोलिल्याची आतां हेचि पराचित । भीड भार थीत बुडवील ॥ २ ॥ तुका ह्मणे आली रोकडी प्रचिती । ह्मांकणें तें किती कोठें देवा ॥ ३ ॥

॥ २५८६ ॥ सकळ सत्ताधारी । व्हावें ऐसें काय हरी ॥ धृ० ॥ परि या कृपेच्या वोरसें । कुढावयाचेंचि पिसें ॥ १ ॥ अंगें सर्वोत्तम । अवघाचि पूर्णकाम ॥ २ ॥ तुका ह्मणे दाता । तरि हा जीव दान देता ॥ ३ ॥

॥ २५८७ ॥ कोणापाशीं द्यावें माप । आपीं आप राहिलें ॥ धृ० ॥ कासयाची भरोवरी । काय दुरी जवळी ॥ १ ॥ एकें दाखविले दाहा । फांटा पाहा पुसून ॥ २ ॥ तुका ह्मणे सरलें वोझें । आतां माझें सकळ ॥ ३ ॥

॥ २५८८ ॥ नभोमय जालें जळ । एकीं सकळ हरपलें ॥ धृ० ॥ आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ॥ १ ॥ कैंचा तेथ यावा सांडी । आप कोंडी आपणा ॥ २ ॥ तुका ह्मणे कल्प जाला । अस्त गेला उदय ॥ ३ ॥

॥ २५८९ ॥ राजा करी तैसे दाम । तेही चाम चालती ॥ धृ० ॥ कारण ते सत्ता शिरीं । कोण करी अव्हेर ॥ १ ॥ वाइले तें सुनें खांदीं । चाले पदीं बैसविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरें । करुणाकरें रक्षिलें ॥ ३ ॥

॥ २५९० ॥ आह्मी देव तुह्मी देव । मध्यें भेव आधिक ॥ धृ० ॥ कैवाडाच्या धांवा लागें । मागें मागें विठ्ठले ॥ १ ॥ भेडसाविलें हाके नादें । वोळखी भेदें मोडिली ॥ २ ॥ तुका ह्मणे उभा राहे । मागें पाहे परतोनी ॥ ३ ॥

॥ २५९१ ॥ हीनसुरबुद्धीपासीं । आकृतीसी भेद नाहीं ॥ धृ० ॥ एक दांडी एक खांदीं । पदीं पदीं भोगणें ॥ १ ॥ एकाऐसें एक नाहीं । भिन्न पाहीं प्रकृती ॥ २ ॥ तुका ह्मणे भूमि खंडें । पीक दंडे जेथें तें ॥ ३ ॥

॥ २५९२ ॥ काय बोलों सांगा । याउपरी पांडुरंगा ॥ धृ० ॥ कांहीं आधारावांचुन । पुढें न चले वचन ॥ १ ॥ वाढे ऐसा रस । कांहीं करावा सौरस ॥ २ ॥ भक्तिभाग्यसीमा । यावा जोडोनियां प्रेमा ॥ ३ ॥ कोरड्या उत्तरीं । नका गौरवूं वैखरी ॥ ४ ॥ करी विज्ञापना । तुका प्रसादाची दाना ॥ ५ ॥

॥ २५९३ ॥ आहाच तो मोड वाळलियामधीं । अधीराची बुद्धि तेणें न्यायें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि संग न करीं दुसरें । चित्त मळीन द्वारें छेद पडे ॥ १ ॥ विषासाठीं सर्पा भयाभीत लोक । हें तों सकळिक जाणतसां ॥ २ ॥ तुका ह्मणे काचें राहे कुळांकुड । अवगुण तो नाड ज्याचा तया ॥ ३ ॥

॥ २५९४ ॥ क्षणक्षणां जीवा वाटतसे खंती । आठवती चित्तीं पाय देवा ॥ धृ० ॥ येईं वो येईं वो येईं लवलाहीं । आळिंगूनि बाहीं क्षेम देईं ॥ १ ॥ उतावीळ मन पंथ अवलोकी । आठवा ते चुकी काय जाली ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवींच्या जीवना । घाला नारायणा उडी वेगीं ॥ ३ ॥

॥ २५९५ ॥ आळी करावी ते कळतें बाळका । बुझवावें हें कां नेणां तुह्मी ॥ धृ० ॥ निवाड तो तेथें असे पायांपाशीं । तुह्मां आह्मां विशीं एकेठायीं ॥ १ ॥ आणिक तों आह्मी न देखोंसें जालें । जाणावें शिणलें भागलेंसें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां लागतें सांगावें । अंतरींचें ठावें काय नाहीं ॥ ३ ॥

॥ २५९६ ॥ तांतडीनें आह्मां धीरचि न कळे । पाळावे हे लळे लवलाहीं ॥ धृ० ॥ नका कांहीं पाहों सावकाशीं देवा । करा एक हेवा तुमचा माझा ॥ १ ॥ वोरसाचा हेवा सांभाळावी प्रीत । नाहीं राहों येत अंगीं सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज नका गोवूं खेळा । भोजनाची वेळा राखियेली ॥ ३ ॥

॥ २५९७ ॥ नाहीं लोपों येत गुण । वेधी आणीकें चंदन ॥ धृ० ॥ न संगतां पडे ताळा । रूप दर्पणीं सकळां ॥ १ ॥ सारविलें वरी । आहाच तें क्षणभरी ॥ २ ॥ तुका ह्मणे वोहळें । सागराच्या ऐसें व्हावें ॥ ३ ॥

॥ २५९८ ॥ वचनेंचि व्हावें आपण उदार । होइल विश्वंभर संतुष्टची ॥ धृ० ॥ सत्य-संकल्पाचीं फळें बीजाऐसीं । शुद्ध नाहीं नासी पावों येत ॥ १ ॥ वंचिलिया काय येतसे उपेगा । शरीर हें नरकाचेंचि आळें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव जितां थारे लावा । पडिलिया गोवा देशधडी ॥ ३ ॥

॥ २५९९ ॥ उखतें आयुष्य जायांचें कलिवर । अवघें वोडंबर विषयांचें ॥ धृ० ॥ कोणासी हा लागे पुसणें विचार । मनेंचि सादर करूं आतां ॥ १ ॥ उत्पत्ति प्रळय पडिलें दळण । पाकाचें भोजन बीज वाढे ॥ २ ॥ तुका ह्मणे जाऊं अभयाच्या ठायां । रिघों देवराया शरण वेगीं ॥ ३ ॥

॥ २६०० ॥ बोलावें ह्मूण हे बोलतों उपाय । प्रवाहें हें जाय गंगाजळ ॥ धृ० ॥ भाग्ययोगें कोणां घडेल सेवन । केचें येथें जन अधिकारी ॥ १ ॥ मुखीं देतां घांस पळ-विती तोंडें । अंगींचिया भांडे असुकानें ॥ २ ॥ तुका ह्मणे पूजा करितों देवाची । आपु-लिया रुचि मनाचिये ॥ ३ ॥

॥ २६०१ ॥ लटिक्याचे वाणी चवी ना सवाद । नाहीं कोणां वाद रुचों येत ॥ धृ० ॥ अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा । मायबापीं वेळा न साधिली ॥ १ ॥ अनावर अंगीं प्रबळ अवगुण । तांतडीनें मन लाहो साधी ॥ २ ॥ तुका ह्मणे दोष आणि अवकळा । न पडतां ताळा घडतसे ॥ ३ ॥

॥ २६०२ ॥ नये स्तवूं काचे होतें क्रियानष्ट । फुंदाचे ते कष्ट भंगा मूळ ॥ धृ० ॥ नाहीं परमार्थ साधत लौकिकें । धरून होतो फिके अंगा आलें ॥ १ ॥ पारखिया पुढें नये घालूं तोंडें । तुटी लाभा खंड होतो माना ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी मिरवितें परवडी । कामावल्या गोडी अविनाश ॥ ३ ॥

॥ २६०३ ॥ कोण्या काळें येईल मना । नारायणा तुमचिया ॥ धृ० ॥ माझा करणें अंगिकार । सर्व भार फेडुनी ॥ १ ॥ लागली हे तळमळ चित्ता । तरी दुश्चिता संसारीं ॥ २ ॥ सुखाचीच पाहें वास । मागें दोष सांभाळीं ॥ ३ ॥ इच्छा पूर्ण जाल्याविण ।

कैसा सीण वारेल ॥ ४ ॥ लाहो काया मनें वाचा । देवा साच्या भेटीचा ॥ ५ ॥ कांटाळ्‍ सो न धरावा । तुह्मी देवा दासांचा ॥ ६ ॥ तुका ह्मणे माझे वेळे । न कळे कां उफराटें ॥ ७ ॥

॥ २६०४ ॥ द्यावी तरी द्यावी उदंडचि सेवा । घ्यावें तरी देवा उदंडची ॥ धृ० ॥ तुटे केंचीं आह्मी पुरतीं भांडवलें । आल्या करीं बोलें समाधान ॥ १ ॥ व्हावें तरी व्हावें बहु तचि दुरी । आलिया अंतरीं वसवावें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझें सख्यत्व आपणी । अस सील ऋणी आवडीचा ॥ ३ ॥

॥ २६०५ ॥ काय करूं जीव होतो कासावीस । कोंडलिये दिस गमेचि ना ॥ धृ० पडिले हें दिसे ब्रह्मांडचि वोस । दाटोनि उच्छ्वास राहातसे ॥ १ ॥ तुका ह्मणे आ सर्वजाणतिया । विश्वंभरें काया निववावी ॥ २ ॥

॥ २६०६ ॥ सुकाविलियां कोमां अत्यंत जळधर । तेणेंच प्रकार न्याय असे ॥ धृ० न चले पाउलीं सांडी गरुडासन । मनाचें हो मन त्वरेलागीं ॥ १ ॥ तुका ह्मणे भूक साहावे बाळा । जीवनांची कळा ओढलीसे ॥ २ ॥

॥ २६०७ ॥ शृंगारिक माझीं नव्हतीं उत्तरें । आळवितों खरे अवस्थेच्या ॥ धृ० न घलावा मनी कामाचा विलंब । तुह्मी तों स्वयंभ करुणामूर्ती ॥ १ ॥ तुका ह्मणे कें सन्मुख वदन । देखतां चरण पोटाळीन ॥ २ ॥

॥ २६०८ ॥ तूं माझी माउली तूं माझी साउली । पाहातों वाटुली पांडुरंगे ॥ धृ० तूं मज येकुला वडील धाकुला । तूं मज आपुला सोयरा जीव ॥ १ ॥ तुका ह्मणे जी तुजपाशीं असे । तुजविण ओस सर्व दिशा ॥ २ ॥

॥ २६०९ ॥ कराल तें करा । हातें आपुल्या दातारा ॥ धृ० ॥ बळियाचीं आ बाळें । असों निर्भर या सळे ॥ १ ॥ आतां कोठें काळ । करील देवापाशीं बळ ॥ २ तुका ह्मणे पंढरिराया । थापटितों ठोक बाह्या ॥ ३ ॥

॥ २६१० ॥ डोळां भरिलें रूप । चित्ता पायांपें संकल्प ॥ धृ० ॥ अवघी घात वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥ १ ॥ वाचा केली माप । रासी हरिनाम अमुप ॥ २ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥ ३ ॥

॥ २६११ ॥ आतां आहे नाहीं । न कळे आळी करा कांहीं ॥ धृ० ॥ केली पुरवु इच्छा । पंढरीनिवासा ॥ १ ॥ नेणें भाग सीण । दुजें कोणी तुह्मांविण ॥ २ ॥ आतां न दुरी । तुका पायीं मिठी मारी ॥ ३ ॥

॥ २६१२ ॥ संकल्पासी अधिष्ठान । नारायण गोमटें ॥ धृ० ॥ अवघियांचें कोड । फिटे जड देहत्व ॥ १ ॥ उभय लोकीं उत्तम कीर्ती । देव चित्तीं राहिलिया ॥ २ तुका ह्मणे जीव धाय । नये हाय जवळी ॥ ३ ॥

॥ २६१३ ॥ भाग्यवंता ऐशी जोडी । परवडी संतांची ॥ धृ० ॥ धन घरीं पांडुरंग अभंग जें सरेना ॥ १ ॥ जनाविरहित हा लाभ । टांचें नभ सांटवणें ॥ २ ॥ तुका ह्म विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥ ३ ॥

॥ २६१४ ॥ जरी आलें राज्य मोळविक्या हातां । तरी तो मागुता व्यवसायी ॥ धृ० ॥ तृष्णेचीं मजुरें नेणती विसांवा । वाढे हांव हांवां काम कामीं ॥ १ ॥ वैभवाचीं सुखें नातळतां अंगा । चिंता करी भोगा विघ्न जाळी ॥ २ ॥ तुका ह्मणे वाहे मरणाचें भय । रक्षणउपाय करूनि असे ॥ ३ ॥

॥ २६१५ ॥ कोण होईल आतां संसारपांगिलें । आहे उगवलें सहजेंची ॥ धृ० ॥ केला तो चालवीं आपुला प्रपंच । काय कोणां वेच आहा घे हे ॥ १ ॥ सहजेंचि घडे आतां मोळ्याविण । येथें काय सीण आणि लाभ ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों सहज लेखणा । ज्याच्या तेणें खुणा दाखविल्या ॥ ३ ॥

॥ २६१६ ॥ आह्मां शरणागता । एवढी काय करणें चिंता ॥ धृ० ॥ परि हे कौतुकाचे खेळ । अवघे पाहातों सकळ ॥ १ ॥ अभयदानवृंदें । आह्मां कैचीं भयद्वंद्वें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी । हरिजन साधनाचे स्वामी ॥ ३ ॥

॥ २६१७ ॥ देवाचिये चाडे प्रमाण उचित । नये वांटूं चित्त निषेधासी ॥ धृ० ॥ नये राहों उभें कसमळापाशीं । भुंकतील तैसीं सांडावीं तीं ॥ १ ॥ तुका ह्मणे क्षमा सुखाची हे रासी । सांडूनि कां ऐसी दुःखी व्हावें ॥ ३ ॥

॥ २६१८ ॥ खळा सदा क्षुद्रीं दृष्टी । करी कष्टी सज्जना ॥ धृ० ॥ करिती आपुलाले परी । धणीवरी व्यापार ॥ १ ॥ दया संतां भांडवल । वेची बोल उपकार ॥ २ ॥ तुका ह्मणे आपुलालें । उसंतीलें ज्यांणीं तें ॥ ३ ॥

॥ २६१९ ॥ जग ऐसें बहु नांवें । बहुभावें भावना ॥ धृ० ॥ पाहों बोलों बहु नये । सत्य काय सांभाळा ॥ १ ॥ कारियासी जें कारण । तें जतन करावें ॥ २ ॥ तुका ह्मणे संतजनीं । हेंचि मनीं धरावें ॥ ३ ॥

॥ २६२० ॥ निघालें तें अगीहुनी । आतां ह्मणी आतळे ॥ धृ० ॥ पळवा परपरतें दुरी । आतां हरि येथुनी ॥ १ ॥ धरिलें तैसें श्रुत करा हो । येथें आहो प्रपंची ॥ २ ॥ अबोल्यानें ठेला तुका । भेऊनि लोकां निराळा ॥ ३ ॥

॥ २६२१ ॥ आतां दुसरें नाहीं वनीं । निरंजनीं पडिलों ॥ धृ० ॥ तुमचीच पाहें वास । अवघी आस निरसली ॥ १ ॥ मागिलांचा मोडला माग । घडला त्याग अरुची ॥ २ ॥ तुका ह्मणे करुणाकरा । तूं सोयरा जीवींचा ॥ ३ ॥

॥ २६२२ ॥ धरूनियां सोई परतलें मन । अनुलक्षीं चरण करूनियां ॥ धृ० ॥ येई पांडुरंगे नेई सांभाळुनी । करुणावचनीं आळवितों ॥ १ ॥ बुद्धि जाली साह्य परि नाहीं बळ । अवलोकितों जळ वाहे नेत्रीं ॥ २ ॥ न चलती पाय गळित जाली काया । ह्मणऊनि दया येऊं द्यावी ॥ ३ ॥ दिशेच्या करितों वारियासीं मात । जोडूनियां हात वास पाहें ॥ ४ ॥ तुका ह्मणे वेग करावा सत्वर । पावावया तीर भवनदीचें ॥ ५ ॥

॥ २६२३ ॥ कौलें भरियेली पेंठ । निग्रहाचे खोटे तंट ॥ धृ० ॥ ऐसें माता जाणे वर्म । बाळा वाढवितां धर्म ॥ १ ॥ कामवितां लोहो कसे । तांतडीनें काम नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे खडे । देतां अक्षर तें जोडे ॥ ३ ॥

[redacted]

॥ २६२४ ॥ चालिलें न वाटे । गाऊनियां जातां वाटे ॥ धृ० ॥ बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥ १ ॥ नाहीं भय आड । कांहीं विषमांचें जड ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्ती । सुखरूप आदीं अंती ॥ ३ ॥

॥ २६२५ ॥ करितां विचार तो हा दृढ संसार । ब्रह्मादिका पार नुलंघवे सामर्थ्यें ॥ धृ० ॥ शरण शरण नारायणा मज अंगिकारीं दीना । आलें तें वचनांपासीं माझ्या सामर्थ्य ॥ १ ॥ पाठीवरी मोळी तोचि कळवा पायीं तळीं । सांपडला जाळीं मत्स्य जाला तो न्याय ॥ २ ॥ आतां करीन तांतडी लाभाची ते याच जोडी । तुका ह्मणे ओढी पायां सोई मनाची ॥ ३ ॥

॥ २६२६ ॥ बहुतां जातींचा केला अंगिकार । बहुतही फार सर्वोत्तमें ॥ धृ० ॥ सरलाचि नाहीं कोणांचिये वेचें । अक्षोभ ठायींचें ठायीं आहे ॥ १ ॥ लागतचि नाहीं घेतां अंतपार । वसवी अंतर अणुचेंही ॥ २ ॥ तुका ह्मणे केला होय टाकीऐसा । पुरवावी इच्छा धरिली ते ॥ ३ ॥

॥ २६२७ ॥ पोट धालें आतां जीवनीं आवडी । पुरवावे परवडी बहुतांचे ॥ धृ० ॥ काय आंचवणा तांतडीचें काम । मागील तीं श्रम न पवावीं ॥ १ ॥ वाढितिया पोटीं बहु असे वाव । सांभाळितां ठाव काय वांचे ॥ २ ॥ दाविल्यावांचूनि नाहीं कळों येत । तेथेंही तुश्चित एकपणें ॥ ३ ॥ नावेचा भार तो उदकाचे शिरीं । काय हळू भारी तये ठायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे गीतीं गाऊनि गोविंद । करूं ब्रह्मानंद एकसरें ॥ ५ ॥

॥ २६२८ ॥ एका हातीं टाळ एका हातीं चिपळिया । घालिती हुंमरी एक वातातीं टाळिया ॥ धृ० ॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं चाड मोक्षपदें भजनीं आवडी ॥ १ ॥ हाका अरोळिया गीत वाद्यें सुखसोहळे । जाय तें न कळे केव्हां रजनी दिवस ॥ २ ॥ तीर्थीं नाहीं चाड न लगे जावें वनांतरा । तुका ह्मणे हरिहरात्मकचि पृथिवी ॥ ३ ॥

॥ २६२९ ॥ देव सखा आतां केलें नव्हे काई । येणें सकळही सोइरीच ॥ धृ० ॥ भाग्यवंत जालों गोतें सपुरतीं । आतां पुण्या नीति पार नाहीं ॥ १ ॥ पाहातां दिसती भरलिया दिशा । ठसावला ठसा लोकत्रयीं ॥ २ ॥ अविनाश जोडी आह्मां भाग्यवंतां । जाली होती सत्ता संचिताची ॥ ३ ॥ पायांवरी डोई ठेवाया अरोथा । जाली यावी सत्ता क्षेम ऐसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे जीव पावला विसावा । ह्मणवितां देवा तुमचींसीं ॥ ५ ॥

॥ २६३० ॥ कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ॥ धृ० ॥ सत्ता जाली त्रिभुवनीं । चक्रपाणी कोंवसा ॥ १ ॥ लडिवाळांचा भार वाहे । उभा आहे कुडावया ॥ २ ॥ तुका ह्मणे घटिका दिस । निमिषही न विसंभे ॥ ३ ॥

॥ २६३१ ॥ आह्मां आवडे नाम घेतां । तोही पिता संतोषे ॥ धृ० ॥ उभयतां एकचित्त । तरी प्रीत वाढली ॥ १ ॥ आह्मी शोभों निकटवासें । अनारिसें न दिसे ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगे । अवघीं अंगें निवाली ॥ ३ ॥

॥ २६३२ ॥ देह तंव असे भोगाचें अधिन । याचें सुख सीण क्षणभंगुर ॥ धृ० ॥ अविनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ १ ॥ क्षणभंगुर हा येथील

पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे सकळ विश्रांती । आठवावा चित्तीं नारायण ॥ ३ ॥

॥ २६३३ ॥ आतां आवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ॥ धृ० ॥ केलें तरीं आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवें संतांमधीं ॥ १ ॥ नाहीं भक्तराजीं ठेविला उद्धर । नामाचा आकार त्यांचियानें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या वडिलांचें ठेवणें । गोप्य नारायणें न करावें ॥ ३ ॥

॥ २६३४ ॥ काया वाचा मनें श्रीमुखाची वास । आणिक उदास विचारासी ॥ धृ० ॥ काय आतां मोक्ष करावा जी देवा । तुमचिया गोवा दर्शनासी ॥ १ ॥ केलिया नेमासी उभें ठाडें व्हावें । नेमलें तें भावें पालटेना ॥ २ ॥ तुका ह्मणे जों जों कराल उशीर । तों तों मज फार रडवील ॥ ३ ॥

॥ २६३५ ॥ पुढिलांचे सोयी माझ्या मला चाली । मताची आणिली नाहीं बुद्धी ॥ धृ० ॥ केलासि तो उभा आजिवरी संतीं । धरिविलें हातीं कट देवा ॥ १ ॥ आहे तेंचि मागों नाहीं खोटा चाळा । नये येऊं बळा लेंकरांशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा साक्षीच व्यवहार । कृपण थोर परि तुह्मी ॥ ३ ॥

॥ २६३६ ॥ बहुत करूनि चाळवाचाळवी । किती तुह्मी गोवी करीतसां ॥ धृ० ॥ लागटपणें मी आलों येथवरी । चाड ते दुसरी न धरुनी ॥ १ ॥ दुजियाचा तंव तुह्मांसि कांटाळा । राहासी निराळा एकाएकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां यावरी गोविंदा । मजशीं विनोदा येऊं नये ॥ ३ ॥

॥ २६३७ ॥ तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमा माणसां ऐसे ॥ धृ० ॥ वांजेच्या मैथुना परि गेलें वायां । बांडेल्याचें जायां जालें पीक ॥ १ ॥ अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुकेचि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे वरदळी ज्याची दृष्टी देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥ ३ ॥

॥ २६३८ ॥ नव्हे मतोळ्याचा वाण । नीच नवा नारायण ॥ धृ० ॥ सुख उपजे श्रवणें । करें टांकसाळी नाणें ॥ १ ॥ लाभ हातोहातीं । अधिक पुढतांपुढती ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणों किती । पुरोनि उरलें पुढती ॥ ३ ॥

॥ २६३९ ॥ घातला दुकान । देती आलियासी दान ॥ धृ० ॥ संत उदार उदार भरलें अनंत भांडार ॥ १ ॥ मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥ २ ॥ तुका ह्मणे पोतें । देवें भरिलें नव्हे रितें ॥ ३ ॥

॥ २६४० ॥ नरस्तुति आणि कथेचा विकरा । हें नको दातारा घडों देऊं ॥ धृ० ॥ ऐसिये कृपेची भाकितों करुणा । आहेसि तूं राणा उदाराचा ॥ १ ॥ पराविया नारी आणि परधना । नको देऊं मनावरी येऊं ॥ २ ॥ भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । नको गोविंदा घडों देऊं ॥ ३ ॥ देहअभिमान नको देऊं शरीरीं । चढों कांहीं परि एक देऊं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुझ्या पायांचा विसर । नको वारंवार पडों देऊं ॥ ५ ॥

॥ २६४१ ॥ लौकिकापुरती नव्हे माझी सेवा । अनन्य केशवा दास तुझा ॥ धृ०

पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥ २ ॥ तुका ह्मणे सकळ विश्रांती । आठवावा चित्तीं नारायण ॥ ३ ॥

॥ २६३३ ॥ आतां आवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ॥ धृ० ॥ केलें तरीं आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवें संतांमधीं ॥ १ ॥ नाहीं भक्तराजीं ठेविला उद्धर । नामाचा आकार त्यांचियानें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या वडिलांचें ठेवणें । गोप्य नारायणें न करावें ॥ ३ ॥

॥ २६३४ ॥ काया वाचा मनें श्रीमुखाची वास । आणिक उदास विचारासी ॥ धृ० ॥ काय आतां मोक्ष करावा जी देवा । तुमचिया गोवा दर्शनासी ॥ १ ॥ केलिया नेमासी उभें ठाडें व्हावें । नेमलें तें भावें पाळटेना ॥ २ ॥ तुका ह्मणे जों जों कराल उशीर । तों तों मज फार रडवील ॥ ३ ॥

॥ २६३५ ॥ पुढिलांचे सोयी माझ्या मला चाली । मताची आणिली नाहीं बुद्धी ॥ धृ० ॥ केलासि तो उभा आजिवरी संतीं । धरिविलें हातीं कट देवा ॥ १ ॥ आहे तेंचि मागों नाहीं खोटा चाळा । नये येऊं बळा लेंकरांशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा साक्षीचा व्यवहार । कृपण थोर परि तुह्मी ॥ ३ ॥

॥ २६३६ ॥ बहुत करूनि चाळवाचाळवी । किती तुह्मी गोवी करीतसां ॥ धृ० ॥ लागटपणें मी आलों येथवरी । चाड ते दुसरी न धरुनी ॥ १ ॥ तुजियाचा तंव तुह्मांसीं कांटाळा । राहासी निराळा एकांएकीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां यावरी गोविंदा । मजशीं विनोदा येऊं नये ॥ ३ ॥

॥ २६३७ ॥ तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमा माणसां ऐसे ॥ धृ० ॥ वांजेच्या मैथुना परि गेलें वायां । बांडेल्याचें जायां जालें पीक ॥ १ ॥ अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुकेचि ना ॥ २ ॥ तुका ह्मणे वरदळी ज्याची दृष्टी । देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥ ३ ॥

॥ २६३८ ॥ नव्हे मतोळ्याचा वाण । नीच नवा नारायण ॥ धृ० ॥ सुख उपजे श्रवणें । करें टांकसाळी नाणें ॥ १ ॥ लाभ हातोहातीं । अधिक पुढतोंपुढती ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणों किती । पुरोनि उरलें पुढती ॥ ३ ॥

॥ २६३९ ॥ घातला दुकान । देती आलियासी दान ॥ धृ० ॥ संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥ १ ॥ मागत्याची पुरे । धणी आणिकांसी उरे ॥ २ ॥ तुका ह्मणे पोतें । देवें भरिलें नव्हे रितें ॥ ३ ॥

॥ २६४० ॥ नरस्तुति आणि कथेचा विकरा । हें नको दातारा घडों देऊं ॥ धृ० ॥ ऐसिये कृपेची भाकितों करुणा । आहेसि तूं राणा उदाराचा ॥ १ ॥ पराविया नारी आणि परधना । नको देऊं मनावरी येऊं ॥ २ ॥ भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडों देऊं ॥ ३ ॥ देहअभिमान नको देऊं शरीरीं । चढों कांहीं परि एक देऊं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुझ्या पायांचा विसर । नको वारंवार पडों देऊं ॥ ५ ॥

॥ २६४१ ॥ लौकिकापुरती नव्हे माझी सेवा । अनन्य केशवा दास तुझा ॥ धृ० ॥

करीं पायांसवें आळी। आणिक वेगळी नेणें परी ॥ १ ॥ एकविध आम्ही
ाठीं। वरी तोचि पोटीं एकभाव ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं सांगितलें काम।
धर्म ठावे देवा ॥ ३ ॥

२ ॥ ज्यांच्या संगें होतों पडिलों भोवनीं । ते केली धोवनी झाडूनियां
ातां एकाएकीं मनासीं विचार। करूं नाहीं भार तुजियाचा ॥ १ ॥ प्रसादसे-
उष्टावळी। उचित ते काळीं अवचित ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म सांपडलें हातीं।
खंती चिंता देवा ॥ ३ ॥

१ ॥ आवडीभोजन प्रकार परवडी। भिन्नभिन्न गोडी एका रसा ॥ धृ० ॥
ांगती लाधलों प्रसाद। तिहीं नाहीं भेद राखियेला ॥ १ ॥ पाकसिद्धि स्वहस्तकें
। आवडीचे भाग सिद्ध केले ॥ २ ॥ तुका ह्मणे आला उच्छिष्ट प्रसाद। तेणें
माझ्या जीवा ॥ ३ ॥

१ ॥ समर्थाचा ठाव संचलाचि असे। दुर्बळाची आस पुढें करी ॥ धृ० ॥
न पदरीं हें दान। एकांतीं भोजन करूं जाऊं ॥ १ ॥ न लगे पाहावी उचि-
। अयाचित काळ साधला तो ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट धालिया उपरी।
रीं पुजूं देवा ॥ ३ ॥

१ ॥ आपुल्यांचा करीन मोळा। माझ्या कुळाचारांचा ॥ धृ० ॥ अवघियांचे
। ठायाठाय न देखें ॥ १ ॥ नेदीं तुटों समाधान। थांबों जन सकळ ॥ २ ॥
झाडा होय। तों हे सोय न संडी ॥ ३ ॥

॥ जन्ममरणांची विसरलों चिंता। तूं माझा आनंता मायबाप ॥ धृ० ॥
डोळां पाहेन प्रकार। भय आणि भार निरसलीं ॥ १ ॥ लिगाडाचें मूळ हातीं
यांचें यां पुरतें विभागिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला प्रपंच पारिखा। जिवासी
डुरंगा ॥ ३ ॥

॥ उदार तूं हरि ऐसी कीर्ति चराचरीं। अनंत हे थोरी गर्जतील पवाडे
झे पायीं माझा भाव पुसी जन्ममरणा ठाव। देवाचा तूं देव स्वामी सकळां
१ ॥ मागणें तें तुज मागों जीवभाव तुज सांगों। लागों तरी लागों पायां
ारा ॥ २ ॥ दिसों देसी कींविलवाणें तरी तुजचि हें उणें। तुका ह्मणे जिणें
ाधीन ॥ ३ ॥

॥ पाहा किती आले शरण समानचि केले। नाहीं विचारिले गुण दोष
धृ० ॥ मज सेवटींसा द्यावा ठाव तयांचिये देवा। नाहीं करीत हेवा कांहीं
॥ १ ॥ नाहीं पाहिला आचार कुळगोत्रांचा विचार। फेडूं आला भार मना
ड ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वजाणा तुझ्या आल्यावरि मना। केला तो उगाणा
ादोषांचा ॥ ३ ॥

॥ आतां चुकलें बंधन गेलें विसरोनि दान। आपुले ते वाण सावकाशा
धृ० ॥ लाभ जोडला अनंत घरीं सांपडलें वित्त। हातोहातीं थीत उरीं ताळ

नल्हाची ॥ १ ॥ होतें गोविलें विसारें माप जालें एकसरें । होतें होरें वारें तोंचि लाहो साधिला ॥ २ ॥ कराया जतन तुका ह्मणे निजधन । केला नारायण साह्य नेरी विसंबों ॥ ३ ॥

॥ २६५० ॥ तुझ्या रूपें माझी काया भरों द्यावी पंढरिराया । दर्पणींची छाया एका रूपें भिन्नत्व ॥ धृ० ॥ सुख पडिलें साठवण सत्ता वेचे शनें शनें । अडचणीचे कोण चारी मार्ग उगवले ॥ १ ॥ वसो डोळ्यांची बाहुली कवळे भिन्न छाया आली । कृष्णांजन चाली नव्हे परती माघारी ॥ २ ॥ जीव ठसावला शिवें मना आलें तेथें जावें । फांटा पडिला नांवें तुका ह्मणे खंडलें ॥ ३ ॥

॥ २६५१ ॥ सोसें सोसें मारूं हाका । होइल चुका ह्मणउनी ॥ धृ० ॥ मार्गे पुढें क्षणभरी । नव्हे दुरी अंतर ॥ १ ॥ नाम मुखीं बैसला चाळा । वेळोवेळां पडताळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखी केलें । या विठ्ठलें बहुतांसी ॥ ३ ॥

॥ २६५२ ॥ धरूनियां चाली हांवा । येइन गांवां धांवत ॥ धृ० ॥ पाठविसी मूळ तरी । लवकरी विठ्ठले ॥ १ ॥ नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्ति मुखें गाईन ॥ २ ॥ तुका ह्मणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥ ३ ॥

॥ २६५३ ॥ माय बापाचिये भेटी । अवघ्या तुटी संकोचा ॥ धृ० ॥ भोगिलें तें आहे सुख । खातां मुख मोकळें ॥ १ ॥ उत्तम तें बाळासाठीं । लावी ओठीं माउली ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली धणी । आनंद मनीं न समाये ॥ ३ ॥

॥ २६५४ ॥ उदासीनाचा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागत त्या ॥ धृ० ॥ अनुताप अंगीं अग्निचिया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ॥ १ ॥ दोष ऐशा नांवें देहाच्या आदर । विटलें अंतर अहंभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाय नासोनियां खंती । तंवच्चि हे चित्तीं बद्धता ते ॥ ३ ॥

॥ २६५५ ॥ बंधनाचा तोडूं फांसा । देऊं आशा टाकोनी ॥ धृ० ॥ नाहीं तेंच घेतां शिरीं । होइल दुरी निजपंथ ॥ १ ॥ नाथिलेंचि माझें तुझें । कोण वोझें वागवी ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतराय । देवीं काय जिणें तें ॥ ३ ॥

॥ २६५६ ॥ तेंच किती वारंवार । बोलों फार बोलिलें ॥ धृ० ॥ आतां माझें दंडवत । तुमच्या संत चरणांसी ॥ १ ॥ आवडी ते नीच नवी । जाली जीवीं वसती ॥ २ ॥ तुका ह्मणे बरवें जालें । घरा आलें बंदरींचें ॥ ३ ॥

॥ २६५७ ॥ उपासा शेवटीं अन्नासवें भेटी । तैसी माझी मिठी पडो पायीं ॥ धृ० ॥ पुरवीं वासना साच सर्वजाणा । आह्मां नारायणा अंकितांची ॥ १ ॥ बहु दिसां पुत्रामातेमध्यें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीतिउभड ॥ २ ॥ तुका ह्मणे धन कृपणा सोइरें । यापरि दुसरें नहो आतां ॥ ३ ॥

॥ २६५८ ॥ रणीं निघतां शूर न पाहे माघारें । ऐसा मज धीरें राख आतां ॥ धृ० ॥ संसारा हातीं अंतरलों दुरी । आतां कृपा करीं नारायणा ॥ १ ॥ वागवितों शुद्धिचा

नामाचें हत्यार । हाचि बडिवार मिरवितों ॥ २ ॥ तुका ह्मणे मज फिरतां माघारें । तेथें उणें पुरें तुह्मी जाणां ॥ ३ ॥

॥ २६५९ ॥ सकळ पूजा स्तुती । करावी ते व्हावें याती ॥ धृ० ॥ ह्मणऊनि वांटा जन । संतपूजा नारायण ॥ १ ॥ सेवावें तें वरी । दावी उमटूनि ढेंकरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सुरा । सुधा ह्मणतां केवीं बरा ॥ ३ ॥

॥ २६६० ॥ धीर नव्हे मनें । काय तयापाशीं उणें ॥ धृ० ॥ भार घातलियावरी । दासां नुपेक्षील हरी ॥ १ ॥ याऐसी आटी । द्यावी द्रव्याचिये साटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पोटें । सेवा बहु केलें खोटें ॥ ३ ॥

॥ २६६१ ॥ द्रव्याचिया कोटी । नये गांडीची लंगोटी ॥ धृ० ॥ अंतीं बोळवणेंसाठीं । पांडुरंग धरा कंठीं ॥ १ ॥ लोभाची लोभिकें । यांचें सन्निधान फिकें ॥ २ ॥ तुका ह्मणे हितें । जग नव्हों पडों रितें ॥ ३ ॥

॥ २६६२ ॥ कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट । कधीं खटखट सरेल हे ॥ धृ० ॥ कोणा आराणुक होईल कोणे काळीं । आपुलाली जाळीं उगवुनी ॥ १ ॥ माझा येणें दुःखें फुटतसे प्राण । न कळतां जन सुखी असे ॥ २ ॥ भोगा आधीं मनें मानिलासे त्रास । पाहे लपायास ठाव कोठें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देतों देवाचें गाऱ्हाणें । माझें ऋण येणें सोसियेलें ॥ ४ ॥

॥ २६६३ ॥ राहिलों निराळा । पाहों कवतुक डोळां ॥ धृ० ॥ करूं जगाचा विनोद । डोळां पाहोनियां छंद ॥ १ ॥ भुललिया संसारें । आलें डोळयासी माजिरें ॥ २ ॥ तुका ह्मणे माथा । कोणी नुचली सर्वथा ॥ ३ ॥

॥ २६६४ ॥ आह्मां एकविधा पुण्य सर्वकाळ । चरणसकळ स्वामीचे ते ॥ धृ० ॥ चित्ताचे संकल्प राहिले चळण । आज्ञा ते प्रमाण करुनी असों ॥ १ ॥ दुजियापासून परतलें मन । केलें द्यावें दान होईल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां पुरला नवस । एकाविण ओस सकळही ॥ ३ ॥

॥ २६६५ ॥ राहाणें तें पायांपाशीं । आणिकां रसीं विटोनी ॥ धृ० ॥ ऐसा धीर देईं मना । नारायणा विनवितों ॥ १ ॥ अंतरीं तो तुझा वास । आणिकां नास कारणां ॥ २ ॥ तुका ह्मणे शेवटींचें । वाटे साचें राखावें ॥ ३ ॥

॥ २६६६ ॥ चंदन तो चंदनपणें । सहजगुणें संपन्न ॥ धृ० ॥ वेधलिया धन्य जाती । आग्यें होती सन्मुख ॥ १ ॥ परिसा अंगीं परिसपण । बाणोनि तें राहिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंची खंती । सुजाती ते ठाकणीं ॥ ३ ॥

॥ २६६७ ॥ लय लक्षी मन न राहे निश्चळ । मुख्य तेथें बळ आसनाचें ॥ धृ० ॥ हें तों असाध्य जी सर्वत्र या जना । भलें नारायणा आळवितां ॥ १ ॥ कामनेचा त्याग वैराग्य या नांव । कुटुंब ते सर्वविषयजात ॥ २ ॥ कर्म उसंतावें चालत पाउलीं । होय जों राहिली देहबुद्धी ॥ ३ ॥ भक्ति तें न जीवजंतुभूत । शांतवूनि कत कामक्रोध ॥ ४ ॥ तुका ह्मणे साध्या साधन अवघडें । देतां हें सांकडें देह बळी ॥ ५ ॥

॥ २६६८ ॥ ऐसें कां हो न करा कांहीं । पुढें नाहीं नास ज्या ॥ धृ० ॥ विश्वंभरा शरणागत । भूतजात वंदुनी ॥ १ ॥ श्रुतीचें कां नेघा फळ । सारमूळ जाणोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढें कांहीं । वाट नाहीं यावरी ॥ ३ ॥

॥ २६६९ ॥ जाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव श्मशानींचा ॥ धृ० ॥ रडती रात्रदिवस कामक्रोधमाया । ह्मणती हायहाया यमधर्म ॥ १ ॥ वैराग्याच्या शेणें लागल्या शरीरा । ज्ञानाग्नि भरभरां जीविल्येसी ॥ २ ॥ फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्य जनीं बोंब जाली ॥ ३ ॥ दिली तिळांजुळी कुळनामरूपांसी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे रक्षा जाली आपींआप । उजळला दीप गुरुकृपा ॥ ५ ॥

॥ २६७० ॥ आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥ धृ० ॥ आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग जाला ॥ १ ॥ एकदेशीं होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें जाला सुकाळ हा ॥ २ ॥ फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी जालों ॥ ३ ॥ नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे दिलें उमटूनि जगीं । घेतलें तें अंगीं लावूनियां ॥ ५ ॥

॥ २६७१ ॥ बोळविला देह आपुलेनि हातें । हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसीं ॥ धृ० ॥ एकवेळें जालें सकळ कारण । आतां नारायण नारायण ॥ १ ॥ अमृतसंजीवनी निववीली खाई । अंगें तये ठायीं हारपली ॥ २ ॥ एकादशीविध जागरण उपवास । बारावा दिवस भोजनाचा ॥ ३ ॥ अवघीं कर्में जालीं घटस्फोटापाशीं । संबंध एकेसी उरला नामीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां आनंदीं आनंदु । गोविंदीं गोविंदु विस्तारला ॥ ५ ॥

॥ २६७२ ॥ पिंडदान पिंडें ठेविलें करुन । तिळीं तिळवण मूळत्रयीं ॥ धृ० ॥ सारिले संकल्प एकाचि वचनें । ब्रह्मी ब्रह्मार्पण शेवटींच्या ॥ १ ॥ सव्य अपसव्य बुडालें हें कर्म । एका एक वर्म एकोविष्णू ॥ २ ॥ पित्यापुत्रत्वाचें जालें अवसान । जनीं जनार्दन अभेदेंसी ॥ ३ ॥ आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ साधियेला ॥ ४ ॥ तुका ह्मणे केला अवघ्यांचा उद्धार । आतां नमस्कार शेवटींचा ॥ ५ ॥

॥ २६७३ ॥ सरलें आतां नाहीं । न ह्मणे वेळकाळ कांहीं ॥ धृ० ॥ विठ्ठल कृपाळु माउली । सदा प्रेमें पान्हायेली ॥ १ ॥ सीण विचारी भाग । नव्हे निष्ठुर नाहीं राग ॥ २ ॥ भेदाभेद नाहीं । तुका ह्मणे तिच्याठायीं ॥ ३ ॥

॥ २६७४ ॥ तुज पाहावें हे धरितों वासना । परि आचरणा नाहीं ठाव ॥ धृ० ॥ करिसी कैवार आपुलिया सत्ता । तरिच देखतां होइन पाय ॥ १ ॥ बाहिरल्या वेषें उत्तम दंडलें । भीतरी मुंडलें नाहीं तैसें ॥ २ ॥ तुका ह्मणे वांयां गेलोंच मी आहें । जरि तुह्मी साहे न व्हा देवा ॥ ३ ॥

॥ २६७५ ॥ दुष्ट आचरण ग्वाही माझें मन । मज ठावे गुण दोष माझे ॥ धृ० ॥ आतां तुह्मी सर्वजाण पांडुरंगा । पाहिजे प्रसंगाऐसें केलें ॥ १ ॥ व्याह्याजांवयांचे पंगती दुर्बळ । वंचिजे तो काळ नव्हे कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां जालों शरणागत । पुढील उचित तुह्मां हातीं ॥ ३ ॥

॥ २६७६ ॥ आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा । घडलिया सेवा समर्थांची ॥ धृ० ॥
तां माझ्या मनें धरावा निर्धार । चिंतनीं अंतर न पडावें ॥ १ ॥ येथें नाहीं जाली
पाची निरास । आल्या याचकास कृपेविशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें नाहीं दुजी परी ।
या रंका सरी देवापायीं ॥ ३ ॥

॥ २६७७ ॥ वैष्णवें चोरटीं । आली घरासी करंटीं ॥ धृ० ॥ आजि यापुनें जतन ।
स भांडें पांघरुण ॥ १ ॥ ज्याचे घरीं खावें । त्याचें सर्वस्वही न्यावें ॥ २ ॥ तुका ह्मणे
ग । नाहीं लागों देत लाग ॥ ३ ॥

॥ २६७८ ॥ ऐकतों दाट । आले एकांचें बोभाट ॥ धृ० ॥ नका विश्वासों बावरी ।
र देहाचे खाणोरी ॥ १ ॥ हेचि यांची जोडी । सदा बोडकीं उघडीं ॥ २ ॥ तुका
णे न्यावें । ज्याचें त्यासी नाहीं ठावें ॥ ३ ॥

॥ २६७९ ॥ आणिकांची सेवा करावी शरीरें । ती येथें उत्तरें कोरडीच ॥ धृ० ॥
॥ पांडुरंग सुलभ सोपारा । नेघे येरझारा सेवकाच्या ॥ १ ॥ आणिकांचे भेटी आड-
ाठी पडे । येथें तें न घडे वचनही ॥ २ ॥ आणिकांचें देणें काळीं पोट भरे । येथील
सरे कल्पांतींही ॥ ३ ॥ आणिकें दंडिली चुकलिया सेवा । येथें सोस हेवा नाहीं
ही ॥ ४ ॥ तुका ह्मणे करी आपणासारिखें । उद्धरी पारिखें उंच निच ॥ ५ ॥

॥ २६८० ॥ दुर्जनाची जाती । त्याचे तोंडीं पडे माती ॥ धृ० ॥ त्याची बुद्धि त्यासी
डी । वाचे अनुचित बडबडी ॥ १ ॥ पाहें संतांकडे । दोषदृष्टि पाहे भीडे ॥ २ ॥ उंच
च नाहीं । तुका ह्मणे खळा कांहीं ॥ ३ ॥

॥ २६८१ ॥ न करीं उदास । माझी पुरवावी आस ॥ धृ० ॥ ऐका ऐका नारायणा ।
झी परिसा विज्ञापना ॥ १ ॥ मायबाप बंधुजन । तूंचि सोयरा सज्जन ॥ २ ॥ तुका
णे तुजविरहित । माझें कोण करी हित ॥ ३ ॥

॥ २६८२ ॥ जीवन उपाय । वैद्यवाणी तुझे पाय ॥ धृ० ॥ ते मी नाठवीं घडिघडी ।
णोनियां चरफडी ॥ १ ॥ तुटे भवरोग । येथें सर्व सुखें भोग ॥ २ ॥ तुका ह्मणे विटे ।
रियेलें जें गोमटें ॥ ३ ॥

॥ २६८३ ॥ ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडुन कर तुम्हां ॥ धृ० ॥ तर्क
रूनियां आपुल्या भावना । बोलतिया जना कोण वारी ॥ १ ॥ आमुच्या जीवींच्या
चि जाणे भावो । रखुमाबाईचा नाहो पांडुरंग ॥ २ ॥ चित्त माझें त्याचे गुंतलें से
यीं । ह्मणउनी कांहीं नावडे त्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज न साहे मीनती । स्वेह
य चित्तीं भंग मना ॥ ४ ॥

॥ २६८४ ॥ ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे वाप धन ॥ धृ० ॥
धृ० ॥ निंब घेतें रोगी कवणिया सुखें । हरावया दुःखें व्याधि पीडा ॥ १ ॥ काय फळे
खें चोरा लागिं पाठी । न घलावी काठी आड तया ॥ २ ॥ जयाचें कारण तोचि
णें करूं । नये कोणा वारूं आणिकासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी सांगवे निर्वाण ।
गवा ओंवाळुन जीव बळी ॥ ४ ॥

॥ २६८५ ॥ काय मी अन्यायी तें घाला पालवीं। आणिक वाट दावीं चालावया ॥ धृ० ॥ माग पाहोनियां जातों तेच सोयी। न वजावें कायी कोण सांगा ॥ १ ॥ धोपट मारग लागलासे गाढा। मज काय पीडा करा तुह्मी ॥ २ ॥ वारितांही भय कोण धरी धाक। परि तुह्मां एक सांगतों मी ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर दोहीं पक्षीं भला। मरतां मुक्त जाला मान पावे ॥ ४ ॥

॥ २६८६ ॥ नव्हती माझे बोल जाणा हा निर्धार। मी आहें मजूर विठोबाचा ॥ धृ० ॥ निर्धारा वचन सोडविलें माझ्या। कृपाळुवें लज्जा राखियेली ॥ १ ॥ निर्भर मानसीं आलों आनंदाचा। गोडावली वाचा नामघोषें ॥ २ ॥ आतां भय माझें नासलें संसारीं। जालोंसें यावरी गगनाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा तों संतांचा प्रसाद। लाधलों आनंद प्रेमसुख ॥ ४ ॥

॥ २६८७ ॥ जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी। मृत्याचिये भेटी जवळी आली ॥ धृ० ॥ आतां माझ्या मना होईं सावधान। ओंपुण्यची जाण कार्यसिद्धी ॥ १ ॥ शेवटील घडी बुडतां न लगे वेळ। साधावा तो काळ जवळीं आला ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंती कुळींची देवता। वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ ३ ॥

॥ २६८८ ॥ मागील आटी येणें घडे सांग। सुतवेल अंग एका सूत्रें ॥ धृ० ॥ पहिपाहुणेरे ते सोहळ्यापुरते। तेथूनि आरते उपचार ते ॥ १ ॥ आवश्यक तेथें आगळा आदर। चाली थोडें फार संपादतें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऋण फिटे एके घडी। अलभ्य ते जोडी हातां आल्या ॥ ३ ॥

॥ २६८९ ॥ साधावा तो देव सर्वस्वाचे साटीं। प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥ धृ० ॥ मग कासयानें पुन्हा संवसार। बीजाचे अंकुर दग्ध होती ॥ १ ॥ जिणें दिल्हें त्यासी द्यावें पिंडदान। उत्तीर्ण चरण धरुनी व्हावें ॥ २ ॥ तुका ह्मणे निज भोगईल निजता। नाहीं होईल सत्ता दुजियाची ॥ ३ ॥

॥ २६९० ॥ जळों अगी पडो खाण। नारायण भोगिता ॥ धृ० ॥ ऐसी ज्याची वदे वाणी। नारायणीं ते पावे ॥ १ ॥ भोजनकाळीं करितां धंदा। ह्मणा गोविंदा पावलें ॥ २ ॥ तुका ह्मणे न लगे मोल। देवा बोल आवडती ॥ ३ ॥

॥ २६९१ ॥ संतांसी क्षोभवी कोण्याही प्रकारें। त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥ धृ० ॥ देवाचा तो वैरी शत्रु दावेदार। पृथ्वी ही थार नेदी तया ॥ १ ॥ संतांपाशीं ज्याचा नुरेचि विश्वास। त्याचे जाले दोष बळिवंत ॥ २ ॥ तुका ह्मणे क्षीर वासराच्या अंगें। किंवा धांवें लागें विषमें मारूं ॥ ३ ॥

॥ २६९२ ॥ उदकीं कालवी शेण मलमूत्र। तो होय पवित्र कासयानें ॥ धृ० ॥ उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना। विन्मुख चरणां संतांचिया ॥ १ ॥ दुखवी तो बुडे सांगडीचा तापा। अंतिल्याई पापाचीच मूर्ति ॥ २ ॥ तुका ह्मणे जेव्हां फिरतें कपाळ। तरी अमंगळ योग होतो ॥ ३ ॥

॥ २६९३ ॥ सोकवावा म्यां देहे। ऐसें नेणों पोटीं आहे ॥ धृ० ॥ तरीच नेदा जी

उत्तर । दुःखी राखिलें अंतर ॥ १ ॥ जावें वनांतरा । येणें उद्देशें दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे गिरी । मज सेववावी दरी ॥ ३ ॥

॥ २६९४ ॥ येइल तुझ्या नामा । लाज ह्मणों पुरुषोत्तमा ॥ धृ० ॥ धीर राहिलों धरुनी । त्रास उपजला मनीं ॥ १ ॥ जगा कथा नांव । निराशेनें नुपजे भाव ॥ २ ॥ तुह्मी साक्षी कीं गा । तुका ह्मणे पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ २६९५ ॥ नेणें जप तप अनुष्ठान याग । काळें तंव लाग घेतलासे ॥ धृ० ॥ रिघालों या भेणें देवाचे पाठीसी । लागे त्याचें त्यासी सांभाळणें ॥ १ ॥ मापें माप सळे चालिली चढती । जाली मग राती काय चाले ॥ २ ॥ तुका ह्मणे चोरा हातीं जें वांचलें । लाभावरी आलें वारिलेशू ॥ ३ ॥

॥ २६९६ ॥ कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुह्मांसी ॥ धृ० ॥ तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेमा खंडत ॥ १ ॥ आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण जाला । हा विठ्ठला हीनशक्ती ॥ ३ ॥

॥ २६९७ ॥ लागों दिलें अंगा । ऐसें कांगा सन्निध ॥ धृ० ॥ कोण्या पापें उदय केला । तो देखिला प्रळय ॥ १ ॥ न देखवे पिडला सर्प । दया दर्प विषाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे भलें । मज तों न वजे साहिलें ॥ ३ ॥

॥ २६९८ ॥ धांवा शीघ्रवत । किंवा घ्यावें दंडवत ॥ धृ० ॥ तुमचा जातो बडिवार । आह्मी होतों हीनवर ॥ १ ॥ न धरावा धीर । धांवा नका चालों स्थिर ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । माझी लाजली जी गुणीं ॥ ३ ॥

॥ २६९९ ॥ सेवकासी आज्ञा निरोपासी काम । स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे ॥ धृ० ॥ मनाचिये मुळीं रहावें बैसोन । आकर्षावे गुण पायांपाशीं ॥ १ ॥ भेटीचे तांतडी करीतसें लाहो । ओंवाळावा देहो ऐसें वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें करावें कारण । आपुलें जतन ब्रीद करा ॥ ३ ॥

॥ २७०० ॥ उद्वेगासी बहु फाकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें ॥ धृ० ॥ आतां कोण यासी करणें विचार । तो देखा साचार पांडुरंगा ॥ १ ॥ मज तों अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी हो नाश जीविताचा ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे वचनाची उरी । करितों तोंवरि विज्ञापना ॥ ३ ॥

॥ २७०१ ॥ दुःखाची संगती । तिच्याठायीं कोण प्रीती ॥ धृ० ॥ अवघें असों हें निराळें । करूं सोइरें सावळें ॥ १ ॥ क्षणभंगुर ते ठाव । करूनि सांडावेचि वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे बरा । ठाव पावलों हा थारा ॥ ३ ॥

॥ २७०२ ॥ मेला तरी जावो सुखें नरकासी । कळंकी याविशीं शिवों नये ॥ धृ० ॥ रजस्वला करी वेलासी आघात । अंतरें तों हित दुरी बरें ॥ १ ॥ उगीच कां आलीं नासवावीं फळें । विटाळ विटाळें कालवुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे लोणी घालोनि शेणांत । उपेगाची मात काय असे ॥ ३ ॥

॥ २७०३ ॥ वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपती ॥ धृ० ॥ विश्वासिया घडे लाभ ।

देइल तरी पद्मनाभ ॥ १ ॥ भाव शुद्ध तरी । सांगितलें काम करी ॥ २ ॥ तुका ह्मणे भोळा देव । परि हा नागवी संदेह ॥ ३ ॥

॥ २७०४ ॥ संचितावांचुन । पंथ न चलवे कारण ॥ धृ० ॥ कोरडी ते अवघी आटी । वांयां जाय लाळ घोटीं ॥ १ ॥ धन वित्त जोडे । देव ऐसें तों न घडे ॥ २ ॥ तुका ह्मणे आड । स्वहितासी बहु नाड ॥ ३ ॥

॥ २७०५ ॥ अतित्याई बुडे गंगे । पाप लागे त्याचें त्या ॥ धृ० ॥ हें तों आपुलिया गुणें । असे जेणें योजिलें ॥ १ ॥ अवचटें अग्नि जाळी । न सांभाळी दुःख पावे ॥ २ ॥ जैसें तैसें दावी आरसा । नकट्या कैसा पालटे ॥ ३ ॥

॥ २७०६ ॥ हेंदऱ्याचे भरितां कान । हलवी मान भोंक रितें ॥ धृ० ॥ नाहीं मी येथें सांगों स्पष्ट । भावें नष्ट घेत नाहीं ॥ १ ॥ अवगुणी बाटलें चित्त । तया हित आतळे ना ॥ २ ॥ तुका ह्मणे फजितखोरा । ह्मणतां बरा उगा रहा ॥ ३ ॥

॥ २७०७ ॥ नाहीं सरों येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ॥ धृ० ॥ सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येतो ॥ १ ॥ काय अंगीपाशीं शृंगारिलें चाले । पोटींचें उकले कसापाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढवुनी ॥ ३ ॥

॥ २७०८ ॥ लचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा । न कळे ओंगळा उपदेश ॥ धृ० ॥ वचनचर्येची न कळे चाचणी । ऐसी संघट्टनी अमंगळ ॥ १ ॥ समय न कळे वेडगळ बुद्धी । विजाती ते शुद्धि चांच चाट ॥ २ ॥ तुका ह्मणे याचा धिक्कारचि बरा । बहुमति खराहूनि हीन ॥ ३ ॥

॥ २७०९ ॥ एक धरिला चित्तीं । आह्मीं रखुमाईचा पती ॥ धृ० ॥ तेणें जालें अवघें काम । निवारला भवश्रम ॥ २ ॥ परद्रव्य परनारी । जाली विषाचिये परी ॥ १ ॥ तुका ह्मणे फार । नाहीं लागत व्यवहार ॥ ३ ॥

॥ २७१० ॥ भेणें पळे डोळसा । न कळे मृत्यु तो सरिसा ॥ धृ० ॥ कैसी जाली दिशाभुली । नव जातिये वाटे चाली ॥ १ ॥ संसाराची खंती । मावळल्या तरी शक्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे हीणा । बुद्धि चुकली नारायणा ॥ ३ ॥

॥ २७११ ॥ अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार ॥ धृ० ॥ लाभ न्यावा हातोहातीं । तोंडीं माती पाडोनी ॥ १ ॥ लागलीसे पाठी लाज । जालें काज नासाया ॥ २ ॥ तुका ह्मणे कुशळ मनीं । विटंबनीं पडिलीं तीं ॥ ३ ॥

॥ २७१२ ॥ चोराचिया धुडका मनीं । वसे ध्यानीं लंछन ॥ धृ० ॥ ऐशा आह्मी करणें काय । वरसो न्यायें पर्जन्य ॥ १ ॥ ज्याच्या बैसे खतावरी । ते चुरचुरी दुखवुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याची खोडी । त्याची जोडी त्या पीडी ॥ ३ ॥

॥ २७१३ ॥ बुद्धिहीना उपदेश । तें तें विष अमृतीं ॥ धृ० ॥ हुंगो नये गोऱ्हवाडी । तेथें जोडी विटाळ ॥ १ ॥ अळसियाचें अंतर कुडें । जैसें मढें निष्काम ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा हातीं । मज श्रीपति वांचवा ॥ ३ ॥

॥ न करीं तुमची सेवा । बापुडें मीपण देवा । बोलिलों तो पाववा । पण
ळ ॥ धृ० ॥ आणिक काय तुह्मां काम । आह्मां नेदा तरी प्रेम । कैसे धर्माधर्म ।
रहाती ॥ १ ॥ आह्मी वेंचलों शरीरें । तुह्मी बीज पेरा खरें । संयोगाचें बरें ।
उभयतां ॥ २ ॥ एका हातें टाळी । कोठें वाजते निराळी । जाला तरी बळी ।
शोभेना ॥ ३ ॥ रूपा यावें जी अनंता । धरीन पुटाची त्या सत्ता । होइन
ंतांमाजी पोषण ॥ ४ ॥ ठेविलें उधारा । वरी काय तो पातेरा । तुका ह्मणे
डांचि निवाड ॥ ५ ॥

१ ॥ भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥ धृ० ॥ हें तों चाळवाचाळवी ।
गचि जेवी ॥ १ ॥ नैवेद्याचा आळ । वेच ठाकणीं सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे
न राखावें दगड ॥ ३ ॥
॥ सर्व भाग्यहीन । ऐसें सांभाळिलों दीन ॥ धृ० ॥ पायीं संतांचे मस्तक ।
ानि हस्तक ॥ १ ॥ जाणें तरि सेवा । दीन दुर्बळ जी देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे
पूंन भाकीं कींव ॥ ३ ॥
॥ भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ॥ धृ० ॥ येथूनिया नुठो माथा ।
नि सर्वथा ॥ १ ॥ होई बळकट । माझ्या मना तूं रे धीट ॥ २ ॥ तुका आला
। भक्तिभाग्यें जाली धणी ॥ ३ ॥
॥ नाहीं तरी आतां कैंचा अनुभव । जालासी तूं देव घरघेणा ॥ धृ० ॥ जेथें
ांचाचा पर्वत । घ्यावें तरि चित्त समाधान ॥ १ ॥ आधीं वरी हात या नांवें
ण्याचे उपकार फिटाफीट ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी तैसी करूं सेवा । सामर्थ्य
ग्रंपाशीं ॥ ३ ॥
१ ॥ आह्मी सर्वकाळ कैंची सावधान । व्यवसायें मन अभ्यासलें ॥ धृ० ॥
मोट ठेविली चरणीं । केलों गुणागुणीं कासावीस ॥ १ ॥ याचे कानसुलीं
ांका । मज घालूं नका मधीं आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे निद्रा जागृति सुषुप्ती ।
ोपति साक्षी येतें ॥ ३ ॥
॥ नसतांचि दाउनि भेव । केला जीव हिंपुटी ॥ धृ० ॥ जालों तेव्हां कळलें
ङ्गा हा आकांत ॥ १ ॥ गंवसिलों पुढें मागें । लागलागे पावला ॥ २ ॥ तुका
आणि । सलगीच्यांनीं सन्मुख ॥ ३ ॥
१ ॥ हें कां आह्मां सेवादान । देखों शीण विषमाचा ॥ धृ० ॥ सांभाळा जी
। तुह्मी कां कळीसारिखें ॥ १ ॥ शरणागत वैऱ्या हातीं । हे निश्चिती
२ ॥ तुका ह्मणे इच्छीं भेटी । पाय पोटीं उफराटे ॥ ३ ॥
२ ॥ कां हीं आलें नेणों भागा । पांडुरंगा माझिया ॥ धृ० ॥ उफराटी तुह्मां
कथा गेली सत्याची ॥ १ ॥ साक्षी हेंगे माझें मन । आतें कोण होतें तें ॥ २ ॥
समर्थपणें । काय नेणें करीतसां ॥ ३ ॥
३ ॥ शकुनानें लाभ हानी । येथूनिच कळतसे ॥ धृ० ॥ भयारूढ जालें

मन। आतां कोण विश्वास ॥ १ ॥ प्रीत कळे आलिंगनीं संपादनीं अत्यंत ॥ २ ॥ तुका ह्मणे मोकलिलें। कळों आलें बरवें हें ॥ ३ ॥

॥ २७२४ ॥ नव्हेंच निग्रह देहासी दंडण। न वजे भूकतान सहावली ॥ धृ० ॥ तरी नित्य नित्य करीं आळवण। माझा अभिमान असों द्यावा ॥ १ ॥ नाहीं विटाळिलें कायावाचामन। संकल्पासी भिन्न असेचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे भवसागरीं उतार। कराया आधार इच्छीतसें ॥ ३ ॥

॥ २७२५ ॥ आइकिली कीर्ति संतांच्या वदनीं। तरि हें ठाकोनि आलों स्थळ ॥ धृ० ॥ मागिला पुढिला करावें सारिखें। पालटों पारिखें नये देवा ॥ १ ॥ आह्मांसी विश्वास नामाचा आधार। तुटतां हे थार उरी नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें नसावेंच्चि दुजें। विनंति पंढरिराजें परिसावी हे ॥ ३ ॥

॥ २७२६ ॥ मौलाचें आयुष्य वेचतसे सेवे । तुगवतां गोवे खेद होतो ॥ धृ० ॥ उगवूं आलेति तुह्मी नारायणा। परिहार या सीणा निमिषांत ॥ १ ॥ लिगाडाचे मासी न्यायें जाली परी। उरली ते उरी नाहीं कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे लाहो साधीं वाचाबळें। ओढियेलों काळें धांव घाला ॥ ३ ॥

॥ २७२७ ॥ ह्मणऊनि जालों क्षेत्रींचे संन्यासी । चित्त आशापासीं आवरुनी ॥ धृ० ॥ कदापि ही नव्हे सीमा उलंघन। केलें विसर्जन आव्हानींच ॥ १ ॥ पारिखा तो आतां जाला दुजा ठाव। दृढ केला भाव एकविध ॥ २ ॥ तुका ह्मणे कार्यकारणाचा हेवा। नाहीं जीव देवा समर्पिला ॥ ३ ॥

॥ २७२८ ॥ विभ्रंशिली बुद्धि देहांत जवळी। काळाची अकाळीं वायचाळ ॥ धृ० ॥ पालटलें जैसें देंठ सांडी पान। पिकलें आपण तयापरी ॥ १ ॥ न मारितां हीन बुद्धि दुःख पावी। माजल्याची गोवी तयापरी ॥ २ ॥ तुका ह्मणे गळ लागलिया मत्स्या। तळमळेचा तैसा लवलाहो ॥ ३ ॥

॥ २७२९ ॥ न वजावा तो काळ वांयां। मुख्य दया हे देवा ॥ धृ० ॥ ह्मणऊनि जैसें तैसें। रहणी असें पायांचे ॥ १ ॥ मोकळें हें मन कष्ट। करी नष्ट दुर्जन ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं नेणें। न वजें येणेंपरी वांयां ॥ ३ ॥

॥ २७३० ॥ कल्पतरूअंगीं इच्छिलें तें फळ। अभागी दुर्बळ भावें सिद्धी ॥ धृ० ॥ धन्य त्या जाती धन्य त्या जाती। नारायण चित्तीं सांठविला ॥ १ ॥ बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर। गुणाचे प्रकार ज्याचे तया ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे पारखिया हिरा। ओझें पाठी खरा चंदनाचें ॥ ३ ॥

॥ २७३१ ॥ उकरडा आधीं अंगीं नरकाडी। जातीचे ते जोडी तेचि चित्तीं ॥ धृ० ॥ कासयानें देखे अंधळा माणिकें। चवीविण फिके वांयां जाय ॥ १ ॥ काय जाणें विष पालटों उपचारें। मुखासी अंतर तोंचि बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे काय उपदेश वेड्या। संगें होतो रेड्यासवें कष्ट ॥ ३ ॥

॥ २७३२ ॥ जया शिरीं कारभार। बुद्धि सार तयाची ॥ धृ० ॥ वर्ते तैसें वर्ते जन।

एकाचा ॥ १ ॥ आपणीयां पाक करी । तो इतरीं सेविजे ॥ २ ॥ तुका ह्मणे गाढ्या वाखे सांगातें ॥ ३ ॥

॥ एक एका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥ धृ० ॥ कोण जाणें कैसी उरी ठेवितां ॥ १ ॥ अवघे धन्य होऊं आतां । स्मरवितां स्मरण ॥ २ ॥ तुका ी जोडी । ते आवडी चरणांची ॥ ३ ॥

॥ फळकट तो संसार । येथें सार भगवंत ॥ धृ० ॥ ऐसें जागवितों मना । सहित ॥ १ ॥ अवघें निरसूनि काम । घ्यावें नाम विठोबाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे केला सीण तो मिथ्या ॥ ३ ॥

१ ॥ सुधारसें ओलावली । रसना धाली न धाय ॥ धृ० ॥ कळों नये जाली ायणीं पूर्णता ॥ १ ॥ आवडे तें तेंच यासी । ब्रह्मरसीं निरसें ॥ २ ॥ तुका ं परी । करूनि करीं सेवन ॥ ३ ॥

६ ॥ असतां कांटाळा हा नव्हे मत्सर । ब्रह्म तें विकारविरहित ॥ धृ० ॥ तरि प्रतिपादलासे । अनादि हा असे वैराकार ॥ १ ॥ सिजलें हिरवें एका नांवें नापें भिन्न निवडें ते ॥ २ ॥ तुका ह्मणे भूतीं साक्षी नारायण । अवगुणीं ं पूजा ॥ ३ ॥

७ ॥ आपुलें आपण जाणावें स्वहित । जेणें राहे चित्त समाधान ॥ धृ० ॥ ा असे विखरली । कुंठितचि चाली होतां बरी ॥ १ ॥ पूजा ते अबोला प्रकारीं । भाव विश्वंभरीं समर्पावा ॥ २ ॥ तुका ह्मणे गेला फिटोनियां भेव । देव मनाचाची ॥ ३ ॥

८ ॥ असोनि न कीजे अलिप्त अहंकारें । उगीच या भारें कुंथाकुंथी ॥ धृ०॥ वर्णे वेगीं लवकरी । मी तों जालों हरि शक्तिहीन ॥ १ ॥ अमल्यानें दिसें बांध- । माझें मजवरी वाहोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव घेतलीसे सोई । आतां पुढें ी ॥ ३ ॥

९ ॥ आपुल्याचा भोत चाटी । मारी करंटी पारख्या ॥ धृ० ॥ ऐसें जन । मिथ्या हेवा वाढवी ॥ १ ॥ गळ गिळी आमिषें मासा । प्राण आशा घेतला का ह्मणे बोकडमोहो । धरी पहा हो खाटिक ॥ ३ ॥

० ॥ विषय तो मरणसंगीं । नेणें सुटिका अभागी ॥ धृ० ॥ शास्त्राचा केला डीं पाडियेला धोंडा ॥ १ ॥ अगदीं मोक्ष नाहीं ठावा । काय सांगावें गाढवा का ह्मणे ग्यानगड । सुखें पावो देवा नाड ॥ ३ ॥

१ ॥ मीच विखळ मीच विखळ । येर सकळ बहु बरें ॥ धृ० ॥ पाहिजे हें । येणें बोलें विनवणी ॥ १ ॥ मीच माझें मीच माझें । जालें ओझें अन्याय ाधीं आंचवला आधीं आंचवला । तुका जाला निमनुष्य ॥ ३ ॥

२ ॥ येणें जाणें तरी । राहे देव कृपा करी ॥ धृ० ॥ ऐसें तंव पुण्य नाहीं ।

पाहातां माझे गांठी कांहीं ॥ १ ॥ भय निवारिता । कोण वेगळा अनंता ॥ २ ॥ तुका ह्मणे वारे भोग । वारी तरी पांडुरंग ॥ ३ ॥

॥ २७४३ ॥ भल्याचें कारण सांगावें स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ॥ धृ० ॥ परि आह्मी असों एकाचिये हातीं । नाचवितो चित्तीं त्याचें तैसें ॥ १ ॥ वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ॥ ३ ॥

॥ २७४४ ॥ लावूनियां पुष्टी पोर । आणि करकर कथेमाजी ॥ धृ० ॥ पडा पाया करा विनंती । इवडा हातीं धरोनियां ॥ १ ॥ कुर्वाळूनि बैसे मोहें । प्रेम कां हें नासीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे चित्त । करा फजित ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ २७४५ ॥ पुण्य उभें राहो आतां । संताचें या कारणें ॥ धृ० ॥ पंढरीचे लागा वाटे । सखा भेटे विठ्ठल ॥ १ ॥ संकल्प हे यावे फळा । कळवळा बहुतांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे होऊनि क्षमा । पुरुषोत्तमा अपराध ॥ ३ ॥

॥ २७४६ ॥ आइकिली मात । पुरविले मनोरथ ॥ धृ० ॥ प्रेम वाढविलें देवा । बरवी घेऊनियां सेवा ॥ १ ॥ केली विनवणी । तैसी पुरविली धणी ॥ २ ॥ तुका ह्मणे काया । रसा कुरोंडी वरोनियां ॥ ३ ॥

॥ २७४७ ॥ संतांची स्तुति ते दर्शनाच्या योगें । पडिल्या प्रसंगें ऐसी कीजे ॥ धृ० ॥ संकल्प ते सदा स्वामीचेचि चित्तीं । फाकों नये वृत्ति अखंडित ॥ १ ॥ दास्यत्व तें असे एकविध नांवें । उरों नये जीवें भिन्नत्वासी ॥ २ ॥ निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे तें पेरी तये वेळे ॥ ३ ॥

॥ २७४८ ॥ सेजेचा एकांत अगीपाशीं कळे । झांकिलिया डोळे अधःपात ॥ धृ० ॥ राहो अथवा मग जळो अगीमधीं । निवाड तो आधीं होऊनि गेला ॥ १ ॥ भेणें झडपणी नाहीं येथें तुजें । पादरधिया ओझें हतियारें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज नाहीं जी भरंवसा । तोंवरि सहसा निवाडा तो ॥ ३ ॥

॥ २७४९ ॥ न सरे भांडार । भरलें वेचितां अपार ॥ धृ० ॥ मविल्याचें पोट भरे । पुढिलासी पुढें उरे ॥ १ ॥ कारणापुरता । लाहो आपुलाल्या हिता ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥ ३ ॥

॥ २७५० ॥ तरी हांव केली असुपा व्यापारें । व्हावें एकसरें धनवंत ॥ धृ० ॥ जालों हरिदास शूरत्वाच्या नेमें । जालीं ठावीं वर्मे पुढिलांचीं ॥ १ ॥ जनावेगळें हें असे अभिनव । वळीं दिला जीव ह्मणउनी ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी लागलों विल्हेसी । चालतिया दिसीं स्वामी ऋणी ॥ ३ ॥

॥ २७५१ ॥ कोण तुजें हरी सीण । शरण दीन आल्याचा ॥ धृ० ॥ तुह्मांविण जगदीशा । उदार ऐसा त्रिभुवनीं ॥ १ ॥ कोण ऐसें वारी पाप । हरी ताप जन्माचा ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव घाली । कोण चाली मनाचे ॥ ३ ॥

॥ २७५२ ॥ ग्रंथाचे अर्थ नेणती हे खळ । बहु अनर्गळ जाले विषयीं ॥ धृ० ॥ नाहीं

पाहातां माझे गांठी कांहीं ॥ १ ॥ भय निवारिता । कोण वेगळा अनंता ॥ २ ॥ तुका ह्मणे वारे भोग । वारी तरी पांडुरंग ॥ ३ ॥

॥ २७४३ ॥ भल्याचें कारण सांगावें स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ॥ धृ० ॥ परि आह्मी असों एकाचिये हातीं । नाचवितो चित्तीं त्याचें तैसें ॥ १ ॥ वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ॥ ३ ॥

॥ २७४४ ॥ लावूनियां पुष्टी पोर । आणि करकर कथेमाजी ॥ धृ० ॥ पडा पायां करा विनंती । दवडा हातीं धरोनियां ॥ १ ॥ कुर्वाळूनि बैसे मोहें । प्रेम कां हें नासीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे चित्त । करा फजित ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ २७४५ ॥ पुण्य उभें राहो आतां । संताचें या कारणें ॥ धृ० ॥ पंढरीचे लागा वाटे । सखा भेटे विठ्ठल ॥ १ ॥ संकल्प हे यावे फळा । कळवळा बहुतांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे होऊनि क्षमा । पुरुषोत्तमा अपराध ॥ ३ ॥

॥ २७४६ ॥ आइकिली मात । पुरविले मनोरथ ॥ धृ० ॥ प्रेम वाढविलें देवा । बरवी घेऊनियां सेवा ॥ १ ॥ केली विनवणी । तैसी पुरविली धणी ॥ २ ॥ तुका ह्मणे काया । रसा कुरोंडी वरोनियां ॥ ३ ॥

॥ २७४७ ॥ संतांची स्तुति ते दर्शनाच्या योगें । पडिल्या प्रसंगें ऐसी कीजे ॥ धृ० ॥ संकल्प ते सदा स्वामीचेचि चित्तीं । फाकों नये वृत्ति अखंडित ॥ १ ॥ दास्यत्व तें असे एकविध नांवें । उरों नये जीवें भिन्नत्वासी ॥ २ ॥ निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे तें पेरी तये वेळे ॥ ३ ॥

॥ २७४८ ॥ सेजेचा एकांत अगीपाशीं कळे । झांकिलिया डोळे अधःपात ॥ धृ० ॥ राहो अथवा मग जळो अगीमधीं । निवाड तो आधीं होऊनि गेला ॥ १ ॥ भेणें झडपणी नाहीं येथें तुजें । पाहरधिटा ओझें हतियारें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज नाहीं जी भरंवसा । तोवरि सहसा निवाडा तो ॥ ३ ॥

॥ २७४९ ॥ न सरे भांडार । भरलें वेचितां अपार ॥ धृ० ॥ भविष्याचें पोट भरे । पुढिलासी पुढें उरे ॥ १ ॥ कारणापुरता । लाहो आपुलाल्या हिता ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥ ३ ॥

॥ २७५० ॥ तरी हांव केली अमुप व्यापारें । व्हावें एकसरें धनवंत ॥ धृ० ॥ जालों हरिदास शूरत्वाच्या नेमें । जाली ठावी वर्मे पुढिलांचीं ॥ १ ॥ जनावेगळें हें असे अभिनव । बळी दिला जीव ह्मणउनी ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी लागलों विल्हेसी । चालतिया दिसीं स्वामी ऋणी ॥ ३ ॥

॥ २७५१ ॥ कोण तुजें हरी सीण । शरण दीन आल्याचा ॥ धृ० ॥ तुह्मांविण जगदीशा । उदार ठसा त्रिभुवनीं ॥ १ ॥ कोण ऐसें वारी पाप । हरी ताप जन्माचा ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव घाली । कोण चाली मनाचे ॥ ३ ॥

॥ २७५२ ॥ ग्रंथाचे अर्थ नेणती हे खळ । बहु अनर्गळ जाले विषयीं ॥ धृ० ॥ नाहीं

भेद ह्मण भलतेंचि आचरे । मोकळा विचरे मनासवें ॥ १ ॥ तुका ह्मणे विषां नांव तें अमृत । पापपुण्या भीत नाहीं नष्ट ॥ २ ॥

॥ २७५३ ॥ कायावाचामनें जाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥ धृ० ॥ विश्वास तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥ १ ॥ तुका ह्मणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥ २ ॥

॥ २७५४ ॥ याती हीन मति हीन कर्म हीन माझें । सांडोनियां सर्व लज्जा शरण आलों तुज ॥ धृ० ॥ येई गा तूं मायबापा पंढरीच्या राया । तुजविण सीण जाला क्षीण जाली काया ॥ १ ॥ दिनानाथ दीनबंधु नाम तुज साजे । पतितपावन नाम ऐसी ब्रीदा-वळी गाजे ॥ २ ॥ विटेवरि नीट उभा कटावरी कर । तुका ह्मणे हेंचि आह्मां ध्यान निरंतर ॥ ३ ॥

॥ २७५५ ॥ गंगा आली आह्मांवरी । संतपाउलें साजिरीं ॥ धृ० ॥ तेथें करीन मी अंघोळी । उडे चरणरजधुळी । येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळ ॥ १ ॥ पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य जालों । सप्तसागरांत न्हालों ॥ ३ ॥

॥ २७५६ ॥ पोटासाठीं खटपट करिसी अवघा वेळ । राम राम ह्मणतां तुझी बसली दांतखीळ ॥ धृ० ॥ हरीचें नाम कदाकाळीं कां रे नये वाचे । ह्मणतां राम राम तुझ्या बाचें काय वेचे ॥ १ ॥ द्रव्याचिया आशा तुजला सही दिशा न पुरती । कीर्तनासी जातां तुझी जड झाली माती ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा जीवा काय करूं आतां । राम राम न ह्मणे त्याचा गाढव मातापिता ॥ ३ ॥

॥ २७५७ ॥ आह्मां सुकाळ सुखाचा । जवळीं हाट पंढरीचा । सासाविती वाचा । रामनामें वैष्णव ॥ धृ० ॥ घ्या रे आपुलाल्या परी । नका ठेवूं कांहीं उरी । ओसरतां भरी । तोंडवरी अंबर ॥ १ ॥ वाहे बंदर द्वारका । खेप आली पुंडलिका । उभेंचि विकिलें एका । सनकादिकां सांपडलें ॥ २ ॥ धन्य धन्य हे भूमंडळी । प्रगटली नामावळी । घेती जीं दुबळीं । तीं आगळीं सदैव ॥ ३ ॥ माप आपुलेनि हातें । कोणी नाहीं निवारितें । पैस करूनि चित्तें । घ्यावें हितें आपुलिया ॥ ४ ॥ नाहीं वांटितां सरलें । आहे तैसेंचि भरलें । तुका ह्मणे गेलें । वांयांविण न घेतां ॥ ५ ॥

॥ २७५८ ॥ चुकलिया ताळा । वाती घालूनि बैसे डोळां ॥ धृ० ॥ तैसें जागें करीं चित्ता । कांहीं आपुलिया हिता ॥ १ ॥ निक्षेपिलें धन । तेथें गुंतलेंसें मन ॥ २ ॥ नाशि-वंतासाटीं । तुका ह्मणे करिसी आटी ॥ ३ ॥

॥ २७५९ ॥ करूनि जतन । कोणा कामा आलें धन ॥ धृ० ॥ ऐसें जाणतां जाणतां । कां रे होतोसी नेणता ॥ १ ॥ प्रिया पुत्र बंधू । नाहीं तुज यांशीं संबंधू ॥ २ ॥ तुका ह्मणे एका । हरीविण नाहीं सखा ॥ ३ ॥

॥ २७६० ॥ आह्मी देतों हाका । कां रे जालासी तूं मुका ॥ धृ० ॥ न बोलसी नारा-यणा । कळलासी क्रियाहीना ॥ १ ॥ आधीं करूं चौघाचार । मग सांडूं भीडभार ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवटीं । तुह्मां आह्मां घालूं तुटी ॥ ३ ॥

॥ २७६१ ॥ नव्हे भिडा हें कारण । जाणें करूं ऐसें जन ॥ धृ० ॥ जों जों धरावा लौकिक । रखडवितोसी आणिक ॥ १ ॥ चाल जाऊं संतांपुढें । ते हें निवडिती रोकडें ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं निर्लज्ज । आह्मां रोकडी गरज ॥ ३ ॥

॥ २७६२ ॥ बहु होता भला । परि ये रांडेनें नासिला ॥ धृ० ॥ बहु शिकला रंग चाळे । खरें खोटें इचे वेळे ॥ १ ॥ नव्हतें आळवितें कोणी । इनें केला जगऋणी ॥ २ ॥ ज्याचे त्यासी नेदी देऊं । तुका ह्मणे धांवे खाऊं ॥ ३ ॥

॥ २७६३ ॥ काय करावें तें आतां । जालें नयेसें बोलतां ॥ धृ० ॥ नाहीं दोघांचिये हातीं । गांठी घालावी एकांतीं ॥ १ ॥ होय आपुलें काय । तों हे भीड सांडूं लाज ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आधीं निवडूं हा गोवा ॥ ३ ॥

॥ २७६४ ॥ केली सलगी तोंडपिटी । आह्मी लडिवाळें धाकुटीं ॥ धृ० ॥ न बोलावें तेंचि आलें । देवा पाहिजे साहिलें ॥ १ ॥ अवघ्यांमध्यें एक वेडें । तेंचि खेळविती कोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे मायबापा । मजवरि कोपों नका ॥ ३ ॥

॥ २७६५ ॥ शिकवूनि बोल । केलें कवतुक नवल ॥ धृ० ॥ आपणियां रंजविलें । बापें माझिया विठ्ठलें ॥ १ ॥ हातीं प्रेमाचें भातुकें । आह्मां देऊनियां निकें ॥ २ ॥ तुका करी टाहो । पाहे रखुमाईचा नाहो ॥ ३ ॥

॥ २७६६ ॥ तेथें सुखाची वसती । गाती वैष्णव नाचती । दिंड्या पताका झळकती । गर्जती हरिनामें ॥ धृ० ॥ दोषा जाली घेघेमारी । पळती भरले दिशा चारी । न येती माघारीं । नाहीं उरी परताया ॥ १ ॥ विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धरिलें गोजिरें ॥ २ ॥ पोट सेवितां न धाये । भूक भुकेलीच राहे । तुका ह्मणे पाहे । कोण आस मुक्तीची ॥ ३ ॥

॥ २७६७ ॥ शूद्रवंशीं जन्मलों । ह्मणोनि दंभें मोकलिलों ॥ धृ० ॥ अरे तूंचि माझा आतां । मायबाप पंढरिनाथा ॥ १ ॥ घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥ २ ॥ सर्वभावें दीन । तुका ह्मणे यातिहीन ॥ ३ ॥

॥ २७६८ ॥ वेडें वांकडें गाईन । परि मी तुझाचि ह्मणवीन ॥ धृ० ॥ मज तारीं दिनानाथा । ब्रीदें साच करीं आतां ॥ १ ॥ केल्या अपराधांच्या राशी । ह्मणऊनि आलों तुजपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तारीं । सांडीं ब्रीद नाहीं तरीं ॥ ३ ॥

॥ २७६९ ॥ हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥ धृ० ॥ अंतकाळीं येती माझ्या सोडवणें । मस्तक बैसणें देइन त्यांसी ॥ १ ॥ आणिक सोइरे सज्जन वो कोणी । वैष्णवांवांचोनि नाहीं मज ॥ २ ॥ देईन आलिंगन धरीन चरण । संवसारसीण नासे तेणें ॥ ३ ॥ कंठीं तुळशीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदीचे ॥ ४ ॥ तयांचे चरणीं घालीन मी मिठी । चाड हे वैकुंठीं नाहीं मज ॥ ५ ॥ अळसें दंभें भावें हरीचें नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचे ॥ ६ ॥ कायावाचामनें देइन क्षेम त्यासी । चाड जीवित्वासी नाहीं मज ॥ ७ ॥ हरीचें नाम मज ह्मणविती

कोणी । तया सुखा धणी धणी वरी ॥ ८ ॥ तुका ह्मणे तया उपकारें बांधलों । ह्मणऊनि आलों शरण संतां ॥ ९ ॥

॥ २७७० ॥ लटिका तो प्रपंच एक हरि साचा । हरिविण आहाच सर्व इंद्रियें ॥ धृ० ॥ लटिकें तें मौन भ्रमाचें तें स्वप्न । हरिविण ध्यान नश्वर अवघें ॥ १ ॥ लटिकिया व्युत्पत्ति हरिविण करिती । हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा ॥ २ ॥ तुका ह्मणे हरि हें धरिसी निर्धारीं । तरी तूं झडकरी जासी वैकुंठा ॥ ३ ॥

॥ २७७१ ॥ सर्वस्वा मुकावें तेणें हरि जिंकावें । अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥ धृ० ॥ मोह ममता माया चाड नाहीं चित्ता । विषयकंदुवेथा जाळूनियां ॥ १ ॥ लोकलज्जा दंभ आणि अहंकार । करूनि मत्सर देशधडी ॥ २ ॥ शांति क्षमा दया सखिया विनउनी । मूळ चक्रपाणी धाडी त्यांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे याती अक्षरें अभिमान । सांडोनियां शरण रिघें संतां ॥ ४ ॥

॥ २७७२ ॥ एकांताचें सुख देईं मज देवा । आघात या जीवा चुकवुनी ॥ धृ० ॥ ध्यानीं रूप वाचे नाम निरंतर । आपुला विसर पडों नेदीं ॥ १ ॥ मायबाळा भेटी सुखाची आवडी । तैशी मज गोडी देईं देवा ॥ २ ॥ कीर्ति ऐकोनियां जालों शरणागत । दासाचें तूं हित करितोसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों दीन पापराशी । घालावें पाठीशीं मायबापा ॥ ४ ॥

॥ २७७३ ॥ लटिकें तें ज्ञान लटिकें तें ध्यान । जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥ धृ० ॥ लटिकेंचि दंभ घातला दुकान । चाळविलें जन पोटासाठीं ॥ १ ॥ लटिकेंचि केलें वेदपारायण । जरि नाहीं स्फुंदन प्रेम कथे ॥ २ ॥ लटिकें तें तप लटिका तो जप । अळस निद्रा झोप कथाकाळीं ॥ ३ ॥ नाम नावडे तो करील बाहेरी । नाहीं त्याची खरी चित्तशुद्धी ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसीं गर्जती पुराणें । शिष्टांचीं वचनें मागिलाही ॥ ५ ॥

॥ २७७४ ॥ भूतीं भगवद्भाव । मात्रासहित जीव । अद्वैत तो ठाव । निरंजन एकला ॥ धृ० ॥ ऐसीं गर्जती पुराणें । वेदवाणी सकळ जन । संत गर्जतील तेणें । अनुभवें निर्भर ॥ १ ॥ माझें तुझें हा विकार । निरसतां एकंकार । न लगे कांहीं फार । विचाराचि करणें ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजें । हें तों नाहीं सहजें । संकल्पाच्या काजें । आपें आप वाढलें ॥ ३ ॥

॥ २७७५ ॥ नेणें फुंकों कान । नाहीं एकांतींचें ज्ञान ॥ धृ० ॥ तुह्मी आइका हो संत । माझा सादर वृत्तांत ॥ १ ॥ नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥ २ ॥ चिंतनाच्या सुखें । तुका ह्मणे नेणें दुःखें ॥ ३ ॥

॥ २७७६ ॥ त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥ धृ० ॥ मग जैसा तैसा राहें । काय पाहें उरलें तें ॥ १ ॥ अंतरींचें विषम गाढें । येऊं पुढें नेदावें ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥ ३ ॥

॥ २७७७ ॥ मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ती ॥ धृ० ॥ देह विसरे

आपुला । जवळी घेतां सीण गेला ॥ १ ॥ दावी प्रेमभातें । आणि अंगावरि चढतें ॥ २ ॥ तुका संतापुढें । पायीं झोंबे लाडें कोडें ॥ ३ ॥

॥ २७७८ ॥ कोणा पुण्या फळ आलें । आजि देखिलीं पाउलें ॥ धृ० ॥ ऐसें नेणें नारायणा । संतीं सांभाळिलें दीना ॥ १ ॥ कोण लाभकाळ । दीन आजिचा मंगळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । लाभ सहज विठ्ठला ॥ ३ ॥

॥ २७७९ ॥ मान इच्छी तो अपमान पावे । अमंगळ सर्वे अभाग्याची ॥ धृ० ॥ एकाचिये अंगीं दुजियाचा वास । आशा पुढें नाश सिद्ध करी ॥ १ ॥ आधीं फळासी कोठें पावों शके । वासनेची भिकेवरी चाली ॥ २ ॥ ह्मणे राजहंस ढोरा नांव । काय तया द्यावें अळंकाराचें ॥ ३ ॥

॥ २७८० ॥ संसारापासूनी कैसें सोडविशी । न कळे हृषीकेशी काय जाणें । करितां न सरे अधिक वाट पाहीं । तृष्णा देशधडी केलों । भक्तिभजनभाव यांसी नाहीं ठाव । चरणीं तुझ्या अंतरलों । मागें पुढें रीग न पुरेचि पाहतां । अवघा अवघीं वेष्टिलों ॥ १ ॥ आतां माझी लाज सखे नारायणा । हीन दीन लीन याचकाची । करितां न कळे कांहीं असतील गुण शेष । करीं होळी संचिताची ॥ धृ० ॥ इंद्रियें द्वारें मन धांवे सैरें । नागवे करितांचि कांहीं । हात पाय कान मुख लिंगस्थान । नेत्र घ्राण द्वारें पाहीं । जया जैसी सोय तया तैसें होय । क्षण एक स्थिर नाहीं । करिती ताडातोडी ऐसी यांची खोडी । न चले माझें यास कांहीं ॥ २ ॥ शरीरसंबंधु पुत्र पत्नी बंधू । धन लोभ मायावंत । जन लोकपाळ मैत्र हे सकळ । सोइरीं सज्जनें बहुतें । नाना कर्म डाय करिती उपाय । बुडावया घातपातें । तुका ह्मणे हरि राखे भलत्या परी । आह्मी तुह्मीं शरणागतें ॥ ३ ॥

॥ २७८१ ॥ नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ॥ धृ० ॥ ऐसा लाभ बांधा गांठीं । विठ्ठलपायीं पडे मिठी ॥ १ ॥ नामापरतें साधन नाहीं । जें तूं करिशी आणिक कांहीं ॥ २ ॥ हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका ॥ ३ ॥

॥ २७८२ ॥ प्राण समर्पिला आह्मीं । आतां उशीर कां स्वामी ॥ धृ० ॥ माझें फेडावें उसणें । भार न मना या ऋणें ॥ १ ॥ जाला कंठस्फोट । जवळी पातलों निकट ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । कैसी बरी वाटे देवा ॥ ३ ॥

॥ २७८३ ॥ येणें मार्गे आले । त्यांचें निसंतान केलें ॥ धृ० ॥ ऐसी अवघड वाट । ऐकोन आलों मी बोभाट ॥ १ ॥ नागविल्या थाटी । उरों नेदीच लंगोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे चोर । तो हा उभा कटिकर ॥ ३ ॥

॥ २७८४ ॥ तोंवरि तोंवरि जंबुक करि गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥ धृ० ॥ तोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या अगस्तिब्राह्मणा देखिलें नाहीं ॥ १ ॥ तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टि पडिली नाहीं ॥ २ ॥ तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टि देखिला नाहीं ॥ ३ ॥ तोंवरि तोंवरि माळामुद्रांचीं भूषणें । जंव तुक्याचें दर्शन जालें नाहीं ॥ ४ ॥

॥ २७८५ ॥ तोंवरि तोंवरि शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥ धृ० ॥

शोभती दीपिका। जुगवता एका भास्करासी ॥ १ ॥ तोंवरि तोंवरि सांगती
ही। जंव नाहीं भेटी तुक्यासवें ॥ २ ॥

धरोनि दोन्ही रूपें पाळणें संहार। करी कोप रुद्र दयाळ विष्णू ॥ धृ० ॥
मुगुट माथां शिरीं। कमळापति गौरीहर एक ॥ १ ॥ भस्म
। शंकर श्रीरंग उभयरूपीं ॥ २ ॥ वैजयंतीमाळा वासुगीचा हार। केयूरें
रा ॥ ३ ॥ कपाळ झोळी एका स्मशानींचा वास। एक जगन्निवास वि
हा म्हणे मज उभयरूपीं एक। सारोनि संकल्प शरण आलों ॥ ५ ॥

उचिताचा भाग होतों राखोनियां। दिसती ते वांयां कष्ट गेले ॥ धृ० ॥
ीं राहेचि ना रुची। खळाऐसें वाची कुची जालें ॥ १ ॥ विश्वासानें नाहीं
करविला धीर येथवरी ॥ २ ॥ तुका म्हणे शेकीं थार नाहीं बुड। केलें
विलें ॥ ३ ॥

लांब लांब जटा काय वाढवुनी। पावडें घेऊनि क्रोधें चाले ॥ धृ० ॥
सा शिष्या दे जनाला। ऐशा तापशाला बोध कैचा ॥ १ ॥ सेवी भांग
दंड। परि तो अखंड भ्रांतीमाजी ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला।
ा पांडुरंग ॥ ३ ॥

अवघींच तीर्थें घडलीं एकवेळा। चंद्रभागा डोळां देखिलिया ॥ धृ० ॥
गेलीं दिगांतरीं। वैकुंठ पंढरी देखिलिया ॥ १ ॥ अवघिया संतां एकवेळा
क दृष्टि देखिलिया ॥ २ ॥ तुका म्हणे जन्मा आल्याचें सार्थक। विठ्ठलाचि
ा ॥ ३ ॥

सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल। तेणें गळां माळ घालूं नये ॥ धृ० ॥
धर्म दया क्षमा शांती। तेणें अंगीं विभूति लावूं नये ॥ १ ॥ ज्यासी न
महिमान। तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये ॥ २ ॥ ज्याचें मन नाहीं लागलें
। प्रपंचासी टाकूं नये ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्यासी नाहीं हरिभक्ती। तेणें
रूं नये ॥ ४ ॥

आह्मी असों निश्चिंतीनें। एक्या गुणें तुमचिया ॥ धृ० ॥ तुराचारीं
तां प्रेमें ह्मणोनी ॥ १ ॥ नाहीं तुह्मां धांव घेतां। कृपावंता आळस ॥ २ ॥
सरूं काई। तुज वो आई विठ्ठले ॥ ३ ॥

। अनुभवें वदे वाणी। अंतर ध्यानीं आपुलें ॥ धृ० ॥ कैंची पिका दुध-
ावी पांढरें ॥ १ ॥ जातीऐसा दावी रंग। बहु जग या नांवें ॥ २ ॥ तुका
ं। ढुंगाभोंवतें आपुलिया ॥ ३ ॥

। परपीडक तो आह्मां दावेदार। विश्वीं विश्वंभर ह्मणउनी ॥ धृ० ॥ देहूं
वलोकूं डोळा। राखूं तो चांडाळा ऐसा दुरी ॥ १ ॥ अनाचार कांहीं न
। बहु होय मन कासावीस ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी एकविध सेवा। विसुरव
चित्तें ॥ ३ ॥

॥ २७९४ ॥ कांहीं न मागे कोणांसी । तोचि आवडे देवासी ॥ धृ० ॥ देव तयासी ह्मणावें । त्याचे चरणीं लीन व्हावें ॥ १ ॥ भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥ २ ॥ नाहीं नाहीं त्यासमान । तुका ह्मणे मी जमान ॥ ३ ॥

॥ २७९५ ॥ नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥ धृ० ॥ ऐसें धरोनियां ध्यान । मनें करावें चिंतन ॥ १ ॥ ब्रह्मादिकांच्या ध्याना नये । तो हा कीर्तनाचे सोये ॥ २ ॥ तुका ह्मणे सार घ्यावें । मनें हरिरूप पाहावें ॥ ३ ॥

॥ २७९६ ॥ आडलिया जना होसि सहाकारी । अंधळियाकरीं काठी तूंची ॥ धृ० ॥ आडिले गांजिले पीडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ १ ॥ प्रल्हाद महासंकटीं रक्षिला । तुह्मी अपंगिला नानापरी ॥ २ ॥ आपुलेंचि अंग तुह्मी वोडविलें । त्याचें निवारलें महा दुःख ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे कृपे पार नाहीं । माझे विटाबाई जननीये ॥ ४ ॥

॥ २७९७ ॥ तपासी तें मन करूं पाहे घात । धरोनि सांगात इंद्रियांचा ॥ धृ० ॥ ह्मणोनि कीर्त्तन आवडलें मज । सांडोनियां लाज हेंचि करीं ॥ १ ॥ पाहातां आगमनिगमाचे ठाव । तेथें नाहीं भाव एकविध ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें नाहीं वो विकार । नाम एक सार विठोबाचें ॥ ३ ॥

॥ २७९८ ॥ गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण ॥ धृ० ॥ भूतीं नारायण खरा । आप तैसाचि दुसरा ॥ १ ॥ न कळतां दोरी साप । राहूं नेदावा तो कांप ॥ २ ॥ तुका ह्मणे गुणदोषी । ऐसें न पडावें सोसीं ॥ ३ ॥

॥ २७९९ ॥ अंगिकार ज्याचा केला नारायणें । निंद्य तेंहि तेणें वंद्य केलें ॥ धृ० ॥ अजामेळ भिल्ली तारिली कुंटणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली ॥ १ ॥ ब्रह्महत्याराशी पातकें अपार । वाल्मीक किंकर वंद्य केला ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें भजन प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥ ३ ॥

॥ २८०० ॥ धनवंता घरीं । करी धनचि चाकरी ॥ धृ० ॥ होय बैसल्या व्यापार । न लगे सांडावेंचि घर ॥ १ ॥ रानीं वनीं द्वीपीं । असतीं तीं होतीं सोपीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोल । देतां कांहीं नव्हे खोल ॥ ३ ॥

॥ २८०१ ॥ हा गे माझा अनुभव । भक्तिभाव भाग्याचा ॥ धृ० ॥ केला ऋणी नारायण । नव्हे क्षण वेगळा ॥ १ ॥ घालोनियां भार माथां । अवघी चिंता वारली ॥ २ ॥ तुका ह्मणे वचनासाठीं । नाम कंठीं धरोनी ॥ ३ ॥

॥ २८०२ ॥ देव आहे सुकाळ देशीं । अभाग्यासी दुर्भिक्षा ॥ धृ० ॥ नेणती हा करूं सांठा । भरलें फांटा आडरानें ॥ १ ॥ वसवूनि असे घर । माग दूर घातला ॥ २ ॥ तुका ह्मणे मन सुरे । मग जें उरे तोंचि तूं ॥ ३ ॥

॥ २८०३ ॥ खुंटोनियां दोरी आपणियांपाशीं । वावडी आकाशीं मोकलिली ॥ धृ० ॥ आपुलियां आहे मालासी जतन । गाहाणाचें ऋण बुडों नेणें ॥ १ ॥ बीज नेलें तेथें येईल अंकुर । जतन तें सार करा याची ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी निश्चिंतीची सेवा । वेगळें नाहीं देवा उरों दिलें ॥ ३ ॥

॥ २८०४ ॥ शाहाणपणें वेद मुका । गोपिका त्या ताकटी ॥ धृ० ॥ कैसें येथें कैसें तेथें । शहाणे ते जाणती ॥ १ ॥ यज्ञमुखें खोडी काढी । कोण गोडी बोरांची ॥ २ ॥ तुका ह्मणे भावाविण । अवघा सीण केला होय ॥ ३ ॥

॥ २८०५ ॥ मजुराचें पोट भरे । दाता उरे संचला ॥ धृ० ॥ या रे या रे हातोहातीं । काम माती सारावी ॥ १ ॥ रोजकीर्दी होतां झाडा । रोकडाचि पर्वत ॥ २ ॥ तुका ह्मणे खोल पाया । वेचों काया क्लेशेसीं ॥ ३ ॥

॥ २८०६ ॥ स्मशानीं आह्मां न्याहालीचें सुख । या नांवें कौतुक तुमची कृपा ॥ धृ० ॥ नाहीं तरीं वांयां अवघें निर्फळ । शब्द ते पोकळ बडबड ॥ १ ॥ झाडें झुडें जीव सोइरे पाषाण । होती तई दान तुह्मीं केलें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां पाहे अनुभव । घेऊनि हातीं जीव पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ २८०७ ॥ आमची जोडी ते देवाचे चरण । करावें चिंतन विठोबाचें ॥ धृ० ॥ लागेल तरीं कोणी घ्यावें धणीवरी । आमुपचि परि आवडीच्या ॥ १ ॥ उभारिला कर प्रसिद्ध या जग । करूं केला त्याग मागें पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे होय दरिद्र विच्छिन्न । ऐसें देऊं दान एकवेळे ॥ ३ ॥

॥ २८०८ ॥ दधिमाजी लोणी जाणती सकळ । तें काढी निराळें जाणें मंथन ॥ धृ० ॥ अग्नि काष्ठामाजी ऐसें जाणें जन । मथिलियाविण कैसा जाळी ॥ १ ॥ तुका ह्मणे मुख मळीण दर्पणीं । उजळिल्यावांचूनि कैसें भासे ॥ २ ॥

॥ २८०९ ॥ नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ॥ धृ० ॥ काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ॥ १ ॥ सोडविना राजा देशींचा चौधरी । आणिक सोइरीं भलीं भलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुला सोडविना कोणी । एका चक्रपाणी वांचूनियां ॥ ३ ॥

॥ २८१० ॥ पुढें जेणें लाभ घडे । तेंचि वेडे नाशिती ॥ धृ० ॥ येवढी कोठें नागवण । अंधारून विष घ्यावें ॥ १ ॥ होणारासी मिळे बुद्धी । नेदी शुद्धि धरूं तें ॥ २ ॥ तुका ह्मणे जना सोंग । दावी रंग आणिक ॥ ३ ॥

॥ २८११ ॥ ऐका गा ए अवघे जन । शुद्ध मन तें हित ॥ धृ० ॥ अवघा काळ नव्हे जरी । समयावरी जाणावें ॥ १ ॥ नाहीं कोणी सवें येता । संचिता या वेगळा ॥ २ ॥ बरवा अवकाश आहे । करा साहे इंद्रियें ॥ ३ ॥ कर्मभूमि ऐसा ठाव । वेवसाव जाणावा ॥ ४ ॥ तुका ह्मणे उत्तम जोडी । जाती घडी नरदेह ॥ ५ ॥

॥ २८१२ ॥ संतसेवेसि अंग चोरी । दृष्टि न पडो तयावरी ॥ धृ० ॥ ऐसियासी व्याली रांड । जळो जळो तिचें तोंड ॥ १ ॥ संतचरणीं ठेवितां भाव । आपेंआप भेटे देव ॥ २ ॥ तुका ह्मणे संतसेवा । माझ्या पूर्वजांचा ठेवा ॥ ३ ॥

॥ २८१३ ॥ गेले पळाले दिवस रोज । काय ह्मणतोसि माझें माझें ॥ धृ० ॥ सळे धरोनि बैसला काळ । फाकों नेदी घटिका पळ ॥ १ ॥ कां रे अद्यापि न कळे । केश फिरले कान डोळे ॥ २ ॥ हित कळोनि असतां हातीं । तोंडीं पाडोनि घेसी माती ॥ ३ ॥

तुज टाउकें मी जाणार । पाया शोधोनि बांधिसी घर ॥ ४ ॥ तुका ह्मणे वेगें । पंढरिराया शरण रिघें ॥ ५ ॥

॥ २८१४ ॥ आतां माझ्या मायबापा । तूं या पापा प्रायश्चित्त ॥ धृ० ॥ फजित हे केले खळ । तो विटाळ निवारीं ॥ १ ॥ प्रेम आतां पाजीं रस । करीं वास अंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । जिवलगा माझिया ॥ ३ ॥

॥ २८१५ ॥ कां रे न पवसी धांवण्या । अंगराख्या नारायणा ॥ धृ० ॥ अंगीं असोनियां बळ । होसी खऱ्याळ नाव्हाळ ॥ १ ॥ आह्मां नरकासी जातां । काय येईल तुझ्या हातां ॥ २ ॥ तुका ह्मणे कान्हा । क्रियानष्टा नारायणा ॥ ३ ॥

॥ २८१६ ॥ माझे पाय तुझी डोई । ऐसें करिं गा भाक देईं ॥ धृ० ॥ पाहतां तंव उफराटें । घडे तरी भाग्य मोठें ॥ १ ॥ बहु साधन मोलाचें । यासी जोडा तुजें कैचें ॥ २ ॥ नका अनमानूं विठ्ठला । तुका ह्मणे धडा जाला ॥ ३ ॥

॥ २८१७ ॥ पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥ धृ० ॥ येर वेठ्या पोट भरी । चाम मसकाचे परी ॥ १ ॥ जेऊनि तो धाला । हरिचिंतनीं केला काला ॥ २ ॥ तुका ह्मणे चवी आलें । जें कां मिश्रित विठ्ठलें ॥ ३ ॥

॥ २८१८ ॥ चरणाचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ॥ धृ० ॥ अंध पारखी माणिकें । बोलविसी स्पष्ट मुकें ॥ १ ॥ काय नाहीं सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ २ ॥ तुका ह्मणे मूढा । मज चेष्टविलें जडा ॥ ३ ॥

॥ २८१९ ॥ बळिवंत कर्म । करी आपुला तो धर्म ॥ धृ० ॥ पुढें घालूनियां सत्ता । न्यावें पतना पतिता ॥ १ ॥ आचरणें खोटीं । केलीं सलताती पोटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । नाहीं भजन केली सेवा ॥ ३ ॥

॥ २८२० ॥ कैं वाहावें जीवन । कैं पलंगीं शयन ॥ धृ० ॥ जैसी जैसी वेळ पडे तैसें होणें घडे ॥ १ ॥ कैं भोज्य नानापरी । कैं कोरड्या भाकरी ॥ २ ॥ कैं बसावें वहनीं । कैं पायीं अनवाणी ॥ ३ ॥ कैं उत्तम प्रावर्णें । कैं वसनें तीं जीर्णें ॥ ४ ॥ कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ॥ ५ ॥ कैं सज्जनाशीं संग । कैं दुर्जनाशीं योग ॥ ६ ॥ तुका ह्मणे जाण । सुखदुःख तें समान ॥ ७ ॥

॥ २८२१ ॥ उंच निच कांहीं नेणें हा भगवंत । तिष्ठे भाव भक्त देखोनियां ॥ धृ० ॥ दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्या घरीं रक्षी प्रल्हादासी ॥ १ ॥ चर्म रंगूं लागे रोहिदासा संगीं । कबिराचे मागीं विणी शेले ॥ २ ॥ सजनकसाया विकूं लागे मास । मळा सांवत्यास खुरपूं लागे ॥ ३ ॥ नरहरिसोनारा घडों फुंकूं लागे । चोख्यामेळ्या संगें ढोरें ओढी ॥ ४ ॥ नामयाची जनी सवें वेची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥ ५ ॥ नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी ॥ ६ ॥ अर्जुनाचीं घोडीं हाकी हा सारथी । भक्षी पोहे प्रीति सुदाम्याचे ॥ ७ ॥ गौळियांचे घरीं गाई अंगें वळी । द्वारपाळ बळीद्वारीं जाला ॥ ८ ॥ यंकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । आंबऋषीचे सोशी गर्भवास ॥ ९ ॥ मिराबाई साठीं घेतो विषप्याला । दामाजीचा जाला पाडेवार

माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी महत्याचीं अंगें भरी ॥ ११ ॥ पुंडलि-
नि तिष्ठत । तुका ह्मणे मात धन्य त्याची ॥ १२ ॥

भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रीं दिवस वाट तुझी ॥ धृ० ॥
मा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥ १ ॥ दिवाळीच्या मुळा
ही । पाहतसे वाडुली पंढरीची ॥ २ ॥ भुकेलिया बाळ अति शोक करी ।
माउलीची ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावीं

आले संत पाय ठेविती मस्तकीं । इहीं उभयलोकीं सरता केलों ॥ धृ० ॥
लोळेन चरणीं । आजि इच्छाधणी फिटईल ॥ १ ॥ अवघीं पूर्व पुण्यें जालीं
अवघेंचि मंगळ संतभेटी ॥ २ ॥ तुका ह्मणे कृतकृत्य जालों देवा । नेणें परि
वें ॥ ३ ॥

करीं धंदा परि आवडती पाय । प्रीति सांगों काय नेणां देवा ॥ धृ० ॥
ीं सदा सर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥ १ ॥ नेमून ठेविली काय्या
चिये वाणी गुण वदे ॥ २ ॥ मनासीं उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ
य ॥ ३ ॥ उसंतितों पंथ वेठीच्चिया परी । जीवनसूत्र दोरीपाशीं ओढ
प्रणे ऐसें करितों निर्वाण । जीव तुह्मां भिन्न नाहीं माझा ॥ ५ ॥

कां रे माझीं पोरें ह्मणसील ढोरें । मायबाप खरें काय एक ॥ धृ० ॥ कां रे
ारिसी तळमळ । मिथ्याचि कोल्हाळ मेलियाचा ॥ १ ॥ कां रे माझें माझें
। नो संडविली दूत यमा हातीं ॥ २ ॥ कां रे मी बळिया ह्मणविसी ऐसा ।
सा उचलविसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे न धरीं भरवसा कांहीं । वेगीं शरण
॥ ४ ॥

अगा करुणाकरा करितसें धांवा । या मज सोडावा लवकरी ॥ धृ० ॥
ीं करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उताविळ ॥ १ ॥ मागें पुढें अवघा
। ठेवूनि पायीं भाव वाट पाहें ॥ २ ॥ उशीर तो आतां न पाहिजे केला ।
ा मायबापा ॥ ३ ॥ उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां
॥ तुका ह्मणे आतां करीं कृपादान । पाउलें समान दावीं डोळां ॥ ५ ॥

न मनीं ते ज्ञानी न मनीं ते पंडित । ऐसे परीचे एकएका भावें ॥ धृ० ॥
ीं आणिकां उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ॥ १ ॥ न मनीं ते योगी
ास । दर्शनें बहुवस बहुतां परीचीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तयां नमन बाह्यात-
ती परी चित्तशुद्धीचे ॥ ३ ॥

कासिया पाषाण पूजिती पितळ । अष्ट धातु खळ भावें विण ॥ धृ० ॥
भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलियेलें ॥ १ ॥ काय करिल जपमाळा
रेशी वेळोवेळां विषयजप ॥ २ ॥ काय करिशील पंडित हे वाणी । अक्ष-

राभिमानी थोर होय ॥ ३ ॥ काय करिशील कुशल गायन । अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥ ४ ॥ तुका ह्मणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ॥ ५ ॥

॥ २८२९ ॥ अंतरींचें गोड । राहे आवडीचें कोड ॥ धृ० ॥ संग्रहणें येती अंगा गुणदोष मनोभंगा ॥ १ ॥ उचिताच्या कळा । नाहीं कळत सकळा ॥ २ ॥ तुका ह्मणे अभावना । भावीं मूळ तें पतना ॥ ३ ॥

॥ २८३० ॥ शिळा जया देव । तैसा फळे त्याचा भाव ॥ धृ० ॥ होय जतन तें गोड अंतरा येती नाड ॥ १ ॥ देव जोडे भावें । इच्छेचें तें प्रेम घ्यावें ॥ २ ॥ तुका ह्मणे मो दावी । तैशीं फळें आलीं व्हावीं ॥ ३ ॥

॥ २८३१ ॥ कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुह्मी देवा संतजन ॥ धृ० विचित्र विंदानी नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥ १ ॥ काय वानरांच अंगींची ते शक्ती । उदका तरती वरी शिळा ॥ २ ॥ तुका ह्मणे करी निमित्यचि आड चेष्टवूनि जड दावी पुढें ॥ ३ ॥

॥ २८३२ ॥ पायां पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पायीं ॥ धृ० ॥ तीं हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असें बाळ ॥ १ ॥ काय उणें तुह्मां संताचि घरीं । विदित या परि सकळही ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें उचित हे सेवा । नये का ठेवाठेवी कांहीं ॥ ३ ॥

॥ २८३३ ॥ वदवावी वाणी माझी कृपावंता । वाग्पुष्प संतां समर्पीशी ॥ धृ० सर्वसंकटाचा तुह्मां परिहार । घालावा ह्यां भार पांडुरंगा ॥ १ ॥ एकसरें चिंता ठेवूनि पायीं । जालों उतराई होतों तेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें जालें अवसान । काया वाच मन वेचूनियां ॥ ३ ॥

॥ २८३४ ॥ नमावें पाय हें माझें उचित । आशीर्वादें हित तुमचिया ॥ धृ० ॥ कृपेन थोरस न समाये पोटीं । ह्मणोनि उफराटीं वचनें हीं ॥ १ ॥ तुमची उष्टावळी हें मा भोजन । झाडावें अंगण केरपुंजे ॥ २ ॥ परि ऐसें पुण्य नाहीं माझें गांठीं । जेणें प मिठी पायांसवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे राहे आठवण चित्तीं । ऐशी कृपा संतीं के तुह्मीं ॥ ४ ॥

॥ २८३५ ॥ काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥ धृ० काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ १ ॥ अमंगळप कांटाळा न धरी । उचलोनि करीं कंठीं लावी ॥ २ ॥ लेववी आपुलें अंगें अळंकार संतोषाये फार देखोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्तुति योग्य नाहीं परी । तुह्मां लाज थो अंकिताची ॥ ४ ॥

॥ २८३६ ॥ माझिया मीपणावर पडो पाषाण । जळो हें भूषण नाम माझें । पा नाहीं पार दुःखाचे डोंगर । जालों ये भूमीसी ओझें ॥ धृ० ॥ काय विटंबना सां किती । पाषाण फुटती ऐसें दुःख । नर नारी सकळ उत्तम चांडाळ । न पाहाती मा मुख ॥ १ ॥ काया वाचा मनें अघटित करणें । चर्मचक्षु हात पाय । निंदा द्वेष घा

भिचार । आणिक सांगों किती काय ॥ २ ॥ लक्ष्मीमदें मातें घडले मह्
दोनी भेदाभेद । पितृवचन घडली अवज्ञा अविचार । कुटिल कुन्चर वार्दी
आणिक किती सांगों ते अवगुण । न वळे जिव्हा कांपे मन । मृतद्
शब्दा धीर । विषयीं लंपट हीन ॥४॥ संत महानुभाव ऐका हें उत्तरें ।
चारें वृद्धि पापा । तुका ह्मणे सरतें करा पांडुरंगीं । शरण आलों माय-

## कृष्णजन्म.

फिराविलीं दोनी । कन्या आणि चक्रपाणी ॥ धृ० ॥ जाला आनंदें
रले गोविंद ॥ १ ॥ तुटलीं बंधनें । वसुदेवदेवकीचीं दर्शनें ॥ २ ॥ गोकु-
ब्रह्म अव्यक्त चांगलें ॥ ३ ॥ नंद दसवंती । धन्य देखिले श्रीपती ॥ ४ ॥
ळ । आले अष्टमी गोपाळ ॥ ५ ॥ आनंदली मही । भार गेला सकळही
ह्मणे कंसा । आट भोविला वळसा ॥ ७ ॥

सोडियेल्या गांठी । दरुषणें कृष्णभेटी ॥ धृ० ॥ करिती नारी अक्षवाणें ।
दानें ॥ १ ॥ उपजल्या काळें । रूपें मोहिलीं सकळें ॥ २ ॥ तुका तेथें
नाडोनि दुसरी ॥ ३ ॥

मुख डोळां पाहे । तैशीच ते उभी राहे ॥ धृ० ॥ केल्याविण नव्हे हातीं ।
परती ॥ १ ॥ न धरिती मनीं । कांहीं संकोच दाटणी ॥ २ ॥ तुका ह्मणे
ल्या देहभावें ॥ ३ ॥

गोकुळीच्या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ धृ० ॥ बाळकृष्ण नंदा घरीं ।
नारी ॥ १ ॥ गुढिया तोरणें । करिती कथा गाती गाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे
घेलीं गोविंदें ॥ ३ ॥

विटंबिलें भट । दिला पाठीवरी पाट ॥ धृ० ॥ खोटें जाणोनि अंतर ।
थंभर ॥ १ ॥ तेंचि करी दान । जैसें आइके वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें ।
ली जीवें ॥ ३ ॥

प्रेम देवाचें देणें । देहभाव जाय जेणें । न धरावी मनें । शुद्धि देशका-
॥ मुक्त लज्जाविरहित । भाग्यवंत हरिभक्त । जाले वोसंडत । नामकीर्ति-
जोडी जाली अविनाश । जन्मोनि जाले हरिचे दास । त्यांस नव्हे गर्भ-
परब्रह्मीं ॥ २ ॥ हेचि वाहाती संकल्प । पुण्यप्रसंगाचे जप । तुका ह्मणे
ाहीं हरिजना ॥ ३ ॥

तोचि लटिक्यामाजी भला । ह्मणे देव म्यां देखिला ॥ १ ॥ ऐशियाच्या
धन कैसें नासे । बुडवी आपणासरिसे । अभिमानें आणिकांस ॥ धृ० ॥
जोडा । देव ह्मणवितां या मूढा ॥ २ ॥ आणिकांचे न मनी सार्चे । तुका
वें ॥ ३ ॥

॥ २८४४ ॥ होईल जाला अंगें देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥ धृ० ॥ येरांनीं सांगावी रेमट काहाणी । चित्ता रंजवणी करावया ॥ १ ॥ धाला आणिकांचें नेणें तान भूक । सुखें पाहे सुख आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे अनुभव शब्दाचें गौरव कामा नये ॥ ३ ॥

॥ २८४५ ॥ कां न वजावें बैसोनि कथे । ऐसें ऐका हो श्रोते । पांडुरंग तेथें । उभ असे तिष्ठत ॥ धृ० ॥ ह्मणऊनि करी धीर । लक्ष लावूनि सादर । भवसिंधुपार । असे ज्या तरणें ॥ १ ॥ कथे कांहीं अणुमात्र । नो बोलावें हा वृत्तांत । देवभक्तां चित्त समरसीं खंडणा ॥ २ ॥ कां वैष्णवा पूजावें । ऐका घेईल जो भावें । चरणरजा शिवें वोडविला मस्तक ॥ ३ ॥ ऐसें जाणा हें निभ्रांत । देव वैष्णवांचा अंकित । अलि आतित । परमित त्यासाठीं ॥ ४ ॥ घालोनि लोळणी । तुका आला लोटांगणीं । वंदे पायवणीं । संतचरणींचें माथां ॥ ५ ॥

॥ २८४६ ॥ अनुभवें आलें अंगा । तें या जगा देतसें ॥ धृ० ॥ नव्हती हातचे बोल । मूळ ओल अंतरिंची ॥ १ ॥ उतरूनि दिलें कसीं । शुद्धरसीं सरें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे दुसरें नाहीं । ऐसी ग्वाही गुजरली ॥ ३ ॥

॥ २८४७ ॥ साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाही ॥ धृ० ॥ लोलुपता काय निद्रेतें जिणावें । भोजन करावें परमित ॥ १ ॥ एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं वचन । प्राण गेल्या जाण बोलों नये ॥ २ ॥ संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरु कृपा ॥ ४ ॥

॥ २८४८ ॥ अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ती । मुळींची जे होती आच्छादित ॥ धृ० ॥ तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न माये । उपमेशीं काये देऊं सुखा ॥ १ ॥ भावा मथिलें निर्गुण संचलें । तें हें उभें केलें विटेवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां ब्रह्मांड पंढरी प्रेमाची जे थोरी सांठवण ॥ ३ ॥

॥ २८४९ ॥ कासया गा मज घातलें संसारीं । चित्त पायांवरी नाहीं तुझ्या ॥ धृ० ॥ कासया गा मज घातलें या जन्मा । नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥ १ ॥ नामाविण माझ्या वाचा अमंगळ । ऐसा कां चांडाळ निर्मियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी जळो जळो काया विठ्ठला सखया वांचूनियां ॥ ३ ॥

॥ २८५० ॥ प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥ धृ० ॥ सोस करिसी वांयां । भज मना पंढरिराया ॥ १ ॥ प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावे दुःख ॥ २ ॥ प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करीना बोभाट ॥ ३ ॥

॥ २८५१ ॥ हीन माझी याती । वरी स्तुति केली संतीं ॥ धृ० ॥ अंगीं वसूं पाहे गर्व माझें हरावया सर्व ॥ १ ॥ मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥ २ ॥ राख रा गेलों वांयां । तुका ह्मणे पंढरिराया ॥ ३ ॥

॥ २८५२ ॥ तपाचे सायास । न लगे घेणें वनवास ॥ धृ० ॥ ऐसें कळलें आ

एक । जालों नामाचे धारक ॥ १ ॥ जाळीं महाकर्मे । दावीं निजसुख धर्मे ॥ २ ॥ तुका म्हणे येणें । कळिकाळ तें ठेंगणें ॥ ३ ॥

॥ २८५३ ॥ माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥ धृ० ॥ हे कां नेणां नारायणा । मज चाळवितां दीना ॥ १ ॥ नाग्वी धांवणें । तेथें साह्य व्हावें कोणें ॥ २ ॥ राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥ ३ ॥ तुझ्या केल्याविण । नव्हे स्थिर वर्म जन ॥ ४ ॥ तुका म्हणे हरी । सूत्र तुझ्यां हातीं दोरी ॥ ५ ॥

॥ २८५४ ॥ गाऊं नेणें परि मी कांहीं गाईन । शरण जाईन पांडुरंगा ॥ धृ० ॥ ब्रह्मां- डनायक मी त्याचा अंकित । काय यमदूत करिती काळ ॥ १ ॥ वेश्या त्याच्या नामें तारिली गणिका । अजामेळासारिखा पापरासी ॥ २ ॥ चरणींच्या रजें अहिल्या तारिली । रूपवंत केली कुबजा जेणें ॥ ३ ॥ पृथिवी तारिली पाताळासी जातां । तुका म्हणे आतां आम्ही किती ॥ ४ ॥

॥ २८५५ ॥ गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ॥ धृ० ॥ काय करोनि पठन । केली अहंता जतन ॥ १ ॥ अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥ २ ॥ तुका म्हणे लंड । त्याचें हाणोनि फोडा तोंड ॥ ३ ॥

॥ २८५६ ॥ परद्रव्य परनारी । अभिलाषुनि नाक धरी ॥ धृ० ॥ जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ १ ॥ सोंवळ्याची स्फीती । क्रोधें विटाळला चित्ती ॥ २ ॥ तुका म्हणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥ ३ ॥

॥ २८५७ ॥ टिळा टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥ धृ० ॥ अवघा बरपंगा सारा । पोटीं विषयांचा थारा ॥ १ ॥ मुद्रा लावितां कोरोनी । मान व्हावयासी जनीं ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥ ३ ॥

॥ २८५८ ॥ ऐसे संत जाले कळीं । तोंडीं तमाखुची नळी ॥ धृ० ॥ स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोडवली ॥ १ ॥ भांगभुर्का हें साधन । पची पडे मद्यपान ॥ २ ॥ तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ ३ ॥

॥ २८५९ ॥ जातीची शिंदळी । तिला कोण वंशावळी ॥ धृ० ॥ आपपर ना बापघर । चिंती मनीं व्यभिचार ॥ १ ॥ सेजे असोनियां धणी । परद्वार मना आणी ॥ २ ॥ तुका म्हणे असल जाती । जातीसाठीं खाती माती ॥ ३ ॥

॥ २८६० ॥ अंधळ्याची काठी । हिरोनियां कडा लोटी ॥ धृ० ॥ हे कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥ १ ॥ साकर म्हणोनि माती । चाळवूनि घाली हातीं ॥ २ ॥ तुका म्हणे वाटे । देवा पसरावे सराटे ॥ ३ ॥

॥ २८६१ ॥ प्रीतिचिया बोला नाहीं पेसपाड । भलतसें गोड करुनी घ्यावें ॥ धृ० ॥ तैसें विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीनें गायें नाम तुझें ॥ १ ॥ वेडे वांकडे बाळकाचे बोल । करिती नवल मायबाप ॥ २ ॥ तुका म्हणे तुज येवो माझी दया । भीर्वींच्या सखया जिवलगा ॥ ३ ॥

॥ २८६२ ॥ माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ धृ० ॥

आतां आड उभा राहे नारायणा । दयासिंधुपणा साच करी ॥ १ ॥ वाचा वदे परि करणें कठीण । इंद्रिया आधीन जालों देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥ ३ ॥

॥ २८६३ ॥ वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ति मानवाची सांगों नये ॥ धृ० ॥ उदंडचि जाले जन्मोनियां मेले । होऊनियां गेले राव रंक ॥ १ ॥ त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥ २ ॥ अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्ममरण व्यथा दूर होती ॥ ४ ॥

॥ २८६४ ॥ नको देऊं देवा पोटीं हें संतान । मायाजाळें जाण नाठवसी ॥ धृ० ॥ नको देऊं देवा द्रव्य आणि भाग्य । तो एक उद्वेग होय जीवा ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं फकिराचे परी । रात्रदिवस हरि येइल घरा ॥ ३ ॥

॥ २८६५ ॥ जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेच करी ॥ धृ० ॥ उत्तमचि गति तो एक पावेल । उत्तम भोगील जीव खाणी ॥ १ ॥ परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ २ ॥ भूतदया गाईपशूचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ३ ॥ शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडिलांचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥ ५ ॥

॥ २८६६ ॥ हरि ह्मणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि ह्मणतां ॥ धृ० ॥ हरि ह्मणतां भुक्ति हरि ह्मणतां मुक्ती । चुके यातायाती हरि ह्मणतां ॥ १ ॥ तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि ह्मणतां ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें जपा हरिचें नाम । मग काळयम शरण तुह्मा ॥ ३ ॥

॥ २८६७ ॥ नये वांटूं मन । कांहीं न देखावें भिन्न ॥ धृ० ॥ पाय विठोबाचे चित्तीं । असों द्यावे दिवसराती ॥ १ ॥ नये काकुळती । कोणा यावें हरिभक्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे साई । करील कृपेची विठाई ॥ ३ ॥

॥ २८६८ ॥ सकळ देवाचें दैवत । उभें असे रंगा आंत ॥ धृ० ॥ रंग लुटा माझे बाप । शुद्ध भाव खरें माप ॥ १ ॥ रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादि संतीं ॥ २ ॥ तुका लुटितां हे रंग । साह्य जाला पांडुरंग ॥ ३ ॥

॥ २८६९ ॥ उशीर कां केला । कृपाळुवा जी विठ्ठला ॥ धृ० ॥ मज दिलें कोणा हातीं । काय मानिली निश्चिंती ॥ १ ॥ कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थिर ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव । ऐसी भाकितसे कींव ॥ ३ ॥

॥ २८७० ॥ तुका वेडा अविचार । करी बडबड फार ॥ धृ० ॥ नित्य वाचे हाचि छंद । रामकृष्ण हरि गोविंद ॥ १ ॥ धरी पांडुरंगीं भाव । आणिक नेणें दुजा देव ॥ २ ॥ गुरुज्ञान सर्वां ठायीं । दुजें न विचारी कांहीं ॥ ३ ॥ बोल नाईके कोणाचे । कथे नागवाचि नाचे ॥ ४ ॥ संगउपचारें कांटाळे । सुखें भलते ठायीं लोळे ॥ ५ ॥ कांहीं उपदे-

शिलें नेणें । वाचे विठ्ठल विठ्ठल ह्मणे ॥ ६ ॥ केला बहुतीं फजित । तरी हेंचि करी नित्य ॥ ७ ॥ अहो पंडितजन । तुका टाकावा थुंकोन ॥ ८ ॥

॥ २८७१ ॥ आली सिंहस्थपर्वणी । न्हाव्या भटा जाली धणी ॥ धृ० ॥ अंतरीं पापाच्या कोडी । वरिवरि बोडी डोई दाढी ॥ १ ॥ बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥ २ ॥ पाप गेल्याची काय खुण । नाहीं पालटले अवगुण ॥ ३ ॥ भक्तिभावेंविण । तुका ह्मणे अवघा सीण ॥ ४ ॥

॥ २८७२ ॥ तुज घालोनियां पूजितों संपुष्टीं । परि तुझ्या पोटीं चवदा भुवनें ॥ धृ० ॥ तुज नाचऊनि दाखवूं कौतुका । परि रूपरेखा नाहीं तुज ॥ १ ॥ तुजलागीं आह्मी गात असों गीत । परि तूं अतित शब्दाहुनी ॥ २ ॥ तुजलागीं आह्मीं घातियेल्या माळा । परि तूं वेगळा कर्तृत्वासीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां होऊनि परमित । माझें कांहीं हित विचारावें ॥ ४ ॥

॥ २८७३ ॥ पापाची मी राशी । सेवाचोर पायांपाशीं ॥ धृ० ॥ करा दंड नारायणा । माझ्या मनाची खंडणा ॥ १ ॥ जना हातीं सेवा । घेतों लंडपणें देवा ॥ २ ॥ तुह्मा ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥ ३ ॥

॥ २८७४ ॥ दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ॥ धृ० ॥ ध्यान लागो ऐसें हरी । तुझे चरणीं तैशापरी ॥ १ ॥ आवंतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥ २ ॥ लोभ्या काळांतराची आस । बोटें मोजी दिवस मास ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । मजला आणिक नको व्यथा ॥ ४ ॥

॥ २८७५ ॥ लागोनियां पायां विनवितों तुह्मांला । करें टाळी बोला मुखें नाम ॥ धृ० ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मणा वेळोवेळां । हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ॥ १ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठीचा ॥ २ ॥ सकळांसी येथें आहे अधिकार । कलियुगीं उद्धार हरिनामें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामापाशीं चारी मुक्ती । ऐसें बहुग्रंथीं बोलियेलें ॥ ४ ॥

॥ २८७६ ॥ लटिकें हासें लटिकें रडें । लटिकें उडें लटिक्यापें ॥ धृ० ॥ लटिकें माझें लटिकें तुझें । लटिकें ओझें लटिक्याचें ॥ १ ॥ लटिकें गायें लटिकें ध्यायें । लटिकें जायें लटिक्यापें ॥ २ ॥ लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जग माया ॥ ३ ॥ लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोले लटिक्यासवें ॥ ४ ॥

॥ २८७७ ॥ जालों ह्मणती त्याचें मज वाटे आश्चर्य । ऐका नव्हे धीर वचन माझें ॥ धृ० ॥ शिजलिया अन्ना ग्वाही दांत हात । जिव्हेसी चाखत नकळे कैसें ॥ १ ॥ तापलिया तेली बावन चंदन । बुंद एक क्षण शीतळ करी ॥ २ ॥ पारखी तो जाणे अंतरींचा भेद । मूढजना छंद लावण्याचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कसीं निवडे आपण । शुद्ध मळहीन जैसें तैसें ॥ ४ ॥

॥ २८७८ ॥ हेचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥ धृ० ॥ ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ १ ॥ वाहिल्या उद्वेग दुःखचि

केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥ २ ॥ ह्मणे तुका घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवा पायीं ॥ ३ ॥

॥ २८७९ ॥ जन्मा येणें घडे पातकाचे मुळें । संचिताचें फळ आपुलिया ॥ धृ० ॥ मग वांयांविण दुःख वाहों नये । रुसोनियां काय देवावरी ॥ १ ॥ ठाउकाचि आहे संसार दुःखाचा । चित्तीं सीण याचा वाहों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम त्याचें आठवावें । तेणें विसरावें जन्मदुःख ॥ ३ ॥

॥ २८८० ॥ आतां माझे नका वाणु गुण दोष । करितों उपदेश याचा कांहीं ॥ धृ० ॥ मानदंभासाठीं छळीतसें कोणा । आण या चरणां विठोबाची ॥ १ ॥ तुका ह्मणे हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥ २ ॥

॥ २८८१ ॥ काय माझें नेती वाईट ह्मणोन । करूं समाधान कशासाठीं ॥ धृ० ॥ काय मज लोक नेती परलोका । जातां कोणा एका निवारिल ॥ १ ॥ न ह्मणे कोणासी उत्तम वाईट । सुखें माझी कुट खावो मागें ॥ २ ॥ सर्व माझा भार असे पांडुरंगा । काय माझें जगासवें काज ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें सर्वही साधन । नामसंकीर्त्तन विठोबाचें ॥ ४ ॥

## स्वामींचें चिंचवडास गमन.

॥ २८८२ ॥ वांजां गाई दुभती । देवा ऐसी तुझी ख्याती ॥ धृ० ॥ ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ॥ १ ॥ चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघधारू ॥ २ ॥ पक्षी राजहंस । अमोलिक मोतीं त्यास ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । कां गा खोंचलासी जीवा ॥ ४ ॥

॥ २८८३ ॥ परतें मी आहें सहजचि दुरी । वेगळें भिकारी नामरूपा ॥ धृ० ॥ न लगे रुसावें धरावा संकोच । सहज ते नीच आलें भागा ॥ १ ॥ पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावें । आर्त तेंचि देवें केलें ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी आह्मां जी वेगळे । केलेती निराळे द्विज देवें ॥ ३ ॥

॥ २८८४ ॥ चिंतामणिदेवा गणपतीसी आणा । करवावें भोजना दुजे पात्रीं ॥ धृ० ॥ देव ह्मणती तुक्या एवढी केची थोरी । अभिमानाभीतरी नागवलों ॥ १ ॥ वाडवेळ जाला सिळें जालें अन्न । तटस्थ ब्राह्मण बैसलेती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरित मोरयासी ॥ ३ ॥

॥ २८८५ ॥ भोक्ता नारायण लक्षुमीचा पती । ह्मणोनि प्राणाहुती घेतलिया ॥ धृ० ॥ भर्ता आणि भोक्ता कर्त्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम ॥ १ ॥ विश्वंभर कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥ २ ॥ कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २८८६ ॥ माझा स्वामी तुह्मी वागवितो लात । तेथें मी पतित काय आलों ॥ धृ० ॥ तीर्थे तुमच्या चरणीं जाहालीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वाणूं ॥ १ ॥ तुका ह्मणे तुह्मी देवा द्विजवंद्य । मी तों काय निंद्य हीन याती ॥ २ ॥

॥ २८८७ ॥ वंदिलें वंदावें जीवाचिये साठीं । किंवा बरी तुटी आरंभींच ॥ धृ० ॥ स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघेंचि मोल धीरा अंगीं ॥ १ ॥ सिंपिलें तें रोप वरीवरी बरें । वाळलिया वरी कोंभ नये ॥ २ ॥ तुका ह्मणे टाकीं वाये देवपण । फुटलिया जन कुला पुसीं ॥ ३ ॥

॥ २८८८ ॥ आह्मां विष्णुदासां हेंचि भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ धृ० ॥ वाणी नाहीं घ्यावें आपुलिया हातें । करोनियां चित्तें समाधान ॥ १ ॥ तुका ह्मणे द्रव्य मेळविलें मागें । हें तों कोणासंगें आलें नाहीं ॥ २ ॥

॥ २८८९ ॥ सुखाचे व्यवहारीं सुखलाभ जाला । आनंदें कोंदला मागें पुढें ॥ धृ० ॥ संगती पंगती देवासवें घडे । नित्यानित्य पडे तेंचि सांचा ॥ १ ॥ समर्थाचे घरीं सकळ संपदा । नाहीं तुटी कदा कासयाची ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें लाभाचिया कोटी । बहु वाव पोटीं समर्थाचे ॥ ३ ॥

॥ २८९० ॥ काय देवें खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ॥ धृ० ॥ ह्मणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें ॥ १ ॥ काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥ २ ॥ कोण लोकीं सांगा घातला बाहेरी । ह्मणतां हरि हरि तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २८९१ ॥ उत्तम त्या याती । देवा शरण अनन्यगती ॥ धृ० ॥ नाहीं तुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥ १ ॥ उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ॥ २ ॥ भाविक विश्वासी । तुका ह्मणे नमन त्यांसी ॥ ३ ॥

॥ २८९२ ॥ ज्यासी नावडे एकादशी । तो जितांचि नरकवासी ॥ धृ० ॥ ज्यासी नावडे हें व्रत । त्यासी नरक तोही भीत ॥ १ ॥ ज्यास मान्य एकादशी । तो जितांचि मुक्तवासी ॥ २ ॥ ज्याशी घडे एकादशी । जाणें लागे विष्णूपाशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुण्यराशी ॥ तोचि करी एकादशी ॥ ४ ॥

॥ २८९३ ॥ मुंगी होउनि साकर खावी । निजवस्तूची भेटी घ्यावी ॥ धृ० ॥ वाळवंटी साकर पडे । गज येउनि काय रडे ॥ १ ॥ जाला हरिदास गोसावी । अवघी मायिक क्रिया दावी ॥ २ ॥ पाठ पाठांतरिक विद्या । जनरंजवणी संध्या ॥ ३ ॥ प्रेम नसतां अंगा आणी । दृढभाव नाहीं मनीं ॥ ४ ॥ ब्रह्मज्ञान वाचे बोले । करणी पाहातां न निवती डोळे ॥ ५ ॥ मिथ्या भगल वाढविती । आपुली आपण पूजा घेती ॥ ६ ॥ तुका ह्मणे धाकुटें व्हावें । निजवस्तूसी मागूनि घ्यावें ॥ ७ ॥

॥ २८९४ ॥ भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥ धृ० ॥ नारायण ऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥ १ ॥ चित्त वित्त हेवा । समर्पून राहा देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे मन । असों द्यावें समाधान ॥ ३ ॥

॥ २८९५ ॥ आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारी संसाराचा ॥ धृ० ॥ नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरिविण ॥ १ ॥ कठिण हें दुःख यम जाचतील । कोण सोडवील तया ठायीं ॥ २ ॥ राहतील दुरी सज्जन सोयरीं ।

आठवीं श्रीहरि लवलाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती करिसी लंडायी । होईल भंडाई पुढें थोर ॥ ४ ॥

॥ २८९६ ॥ होऊं नको कांहीं या मना आधीन । नाइकें वचन याचें कांहीं ॥ धृ० ॥ इंद्रियाची गोष्टी मोडून टाकावी । सोई हीं धरावी विठोबाची ॥ १ ॥ आपुले आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरि जीवा घातक हें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाले जे मना आधीन । तयांसी बंधन यम करी ॥ ३ ॥

॥ २८९७ ॥ नामाविण काय वाउगी चावट । वांयां वटवट हरीविण ॥ धृ० ॥ फुकटचि सांगे लोकांचिया गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥ १ ॥ मेळवूनि चाट करी सुरापान । विषयांच्या गुणें मातलसे ॥ २ ॥ बैसोनि टवाळी करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥ ३ ॥ बळें यम दांत खाय तयावरी । जंव भरे दोरी आयुष्याची ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठविला ॥ ५ ॥

॥ २८९८ ॥ संत गाती हरिकीर्तनीं । त्यांचे घेईन पायवणी ॥ धृ० ॥ हेंचि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणें दुजें ॥ १ ॥ काया कुरवंडी करीन । संत महंत ओंवाळीन ॥ २ ॥ संत महंत माझी पूजा । अनुभाव नाहीं दुजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणें कांहीं । अवघें आहे संतांपायीं ॥ ४ ॥

॥ २८९९ ॥ जालें भांडवल । अवघा पिकला विठ्ठल ॥ धृ० ॥ आतां वाणी काशासाठीं । धीर धरावाच पोटीं ॥ १ ॥ आपुल्या संकोचें । ह्मणऊनि तेथें टांचे ॥ २ ॥ घेतों खऱ्या मापें । तुका देखोनियां सोपें ॥ ३ ॥

॥ २९०० ॥ शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥ धृ० ॥ रवि रसां सकळां शोषी । गुणदोषीं न लिंपे ॥ १ ॥ कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥ २ ॥ सत्य तरी ऐसें आहे । तुका पाहे उपदेशीं ॥ ३ ॥

॥ २९०१ ॥ अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें । हिंवे तोचि तापे जाऊनियां ॥ धृ० ॥ उदक ह्मणे काय या हो मज प्यावें । तृषित तो धांवे सेवावया ॥ १ ॥ काय वस्त्र ह्मणे यावो मज नेसा । आपुले स्वइच्छा जग वोढी ॥ २ ॥ तुक्यास्वामी ह्मणे काय मज स्मरा । आपुल्या उद्धारा लागूनियां ॥ ३ ॥

॥ २९०२ ॥ भक्त देवाघरचा सुना । देव भक्ताचा पोसणा ॥ धृ० ॥ येर येरां जडलें कैसें । जीवा अंग जैसें तैसें ॥ १ ॥ देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ३ ॥

॥ २९०३ ॥ बरवयांबरवंट । विटे चरण सम नीट ॥ धृ० ॥ ते म्या हृदयीं धरिले । तापशमन पाउलें ॥ १ ॥ सकळां तीर्थां अधिष्ठान । करी लक्ष्मी संवाहन ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । ठाव मागितला संतीं ॥ ३ ॥

॥ २९०४ ॥ मांस चर्म हाडें । देवा अवघींच गोडें ॥ धृ० ॥ जे जे हरिरंगीं रंगले । कांहीं न वचे वांयां गेले ॥ १ ॥ वेद खाय शंखासुर । त्याचें वागवी कलिवर ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा । बराडी हा भक्तिरसा ॥ ३ ॥

॥ २९०५ ॥ कोणा चिंता आड । कोणा लोकलाज नाड ॥ धृ० ॥ कैंचा राम अभागिया । करी कटकट वांया ॥ १ ॥ स्मरणाचा राग । क्रोधें विटाळलें अंग ॥ २ ॥ तुका ह्मणे जडा । काय चाले या दगडा ॥ ३ ॥

॥ २९०६ ॥ आपुलिया काजा । आह्मीं सांडियेली लाजा ॥ धृ० ॥ तुह्मां असों जागवीत । आपुलिया हातीं हित ॥ १ ॥ तुह्मी देहशून्य । आह्मां कळे पाप पुण्य ॥ २ ॥ सांगायासी लोकां । उरउरीत उरला तुका ॥ ३ ॥

॥ २९०७ ॥ मायबापें केवळ काशी । तेणें न वजावें तीर्थासी ॥ धृ० ॥ पुंडलीकें काय केलें । परब्रह्म उभें ठेलें ॥ १ ॥ तैसा होईं सावधान । हृदयीं धरीं नारायण ॥ २ ॥ तुका ह्मणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ॥ ३ ॥

॥ २९०८ ॥ सत्य आह्मां मनीं । नव्हों गाबाळाचे धनी ॥ धृ० ॥ ऐसें जाणा रे सकळ । भरा शुद्ध टांका मळ ॥ १ ॥ देतों तीक्ष्ण उत्तरें । पुढें व्हावयासी बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडें ॥ ३ ॥

॥ २९०९ ॥ शिकवूनि हित । सोयी लावावे हे नीत ॥ धृ० ॥ त्याग करूं नये खरें । ऐसें विचारावें बरें ॥ १ ॥ तुमचिया तोंडें । धर्माधर्मचि खंडें ॥ २ ॥ मजसाठीं देवा । कां हो लपविला ठेवा ॥ ३ ॥ जाला सावधान । त्यासी घालावें भोजन ॥ ४ ॥ तुका ह्मणे पिता । वरी बाळाच्या तो हिता ॥ ५ ॥

॥ २९१० ॥ सुख सुखा भेटे । मग तोडिल्या न तुटे ॥ धृ० ॥ रविरश्मिकळा । नये घालितां पैं डोळां ॥ १ ॥ दुरि तें जवळी । स्नेहें आकाशा कवळी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । माझें पायीं अखंडित ॥ ३ ॥

॥ २९११ ॥ तुह्मां न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥ धृ० ॥ फुकासाठीं जोडे यश । येथें कां करा आळस ॥ १ ॥ कृपेचें भुकेलें । होय जीवदान केलें ॥ २ ॥ तुका ह्मणे शिकविलें । माझें ऐकावें विठ्ठले ॥ ३ ॥

॥ २९१२ ॥ लोक ह्मणती मज देव । हा तों अधर्म उपाव ॥ धृ० ॥ आतां कळेल तें करीं । सीस तुझे हातीं सुरी ॥ १ ॥ अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांहीं ॥ २ ॥ मन जाणे पापा । तुका ह्मणे मायबापा ॥ ३ ॥

॥ २९१३ ॥ एका ह्मणे भलें । आणिका सहजचि निंदिलें ॥ धृ० ॥ कांहीं न करितां आयास । सहज घडले ते दोष ॥ १ ॥ बरें वाइटाचें । नाहीं मज कांहीं साचें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । खंडोनि राहावें चिंतनीं ॥ ३ ॥

॥ २९१४ ॥ आणिलें सेवटा । आतां कामा नये फांटा ॥ धृ० ॥ मज आपुलेंसें ह्मणा उपरि या नारायणा ॥ १ ॥ वेचियेली वाणी । युक्ति अवघी चरणीं ॥ २ ॥ तुका धरी पाय । क्षमा करवूनि अन्याय ॥ ३ ॥

॥ २९१५ ॥ न करा टांचणी । येथें कांहीं आडचणी ॥ धृ० ॥ जिव्हा अमुप करी माप । विठ्ठल पिकला माझा बाप ॥ १ ॥ तुका ह्मणे सर्वकाळ । अवघा गोविंद गोपाळ ॥ २ ॥

॥ २९१६ ॥ तुझ्या नामाची आवडी । आह्मी विठो तुझीं वेडीं ॥ धृ० ॥ आतां न

बजों आणिकां ठायां । गाऊं गीत लागों पायां ॥ १ ॥ काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखापुढें ॥ २ ॥ संतसमागममेळ । प्रेमसुखाचा सुकाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझ्या पायीं । जन्ममरणा ठाव नाहीं ॥ ४ ॥

॥ २९१७ ॥ साकरेच्या योगें वर्ख । राजा कागदातें देखे ॥ धृ० ॥ तैसें आह्मां मनुष्यपण । रामनाम केण्यागुणें ॥ १ ॥ फिरंगीच्या योगें करी । राजा काष्ठ हाता धरी ॥ २ ॥ रत्नकनका योगें लाख । कंठीं धरिती श्रीमंत लोक ॥ ३ ॥ देवा देवघाट । देव्हाऱ्यावरी बैसे स्पष्ट ॥ ४ ॥ ब्रह्मानंदयोगें तुका । पढीयंता सज्जनलोकां ॥ ५ ॥

॥ २९१८ ॥ धनवंतालागीं । सर्वमान्यता आहे जगीं ॥ धृ० ॥ माता पिता बंधु जन । सर्व मानिती वचन ॥ १ ॥ जंव मोठा चाले धंदा । तंव बहिण ह्मणे दादा ॥ २ ॥ सदा शृंगारभूषणें । कांता लवे बहुमानें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥ ४ ॥

॥ २९१९ ॥ न विचारितां ठायाठाव । काय भुंके तो गाढव ॥ धृ० ॥ केला तैसा लाहे दंड । खळ अविचारी लंड ॥ १ ॥ करावें लाताळें । ऐसें नेणे कोण्या काळें ॥ २ ॥ न कळे उचित । तुका ह्मणे नीत हित ॥ ३ ॥

॥ २९२० ॥ कंठीं नामसिका । आतां कळिकाळासी धका ॥ धृ० ॥ रोखा माना कीं सिका माना । रोखा सिका तत्समाना ॥ १ ॥ रोखा न मना सिका न मना । जतन करा नाककाना ॥ २ ॥ सिका न मनी रावण । त्याचें केलें निसंतान ॥ ३ ॥ सिका मानी हळाहळ । जालें सर्वांगीं शीतळ ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाम सिका । पटीं बैसलों निजसुखा ॥ ५ ॥

॥ २९२१ ॥ भूतीं देव ह्मणोनि भेटतों या जना । नाहीं हे भावना नरनारी ॥ धृ० ॥ जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ॥ १ ॥ दयेसाठीं केला उपाधिपसारा । जड जीवा तारा नाव कथा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं पडत उपवास । फिरतसे आस धरोनियां ॥ ३ ॥

॥ २९२२ ॥ हारपल्याची नका चित्तीं । धरूं खंती वांयांच ॥ धृ० ॥ पावलें तें ह्मणा देवा । सहज सेवा या नांवें ॥ १ ॥ होणार तें तें भोगें घडे । लाभ जोडे संकल्पें ॥ २ ॥ तुका ह्मणे मोकळें मन । अवघें पुण्य या नांवें ॥ ३ ॥

॥ २९२३ ॥ नेसणें आलें होतें गळ्या । लोक रळ्या करिती ॥ धृ० ॥ आपणियां सावरिलें । जग भलें आपण ॥ १ ॥ संबंध तो तुटला येणें । जागेपणें चेष्टांचा ॥ २ ॥ भलती सेवा होती अंगें । बारस वेगें पडिलें ॥ ३ ॥ सावरिलें नीट वोजा । दृष्टिलाजा पुढिलांच्या ॥ ४ ॥ बरे उघडिले डोळे । हळहळेपासूनी ॥ ५ ॥ तुका ह्मणे विटंबना । नारायणा चुकली ॥ ६ ॥

॥ २९२४ ॥ जिव्हा जाणे फिके मधुर कीं क्षार । येर मास पर हाता न कळे ॥ धृ० ॥ देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुखदुःखें कळों येती ॥ १ ॥ परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । एकाचें कारण एका नव्हे ॥ २ ॥ एकदेहीं भिन्न ठेवियेल्या कळा । नाचवी पुतळा सूत्रधारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसी जयाची सत्ता । कां तया अनंता विसरलेती ॥ ४ ॥

॥ २९२५ ॥ न लगे द्यावा जीव सहजचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं

मरण जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥ तुका
होईल स्वहित । निधान जो थीत सकूं पाहे ॥ ३ ॥

२६ ॥ मोल वेचूनियां धुंडिती सेवका । आह्मी तरी फुका मागों बळें ॥ धृ० ॥
ावळी हित फार करूं । जीव भाव धरूं तुझ्या पायीं ॥ १ ॥ नेदूं भोग आह्मी
शरीरा । तुह्मांसी सतारा व्हावें ह्मूण ॥ २ ॥ कीर्ति तुझी करूं आपुले सायास ।
दास पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज काय मागों आह्मी । फुकाचा कां नाम भी
ा ॥ ४ ॥

२७ ॥ काय लवणकणिकेविण । एके क्षीण सागर ॥ धृ० ॥ मां हे येवढी अड-
रायणी मजविण ॥ १ ॥ कुबेर अटाहासे जोडी । काय कवडी कारणें ॥ २ ॥
े काचमणी । कोण गणी भांडारी ॥ ३ ॥

२८ ॥ तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥ धृ० ॥ तूं माझा आकार ।
च निर्धार ॥ १ ॥ मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगें सेवा ॥ २ ॥ मी तुज-
चळ । मजमाजी तूं सबळ ॥ ३ ॥ तूं बोलसी माझ्या मुखें । मी तों तुजमाजी
॥ तुका ह्मणे देवा । विपरीत ठायीं नांवा ॥ ५ ॥

२९ ॥ वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाग ॥ धृ० ॥ संतकृपेचे हे दीप ।
का निष्पाप ॥ १ ॥ तोचि देवभक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ॥ २ ॥ तुका प्रेमें
ये । पाणियांत विरोन जाये ॥ ३ ॥

३० ॥ जप तप ध्यान न लगे धारणा । विठ्ठलकीर्त्तनामाजी सर्व ॥ धृ० ॥ राहें
ना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥ १ ॥ कीर्तनसमाधि साधन ते
हतील थारा धरोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । वोळगती
द्धिसिद्धी ॥ ३ ॥

३१ ॥ नाहीं तुज कांहीं मागत संपत्ती । आठवण चित्तीं असों द्यावी ॥ धृ० ॥
भोग येईन सेवटीं । पायांपें या भेटी अनुसंधानें ॥ १ ॥ आतां मजसाठीं याल
स । रोकडी हे आस नाहीं देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे मुखीं असो तुझें नाम । देईल
देवो काळ ॥ ३ ॥

३२ ॥ हितावरी यावें । कोणी बोलिलों या भावें ॥ धृ० ॥ नव्हे विनोद उत्तर ।
वाया चार ॥ १ ॥ केली अटाअटी ॥ अक्षरांची देवासाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे
। नका जागा येथें निजों ॥ ३ ॥

३३ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघा जाला नारायण ॥ धृ० ॥ नाहीं
ी संबंधू । जरा मरण कांहीं बाधू ॥ १ ॥ द्वैताद्वैतभावें । अवघें व्यापियेलें देवें
तुका ह्मणे हरी । आह्मांमाजी क्रीडा करी ॥ ३ ॥

३३४ ॥ नेणें करूं सेवा । पांडुरंगा कृपाळुवा ॥ धृ० ॥ धांवें बुडतों मी काढीं ।
ापुलिया ओढीं ॥ १ ॥ क्रियाकर्महीन । जालों इंद्रियां अधीन ॥ २ ॥ तुका
करी । वेळोवेळां पाय धरी ॥ ३ ॥

॥ २९३५ ॥ जयापासोनि सकळ । महीमंडळ जालें ॥ धृ० ॥ तो एक पंढरीचा राणा । नयें श्रुति अनुमाना ॥ १ ॥ विवादती जयासाठीं । जगजेठी तो विठ्ठल ॥ २ ॥ तुका ह्मणे तो अकळ । आहे सकळ व्यापक ॥ ३ ॥

॥ २९३६ ॥ नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥ धृ० ॥ जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥ १ ॥ नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसें ॥ २ ॥ नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥ ४ ॥

॥ २९३७ ॥ आहे सकळां वेगळा । खेळे कळा चोरोनी ॥ धृ० ॥ खांबसूत्राचिये परी । देव दोरी हालवितो ॥ १ ॥ आपण राहोनि निराळा । कैसी कळा नाचवी ॥ २ ॥ जेव्हां असुडितो दोरी । भूमीवरी पडे तेव्हां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तो जाणावा । सखा करावा आपुला ॥ ४ ॥

॥ २९३८ ॥ आतां पुढें मना । चाली जाली नारायणा ॥ धृ० ॥ येथें राहिलें राहिलें । कैसें गुंतोनि उगलें ॥ १ ॥ भोवतें भोवनी । आलियांची जाली धणी ॥ २ ॥ तुका ह्मणे रंग रंगें । रंगलें पांडुरंगें ॥ ३ ॥

॥ २९३९ ॥ आळस पाडी विषयकामीं । शक्ती देईं तुझ्या नामीं ॥ धृ० ॥ हेंचि विनवणी विनवणी । विनविली धरा मनीं ॥ १ ॥ आणिक वचना मुकी वाणी । तुमच्या गर्जो द्यावी गुणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पाय डोळां । पाहें एरवी अंधळा ॥ ३ ॥

॥ २९४० ॥ कोण वेची वाणी । आतां क्षुल्लका कारणीं ॥ धृ० ॥ आतां हेंचि काम करूं । विठ्ठल हृदयांत धरूं ॥ १ ॥ नेदावया वृत्ती । आतां उठोंचि बहुती ॥ २ ॥ उपदेश लोकां । करुनी वेडा होतो तुका ॥ ३ ॥

॥ २९४१ ॥ मागणें तें एक तुज । देईं विचारोनि मज ॥ धृ० ॥ नको दुर्जनांचा संग । क्षणक्षणा चित्तभंग ॥ १ ॥ जन्म घेईन मी नाना । बहु सोसीन यातना ॥ २ ॥ रंक होईन दीनांचा । घायें देहपात साचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि आतां । देईं देईं तूं सर्वथा ॥ ४ ॥

॥ २९४२ ॥ जाणसी उचित । पांडुरंगा धर्मनीत ॥ धृ० ॥ तरि म्यां बोलावें तें काई । सरे ऐसें तुझे पायीं ॥ १ ॥ पालटती क्षणें । संचितप्रारब्धक्रियमाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । होसी सकळ करिता ॥ ३ ॥

॥ २९४३ ॥ तुह्मी कांटाळलां तरी । आह्मां न सोडणें हरी ॥ धृ० ॥ जावें कवणिया ठाया । सांगा विनवितों पायां ॥ १ ॥ केली जिवा साठी । आतां सुखें लागा पाठी ॥ २ ॥ तुका ह्मणे ठाव । न सोडणें हाचि भाव ॥ ३ ॥

॥ २९४४ ॥ येउनि संसारीं । मी तों एक जाणें हरी ॥ धृ० ॥ नेणें आणिक कांहीं धंदा । नित्य ध्यातसें गोविंदा ॥ १ ॥ कामक्रोधलोभस्वार्थ ॥ अवघा माझा पंढरिनाथ ॥ २ ॥ तुका ह्मणे एक । धणी विठ्ठल मी सेवक ॥ ३ ॥

॥ २९४५ ॥ सर्वपक्षीं हरि साहे सखा जाला । भोल्या अंगणीच्या कल्पलता त्याला

॥ धृ० ॥ सहजचाली चालतां पायवाटे । चिंतामणीसमान होती गोटे ॥ १ ॥ तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरीं वेदांत वाहे पाणी ॥ २ ॥

॥ २९४६ ॥ काय पुण्य ऐसें आहे मजपाशीं । तांतडी धांवसी पांडुरंगा ॥ धृ० ॥ काय ऐसा भक्त वांयां गेलों थोर । तूं मज समोर होसी वेगीं ॥ १ ॥ काय कष्ट माझे देखिली चाकरी । तो तूं झडकरी पाचारिसी ॥ २ ॥ कोण मी नांवाचा थोर गेलों मोठा। अपराधी करंटा नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं ठाउकें संचित । येणें जन्महित नाहीं केलें ॥ ४ ॥

॥ २९४७ ॥ आमुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी ॥ धृ० ॥ समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनियां ॥ १ ॥ चळण वळण सेवकाच्या बळें । निर्गुणाच्यामुळें सांभाळावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आलों खंडावरी । प्रेम देउनि हरी बुझवावें ॥ ३ ॥

॥ २९४८ ॥ आह्मी मेलों तेव्हां देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ॥ धृ० ॥ सूत्रधारी जैसा हालवितो कळा । तैसा तो पुतळा नाचे छंदें ॥ १ ॥ बोलतसें जैसें बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ॥ २ ॥ पाप पुण्य ज्याचें तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आह्मांसवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी आइका हो मात । आह्मी या अतीत देहाहूनी ॥ ४ ॥

॥ २९४९ ॥ लागों नेदीं बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आण ॥ धृ० ॥ परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानीं ॥ १ ॥ तुका ह्मणे याची लाज असे कोणा । सहाकारी दीना ज्याची तया ॥ २ ॥

॥ २९५० ॥ हेचि भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीपें ॥ धृ० ॥ सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या ताहान भूक जाय ॥ १ ॥ दुरील जवळी आपणचि होतें । कवळिलें चित्तें जिवापासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम घेतों वेळोवेळां । होतील सकळा शीतळा नाडी ॥ ३ ॥

॥ २९५१ ॥ आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा भगवंत वाचा त्याची ॥ धृ० ॥ साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥ १ ॥ काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याची कोण जाणे कळा । चालवी पांगळा पायांविण ॥ ३ ॥

॥ २९५२ ॥ हित सांगे तेणें दिलें जीवदान । घातकी तो जाण मनामागें ॥ धृ० ॥ बळें हे वारावे अधर्म करितां । अंधळें चालतां आडरानें ॥ १ ॥ द्रव्य देऊनियां धाडावें तीर्थासी । नेदावें चोरासी चंद्रबळ ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें आहे हें पुराणीं । नाहीं माझी वाणी पदरींची ॥ ३ ॥

॥ २९५३ ॥ ऐसा घेईंकां रे संन्यास । करीं संकल्पाचा न्यास ॥ धृ० ॥ मग तूं राहें भलते ठायीं । जनीं वनीं खाटे भोई ॥ १ ॥ तोडीं जाणिवेची कळा । होईं वृत्तीसी वेगळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नभा । होईं आमुचाही भागा ॥ ३ ॥

॥ २९५४ ॥ सोळा सहस्र होऊं येतें । भरलें रितें आह्मांपें ॥ धृ० ॥ ऐसे तुह्मां ठाया-ठाव । देव म्हूण संपादे ॥ १ ॥ कैची चिरामध्यें चिरे । मना बरें आलें ते ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । भंगलगा भिन्न परा ॥ ३ ॥

॥ २९५५ ॥ इहलोकीं आह्मां भूषण अवकळा । भोपळा वाकळा आणि भिक्षा ॥ धृ० ॥ निमोली संपदा भयविरहित । सर्वकाळ चित्त समाधान ॥ १ ॥ छिद्राचा आश्रम उंदीर कुळवाडी । धन नाम जोडी देवाचें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे एक सेवटीं राहणें । वर्ततों या जना विरहित ॥ ३ ॥

॥ २९५६ ॥ आह्मी भाग्याचे भाग्याचे । आह्मां तांबे भोपळयाचे ॥ धृ० ॥ लोकां घरीं गाई ह्मैसी । आह्मां घरीं उंदिर घुसी ॥ १ ॥ लोकां घरीं हत्ती घोडे । आह्मां आधोडीचे जोडे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी सुडके । आह्मां देखोंन काळ धाके ॥ ३ ॥

॥ २९५७ ॥ गाऊं नेणें कळा कुसरी । कान धरोनि ह्मणे हरी ॥ धृ० ॥ माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥ १ ॥ मज हंसतील लोक । परि मी गाईन निःशंक ॥ २ ॥ तुझे नामीं मी निर्लज्ज । काय जनासवें काज ॥ ३ ॥ तुका ह्मण माझी विनंती । तुह्मी परिसा कमळापती ॥ ४ ॥

॥ २९५८ ॥ विष पोटीं सर्पा । जन भीतें तया दर्पा ॥ धृ० ॥ पंच भूतें नाहीं भिन्न । गुण दुःख देती शीण ॥ १ ॥ चंदन प्रिय वासें । आवडे तें जाती ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे सुणा कुचर । मिळो नये अन्ना ॥ ३ ॥

॥ २९५९ ॥ देव अवघें प्रतिपादी । वंदी सकळां एका निंदी ॥ धृ० ॥ तेथें अवघें गेलें वांयां । विष घास एके ठायां ॥ १ ॥ सर्वांग कुरवाळी । उपटी एक रोमावळी ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । नाहीं जयाचें अंकित ॥ ३ ॥

॥ २९६० ॥ मज माझा उपदेश । आणिकां नये याचा रीस ॥ धृ० ॥ तुह्मी अवघे पांडुरंग । मीच दुष्ट सकळ चांग ॥ १ ॥ तुमचा मी शरणागत । कांहीं करा माझें हित ॥ २ ॥ तुका पाय धरी । मी हें माझें दूर करीं ॥ ३ ॥

॥ २९६१ ॥ जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ॥ धृ० ॥ मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य । अनुभवाविण कळूं नये ॥ १ ॥ तुका ह्मणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ॥ २ ॥

॥ २९६२ ॥ अभिमानी पांडुरंग । गोवा काशाचा हो मग ॥ धृ० ॥ अनुसरा लवलाहीं । नका विचार करूं कांहीं ॥ १ ॥ कोठें राहातील पाप । जालिया हो अनुताप ॥ २ ॥ तुका ह्मणे येचि घडी । उभ्या पाववील थडी ॥ ३ ॥

॥ २९६३ ॥ तुझें वर्म हातीं । दिलें सांगोनियां संतीं ॥ धृ० ॥ मुखीं नाम धरी न कंठीं । अवघा सांठवीन पोटीं ॥ १ ॥ नवविधा वेढीन आधीं । सांपडलासी भावसंधी ॥ २ ॥ तुका ह्मणे बळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ ३ ॥

॥ २९६४ ॥ माझ्या मना लागो चाळा । पहावया विठ्ठल डोळां ॥ धृ० ॥ आणीक

नाहीं चाड । न लगे संसार हा गोड ॥ १ ॥ तरिच फळ जन्मा आलों । सरता पांडुरंगीं जालों ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । देईं चरणांची सेवा ॥ ३ ॥

॥ २९६५ ॥ अवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ॥ धृ० ॥ गात जागा गात जागा । प्रेमा मागा विठ्ठला ॥ १ ॥ अवघीं सुखाचींच राशी । पुंडलिकाशीं वोळली हे ॥ २ ॥ तुका ह्मणे जवळी आलें । उभें ठेलें समचरणीं ॥ ३ ॥

॥ २९६६ ॥ देह तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ॥ धृ० ॥ आतां माझ्या जीवा । करणें तें करीं देवा ॥ १ ॥ बहु अपराधी । मतिमंद हीनबुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणें । भावभक्तीचीं लक्षणें ॥ ३ ॥

॥ २९६७ ॥ जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें । अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥ धृ० ॥ आल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनि पळती रांडपोरें ॥ १ ॥ बाइल ह्मणे खरें मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनिया ॥ २ ॥ तुका ह्मणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ॥ ३ ॥

॥ २९६८ ॥ जाणोनि नेणते करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ धृ० ॥ मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळाआंत पद्मपत्र ॥ १ ॥ ऐकोनि नाइकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनी योगिराज ॥ २ ॥ देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टि चेविल्या जेवीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें जालियावांचून । करणें तें तें सीण वाट-तसे ॥ ४ ॥

॥ २९६९ ॥ विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥ धृ० ॥ कईं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ १ ॥ जाल्या येरझारा । जन्मां बहुतांचा फेरा ॥ २ ॥ तुका ह्मणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥ ३ ॥

॥ २९७० ॥ ज्यासी विषयाचें ध्यान । त्यासी कैंचा नारायण ॥ धृ० ॥ साधु कैंचा पापीयासी । काय चांडाळासी काशी ॥ १ ॥ काय पतितासी पिता । काय अधमासी गीता ॥ २ ॥ तुका ह्मणे निरंजनी । शठ कैंचा ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥

॥ २९७१ ॥ वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥ धृ० ॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥ १ ॥ आशा धरोनि मनीं । कांहीं देईल ह्मणऊनी ॥ २ ॥ पोटा एका साठीं । तुका ह्मणे जाले कष्टी ॥ ३ ॥

॥ २९७२ ॥ प्रपंच वोसरो । चित्त तुझे पायीं मुरो ॥ धृ० ॥ ऐसें करिं गा पांडुरंगा । शुद्ध रंगवावें रंगा ॥ १ ॥ पुरे पुरे आतां । नको दुजियाची सत्ता ॥ २ ॥ लटिकें ते फेडा । तुका ह्मणे जाय पीडा ॥ ३ ॥

॥ २९७३ ॥ ऐका कलीचें हें फळ । पुढें होइल ब्रह्मगोळ ॥ धृ० ॥ चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती एके पंक्ती ॥ १ ॥ पूजिती असुरा रांडा । मद्य प्राशितील पेंढा ॥ २ ॥ वामकवळ मार्जन । जन जाईल अधःपतन ॥ ३ ॥ तुका हरिभक्ति करी । शक्ती पाणी वाहे घरीं ॥ ४ ॥

॥ २९७४ ॥ गुरुमार्गामुळें भ्रष्ट सर्वकाळ । ह्मणती याती कुळ नाहीं ब्रह्मीं ॥ धृ० ॥

त्या शोकें मेदिनी फुटों पाहे ॥ २ ॥ काय हें सामर्थ्य नव्हतें तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूतां ॥ ३ ॥ तुज ठावें आह्मां कोणी नाहीं सखा । उभय लोकीं तुका तुजविण ॥ ४ ॥ कान्हा ह्मणे तुझ्या वियोगें पोरटीं । जालों दे रे भेटी बंधुराया ॥ ५ ॥

॥ २९९० ॥ सख्यत्वासी गेलों करीत सलगी । नेणोंचि अभागी महिमा तुझा ॥ धृ० ॥ पावलों आपुलें केलेंलाहेंरास । निर्दैवां परिस काय होय ॥ १ ॥ कष्टविलासी म्यां चांडाळें संसारीं । अद्यापिवरि तरि उपदेशीं ॥ २ ॥ उचित अनुचित सांभाळिलें नाहीं । कान्हा ह्मणे कांहीं बोलों आतां ॥ ३ ॥

॥ २९९१ ॥ असो आतां कांहीं करोनियां ग्लानी । कोणा काकुलती येइल येथें ॥ धृ० ॥ करूं कांहीं दिस राहे तों सायास । झोंबों त्या लागास भावाचिये ॥ १ ॥ करितां रोदना बापुडें ह्मणती । परि नये अंतीं कामा कोणी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे पडिलिया वनीं । विचार तो मनीं बोलिला हे ॥ ३ ॥

॥ २९९२ ॥ चरफडें चरफड शोकें शोक होये । कार्यमूळ आहे धीरापाशीं ॥ धृ० ॥ कल्पतसे मज ऐसें हें पाहातां । करावी ते चिंता मिथ्या खोटी ॥ १ ॥ न चुके होणार सांडिल्या शूरत्वा । फुकटचि सत्त्वा होइल हानी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे दिल्या बंद मना । वांचूनि निधाना न पवीजे ॥ ३ ॥

॥ २९९३ ॥ न लगे चिंता आतां अनुमोदन हाता । आलें मूळ भ्राता गेला त्याचें ॥ धृ० ॥ घरभेद्या येथें आहे तें सुकानू । धरितों कवळून पाय दोन्ही ॥ १ ॥ त्याचें त्याचिया मुखें पडिलें ठावें । न लगे सारावें मागें पुढें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे करील भेटी भावा । सोडीन तेधवां या विठ्ठला ॥ ३ ॥

॥ २९९४ ॥ मूळस्थळ ज्याचें गोमतीचे तीरीं । तो हा सारी दोरी खेळवितो ॥ धृ० ॥ ऐसें हें कळलें असावें सकळां । चोर त्या वेगळा नाहीं दुजा ॥ १ ॥ वैष्णव हे हेर तयाचे पाळती । खूण हे निरुती सांगितली ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे आलें अनुभवास । तेणेंच आह्मांस नागविलें ॥ ३ ॥

॥ २९९५ ॥ बरा रे निर्गुणा नष्ट नारायणा । घरबुडवणा भेटलासी ॥ धृ० ॥ एके घरीं कोणी कोणासी न धरी । ऐसी अपरंपरी केली आह्मां ॥ १ ॥ कान्हा ह्मणे कां रे निष्काम देखिलें । ह्मणोनि मना आलें करितोसी ॥ २ ॥

॥ २९९६ ॥ धर्दिधर्दि तुझ्या करीन धर्दिड्या । ऐसें काय वेड्या जाणितलें ॥ धृ० ॥ केली तरी बरें मज भेटी भावास । नाहीं तरि नास आरंभिला ॥ १ ॥ मरावें मारावें या आलें प्रसंगा । बरें पांडुरंगा कळलें सावें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे तुझी माझी उरी । उडाली न धरीं भीड कांहीं ॥ ३ ॥

॥ २९९७ ॥ भुक्ति मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणोनी भावा वेगीं ॥ धृ० ॥ रिद्धिसिद्धि मोक्ष ठेवीं गुंडाळून । दे माझ्या आणुन भावा वेगीं ॥ १ ॥ नको आपुलिया नेऊं वैकुंठासी । दे माझ्या आणुन भावा वेगीं ॥ २ ॥ नको होऊं कांहीं

होसील प्रसन्न । दे माझ्या आणुन भावा वेगीं ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे पाहा हो नाहीं-तरी । हत्या होईल शिरीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २९९८ ॥ मुख्य आहे आह्मां मातेचा पटंगा । तुज पांडुरंगा कोण लेखी ॥ धृ० ॥ नको लावूं आह्मां सवें तूं तोंवरी । पाहा दूरवरी विचारुनी ॥ १ ॥ साहे संतजन केले महाराज । न घडे आतां तुज भेईन मी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे अइक्यें ऐक्यता । वाढतें अनंता दुःखें दुःख ॥ ३ ॥

॥ २९९९ ॥ नय सोमसरी उपचाराची हरी । करकरेचें करीं काळें तोंड ॥ धृ० ॥ मागतों इतुकें जोडूनियां कर । ठेऊनियां शीर पायांवरी ॥ १ ॥ तुह्मां आह्मां एके ठायीं सहवास । येथें द्वैत द्वेष काय बरा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे बहुतां बहुतां रीती । अनंता विनंति परिसावी हे ॥ ३ ॥

॥ ३००० ॥ लालुचाईसाठीं बळकाविसी भावा । परि मी जाण देवा जिरों नेदीं ॥ धृ० ॥ असों द्या निश्चय हा मनीं मानसीं । घातली येविशीं दृढ कास ॥ १ ॥ मज आहे बळ आळीचें सबळ । फोडीन अंत्राळ हृदय तुझें ॥ २ ॥ करुणारसें तुकयाबंधु ह्मणे भुलवीन । काढूनि घेईन निज वस्तु ॥ ३ ॥

॥ ३००१ ॥ तुझीं वर्मं आह्मां ठावीं नारायणा । परि तूं शहाणा होत नाहीं ॥ धृ० ॥ मग कालाबुलीं हाका देते वेळे । होतोसि परि डोळे झुघडिसी ॥ १ ॥ जाणोनि अज्ञान करावें मोहरें । खोटी खोडी हे रे तुझी देवा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे कारण प्रचिती । पाहातों वेळ किती तेच गुण ॥ ३ ॥

॥ ३००२ ॥ अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा ॥ धृ० ॥ ह्मणतां लाज नाहीं सकळांची माउली । जवळी धरिलीं एकें दुरी ॥ १ ॥ एकां सुख द्यावें घेऊनि वोसंगा । एक दारीं गळा श्रमविती ॥ २ ॥ एकां नवनीत पाजावें दादून । एकें अन्न अन्न करितील ॥ ३ ॥ एके वाटतील न वजावीं दुरी । एकांचा मत्सर जवळी येतां ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे नावडतीं त्यांस । कासया व्यालास नारायणा ॥ ५ ॥

॥ ३००३ ॥ निनांव हें तुला । नांव साजे रे विठ्ठला । बरा शिरविला । फाटक्यामध्यें पाव ॥ धृ० ॥ कांहीं तरी विचारिलें । पाप पुण्य ऐसें केलें । भुरळें घातलें । एकाएकीं भावासी ॥ १ ॥ मुद्राधारण माळा टिळे । बोल रसाळ कोंवळे । हातीं फांशांचे गुंडाळे । कोण चाळे गृहस्था हे ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे मिस्किन । करितोसी देखोन । पाहा दुरि-वरी विच्छिन्न । केला परी संसार ॥ ३ ॥

॥ ३००४ ॥ नाहीं घटिका ह्मणसी । लाग लागला तुजपाशीं । पडिला हृषीकेशी । जाब सकळ करणें ॥ धृ० ॥ माझें नेलें पांघरुण । ठावें असोन दुर्बळ दीन । माणसां मधून । उठविलें खाणोऱ्या ॥ १ ॥ आह्मीं हें जगऊनि होतों पाणी । संदीं देवदेव करुनी । जालासी कोठोनि । पेंदा चोरा देहाच्या ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे केलें । उघडें मजचि उमगिलें । ऐसें काय गेलें । होतें तुज न पुरतें ॥ ३ ॥

॥ ३००५ ॥ कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । ह्मणवितोसी परि केवळ ।

गळेकाटू दिसतोसी ॥ धृ० ॥ काय केलें होतें आह्मीं । सांग तुझें एकये जन्मीं । जालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया ॥ १ ॥ भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा । करूनि बंधु वेडा । जोडा माझा विखंडिला ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे भला । कैसें ह्मणताती तुजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहींतरी ॥ ३ ॥

॥ ३००६ ॥ आतां कळों आले गुण । अवघेचि यावरोन । चोखट लक्षण । धरिलें हें घरघेणें ॥ धृ० ॥ या नांवें कृपासिंधू । ह्मणवितोसी दीनबंधू । मज तरी मैंदू । दिसतोसी पाहातां ॥ १ ॥ अमळ दया नाहीं पोटीं । कठीण तैसाचि कपटी । अंधळ्याची काठी । माझी गुदरसीच ना ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे पुरता नाहीं म्हूण बरें अनंता । एरवी असतां । तुझां पोट भरियेला ॥ ३ ॥

॥ ३००७ ॥ काय सांगों हृषीकेशा । आहे अनुताप आला । ऐसा गिळावासी निमिषा । निमिष लागों नेदावें ॥ धृ० ॥ माझें बुडविलें घर । लेंकरें बाळें दारोदार । लाविलीं काहार । तारातीर करोनी ॥ १ ॥ जीव घ्यावा किंवा द्यावा । तुझा आपुला केशवा । इतुकें उरलें आहे । भावाचिया निमित्यें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे जग । बरें वाईट ह्मणो मग । या कारणें परि लाग । न संडावा सर्वथा ॥ ३ ॥

॥ ३००८ ॥ मायबाप निमाल्यावरी । घातलें भावाचे आभारीं । तो ही परि हरी । तुज जाला असमाई ॥ धृ० ॥ हे कां भक्तीचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर । प्रसन्नता व्यवहार । सेवटीं हे जालासी ॥ १ ॥ एका जिवावरी । होतों दोंनी कुटुंबारी । चाळवूं तो तरीं । तुज येतो निर्लज्जा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे भला । आणिक काय ह्मणावें तुला । वेडा त्यानें केला । तुजसवें संबंधू ॥ ३ ॥

॥ ३००९ ॥ पूर्वीं पूर्वजांची गती । हेचि आईकिली होती । सेवे लावूनि श्रीपती । निश्चिंती केली तयांची ॥ धृ० ॥ कां रे पाठी लागलासी । ऐसा सांग हृषीकेशी ॥ अद्या-पवरी न राहासी । अंत पाहासी किती ह्मूण ॥ १ ॥ जन्मजन्मांतरीं दावा । आह्मां आपणां केशवा । निमित्य चालवा । काईसयास्तव हें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे अदेखणा । किती होसी नारायणा । देखों सकवेना । खातयासी न खात्या ॥ ३ ॥

॥ ३०१० ॥ निष्ठुर संसार करून । होतों पोट भरून । केली विवसी निर्माण । देव-पण दाखविलें ॥ धृ० ॥ ऐसा काढियेला निस । काय म्हूण सहित वंश । आणिलें शेवटास । हाउस तरी न पुरे ॥ १ ॥ उरलों पालव्या सेवटीं । तेंही न देखवे दृष्टी । दोघांमध्यें तुटी । रोकडीचि पाडिली ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे गोड । बहु जालें अनिवाड । ह्मणोनि कां बुड । मुळ्यांसहित खावें ॥ ३ ॥

॥ ३०११ ॥ बरा जाणतोसी धर्मनीती । उचित अनुचित श्रीपती । करूं येते राती । ऐसी डोळे झांकुनी ॥ धृ० ॥ आतां जाब काय कैसा । देसी तो दे जगदीशा । आणिला वोळसा । आपणां भोंवता ॥ १ ॥ सेवेचिया सुखास्तव । बळें धरिलें अज्ञानत्व । येइल परि हा भाव । ज्याचा त्यासी कारणा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे नाहीं । आतां आह्मां बोल कांहीं । जडोनियां पायीं । तुझें त्वांचि घेतलें ॥ ३ ॥

॥ ३०१२ ॥ कांहीं विपत्ति अपत्यां । आतां अमूचिया होतां । काय होईल अनंता । पाहा बोलों कासया ॥ धृ० ॥ बरें अनायासें जालें । सायासेंविण बोले चाले । काबाड चुकलें । केलें कष्टावेगळें ॥ १ ॥ बरा सांपडलासी वोजा । वर्मावरी केशीराजा । बोलाथासी तुझा । उजुरचि नाहींसा ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे दगा । बरा दिला होता बागा । झडकरी चलागा । चांग दैवें पावलों ॥ ३ ॥

॥ ३०१३ ॥ देवा तुजपें माझ्या पूर्वजांचें ऋण । आहे तें कां नेदिसी अझून । अवगलासी झोंडपणें । परि मी जाण जीवें जिरों नेदीं ॥ धृ० ॥ कळों येईल रोकडें । उभा करीन संतांपुढें । तुझें काय एवढें । भय आपुलें मागतां ॥ १ ॥ आजिवरी होतों नेणता । तों तुज फावलें रे अनंता । कवडीचा तो आतां । पडों नेदीन फेर ॥ २ ॥ ठेविला ये जीवनीं जीव । ह्मणे तुकयाचा बंधव । माझा गळा तुझा पाव । एके ठायीं बांधेन ॥ ३ ॥

॥ ३०१४ ॥ मागें असताशी कळला । उमस घेऊं नसता दिला । तेणेंचि काळें केला । असता अवघा निवाडा ॥ धृ० ॥ इतका न लगता उशीर । न धरितों भीडभार । सिद्धासी व्यवहार । कासयासी लागला ॥ १ ॥ असोनियां माल खरा । किती केल्या येरझारा । धरणेंही दिवस तेरा । माझ्या भावें घेतलें ॥ २ ॥ अझुन तरी इतक्यावरी । चुकवीं जनाचार हरी । तुकयाबंधु ह्मणे उरी । नाहीं तरी नुरे कांहीं ॥ ३ ॥

॥ ३०१५ ॥ आतां न राहें क्षण एक । तुझा कळला रे लौकिक । नेदीं हालों एक । कांहीं केल्यावांचुनी ॥ धृ० ॥ संबंध पडिला कोणाशीं । काय डोळे झांकितोसी । नेईन पांचांपाशीं । दे नाहींतरी वोढुनी ॥ १ ॥ सुखें नेदीस जाणवलें । नास केल्याविण उगलें । तरि तें विचारिलें । आह्मी आहे तुज आधीं ॥ २ ॥ असेंच करूनि किती । नागविलीं नाहीं नीती । तुकयाबंधु ह्मणे अंतीं । न सोडिसी ते खोडी ॥ ३ ॥

॥ ३०१६ ॥ तुज ते सर्व आहे ठावें । द्यावें त्याचें बुडवावें । परि तें आह्मांसवें । आतां न फावे कांहीं ॥ धृ० ॥ नव्हों सोडायाचे धणी । कष्टें मेळविलें करोनी । पाहा विचारोनी । आढी धरोनि काम नाहीं ॥ १ ॥ अवघे राहिले प्रकार । जालों जीवासी उदार । असा हा निर्धार । कळला असावा असेल ॥ २ ॥ आतां निदसुर नसावें । गांठ पडली कुणब्यासवें । तुकयाबंधु ह्मणे राखावें । देवा महत्व आपुलें ॥ ३ ॥

॥ ३०१७ ॥ बहु बोलणें नये कामा । वाउगें तें पुरुषोत्तमा । एकाचि वचनें आह्मां । काय सांगणें तें सांग ॥ धृ० ॥ देणें आहे कीं भांडाई । करणें आहे सांग भाई । आतां भीड कांहीं । कोणी न धरी सर्वथा ॥ १ ॥ मागें गेलें जें होउनी । असो तें धरित नाहीं मनी । आतां पुढें येथुनी । कैसा काय विचार ॥ २ ॥ सारखी नाहीं अवघी वेळ । हें तों कळतें सकळ । तुकयाबंधु ह्मणे खळखळ । करावी ते उरेल ॥ ३ ॥

॥ ३०१८ ॥ आतां हें न सुटे न चुके । बोल कां दवडिसी फिके । जनलोक पारिखें । अवघें केलें म्यां यासाटीं ॥ धृ० ॥ नये सरतां नव्हे भलें । तुझें लक्षण कळलें । बैसलासी काढिलें । देहाचें मुळीं दिवाळें ॥ १ ॥ दिसतोसी बरा बोल कोंवळे । गुण मैंदाचे चाळे ।

दिसताती ये वेळे। काय करूं विसंबोनी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे देखतां। अंध बहिर ऐकतां। कैसें व्हावें आतां। इतकियाउपरी ॥ ३ ॥

॥ ३०१९ ॥ तिहीं ताळी हेचि हाक। ह्मणती पांढरा स्फटिक। अवघा बुडविला लौकिक। सुखेंचि भीके लाविलीं ॥ धृ० ॥ थोंटा नांव शिरोमणी। नाहीं जोडा त्रिभुवनी। ह्मणोनि शाहाणे ते कोणी। तुझे दारीं बैसतिना ॥ १ ॥ निर्गुण निलाजिरा निनांवा। लंड झोंड कुडा देवा। नागवणा या नांवा। वांचूनि दुजा नाइकों ॥ २ ॥ सर्वगुणें संपन्न। कळों आलासी संपूर्ण। तुकयाबंधु ह्मणे चरण। आतां जीवें न सोडीं ॥ ३ ॥

॥ ३०२० ॥ तोचि प्रसंग आला सहज। गुज धरितां नव्हे काज। न संडितां लाज। पुढें वोज न दिसे ॥ धृ० ॥ तूं तर न होसी शाहाणा। नये सांगतों तेंही मना। आपण आपणा। आतां प्रयत्न देखावा ॥ १ ॥ न पुरवी पाहातां वाट। द्यावें प्रमाण चोखट। कास घालूनिया नीट। चौघाचार करावा ॥ २ ॥ आतां श्रमाचें कारण। नव्हे व्हावें उदासीन। न पडे तयाविण। गांठी तुकयाबंधु ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३०२१ ॥ हळूहळू जाड। होत चालिलें लिगाड। जाणवेल निवाड। न करिसी परी पुढें ॥ धृ० ॥ मी तों सांगून उतराई। जालों आतां तुज काई। कळों येईल भाई। तैसा करीं विचार ॥ १ ॥ मागें युगें अठ्ठाविस। जालीं दिवसाचा दिवस। मुद्दल व्याज कासाविस। होसी देवा ये कामें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे राखें। आतां टाकीं तुह्मीं तीं सुखें। जगजाहिर ठाउकें। जालें नाहीं खंडलेंसें ॥ ३ ॥

॥ ३०२२ ॥ पत्र उचटिलें प्रेत्नें। ग्वाही कराया कारणें। नाहींतरी पुण्यें। तुझ्या काय उणें आह्मां ॥ धृ० ॥ नांव तुझेंचि करोनी। आहों सुखें पोट भरोनी। केली जाणवणी। ह्मणऊनि नाहीं ह्मणसील ॥ १ ॥ आतां इतकियाउपरी। दे नको भलतें करीं। ह्मणती ऋणकरी। आमुचा इतके उदंड ॥ २ ॥ तुकयाबंधु जागा। अळवावया पांडुरंगा। केला कांहीं मागा-। याची नव्हती गरज ॥ ३ ॥

॥ ३०२३ ॥ माझ्या भावें केली जोडी। न सरेसी कल्पकोडी। आणियेलें धाडी। घालूनि अवघें वैकुंठ ॥ धृ० ॥ आतां न लगे यावें। जावें कोठें कांहींच करावें। जन्मोजन्मीं खावें सुखें। बैसोनसें जालें ॥ १ ॥ असंख्य संख्या नाहीं पार। आनंदें दाटलें अंबर। न माये अपार। त्रिभुवनीं सांठवितां ॥ २ ॥ अवघें भरलें सदोदित। जाले सुखाचे पर्वत। तुकयाबंधु ह्मणे परमार्थ। धन अद्भुत सांपडलें ॥ ३ ॥

॥ ३०२४ ॥ आतां चुकलें देशावर। करणें अकरणें सर्वत्र। घरासी आगर। आला सकळसिद्धींचा ॥ धृ० ॥ जालों निधाई निधानें। लागलें अनंतगुणरत्न। जन्माचें विच्छिन्न। दुःख जालें दारिद्र ॥ १ ॥ तारूं सागरिचें अवचितें। हेंदोवलें आलें येथें। ओढिलें संचितें। पूर्वदत्तें लाधलें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे सीमा। नाहीं आमुचिया दैवा। आतां पुरुषोत्तमा। ऐसा सवदागर सांपडला ॥ ३ ॥

॥ ३०२५ ॥ सांपडलें जुनें। आमुच्या वडिलांचें ठेवणें। केली नारायणें। कृपा पुण्यें पूर्वींचिया ॥ धृ० ॥ सुखें आनंदरूप आतां। आह्मी आहों याकारितां। निवारली चिंता।

देणें घेणें चुकलें ॥ १ ॥ जालें भांडवल घरिंचें । अमुप नाम विठ्ठलाचें । सुकृत भावाचें । हें तयानें दाविलें ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे फिटला । पांग नाहीं बोलायाला । चाड दुसरी विठ्ठला । वांचूनियां आणिक ॥ ३ ॥

॥ ३०२६ ॥ कामक्रोध अहंकार नको देहीं । आशा तृष्णा माया लज्जा चिंता कांहीं । वास पंढरीचा जन्म सदा देई । आणिक दुजें मागणें तुज नाहीं ॥ धृ० ॥ कृपा देई दान हरि मज कृपा देई दान । नासीं तिमिर दाखवीं चरण । आर्त पुरवावें भेटी देउन । नको उपेक्षु आलिया शरण ॥ १ ॥ नाम अखंड हृदयीं राहो वाणी । न पडो विसर क्षण जागृति स्वप्नीं । संतसमागम ऐसा दे लावुनी । आणिक दुजें कांहीं नेणें तुजवांचुनी ॥ २ ॥ पंथपुरिचा रविसुत पुरे आतां । आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता । नाहीं आडताळा त्रैलोक्यामाजी सरता । विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवूनि माथा ॥ ३ ॥

॥ ३०२७ ॥ तटाचे जातीला नाहीं भीड भार । लाता मारी थोर लहान नेणें ॥ धृ० ॥ परि त्या विशेष मनुष्य होउनी । करी खंड मान वडिलांचा ॥ १ ॥ बेरसा गाढव माय ना बहीण । भुंके चवीविण भलतेंची ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे बोकड मातलें । न विचारी आपुले तोंडीं मुते ॥ ३ ॥

॥ ३०२८ ॥ मायझवा खर गाढवाचें बीज । तें ऐसें सहज कळों येतें ॥ धृ० ॥ अपमानिलें जेणें श्रेष्ठाचें वचन । तेचि त्याची खूण ओळखावी ॥ १ ॥ मद्यपी तो पुरा अधम यातीचा । तया उपदेशाचा राग वांयां ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे पिसाळलें सुनें । आपपर तेणें न विचारावें ॥ ३ ॥

॥ ३०२९ ॥ मत्स्यकूर्मशेषा कोणाचा आधार । पृथिवीचा भार वाहावया ॥ धृ० ॥ काय धाक आह्मां कासयाची चिंता । ऐसा तो असतां साहाकारी ॥ १ ॥ शंखचक्रगदा आयुधें अपार । वागवितो भार भक्तांसाठीं ॥ २ ॥ पांडवा जो हरी राखिलें कुसरी । तो हा बंधूचा कैवारी तुकयाच्या ॥ ३ ॥

॥ ३०३० ॥ राम ह्मणतां कामक्रोधांचें दहन । होय अभिमान देशधडी ॥ धृ० ॥ राम ह्मणतां कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम सीण स्वप्नासहीं ॥ १ ॥ राम ह्मणतां जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्रास पात्र कधीं ॥ २ ॥ राम ह्मणतां यम शरणागत बापुडें । आढळ पद पुढें काय तेथें ॥ ३ ॥ राम ह्मणतां धर्म घडती सकळ । तिमिरपडळ नासे हेळा ॥ ४ ॥ राम ह्मणतां ह्मणे तुकयाचा बंधू । तरिजेल भवसिंधु संदेह नाहीं ॥ ५ ॥

॥ ३०३१ ॥ मरोनि जाईन गुणनामावरुनी । तुझ्या चक्रपाणी मायबापा ॥ धृ० ॥ चुकविलीं दुःखें मायेचा वोळसा । तोडोनियां आशापाश तेणें ॥ १ ॥ केली काया तनु हिंवसी शीतळ । चिंतातळपळ नाहीं ऐसी ॥ २ ॥ काळें तोंड काळ करूनि राहिलें । भूतमात्र जालें सज्जनसखें ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे अवघ्या दशदिशा । मुक्त रे परेशा तुझ्या पुण्यें ॥ ४ ॥

॥ ३०३२ ॥ आतां मागतों तें ऐक नारायणा । भावपूर्वक मनापासूनियां ॥ धृ० ॥

असो दे मोकळी जिव्हा जरि गाईल गुण । नाहीं तरी खिळुन टाकीं परती ॥ १ ॥ मातेचिया परि देखती परनारी । ठेवीं नेत्र तरी नाहीं तरि नको ॥ २ ॥ तरी बरें कांटाळा करिती निंदास्तुतीचा । नाहीं तरि कानांचाही देख प्रेत्न ॥ ३ ॥ सकळ इंद्रियांचा निग्रह करूनि एक । राखावीं पृथक तोडोनि भ्रम ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे तेचि वाट प्राणा । पडतां नारायणा विसर तुझा ॥ ५ ॥

॥ ३०३३ ॥ नमस्कारी भूतें विसरोनि याती । तेणें आत्मस्थिति जाणीतली ॥ धृ० ॥ परउपकारीं वेचियेल्या शक्ती । तेणें आत्मस्थिति जाणीतली ॥ १ ॥ द्वैताद्वैतभाव नाहीं जया चित्तीं । तेणें आत्मस्थिति जाणीतली ॥ २ ॥ जयाचिये वाचे नये निंदास्तुती । तेणें आत्मस्थिति जाणीतली ॥ ३ ॥ उचित अनुचित जाणें धर्मनीती । दृढ भावभक्ति मानव तो ॥ ४ ॥ तुकयाबंधु ह्मणे वरकड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥ ५ ॥

॥ ३०३४ ॥ चवदा भुवनें लोक तिन्हीं दाढे जो कवळी । संपुष्ट तो संबळीमध्यें देखा ॥ धृ० ॥ उत्पत्तिसंहार करितां जो पाळण । तो नंदानंदन ह्मणवीतसे ॥ १ ॥ असुर तोडरी दैत्यांचा काळ । जाला द्वारपाळ बळीचा तो ॥ २ ॥ लक्ष्मीचा स्वामी क्षीराच्या सागरा । उच्छिष्टकवळा पसरी मुख ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे चतुरांचा रावो । भावें तो पाहा हो केला वेडा ॥ ४ ॥

॥ ३०३५ ॥ कोण या पुरुषार्थाची गती । आणियेला हातोहातीं । जाहाज पृथ्वीपती । केली ख्याति अद्भुत ॥ धृ० ॥ भला रे पुंडलिका भला । महिमा नव जाये वर्णिला । दगा देउनि अवघियांला । सांटविलें अविनाश ॥ १ ॥ केलें एकें घरीं केणें । भरलीं सदोदित दुकानें । दुमदुमिलीं सुखानें । हे भाग्याची पंढरी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे किल्ल्या । संतांचे हातीं दिल्या । आंगावेगळे आपुल्या । टाकूनि जाला महिमान ॥ ३ ॥

॥ ३०३६ ॥ पाहा हो कलिचें महिमान । असत्यासी रिझलें जन । पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ॥ धृ० ॥ ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ । केलें धर्माचें निर्मुळ । प्रळयकाळ आरंभला ॥ १ ॥ थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडूनियां द्विजवर । दावल पीर स्मरताती ॥ २ ॥ ऐसे यथार्थाचे अनर्थ । जाला बुडाला परमार्थ । नाहीं जालीं ऐसी नीत । हा हा भूत पातले ॥ ३ ॥ शांति क्षमा दया । भावभक्ति सत्क्रिया । ठाव नाहीं सांगावया । सत्त्वधैर्य भंगिलें ॥ ४ ॥ राहिले वर्णाश्रमधर्म । अन्योन्य विचरती कर्म । ह्मणवितां रामराम । श्रम महा मानिती ॥ ५ ॥ थेर भोरपाचे विशीं । धांवती भूतें आमिषा तैसीं । कथा पुराण ह्मणतां सिसी । तिडीक उठी नकऱ्याचे ॥ ६ ॥ विषयलोभासाठीं । सवाथेंसीं प्राण साटी । परमार्थीं पीठ मुठी । मागतां उठती सुनींसीं ॥ ७ ॥ धनाढ्य देखोनि अनामिक । तयातें मानिती आवश्यक । अपमानिले वेदपाठक । सात्त्विक शास्त्रज्ञ संपन्न ॥ ८ ॥ पुत्र ते पितियापाशीं । सेवा घेती सेवका ऐसी । सुनांचिया दासी । सासा जाल्या आंदण्या ॥ ९ ॥ खोटें जालें आलीं विवसी । केली मर्यादा नाहींसी । भार्या भ्रतारेंसी । रंक तैसीं मानिती ॥ १० ॥ नमस्कारावया हरिदासां । लाजती धरिती कांहीं गर्वसा । पोटासाठीं खोसा । वंदिती मलिछाच्या

॥ ११ ॥ बहुत पाप जालें उचंबळ । उत्तम न ह्मणती चांडाळ । अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरी कोणाचा ॥ १२ ॥ कैसें जालें नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न । विडे घेऊनि ब्राह्मण । अविद्वाणी वदताती ॥ १३ ॥ कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासींचीं चुंबिती । सोवळ्याच्या स्फीती । जगीं मिरविती पवित्रता ॥ १४ ॥ मद्यपानायी सुराणी । नवनीता न पुसें कोणी । केळवती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥ १५ ॥ केवढी दोषाची सबळता । जाली पहा हो भगवंता । पुण्य धुडावोनी संता । तीर्थां हारी आणिली ॥ १६ ॥ भेणें मंद जाल्या मेघवृष्टी । आकांतली कांपे सृष्टी । देव रिगाले कपाटीं । आटाआटी प्रवर्तली ॥ १७ ॥ अपीक धान्यें दिवसें दिवसें । गाई ह्मैसी चेवल्या गोरसें । नगरें दिसती उध्वंसें । पिकली बहुवसें पाखांडें ॥ १८ ॥ होम हरपलीं हवनें । यज्ञयाग अनुष्ठानें । जपतपादिसाधनें । आचरणें भ्रष्टलीं ॥ १९ ॥ अठरा यातींचे व्यापार । करिती तस्कराई विप्र । सांडोनियां शुद्ध शुभ्र । वस्त्रें निळीं पांघरती ॥ २० ॥ गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्रीं । अश्वाचियापरी । कुमारी विकिती वेदवक्ते ॥ २१ ॥ वेदाध्ययनसंहितारुची । भकाद्या करिती तयांची । आवडी पंडितांची । मुसाफावरी बैसली ॥ २२ ॥ मुख्य सर्वोत्तम साधनें । तीं उच्छेदुनी केलीं दीनें । कुडीं कापट्यें महा मोहनें । मिरविताती दुर्जन ॥ २३ ॥ कळाकुशळता चतुराई । तर्कवादी भेद निंदेठायीं । विधिनिषेधाचा वाही । एकही ऐसीं नाडलीं ॥ २४ ॥ जे संन्यासी तापसी ब्रह्मचारी । होतां वैरागी दिगांबर । निस्पृही वैराग्यकारी । कामक्रोधें व्यापिले भारी । इच्छाकरीं न सुटती ॥ २५ ॥ कैसें विनाशकाळाचें कौतुक । राजे जाले प्रजांचे अंतक । पिते पुत्र सहोदर । एकाएक शत्रुघातें वर्त्तती ॥ २६ ॥ केवढी ये रांडेची अंगवण । भ्रमविलें अवघें जन । याती अठरा चाऱ्ही वर्ण । कर्दम करूनि विटाळले ॥ २७ ॥ पूर्वीं होतें भविष्य केलें । संतीं तें यथार्थ जालें । ऐकत होतों तें देखिलें । प्रत्यक्ष लोचनीं ॥ २८ ॥ आतां असो हें आघवें । गति नव्हे कळीमध्यें वागवरावें । देवासी भाकोनि करुणावें । वेगें स्मरावें अंतरीं ॥ २९ ॥ अगा ये वैकुंठनायका । काय पाहातोसि या कौतुका । धांव कलीनें गांजिलें लोकां । देतो हाका सेवक तुकयाचा ॥ ३० ॥

॥ ३०३७ ॥ केली हार्णाळां अंघोळी । येऊनि बैसलों राउळीं ॥ धृ० ॥ अजिचें जालें भोजन । रामकृष्ण नारायण ॥ १ ॥ तुकयाबंधु ह्मणे मास । नाहीं कल्पांतीं जयास ॥ २ ॥

॥ ३०३८ ॥ तुजलागीं माझा जी जाला पिसा । अवलोकितों दिशा पांडुरंगा ॥ धृ० ॥ सांडिला व्यवहार माया लोकाचार । छंद निरंतर हाचि मनीं ॥ १ ॥ आइकिलें कानीं तें रूप लोचन । देखावया सीण करिताती ॥ २ ॥ प्राण हा विकळ होय कासाविस । जीवनाविण मत्स्य तयापरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां कोण तो उपाव । करूं तुझे पाव आतुडे तो ॥ ४ ॥

॥ ३०३९ ॥ कोणे गांवा आहे सांगा हा विठ्ठल । जरी ठावा असेल तुह्मां कोणा ॥ धृ० ॥ लागतसें पायां येतों लोटांगणीं । मात तरी कोणी सांगा याची ॥ १ ॥ गुण रूप याचें वाणिती या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ॥ २ ॥ सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं ।

पांडुरंग कोणी दावी तया ॥ ३ ॥ तुका ह्मणे गाईवत्सा तडातोडी । तैसी जाते घडी एकी मज ॥ ४ ॥

॥ ३०४० ॥ एकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधिलिया साधे काय तेथें ॥ धृ० ॥ काय हातीं लागे भुसाचे कांडणीं । सत्यासी दाटणी करूनि काय ॥ १ ॥ कवित्वाचें रूढि पायां पाडी जग । सुखावोनि मग नरका जाय ॥ २ ॥ तुका ह्मणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥ ३ ॥

॥ ३०४१ ॥ भल्याचें दर्शन । तेथें शुभचि वचन ॥ धृ० ॥ बोलावी हे धर्मनीत । क्षोभें होत नाहीं हित ॥ १ ॥ मर्यादा ते बरी । वेळ जाणावी चतुरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे बहू । लाग ऐसें बरें मऊ ॥ ३ ॥

॥ ३०४२ ॥ आवडीनें धरिलीं नांवें । प्रियभावें चिंतन ॥ धृ० ॥ वेडा जाला वेडा जाला । लांचावला भक्तीसी ॥ १ ॥ निचाडया चाड धरी । तुळसी करीं दळ मागे ॥ २ ॥ धरिला मग न करी बळ । तुका ह्मणे कळ पायीं ॥ ३ ॥

॥ ३०४३ ॥ कंठीं राहो नाम । अंगीं भरोनियां प्रेम ॥ धृ० ॥ ऐसें द्यावें कांहीं दान । आलों पतित शरण ॥ १ ॥ संतांचिये पायीं । वेळोवेळां ठेवीं डोई ॥ २ ॥ तुका ह्मणे तरें । भवसिंधु एका सरें ॥ ३ ॥

॥ ३०४४ ॥ विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ॥ धृ० ॥ वाये टाळ टाळ्याटाळी । होइल होळी विघ्नांची ॥ १ ॥ विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा ॥ २ ॥ तुका ह्मणे विठ्ठलवाणी । वदा कानीं आइका ॥ ३ ॥

॥ ३०४५ ॥ पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचे ॥ धृ० ॥ पुंडलिका दिला वर । करुणाकरें विठ्ठलें ॥ १ ॥ मूढ पापी जैसे तैसे । उतरी कासे लावुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें जालें । एका बोलें संतांच्या ॥ ३ ॥

॥ ३०४६ ॥ अमृताचीं फळें अमृताची वेली । तेचि पुढें चाली बीजाचीही ॥ धृ० ॥ ऐसियांचा संग देई नारायणा । बोलावा वचना जयांचिया ॥ १ ॥ उत्तम सेवन सितळ कंठासी । पुष्टी कांति तैसी दिसे वरी ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसें होइजेत संगें । वास लागे अंगें चंदनाच्या ॥ ३ ॥

॥ ३०४७ ॥ पंढरीसी जा रे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ॥ धृ० ॥ वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळ तांतडी उतावीळ ॥ १ ॥ मागील परिहार पुढें नाहीं सीण । जालिया दर्षण एकवेळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नेदी आणिकांचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ३ ॥

॥ ३०४८ ॥ नकळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ धृ० ॥ न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें यां विठ्ठलें एकाचिया ॥ १ ॥ न बोलों तें बोलों येइल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ २ ॥ न भेटे तें भेटों येइल आपण । करितां चिंतन विठोबाचें ॥ ३ ॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर ह्मणतां वाचे ॥ ४ ॥ तुका ह्मणे आसक्त जीव सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ ५ ॥

॥ ३७४९ ॥ बहुजन्में केला लाग । तो हा भाग लाधलों ॥ धृ० ॥ जीव देईन हा बळी । करीन होळी संसारा ॥ १ ॥ गेलें मग नये हाता । पुढती चिंता वाटतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तांतड करूं । पाय धरूं बळकट ॥ ३ ॥

॥ ३०५० ॥ भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसी ॥ धृ० ॥ आत्मनिष्ठ जरी जाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां ॥ १ ॥ तुका ह्मणे कृपा करील नारायण । तरिच हें वर्म पडे ठावें ॥ २ ॥

॥ ३०५१ ॥ दुधाळ गाढवी जरी जाली पाहे । पावेल ते काय धेनुसरी ॥ धृ० ॥ कागाचिया गळा पुष्पाचिया माळा । हंसाचि तो कळा काय जाणें ॥ १ ॥ मर्कटें अंघोळी लावियेले टिळे । ब्राह्मणाचे लीळे वर्तूं नेणें ॥ २ ॥ जरी तो ब्राह्मण झाला कर्मभ्रष्ट । तुका ह्मणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥ ३ ॥

॥ ३०५२ ॥ देव भक्तालागिं करूं नेदी संसार । अंगें वारावार करोनि ठेवी ॥ धृ० ॥ भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा । ह्मणोनि करंटा करोनि ठेवी ॥ १ ॥ स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठीं लावी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज प्रचित आली देखा । आणिक या लोकां काय सांगों ॥ ३ ॥

॥ ३०५३ ॥ वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊं द्यावें मला ॥ धृ० ॥ अंतीं मरसी तें न चुके । मजही मारितोसी भुके ॥ १ ॥ येरू ह्मणे भला भला । निवाड तुझ्या तोंडें जाला ॥ २ ॥ देह तंव जाणार । घडेल हा उपकार ॥ ३ ॥ येरू ह्मणे मनीं । ऐसें जावें समजोनी ॥ ४ ॥ गांठी पडली ठका ठका । त्याचा धर्म बोले तुका ॥ ५ ॥

॥ ३०५४ ॥ जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम ते ठाय रम्य स्थळ ॥ धृ० ॥ रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त तें ते घडी ॥ १ ॥ धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभकाळ तेंचि जीणें । भाग्य नारायण उत्तम तें ॥ ३ ॥

॥ ३०५५ ॥ तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥ धृ० ॥ माझ्या बळिया नेणसी कोण । संतां साहे नारायण ॥ १ ॥ शंख वधिला सागरीं । वेद घेऊनि आला चारी ॥ २ ॥ कूर्में दैत्य वधिला जेठी । हात पाय लपवी पोटीं ॥ ३ ॥ वाराहरूप धरिलें गाढें । धरा प्रतापें धरिली दाढें ॥ ४ ॥ हिरण्यकश्यप विदारिला । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ ५ ॥ वामन जाला दिनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ॥ ६ ॥ छेदूनियां सहस्र भुजा । कामधेनु आणिली वोजा ॥ ७ ॥ शिळा प्रतापें सागरी तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ॥ ८ ॥ मारोनियां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ॥ ९ ॥ पांचाळीसी गांजितां वैरी । वस्त्रें आपण जाला हरी ॥ १० ॥ गजेंद्र स्मरे रामराम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥ ११ ॥ तुका ह्मणे हरिरूप जाले । पुन्हा जन्मा नाहीं आले ॥ १२ ॥

॥ ३०५६ ॥ सर्वा भूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन । उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरीजे ॥ धृ० ॥ पुण्य करितां होय पाप । दुग्ध पाजोनि पोशिला साप । करीनि अघोर जप । दुःख विकत घेतलें ॥ १ ॥ भूमि पाहातां नाहीं वेगळी । माळ वरड एक

काळी । उत्तम निराळी । मध्यम कनिष्ठ ॥ २ ॥ ह्मणोनि विवेकें । कांहीं करणें निकें । तुका ह्मणे फिकें । रुचि नेदी मिष्टान्न ॥ ३ ॥

॥ ३०५७ ॥ देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥ धृ० ॥ देह देवाचे सांभाळी । सार योजे यथाकाळीं ॥ १ ॥ विश्वासीं निर्धार । विस्तारील विश्वंभर ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें । बळ एकाचि जाणावें ॥ ३ ॥

॥ ३०५८ ॥ वर्त्तता बासर । काय करावें शरीर ॥ धृ० ॥ ठेवा नेमून नेमून । माझें तुमचे पायीं मन ॥ १ ॥ नेदाविया वृत्तीं । कोठें फांकोंचि श्रीपती ॥ २ ॥ तुका ह्मणे भले । जन्मा येऊनियां जाले ॥ ३ ॥

॥ ३०५९ ॥ केली प्रतिज्ञा मनाशीं । तंई मी दास सत्यत्वेशीं । नेईन पायांपाशीं । स्वामि मूळ पंढरिये ॥ धृ० ॥ तोंवरी हें भरीं पोट । केला तो मिथ्या बोभाट । नाहीं सांपडली वाट । सइराट फिरतसें ॥ १ ॥ ज्यावें आदरावें जिणें । स्वामी कृपा करी तेणें । पाळिल्या वचनें । सख्यत्वाचा अनुभव ॥ २ ॥ घडे तैसें घडो आतां । मायबापाची हे सत्ता । तुका ह्मणे चिंता । काय पाहें मारगा ॥ ३ ॥

॥ ३०६० ॥ नेत्र झाकोनियां काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं भावप्रेम ॥ धृ० ॥ उघडा मंत्र जाणा रामकृष्ण ह्मणा । तुटती यातना गर्भवास ॥ १ ॥ मंत्र यंत्र कांहीं करिसी जडी बुटी । तेणें भूतसृष्टि पावशील ॥ २ ॥ सार तुका जपे बीज मंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण ॥ ३ ॥

॥ ३०६१ ॥ संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ॥ धृ० ॥ काय करावीं साधनें । काय नव्हे एक तेणें ॥ १ ॥ शेष घेईन उच्छिष्ट । धांय धणीवरी पोट ॥ २ ॥ तुका ह्मणे संतांपायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ ३ ॥

॥ ३०६२ ॥ जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोबडे शब्द गोड ॥ धृ० ॥ आपुलें आवडी लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख वाटे ॥ १ ॥ तुका ह्मणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणतसें ॥ २ ॥

॥ ३०६३ ॥ देवाचिया वस्त्रा स्वप्नींही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥ धृ० ॥ गाईचें पाळण नयेचि विचारा । अश्वासी खरारा करी अंगें ॥ १ ॥ लेकराची रास स्वयें धावें क्षाळूं । न ह्मणे प्रक्षाळूं द्विजपायां ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ३ ॥

॥ ३०६४ ॥ उरा लावी उर आळंगितां कांता । संतासी भेटतां अंग चोरी ॥ धृ० ॥ पतित देखोनि होय पाठमोरा । ब्याह्यासि समोरा जाय वेगीं ॥ १ ॥ द्विजा नमस्कारा मनीं भाव कैचा । तुर्काचे दासीचा लेंक होय ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणीं ॥ ३ ॥

॥ ३०६५ ॥ ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि कां हिंपुटी वेदशास्त्रें ॥ धृ० ॥ शास्त्रांचें भांडण जप तीर्थाटन । उर्वीचें भ्रमण याचसाठीं ॥ १ ॥ याचसाठीं जप ।

याचसाठीं तप । व्यासेंहि अमुप ग्रंथ केले ॥ २ ॥ याचसाठीं संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३०६६ ॥ गायत्री विकोन पोट जे जाळिती । तया होय गति यमलोकीं ॥ धृ० ॥ कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरकपाता ॥ १ ॥ नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणों तयां गति कैसी होय ॥ २ ॥ आमुचा सांगाती आहे तो श्रीहरी । न लगे दुराचारी तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३०६७ ॥ साधूच्या दर्शना लाजशी गव्हारा । वेश्येचिया घरा पुष्पें नेसी ॥ धृ० ॥ वेश्या दासी मुरळी जगाची वोंवळी । ते तुज सोंवळी वाटे कैशी ॥ १ ॥ तुका ह्मणे आतां लाज धरीं बुच्या । टांचराच्या कुच्या मारा वेगीं ॥ २ ॥

॥ ३०६८ ॥ राउळासी जातां त्रास मानी मोठा । बैसतो चोहोटां आदरेशीं ॥ धृ० ॥ न करी स्नानसंध्या ह्मणे रामराम । गुडगुडीचें प्रेम अहर्निशीं ॥ १ ॥ देवाब्राह्मणासी जाईना शरण । दासीचे चरण वंदी भावें ॥ २ ॥ सुगंध चंदन सांडोनियां माशी । बसे दुर्गंधीशीं अतिआदरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे अरे ऐक भाग्यहीना । कां रे रामराणा विसरसी ॥ ४ ॥

॥ ३०६९ ॥ दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥ धृ० ॥ आतां ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं ॥ १ ॥ उपजला भावो । तुमचे कृपे सिद्धि जावो ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । लाभ नाहीं या परता ॥ ३ ॥

॥ ३०७० ॥ तरुवर बीजा पोटीं । बीज तरुवरा सेवटीं ॥ धृ० ॥ तैसें तुह्मा आह्मां जालें । एकीं एक सामावलें ॥ १ ॥ उदकावरील तरंग । तरंग उदकाचें अंग ॥ २ ॥ तुका ह्मणे बिंबच्छाया । ठायीं पावली विलया ॥ ३ ॥

॥ ३०७१ ॥ साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठी । तयासी सेवटीं करबाडें ॥ धृ० ॥ मालाचे पैं पेटे वाहाताती उंटें । तयालागीं कांटे भक्षावया ॥ १ ॥ वाउगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनियां देती यमाहातीं ॥ २ ॥ ज्यासी असे लाभ तोचि जाणें गोडी । येर तीं बापुडीं सिणलीं वांया ॥ ३ ॥ तुका ह्मणे शाहणा होईं रे गव्हारा । चौऱ्यासीचा फेरा फिरों नको ॥ ४ ॥

॥ ३०७२ ॥ चिरगुटें घालूनि वाढविलें पोट । गऱ्हवार बोभाट जनामध्यें ॥ धृ० ॥ लटिकेचि डोहळे दाखवी प्रकार । दुध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥ १ ॥ तुका ह्मणे अंतीं वांजचि ते खरी । फजिती दुसरी जनामध्यें ॥ २ ॥

॥ ३०७३ ॥ माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायांसी न विसंबें ॥ धृ० ॥ विसरेना रूप क्षण एक चित्तीं । जिवलग मूर्ति सांवळी ते ॥ १ ॥ विसरतां हरि क्षण एक घडी । अंतरली जोडी लक्षलाभ ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या विठोबाचे पाये । संजीवनी आहे हृदयामाजी ॥ ३ ॥

॥ ३०७४ ॥ काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचताती पुढें संसाराच्या ॥ धृ० ॥ ह्मातारे तेवेळे विचकिती दांत । घेती यमदूत दंडवरी ॥ १ ॥ हात दांत कान हलविती

मान । दाखविती जन मानावया ॥ २ ॥ तुका ह्मणे किती जालीं हीं फजित । मागें नाहीं नीत भारवाही ॥ ३ ॥

॥ ३०७५ ॥ थोर ती गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥ धृ० ॥ व्यर्थ भराभर केलें पाठांतर । जोंवरि अंतर शुद्ध नाहीं ॥ १ ॥ घोडें काय थोडें वागविते ओझें । भावेंविण तैसें पाठांतर ॥ २ ॥ तुका ह्मणे धरा निष्ठावंत भाव । जरी पंढरिराव पाहिजे तो ॥ ३ ॥

॥ ३०७६ ॥ जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥ धृ० ॥ सांडोनिया वाळवंटा काय इच्छिसी वैकुंठ ॥ १ ॥ खांद्या पताकांचे भार । तुळसी माळा आणि अबीर ॥ २ ॥ साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥ ३ ॥

॥ ३०७७ ॥ जगीं ऐसा बाप व्हावा । ज्याचा वंश मुक्तीस जावा ॥ धृ० ॥ पोटा येतां हरलें पापा । ज्ञानदेवा मायबापा ॥ १ ॥ मुळीं बाप होता ज्ञानी । तरी आह्मी लागलों ध्यानीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मी पोटींचें बाळ । माझी पुरवा ब्रह्मींची आळ ॥ ३ ॥

॥ ३०७८ ॥ संतांच्या हेळणें बाटलें जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥ धृ० ॥ भेसळीचें वीर्य ऐशा अनुभवें । आपुलें परावें नाहीं खळा ॥ १ ॥ संतांचा जो शोध करितो चांडाळ । धरावा विटाळ बहु त्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे केली प्रज्ञा याचसाठीं । कांहीं माझे पोटीं शंका नाहीं ॥ ३ ॥

॥ ३०७९ ॥ बहु टाळाटाळी । होतां भोवताहे कळी ॥ धृ० ॥ बरें नव्हेल सेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥ १ ॥ मुरगाळी कान । घुस मांडील सावधान ॥ २ ॥ अबोलण तुका । ऐसें कोणी लेखूं नका ॥ ३ ॥

॥ ३०८० ॥ जिव्हे जाला चळ । नेणे अवसान ते पळ ॥ धृ० ॥ हेंचि वोसनावोनी उठी । देव सांठविला पोटीं ॥ १ ॥ नाहीं ओढा वारा । पडिला प्रसंग तो बरा ॥ २ ॥ तुका ह्मणे जाली । मज हे अनावर बोली ॥ ३ ॥

॥ ३०८१ ॥ गोहो यावा गांवा । ऐसे नवस करी आवा ॥ धृ० ॥ केचें पुण्य तया गांठीं । व्रतें वेची लोभासाठीं ॥ १ ॥ वाढावें संतान । गृहीं व्हावें धनधान्य ॥ २ ॥ मागे गारगोटी । परिसाचिये साटोवाटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोल । देऊन घेतला सोमल ॥ ४ ॥

॥ ३०८२ ॥ बाळपणें ऐसीं वरुषें गेलीं बारा । खेळतां या पोरा नानामतें ॥ धृ० ॥ विटू दांडू चेंडू लगोऱ्या वाघोडीं । चंपे पेंड खडी एकीबेकी ॥ १ ॥ हमामा हुंबरी पकव्याच्या बारे । खेळे जंगीभोंवरे चुंबाचुंबी ॥ २ ॥ सेलडेरा आणि निसरभोंवडी । उचली बाले धोंडी अंगबळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें बाळपण गेलें । मग तारुण्य आलें गर्वमूळ ॥ ४ ॥

॥ ३०८३ ॥ तारुण्याच्या मदें न मनी कोणासी । सदा मुसमुसी घुळी जैसा ॥ धृ० ॥ अटोनी वेठोनी बांधला मुंडासा । फिरतसे हैसा जनामधीं ॥ १ ॥ हातीं दीडपान वरतीच मान । नाहीं तो सन्मान भलियांसी ॥ २ ॥ श्वानाचिया परि हिंडे दारोदारीं । पाहे परनारी पापदृष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसा थोर हा गयाळी । करितां टवाळी जन्म गेला ॥ ४ ॥

॥ ३०८४ ॥ ज्ञातारपणीं येटे पडसें खोकला । हात कपाळाला लावूनि बैसे ॥ धृ० ॥ खोबरियाची वाटी जालें असे मुख । गळतसे नाक श्लेष्मपुरी ॥ १ ॥ बोलों जातां शब्द नयेचि हा नीट । गडगडी कंठ कफ भारी ॥ २ ॥ सेजारी ह्मणती मरेना कां मेला । आणिला कांटाळा येणें आह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां सांडुनी सर्वकाम । स्मरा राम राम क्षणक्षणा ॥ ४ ॥

॥ ३०८५ ॥ जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥ धृ० ॥ बुक्का लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥ १ ॥ तटावृषभासी दाणा । तृण मागों नये जाणा ॥ २ ॥ तुका ह्मणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥ ३ ॥

॥ ३०८६ ॥ लंकेमाजी घरें किती तीं आइका । सांगतसें संख्या जैसीतैसी ॥ धृ० ॥ पांच लक्ष घरें पाषाणांचीं जेथें । सात लक्ष तेथें विटेबंदी ॥ १ ॥ कोटि घरें जेथें कांशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाचीं सप्त कोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ३ ॥

॥ ३०८७ ॥ व्यभिचारिणी गणिका कुंटणी । विश्वासचि मनीं राघोबाचा ॥ धृ० ॥ ऐसी हीं पापिणी वाहिली विमानीं । अचळ भुवनीं ठेवियेली ॥ १ ॥ पतितपावन तिहीं लोकीं ठसा । कृपाळू कोंवसा अनाथांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे विठोबाची धरा सोय । आणिक उपाय नेणों किती ॥ ३ ॥

॥ ३०८८ ॥ गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें । जळामाजी नक्रें पीडिलासे ॥ धृ० ॥ सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे । अंतीं वाट पाहे विठो तुझी ॥ १ ॥ कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तया दोघांजणा तारियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे नेले वाऊनि विमानीं । मीही आईकोनी विश्वासलों ॥ ३ ॥

॥ ३०८९ ॥ ब्रह्मयाचे वेद शंखासुरें नेले । त्यासाठीं धरिलें मत्स्यरूप ॥ धृ० ॥ तेणें आत्मा नव्हता नेला ब्रह्मांडासी । काय ब्रह्मयासी नव्हतें ज्ञान ॥ १ ॥ परि तेणें धावा केला आवडीनें । जाले नारायण कृपासिंधू ॥ २ ॥ तुका ह्मणे विठोबा मी नामधारक । पोसनें सेवक भेटी देई ॥ ३ ॥

॥ ३०९० ॥ देवीं आणि दैतीं सिंधू घुसळिला । भार पृथ्वीस जाला साहावेना ॥ धृ० ॥ जालासी कासव धरिली पाठीवरी । चिंता तुज हरि सकळांची ॥ १ ॥ तये काळीं देव करितातीं स्तुती । कृपाळु श्रीपति ह्मणोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे उदंड पवाडे । ज्यासी सहस्र तोंडें सिणला तोही ॥ ३ ॥

॥ ३०९१ ॥ हिरण्याक्ष दैत्य मातला जे काळीं । वरदानें बळी शंकराच्या ॥ धृ० ॥ इंद्रपदराज्य घेतलें हिरोनी । देवा चक्रपाणी ह्मणती धांव ॥ १ ॥ तई पांडुरंगा शूकर जालेती । तयां दैत्यपति मारियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यांचीं राज्यें त्यांसी दिलीं । ऐसी तूं माउली पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३०९२ ॥ प्रल्हादाकारणें नरसिंह जालासी । त्याचिया बोलासी सत्य केलें ॥ धृ० ॥ रामकृष्ण गोविंद नारायण हरी । गर्जे राजद्वारीं भक्तराज ॥ १ ॥ विठ्ठल माधव

मुकुंद केशव । तेणें दैत्यराव दचकला ॥ २ ॥ तुका ह्मणे तयां कारणें सगुण । भक्तांचें वचन सत्य केलें ॥ ३ ॥

॥ ३०९३ ॥ नामाचें सामर्थ्य कां रे दवडीसी । कां रे विसरसी पवाडे हे ॥ धृ० ॥ खणखणां हाणती खर्गें प्रल्हादासी । न रुपे आंगासी किंचितही ॥ १ ॥ रामकृष्ण हरि ऐसी मारी हाक । तेणें पडे धाक बळियासी ॥ २ ॥ असों द्यावीं सामर्थ्यें ऐसिया कीर्तीचीं । आवडी तुक्याची भेटी देई ॥ ३ ॥

॥ ३०९४ ॥ वाटीभर विष दिलें प्रल्हादासी । निर्भय मानसीं तुझ्या बळें ॥ धृ० ॥ भोक्ता नारायण केलें तें प्राशन । प्रतापें जीवन जाहालें तुझ्या ॥ १ ॥ नामाच्या चिंतनें विषाचें तें आप । जाहालें देखत नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे तुझे बडिवार । सिणला फणीवर वर्णवेना ॥ ३ ॥

॥ ३०९५ ॥ अग्निकुंडामाजी घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरेना ॥ धृ० ॥ पितियासी ह्मणे व्यापक श्रीहरी । नांदतो मुरारी सर्वांठायीं ॥ १ ॥ अग्निरूपें माझा सखा नारायण । प्रल्हाद गर्जून हाक मारी ॥ २ ॥ तुका ह्मणे अग्नि जाहाला शीतळ । प्रताप सबळ विठो तुझा ॥ ३ ॥

॥ ३०९६ ॥ कोपोनियां पिता बोले प्रल्हादासी । सांग हृषीकेशी कोठें आहे ॥ धृ० ॥ येरू ह्मणे काष्ठीं पाषाणीं सकळीं । आहे वनमाळी जेथें तेथें ॥ १ ॥ खांबावरी लात मारिली दुर्जनें । खांबीं नारायण ह्मणतांची ॥ २ ॥ तुका ह्मणे कैसा खांब कडाडिला । ब्रह्मा दचकला सत्यलोकीं ॥ ३ ॥

॥ ३०९७ ॥ डळमळिला मेरु आणि तो मांदार । पाताळीं फणिवर डोई झाडी ॥ धृ० ॥ लोपे तेजें सूर्य आणिक हा चंद्र । कांपतसे इंद्र थरथरां ॥ १ ॥ ऐसें रूप उग्र हरीनें धरिलें । दैत्या मारियेलें मांडीवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तांकारणें श्रीहरी । बहु दुराचारी निर्दाळिले ॥ ३ ॥

॥ ३०९८ ॥ बहुत कृपाळु दीनाचा दयाळु । जगीं भक्तवत्सळु नाम तुझें ॥ धृ० ॥ मानियेला चित्तीं बळीचा उपकार । अझूनि त्याचें द्वार राखसील ॥ १ ॥ काय त्याच्या भेणें बैसलासी द्वारीं । नाहीं तुज हरि कृपा बहू ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तजनाची ममता । तुह्मांसी अनंता अलोलिक ॥ ३ ॥

॥ ३०९९ ॥ पांडुरंगा तुझे काय वाणूं गुण । पवाडे हे धन्य जगीं तुझे ॥ धृ० ॥ दंडिलें दुर्वासा सुरा असुरानें । तो आला गाऱ्हाणें सांगावया ॥ १ ॥ बळिचिये द्वारीं तुह्मी बैसलेती । दुर्वास विनंति करी भावें ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपासागरा श्रीहरी । तुह्मी भक्तावरी प्रेमच्छाया ॥ ३ ॥

॥ ३१०० ॥ दुर्वासया स्वामी गुंतलों भाकेसी । पुसा जा बळीसी निरोप द्यावा ॥ धृ० ॥ त्याचे आज्ञेविण आह्मां येतां नये । द्वारपाळ राहें होऊनियां ॥ १ ॥ पुसे दुर्वासया बळीसी जाउनी । येरू ह्मणे ह्मणी बोलों नका ॥ २ ॥ तुका ह्मणे केला अन्यत्राचा त्याग । तेव्हां पांडुरंग सखा जाला ॥ ३ ॥

॥ ३१०१ ॥ बळी ह्मणे आजि दुर्वासया स्वामी । मागों नका तुह्मी नारायणा ॥ धृ० ॥ बहुतां प्रयासीं जोडला श्रीहरी । बैसविला द्वारीं राखावया ॥ १ ॥ परतला दुर्वास मग ह्मो तेथुनी । चिंतातुर मनीं उद्वेगला ॥ २ ॥ काय तूं एकाचा आहेसी अंकित । होईं कृपावंत तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३१०२ ॥ त्रैलोक्यांचा नाथ सकळांचा आधार । बळीचें तुवां घर धरियेलें ॥ धृ० ॥ आह्मां मोकलिलें कोणां निरविलें । कोणा हातीं दिले तिन्ही लोक ॥ १ ॥ अनाथांचा बंधु दासांचा कैवारी । ब्रिदें तुझीं हरि जातीं वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें बोलिला दुर्वास । वाटला संतोष पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३१०३ ॥ बोलिले ते देवऋषि दुर्वासया । जाय पुसावया मागत्यानें ॥ धृ० ॥ मागुता दुर्वास पुसे बळिराया । निरोप जावया देईं देवा ॥ १ ॥ बळी ह्मणे त्यासी जाय मी न ह्मणें । जाईल नारायण लागलाची ॥ २ ॥ मजपाशीं राहें कोठें तरीं जाय । तुका ह्मणे पाय न सोडीं मी ॥ ३ ॥

॥ ३१०४ ॥ दुर्वासें निरोप आणिला ये रिती । मग वाढलेती नारायणा ॥ धृ० ॥ ठेविलें चरण बळिचिये द्वारीं । शीर अंगावरी लांबविलें ॥ १ ॥ पाडियेलें द्वार द्वारावति-येसी । वरि हृषीकेशी निवालेती ॥ २ ॥ तेथूनियां नाम पडिलें द्वारका । वैकुंठनायका तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३१०५ ॥ मुरुकुश दोन्ही मारिले आसुर । दुर्वास ऋषीश्वर सुखी केला ॥ धृ० ॥ मारियेला मुरु ह्मणोनी मुरारी । नाम तुझें हरि पडियेलें ॥ १ ॥ पूर्वींहुनी ऐसा भक्तिप्रति-पाळ । केला त्वां सांभाळ नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे येचि वेळे काय जालें । कां सोंग धरिलें मोहनाचें ॥ ३ ॥

॥ ३१०६ ॥ गुरुपादांभींचें जळ । त्यास मानी जो विटाळ ॥ धृ० ॥ संतीं वाळिला जो खळ । नरकीं पचे चिरकाळ ॥ १ ॥ गुरुतीर्थीं अनमान । यथासांग मद्यपान ॥ २ ॥ गुरुअंगुष्टा न चोखी । मुख घाली वेश्येमुखीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगों किती । मुखीं पडो त्याचे माती ॥ ४ ॥

॥ ३१०७ ॥ वाढविलें कांगा । तुह्मी एवढें पांडुरंगा ॥ धृ० ॥ काय होती मज चाड । एवढी करावया बडबड ॥ १ ॥ ब्रह्मसंतर्पण । लोकीं करावें कीर्तन ॥ २ ॥ निमित्याचा धणी । तुका ह्मणे नेणे कोणी ॥ ३ ॥

॥ ३१०८ ॥ साही शास्त्रां अतिदुरी तो परमात्मा श्रीहरी । तो दशरथाचे घरीं क्रीडतो राम ॥ धृ० ॥ शिवाचें निजध्येय वाल्मीकाचें निज गुह्य । तो भिल्लटीचीं फळें खाय श्रीराम तो ॥ १ ॥ योगियांचे मनीं नातुडे चिंतनीं । तो वानरांचे कानीं गोष्टी सांगे ॥ २ ॥ चरणीं शिळा उद्धरी नामें गणिका तारी । तो कोळिया घरीं पाहुणा राम ॥ ३ ॥ क्षण एक सुरवरा नातुडे नमस्कारा । तो रिसा आणि वानरा क्षेम दे राम ॥ ४ ॥ राम सांवळा सगुण राम योगियाचें ध्यान । राम राजीवलोचन तुका चरण वंदितो ॥ ५ ॥

॥ ३१०९ ॥ विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळधर्म देव विठ्ठल माझा ॥ धृ० ॥

विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारू । उतरील पारु भवनदीचा ॥ १ ॥ विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिणी बंधू ॥ २ ॥ विठ्ठल हे जन विठ्ठल माझें मन । सोयरा सज्जन विठ्ठल माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा विठ्ठल विसावा । नश्वरित गांवा जाइन त्याच्या ॥ ४ ॥

॥ ३११० ॥ न मनावी चिंता । कांहीं माझेविशीं आतां ॥ धृ० ॥ ज्याणें लौकिक ह्या केला । तो हें निवारिता भला ॥ १ ॥ माझे इच्छे काय । होणार ते एक ठाय ॥ २ ॥ सुखा आणि दुःखा । ह्मणे वेगळा मी तुका ॥ ३ ॥

॥ ३१११ ॥ माझा पाहा अनुभव । केला देव आपुला ॥ धृ० ॥ बोलविलें तेंचि द्यावें । उत्तर व्हावें ते काळीं ॥ १ ॥ सोडिलिया जग निंद्य । मग गोविंद ह्मणियारा ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर केला । तेणें याला गोविलें ॥ ३ ॥

॥ ३११२ ॥ जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर ॥ धृ० ॥ येरें काय तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥ १ ॥ पण ऐशा नांवें । देव धरिजेतो भावें ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यावें । सत्य कीर्तीनें बरवें ॥ ३ ॥

॥ ३११३ ॥ सरे ऐसें ज्याचें दान । त्याचे कोण उपकार ॥ धृ० ॥ नको वाढूं ऐसें काचें । दे वो साच विठ्ठला ॥ १ ॥ रडत मागें सांडी पोर । ते काय थोर माउली ॥ २ ॥ तुका ह्मणे कीर्ति वाढे । धर्म गाढे ते ऐसे ॥ ३ ॥

॥ ३११४ ॥ तुटे मायाजाळ विघडे भवसिंधू । जरि लागे छंदु हरिनामें ॥ धृ० ॥ येर कर्म धर्म करितां ये काळीं । माजी तरला बळी कोण सांगा ॥ १ ॥ न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ २ ॥ न साधवे योग न करवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ ३ ॥ नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान कृष्ण-कथा ॥ ४ ॥ तुका ह्मणे वर्म दावियेलें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥ ५ ॥

॥ ३११५ ॥ लोभावरी ठेवुनी हेत । करी असत्य न्याय नीत ॥ धृ० ॥ त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥ १ ॥ कोटिगोहत्यापातक । त्यासी घडेल निष्टंक ॥ २ ॥ मासां श्रवे जे सुंदरा । पाजी विटाळ पितरां ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसियासी । यम गांजील सायासी ॥ ४ ॥

॥ ३११६ ॥ देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल ॥ धृ० ॥ कां रे तुमजसी दगडा । कैचे हत्ती घोडे वाडा ॥ १ ॥ लोंडें बालिस्तें सुपती । जरा आलिया फजिती ॥ २ ॥ शरीरसंबंधाचें नातें । भोरड्या बुडविती सेतातें ॥ ३ ॥ अझुनि तरी होईं जागा । तुका ह्मणे पुढें दगा ॥ ४ ॥

॥ ३११७ ॥ मागें बहुतां जनां राखिलें आडणी । धांवसी निर्वाणी नाम घेतां ॥ धृ० ॥ ऐसें ठावें जालें मज बरव्या परी । ह्मणऊनि करीं धांवा तुझा ॥ १ ॥ माझेविशीं तुज पडिला विसरू । आतां काय करूं पांडुरंगा ॥ २ ॥ अझूनि कां नये तुह्मासी करुणा । दुरि नारायणा धरिलें मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव जाऊं पाहे माझा । आतां केशीराजा घालीं उडी ॥ ४ ॥

॥ ३११८ ॥ कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काज जीव ठेवूं आतां ॥ धृ० ॥ तूं काय करिसी माझिया संचिता । धिग हे अनंता जालें जिणें ॥ १ ॥ पतितपावन राहिलों या आशा । आइकोनी ठसा कीर्ति तुझी ॥ २ ॥ आतां कोण करी माझा अंगिकार । कळलें निष्ठुर जालासी तूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी मांडिली निरास । करितों जीवा नास तुजसाठीं ॥ ४ ॥

॥ ३११९ ॥ तरि कां मागें वांयां कीर्ति वाढविली । जनांत आपुली ब्रिदावळी ॥ धृ० ॥ साच करितां आतां फिरसी माघारा । ठायींचें दातारा नेणवेची ॥ १ ॥ संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी । पुढें मात त्यांसी सांगईन ॥ २ ॥ घईन डांगोरा तुझिया नामाचा । नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आधीं राहिलों मरोनी । तूं कां होसी धनी निमित्याचा ॥ ४ ॥

॥ ३१२० ॥ आह्मी तुझ्या दासीं । जरि जावें पतनासी ॥ धृ० ॥ तरि हें दिसे विपरीत । कोठें बोलिली हे नीत ॥ १ ॥ तुझें नाम कंठीं । आह्मां संसार आटी ॥ २ ॥ तुका ह्मणे काळ । करी आह्मांसी विटाळ ॥ ३ ॥

॥ ३१२१ ॥ लाजती पुराणें । वेदां येऊं पाहे उणें ॥ धृ० ॥ आह्मी नामाचे धारक । किविलवाणीं दिसों रंक ॥ १ ॥ बोलिले ते संतीं । बोल वांयांविण जाती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । रोकडी हे मोडे सेवा ॥ ३ ॥

॥ ३१२२ ॥ आहारनिद्रे न लगे आदर । आपण सादर तेचि होय ॥ धृ० ॥ परिमितीविणें बोलणें तें वांयां । फार थोडें काया पिंड पीडी ॥ १ ॥ समाधान त्याचें तोचि एक जाणें । आपूलिये खुणे पावोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे होय पीडा तें न करीं । मग राहें परी भलतिये ॥ ३ ॥

॥ ३१२३ ॥ भूमि अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥ धृ० ॥ तैसे वोसपले जीव । सांडी नसतां अंगीं घाव ॥ १ ॥ जीव अवघे देव । खोटा नागवी संदेह ॥ २ ॥ तुका ह्मणे शुद्ध । मग तुटलिया भेद ॥ ३ ॥

॥ ३१२४ ॥ सरतें माझें तुझें । तरि हें उतरतें ओझें ॥ धृ० ॥ न लगे सांडावें मांडावें । आहे शुद्धचि स्वभावें ॥ १ ॥ घातला तो आशा । मोहोजाळें गळां फासा ॥ २ ॥ सुखाचा तो मान । नाहीं दुःखाचा तो शीण ॥ ३ ॥ करितां नारायण । एवढें वेचितां वचन ॥ ४ ॥ लाभ हानि हे समान । तैसा मान अपमान ॥ ५ ॥ तुका ह्मणे याचें । नांव सोंवळें साचें ॥ ६ ॥

॥ ३१२५ ॥ तुज करितां होती ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥ धृ० ॥ परि वर्म नेणें तें कोणी । पीडाखाणी भोगितील ॥ १ ॥ उलंघितें पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥ २ ॥ पापी होय पुण्यवंत । न करी घात दुर्जन ॥ ३ ॥ अवघें हेळामात्रें हरी । मुक्त करी ब्रह्मांड ॥ ४ ॥ तुका ह्मणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापुनी ॥ ५ ॥

॥ ३१२६ ॥ पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥ धृ० ॥ पुरोनि उरे खातां

देतां । नव्हे खंडन मवितां ॥ १ ॥ खोलीं पडे ओली बीज । तरींच हाता लागे निज ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी । विठ्ठल अक्षरें या तिन्ही ॥ ३ ॥

॥ ३१२७ ॥ करिसी लाघवें । तूं हें खेळसी आघवें ॥ धृ० ॥ अहंकार आड । आह्मां जगासी हा नाड ॥ १ ॥ येथें भुतें यावें । दावूं लपों ही जाणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे हो श्रीपती । आतां चाळवाल किती ॥ ३ ॥

॥ ३१२८ ॥ घालिती पव्हया । वाटे अनाथाच्या दया ॥ धृ० ॥ तैसें कां हें नये करूं । पांडुरंगा आह्मां तारूं ॥ १ ॥ रोगियासी काढा । देऊनि वारितील पीडा ॥ २ ॥ बुडल्यासाठीं उडी । घालितील कां हे जोडी ॥ ३ ॥ सारितील कांटे । पुढें मागिलांचे वाटे ॥ ४ ॥ तुका ह्मणे भार । घेती भागल्यांचा फार ॥ ५ ॥

॥ ३१२९ ॥ नका दंतकथा येथें सांगों कोणी । कोरडे ते मानी बोल कोण ॥ धृ० ॥ अनुभव येथें व्हावा शिष्टाचार । न चलतीं चार आह्मांपुढें ॥ १ ॥ निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पाहिजे जातीचें । येरा गाबाळाचें काय काम ॥ ३ ॥

॥ ३१३० ॥ न करि त्याचें गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥ धृ० ॥ भवसिंधूचा थडवा केला । बोलाविला पाहिजे ॥ १ ॥ याचे सोई पाउल वेचे । मग कैंचे आडथळे ॥ २ ॥ तुका ह्मणे खरें खोटें । न ह्मणे मोठें लहान ॥ ३ ॥

॥ ३१३१ ॥ रिकामें तूं नको मना । राहों क्षणक्षणाही ॥ धृ० ॥ वेळोवेळां पारायण । नारायण हें करीं ॥ १ ॥ भ्रमणांच्या मोडीं वाटा । न भरें फाटा आडरानें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवें । हेंचि घ्यावें धणीवरी ॥ ३ ॥

॥ ३१३२ ॥ पंचभूतांचिये सांपडलों संदीं । घातलोंसे बंदीं अहंकारें ॥ धृ० ॥ आपल्या आपण बांधविला गळा । नेणोंचि निराळा असतां हो ॥ १ ॥ कासया हा सत्य लेखिला संसार । कां हे केले चार माझें माझें ॥ २ ॥ कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥ ३ ॥ किंचित सुखाचा धरिला अभिळास । तेणें बहु नास केला पुढें ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां देह देऊं बळी । करूनि सांडूं होळी संचिताची ॥ ५ ॥

॥ ३१३३ ॥ देव जाले अवघे जन । माझे गुण दोष हारपले ॥ धृ० ॥ बरवें जालें बरवें जालें । चित्त धालें महालाभें ॥ १ ॥ दर्पणींचें दुसरें भासे । परि तें असे एक तें ॥ २ ॥ तुका ह्मणे सिंधुभेटी । उदका तुटी वाहाळासी ॥ ३ ॥

॥ ३१३४ ॥ बहु प्रकार गव्हाचे । जिव्हा नाचे आवडी ॥ धृ० ॥ सरलें परि आवडी नवी । सिंधु दावी तरंग ॥ १ ॥ घेतलें घ्यावें वेळोवेळां । माय बाळा न विसंबे ॥ २ ॥ तुका ह्मणे रस राहिला वचनीं । तोचि पडताळूनि सेवीतसें ॥ ३ ॥

॥ ३१३५ ॥ आह्मां सोइरे हरिजन । जनीं भाग्य निकंचन ॥ धृ० ॥ ज्याच्या धैर्या नाहीं भंग । भाव एकविध रंग ॥ १ ॥ भुके तान्हे चित्तीं । सदा देव आठविती ॥ २ ॥ तुका ह्मणे धन । ज्याचें निज नारायण ॥ ३ ॥

॥ ३१३६ ॥ ह्मणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोटभरी ॥ धृ० ॥ खोटें

कोठें सरे तुझे पायांपाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ॥ १ ॥ आचरण खोटें आपणासी ठावें । लटिकें बोलावें दुसरें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधि तुह्मां ठावा ॥ ३ ॥

॥ ३१३७ ॥ जळालें तें बाह्य सोंग । अंतर व्यंग पडिलिया ॥ धृ० ॥ कारण तें अंतरलें । वाइट भलें ह्मणवितां ॥ १ ॥ तांतडीनें नासी । तांतडीनेंच संतोषी ॥ २ ॥ तुका ह्मणे धीर । नाहीं बुद्धि एक स्थिर ॥ ३ ॥

॥ ३१३८ ॥ चित्ताचे बांधलें जवळी तें वसे । प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥ धृ० ॥ अंतरीं वसावी उत्तम ते भेटी । होऊं कांहीं तुटी न सकेची ॥ १ ॥ ब्रह्मांड कवळे आठवणेसाठीं । धरावा तो पोटीं वाव बरा ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभ घरिचिया घरीं । प्रेमतंतु दोरी न तुटतां ॥ ३ ॥

॥ ३१३९ ॥ दुखवलें चित्त आजिच्या प्रसंगें । बहु पीडा जगें केली देवा ॥ धृ० ॥ कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठवूनि मनें पाय असें ॥ १ ॥ आणिकांची येती अंतरा अंतरें । सुखदुःख बरेंवाइट तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ॥ ३ ॥

॥ ३१४० ॥ धनवंत एक बहिर अंधळे । शुभ्र कुष्ठ काळे भोग अंगीं ॥ धृ० ॥ प्रारब्धाची गति न कळे विचित्र । आहे हातीं सूत्र विठोबाचे ॥ १ ॥ आणिक रोगांचीं नांवें घेऊं किती । अखंड असती जडोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे नष्ट संचिताचें दान । पात्रें खातां पण सुख नेदी ॥ ३ ॥

॥ ३१४१ ॥ भेदाभेदताळा न घडे घालितां । आठवा रे आतां नारायण ॥ धृ० ॥ येणें एक केलें अवघें होय सांग । अच्युताच्या योगें नामें छंदें ॥ १ ॥ भोंवरे खळाळ चोर वाटा घेती । पावलें मारिती सिवेपाशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें भावेंविण पार । न पविजे सार हेंचि आहे ॥ ३ ॥

॥ ३१४२ ॥ जे गाती अखंड विठ्ठलाचें गीत । त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी ॥ धृ० ॥ जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम । ते माझे परम प्राणसखे ॥ १ ॥ जयांसी विठ्ठल आवडे लोचनीं । त्यांचें पायवणी स्वीकारीन ॥ २ ॥ विठ्ठलासी जिहीं दिला सर्व भाव । त्यांच्या पायीं ठाव मागईन ॥ ३ ॥ तुका ह्मणे रज होईन चरणींचा । ह्मणविती त्यांचा हरिचे दास ॥ ४ ॥

॥ ३१४३ ॥ काय तो विवाद असो भेदाभेद । साधा परमानंद एका भावें ॥ धृ० ॥ निघोनि आयुष्य जातें हातोहात । विचारीं पां हित लवलाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे भावभक्ति हे कारण । नागवी भूषण दंभ तोची ॥ ३ ॥

॥ ३१४४ ॥ देवकीनंदनें । केलें आपुल्या चिंतनें ॥ धृ० ॥ मज आपुलिया ऐसें । मना लावूनियां पिसें ॥ १ ॥ गोवळे गोपाळां । केलें लावूनियां चाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे संग । केला दुरि नव्हे मग ॥ ३ ॥

॥ ३१४५ ॥ माझिया जीवासी हेचि पैं विश्रांती । तुझे पाय चित्तीं पांडुरंगा ॥ धृ० ॥

भांडवल गांठी आलें सपुरतें । समाधान चित्तें मानियेलें ॥ १ ॥ उदंड उच्चारें घातला पसरू । रूपावरी भरु आवडीचा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज भक्तीची आवडी । अभेदीं तांतडी नाहीं म्हूण ॥ ३ ॥

॥ ३१४६ ॥ एकविध आह्मी न धरूं पालट । न संडूं ते वाट सांपडली ॥ धृ० ॥ ह्मणवूनि केला पाहिजे सांभाळ । माझें बुद्धिबळ पाय तुझे ॥ १ ॥ बहुत न कळे बोलतां प्रकार । अंतरा अंतर साक्ष असे ॥ २ ॥ तुका ह्मणे आगा जीवींच्या जीवना । तूंचि नारायणा साक्षी माझा ॥ ३ ॥

॥ ३१४७ ॥ राहो येचि ठायीं । माझा भाव तुझे पायीं ॥ धृ० ॥ करीन नामाचें चिंतन । जाऊं नेदीं कोठें मन ॥ १ ॥ देईन ये रसीं । आतां बुडी सर्वविशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । साटी करोनियां जीवा ॥ ३ ॥

॥ ३१४८ ॥ तैसे नव्हों आह्मी विठ्ठलाचे दास । यावें आणिकांस काकुलती ॥ धृ० ॥ स्वामिचिया सत्ता डेंगणें सकळ । आला कळिकाळ हाताखालीं ॥ १ ॥ अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥ ३ ॥

॥ ३१४९ ॥ मोक्ष देवापाशीं नाहीं । लटिक्या घाई विळवतें ॥ धृ० ॥ काय खरें न धरी शुद्धी । गेली बुद्धि भ्रमलें ॥ १ ॥ अहंकारास उरलें काई । पांचाठायीं हें वांटे ॥ २ ॥ तुका ह्मणे कुंथे भारें । लटिकें खरें मानुनियां ॥ ३ ॥

॥ ३१५० ॥ आपला तो एक देव करूनि घ्यावा । तेणेंविण जीवा सुख नव्हे ॥ धृ० ॥ येर तीं माइकें दुःखाचीं जनितीं । नाहीं आदिअंतीं अवसान ॥ १ ॥ अविनाश करी आपुलिया ऐसें । लावीं मना पिसें गोविंदाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे एका मरणेंचि सरें । उत्तमचि उरे कीर्ति मागें ॥ ३ ॥

॥ ३१५१ ॥ आजिचें हें मज तुह्मीं कृपादान । दिलें संतजन मायबापीं ॥ धृ० ॥ आलीं मुखावाटा अमृतवचनें । उत्तीर्ण तीं येणें नव्हे जन्में ॥ १ ॥ तुका ह्मणे तुह्मी उदार कृपाळ । शृंगारिलें बाळ कवतुकें ॥ २ ॥

॥ ३१५२ ॥ स्तुति अथवा निंदा करावी देवाची । अधम तो वेची व्यर्थ वाणी ॥ धृ० ॥ आइकोनि होती बहिर हे बोल । वेचूनि ते मोल नरका जाती ॥ १ ॥ इह लोकीं थुंका उडे तोंडावरी । करणें अघोरीं वास लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे माप वाचेऐसें निकें । भरलें नरकें निंदेसाठीं ॥ ३ ॥

॥ ३१५३ ॥ लोह कफ गारा सिद्ध हे सामुग्री । अग्नि दणल्कारी दिसों येतो ॥ धृ० ॥ सांगावें तें काई सांगावें तें काई । चित्ता होय ठायीं अनुभव तो ॥ १ ॥ अन्नें सांगों येतो तृप्तीचा अनुभव । करूनि उपाव घेऊं देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे मिळे जीवनीं जीवन । तेथें कोणा कोण नांव ठेवी ॥ ३ ॥

॥ ३१५४ ॥ बाळाचें जीवन । माता जाणें भूक तान ॥ धृ० ॥ काय करूं विनवणी । असो मस्तक चरणीं ॥ १ ॥ ठेविलिये ठायीं । चित्त ठेवूनि असें पायीं ॥ २ ॥ करितों हे

सेवा । चिंतन सर्वां ठायीं देवा ॥ ३ ॥ न्यून तेंचि पुरें । घ्यावें करोनि शतारें ॥ ४ ॥ तुका ह्मणे बुद्धी । अल्प असे अपराधी ॥ ५ ॥

॥ ३१९५ ॥ जाणतों समये । परि मत कामा नये ॥ धृ० ॥ तुह्मी सांगावें तें बरें देवा सकळ विचारें ॥ १ ॥ फुकाचिये पुसी । चिंता नाहीं होते ऐसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे । धर पाय मज साहे ॥ ३ ॥

॥ ३१९६ ॥ द्वारपाळ विनंति करी । उभे द्वारीं राउळा ॥ धृ० ॥ आपुलिया शरणागता । वाहों चिंता नेदावी ॥ १ ॥ वचना या चित्त द्यावें । असों ठावें पायांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपासिंधू । दीनबंधु केशवा ॥ ३ ॥

॥ ३१९७ ॥ दोहीं बाहीं आह्मां वास । असों कास घालुनी ॥ धृ० ॥ बोल बोलों उभयतां । स्वामीसत्ता सेवेची ॥ १ ॥ एकसरें आज्ञा केली । असों चाली ते नीती ॥ २ ॥ तुका ह्मणे जोहारितों । आहें होतों ते ठायीं ॥ ३ ॥

॥ ३१९८ ॥ ऐका जी देवा माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ धृ० ॥ सन्निध पातलों सांडूनियां शंका । सन्मुखचि एकाएकीं पुढें ॥ १ ॥ जाणविलें कोठें पावे पायांपाशीं । केली या जिवासी साटी ह्मूण ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे हातीं द्या उद्धार । करीं करकर ह्मणवुनी ॥ ३ ॥

॥ ३१९९ ॥ बैसलों तों कडियेवरी । नव्हें दुरी वेगळा ॥ धृ० ॥ घडलें हें बहुवा दिसां । आतां इच्छा पुरवीन ॥ १ ॥ बहु होता जाला सीण । नाहीं क्षण विसांवा ॥ २ ॥ दुःखी केलें मीतूंपणें । जवळी नेणें होतें तें ॥ ३ ॥ पाहात जे होतों वास । तेचि आस पुरविली ॥ ४ ॥ तुका ह्मणे मायबापा । झणी कोपा विठ्ठला ॥ ५ ॥

॥ ३१६० ॥ तुझें नाम मुखीं तयासी विपत्ती । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ॥ धृ० ॥ काय जाणों काय होसील निजला । नेणों जी विठ्ठला मायबापा ॥ १ ॥ भवबंधनाचे तुटतील फांसे । तें कां येथें असे अव्हेरिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें दचकलें मन । वाटे वांयांविण श्रम केला ॥ ३ ॥

॥ ३१६१ ॥ सेवकें करावें सांगितलें काम । सिक्याचा तो धर्म स्वामी राखे ॥ धृ० ॥ काय देवा नेणों आलें गांढेपण । तुह्मी शक्तिहीन जाले दिसां ॥ १ ॥ विष्णुदास आह्मी निर्भर ज्या बळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे मूळ पाठवा लौकरी । किंवा करूं हरी काय सांगा ॥ ३ ॥

॥ ३१६२ ॥ खेळतां न भ्यावें समर्थाच्या बाळें । तयाच्या सकळ सत्तेखालीं ॥ धृ० ॥ तरी लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानाविण ॥ १ ॥ अवघीच दिशा असावी मोकळी । मायबाप बळी ह्मणउनी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें ऐसें आहे देवा । ह्मणऊनि सेवा समर्पिली ॥ ३ ॥

॥ ३१६३ ॥ निरंजनीं एकटवाणें । संग नेणें दुसरा ॥ धृ० ॥ पाहा चाळविलें कैसें । लावूनि पिसें गोवळें ॥ १ ॥ लपलें अंगें अंग । दिला संग होता तो ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हतें ठावें । जालें भावें वाटोळें ॥ ३ ॥

॥ ३१६४ ॥ नव्हती भेटी तोंचि बरें । होतां चोरें नाडिलें ॥ धृ० ॥ अवघियांचा केला झाडा । रिता वाडा खोंकर ॥ १ ॥ चिंतनाचें मूळ चित्त । नेलें वित्त हरूनी ॥ २ ॥ तुका ह्मणे मूळा आलें । होतें केलें तैसेंची ॥ ३ ॥

॥ ३१६५ ॥ जये ठायीं आवडी ठेली । मज ते बोली न संडे ॥ धृ० ॥ पुरवावें जीवींचें कोड । भेटी गोड तुज मज ॥ १ ॥ आणिलें तें येथवरी । रूप दुरी न करावें ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणा । सेवाहीना धिग वृत्ती ॥ ३ ॥

॥ ३१६६ ॥ सरलियाचा सोस मनीं । लाजोनियां राहिलों ॥ धृ० ॥ आवडीनें बोलावितों । येथें तें तों लपावें ॥ १ ॥ माझें तेंचि मज द्यावें । होतें भावें जोडिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरा । आळीकरा बुझावा ॥ ३ ॥

॥ ३१६७ ॥ नाचावेंसें वाटे मना । छंद गुणा अधीन ॥ धृ० ॥ चेष्टविलीं माझीं गात्रें । सत्तासूत्रें हालती ॥ १ ॥ नामरूपें रंगा आलीं । तेचि चाली स्वभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगें । अंग संगें कवळिलें ॥ ३ ॥

॥ ३१६८ ॥ खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें । नव्हती हीं छंदें नासिवंतें ॥ धृ० ॥ माझा मायबाप उभा विटेवरी । कवतुकें करी कृपादान ॥ १ ॥ प्रसादाची वाणी वेद तीं उत्तरें । नाहीं मतांतरें जोडियेलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे रस वाढितिया अंगें । छाया पांडुरंगें केली वरी ॥ ३ ॥

॥ ३१६९ ॥ अखंड मुडतर । सासुरवास करकर ॥ धृ० ॥ याची जाली बोळवण । आतां न देखों तो शीण ॥ १ ॥ बहुतांची दासी । तये घरीं सासुरवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मुळें । खंड जाला एका वेळें ॥ ३ ॥

॥ ३१७० ॥ अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥ धृ० ॥ कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥ १ ॥ चुकलोंसा दिसें पंथ । गेले संत तो ऐसा ॥ २ ॥ तुका ह्मणे सोंग वांयां । कारण या अनुभवें ॥ ३ ॥

॥ ३१७१ ॥ आतां तुह्मी कृपावंत । साधु संत जिवलग ॥ धृ० ॥ गोमटें तें करा माझें । भार ओझें तुह्मांसी ॥ १ ॥ वंचिलें तें पायांपाशीं । नाहीं यासी वेगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥ ३ ॥

॥ ३१७२ ॥ सुख वाटे परी वर्म । धर्माधर्म न कळे ॥ धृ० ॥ गायें नाचें एवढें जाणें । विठ्ठल ह्मणे निर्लज्ज ॥ १ ॥ आवघें माझें एवढें धन । साधनही सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पायां पडें । तुमच्या कोडें संतांच्या ॥ ३ ॥

॥ ३१७३ ॥ धरिलीं जीं होतीं चित्तीं । डोळां तींच दिसती ॥ धृ० ॥ आलें आवडीस फळ । जालें कारण सकळ ॥ १ ॥ घेईन भातुकें । मागोनियां कवतुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे लाड । विठोबा पुरवील कोड ॥ ३ ॥

॥ ३१७४ ॥ बहुतां दिसांची आजि जाली भेटी । जाली होती तुटी काळगती ॥ धृ० ॥ येथें सावकाश घेईन ते धणी । गेली अडचणी उगवोनी ॥ १ ॥ बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ॥ २ ॥ बहु दिस होता पडिला मारग ।

क्लेशाचा त्या त्याग आजि जाला ॥ ३ ॥ बहु होती केली सोंगसंपादणी । लौकिकापासूनि निर्गमलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे येथें जालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥ ५ ॥

॥ ३१७५ ॥ पुत्र जाला चोर । मायबापा हर्ष थोर ॥ धृ० ॥ आतां काशासाठीं जोडी । हाट धाटे गुंडगे घडी ॥ १ ॥ ऐते अपाहार । आणूनियां भरी घर ॥ २ ॥ मानिली निश्चिंती । नरका जावया उभयतीं ॥ ३ ॥ झोडाझोडगीचे पोटीं । फळें बीजें तीं करंटीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे बेऱ्या । भांडवल न लगे खऱ्या ॥ ५ ॥

॥ ३१७६ ॥ एवढी अपकीर्ती । ऐकोनियां फजिती ॥ धृ० ॥ जरि दाविल वदन । थुंका थुंका तो देखोन ॥ १ ॥ काळिमेचें जिणें । जीऊनियां राहे सुनें ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण । दरुषणें अपशकुन ॥ ३ ॥

॥ ३१७७ ॥ पुंडलिक भक्तराज । तेणें साधियेलें काज । वैकुंठींचें निज । परब्रह्म आणिलें ॥ धृ० ॥ पांडुरंग बाळमूर्ती । गाईगोपाळां संगती । येऊनियां प्रीती । उभें समचि राहिलें ॥ १ ॥ एका आगळें अक्षरें । भूवैकुंठचि दुसरें । ह्मणविती येरें । परि तीं ऐसीं नव्हेती ॥ २ ॥ पाप पंचक्रोशीमधीं । येऊं न सकेचि कधीं । कैंची तेथें विधि- । निषेधाची वसती ॥ ३ ॥ पुराणें वदती ऐसें । चतुर्भुज तीं मानसें । सुदर्शनावरी वसे । रीग न घडे कल्पांतीं ॥ ४ ॥ महाक्षेत्र हें पंढरी । अनुपम्य इची थोरी । धन्य धन्य वारकरी । तुका ह्मणे तेथींचे ॥ ५ ॥

॥ ३१७८ ॥ देह मृत्याचें भातुकें । कळों आलें कवतुकें ॥ धृ० ॥ काय मानियेलें सार । हेंचि वाटतें आश्चर्य ॥ १ ॥ नानाभोगांचीं संचितें । करूनि ठेविलें आइतें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोर्डी । उगवूं न सकती बापुडीं ॥ ३ ॥

॥ ३१७९ ॥ त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥ धृ० ॥ आतां असो तुझे पायीं हें मोटळें । इंद्रियें सकळें काया मन ॥ १ ॥ सांडीमांडी विधिनिषेधाचा ठाव । न कळतां भाव जाइल वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥ ३ ॥

॥ ३१८० ॥ दावूनियां बंड । पुरे न करी तें भांड ॥ धृ० ॥ जळो जळो तैसें जिणें । फटमरे लाजिरवाणें ॥ १ ॥ घेतलें तें सोंग । बरवें संपादावें सांग ॥ २ ॥ तुका ह्मणे धीरें । देव नुपेक्षील खरें ॥ ३ ॥

॥ ३१८१ ॥ न पालटे जाती जीवाचिये साटीं । बाहे तेंचि पोटीं दावी वरी ॥ धृ० ॥ अंतरीं सबाहीं सारिखाचि रंग । वीट आणि भंग नाहीं रसा ॥ १ ॥ घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणें धीरा आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे कढे करावी शीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ॥ ३ ॥

॥ ३१८२ ॥ दिली मान तरी नेघावी शत्रूची । शरण आलें त्यासी जतन जीवें ॥ धृ० ॥ समर्थासी असे विचाराची आण । भलीं पापपुण्य विचारावें ॥ १ ॥ काकुलतीसाठीं सत्याचा विसर । पडिलें अंतर न पाहिजे ॥ २ ॥ तुका ह्मणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥ ३ ॥

॥ ३१८३ ॥ विचारिलें आधीं आपुल्या मानसीं । वांचों येथें कैसीं कोण्या द्वारें ॥ धृ० ॥ तंव जाला साह्य हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी नास नाहीं ॥ १ ॥ उद्वेगाचे होतों पडिलों समुद्रीं । कोणे रीति तरी पाविजेल ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःखें आला आयु-र्भाव । जाला बहु जीव कासावीस ॥ ३ ॥

॥ ३१८४ ॥ आपुलें वेचूनि खोडा घाली पाव । ऐसे जया भाव हीनबुद्धि ते ॥ धृ० ॥ विषयांच्या संगें आयुष्याचा नास । पडियेलें ओस स्वहिताचें ॥ १ ॥ भुलल्याचें अंग आपणा पारिखें । छंदाच सारिखें वर्ततसे ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःख उमटे परिणामीं । लंपटासी कामीं रतलिया ॥ ३ ॥

॥ ३१८५ ॥ केलें शकुनें प्रयाण । आतां मागें फिरे कोण ॥ धृ० ॥ होय तैसें होय आतां । देह बळी काय चिंता ॥ १ ॥ पडिलें पालवीं । त्याचा धाक वाहे जीवीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जीणें । देवा काय हीनपणें ॥ ३ ॥

॥ ३१८६ ॥ आळणी ऐसें कळों आलें । त्यासी भलें मौनची ॥ धृ० ॥ नये कांहीं वेचूं वाणी । वेडे घाणीसांगातें ॥ १ ॥ वेगळें तें देहभावा । भ्रम जीवा माजिरा ॥ २ ॥ तुका ह्मणे कवतुक केलें । किंवा भलें दवडितां ॥ ३ ॥

॥ ३१८७ ॥ चित्ताचा चाळक । त्याचें उभय सूत्र एक ॥ धृ० ॥ नाचवितें नानाछंदें । सुखें आपुल्या विनोदें ॥ १ ॥ चंद्र कमळणी । नाहीं धाडीत सांगोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे उठी । लोह चुंबकाचे दृष्टी ॥ ३ ॥

॥ ३१८८ ॥ करितां तडातोडी । वत्सा माते सोई ओढी ॥ धृ० ॥ करित्याचा आग्रह उरे । एक एकासाठीं झुरे ॥ १ ॥ भुके इच्छी अन्न । तेंहि त्यासाठीं निर्माण ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती । एक एकाचिये चित्तीं ॥ ३ ॥

॥ ३१८९ ॥ निघालें दिवाळें । जालें देवाचें वाटोळें ॥ धृ० ॥ आतां वेचूं नये वाणी । विचारावें मनींच्या मनीं ॥ १ ॥ गुंडाळिलीं पोतीं । भीतरी लावियेली वाती ॥ २ ॥ तुका ह्मणे करा । ऐसा राहे माजी घरा ॥ ३ ॥

॥ ३१९० ॥ तीर्थाचिये पंथें चाले तो निदैव । पाविजेतो ठाव अंतराय ॥ धृ० ॥ ह्मणऊनि भलें निश्चळचि स्थळीं । मनाचिये मुळीं बैसोनियां ॥ १ ॥ संकल्पारूढ तें प्रारब्धेंचि जिणें । कार्यचि कारणें वाढतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे कामा नाहीं एक मुख । जिरवितां सुख होतें पोटीं ॥ ३ ॥

॥ ३१९१ ॥ क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधू ॥ धृ० ॥ नाशिवंत देह जाणार सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥ १ ॥ संतसमागमीं धरूनि आवडी । करावी तांतडी परमार्थीं ॥ २ ॥ तुका ह्मणे यहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरूनि राहों ॥ ३ ॥

॥ ३१९२ ॥ कोणाशीं विचार करावा सेवटीं । एवढ्या लाभें तुटी जाल्या तरे ॥ धृ० ॥ सांभाळितो शूर आला घावडाव । पुढें दिला पाव न करी मागें ॥ १ ॥ घात तो या नांवें

येथें अंतराय । अंतरल्या पाय गोविंदाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे गडसंदीचा हा ठाव । केला तो उपाव कार्या येतो ॥ ३ ॥

॥ ३१९३ ॥ असा जी सोंवळे । आह्मां तैसेचि निराळे ॥ धृ० ॥ आह्मीं नयों तुमच्या वाटा । काय लटिकाचि ताठा ॥ १ ॥ चिंतनचि पुरे । काय सलगी सवें धुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । नका नावडे ते सेवा ॥ ३ ॥

॥ ३१९४ ॥ अहंकार तो नासा भेद । जगीं निंद्य ओंवळा धृ० ॥ नातळे तो धन्य यासी । जाला वंशीं दीपक ॥ १ ॥ करवितो आत्महत्या । नेदी सत्या आतळों ॥ २ ॥ तुका ह्मणे गुरुगुरी । माथां थोरी धरोनी ॥ ३ ॥

॥ ३१९५ ॥ इच्छिलें ते शकुनवंती । होय देती तात्काळ ॥ धृ० ॥ क्षीरा नीरा निवाड करी । बराबरी विठ्ठल ॥ १ ॥ भाग्याविण कैचें फळ । अंतर मळमूत्राचें ॥ २ ॥ तुका ह्मणे संचित कुडें । तें बापुडें करीतसे ॥ ३ ॥

॥ ३१९६ ॥ काशासाठीं आह्मी जाळिला संसार । न करा विचार ऐसा देवा ॥ धृ० ॥ कैसें नेणों तुह्मां करवतें उदास । माझा प्रेमरस भंगावया ॥ १ ॥ समर्पूनि ठेलों देह हा सकळ । धरितां विटाळ न लजा माझा ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघी मोकलूनि आस । फिरतों उदास कोणासाठीं ॥ ३ ॥

॥ ३१९७ ॥ नाहीं तुह्मां कांहीं लाविलें मागणें । कांटाळयाच्या भेणें त्रासलेती ॥ धृ० ॥ एखादिये परी टाळावी करकर । हा नका विचार देखों कांहीं ॥ १ ॥ पायांच्या वियोगें प्राणासवसाटी । नेघेवेसी तुटी जाली आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां मागणें तें आतां । हेंचि कृपावंता चरणीं वास ॥ ३ ॥

॥ ३१९८ ॥ जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥ धृ० ॥ धर्म भूतांची ते दया । सत्य कारण ऐसीया ॥ १ ॥ नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगें संत ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें । दावी उमटूनि अनुभवें ॥ ३ ॥

॥ ३१९९ ॥ दंड अन्यायाच्या माथां । देखोनि करावा सर्वथा ॥ धृ० ॥ नये उगें बहुतां घाटूं । सिसें सोनियांत आटूं ॥ १ ॥ पापपुण्यासाठीं । नीत केली सत्ता खोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । दोष कोणाचा तो दावा ॥ ३ ॥

॥ ३२०० ॥ आह्मी पापी तूं पावन । हें तों पूर्वापार जाण ॥ धृ० ॥ नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें तेणें ॥ १ ॥ राखावा तो ठाव । मिरासी करोनि उपाव ॥ २ ॥ वादें मारी हाका । देवा आइकवी तुका ॥ ३ ॥

॥ ३२०१ ॥ पाडावी ते बरी । गांठी धुरेसवें खरी ॥ धृ० ॥ नये मरों लंडीपणें । काय बापुडें तें जिणें ॥ १ ॥ लुटावें भांडार । तरी जया नाहीं पार ॥ २ ॥ तुका ह्मणे नांवें । कीर्ति आगळीनें ज्यावें ॥ ३ ॥

॥ ३२०२ ॥ भजनेंचि जालें । मग जीवाचें काय आलें ॥ धृ० ॥ येऊं नेदावी पुढती । आड भयाची ते जाती ॥ १ ॥ करितां सरोबरी । कांहीं न ठेवावी उरी ॥ २ ॥ तुका ह्मणे शूर । व्हावें धुरेसींच धुर ॥ ३ ॥

॥ ३२०३ ॥ जन्मांतरीं शुद्ध नाहीं आचरण । यालागीं चरण अंतरले ॥ धृ० ॥ वोडवलें संचित येणें जन्में पाहतां । आतां पंढरिनाथा कृपा करीं ॥ १ ॥ पतितपावन ब्रिद साच करीं देवा । यालागीं कुढावा करीं माझा ॥ २ ॥ अपराधी पातकी दुष्ट दुराचारी । आहाळलों भारी संवसारें ॥ ३ ॥ कामक्रोध आदि कल्पनेच्या त्रासें । तुज न पवें ऐसें जालें देवा ॥ ४ ॥ हा ना तोसा ठाव जाला पांडुरंगा । नयेचि उपेगा काय करूं ॥ ५ ॥ आपुलिया नांवा धांवणिया धांवें । लवकरी यावें तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ३२०४ ॥ प्रथमभेटी आळिंगण । मग चरण वंदावे ॥ धृ० ॥ ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कवळोनी ॥ १ ॥ न सांगतां सीण भाग । पांडुरंग जाणतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंतें । द्यावें भातें न मागतां ॥ ३ ॥

॥ ३२०५ ॥ वचनाचा अनुभव हातीं । बोलविती देव मज ॥ धृ० ॥ परि हें न कळे अभाविकां । जडलोकां जिवांसी ॥ १ ॥ अश्रुत हे प्रसादिक । कृपा भीक स्वामीची ॥ २ ॥ तुका ह्मणे वरावरी । जातों तरी सांगत ॥ ३ ॥

॥ ३२०६ ॥ कांरे तुह्मीं ठेवा बहुतां निमित्तें । माझिया संचितें वोडवलें ॥ धृ० ॥ भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ॥ १ ॥ पुसिलें पडळ तिमिर विठ्ठलें । जगचि भरलें ब्रह्मानंदें ॥ २ ॥ तुका ह्मणे केलों कामनेवेगळा । आवडी गोपाळावरी वसे ॥ ३ ॥

॥ ३२०७ ॥ आसन शयन भोजन गोविंदें । भरलें आनंदें त्रिभुवन ॥ धृ० ॥ अवघियां केली काळें तडातोडी । अवसर घडी पुरों नये ॥ १ ॥ वांटणी घातले शरीराचे भाग । दुजियाचा लाग खंडियेला ॥ २ ॥ आवडीच्या आलें आहारासी रूप । पृथक संकल्प मावळले ॥ ३ ॥ काम तरी क्रोध बुद्धि मन नासे । भ्रमाचे वोळसे गिळिले शांती ॥ ४ ॥ तुका ह्मणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकविध ॥ ५ ॥

॥ ३२०८ ॥ ज्वरल्यासी काढा औषध पाचन । मूढां नारायण स्मरवितों ॥ धृ० ॥ भवव्याधि येणें तुटेल रोकडी । करूनियां झाडी निश्चयेसी ॥ १ ॥ आणिकां उपायां अनुपान कठिण । भाग्यें बरें सीण शीघ्रवत ॥ २ ॥ तुका ह्मणे केला उघडा पसारा । भाग्य आलें घरा दारावरी ॥ ३ ॥

॥ ३२०९ ॥ जपाचें निमित्त झोपेचा पसरू । देहाचा विसरू पाडूनियां ॥ धृ० ॥ ऐसीं तीं भजनें अमंगळवाणीं । सोंगसंपादणी बहुरूप्याची ॥ १ ॥ सेवेसी विकिलें लोभाचिये आसे । तया कोठें असे उरला देव ॥ २ ॥ तुका ह्मणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजिती करूं आह्मी ॥ ३ ॥

॥ ३२१० ॥ परद्रव्य परकांता । नातळे जयाचिया चित्ता । आणि कर्मीं तो तत्त्वता । बांधला न वजाय ॥ धृ० ॥ ऐसा अनुभव रोकडा । विश्वासीतो जीवा जोडा । एकांत त्या पुढां । अवघा करी उकल ॥ १ ॥ सकट आंवलें तें अन्न । शोधीं तेंचि मद्यपान । विषमानें भिन्न । केलें शुद्धाशुद्ध ॥ २ ॥ तुका ह्मणे नित । बरवें अनुभवें उचित । तरी काय हित । मोलें घ्यावें लागतें ॥ ३ ॥

॥ ३२११ ॥ भूक पोटापुरती । तृष्णा भरवी वाखती । करवी फजिती । हांवें भार वाढला ॥ धृ० ॥ कुळिकेसी लांस फांस । डोई दाढी बोडवी दोष । अविहितनाश । करवी वजन चुकतां ॥ १ ॥ विधिसेवनें विहितें । कार्यकारणापुरतें । न बाटे जो चित्तें । अधर्माच्या तो त्यागी ॥ २ ॥ आज्ञापालणें ते सेवा । भय धरोनियां जीवा । तुका ह्मणे ठेवा । ठेविला तो जतन ॥ ३ ॥

॥ ३२१२ ॥ कळे न कळे त्या धर्म । ऐका सांगतों रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अट्टाहासें उच्चारा ॥ धृ० ॥ तो या दाखवील वाटा । तया पाहिजे त्या नीटा । कृपावंत मोठा । पाहिजे तो कळवळा ॥ १ ॥ पुसतां चुका होतो वाटा । सवें बोळावा गोमटा । मोडों नेदी कांटा । घेऊं सांटा चोरासी ॥ २ ॥ तुका ह्मणे मोल । न लगे द्यावें वेचावे बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मनासी ॥ ३ ॥

॥ ३२१३ ॥ तरी कां वोळगणे । राजद्वारीं होती सुने ॥ धृ० ॥ अंगीं दावूनि निष्कामता । पोकळ पोकळी ते वृथा ॥ १ ॥ कासया मोकळ । भोंवतें शिष्यांचें गाबाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे ढाळे । बाहेर गुरें तें निराळें ॥ ३ ॥

॥ ३२१४ ॥ हरिच्या दासां सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ॥ धृ० ॥ कडिये देव बाहेर खांदी । वैष्णव मांदी क्रीडेसी ॥ १ ॥ सरती येणें आटाआटी । नाहीं तुटी लाभाची ॥ २ ॥ तुका ह्मणे समाधान । सदा मन आमुचें ॥ ३ ॥

॥ ३२१५ ॥ भूतांचिये नांदे जीवीं । गोसावीच सकळां ॥ धृ० ॥ क्षणक्षणां जागा ठायीं । दृढ पायीं विश्वास ॥ १ ॥ दावूनियां सोंग दुजें । अंतर बीजें वसतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणें धर्म । धरी तें वर्म चिंतन ॥ ३ ॥

॥ ३२१६ ॥ संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥ धृ० ॥ कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ॥ १ ॥ काया कुरवंडी । करुन ओंवाळून सांडी ॥ २ ॥ तुका ह्मणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥ ३ ॥

॥ ३२१७ ॥ भेद तुटलियावरी । आह्मी तुमचींच हो हरी ॥ धृ० ॥ आतां पाळावे पाळावे । आह्मां लडिवाळांचे लळे ॥ १ ॥ आणिकांची देवा । नाहीं जाणतचि सेवा ॥ २ ॥ तुका ह्मणे हेवा । माझा हेत पायीं देवा ॥ ३ ॥

॥ ३२१८ ॥ आमुची विश्रांती । तुमचे चरण कमळापती ॥ धृ० ॥ पुढती पुढती नमन । घालूनियां लोटांगण ॥ १ ॥ हेंचि एक जाणें । काया वाचा आणि मनें ॥ २ ॥ नीच जनालोकां । तळिले पायरीस तुका ॥ २ ॥

॥ ३२१९ ॥ विनवितों सेवटीं । आहे तैसें माझे पोटीं ॥ धृ० ॥ कंठीं राहावें राहावें । हेंचि मागतसें भावें ॥ १ ॥ पुरली वासना । येणें होईल नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे जो देहाडा । तोचि वर्णीन पवाडा ॥ ३ ॥

॥ ३२२० ॥ आवडीची सलगी पूजा । विषम दुजा भाव तो ॥ धृ० ॥ ऐसीं उफराटीं वर्मे । कळों भ्रमें न येती ॥ १ ॥ न लगे समाधान मोल । रुचती बोल प्रीतीचे ॥ २ ॥ तुका ह्मणे एका जीवें । सूत्र व्हावें गुंतलें ॥ ३ ॥

॥ ३२२१ ॥ बाळ माते लाते वरी । मारी तेणें संतोषे ॥ धृ० ॥ सुख वसे चित्ता अंगीं । तें हें रंगीं मिळालें ॥ १ ॥ भक्षी त्याचा जीवभाग । आला भाग तो बरा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऋणानुबंधें । सांगे सुदें सकाळां ॥ ३ ॥

॥ ३२२२ ॥ शिजल्यावरी जाळ । वांयां जायाचें तें मूळ ॥ धृ० ॥ ऐसा वारावा तो श्रम । अतिशयीं नाहीं काम ॥ १ ॥ सांभाळावें वर्म । उचिताच्या काळें धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । ऐसें कारणाचे वेळे ॥ ३ ॥

॥ ३२२३ ॥ उभा ऐल थडी । तेणें घालूं नये उडी ॥ धृ० ॥ पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥ १ ॥ दिसतें आहारीं । नये जाऊं ऐशावरी ॥ २ ॥ अळसाची धाडी । तुका ह्मणे बहु नाडी ॥ ३ ॥

॥ ३२२४ ॥ शक्ति द्याव्या देवा । नाहीं पार्थिवांची सेवा ॥ धृ० ॥ मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ १ ॥ मना पोटीं देव । जाणें जैसा तैसा भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे सोसें । लागे लाविल्याचें पिसें ॥ ३ ॥

॥ ३२२५ ॥ कार्यचि कारण । तृष्णा पावविते सीण ॥ धृ० ॥ काय करूनि ऐसा संग । सोसेंचि तूं पांडुरंग ॥ १ ॥ रूपीं नाहीं गोडी । हांवें हांवें ऊर फोडी ॥ २ ॥ तुका ह्मणे पडे भरी । ऐशा वरदळाचे थोरी ॥ ३ ॥

॥ ३२२६ ॥ संसाराच्या नांवें घालूनियां शून्य । वाढता हा पुण्य केला धर्म ॥ धृ० ॥ हरिभजनें हें धवळिलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥ १ ॥ कोणांही नलगे साधनांचा पांग । करणें केला त्याग देहबुद्धी ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख समाधि हरिकथा । नेणें भवव्यथा गाईल तो ॥ ३ ॥

॥ ३२२७ ॥ विश्वासिया नाहीं लागत सायास । रंग अनायासें अंगा येतो ॥ धृ० ॥ लेंकराच्या हातें घास मागे माता । वोरसोनि चित्ता सुख पावे ॥ १ ॥ गौरव त्या मानी आरुषा वचनीं । भूषण ते वाणी मिरवावी ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे सकळही साक्षी । माझा कईं पक्षी पांडुरंग ॥ ३ ॥

॥ ३२२८ ॥ वैभवाचे धणी सकळां शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिलें तें ॥ धृ० ॥ नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायाठाव ॥ १ ॥ जाणोनि नेणोनि अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणच ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें धाकट्याचें जिणें । माता स्तनपानें वाढविते ॥ ३ ॥

॥ ३२२९ ॥ कईं ऐसी दशा येइल माझ्या आंगा । चित्त पांडुरंगा झुरतसे ॥ धृ० ॥ नाठवूनि देह पायांचें चिंतन । अवसान तें क्षण नाहीं मधीं ॥ १ ॥ काय ऐसा पात्र होईन लाभासी । नेणों हृषीकेशी तुष्टईल ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य मानीन संचित । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥ ३ ॥

॥ ३२३० ॥ नाहीं वागवीत जाणिवेचें ओझें । स्वामिसेवा काज निर्धारु हा ॥ धृ० ॥ आज्ञा ते प्रमाण हा मनीं निर्धार । येणें फिटे भार निश्चयेसी ॥ १ ॥ आळीकरें आह्मी

एकविध चित्तें । तैसें होऊं येतें मायबापें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी ये जातीची सेवा । घातलासे देवावरी भार ॥ ३ ॥

॥ ३२३१ ॥ काय नाहीं माझे अंतरीं वसती । व्यापक हा भूतीं सकळां नांदे ॥ धृ० ॥ चित्तासी प्रसाद होईल चळण । तेंचि तें वळण मनासही ॥ १ ॥ सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंठित । नाहीं केलें होत आपुलें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे दोरी खांब सुत्र्या हातीं । नाचवी नाचती जडें तैसीं ॥ ३ ॥

॥ ३२३२ ॥ देवाचें निर्माल्य कोण शिवे हातीं । संकल्पासीं होती विकल्प ते ॥ धृ० ॥ वाहिलें देह हें देवा एकसरें । होईल तें बरें तेणें द्वारें ॥ १ ॥ होता भार त्याची निवारली खंती । येथें आतां रिती सांठवण ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छे पावविले कष्ट । ह्मणऊनि नष्ट दुरावली ॥ ३ ॥

॥ ३२३३ ॥ देव तीर्थ येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥ धृ० ॥ तया बरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ॥ १ ॥ शुद्धाशुद्धठाव पाप-पुण्यबीज । पावडील दुजे फळभोग ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभराऐसें वर्म । चुकलिया धर्म अवघे मिथ्या ॥ ३ ॥

॥ ३२३४ ॥ काय करूं सांगतांही न कळे वर्म । उपस्थित भ्रम उपजवितो ॥ धृ० ॥ मन आधीं ज्याचें आलें होइल हातां । तयावरी सत्ता केली चाले ॥ १ ॥ अभुकेचे अंगीं चवी ना सवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥ २ ॥ तुका ह्मणे आप राखावें आपणा । संकोचोंचि कोणा नये आतां ॥ ३ ॥

॥ ३२३५ ॥ अमृत अव्हेरें उचललें जातां । विष आर्त्तभूतां आवश्यक ॥ धृ० ॥ आदरासी मोल नये लावूं केजें । धीर शुद्धबीजें गोमटा तो ॥ १ ॥ खऱ्याचिये अंगीं आपणचि चाली । लावणी लाविली काय लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे चाडे करा वेवसाव । आह्मांसी तो वांव धीर आहे ॥ ३ ॥

॥ ३२३६ ॥ अनुभवाचे रस देऊं आर्त्तभूतां । सोडूं चोजवितां पुढें पोतीं ॥ धृ० ॥ देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी । शोभतील गुणीं आपुलिया ॥ १ ॥ आधीं भाव सार शुद्ध ते भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचें नाम गुण-वंत । तें नाहीं लागत पसरावें ॥ ३ ॥

॥ ३२३७ ॥ काय मज एवढा भार । हे वेव्हार चालवाया ॥ धृ० ॥ उकल तो जाणें धणी । मज भोजनीं कारण ॥ १ ॥ चिंता ज्याची तया शिरीं । लेंकरीं तें खेळावें ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवट झाला । देव या बोला भोगिता ॥ ३ ॥

॥ ३२३८ ॥ न गमे न गमे न गमे हरिविण । न गमे न गमे न गमे मेळवा शाम कोणी गे ॥ धृ० ॥ तळमळ करी तैसा जीव जळाविण मासा । दिसती दिशा ओसा वो ॥ १ ॥ नाठवे भूक तान विकळ जालें मन । घडी जाय प्रमाण जुगा एकी वो ॥ २ ॥ जरी तुह्मी नोळखा सांगतें ऐका । तुकयाबंधुचा सखा जगजीवन ॥ ३ ॥

॥ ३२३९ ॥ विठ्ठला रे तुझे वर्णितां गुणवाद । विठ्ठला रे दग्ध जालीं पापें ॥ धृ० ॥

विठ्ठला रे तुझें पाहातां श्रीमुख । विठ्ठला रे सुख जालें नयना ॥ १ ॥ विठ्ठला रे तुज देतां आलिंगन । विठ्ठला तनमन निवाल्या बाह्या ॥ २ ॥ विठ्ठला रे तुझी ऐकतां कीर्ती । विठ्ठल हे विश्रांति पावले स्मरणें ॥ ३ ॥ विठ्ठला रे तुकयाबंधु ह्मणे देहभाव । विठ्ठला जीव पाव धरितां गेला ॥ ४ ॥

॥ ३२४० ॥ एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तोही मळ नाहीं एथें ॥ धृ० ॥ द्यावें घ्यावें आह्मीं आपुलिया सत्ता । न देखों पुसता दुजा कोणी ॥ १ ॥ भांडाराची किली माझे हातीं आहे । पाहिजे तो पाहें वान येथें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां किफ्यालाच्या बळें । ठेविलें मोकळें देवें येथें ॥ ३ ॥

॥ ३२४१ ॥ स्मरणाचे वेळे । व्हावें सावध न कळे ॥ धृ० ॥ पडिलों विषयांचे ओढी । कोणी न दिसेसें काढी ॥ १ ॥ भांडवल माझें । वेच जालें भूमि ओझें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । तूंचि धांवें ऐसे वेळे ॥ ३ ॥

॥ ३२४२ ॥ पाहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचितें ॥ धृ० ॥ एक नाहीं एका ऐसे । दावी कैसे शुद्ध हीन ॥ १ ॥ पंचभूतें एकी रासी । सूत्रें कैसीं खेळवी ॥ २ ॥ तुका ह्मणे जे जे जाती । तैसी स्थिति येतसे ॥ ३ ॥

॥ ३२४३ ॥ कोणाचिया न पडों छंदा । गोविंदासी आळवूं ॥ धृ० ॥ बहुतांचीं बहु मतें । अवघे रिते पोकळ ॥ १ ॥ घटापटा ढवळी मन । होय सीण न करूं तें ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंग । भरूं भाग आला तो ॥ ३ ॥

॥ ३२४४ ॥ एकवेळ करीं या दुःखावेगळें । दुरिताचें जाळें उगवुनी ॥ धृ० ॥ आठवीन पाय हा माझा नवस । रात्रीही दिवस पांडुरंगा ॥ १ ॥ बहु दुरवरी भोगविले भोगा । आतां पांडुरंगा सोडवावें ॥ २ ॥ तुका ह्मणे काया करीन कुरवंडी । ओंवाळूनि सांडी मस्तक हें ॥ ३ ॥

॥ ३२४५ ॥ आणिक म्यां कोणा यावें काकुळती । कोण कामा येती अंतकाळीं ॥ धृ० ॥ तूं वो माझी सखी होसी पांडुरंगे । लवकरी येगे वाट पाहें ॥ १ ॥ काया वाचा मनें हेंचि काम करीं । पाउलें गोजिरीं चिंतीतसें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी पुरवीं हे आस । घालीं ब्रह्मरस भोजन हें ॥ ३ ॥

॥ ३२४६ ॥ आह्मांसी सकळ । तुझ्या नामाचेंचि बळ ॥ धृ० ॥ करूं अमृताचें पान । तुजें नेणों कांहीं आन ॥ १ ॥ जयाचा जो भोग । सुख दुःख पीडा रोग ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुझे पायीं माझा हेवा ॥ ३ ॥

॥ ३२४७ ॥ आर्त्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायांशीं ॥ धृ० ॥ यासी तुह्मी कृपावंता । माझी चिंता असों द्या ॥ १ ॥ तळमळ करी चित्त । अखंडित वियोगें ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । जाणें वेथा अंतरिंची ॥ ३ ॥

॥ ३२४८ ॥ बहु जन्मांतरें फेरे । केले येरे सोडवीं ॥ धृ० ॥ आळवितों करुणाकरे । विश्वंभरे दयाळे ॥ १ ॥ वाहवतों मायापुरीं । येथें करीं कुढावा ॥ २ ॥ तुका ह्मणे दुजा कोण । ऐसा सीण निवारी ॥ ३ ॥

॥ ३२४९ ॥ कृपाळ तें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडिया ॥ धृ० ॥ सोडवूनि द्यावें काळचक्रा हातीं । बहुत विपत्ति भोगविल्या ॥ १ ॥ ज्यालें जीवों नेदी मारिलेंचि मरे । प्रारब्ध तें उरे मागुतालें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुजा खुंटला उपाय । ह्मणऊनि पाय आठविले ॥ ३ ॥

॥ ३२५० ॥ डौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ॥ धृ० ॥ संतसंगें सारूं काळ । प्रेमसुखाचा कल्लोळ ॥ १ ॥ ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ॥ २ ॥ नाहीं वैकुंठींचा पांग । धांवे कथे पांडुरंग ॥ ३ ॥ मुक्त व्हावें काशासाठीं । केंची येणें रसें भेटी ॥ ४ ॥ तुका ह्मणे गोड । हेंचि पुरे माझें कोड ॥ ५ ॥

॥ ३२५१ ॥ फोडिलें भांडारें । माप घेऊनियां खरें ॥ धृ० ॥ केली हरिनामाची वरो । मागितलें आतां सरो ॥ १ ॥ देशांत सुकाळ । जाला हारपला काळ ॥ २ ॥ द्यावें धणीवरी । तुका ह्मणे लहान थोरीं ॥ ३ ॥

॥ ३२५२ ॥ आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें ॥ धृ० ॥ काय सांगों जालें कांहींचिया बाही । पुढें चाली नाहीं आवडीनें ॥ १ ॥ गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव सरिसा मुखा आला ॥ ३ ॥

॥ ३२५३ ॥ ह्मणऊनि धरिले पाय । अवो माय विठ्ठले ॥ धृ० ॥ आपुलेंचि करूनि द्यावें । अश्वासावें ना भीसें ॥ १ ॥ वाढली ते तळमळ चित्ता । शम आतां करावी ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवीं वसे । मज नसे वेगळी ॥ ३ ॥

॥ ३२५४ ॥ कल्याण या आशीर्वादें । जाती द्वंद्वें नासोनी ॥ धृ० ॥ आश्वासिलें नारायणें । प्रेमदानें अंतरिंच्या ॥ १ ॥ गेली निवारोनि आतां । सकळ चिंता यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मातां गीत । आलें हित सामोरें ॥ ३ ॥

॥ ३२५५ ॥ हरिनामवेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥ धृ० ॥ तेथें माझ्या मना होईं पक्षिराज । साधावया काज तृप्तीचें या ॥ १ ॥ मुळींचिया बीजें दाखविली गोडी । लवकरचि जोडी जालियाची ॥ २ ॥ तुका ह्मणे क्षणक्षणां जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ३ ॥

॥ ३२५६ ॥ बरवें ऐसें आलें मना । नारायणा या काळें ॥ धृ० ॥ देव आह्मा प्राणसखा । जालें दुःखा खंडण ॥ १ ॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी । होत्या त्यांसी फळ आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे निज ठेवा । होईल देवा लाधलों ॥ ३ ॥

॥ ३२५७ ॥ जरि हे आड येती लाज । कैसें काज साधतें ॥ धृ० ॥ करणें केलें उटाउठी । पायीं मिठी घातली ॥ १ ॥ समर्पिला जीव भाव । धरिला भाव अखंड ॥ २ ॥ तुका ह्मणे आड कांहीं । काळ नाहीं घातला ॥ ३ ॥

॥ ३२५८ ॥ पात्र शुद्ध चित्त ग्वाही । न लगे कांहीं सांगणें ॥ धृ० ॥ शूर तरी सत्यचि व्हावें । साठी जीवें करुनी ॥ १ ॥ असुपच सुखमान । स्वामी जन मानावें ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसी वाणी । तैसे मनीं परिपाक ॥ ३ ॥

॥ ३२५९ ॥ प्रगटलें ज्ञान । नारायण भूतीं तें ॥ धृ० ॥ अनुभवच घेऊं व्हावा । विनंति देवा करूनियां ॥ १ ॥ देखोवेखीं वदे वाणी । पडिल्या कानीं प्रमाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे योगक्षेम । घडे तें वर्म साधावें ॥ ३ ॥

॥ ३२६० ॥ मुख्य आधीं विषयत्याग । विधिभाग पाळणें ॥ धृ० ॥ मन पावे समाधान । हेंचि दान देवाचें ॥ १ ॥ उदासीन वृत्ति देहीं । चाड नाहीं पाळणें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं भय । सम सोय विषमाची ॥ ३ ॥

॥ ३२६१ ॥ आतां हेंचि सार हेंचि सार । मूळबीज रे आइका ॥ धृ० ॥ आवडीनें आवडी उरे । जें ज्या पुरे तें त्यासी ॥ १ ॥ प्रेमाचिया सूत्रदोरी । नाहीं उरी उरवी ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंतन बरें । आहे खरें खऱ्यापें ॥ ३ ॥

॥ ३२६२ ॥ केला तैसा अंगिकार । माझा भार चालवीं ॥ धृ० ॥ होऊं अंतराय बुद्धी । कृपानिधी नेदावी ॥ १ ॥ आह्मी तरी जड जीव । कैंचा भाव पुरता ॥ २ ॥ अनन्यभावें घ्यावी सेवा । आह्मां देवा घडेसी ॥ ३ ॥ तुह्मीं आह्मी शरणागतें । कृपावंतें रक्षीजे ॥ ४ ॥ तुका ह्मणे भाकूं कींव । असों जीव जड आह्मी ॥ ५ ॥

॥ ३२६३ ॥ सोसें बहुगर्भवासी । मेलों असों उपवासी । नाहीं सखीं ऐसीं । तेथें कोणी भेटलीं ॥ धृ० ॥ करीं करीं रे स्वहित । देह तंव हे अनित्य । नाहीं दिलें चित्त । सोडवूं मोहापासोनी ॥ १ ॥ पाळी तोंडिचिया घांसें । तेंचि होय अनारिसें । ज्या नव्हे ऐसें । खेवी परि सोडविना ॥ २ ॥ तुका ह्मणे धनमानें । माझ्या बाटलों मीपणें । नाहीं दिला जनें । देखों लाभें हा लाभ ॥ ३ ॥

॥ ३२६४ ॥ इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप । आह्मांसी स्वरूपस्थिति चाड ॥ धृ० ॥ आतां नव्हे माझा भाव अनारिसा । पाउलांनीं इच्छा गोवियेली ॥ १ ॥ लेंकरासी कोठें जाणत्याची परी । करूं येते दुरी धरावया ॥ २ ॥ लागली न सुटे नामाची आवडी । माझी भावजोडी भंगूं नका ॥ ३ ॥ घेसील वेढे मुक्तीच्या अभिळासें । चाळवी जा पिसें ब्रह्मज्ञानी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझा कोठें भक्तिरस । पाडावया ओस चाळविसी ॥ ५ ॥

॥ ३२६५ ॥ आह्मां भाविकांची जाती । एकविध जी श्रीपती । अळंकारयुक्ती । सरों तेथें शकेचि ना ॥ धृ० ॥ जाणें माउली त्या खुणा । क्षोभ उपजों नेदी मना । शांतवूनि स्तना । लावीं अवो कृपाळे ॥ १ ॥ तुज अवघें होऊं येतें । मज बाटों नये चित्तें । उपासनें परतें । नये कांहीं आवडों ॥ २ ॥ करूं रूपाची कल्पना । मुखीं नाम उच्चारणा । तुका ह्मणे जना । जल स्थल देखतां ॥ ३ ॥

॥ ३२६६ ॥ व्यावें हीनपणें । कासयाच्या प्रयोजनें ॥ धृ० ॥ प्रारब्धीं संसार । बरी हिमतीची थार ॥ १ ॥ होणार तें कांहीं । येथें अवकळा नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । कृपा केलिया बरवें ॥ ३ ॥

॥ ३२६७ ॥ किती रांडवंडे । घालूनि व्हाल रे बापुडे । संसाराचे भिडे । कासावीस जालेती ॥ धृ० ॥ माझ्या स्वामी शरण रिघा । कृपा लुवा पांडुरंगा । टेवी अंगसंगा ।

विश्वासियां जवळी ॥ १ ॥ कांहीं न मागतां भलें । होईल तेंचि काम केलें । नसावें आथिलें । कांहीं एका संकल्पें ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । पाववील ठायाठाव । एकविध जीव । ठेविलिया सेवेसी ॥ ३ ॥

॥ ३२६८ ॥ बाप करी जोडी लेंकराचे ओढी । आपुली करवंडी वाळवुनी ॥ धृ० ॥ एकाएकीं केला मिरासीचा धनी । कडिये वागवुनी भार खांदीं ॥ १ ॥ लेववुनी पाहे डोळा अळंकार । देवा दावी थोर करूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे नेदी गांजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलिया ॥ ३ ॥

॥ ३२६९ ॥ या रे हरिदासांनो जिंकों कळिकाळा । आमुचिया बळा पुढें किती बापुडें ॥ धृ० ॥ रंग सुरंग घमंडी नाना छंदें । हास्यविनोदें मनाचिये आवडी ॥ १ ॥ येणें तेणें प्रकारें बहुतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ॥ २ ॥ वांकड्या माना बोल बोलावे आर्ष । येईल तो त्यांस छंद पढीयें गोविंदा ॥ ३ ॥ आपुलालें आवडी एका-पुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान या प्रसंगीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे येथें प्रेम भंगूं नये कोणीं । देव भक्त दोन्ही निवडितां पातक ॥ ५ ॥

॥ ३२७० ॥ अवघाच अन्यायी । तेथें एकल्याचें काई ॥ धृ० ॥ आतां अवघें एक-वेळें । जळोनि सरो तें निराळें ॥ १ ॥ काय माझें खरें । एवढेंच राखों बरें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । परिहार न लगे चित्ता ॥ ३ ॥

॥ ३२७१ ॥ काय वृंदावन मोहियेलें गुळें । काय जिरें काळें उपचारिलें ॥ धृ० ॥ तैसी अधमाची जातीच अधम । उपदेश श्रम करावा तो ॥ १ ॥ न कळे विंचासी कुरवाळिलें अंग । आपले तें रंग दावीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे नये पाकासी दगड । शूकरासी गोड जैसी विष्ठा ॥ ३ ॥

॥ ३२७२ ॥ स्तवूनियां नरा । केला आयुष्याचा मातेरा ॥ धृ० ॥ नारायणाचिया लोपें । घडलीं अवघींचि पापें ॥ १ ॥ जीव ज्याचें दान । त्याचा खंडूनियां मान ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । आइके त्या दोष कानीं ॥ ३ ॥

॥ ३२७३ ॥ संतां नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥ धृ० ॥ ऐसे पोटाचे मारिले । देवा आशा विटंबिले ॥ १ ॥ घाली लोटांगण । वंदी नीचाचें चरण ॥ २ ॥ तुका ह्मणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥ ३ ॥

॥ ३२७४ ॥ अवो कृपावंता । होईं बुद्धीचा ये दाता ॥ धृ० ॥ जेणें पाविजे उद्धार । होय तुझें पायीं थार ॥ १ ॥ वदवीं हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझें अंतर वसवा ॥ ३ ॥

॥ ३२७५ ॥ नाहीं म्या वंचिला मंत्र कोणापाशीं । राहिलों जीवासीं धरूनि तो ॥ धृ० ॥ विटेवरी भावें ठेवियेलें मन । पाउलें समान चिंतीतसें ॥ १ ॥ पावविलों पार धरिला विश्वास । घालूनियां कास बळकट ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें पावले उद्धार । तिहीं हा आधार ठेविलासे ॥ ३ ॥

॥ ३२७६ ॥ चंचळीं चंचळ निश्चळीं निश्चळ । वाजवी खळाळ उदकासी ॥ धृ० ॥

सोपें वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥ १ ॥ रविबिंब नाहीं तुटत उदका । छायेची ते नका सरी धरूं ॥ २ ॥ तुका ह्मणे भय धरीं रज्जूसाठीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥ ३ ॥

॥ ३२७७ ॥ आवडी येते कळों । गुणें चिन्हें उमटतीं ॥ धृ० ॥ पोटीचें ओठीं उभें राहे । चित्त साहे मनासी ॥ १ ॥ डोहोळियाची भूक गर्भा । तातीं प्रभा प्रतिबिंबें ॥ २ ॥ तुका ह्मणे मानोन घ्यावें । वाटे खावें वाटतें ॥ ३ ॥

॥ ३२७८ ॥ काय ऐसी वेळ । वोंडवली अमंगळ ॥ धृ० ॥ आजि दुखवलें मन । कथाकाळीं जाला सीण ॥ १ ॥ पापाचिया गुणें । त्यांचिया वेळे वर्षणें ॥ २ ॥ तुका ह्मणे कानीं । घालूं आले दुष्टवाणी ॥ ३ ॥

॥ ३२७९ ॥ कितीवेळां जन्मा यावें । निस्थ व्हावें फजीत ॥ धृ० ॥ ह्मणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोबासी ॥ १ ॥ प्रारब्ध पाठी गाढें । न सरे पुढें चालतां ॥ २ ॥ तुका ह्मणे रोकडी हे । होती पाहें फजीती ॥ ३ ॥

॥ ३२८० ॥ होतों सांपडलों वेठी । जातां भेटी संसारा ॥ धृ० ॥ तों या वाटे कृपा केली । भेटी जाली विठोबासी ॥ १ ॥ होता भार माथां माझे । बहु ओझें अमुप ॥ २ ॥ तुका ह्मणे केली चिंता । कोण दाता भेटेल ॥ ३ ॥

॥ ३२८१ ॥ भुंकुनियां सुनें लागे हस्तीपाठीं । होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥ धृ० ॥ काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ १ ॥ मातलें बोकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥ ३ ॥

॥ ३२८२ ॥ जारे तुह्मी पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ धृ० ॥ गुण दोष नाणी मना । करी आपणासारिखें ॥ १ ॥ उभारोनि उभा कर । भवपार उतराया ॥ २ ॥ तुका ह्मणे तांतड मोठी । जाली भेटी उदंड ॥ ३ ॥

॥ ३२८३ ॥ गर्जत जावें नामावळी । प्रेमें टाळी वाहोनी ॥ धृ० ॥ येणें सुखें पुढती धांवें । भेटी सर्वे गोपाळा ॥ १ ॥ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ २ ॥ तुका ह्मणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥ ३ ॥

॥ ३२८४ ॥ अनुसरे तो अमर जाला । अंतरला संसारा ॥ धृ० ॥ न देखती गर्भवास । कधीं दास विष्णूचे ॥ १ ॥ विसंभेना माता बाळा । तैसा लळा पाळावा ॥ २ ॥ त्रिभुवनीं ज्याची सत्ता । तुक्या रक्षिता तो झाला ॥ ३ ॥

॥ ३२८५ ॥ आतां केशीराजा हेचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ धृ० ॥ देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥ १ ॥ काळाचें खंडण घडावें चिंतन । धनमानजनविन्मुख तो ॥ २ ॥ कफवातपित्त देहअवसानीं । ठेवावीं वारूनि दुरितेंही ॥ ३ ॥ सावध तों माझीं इंद्रियें सकळें । दिलीं एका वेळे हाक आधीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं या सकळांचा जानिता । येथें ऐकतां सकळांसी ॥ ५ ॥

॥ ३२८६ ॥ चित्त तें चिंतन कल्पनेची धांव । जे जे वाढे हांव इंद्रियांची ॥ धृ० ॥

हात पाव दिसे शरीर चालतां । नांवें भेद सत्ता जीवाची ते ॥ १ ॥ रवीचिये अंगीं प्रकाशक कळा । वचनें निराळा भेद दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे माप वचनाच्या अंगीं । मौन्य काय रंगीं निवडावें ॥ ३ ॥

॥ ३२८७ ॥ बोलोनियां काय दावूं । तुह्मी जीऊ जगाचें ॥ धृ० ॥ हेंचि आतां माझी सेवा । चिंतन देवा करितों ॥ १ ॥ विरक्तासी देह तुच्छ । नाहीं आस काशाची ॥ २ ॥ तुका ह्मणे पायांपाशीं । येइन ऐसी वासना ॥ ३ ॥

॥ ३२८८ ॥ निजों नेदी सकाळवेळीं । रातीकाळीं चिनचिनी ॥ धृ० ॥ वोंगळानें घेतली पाठी । केली आटी जीवासी ॥ १ ॥ मेळऊनि सर्वें जन । चिंता नेणें देवळींच ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों घरा । तोंडा घोरा बाइलेच्या ॥ ३ ॥

॥ ३२८९ ॥ मायबाप सर्वें नये धनवित्त । करावें संचित भोगावें तें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि लाभ काय तो विचारीं । नको चालीवरी चित्त ठेवूं ॥ १ ॥ आयुष्य सेवटीं सांडूनि जाणार । नव्हेचि साचार शरीर हें ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें लावियेलें माप । जमा धरी पापपुण्याचीही ॥ ३ ॥

॥ ३२९० ॥ मोटळें हातीं सोडिल्या गांठी । विकऱ्या घातले कण । ज्याचे भाग त्यासी देऊनि वारिलें । सारूनि लिगाड शान । खरें माप हातीं घेऊनि बैसलों । मानिती ते चौघे जन । खरें वित्त तेथें आलें चोजवीत । गिऱ्हाइक संतजन ॥ धृ० ॥ झाडिला पालव केला हाट वेच । जाली सकाळींच अराणुक । याल तरि तुह्मी करा लगबग । आमचे ते कोणी लोक ॥ १ ॥ एक ते उत्तम मध्यम कनिष्ठ । वित्ताचे प्रकार तीन । बहुतां जनाचे बहुत प्रकार । वेगळाले वाण । लाभ हाणि कोणा मुद्दल जालें । कोणासी पडिलें खाण । अर्धमर्ध कोणी गुंतोनि राहिले । थोडे तैसे बहु जन ॥ २ ॥ एकें सांते आलें एके गांवीहुन । येकामेचि नव्हे जाणें । येतां जातां रुजू नाहीं दिवाणा । काळतोंडी एके तेणें । लाग भाग एकीं एकानीं गोविलें । मागील पुढिलां ऋणें । तुका ह्मणे आतां पाहूं नये वास । साधावें आपुलें पेणें ॥ ३ ॥

॥ ३२९१ ॥ करा करा लागपाट । धरा पंढरिची वाट । जंव नाहीं चपेट । घात पडिला काळाचा ॥ धृ० ॥ दुजा ऐसा नाहीं कोणी । जो या काढी भयांतुनी । करा ह्मणऊनी । हा विचार ठायींचा ॥ १ ॥ होती गात्रें बेंबळीं । दिवस अस्तमानाकाळीं । हातपायटाळीं । जों मोकळीं आहेती ॥ २ ॥ कां रे घेतलासी सोसें । तुज वाटतांहे कैसें । तुका ह्मणे ऐसें । पुढें कैं लाहासी ॥ ३ ॥

॥ ३२९२ ॥ यत्न आतां तुह्मी करा । मज दातारा सत्तेनें ॥ धृ० ॥ विश्वास तो पायांवरी । ठेवूनि हरि राहिलों ॥ १ ॥ जाणतचि तुजें नाहीं । आणिक कांहीं प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे शरण आलों । नेणें बोलों विनवितां ॥ ३ ॥

॥ ३२९३ ॥ अनाथां जीवन । आह्मां तुमचे चरण । करूनि सांठवण । धरीयेलें हृदयीं ॥ धृ० ॥ पुष्ट जाली अंगकांती । आनंद न समाये चित्तीं । कवतुकें प्रीती । गाऊं नाचों उल्हासें ॥ १ ॥ करुणाउत्तरीं । करूं आळवण हरी । जाऊं नेदूं दुरी । प्रेमप्रीति-

हात पाव दिसे शरीर चालतां । नांवें भेद सत्ता जीवाची ते ॥ १ ॥ रवीचिये अंगीं प्रकाशक कळा । वचनें निराळा भेद दिला ॥ २ ॥ तुका ह्मणे माप वचनाच्या अंगीं । मौन्य काय रंगीं निवडावें ॥ ३ ॥

॥ ३२८७ ॥ बोलोनियां काय दावूं । तुह्मी जीऊ जगाचे ॥ धृ० ॥ हेंचि आतां माझी सेवा । चिंतन देवा करितों ॥ १ ॥ विरक्तासी देह तुच्छ । नाहीं आस काशाची ॥ २ ॥ तुका ह्मणे पायांपाशीं । येइन ऐसी वासना ॥ ३ ॥

॥ ३२८८ ॥ निजों नेदी सकाळवेळीं । रातीकाळीं चिनचिनी ॥ धृ० ॥ वोंगळानें घेतली पाठी । केली आटी जीवासी ॥ १ ॥ मेळऊनि सर्वे जन । चिंता नेणें देवळींच ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों घरा । तोंडा घोरा बाइलेच्या ॥ ३ ॥

॥ ३२८९ ॥ मायबाप सर्वे नये धनवित्त । करावें संचित भोगावें तें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि लाभ काय तो विचारीं । नको चालीवरी चित्त ठेवूं ॥ १ ॥ आयुष्य सेवटीं सांडूनि जाणार । नव्हेचि साचार शरीर हें ॥ २ ॥ तुका ह्मणे काळें लावियेलें माप । जमा धरी पापपुण्याचीही ॥ ३ ॥

॥ ३२९० ॥ मोटळें हातीं सोडिल्या गांठी । विकऱ्या घातले कण । ज्यांचे भाग त्यांसी देऊनि वारिलें । सारूनि लिगाड दान । खरें माप हातीं घेऊनि बैसलों । मानिती ते चौघे जन । खरें वित्त तेथें आलें चोजवीत । गिऱ्हाइक संतजन ॥ धृ० ॥ झाडिला पालव केला हाट वेच । जाली सकाळींच अराणुक । याल तरि तुह्मी करा लगबग । आमचे ते कोणी लोक ॥ १ ॥ एक ते उत्तम मध्यम कनिष्ठ । वित्ताचे प्रकार तीन । बहुतां जनाचे बहुत प्रकार । वेगळाले वाण । लाभ हाणि कोणा मुदल जालें । कोणासीं पडिलें खाण । अर्धमर्धं कोणी गुंतोनि राहिले । थोडे तैसे बहु जन ॥ २ ॥ एकें सातें आलें एकें गांवींहुन । येकामेचि नव्हे जाणें । येतां जातां रुजू नाहीं दिवाणा । काळतोंडीं एके तेणें । लाग भाग एकीं एकानीं गोविलें । मागील पुढिलां ऋणें । तुका ह्मणे आतां पाहूं नये वास । साधावें आपुलें पेणें ॥ ३ ॥

॥ ३२९१ ॥ करा करा लागपाट । धरा पंढरिची वाट । जंव नाहीं चपेट । घात पडिला काळाचा ॥ धृ० ॥ तुजा ऐसा नाहीं कोणी । जो या काढी भयांतुनी । करा ह्मणऊनी । हा विचार ठायींचा ॥ १ ॥ होती गात्रें बेंबळीं । दिवस अस्तमानाकाळीं । हातपायटाळीं । जों मोकळीं आहेती ॥ २ ॥ कां रे घेतलासी सोसें । तुज वाटताहे कैसें । तुका ह्मणे ऐसें । पुढें कैं लाहासी ॥ ३ ॥

॥ ३२९२ ॥ यत्न आतां तुह्मी करा । मज दातारा सत्तेनें ॥ धृ० ॥ विश्वास तो पायांवरी । ठेवूनि हरि राहिलों ॥ १ ॥ जाणतचि तुजें नाहीं । आणिक कांहीं प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे शरण आलों । नेणें बोलों विनवितां ॥ ३ ॥

॥ ३२९३ ॥ अनाथां जीवन । आह्मां तुमचे चरण । करूनि सांठवण । धरियेलें हृदयीं ॥ धृ० ॥ पुष्ट जाली अंगकांती । आनंद न समाये चित्तीं । कवतुकें प्रीती । गाऊं नाचों उल्हासें ॥ १ ॥ करुणाउत्तरीं । करूं आळवण हरी । जाऊं नेदूं दुरी । प्रेमप्रीति-

सोपें वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥ १ ॥ रविबिंब नाहीं तुटत उदका । छायेची ते नका सरीं धरूं ॥ २ ॥ तुका ह्मणे भय धरीं रज्जुसाठीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥ ३ ॥

॥ ३२७७ ॥ आवडी येते कळों । गुणें चिन्हें उमटतीं ॥ धृ० ॥ पोटीचें ओठीं उभें राहे । चित्त साहे मनासीं ॥ १ ॥ डोहोळियाची भूक गर्भा । तातीं प्रभा प्रतिबिंबें ॥ २ ॥ तुका ह्मणे मानोन घ्यावें । वाटे खावें वाटतें ॥ ३ ॥

॥ ३२७८ ॥ काय ऐसी वेळ । वोडवली अमंगळ ॥ धृ० ॥ आजि दुखवलें मन । कथाकाळीं जाला सीण ॥ १ ॥ पापाचिया गुणें । त्यांचिया वेळे दर्षणें ॥ २ ॥ तुका ह्मणे कानीं । घालूं आले दुष्टवाणी ॥ ३ ॥

॥ ३२७९ ॥ कितीवेळां जन्मा यावें । निस्य व्हावें फजीत ॥ धृ० ॥ ह्मणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोबासी ॥ १ ॥ प्रारब्ध पाठी गाढें । न सरे पुढें चालतां ॥ २ ॥ तुका ह्मणे रोकडी हे । होती पाहें फजीती ॥ ३ ॥

॥ ३२८० ॥ होतों सांपडलों वेठी । जातां भेटी संसारा ॥ धृ० ॥ तों या वाटे कृपा केली । भेटी जाली विठोबासी ॥ १ ॥ होता भार माथां माझे । बहु ओझें अमुप ॥ २ ॥ तुका ह्मणे केली चिंता । कोण दाता भेटेल ॥ ३ ॥

॥ ३२८१ ॥ भुंकुनियां सुनें लागे हस्तीपाठीं । होऊनि हिंपुटीं दुःख पावे ॥ धृ० ॥ काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ १ ॥ मातलें बोकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥ ३ ॥

॥ ३२८२ ॥ जारे तुह्मी पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ धृ० ॥ गुण दोष नाणी मना । करी आपणासारिखें ॥ १ ॥ उभारोनि उभा कर । भवपार उतराया ॥ २ ॥ तुका ह्मणे तांतड मोठी । जाली भेटी उदंड ॥ ३ ॥

॥ ३२८३ ॥ गर्जत जावें नामावळी । प्रेमें टाळी वाहोनी ॥ धृ० ॥ येणें सुखें पुढती धांवे । भेटी सर्वे गोपाळा ॥ १ ॥ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ २ ॥ तुका ह्मणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥ ३ ॥

॥ ३२८४ ॥ अनुसरे तो अमर जाला । अंतरला संसारा ॥ धृ० ॥ न देखती गर्भवास । कधीं दास विष्णूचे ॥ १ ॥ विसंभेना माता बाळा । तैसा लळा पाळावा ॥ २ ॥ त्रिभुवनीं ज्याची सत्ता । तुक्या रक्षिता तो झाला ॥ ३ ॥

॥ ३२८५ ॥ आतां केशीराजा हेचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ धृ० ॥ देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥ १ ॥ काळाचें खंडण घडावें चिंतन । धनमानजनविन्मुख तो ॥ २ ॥ कफवातपित्त देहअवसानीं । ठेवावीं वारूनि दुरितेंही ॥ ३ ॥ सावध तों माझीं इंद्रियें सकळें । दिलीं एका वेळे हाक आधीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं या सकळांचा जानिता । येथें ऐकतां सकळांसी ॥ ५ ॥

॥ ३२८६ ॥ चित्त तें चिंतन कल्पनेची धांव । जे जे वाढे हांव इंद्रियांची ॥ धृ० ॥

पडिभरें ॥ २ ॥ मोहो माते करी गोवा । ऐसें आहे जी केशवा । तुका ह्मणे सेवा । आणिक नाहीं जाणत ॥ ३ ॥

॥ ३२९४ ॥ सुखाची वसति जाली माझे जीवीं । तुमच्या गोसावी कृपादानें ॥ धृ० ॥ रूप वेळोवेळां आठवीं अंतरीं । बैसोनि जिव्हारीं राहिलें तें ॥ १ ॥ विसांवलें मन विठ्ठलें प्रपंचा । गोडावली वाचा येणें रसें ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं नाठवेसें केलें । दुसरें विठ्ठलें मज आतां ॥ ३ ॥

॥ ३२९५ ॥ आह्मां कांहीं आह्मां कांहीं । आतां नाहीं या बोलें ॥ धृ० ॥ मोल सांगा मोल सांगा । घेणें तिहीं गा पुसावें ॥ १ ॥ कैसें घडे कैसें घडे । बडबड तुज मज ॥ २ ॥ मुद्दलेंसाठीं मुद्दलेंसाठीं । लाभ पोटीं त्याच मधीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे साठवूं घरीं । आडल्या काळें पुसती तरी ॥ ४ ॥

॥ ३२९६ ॥ घ्यारे भाई घ्यारे भाई । कोणी कांहीं थोडें बहू ॥ धृ० ॥ येच हाटीं येच हाटीं । बांधा गाठी पारखून ॥ १ ॥ वेच आहे वेच आहे । सरलें पाहे मग खोटें ॥ २ ॥ उघडें दुकान उघडें दुकान । रात्री जाली कोण सोडी मग ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतकाळीं । जाती टाळीं बैसोनी ॥ ४ ॥

॥ ३२९७ ॥ मार्ग चुकले विदेशीं एकले । तयावरि जाले दिशाभुली ॥ धृ० ॥ हातीं धरूनियां पावविलें घरा । त्याच्या उपकारा काय द्यावें ॥ १ ॥ तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा । सेवा न घडे लाजा ह्मणउनी ॥ २ ॥ सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ ३ ॥ उष्ण तान भूक एवढिये अकांतीं । वोसंगा लाविती काय ह्मणिजे ॥ ४ ॥ खांद्यावरी शूळ मरणाचे वाटे । अन्यायाहि मोठे साच केले ॥ ५ ॥ हातींचें हिरोनि घातला पाठीसी । तुका ह्मणे ऐसी परि झाली ॥ ६ ॥

॥ ३२९८ ॥ जैसी तैसी तरि वाणी । मना आणि माउली ॥ धृ० ॥ लेकरांच्या स्नेहें गोड । करी कोड त्या गुणें ॥ १ ॥ मागें पुढें रिघे पोटीं । साहे खेटी करीतें ॥ २ ॥ तुका विनवी पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ॥ ३ ॥

॥ ३२९९ ॥ गुणांची आवडी वाचेचा पसरू । पडिला विसरु इतरांचा ॥ धृ० ॥ आदिमध्यअंतीं नाहीं अवसान । जीवनीं जीवन मिळोनि गेलें ॥ १ ॥ रामकृष्णनाममाळा हे साजिरी । ओविली गोजिरी कंठाजोगी ॥ २ ॥ तुका ह्मणे तनु जालीसे शीतळ । अवघी सकळ ब्रह्मानंदें ॥ ३ ॥

॥ ३३०० ॥ देवाची भांडारी । आह्मा विनियोग करी ॥ धृ० ॥ आतां न माखे हातपाय । नेणों होतें ऐसें काय ॥ १ ॥ देवें नेली चिंता । जाला सकळ करिता ॥ २ ॥ तुका ह्मणे धणी । त्यासी अवघी पुरवणी ॥ ३ ॥

॥ ३३०१ ॥ पेणावलें ढोर मार खाय पाठी । बैसलें तें उठी तेथूनियां ॥ धृ० ॥ तैसी माझ्या मना परि झाली देवा । धांवें अहंभावा सांडावलों ॥ १ ॥ कडां घालीं उडी मागिलांच्या भेणें । मरणामरण न कळेची ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों त्यापरी दुःखित । असें बोलावीत पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३३०२ ॥ जालिया दर्शन करीन मी सेवा । आणिकही देवा न लगे तुजें ॥ धृ० ॥ प्रारब्धा अधीन अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवीं पायीं ॥ १ ॥ ये गा ये गा ये गा कृपाळुवा हरी । निववीं अभ्यंतरीं देऊनि भेटी ॥ २ ॥ आसावलें मन जीवनाचे ओढी । नामरूपें गोडी लावियेली ॥ ३ ॥ काय तुह्मांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥ ४ ॥ काय लोखंडाचे पाहे गुण दोष । सिवोनि परिस सोनें करी ॥ ५ ॥ तुका ह्मणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥ ६ ॥

॥ ३३०३ ॥ येथें आड कांहीं न साहे आणिक । प्रमाण तें एक हेंचि जालें ॥ धृ० ॥ गाऊं नाचों टाळी वाऊं गीत छंदें । डोलवूं विनोदें अंग तेणें ॥ १ ॥ मंथूनिया सार काढिलें बाहेरी । उपाधि ते येरी निवडिली ॥ २ ॥ तुका ह्मणे जगा लाविली शिराणी । सेवितां हे धणी होत नाहीं ॥ ३ ॥

॥ ३३०४ ॥ शरणागत जालों । तेणें मीपणा मुकलों ॥ धृ० ॥ आतां दिल्याचीच वाट । पाहों नाहीं खटपट ॥ १ ॥ नलगे उचित । कांहीं पाहावें संचित ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । मानें तैसी करूं देवा ॥ ३ ॥

॥ ३३०५ ॥ वाचेचिया आळा कवाळिलें ब्रह्म । चुकविला श्रम पृथक तो ॥ धृ० ॥ सुलभ जालें सुलभ जालें । जवळी आलें पंढरिये ॥ १ ॥ नामरूपाचें बांधलें मोटळें । एका एका वेळे सारियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाटे चुकली वसती । उद्धार तो हातीं आणियेला ॥ ३ ॥

॥ ३३०६ ॥ सवंग जालें सवंग जालें । घरा आलें बंदरींचें ॥ धृ० ॥ आतां हेवा करा सोस । भक्तिरस बहु गोड ॥ १ ॥ पाउल वेचे चिंता नाहीं । आड कांहीं मग नये ॥ २ ॥ तुका ह्मणे संचिताचें । नेणें काचें राहों तें ॥ ३ ॥

॥ ३३०७ ॥ तुह्मी संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ति वाणूं ॥ धृ० ॥ अवतार तुह्मां धराया कारण । उद्धरावें जन जड जीव ॥ १ ॥ वाढविलें सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुह्मी जगीं संतजन ॥ ३ ॥

॥ ३३०८ ॥ पाठी लागे तया दवडी दुरी । घालीं या बाहेरी संवसारा ॥ धृ० ॥ येऊनि रडें तुमच्या पायीं । धांवें तईं छो ह्मणा ॥ १ ॥ पारखियाचा वास पडे । खडबडे उठी तें ॥ २ ॥ तुका ह्मणे लाविला धाक । नेदी ताक खाऊं कोणी ॥ ३ ॥

॥ ३३०९ ॥ सांखळिलों प्रीति गळां । भुंके वेळां जाणोनियां ॥ धृ० ॥ तुमचे मी केशिराजा । सुमे या काजा पाळिलों ॥ १ ॥ आलें गेलें कळे वाटा । कोण निश वाकडिया ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें वारी । दुरितें दुरी नातळतां ॥ ३ ॥

॥ ३३१० ॥ सुनियांचा हाचि भाव । आपला ठाव राखावा ॥ धृ० ॥ दुजियाचा येऊं वारा । नेदूं घरावरी येऊं ॥ १ ॥ केली याची फाडाफाडी । तडामोडी क्षेत्राची ॥ २ ॥ पातेजत नाहीं लोकां । तुका देवावांचुनी ॥ ३ ॥

॥ ३३११ ॥ सुनियांची आवडी देवा । घेत सेवा नाहीं कांहीं ॥ धृ० ॥ सिकविलें

जवळी बैसों । जेथें असों तयेंची ॥ १ ॥ नेदी तुजें बोलों करूं । गुरुगुरु न साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे कुर्वाळितां । अंग सत्त संगाची ॥ ३ ॥

॥ ३३१२ ॥ सिळें खातां आला वीट । सुनें धीट पाय धरी ॥ धृ० ॥ कान्होबा तें जाणें खूण । उन उन घास घाली ॥ १ ॥ आपुलिये हातींचें घ्यावें । लाड भावें पाळावा ॥ २ ॥ तुका ह्मणे मी जुनाट । मोहों आट परतला ॥ ३ ॥

॥ ३३१३ ॥ लागलें भरतें । ब्रह्मानंदाचें वरतें ॥ धृ० ॥ जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ १ ॥ बैसोनि सकळ । बाळ चालिले गोपाळ ॥ २ ॥ तुका ह्मणे वाट । बरवी सांपडली नीट ॥ ३ ॥

॥ ३३१४ ॥ धनें वित्तें कुळें । अवघियानें तें आगळें ॥ धृ० ॥ ज्याचे नारायण गांठी । भरला हृदय संपुटीं ॥ १ ॥ अवघेंचि गोड । त्याचें पुरलें सर्व कोड ॥ २ ॥ तुका ह्मणे अस्त । उदय त्याच्या तेजा नास्त ॥ ३ ॥

॥ ३३१५ ॥ बोलावें तें आतां आह्मी अबोलणें । एकाचि वचनें सकळांसी ॥ धृ० ॥ मेघवृष्टि कांहीं न विचारी ठाव । जैसा ज्याचा भाव त्यासी फळे ॥ १ ॥ तुका ह्मणे नाहीं समाधानें चाड । आपणा ही नाड पुढिलांसी ॥ २ ॥

॥ ३३१६ ॥ अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥ धृ० ॥ मुंगीवरी भार गजाचें पाळण । घालितां तें कोण कार्यसिद्धी ॥ १ ॥ तुका ह्मणे फांसे वागुरा-कुऱ्हाडी । प्रसंगीं तों काढी पारधी तो ॥ २ ॥

॥ ३३१७ ॥ नव्हों वैद्य आह्मी अर्थाचे भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥ धृ० ॥ कुपथ्य करूनि विटंबावे रोगी । काय हे सलगी भीड त्याची ॥ १ ॥ तुका ह्मणे लासूं फासूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥ २ ॥

॥ ३३१८ ॥ नव्हे परि ह्मणवी दास । कांहीं निमित्तास मूळ केलें ॥ धृ० ॥ तुमचा तो धर्म कोण । हा आपण विचारा ॥ १ ॥ नाहीं शुद्ध आचरण । परि चरण चिंतितों ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । ऐसें कां गा नेणां हें ॥ ३ ॥

॥ ३३१९ ॥ मागें चिंता होती आस । केला नास या काळें ॥ धृ० ॥ तुह्मी आह्मां उदासीन । भिन्नाभिन्न वारिलें ॥ १ ॥ मोहजाळें दुःख वाढे । ओढे ओढे त्यास तें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोण देवा । आतां हेवा वाढवी ॥ ३ ॥

॥ ३३२० ॥ आहे उभा विटेवरि । भरोवरी चुकविली ॥ धृ० ॥ निवारलें जाणें येणें । कोणा कोणें रुसावें ॥ १ ॥ संकल्पासी वेचे बळ । भारे फळ निर्माण ॥ २ ॥ तुका ह्मणे उभयतां । भेटी सत्ता लोभाची ॥ ३ ॥

॥ ३३२१ ॥ असो खटपट । आतां वाउगे बोभाट ॥ धृ० ॥ परिसा हे विनवणी । असो मस्तक चरणीं ॥ १ ॥ अपराध करा । क्षमा घडले दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे वेथा । तुह्मा काळें पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ ३३२२ ॥ वारकरी पायांपाशीं । आले त्यांसीं विनविलें ॥ धृ० ॥ काय काय तें

आइका । विसरों नका रंकासी ॥ १ ॥ चिंतवोनि चिंता केली । हे राहिली अवस्था ॥ २ ॥ तुका ह्मणे संसारा । रुसलों खरा यासाठीं ॥ ३ ॥

॥ ३३२३ ॥ जीवींचें कां नेणा । परि हे आवडी नारायणा ॥ धृ० ॥ वाढवावें हें उत्तर । कांहीं लाज करकर ॥ १ ॥ कोठें वांयां गेले । शब्द उत्तम चांगले ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळा । असंतात प्रिय खेळा ॥ ३ ॥

॥ ३३२४ ॥ वोडविलें अंग । आतां करूनि द्यावें सांग ॥ धृ० ॥ काय पूजा ते मी नेणें । जाणावें जी सर्व जाणें ॥ १ ॥ पोटा आलें बाळ । त्याचें जाणावें सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । वाहावे जी कडियेवरी ॥ ३ ॥

॥ ३३२५ ॥ सेवटींची हे विनंती । पाय चित्तीं रहावे ॥ धृ० ॥ ऐसें करा कृपादान । तुह्मां मन संन्निध ॥ १ ॥ भाग्याविण कैंचीं भेटी । नव्हे तुटी चिंतनें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळसा आलें । हें विठ्ठलें परिसावें ॥ ३ ॥

॥ ३३२६ ॥ करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ धृ० ॥ तरींच हा तरिजे सिंधू । भवबंधू तोडोनियां ॥ १ ॥ तेथें सरे शुद्ध साचें । अंतरींचें बीज तें ॥ २ ॥ तुका ह्मणे लवणकळी । पडतां जळीं तें होय ॥ ३ ॥

॥ ३३२७ ॥ जिकडे पाहे तिकडे देव । ऐसा भाव दे कांहीं ॥ धृ० ॥ काय केलों एकदेशी । गुणदोषीं संपन्न ॥ १ ॥ पडें तेथें तुझ्या पायां । करीं वांयां न वजें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विषमें सारी । ठाणें धरी जीवासी ॥ ३ ॥

॥ ३३२८ ॥ जिकडे जाय तिकडे सवें । आतां यावें यावरी ॥ धृ० ॥ माझ्या अवघ्या भांडवला । तूं एकला जालासी ॥ १ ॥ आतां दुजें धरा ह्मणी । पायांहूनि वेगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां देवा । नका गोवा यावरी ॥ ३ ॥

॥ ३३२९ ॥ स्मरतां कां घडे नास । विष्णुदास यावरी ॥ धृ० ॥ ऐसी सीमा जाली जगीं । तरी मी वेगीं अनुसरलों ॥ १ ॥ धरिलें तें निवडे आतां । न घडे चित्तावेगळें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाश नाहीं । पुराणेंही गर्जती ॥ ३ ॥

॥ ३३३० ॥ आधीं नाहीं कळों आला हा उपाय । नाहीं तरी काय चुकी होती ॥ धृ० ॥ घालितों पायांसीं मिठी एकसरें । नेदीं तों दुसरें आड येऊं ॥ १ ॥ कासया पडतों लटिक्याचे भरी । नव्हतां का शिरीं भार घेतों ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहे घेतों गर्भवास । कां या होतों सस कुटुंबाचा ॥ ३ ॥

॥ ३३३१ ॥ आतां बरें जालें । माझें मज कळों आलें ॥ धृ० ॥ खोटा ऐसा संवसार । मज पायीं द्यावा थार ॥ १ ॥ उघडले डोळे । भोग देताकाळीं कळे ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवा । होतां तडातोडी देवा ॥ ३ ॥

॥ ३३३२ ॥ बोलिलों तें धर्म अनुभव अंगें । काय पांडुरंगें उणें केलें ॥ धृ० ॥ सर्व सिद्धि पायीं वोळगती दासी । इच्छा नाहीं ऐसी व्हावें कांहीं ॥ १ ॥ संतसमागमें अळंकार वाणी । करूं हे पेरणी शुद्ध बीजा ॥ २ ॥ तुका ह्मणे रामकृष्णनामें गोड । आवडीचें कोड माळ ओऊं ॥ ३ ॥

॥ ३३३३ ॥ करूनि उचित खेळें भोवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥ धृ० ॥ येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥ सुख दुःख तुज देऊनि सकळ । नाहीं ऐसा काळ केला आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला देहाचा विसर । नाहीं आतां पर आप कोणी ॥ ३ ॥

॥ ३३३४ ॥ परिसाचे अंगें सोनें जाला विळा । वाकणें या कळा हीन नव्हे ॥ धृ० ॥ अंतरीं पालट घडला कारण । मग समाधान तेंचि गोड ॥ १ ॥ पिकली हे सेंद पूर्वकर्मा नये । अव्हेरु तो काये घडे मग ॥ २ ॥ तुका ह्मणे आणा पंगती सुरण । पृथक तें गुण केलें पाकें ॥ ३ ॥

॥ ३३३५ ॥ ज्याचे माथां जो जो भार । तेंचि फार तयासी ॥ धृ० ॥ मागें पुढें अवघें रितें । कळों येतें अनुभवें ॥ १ ॥ परिसा अंगीं अमुपसोनें । पोटीं हीन धातुची ॥ २ ॥ आपुला तो करी धर्म । जाणें वर्म तुका तें ॥ ३ ॥

॥ ३३३६ ॥ पाहें तिकडे दिशा ओस । अवघी आस पायांपें ॥ धृ० ॥ मनाचि साच होईल कईं । प्रेम देईं भेटोनी ॥ १ ॥ सर्वांपरी पांगुळ असें । न कळे कैसें तें तुह्मां ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । तूं तों दाता दीनाचा ॥ ३ ॥

॥ ३३३७ ॥ चालवणें काय । ऐसें भगे माझे माय ॥ धृ० ॥ धांव धांव लवलाहें । कंठीं प्राण वाट पाहे ॥ १ ॥ पसरूनि कर । तुज चालिलों समोर ॥ २ ॥ देसील विसांवा । तुका ह्मणे ऐशा हांवा ॥ ३ ॥

॥ ३३३८ ॥ आवडीच्या ऐसें जालें । मुखा आलें हरिनाम ॥ धृ० ॥ आतां घेऊं धणीवरी । मागें उरीं तुरेतों ॥ १ ॥ सांटवण मनाऐसी । पुढें रासी अमुप ॥ २ ॥ तुका ह्मणे कारण जालें । विठ्ठल तीं अक्षरीं ॥ ३ ॥

॥ ३३३९ ॥ त्यांचिया चरणा माझें दंडवत । ज्यांचें धनवित्त पांडुरंग ॥ धृ० ॥ येथें माझा जीव पावला विसांवा । ह्मणऊनि हांवा भरलासे ॥ १ ॥ चरणीचे रज लावीन कपाळा । जीं पदें राउळा सोई जाती ॥ २ ॥ आणिक तीं भाग्यें येथें कुरवंडी । करूनियां सांडीं इंद्राऐसी ॥ ३ ॥ वैष्णवांचे घरीं देवाची वसती । विश्वास हा चित्तीं सत्यभावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे सखे हरिचे ते दास । आतां पुढें आस नाहीं दुजी ॥ ५ ॥

॥ ३३४० ॥ उपजोनियां मरें । परि हेंचि वाटे बरें ॥ धृ० ॥ नाहीं आवडीसी पार । न ह्मणावें जालें फार ॥ १ ॥ अमृताची खाणी । उघडली नव्हे धणी ॥ २ ॥ तुका ह्मणे प्रचे । विठ्ठल हें मुखा साचें ॥ ३ ॥

॥ ३३४१ ॥ सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला । कां गा हा दाविला जगदाकार ॥ धृ० ॥ सांभाळीं आपुली हाक देतो माया । आह्मांसी कां भयाभीत केलें ॥ १ ॥ रूप नाहीं त्यासी ठेवियेलें नाम । लटकाचि श्रम वाढविला ॥ २ ॥ तुका ह्मणे कां गा जालासी चतुर । होतासी निसुर निर्विकार ॥ ३ ॥

॥ ३३४२ ॥ अमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धी । धरावी ते शुद्धि योगा नये ॥ धृ० ॥ काय या राहिलें विनोदावांचुन । आपूलिया भिन्न केलें आह्मां ॥ १ ॥ कोठें मूर्तिमंत दावी

पुण्यपाप । काशासी संकल्प वाहाविसी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आवरावा चेडा । लटिकीच पीडा पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३३४३ ॥ नो बोलावें ऐसें जनासी उत्तर । करितों विचार बहु वेळा ॥ धृ० ॥ कोण पाप आड ठाकतें येऊन । पालटी तो गुण अंतरींचा ॥ १ ॥ संसारा हातीं सोडवूनि गळा । हे कां अवकळा येती पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवे घडे अंतराय । यास करूं काय पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३३४४ ॥ आतां हें उचित माझें जना हातीं । पाहिजे फजिती केली कांहीं ॥ धृ० ॥ मग हे तुमचे न सोडीं चरण । त्रासोनियां मन येईल ठाया ॥ १ ॥ वाउगे वाणीचा न धरीं कांटाळा । ऐसी कां चांडाळा बुद्धि मज ॥ २ ॥ तुका ह्मणे जरि माथां बैसे घाव । तरि मग वाव नेघे पुढें ॥ ३ ॥

॥ ३३४५ ॥ मायेवरी सत्ता आवडीची बाळा । संकोचोनि लळा प्रतिपाळी ॥ धृ० ॥ अपराध माझे न मनावे मनीं । तुह्मी संतजनीं मायबापीं ॥ १ ॥ आरुष वचन लेंकुराची आळी । साहोनि कवळी मागुताली ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं काय नाहीं सत्ता । परि निष्ठुरता उपजेना ॥ ३ ॥

॥ ३३४६ ॥ कैसा होतो कृपावंत । बहुसंत सांगती ॥ धृ० ॥ पुसणें नाहीं यातीकुळ । लागो वेळ नेदावा ॥ १ ॥ ऐसी काय जाणों किती । उतरती उतरले ॥ २ ॥ ठावी वैकुंठींच्या वाटा । पाहातां मोठा संपन्न ॥ ३ ॥ अभिमान तो नाहीं अंगीं । भक्तालागीं न बैसे ॥ ४ ॥ तुका ह्मणे आळस निद्रा । नाहीं थारा त्या अंगीं ॥ ५ ॥ आलें द्यावें भलत्या काळें । विठ्ठल बळें आगळा ॥ ६ ॥

॥ ३३४७ ॥ सदैव हे वारकरी । जे पंढरी देखती ॥ धृ० ॥ पदोपदीं विठ्ठल वाचा । त्यांसी कैंचा संसार ॥ १ ॥ दोष पळाले पळाले । पैल आले हरिदास ॥ २ ॥ प्रेमभातें भरलें अंगीं । निर्लज्ज रंगीं नाचती ॥ ३ ॥ गोपीचंदनाची उटी । तुळसी कंठीं मिरवती ॥ ४ ॥ तुका ह्मणे देव चित्तीं । मोक्ष हातीं रोकडा ॥ ५ ॥ दुर्बळा या शक्तिहीना । त्याही जना पुरता ॥ ६ ॥

॥ ३३४८ ॥ ऐसीं ठावीं वर्में । तरी सांडवलों भ्रमें ॥ धृ० ॥ सुखें नाचतों कीर्तनीं । नाहीं आशंकित मनीं ॥ १ ॥ ऐसें आलें हाता । बळ तरी गेली चिंता ॥ २ ॥ सुख येथें जालें तरी । नाहीं आणिकांची उरी ॥ ३ ॥ ऐसें केलें देवें । पुढें कांहींचि न व्हावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मन । आतां जालें समाधान ॥ ५ ॥

॥ ३३४९ ॥ चित्तीं बैसलें चिंतन । नारायण नारायण ॥ धृ० ॥ न लगे गोड कांहीं आतां । आणिक दुसरें सर्वथा ॥ १ ॥ हरपला द्वैतभाव । तेणें देह जाला वाव ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे आह्मी । जालों निष्काम ये कामीं ॥ ३ ॥

॥ ३३५० ॥ व्यापिलें सर्वत्र । बाहेरी भीतरी अंतर ॥ धृ० ॥ ऐसें गोविंदें गोविलें । बोलें न वजाये बोलिलें ॥ १ ॥ संचिताची होळी । करूनि जीव घेतला बळी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे नाहीं । आतां संसारा उरी कांहीं ॥ ३ ॥

॥ ३३५१ ॥ तुह्मांआह्मांसी तरुषण । जाले दुर्लभ भाषण ॥ धृ० ॥ ह्मणऊनि करितों आतां । दंडवत घ्या समस्तां ॥ १ ॥ भविष्याचें माथां देह । कोण जाणें होइल काय ॥ २ ॥ ह्मणे तुकयाचा बांधव । आमचा तो जाला भाव ॥ ३ ॥

॥ ३३५२ ॥ अनंतजन्में जरी केल्या तपरासी । तरी हा न पवसी ह्मणे देह ॥ धृ० ॥ ऐसें जें निधान लागलेंसे हातीं । त्याची केली माती भाग्यहीना ॥ १ ॥ उत्तमाचें सार वेदाचें भांडार । ज्याच्यानें पवित्र तीर्थें होती ॥ २ ॥ ह्मणे तुकयाबंधु आणिक उपमा । नाहीं या तों जन्मा द्यावयासी ॥ ३ ॥

॥ ३३५३ ॥ आह्मांपाशीं सरे एक शुद्ध भाव । चतुराई जाणीव न लगे काळा ॥ धृ० ॥ सर्वजाण माझा स्वामी पांडुरंग । तया अंगसंग गोपाळासी ॥ १ ॥ तुका ह्मणे कर्में धर्में नये हातां । तयावरि सत्ता भाविकांची ॥ २ ॥

॥ ३३५४ ॥ प्रीति करी सत्ता । बाळा भीति मातापिता ॥ धृ० ॥ काय चाले त्याशीं बळ । आळी करितां कोल्हाळ ॥ १ ॥ पदरीं घाली मिठी । खेंदी मागें पुढें लोटी ॥ २ ॥ बोले मना आलें । तुका साहिला विठ्ठलें ॥ ३ ॥

॥ ३३५५ ॥ आवडीचे भेटी निवे । चित्त पावे विश्रांती ॥ धृ० ॥ बरवियाचा छंद मना । नारायण अविट ॥ १ ॥ तुळणें कांहीं साम्या पुरे । हें तों उरे ये रुची ॥ २ ॥ तुका ह्मणे बरवें जालें । फावलें हें काळें त्या ॥ ३ ॥

॥ ३३५६ ॥ केलियाचें दान । करा आपुलें जतन ॥ धृ० ॥ माझी बुद्धि स्थिर देवा । नाहीं विषयांचा हेवा ॥ १ ॥ भावा अंतराय । येती अंतरती पाय ॥ २ ॥ तुका ह्मणे जोडी । आदीं अंतीं राहो गोडी ॥ ३ ॥

॥ ३३५७ ॥ माझे हातीं आहे करावें चिंतन । तुह्मी कृपादान प्रेम द्यावें ॥ धृ० ॥ मागतियां भांडवल आळवण । नामाचीं जतन दातियासी ॥ १ ॥ बाळक धांवोनि आड निघे स्तनीं । घालावा जननी कृपे पान्हा ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं कासवाचे परी । आहे सूत्रदोरी तुझे हातीं ॥ ३ ॥

॥ ३३५८ ॥ वाट दावी त्याचें गेलें काय । नागवला जो वारितां जाय ॥ धृ० ॥ ऐसीं मार्गें ठकलीं किती । सांगतां खाती विषगोळा ॥ १ ॥ विचारोनि पाहे त्यास । न वजे जीवें नव्हे नास ॥ २ ॥ तुका ह्मणे जो रुसला जीवा । तयासी केशवा काय चाले ॥ ३ ॥

॥ ३३५९ ॥ अनुभवावांचून सोंग संपादणें । नव्हे हें करणें स्वहिताचें ॥ धृ० ॥ तैसा नको भुलों बाहिरल्या रंगें । हित तेंचि वेगें करूनि घेई ॥ १ ॥ बहुरूपी रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ॥ २ ॥ पाषाणाचें नांव ठेवियेलें देव । आणिकां तारी भाव परि तो तैसा ॥ ३ ॥ कनक झाड म्हूण वंदियेलें माथां । परि तें अर्था न मिळे माजी ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्याचा भाव तारी त्यास । अहंभावीं नास तोचि पावे ॥ ५ ॥

॥ ३३६० ॥ मज नष्टा माया मोह नाहीं लोभ । अधिक हा क्षोभ आदराचा ॥ धृ० ॥ धिग हें शरीर अनउपकार । न मनी आभार उपकाराचा ॥ १ ॥ मजहून नष्ट आहे ऐसा

कोण । नावडे मिष्टान्न बहुमोल ॥ २ ॥ न दिसती मज आपलेसे गुण । संचित तें कोण जाणें मागें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें देखोनियां काई । पांडुरंगा पायीं राखियेलें ॥ ४ ॥

॥ ३३६१ ॥ मतिकिंग काय वर्णू तुझें ध्यान । जेथें पडिलें मौन वेदश्रुती ॥ धृ० ॥ करूनि गोजिरा आपुलिये मती । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥ १ ॥ सुखाचें ओतिलें पाहों तें श्रीमुख । तेणें हरे भूक तान माझी ॥ २ ॥ रसना गोडावली ओव्या गातां गीत । पावलेंसे चित्त समाधान ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी दृष्टि चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥ ४ ॥

॥ ३३६२ ॥ ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें । जीवलग नेणें मज कोणी ॥ धृ० ॥ भय वाटे देखें श्वापदांचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥ १ ॥ अंधकारापुढें न चलवे वाट । लागतील खुंट कांटे अंगा ॥ २ ॥ एकला निःसंग फांकती मारग । भितों नव्हे लाग चालावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाट दावूनि सद्गुरू । राहिला हा कुरु पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ३३६३ ॥ उदार कृपाळ सांगसी जना । तरी कां त्या रावणा मारियेलें । नित्य नित्य पूजा करी श्रीकमळीं । तेणें तुझें काय केलें ॥ धृ० ॥ काय बडिवार सांगसी वांयां । ठावा पंढरिराया आहेसि आह्मां । एकलाचि जरी देऊं परिहार । आहे दुरिवरी सीमा ॥ १ ॥ कर्णाऐसा वीर उदार जुंझार । तो तुवां जर्जर केला बाणीं । पडिला भूमि परी नयेची करुणा । दांत पाडियेले दोन्ही ॥ २ ॥ श्रियाळ बापुडें सात्विकवाणी । खादलें कापूनि त्याचें पोर । ऐसा कठिण कोण होईल दुसरा । उखळीं कांडविलें शिर ॥ ३ ॥ शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग । त्याचें चिरिलें अंग ठायीं ठायीं । जाचऊनि प्राण घेतला मागें । पुढें न पाहतां कांहीं ॥ ४ ॥ बळीचा अन्याय सांग होता काय । बुडविला तो पाय देऊनि माथां । कोंडिलें दार हा काय कहार । सांगतोसी चित्र कथा ॥ ५ ॥ हरिश्चंद्राचें राज्य घेऊनियां सर्व । विकविला जीव डोंबाघरीं । पाडिला विघड नळा दमयंतीमधीं । ऐसी तुझी बुद्धि हरी ॥ ६ ॥ आणिकही गुण सांगावे किती । केलिया विपत्ति माउसीच्या । वधियेला मामा सखा पुरुषोत्तमा । ह्मणे बंधु तुकयाचा ॥ ७ ॥

॥ ३३६४ ॥ जे केली आळी ते अवघी गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ धृ० ॥ काय समाधान केलें कोणे वेळे । कोणें माझे लळे पाळियेले ॥ १ ॥ आभासाहि नाहीं स्वप्नीं तुझिया । प्रत्यक्ष बोलतां कइचा तो ॥ २ ॥ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी जाले ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं भरवसा । मोकलिसी ऐसा वाटतोसी ॥ ४ ॥

॥ ३३६५ ॥ समर्थुळित असतां वाचा । घोष न करिसी कां नामाचा ॥ धृ० ॥ कांरे वैष्णव नव्हेसी । कवण्या दंभें नागवलासी ॥ १ ॥ हरि हरि ह्मणतां लाजसी । गर्वे फुगोनि चालसी ॥ २ ॥ तारुण्यें उताणा । पुंसेंविण बांडा सुना ॥ ३ ॥ जालेंसि महिमेचें वेडें । नाचों लाजसी दिंडीपुढें ॥ ४ ॥ अळंकारांच्यानि बळें । वंचलासी तुळसीमाळे ॥ ५ ॥ कैसा सकुमार जालासी । ह्मणसी न टकें एकादशी ॥ ६ ॥ स्नान न करिसी आंघोळी ।

विभुति न लाविसी कपाळीं ॥ ७ ॥ वरिवरि न्याहाळिसी त्वचा । उपेग नाहीं मांसाचा ॥ ८ ॥ पद्मनाभी विश्वनाथ । तुका अझून रडत ॥ ९ ॥

॥ ३३६६ ॥ वाघाचा कालभूत दिसे वाघाऐसा । परि नाहीं दशा साच अंगीं ॥ धृ० ॥ बाहेरील रंग निवडी कसोटी । संघष्टणें भेटी आपेआप ॥ १ ॥ सिकविलें तैसें नाचावें माकडें । न चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे करी लटिक्याचा सांटा । फजित तो खोटा शीघ्र होय ॥ ३ ॥

॥ ३३६७ ॥ सिदळीचे सोर चोराची दया । तोहि जाणा तया संवसर्गी ॥ धृ० ॥ फुकासाठीं भोगे दुःखाचा तो वाटा । उभारोनि कांटा वाटेवरी ॥ १ ॥ सर्प पोसूनियां दुधाचाही नास । केलें यांता विष अमृताचें ॥ २ ॥ तुका ह्मणे यासी न करितां दंडण । पुढिल्या खंडण नव्हे दोषा ॥ ३ ॥

॥ ३३६८ ॥ तेणें सुखें माझें निवालें हें अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥ धृ० ॥ कवतुकें करुणा भाकीतसें लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥ १ ॥ मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची समूळ गेली ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख जालें माझ्या जीवा । रंगलें केशवा तुझ्या रंगें ॥ ३ ॥

॥ ३३६९ ॥ विठ्ठल सोयरा सज्जन विसांवा । जाइन त्याच्या गांवा भेटावया ॥ धृ० ॥ सीण भाग त्यासी सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणे ॥ १ ॥ माय माउलिया बंधुवर्ग जाणा । भाकीन करुणा सकळिकांसी ॥ २ ॥ संत महंत सिद्ध महानुभाव मुनी । जीवभाव जाऊनि सांगेन त्यां ॥ ३ ॥ माझिये माहेरीं सुखा काय उणें । न लगे येणें जाणें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३३७० ॥ ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम । आणिक न करीं काम जिव्हामुखें ॥ धृ० ॥ पाहिन तुझे पाय ठेविन तेथें डोय । पृथक तें काय न करीं मनीं ॥ १ ॥ तुझेचि गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥ २ ॥ करिन सेवा करीं चालेन मी पायीं । आणिक न वजें ठायीं तुजविण ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव ठेविला तुझ्या पायीं । आणिक तो कांई देऊं कोणा ॥ ४ ॥

॥ ३३७१ ॥ देवाचें भजन कांरे न करीसी । अखंड हव्यासीं पीडतोसी ॥ धृ० ॥ देवासी शरण कांरे न वजवे तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागीं ॥ १ ॥ देवाचा विश्वास कांरे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥ २ ॥ कांरे नाहीं तैसी देवाची हे गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥ ३ ॥ कांरे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजना ॥ ४ ॥ कांरे भय वाहासी लोकांचा धाक । विसरोनि एक नारायण ॥ ५ ॥ तुका ह्मणे कांरे घातलें वांयां । अवघें आयुष्य जाया भक्तिविण ॥ ६ ॥

॥ ३३७२ ॥ माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं । धरोनियां बाहीं । भव तारीं दातारा ॥ धृ० ॥ चतुरा तूं शिरोमणी । गुणलावण्याची खाणी । मुगुट सकळां मणी । तूंचि धन्य विठोबा ॥ १ ॥ करीं तिमिराचा नाश । दीप होऊनि प्रकाश । तोडीं

आशापाश । करीं वास हृदयीं ॥ २ ॥ पाहें गुंतलों नेणतां । तुज असो माझी चिंता । तुका देवी माथां । पायीं आतां राखावें ॥ ३ ॥

॥ ३३७३ ॥ आमुचें उचित हेंचि उपकार । आपलाचि भार घालूं तुज ॥ धृ० ॥ भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरणें काळीं शीताचिये ॥ १ ॥ जेणें काळें उठी मनाची आवडी । तेचि मागों घडी आवडे तें ॥ २ ॥ दुःख येऊं नेदी आमचिया घरा । चक्र करीं फेरा भोंवताला ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं मुक्तिसवें चाड । हेंचि आह्मां गोड जन्म घेतां ॥ ४ ॥

॥ ३३७४ ॥ मी दास तयाचा जया चाड नाहीं । सुख दुःख दोहींविरहित जो ॥ धृ० ॥ राहिलासे उभा भींवरेच्या तीरीं । कट दोहीं करीं धरोनियां ॥ १ ॥ नवल काई तरी पाचारितां पावे । न स्मरितां धांवे भक्तिकाजें ॥ २ ॥ सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तोचि माझा दाता स्वहिताचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यास गाईन मी गीतीं । आणिक तें चित्तीं न धरीं कांहीं ॥ ४ ॥

॥ ३३७५ ॥ यासी कोणी ह्मणे निंदेचीं उत्तरें । नागवला खरें तोचि ऐक ॥ धृ० ॥ आड वाटे जातां लावी नीट सोई । धर्मनीत तेही ऐसी आहे ॥ १ ॥ नाइकतां सुखें करावें ताडण । पाप नाहीं पुण्य असे फार ॥ २ ॥ जन्म व्याधि फार चुकतील दुःखें । खंडावा हा सुखें मान त्याचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे निंब दिलियावांचून । अंतरींचा सीण कैसा जाय ॥ ४ ॥

॥ ३३७६ ॥ निवडे जेवण सेवटींच्या घांसें । होय त्याच्या ऐसें सकळही ॥ धृ० ॥ न पाहिजे जाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वांयां ॥ १ ॥ संपादिलें होय धरिलें तें सोंग । विटंबणा व्यंग पडिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म नेणतां जो रांधी । पावेवी ते बुद्धि अवकळा ॥ ३ ॥

॥ ३३७७ ॥ न लगे मरावें । ऐसा ठाव दिला देवें ॥ धृ० ॥ माझ्या उपकारासाठीं । वागविला म्हूण कंठीं ॥ १ ॥ घरीं दिला ठाव । अवघा सकळही वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे एके ठायीं । कोठें माझें तुझें नाहीं ॥ ३ ॥

॥ ३३७८ ॥ नाहीं लाग माग । न देखेसें केलें जग ॥ धृ० ॥ आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ॥ १ ॥ निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥ ३ ॥

॥ ३३७९ ॥ दिली हाक मनें नव्हे ती जतन । वेंढाळिल्या गुणें धांव घेती ॥ धृ० ॥ काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा द्वेष फार माया तृष्णा ॥ १ ॥ इंद्रियांचे भार फिरतील चोर । खान द्यावया घर फोडूं पाहे ॥ २ ॥ माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां करितों उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥ ४ ॥

॥ ३३८० ॥ तुझा दास मज ह्मणती अंकित । अवघे सकळिक लहान थोर ॥ धृ० ॥ हेंचि आतां लागे करावें जतन । तुझें थोरपण तुज देवा ॥ १ ॥ होउनी निर्भर राहिलों

निश्चित । पावनपतित नाम तुझें ॥ २ ॥ करितां तुज होय डोंगराची राई । न लगतां कांहीं पात्या पातें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज काय ते आशंका । तारितां मशका मज हीना ॥ ४ ॥

॥ ३३८१ ॥ काय मागावें कवणासी । ज्यासी मागों तो मजपाशीं ॥ धृ० ॥ जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥ १ ॥ जरी मागों ध्रुवपद । तरी त्यासी येथील छंद ॥ २ ॥ स्वर्गभोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुतीं येणें ॥ ३ ॥ आयुष्य मागों चिरंजीव । जीवा मरण नाहीं स्वभावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे एक मागें । एकपणा नाहीं भंग ॥ ५ ॥

॥ ३३८२ ॥ आह्मी ज्याचे दास । त्याचा पंढरिये वास ॥ धृ० ॥ तो हा देवांचाही देव । काय कळिकाळाचा भेव ॥ १ ॥ वेद जया गाती । श्रुति ह्मणती नेति नेती ॥ २ ॥ तुका ह्मणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ॥ ३ ॥

॥ ३३८३ ॥ भक्तवत्सल दिनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ॥ धृ० ॥ तो हा पुंडलिकासाठीं । आला उभा वाळवंटीं ॥ १ ॥ गर्भवास धरी । अंबऋषीचा कैवारी ॥ २ ॥ सकळां देवां अधिष्ठान । एका मंत्रासी कारण ॥ ३ ॥ तुका ह्मणे ध्यानीं । ज्यासि ध्यातो शूळपाणी ॥ ४ ॥

॥ ३३८४ ॥ फटकाळ देव्हारा फटकाळ अंगारा । फटकाळ विचारा चालविलें ॥ धृ० ॥ फटकाळ तो देव फटकाळ तो भक्त । करवितो घात आणिका जीवा ॥ १ ॥ तुका ह्मणे अवघें फटकाळ हें जन । अनुभविये खूण जाणतील ॥ २ ॥

॥ ३३८५ ॥ लावूनियां गोठी । चुकवूं आदरिली दिठी । देऊनियां मिठी । पळे महिमा थुलिया ॥ धृ० ॥ पुढें तोचि करी आड । तिचा लोभ तिसी नाड । लावुनी चरफड । हात गोऊनि पळावें ॥ १ ॥ आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती । तोंडीं पडे माती । फिरतां मागें कैंचा तो ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । यासी रडवी याचा हेवा । भावें कां हे सेवा । सुखें तुह्मां नार्पिती ॥ ३ ॥

॥ ३३८६ ॥ नेत्राची वासना । तुज पाहावें नारायणा ॥ धृ० ॥ करीं याचें समाधान । काय पहातोसी अनुमान ॥ १ ॥ भेटावें पंढरीराया । हेंचि इच्छिताती बाह्या ॥ २ ॥ ह्मणतों जावें पंढरीसी । हेंचि ध्यान चरणासी ॥ ३ ॥ चित्त ह्मणे पायीं । तुझे राहीन निश्चयीं ॥ ४ ॥ ह्मणे बंधु तुकयाचा । देवा भाव पुरवीं साचा ॥ ५ ॥

॥ ३३८७ ॥ मन उताविळ । जालें न राहे निश्चळ ॥ धृ० ॥ देरे भेटी पंढरिराया । उभारोनि चारी बाह्या ॥ १ ॥ सर्वांग तळमळी । हात पाय रोमावळी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे कान्हा । भूक लागली नयना ॥ ३ ॥

॥ ३३८८ ॥ ह्मणसी दावीन अवस्था । तैसें नको रे अनंता ॥ धृ० ॥ होऊनियां सहाकार । रूप दाखवी सुंदर ॥ १ ॥ मृगजळाचियापरी । तैसें न करावें हरी ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे हरी । कामा नये बाह्यात्कारी ॥ ३ ॥

॥ ३३८९ ॥ आकारवंत मूर्ती । जेव्हां देखेन मी दृष्टी ॥ धृ० ॥ मग मी राहेन निवांत ।

ठेवूनियां तेथें चित्त ॥ १ ॥ श्रुति वाखाणिती । तैसा येसील प्रचिती ॥ २ ॥ ह्मणे तुकयाचा सेवक । उभा देखेन सन्मुख ॥ ३ ॥

॥ ३३९० ॥ जेणें तुज जालें रूप आणि नांव । पतित हें दैव तुझें आह्मी ॥ धृ० ॥ नाहीं तरी तुज कोण हें पुसतें । निराकारी तेथें एकाएकी ॥ १ ॥ अंधारें दीपका आणियेली शोभा । माणिकासी प्रभा कोंदणाची ॥ २ ॥ धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी काय चाडा जाणावें तें ॥ ३ ॥ अमृतासी मोल विषाचिया गुणें । पितळें तरी सोनें उंच निच ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी असोनियां जाण । तुज देवपण आणियेलें ॥ ५ ॥

॥ ३३९१ ॥ सुख वाटे येचि ठायीं । बहु पायीं संतांचे ॥ धृ० ॥ ह्मणऊनि केला वास । नाहीं नास ते ठायीं ॥ १ ॥ न करवे हाली चाली । निवारिली चिंता हे ॥ २ ॥ तुका ह्मणे निवे तनू । रजकणू लागती ॥ ३ ॥

॥ ३३९२ ॥ देऊं कपाट । कीं कोण काळ राखों वाट ॥ धृ० ॥ काय होईल तें शिरीं । आज्ञा धरोनियां करीं ॥ १ ॥ करूं कळे ऐसी मात । किंवा राखावा एकांत ॥ २ ॥ तुका ह्मणे जागों । किंवा कोणा नेदूं वागों ॥ ३ ॥

॥ ३३९३ ॥ मायबापापुढें लेंकराची आळी । आणिक हे पाळी कोण लळे ॥ धृ० ॥ सांभाळा जी माझीं विषमें अनंता । जवळी असतां अव्हेर कां ॥ १ ॥ आणिकांची चाले सत्ता आह्मांवरी । तुमची ते थोरी काय मग ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ॥ ३ ॥

॥ ३३९४ ॥ माझ्या मुखें मज बोलवितो हरी । सकळां अंतरीं नारायण ॥ धृ० ॥ न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों आह्मी ॥ १ ॥ तुका ह्मणे दोष नाहीं या विचारें । हिताचीं उत्तरें शिकवितां ॥ २ ॥

॥ ३३९५ ॥ मांस खातां हाउस करी । जोडूनि वैरी ठेवियेला ॥ धृ० ॥ कोण त्याची करिल कींव । जीवें जीव नेणती ॥ १ ॥ पुढिलांसाठीं पाजवी सुरी । आपुली चोरी अंगुळी ॥ २ ॥ तुका ह्मणे कुटिती हाडें । आपुल्या नाडें रडती ॥ ३ ॥

॥ ३३९६ ॥ तुज जाणें तान्हें नाहीं पांडुरंगा । कांजी मज सांगा उपेक्षिलें ॥ धृ० ॥ तुज ठावें होतें मी पातकी थोर । आधींच कां थार दिधली पायीं ॥ १ ॥ अंक तो पाडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी जिंतिलें तें खरें । आतां उणें पुरें तुह्मां अंगीं ॥ ३ ॥

॥ ३३९७ ॥ आह्मां घरीं धन शब्दाचींच रत्नें । शब्दाचींच शस्त्रें यत्न करूं ॥ धृ० ॥ शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ॥ १ ॥ तुका ह्मणे पाहा शब्दचि हा देव । शब्देंचि गौरव पूजा करूं ॥ २ ॥

॥ ३३९८ ॥ ब्रह्मज्ञान दारीं येतें काकुलती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥ धृ० ॥ रिघों पाहे माजी बळें त्याचें घर । दवडिती दूर ह्मणोनियां ॥ १ ॥ तुका ह्मणे येथें न चले सायस । पडिलें उदास त्याच्या गळां ॥ २ ॥

॥ ३३९९ ॥ कासया लागला यासी चौघाचार । मुळींचा वेव्हार निवडिला ॥ धृ० ॥

ग्वाही बहुतांची घालूनियां वरी । महजर करीं आहे माझ्या ॥ १ ॥ तुह्मां वेगळा लागें आपल्याच ठायीं । हातें करूनि तेंहि माझें माझें ॥ २ ॥ भांडण सेवटीं जालें एकवट । आतां कटकट करूं नये ॥ ३ ॥ ठेविला ठेवा तो आला माझ्या हाता । आतां नाहीं सत्ता तुज देवा ॥ ४ ॥ तुका ह्मणे वांयांविण खटपटा । राहिलें मी वांटा घेऊनियां ॥ ५ ॥

॥ ३४०० ॥ देहबुद्धि वसे जयाचिये अंगीं । पूज्यता ते जगीं सुख मानी ॥ धृ० ॥ थोर असे दगा जाला त्यासी हाटीं । सोडोनियां गांठी चोरीं नेली ॥ १ ॥ गांठीचें जाऊनि नव्हे तो मोकळा । बांधिलासे गळा दंभलोभें ॥ २ ॥ पुढिल्या उदिमा जालेंसे खंडण । दिसे नागवण पडे गांठी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे बोलतील संत । जाणूनियां घात कोण करी ॥ ४ ॥

॥ ३४०१ ॥ निंबाचिया झाडा साकरेचें आळें । आपलीं तीं फळें न संडीच ॥ धृ० ॥ तैसें अधमाचें अमंगळ चित्त । वमन तें हित करुनी सांडी ॥ १ ॥ परिसाचे अंगीं लाविलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे वेळू चंदना संगतीं । काय ते नसती जवळिकें ॥ ३ ॥

॥ ३४०२ ॥ दुबळें सदैवा । ह्मणे नागवेल केव्हां ॥ धृ० ॥ आपणासारिखें त्या पाहे । स्वभावासी करिल काये ॥ १ ॥ मूढ सभे आंत । इच्छी पंडिताचा घात ॥ २ ॥ गांढे देखूनि शूरा । उगें करितें बुरबुरा ॥ ३ ॥ आणि कांचा हेवा । न करीं शरण जाई देवा ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती । करूं दुष्टाची फजिती ॥ ५ ॥

॥ ३४०३ ॥ माझी आतां लोक सुखें निंदा करू । ह्मणती विचारू सांडियेला ॥ धृ० ॥ कारण होय तो करावा विचार । काय भीड भाड करूं देवा ॥ १ ॥ तुका ह्मणे काय करूं लापनिक । जनाचार सख नाशिवंत ॥ २ ॥

॥ ३४०४ ॥ ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला । कुसंगें नाडला तैसा साधू ॥ धृ० ॥ ओढाळाच्या संगें सात्विक नासलीं । क्षण एक नाडलीं समागमें ॥ १ ॥ डांकाचे संगतीं सोनें हीन जालें । मोल तें तुटलें लक्ष कोडी ॥ २ ॥ विषानें पक्वान्नें गोड कडू जालीं । कुसंगानें केली तैसी परी ॥ ३ ॥ भावें तुका ह्मणे सत्संग हा बरा । कुसंग हा फेरा चौऱ्याशीचा ॥ ४ ॥

॥ ३४०५ ॥ भलते जन्मीं मज घालिसील तरी । न सोडीं मी हरि नाम तुझें ॥ धृ० ॥ सुख दुःख तुज देईन भोगितां । मग मज चिंता कासयाची ॥ १ ॥ तुझा दास ह्मणवीन मी अंकिला । भोगितां विठ्ठला गर्भवास ॥ २ ॥ कासया मी तुज भाकितों करुणा । तारीं नारायणा ह्मणउनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज येऊं पाहे उणें । तारिसील तेणें आह्मां तया ॥ ४ ॥

॥ ३४०६ ॥ गातों नाचतों आनंदें । टाळघागरिया छंदें ॥ धृ० ॥ तुझी तुज पुढें देवा । नेणों भाव कैसी सेवा ॥ १ ॥ नेणों ताळ घात मात । भलते सर्वां पाय हात ॥ २ ॥ लाज नाहीं शंका । प्रेम घाला ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ३४०७ ॥ रुसलों आह्मीं आपुलिया संवसारा । तेथें जनाचारा काय पाड ॥ धृ० ॥

आह्मां इष्ट मित्र सज्जन सोयरे। नाहीं या दुसरें देवाविण ॥ १ ॥ दुराविले बंधु सखे सहोदर। आणिक विचार काय तेथें ॥ २ ॥ उपाधिवचन नाइकती कान। त्रासलें हें मन बहु माझें ॥ ३ ॥ तुका ह्मणे करा होइल ते दया। सुख दुःख वांयां न धरावें ॥ ४ ॥

॥ ३४०८ ॥ सांडूनि सुखाचा वांटा। मुक्ति मागे तो करंटा ॥ धृ० ॥ कां रे न घ्यावा जन्म। प्रेमें लुटावें नाम ॥ १ ॥ येथें मिळतो दहींभात। वैकुंठीं ते नाहीं मात ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां। मज न लगे सायुज्यता ॥ ३ ॥

॥ ३४०९ ॥ पदोपदीं पायां पडणें। करुणा जाण भाकावी ॥ धृ० ॥ ये गा ये गा विसांवया। करुणा दयासागरा ॥ १ ॥ जोडोनियां करकमळ। नेत्र जळ भरोनी ॥ २ ॥ तुका उभें दारीं पात्र। पुरवीं आर्त विठोबा ॥ ३ ॥

॥ ३४१० ॥ आतां हें सेवटीं असो पायांवरी। वदती वैखरी वागपुष्प ॥ धृ० ॥ नुपेक्षावें आह्मां दीना पांडुरंगा। कृपादानीं जगामाजी तुह्मी ॥ १ ॥ बोळवुनी देह सांडियेली शुद्ध। सारियेला भेद जीव शिव ॥ २ ॥ तुका ह्मणे मन तुमचे चरणीं। एवढी आयणी पुरवावी ॥ ३ ॥

॥ ३४११ ॥ तरिच होय वेडी। नग्न होय धडफुडी ॥ धृ० ॥ काय बोलाचें गौरव। आंत वरी दोन भाव ॥ १ ॥ मृगजळा न्याहाळितां। तान न वजाये सेवितां ॥ २ ॥ न पाहे आणिकांची आस। शूर बोलिजे तयास ॥ ३ ॥ तुका ह्मणे या लक्षणें। संत अळंकार लेणें ॥ ४ ॥

॥ ३४१२ ॥ आग्रह नांवें पाप। योगीं सारावे संकल्प ॥ धृ० ॥ सहजा ऐसें भांडवल। असोनि कां सारा बोल ॥ १ ॥ तें न भेटे तें काय। मना अंगींचे उपाय ॥ २ ॥ तुका ह्मणे धरीं सोय। वासनेची फोडा डोय ॥ ३ ॥

॥ ३४१३ ॥ न करीं पठन घोष अक्षरांचा। बीजमंत्र आमुचा पांडुरंग ॥ धृ० ॥ सर्वकाळ नामचिंतन मानसीं। समाधान मनासी समाधि हे ॥ १ ॥ न करीं भ्रमण न रिघें कपाटीं। जाईन तेथें दाटी वैष्णवांची ॥ २ ॥ अनु नेणें कांहीं न वजें तपासी। नाचें दिंडीपाशीं जागरणीं ॥ ३ ॥ उपवास व्रत न करीं पारणें। रामकृष्ण ह्मणे नारायण ॥ ४ ॥ आणिकांची सेवा स्तुति नेणें वाणूं। तुका ह्मणे आणु दुजें नाहीं ॥ ५ ॥

॥ ३४१४ ॥ पुंडलिकाचे निकटसेवे। कैसा धावे बराडी ॥ धृ० ॥ आपुलें थोरपण। नारायण विसरला ॥ १ ॥ उभा कटीं ठेवूनि कर। न ह्मणे पर बैससें ॥ २ ॥ तुका ह्मणे जगदीशा। करणें आशा भक्तांची ॥ ३ ॥

॥ ३४१५ ॥ बाळ काय जाणे जीवनउपाय। मायबाप वाहे सर्व चिंता ॥ धृ० ॥ आइतें भोजन खेळणें अंतरीं। अंकिताचे शिरीं भार नाहीं ॥ १ ॥ आपुलें शरीर रक्षितां न कळे। सांभाळूनि लळे पाळी माय ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा विठ्ठल जनिता। आमुची ते सत्ता तयावरी ॥ ३ ॥

॥ ३४१६ ॥ काय करितील केलीं नित्य पापें। वसे नाम ज्यापें विठोबाचें ॥ धृ० ॥ तृणीं हुताशन लागला ते रासी। जळतील तैसीं क्षणमात्रें ॥ १ ॥ विष्णुमूर्तिपाद पाहतां

चरण । तेथें कर्म कोण राहूं शके ॥ २ ॥ तुका ह्मणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥ ३ ॥

॥ ३४१७ ॥ वेद नेले शंखासुरें । केलें ब्रह्मयानें गाऱ्हाणें ॥ धृ० ॥ धांव धांव झडकरी । ऐसें कृपाळुवा हरी ॥ १ ॥ गजेंद्र नाडियेला गांजिला । तेणें तुझा धांवा केला ॥ २ ॥ तुका ह्मणे पद्मनाभा । जेथें पाहें तेथें उभा ॥ ३ ॥

॥ ३४१८ ॥ मांकडा दिसती कवटी नारळा । भोक्ता निराळा वरील सारी ॥ धृ० ॥ एका रस एका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥ १ ॥ सुनियांसी क्षीर वाढिल्या ओकवी । भोगित्यां पोसवी धणीवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे भार वागविती मूर्ख । नेतील तें सार परीक्षक ॥ ३ ॥

॥ ३४१९ ॥ भेटीची आवडी उतावीळ मन । लागलेंसें ध्यान जीवीं जीवा ॥ धृ० ॥ आतां आवडीचा पुरवावा सोहळा । येउनी गोपाळा क्षेम देईं ॥ १ ॥ नेत्र उन्मळित राहिले ताटस्त । गंगा अश्रुपात वहावली ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी करा साचपणा । मुळींच्या वचना आपुलिया ॥ ३ ॥

॥ ३४२० ॥ धवळलें जगदाकार । आंधार तो निरसला ॥ धृ० ॥ लपों जातां नाहीं ठाव । प्रगट पाहें पसारा ॥ १ ॥ खरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवें साठीं । पडिली मिठी धुरेसी ॥ ३ ॥

॥ ३४२१ ॥ मातेची अवस्था काय जाणें बाळ । तिसी तों सकळ चिंता त्याची ॥ धृ० ॥ ऐसें परस्परें आहेचि विचारा । भोपळ्याचा तारा दगडासी ॥ १ ॥ भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे परि संग नव्हे तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे करा परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ॥ ३ ॥

॥ ३४२२ ॥ लावूनि कोलित । माझा करितील घात ॥ धृ० ॥ ऐसे बहुतांचे संधी । सांपडलों खोळेमधीं ॥ १ ॥ पाहातील उणें । तेथें देती अनुमोदनें ॥ २ ॥ तुका ह्मणे रिघे । पुढें नाहीं जाले धींगे ॥ ३ ॥

॥ ३४२३ ॥ ऐसी एकां अटी । रीतीं सिणती करंटीं ॥ धृ० ॥ साच आपुल्या पुरतें । करुन नेघेती कां हितें ॥ १ ॥ कांहीं वेचितील वाणी । निरर्थकचि कारणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । कांहीं समर्पूनि सेवा ॥ ३ ॥

॥ ३४२४ ॥ चालिले सोबती । काय मानिली निश्चिती ॥ धृ० ॥ काय करिसी एकला । काळ सन्निध पातला ॥ १ ॥ कांहीं सावध तो बरवा । करीं आपुला काढावा ॥ २ ॥ चालिले अगळे । हळूच कान केश डोळे ॥ ३ ॥ वोसरले दांत । दाढा गडबडल्या आंत ॥ ४ ॥ एकली तळमळे । जिव्हा भलतें ठायीं लोळे ॥ ५ ॥ तुका ह्मणे यांणीं । तुह्मी मांडिलीं घालणी ॥ ६ ॥

॥ ३४२५ ॥ नका मजपाशीं । वदों प्रपंचाचे विशीं ॥ धृ० ॥ आतां नाइकावी कानीं । मज देवाविण वाणी ॥ १ ॥ येऊनियां रूपा । कोण पाहे पुण्यपापा ॥ २ ॥ मागे आजि-

वरी । जालें माप नेलें चोरीं ॥ ३ ॥ सांडियेली पानें । पुढें पिका अवलोकनें ॥ ४ ॥ पडों नेदी तुका । आड गुंपूं कांहीं चुका ॥ ५ ॥

॥ ३४२६ ॥ जाले आतां सांटे । कासयाचे लहान मोटे ॥ धृ० ॥ एक एका पडिलों हातीं । जाली तेव्हांचि निश्चिंती ॥ १ ॥ नाहीं फिरों येत मागें । जालें साक्षीचिया अंगें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आतां येथें कोठें हेवा ॥ ३ ॥

॥ ३४२७ ॥ माझें मज द्यावें । नाहीं करवीत नवें ॥ धृ० ॥ सहस्रनामाचें रूपडें । भक्त कैवारी चोखडें ॥ १ ॥ साक्षीविण बोलें । तरी मज पाहिजे दंडिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे माल । माझा खरा तो विठ्ठल ॥ ३ ॥

॥ ३४२८ ॥ करूं स्तुति तरि ते निंदा । तुह्मीं जाणा हे गोविंदा ॥ धृ० ॥ आह्मां लडिवाळांचे बोल । करा कवतुकें नवल ॥ १ ॥ बोबड्या उत्तरीं । तुह्मा रंजवितों हरी ॥ २ ॥ मागतो भातुकें । तुका ह्मणे कवतुकें ॥ ३ ॥

॥ ३४२९ ॥ न लाहिजे जपें न लाहिजे तपें । आह्मांसी हें सोपें गीतीं गातां ॥ धृ० ॥ न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्त्तनामाजी हरी ॥ १ ॥ जयासी नाहीं रूप आणि आकार । तोचि कटीं कर उभा विटे ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं । तो आह्मां संपुष्टीं भक्तिभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म जाणतीं लडिवाळें । जें होतीं निर्मळें अंतर्बाहीं ॥ ४ ॥

॥ ३४३० ॥ आह्मी जालों बळिवंत । होऊनियां शरणागत ॥ धृ० ॥ केला घरांत रिघावा । ठायीं पडियेला ठेवा ॥ १ ॥ हातां चढलें धन । नेणें रचिलें कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे मिठी । पायीं देऊनि केली सुटी ॥ ३ ॥

॥ ३४३१ ॥ लागपाठ केला । आतां वांटा नित्य त्याला ॥ धृ० ॥ करा जोडीचा हव्यास । आलें दुरील घरास ॥ १ ॥ फोडिलीं भांडारें । मोहोरलीं एकसरें ॥ २ ॥ अवघियां पुरतें । तुका ह्मणे घ्यावें हातें ॥ ३ ॥

॥ ३४३२ ॥ एकीं असे हेवा । एक अनावड जीवा ॥ धृ० ॥ देवें केल्या भिन्न जाती । उत्तम कनिष्ठ मध्यस्ती ॥ १ ॥ प्रीतिसाठीं भेद । कोणी पूज्य कोणी निंद्य ॥ २ ॥ तुका ह्मणे लळा । त्याचा जाणे हा कळवळा ॥ ३ ॥

॥ ३४३३ ॥ स्वामीचें हें देणें । येथें पावलों दर्पणें ॥ धृ० ॥ करूं आवडीनें वाद । तुमच्या सुखाचा संवाद ॥ १ ॥ कळावया वर्म । हा तों पायांचाचि धर्म ॥ २ ॥ तुका ह्मणे सिद्धी । हेचि पाववावी बुद्धी ॥ ३ ॥

॥ ३४३४ ॥ रुसलों संसारा । आह्मी आणी व्यापारा ॥ धृ० ॥ ह्मणऊनि केली सांडी । देऊनि पडिलों मुरकंडी ॥ १ ॥ परतेचि ना मागें । मोहो निष्ठुर जालों अंगें ॥ २ ॥ सांपडला देव । तुका ह्मणे गेला भेव ॥ ३ ॥

॥ ३४३५ ॥ हें तों वाटलें आश्चर्य । तुह्मां न धरवे धीर ॥ धृ० ॥ माझा फुटतसे प्राण । धांवा धांवा ह्मणऊन ॥ १ ॥ काय नेणों दिशा । जाल्या तुह्मांविण ओशा ॥ २ ॥ तुका ह्मणे कांगा । नाइकिजे पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३४३६ ॥ धांवा केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा ॥ धृ० ॥ वर्षे अमृताच्या धारा । घेई वोसंगा लेंकरा ॥ १ ॥ उशीर तो आतां । न करावा हेचि चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे त्वरें । वेग करीं विश्वंभरे ॥ ३ ॥

॥ ३४३७ ॥ जोडिले अंजुळ । असें दानउताविळ ॥ धृ० ॥ पाहा वाहा कृपावृष्टी । आणा अनुभवा गोष्टी ॥ १ ॥ तूं धनी मी सेवक । आइक्य तें एकाएक ॥ २ ॥ करितों विनंती । तुका सन्मुख पुढती ॥ ३ ॥

॥ ३४३८ ॥ काय तुज कैसें जाणवेल देवा । आणावें अनुभवा कैशा परी ॥ धृ० ॥ सगुण निर्गुण थोर कीं लहान । न कळे अनुमान मज तुझा ॥ १ ॥ कोण तो निर्धार करूं हा विचार । भवसिंधु पार तरावया ॥ २ ॥ तुका ह्मणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपति वर्म ठावें ॥ ३ ॥

॥ ३४३९ ॥ मी तंव बैसलों धरूनियां ध्यास । न करीं उदास पांडुरंगा ॥ धृ० ॥ नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागाया भिकारी जालों दास ॥ १ ॥ भुकेलों कृपेच्या वचना-कारणें । आशा नारायणें पुरवावी ॥ २ ॥ तुका ह्मणे येऊनियां देईं भेटी । कुरवाळुनी पोटीं धरीं मज ॥ ३ ॥

॥ ३४४० ॥ आलों तुझें नाम गात असें गीतीं । ह्मणोनी मानिती लोक मज ॥ धृ० ॥ अन्नवस्त्रचिंता नाहीं या पोटाची । वारिली देहाची थोर पीडा ॥ १ ॥ सज्जन संबंधीं तुटली उपाधी । रोकडी या बंदीं सुटलोंसें ॥ २ ॥ ध्यावा ध्यावा कोणें करावा सायास । गेले आशापाश वारोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज कळेल तें आतां । करा जी अनंता मायबापा ॥ ४ ॥

॥ ३४४१ ॥ कामक्रोध माझे लावियेले पाठीं । बहुत हिंपुटीं जालों देवा ॥ धृ० ॥ आवरितां तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥ १ ॥ तुझिया विनोदें आह्मां प्राणासाटीं । भयभीत पोटीं सदा दुःखी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥ ३ ॥

॥ ३४४२ ॥ सन्मुखचि तुह्मीं सांगावी जी सेवा । ऐसे माझे देवा मनोरथ ॥ धृ० ॥ नेघों आह्मी कांहीं चित्तवित्त घरें । आपुल्या उद्गारें जीवावरी ॥ १ ॥ बोल परस्परें वाढवावें सुख । पाहावें श्रीमुख डोळेभरी ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य बोलतों वचन । करुनी चरण साक्ष तुझे ॥ ३ ॥

॥ ३४४३ ॥ मज अनाथाकारणें । करीं येणें केशवा ॥ धृ० ॥ जीव झुरे तुजसाठीं । वाट पोटीं पहातसें ॥ १ ॥ चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । माझी चिंता असावी ॥ ३ ॥

॥ ३४४४ ॥ कासयावांचूनि जालों भूमि भार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥ धृ० ॥ जातां भलें काय डोळीयांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ॥ १ ॥ काय मुख पेंव श्वापदाचें धांव । नित्य तुझें नांव नुच्चारितां ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥ ३ ॥

॥ ३४४५ ॥ नको मज ताठा नको अभिमान । तुजवांचूनि क्षीण होतो जीव ॥ धृ० ॥ दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवीं मज ॥ १ ॥ तुका ह्मणे तुझें जालिया दर्षण । मग निवारण होईल सर्व ॥ २ ॥

॥ ३४४६ ॥ चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणांवरी माथा ॥ धृ० ॥ वेळोवेळां देईं क्षेमआलिंगन । वरी अवलोकन कृपादृष्टी ॥ १ ॥ प्रक्षाळूं दे पाय बैसें माजघरीं । चित्त स्थिर करीं पांडुरंगा ॥ २ ॥ आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ॥ ३ ॥ करुणाकरें नाहीं काळीं दिलें वर्म । दुरी होतां भ्रम कोण वारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां आवडीच्या सत्ता । बोलिलों अनंता करवीन तें ॥ ५ ॥

॥ ३४४७ ॥ देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे चिरा मनुष्यपणा ॥ धृ० ॥ देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणा वेगळें कोणी नाहीं ॥ १ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥ २ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥ ३ ॥ देवाची ते खूण तोडी मायाजाळ । आणि हें सकळ जग हरी ॥ ४ ॥ पहा देवें तेंचि बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ॥ ५ ॥

॥ ३४४८ ॥ अनंताचे मुखीं होसील गाइला । अमुप विठ्ठला दास तुझ्यां ॥ धृ० ॥ माझें कोठें आलें होईल विचारा । तरींच अव्हेरा योग्य जालों ॥ १ ॥ सर्वकाळ तुह्मी असा जी संपन्न । चतुरा नारायण शिरोमणी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे कलियुगींचे जीव । तरी नये कींव बहुपापी ॥ ३ ॥

॥ ३४४९ ॥ न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥ धृ० ॥ दासां साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥ १ ॥ न लगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥ २ ॥ न धरावी शंका । नये बोलों ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ३४५० ॥ भांडवल माझें लटिक्याचे गांठी । उदीम तो तुटी यावी ह्याचि ॥ धृ० ॥ कैसी तुह्मी वाट पाहों कोणा तोंडें । भोंवतीं कि रे भांडे गर्भवास ॥ १ ॥ चहूं खाणीं-चिया रंगलोंसें संगें । दुष्ट दुष्ट अंगें धरूनियां ॥ २ ॥ बहुतांचे बहु पालटलों सळे । बहु आला काळें रंग अंगा ॥ ३ ॥ उकलूनि नये दावितां अंतर । घडिचा पदर सारूनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे करीं गोंवळें यासाठीं । आपल्या पालटीं संगें देवा ॥ ५ ॥

॥ ३४५१ ॥ संतसंगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येती ॥ धृ० ॥ मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृताचा ॥ १ ॥ तुका ह्मणे नमस्कारावे दुरून । अंतरीं धरून राहें रूप ॥ २ ॥

॥ ३४५२ ॥ जें ज्याचें जेवण । तेंचि याचकासी दान ॥ धृ० ॥ आतां जाऊं चोज-वीत । जेथें वसतील संत ॥ १ ॥ होती धालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव । पुढें खुंटईल हांव ॥ ३ ॥

॥ ३४५३ ॥ धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ॥ धृ० ॥ निजल्या जागविती । निज पुरवूनि देती ॥ १ ॥ एक वेवसाव । त्यांचा संग त्यांचा जीव ॥ २ ॥ हितें केलें

॥ ३४३६ ॥ धांवा केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा ॥ धृ० ॥ वर्षे अमृताच्या धारा । घेई वोसंगा लेंकरा ॥ १ ॥ उशीर तो आतां । न करावा हेचि चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे त्वरें । वेग करीं विश्वंभरे ॥ ३ ॥

॥ ३४३७ ॥ जोडिले अंजुळ । असें हानउताविळ ॥ धृ० ॥ पाहा वाहा कृपावृष्टी । आणा अनुभवा गोष्टी ॥ १ ॥ तूं धनी मी सेवक । आइक्य तें एकाएक ॥ २ ॥ करितों विनंती । तुका सन्मुख पुढती ॥ ३ ॥

॥ ३४३८ ॥ काय तुज कैसें जाणवेल देवा । आणावें अनुभवा कैशा परी ॥ धृ० ॥ सगुण निर्गुण थोर कीं लहान । न कळे अनुमान मज तुझा ॥ १ ॥ कोण तो निर्धार करूं हा विचार । भवसिंधु पार तरावया ॥ २ ॥ तुका ह्मणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपति वर्म ठावें ॥ ३ ॥

॥ ३४३९ ॥ मी तंव बैसलों धरूनियां ध्यास । न करीं उदास पांडुरंगा ॥ धृ० ॥ नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागाया भिकारी जालों दास ॥ १ ॥ भुकेलों कृपेच्या वचना-कारणें । आशा नारायणें पुरवावी ॥ २ ॥ तुका ह्मणे येऊनियां देई भेटी । कुरवाळूनी पोटीं धरीं मज ॥ ३ ॥

॥ ३४४० ॥ आतां तुझें नाम गात असें गीतीं । ह्मणोनी मानिती लोक मज ॥ धृ० ॥ अन्नवस्त्रचिंता नाहीं या पोटाची । वारिली देहाची थोर पीडा ॥ १ ॥ सज्जन संबंधीं तुटली उपाधी । रोकडी या बंदीं सुटलोंसें ॥ २ ॥ ध्यावा ध्यावा कोणें करावा सायास । गेले आशापाश वारोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज कळेल तें आतां । करा जी अनंता मायबापा ॥ ४ ॥

॥ ३४४१ ॥ कामक्रोध माझे लावियेले पाठीं । बहुत हिंपुटीं जालों देवा ॥ धृ० ॥ आवरितां तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥ १ ॥ तुझिया विनोदें आह्मां प्राणासाटीं । भयभीत पोटीं सदा दुःखी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥ ३ ॥

॥ ३४४२ ॥ सन्मुखचि तुह्मीं सांगावी जी सेवा । ऐसे माझे देवा मनोरथ ॥ धृ० ॥ नेघों आह्मी कांहीं चित्तवित्त घरें । आपुल्या उदारें जीवावरी ॥ १ ॥ बोल परस्परें वाढवावें सुख । पाहावें श्रीमुख डोळेभरी ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्य बोलतों वचन । करुनी चरण साक्ष तुझे ॥ ३ ॥

॥ ३४४३ ॥ मज अनाथाकारणें । करीं येणें केशवा ॥ धृ० ॥ जीव झुरे तुजसाठीं । वाट पोटीं पहातसें ॥ १ ॥ चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । माझी चिंता असावी ॥ ३ ॥

॥ ३४४४ ॥ कासयावांचूनि जालों भूमि भार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥ धृ० ॥ जातां भलें काय डोळीयांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ॥ १ ॥ काय सुख पेंव श्वापदाचें धांव । नित्य तुझें नांव उच्चारितां ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥ ३ ॥

॥ ३४४५ ॥ नको मज ताठा नको अभिमान । तुजवांचूनि क्षीण होतो जीव ॥ धृ० ॥ दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवीं मज ॥ १ ॥ तुका ह्मणे तुझें जालिया दर्शण । मग निवारण होईल सर्व ॥ २ ॥

॥ ३४४६ ॥ चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणांवरी माथा ॥ धृ० ॥ वेळोवेळां देईं क्षेमआलिंगन । वरी अवलोकन कृपादृष्टी ॥ १ ॥ प्रक्षाळूं दे पाय बैसें माजघरीं । चित्त स्थिर करीं पांडुरंगा ॥ २ ॥ आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ॥ ३ ॥ करुणाकरें नाहीं कळों दिलें वर्म । दुरी होतां श्रम कोण वारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां आवडीच्या सत्ता । बोलिलों अनंता करवीन तें ॥ ५ ॥

॥ ३४४७ ॥ देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे चिरा मनुष्यपणा ॥ धृ० ॥ देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणा वेगळें कोणी नाहीं ॥ १ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥ २ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥ ३ ॥ देवाची ते खूण तोडी मायाजाळ । आणि हें सकळ जग हरी ॥ ४ ॥ पहा देवें तेंचि बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ॥ ५ ॥

॥ ३४४८ ॥ अनंताचे मुखीं होसील गाइला । अमुप विठ्ठला दास तुह्मां ॥ धृ० ॥ माझें कोठें आलें होईल विचारा । तरीच अव्हेरा योग्य जालों ॥ १ ॥ सर्वकाळ तुह्मी असा जी संपन्न । चतुरा नारायण शिरोमणी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे कलियुगींचे जीव । तरी नये कींव बहुपापी ॥ ३ ॥

॥ ३४४९ ॥ न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥ धृ० ॥ दासां साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥ १ ॥ न लगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥ २ ॥ न धरावी शंका । नये बोलों ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ३४५० ॥ भांडवल माझें लटिक्याचे गांठी । उदीम तो तुटी यावी हाचि ॥ धृ० ॥ कैसी तुह्मी वाट पाहों कोणा तोंडें । भोंवतीं कि रे भांडे गर्भवास ॥ १ ॥ चहूं खाणी-चिया रंगलोंसें संगें । सुष्ट दुष्ट अंगें धरूनियां ॥ २ ॥ बहुतांचे बहु पालटलों सळे । बहु आला काळें रंग अंगा ॥ ३ ॥ उकलूनि नये दावितां अंतर । घडिचा पदर साहूनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे करीं गोंवळें यासाठीं । आपल्या पालटीं संगें देवा ॥ ५ ॥

॥ ३४५१ ॥ संतसंगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येती ॥ धृ० ॥ मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृताचा ॥ १ ॥ तुका ह्मणे नमस्काराचें दुरून । अंतरीं धरून राहें रूप ॥ २ ॥

॥ ३४५२ ॥ जें ज्याचें जेवण । तेंचि याचकासी दान ॥ धृ० ॥ आतां जाऊं चोजवीत । जेथें वसतील संत ॥ १ ॥ होतीं धालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव । पुढें खुंटईल हांव ॥ ३ ॥

॥ ३४५३ ॥ धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ॥ धृ० ॥ निजल्या जागविती । निज पुरवूनि देती ॥ १ ॥ एक वेवसाव । त्यांचा संग त्यांचा जीव ॥ २ ॥ हितें केलें

हित । ग्वाही एक एकां चित्त ॥ ३ ॥ विषमाचें कांहीं । आड तया एक नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे बरीं । घरा येतील त्यापरी ॥ ५ ॥

॥ ३४५४ ॥ धोंडयासवें आदळितां फुटे डोकें । तो तों त्याच्या दुःखें घामेजेना ॥ धृ० ॥ इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काई सुख वाटे ॥ १ ॥ तुका ह्मणे आह्मांसवें जो रुसला । तयाचा अबोला आकाशासीं ॥ २ ॥

॥ ३४५५ ॥ खरे आह्मांपाशीं एक शुद्धभाव । नाहीं तरी वाव उपचार ॥ धृ० ॥ कोण मानी वरी रसाळ बोलणें । नाहीं जाली मनें ओळखी तों ॥ १ ॥ तुका ह्मणे आह्मां जाणी-वेचें दुःख । न पाहों त्या मुख दुर्जनाचें ॥ २ ॥

॥ ३४५६ ॥ आतां तळमळ । केली पाहिजे सीतळ ॥ धृ० ॥ करील तें पाहें देव । पायीं ठेवूनियां भाव ॥ १ ॥ तोचि अन्नदाता । नाहीं आणिकांची सत्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे दासा । नुपेक्षील हा भरवसा ॥ ३ ॥

॥ ३४५७ ॥ लांब धांवे पाय चोरी । भरोवरी जनाच्या ॥ धृ० ॥ आतां कैसें होय याचें । सिजतां काचें राहिलें ॥ १ ॥ खाय ओकी वेळोवेळां । कैसी कळा राहेल ॥ २ ॥ तुका ह्मणे भावहीण । त्याचा सीण पाचावा ॥ ३ ॥

॥ ३४५८ ॥ माझ्या इंद्रियांसीं लागलें भांडण । ह्मणतील कान रसना धाली ॥ धृ० ॥ करिती तळमळ हस्त पाद भाळ । नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥ १ ॥ गुण गाय मुख आइकती कान । आमचें कारण तैसें नव्हे ॥ २ ॥ दरुषनें फिटे सकळांचा पांग । जेथें ज्याचा भाग घेइल तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें करीं नारायणा । माझी ही वासना ऐसी आहे ॥ ४ ॥

॥ ३४५९ ॥ सिद्धीचा दास नव्हें श्रुतीचा अंकिला । होईन विठ्ठला सर्व तुझा ॥ धृ० ॥ सर्वकाळ सुख आमच्या मानसीं । राहिलें जयासी नाश नाहीं ॥ १ ॥ नेणें पुण्य पाप न पाहें लोचनीं । आणिकावांचूनि पांडुरंगा ॥ २ ॥ न करीं आस मुक्तीचे सायास । भक्तिप्रेम-रस सांडूनियां ॥ ३ ॥ गर्भवासीं धाक नाहीं येतां जातां । हृदयीं राहतां नाम तुझें ॥ ४ ॥ तुका ह्मणे जालों तुझाचि अंकिला । न भें मी विठ्ठला कळिकाळासी ॥ ५ ॥

॥ ३४६० ॥ जन्मा येऊनि तया लाभ जाला । बिडवई भेटला पांडुरंगा ॥ धृ० ॥ संसारदुःखें नासिलीं तेणें । उत्तम हें केणें नामघोष ॥ १ ॥ धन्य ते संत सिद्ध महानु-भाव । पंढरीचा ठाव टाकियेला ॥ २ ॥ प्रेमदाते तेच पतितपावन । धन्य दरुषन होय त्याला ॥ ३ ॥ पावटणिया पंथें जालिया सिद्धी । वोळगे समाधि सायुज्यता ॥ ४ ॥ प्रेम अराणुक नाहीं भय धाक । मज तेणें सुखें कांहीं चिंता ॥ ५ ॥ तें दुर्लभ संसारासी । जडजीव उद्धार लोकासी ॥ ६ ॥ तुका त्यासी ह्मणे । धन्य भाग्य दरुषनें ॥ ७ ॥

॥ ३४६१ ॥ काय दिवस गेले अवघेचि वऱ्हाडें । तें आलें सांकडें कथेमाजी ॥ धृ० ॥ क्षण एके ठायीं मन स्थिर नाहीं । आराणूक कई होईल पुढें ॥ १ ॥ कथेचें विरसें दोषा मूळ होय । तरण उपाय कैचा मातीं ॥ २ ॥ काय तें सांचवूनि उरलें हें मागें । घटिका

एक संगें काय गेलें ॥ ३ ॥ तोचि वाणी येथें करा उजळणी । काढावी मथूनि शब्दरत्नें ॥ ४ ॥ तुका ह्मणे हेंचि बोलावया चाड । उभयतां नाड हित असे ॥ ५ ॥

॥ ३४६२ ॥ शुद्धाशुद्ध निवडे कैसें । चर्म मास भिन्न नाहीं ॥ धृ० ॥ कांहीं अधिक नाहीं उणें । कवण्या गुणें देवासी ॥ १ ॥ उदक भिन्न असे काई । वाहाळ बावी सरिता नई ॥ २ ॥ सूर्य तेजें निवडी काय । रश्मी रसा सकळा खाय ॥ ३ ॥ वर्णां भिन्न दुधा नाहीं । सकळा गाई सारखें ॥ ४ ॥ करितां भिन्न नाहीं माती । मडक्या गति भिन्न नांवें ॥ ५ ॥ वर्त्ते एकविध अग्नी । नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥ ६ ॥ तुका ह्मणे पात्र चाड । किंवा विषें अमृत गोड ॥ ७ ॥

॥ ३४६३ ॥ न धरी प्रतिष्ठा कोणाचीहि यम । ह्मणतां कां रे राम लाजा ह्मणी ॥ धृ० ॥ सांपडे हातींचें सोडवील काळा । तो कां वेळोवेळां नये वाचे ॥ १ ॥ कोण लोक जो हा सुटला तो एक । गेले कुंभपाक रवरवांत ॥ २ ॥ तुका ह्मणे हित तों ह्मणां विठ्ठल । न ह्मणे तो भोगील कळेल तें ॥ ३ ॥

॥ ३४६४ ॥ ह्मणवितां हरि न ह्मणे तयाला । दरवडा पडिला देहामाजी ॥ धृ० ॥ आयुष्यधन त्याचें नेलें यमदूतीं । भुलविला निश्चिती कामरंगें ॥ १ ॥ नावडे ती कथा देउळासी जातां । प्रियधनसुता लक्ष तेथें ॥ २ ॥ कोण नेतो तयां घटिका दिवसा एका । कां रे ह्मणे तुका नागवसी ॥ ३ ॥

॥ ३४६५ ॥ कथे बैसोनि सादरें । सुखचर्चा परस्परें । नवल काय तो उद्धरे । आणिक तरे सुगंधें ॥ धृ० ॥ पुण्य घेई रे फुकाचें । पाप दुष्टवासनेचें । पेरिल्या बीजाचें । फळ घेई शेवटीं ॥ १ ॥ कथा विरस पाडी आळसें । छळणा करूनि मोडी रस । बुडवी आपणासरिसें । विटाळसें नावेसी ॥ २ ॥ सज्जन चंदनाचिये परी । दुर्जन देशत्यागें दुरी । राहो ह्मणे हरी । विनंति करी तुका हे ॥ ३ ॥

॥ ३४६६ ॥ काळों आलें तुझें जिणें । देवा तूं माझें पोषणें ॥ धृ० ॥ वाट पाहासी आठवाची । सत्ता सतंत कंईची ॥ १ ॥ बोलावितां यावें रूपा । सदा निर्गुणींचि लपा ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं परदेशी । येथें आह्मां अंगेजिसी ॥ ३ ॥

॥ ३४६७ ॥ आतां येथें लाजे नाहीं तुझें काम । जाय मज राम आठवूं दे ॥ धृ० ॥ तुझे भिडे माझे बहु जाले घात । केलों या अंकित दुर्जनाचा ॥ १ ॥ माझें केलें मज पारिखें माहेर । नटोनी साचार चाळविलें ॥ २ ॥ सुखासाठीं एक वाहियेलें खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥ ३ ॥ केला चौघाचार नेलों पांचांमधीं । नाहीं दिली शुद्धि धरूं आशा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां घेईन कांटीवरी । धनी म्यां कैवारी केला देव ॥ ५ ॥

॥ ३४६८ ॥ आजिवरि होतों तुझे सत्ते खालीं । तोंवरी तों केली विटंबना ॥ धृ० ॥ आतां तुज राहों नेदी या देशांत । ऐसा म्यां समर्थ केला धणी ॥ १ ॥ सापें रिग केला कोठें बाळपणीं । होतीसी पापिणी काय जाणों ॥ २ ॥ तुका ह्मणे म्यां हा बुडविला वेव्हार । तुझेचि ढोपर सोलावया ॥ ३ ॥

॥ ३४६९ ॥ देवाच्या निरोपें पिटितों डांगोरा । लाजे नका थारा देऊं कोणी ॥ धृ० ॥

मोडिलें या रांडे सुपंथ मारग । चालविलें जग यमपंथें ॥ १ ॥ परिचारीं केली आपुलीच रुढी । पोटींची ते कुडी ठावी नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आणा राउळा धरुन । फजित करून सोडूं मग ॥ ३ ॥

॥ ३४७० ॥ कां रे तुह्मी निर्मळ हरिगुण गाना । नाचत आनंदरूप वैकुंठासी जाना ॥ धृ० ॥ काय गणिकेच्या याती अधिकार मोठा । दोषी अजामेळ ऐसीं नेलीं वैकुंठा ॥ १ ॥ ऐसे नेणों मागें किती अनंत अपार । पंच महादोषी पातकां नाहीं पार ॥ २ ॥ सुताचिया लोभें नष्ट ह्मणे नारायण । कोण कर्तव्य तुका ह्मणे त्याचें पुण्य ॥ ३ ॥

॥ ३४७१ ॥ बैसोनियां खाऊं जोडी । ओढाओढी चुकवुनी ॥ धृ० ॥ ऐसें केलें नारायणें । बरवें जिणें सुखाचें ॥ १ ॥ घरींच्या घरीं भांडवल । न लगे बोल वेचावे ॥ २ ॥ तुका ह्मणे आटाआटी । चुकली दाटी सकळ ॥ ३ ॥

॥ ३४७२ ॥ नाहीं ग्यालों तरी पावलों याठाया । तुह्मां आळवाया जवळिकें ॥ धृ० ॥ सत्ताबळें आतां मागेन भोजन । केलें तें चिंतन आजिवरी ॥ १ ॥ नवनीतासाठीं खादला हा जीव । थोड्यासाठीं कींव कोण करीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ताक न लगे हें घाटे । पांडु-रंगा खोटें चाळवण ॥ ३ ॥

॥ ३४७३ ॥ सारीन तें आतां एकाचि भोजनें । वारीन मागणें वेळोवेळां ॥ धृ० ॥ सेवटींचा घास गोड करीं माते । अगे कृपावंते पांडुरंगे ॥ १ ॥ वंचूं नये आतां कांहींच प्रकार । धाकल्याचें थोर जाल्यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बहु चाळवावें । कांहीं नेदीं ठावें उरों मागें ॥ ३ ॥

॥ ३४७४ ॥ पोट धालें मग न लगे परती । जालिया निश्चिती खेळ गोड ॥ धृ० ॥ आपुलिया हातें देईं वो कवळ । विठ्ठल शीतळ जीवन वरी ॥ १ ॥ घराचा विसर होईल आनंद । नाचेन मी छंदें प्रेमाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे तोंच वरी करकर । मग हें उत्तर खंडईल ॥ ३ ॥

॥ ३४७५ ॥ बोलविसी तरी । तुझ्या येइन उत्तरीं ॥ धृ० ॥ कांहीं कोड कवतुकें । हातीं द्यावया भातुकें ॥ १ ॥ बोलविसी तैसें । करीन सेवन सरिसें ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझें चळण तुज सेवा ॥ ३ ॥

॥ ३४७६ ॥ दिला जीवभाव । तेव्हां सांडिला म्यां ठाव ॥ धृ० ॥ आतां वर्ते तुह्मी सत्ता । येथें सकळ अनंता ॥ १ ॥ माझिया मरणें । तुह्मी बैसविलें ठाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । मी हें माझें येथें नाहीं ॥ ३ ॥

॥ ३४७७ ॥ एकाचिये वेठी । सांपडलों फुकासाठीं ॥ धृ० ॥ घेतों काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें ॥ १ ॥ धांवें मागें मागें । जाय तिकडेचि लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे नेलें । माझें सर्वस्वें विठ्ठलें ॥ ३ ॥

॥ ३४७८ ॥ बराडियाची आवडी पुरे । जया झुरे साठीं तें ॥ धृ० ॥ तैसें आलें माझ्या मना । तुठी चरणावरुनी ॥ १ ॥ भागलिया पेणें पावे । विसांवे तें ठाकणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे छाया भेटे । बरें वाटे तापें त्या ॥ ३ ॥

॥ ३४७९ ॥ आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥ धृ० ॥ उभारोनि बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥ १ ॥ नाभी नाभी या उत्तरें । करुणाकरें सांतवीजे ॥ २ ॥ तुका ह्मणे केली आस । तो हा दिस फळाचा ॥ ३ ॥

॥ ३४८० ॥ बहुजन्में सोस केला । त्याचा जाला परिणाम ॥ धृ० ॥ विठ्ठलसें नाम कंठीं । आवडी पोटीं संचितें ॥ १ ॥ येथून तेथवरी आतां । न लगे चिंता करावी ॥ २ ॥ तुका ह्मणे धालें मन । हेंचि दान शकुनाचें ॥ ३ ॥

॥ ३४८१ ॥ उसंतिल्या कर्मवाटा । बहु मोठा आघात ॥ धृ० ॥ शीघ्र यावें शीघ्र यावें । हातीं न्यावें धरुनी ॥ १ ॥ भागलों या खटपटे । घटपटें करितां ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता । माझी चिंता खंडावी ॥ ३ ॥

॥ ३४८२ ॥ तुह्मासी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ॥ धृ० ॥ कां बा तुह्मी ऐसें नेणें । निष्ठुरपणें टाळित असां ॥ १ ॥ आळवितां मायबापा । नये कृपा अझुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे जगदीशा । काय असा निजेले ॥ ३ ॥

॥ ३४८३ ॥ नेलें सळेंबळें । चित्ताविताचें गांठोळें ॥ धृ० ॥ साह्य जालीं घरिच्या घरीं । होतां ठायींच कुठोरी ॥ १ ॥ मी पातलों या भावा । कपट तें नेणें देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥ ३ ॥

॥ ३४८४ ॥ जाला हा डांगोरा । मुखीं लहानाचे थोरा ॥ धृ० ॥ नागविलों जनाचारी । कोणी बैसों नेदी दारीं ॥ १ ॥ संचिताचा ठेवा । आतां आला तैसा घ्यावा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । ह्मणों केलें हें बरवें ॥ ३ ॥

॥ ३४८५ ॥ किती चौघाचारें । येथें गोविलीं वेव्हारें ॥ धृ० ॥ असे बांधविले गळे । होऊं न सकती निराळे ॥ १ ॥ आपलें आपण । केलें कां नाहीं जतन ॥ २ ॥ तुका ह्मणे खंडदंडें । येरझारीं लपती लंडें ॥ ३ ॥

॥ ३४८६ ॥ पांडुरंगा ऐसा सांडूनि वेव्हारा । आणिकांची करा आस वांयां ॥ धृ० ॥ बहुतांसी दिला उद्धार उदारें । निवडीना खरें खोटें कांहीं ॥ १ ॥ याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणिक वेव्हार चालतीना ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे हातींचें वजन । यासी बोल कोण ठेवूं सके ॥ ३ ॥

॥ ३४८७ ॥ ठेवूनि इमान राहिलों चरणीं । ह्मणऊनि धणी कृपा करी ॥ धृ० ॥ आह्मांसी भांडार करणें जतन । आलें गेलें कोण उंच निच ॥ १ ॥ करूनि सांभाळी राहिला निराळा । एक एक वेळा आज्ञा केली ॥ २ ॥ तुका ह्मणे योग्यायोग्य विनीत । देवा नाहीं चित्त येथें देणें ॥ ३ ॥

॥ ३४८८ ॥ आतां नव्हे गोड कांहीं करितां संसार । आणिक संचार जाला माजी ॥ धृ० ॥ ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥ १ ॥ रसनेचिये रुचि कंठीं नारायण । बैसोनियां मन निववीलें ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां बैसलों ठाकणीं । इच्छेची ते धणी पुरईल ॥ ३ ॥

॥ ३४८९ ॥ आतां काशासाठीं दुरी । अंतर उरी राखिली ॥ धृ० ॥ करीं लवकरी

मूळ । लहानें तीळ मुळींचिया ॥ १ ॥ दोहीं ठायीं उद्वेगवाणें । दरुषणें निश्चिती ॥ २ ॥ तुका ह्मणे वेग व्हावा । ऐसी जीवा उत्कंठा ॥ ३ ॥

॥ ३४९० ॥ पडिली हे रूढि जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य ह्मूण ॥ धृ० ॥ मरणाची कां रे नाहीं आठवण । संचिताचा धन लोभ हेवा ॥ १ ॥ देहाचें भय तें काळाचें भातुकें । मासूनि तें एकें ठेविलेंसे ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि अंधळे होऊं नका ॥ ३ ॥

॥ ३४९१ ॥ हित नाहीं ठावें जननीजनका । दाविला लौकिकाचार तिहीं ॥ धृ० ॥ अंधळ्याचे काठी लागले अंधळें । घात एका वेळे पुढेंमागें ॥ १ ॥ न धरावी चाली करावा विचार । वरील आहार गळीं लावी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला निवाडा रोकडा । राउत हा घोडा हातोहातीं ॥ ३ ॥

॥ ३४९२ ॥ जेथें पाहें तेथें कांडिती भूस । चिपाडें चोखूनि पाहाती रस ॥ धृ० ॥ काय सांगों देवा भुलले जीव । बहु यांची येतसे कींव ॥ १ ॥ वेठीचें मोटळें लटिकेंचि फुगे । पेणिया जाऊनि भिक्षा मागे ॥ २ ॥ तुका ह्मणे कां उगेचि खोल । जवळीं दाखवी आपणां बोल ॥ ३ ॥

॥ ३४९३ ॥ जाणिवेच्या भारें चेंपला उर । सदा बुरबुर सरेचि ना ॥ धृ० ॥ किती याचें ऐकों कानीं । मारिलें घाणीं नाळकरी ॥ १ ॥ मिठेंविण आळणी बोल । कोरडी फोल घसघस ॥ २ ॥ तुका ह्मणे डेंगा न कळे हित । किती फजित करूं तरी ॥ ३ ॥

॥ ३४९४ ॥ अनुतापयुक्त गेलिया अभिमान । विसरूं वचन मागिलांचा ॥ धृ० ॥ त्याचे पाय माझे लागोत कपाळीं । भोग उष्टावळी धन्यकाळ ॥ १ ॥ षड उर्मी जिहीं हाणितल्या लाता । शरण या संता आल्या वेगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जाती वोळे लवकरी । ठायींचि अंतरीं शुद्ध होती ॥ ३ ॥

॥ ३४९५ ॥ खोल ओले पडे तें पीक उत्तम । उथळाचा श्रम वांया जाय ॥ धृ० ॥ लटिक्याचे आह्मी नव्हों सांटेकरी । थीतें घाली भरी पदरीचें ॥ १ ॥ कोणा इहलोकीं पाहिजे पसारा । दंभ पोट भरायाचे चाडे ॥ २ ॥ तुका ह्मणे कसीं अगी जें उतरे । तेंचि येथें सरे जातिशुद्ध ॥ ३ ॥

॥ ३४९६ ॥ गोमट्या बीजाचीं फळेंही गोमटीं । बाहे तेंचि पोटीं समतुक ॥ धृ० ॥ जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांती । परतोनि मागुती फिरों नेणें ॥ १ ॥ खऱ्याचे पारखीं येत नाहीं तोटा । निवडे तो टाळें दुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज सत्याचि आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥ ३ ॥

॥ ३४९७ ॥ मन जालें भाट । कीर्ति मुखें घडघडाट । पडियेली वाट । येचि चालीं स्वभावें ॥ धृ० ॥ बोलें देवाचे पवाडे । नित्य नवेचि रोकडे । ज्या परी आवडे । तैसा तैसा करुनी ॥ १ ॥ रोखीं रहावें समोर । पुढें मागें चालें भार । करावें उत्तर । सेवा रुजू करुनी ॥ २ ॥ पूर वर्षला देकारें । संतोषाच्या अभय करें । अंगीच्या उत्तरें । तुकया स्वामि शृंगारी ॥ ३ ॥

॥ ३४९८ ॥ दूरि तोंचि होतों आपुले आशंके । नव्हतें ठाउकें मूळभेद ॥ धृ० ॥ आतां जेथें तेथें येइन सांगातें । लपाया पुरतें उरों नेदीं ॥ १ ॥ मिथ्या मोहें मज लाविला उशीर । तरी हें अंतर जालें होतें ॥ २ ॥ तुका ह्मणे कां रे दाखविसी भिन्न । लटिकाचि सीण लपंडाई ॥ ३ ॥

॥ ३४९९ ॥ कळों नये तोंचि चुकावितां बरें । मग पाठमोरें काय काज ॥ धृ० ॥ धरिलेती आतां द्या जी माझा डाव । सांपडतां भाव ऐसा आहे ॥ १ ॥ होतासी अंतरें झाकिलिया डोळीं । तों मी हा न्याहाळीं धरुनी दृष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज रडीचीच खोडी । अहाच बराडी तों मी नव्हे ॥ ३ ॥

॥ ३५०० ॥ करिसी लाघवें । तूं हें खेळसी आघवें ॥ धृ० ॥ केला अहंकार आड । आह्मां जगासी हा नाड ॥ १ ॥ इत्थंभूतें यावें । दावूं लपों हीं जाणावें ॥ २ ॥ तुका ह्मणे हो श्रीपती । आतां चाळवाल किती ॥ ३ ॥

॥ ३५०१ ॥ विश्वास तो देव । ह्मणूनि धरियेला भाव ॥ धृ० ॥ माझी वदवितो वाणी । ज्याणें धरिली धरणी ॥ १ ॥ जोडिलीं अक्षरें । नव्हती बुद्धीचीं उत्तरें ॥ २ ॥ नाहीं केली आटी । कांहीं मानदंभासाठीं ॥ ३ ॥ कोणी भाग्यवंत । तया कळेल उचित ॥ ४ ॥ तुका ह्मणे झरा । आहे मुळींचाचि खरा ॥ ५ ॥

॥ ३५०२ ॥ सुराणीचीं जालों लाडिकीं एकलीं । वडील धाकुलीं आह्मी देवा ॥ धृ० ॥ ह्मणऊनि कांहीं न घडे अन्हेर । गोमटें उत्तर भातुकेंही ॥ १ ॥ कांहीं एक नाहीं वंचिलें वेगळें । मुळींचिया मुळें स्थिराविलें ॥ २ ॥ लेवविलीं अंगीं आपुलीं भूषणें । अळंकार लेणें सकळही ॥ ३ ॥ सारितां न सरे अमुप भांडार । धना अंतपार नाहीं लेखा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मीं आळवूं आवडी । ह्मणऊनि जोडी दाखविली ॥ ५ ॥

॥ ३५०३ ॥ एका वेळे केलें रितें कलिवर । आंत दिलें थार पांडुरंगा ॥ धृ० ॥ पाळण पोषण लागलें तें सोई । देहाचें तें काई सर्वभावें ॥ १ ॥ माझिया मरणें जाली हे वसती । लागली ते ज्योती अविनाशा ॥ २ ॥ जाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका ह्मणे कांहीं बोलों नये ॥ ३ ॥

॥ ३५०४ ॥ पावतों ताडन । तरी हें मोकलितों जन ॥ धृ० ॥ मग मी आठवितों दुःखें । देवा सावकाश सुखें ॥ १ ॥ होती अप्रतिष्ठा । हो तों वरपडा कष्टा ॥ २ ॥ तुका ह्मणे मान । होतां उत्तम खंडन ॥ ३ ॥

॥ ३५०५ ॥ धरावें तें भय । अंतरोनि जाती पाय ॥ धृ० ॥ जाल्या तुटी देवासवें । काय वांचोनि करावें ॥ १ ॥ कोणासी पारिखें । लेखूं आपणासारिखें ॥ २ ॥ तुका ह्मणे असो । अथवा हें आतां नसो ॥ ३ ॥

॥ ३५०६ ॥ आह्मांसी सांगाती । होती अराले ते होती ॥ धृ० ॥ येती आइकतां हाक । दोन मिळोन ह्मणती एक ॥ १ ॥ आणिकां उत्तरीं । मसे गोंविली वैखरी ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल । खूण पहाती विठ्ठल ॥ ३ ॥

॥ ३५०७ ॥ आनंदाचा थारा । सुखें मोहरला झरा ॥ धृ० ॥ ऐसी प्रभुची क्या कळा ।

त्याच्या कोण पाहे बाळा ॥ १ ॥ अंकिता ऐसया । होइल पावविलें ठाया ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें । दिलें आभंड प्रकाशें ॥ ३ ॥

॥ ३५०८ ॥ काहे लकडा घांस कटावे । खोदहि जुमीन मठ बनावे ॥ धृ० ॥ देवलवासी तरवरछाया । घरघर माई खपरिबसमाया ॥ १ ॥ कां छांडिये भार फेरे सीर भागें । मायाको दुःख मिटलिये अंगें ॥ २ ॥ कहे तुका तुम सुनो हो सिद्धा । रामबिना और झुटा कछु धंदा ॥ ३ ॥

॥ ३५०९ ॥ आणिक पाखांडें असती उदंडें । तळमळिती पिंडे आपुलिया ॥ धृ० ॥ त्याचिया बोलाचा नाहीं विश्वास । घातलीसे कास तुझ्या नामीं ॥ १ ॥ दृढ एक चित्तें जालों या जीवासी । लाज सर्वविशीं तुह्मांसी हे ॥ २ ॥ पीडों नेदी पशु आपुले अंकित । आहे जें उचित तैसें करा ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती भाकावी करुणा । कोप नारायणा येइल तुह्मां ॥ ४ ॥

॥ ३५१० ॥ व्हावया भिकारी हें आह्मां कारण । अंतरोनि जन जावें दुरी ॥ धृ० ॥ संबंध तुटावा शब्दाचाही स्पर्श । ह्मणऊनि आस मोकलिली ॥ १ ॥ तुका ह्मणे दुःखें उबगला जीव । ह्मणउनी कींव भाकीं देवा ॥ २ ॥

॥ ३५११ ॥ कोरडिया ऐशा सारूनियां गोष्टी । करा उठाउठीं हित आधीं ॥ धृ० ॥ खोळंबला राहे आपुला मारग । पहावी ते मग तुटी कोठें ॥ १ ॥ लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दुःख देती ॥ २ ॥ तुका ह्मणे डांख लागे अळंकारें । मग नव्हे खरें पुटाविण ॥ ३ ॥

॥ ३५१२ ॥ ऐसें ठावें नाहीं मूढा । सोस काकुळती पुढां ॥ धृ० ॥ माझीं नका जाळूं भांडीं । पोटीं भय सोस तोंडीं ॥ १ ॥ पातलिया काळ । तेव्हां काय चाले बळ ॥ २ ॥ संचित तें करी । नरका जाया मेल्यावरी ॥ ३ ॥ परउपकार । न घडावा हा विचार ॥ ४ ॥ तुका ह्मणे लांसी । आतां भेटों नये ऐसी ॥ ५ ॥

॥ ३५१३ ॥ करुनी चिंतन खेळों भोवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥ धृ० ॥ येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥ सुखदुःखें तुज देउनी सकळ । नाहीं ऐसा काळ केला आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला देहाचा विसर । नाहीं आतां पर आप दोन्ही ॥ ३ ॥

॥ ३५१४ ॥ काळाच सारिखीं वाहाती क्षेत्रें । करितां दुसरें फळ नाहीं ॥ धृ० ॥ ऐसें करव्यानें ठेविलें करुन । भरिलें भरून माप नेमें ॥ १ ॥ शीतउष्णकाळीं मेघ वरुषावे । वरुषतां वाव होय शिण ॥ २ ॥ तुका ह्मणे विष अमृताचे किडे । पालट न घडे जीणें तया ॥ ३ ॥

॥ ३५१५ ॥ बोलणें तें आह्मी बोलों उपयोगीं । पडिलें प्रसंगीं काळाऐसें ॥ धृ० ॥ जयामध्यें देव आदि मध्यें अंतीं । खोल पाया भिंती न खचेसी ॥ १ ॥ करणें तें आह्मी करूं एका वेळे । पुढिलिया बळें वाढी खुंटे ॥ २ ॥ तुका ह्मणे असों आज्ञेचीं धारकें । ह्मणऊनि एकें घायें सारूं ॥ ३ ॥

॥ ३५१६ ॥ तुझिया विनोदें आह्मांसी मरण । सोसियेला सीण बहु फेरे ॥ धृ० ॥ आतां आपणचि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं ॥ १ ॥ वियोगेंचि आलों उसंतीत वनें । संकल्प हे मनें वाहोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्म सांपडलें सोपें । गोविथेलों पापें पुण्यें होतों ॥ ३ ॥

॥ ३५१७ ॥ पाठीलागा काळ येतसे या लागें । मी माझें वाउगें मेंढीऐसें ॥ धृ० ॥ आतां अगी लागो ऐसिया वेव्हारा । तूं माझा सोइरा पांडुरंगा ॥ १ ॥ वागविला माथां नसताचि भार । नव्हे तें साचार जाणील तों ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें जवळील दुरी । मृगजळ वरी आड आलें ॥ ३ ॥

॥ ३५१८ ॥ आपुलिये टाकीं । करीन कांहीं तरी एकी ॥ धृ० ॥ करीन पायांशीं वोळखी । करिसी तें करीं सुखी ॥ १ ॥ कायाक्लेशगंगाजळ । समर्पीन तुळसीदळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । कर जोडीन ते सेवा ॥ ३ ॥

॥ ३५१९ ॥ माझा तो स्वभाव मज अनावर । तुजही देतां भार कांहीं नव्हे ॥ धृ० ॥ ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृती स्वपना ताळ नाहीं ॥ १ ॥ संपारितों हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्या नाहीं पाठी पोट । असतें निर्वाट एकी जाती ॥ ३ ॥

॥ ३५२० ॥ नव्हावा तो बरा मुळींच संबंध । विश्वासिकां वध बोलिलासे ॥ धृ० ॥ आतां माझें हित काय तें विचारा । सत्यत्वें दातारा पांडुरंगा ॥ १ ॥ नाहीं भाव परी ह्मणवितों दास । नका देऊं यास उणें येऊं ॥ २ ॥ तुका ह्मणे कां हो उद्धरितां दीना । मानीतसां सीण मायबापा ॥ ३ ॥

॥ ३५२१ ॥ काय तुमचिया सेवे न वेचते गांठोळी । मोहें टाळाटाळी करीतसां ॥ धृ० ॥ चतुराच्या राया अहो पांडुरंगा । ऐसें तरी सांगा निवडुनी ॥ १ ॥ कोण तुह्मां सुख असे या कौतुकें । भोगितां अनेकें दुःखें आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जालासी निर्गुण । आह्मां येथें कोण सोडवील ॥ ३ ॥

॥ ३५२२ ॥ निष्ठुर यासाठीं करितों भाषण । आहेसी तूं सर्वजाण दाता ॥ धृ० ॥ ऐसें कोण दुःख आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ १ ॥ बैसलासी केणें करूनि एक घरीं । नाहीं येथें उरी दुसऱ्याची ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें अवघेंचि पायापें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ३ ॥

॥ ३५२३ ॥ पायांपासीं चित्त । तेणें भेटी अखंडित ॥ धृ० ॥ असे खेळे भलते ठायीं । प्रेमसूत्रदोरी पायीं ॥ १ ॥ केलेंसे जतन । मुळीं काय तें वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वजाणा । ठायीं विचारावें मना ॥ ३ ॥

॥ ३५२४ ॥ तुझें मजपाशीं मन । माझी येथें भूक तान ॥ धृ० ॥ जिव्हा रते एके ठायीं । दुजें बोलायाचें काई ॥ १ ॥ माझिया कवतुकें । उभा पहासी भातुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे साचें । तेथें मागील कईचें ॥ ३ ॥

॥ ३५२५ ॥ तुह्मां आह्मां सरी । येथें कइच्या या परी ॥ धृ० ॥ स्वामिसेवा अळंकार ।

नाहीं आवडिये थार ॥ १ ॥ खुंटलिया वाचा । मग हा आनंद काइचा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोडें । आह्मी नाचों तुज पुढें ॥ ३ ॥

॥ ३९२६ ॥ कैचें भांडवल खरा हातीं भाव । कळवळ्यानें माव दावीतसें ॥ धृ० ॥ आतां माझा अंत नको सर्वजाणा । पाहों नारायणा निवडुनी ॥ १ ॥ संतांचें उच्छिष्ट मागिलें पंगती । करावें संगती लागे ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों दावूनि विश्वास । संचित तें नास पावे ऐसें ॥ ३ ॥

॥ ३९२७ ॥ थोडे तुह्मी मागें होती उद्धरिले । मज ऐसे गेले वांया जीव ॥ धृ० ॥ आतां याचा कांहीं न मनावा भार । कृपेचा सागर आहेसी तूं ॥ १ ॥ तुज आळवितां पापाची वसती । राहे अंगीं किती बळ त्याचें ॥ २ ॥ तुका ह्मणे उदकीं तारिले दगड । तैसा मीही जड एक देवा ॥ ३ ॥

॥ ३९२८ ॥ आह्मी ह्मणों कोणी नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥ धृ० ॥ हागे माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरी सत्ता नाहीं ऐसी ॥ १ ॥ आह्मी तुज असों देऊनि आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥ २ ॥ तुका ह्मणे मज धरियेलें बळें । पंचभूतीं खळें करूनियां ॥ ३ ॥

॥ ३९२९ ॥ आहे तें सकळ प्रारब्धा हातीं । यावें काकुलती यासी आतां ॥ धृ० ॥ ऐसा माझ्या मनें सांगितला भाव । तोंवरीच देव दुजा नाहीं ॥ १ ॥ अवघियांचीं जेव्हां सारावी करकर । भावबळें थार धरूं येसी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज ठेवावें पुजून । आणिक ते गुण नाहीं येथें ॥ ३ ॥

॥ ३९३० ॥ शेवट तो होतो तुझियानें गोड । ह्मणऊनि चाड धरीतसों ॥ धृ० ॥ देऊं भोगाभोग कलिवराचा भार । साहों तुज थार त्याच मधीं ॥ १ ॥ तुझ्या बळें कांहीं खटपट काम । वाढवावा श्रम नलगे तो ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी चेंपलों या भारें । तुमचें तें खरें देवपण ॥ ३ ॥

॥ ३९३१ ॥ ऐसाचि तो गोवा । न पाहिजे केला देवा ॥ धृ० ॥ बहु आली दुरिवरी । ओढत हे भरोवरी ॥ १ ॥ आह्मांसी न कळे । तुह्मी झाकूं नये डोळे ॥ २ ॥ तुका ह्मणे संगें । असों एक एका अंगें ॥ ३ ॥

॥ ३९३२ ॥ मायलेंकरांत भिन्न । नाहीं उत्तराचा सीण ॥ धृ० ॥ धाडीं धाडीं वो आतुकें । रंजविल्याचें कौतुकें ॥ १ ॥ करूनि नवल । याचें बोलिलों ते बोल ॥ २ ॥ तुका ह्मणे माते । पांडुरंगे कृपावंते ॥ ३ ॥

॥ ३९३३ ॥ आवडी कां ठेवूं । बैसोनियां संगें जेवूं ॥ धृ० ॥ मागें नको ठेवूं उरी । आह्मी आण तुजवरी ॥ १ ॥ देखिले प्रकार । त्याचे पाहे न साचार ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळीं । केली चाहाडी सकळीं ॥ ३ ॥

॥ ३९३४ ॥ नव्हेसी तूं लांसी । माया आणिकां त्या ऐसी ॥ धृ० ॥ जे हे वांया जाती बोल । होती निर्फळचि फोल ॥ १ ॥ नव्हेसी दुबळी । कांहीं नाहीं तें जवळी ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटी । कांहीं नव्हेसी करंटी ॥ ३ ॥

॥ ३५३५ ॥ आह्मां बोल लावा । तुह्मा अनुचित हें देवा ॥ धृ० ॥ ऐसें सांगा कां च्यालेती । काय नाहीं तुह्मां हातीं ॥ १ ॥ आतां धरी दुरी । वांयां दवडाया थोरी ॥ २ ॥ तुका ह्मणे ठायीं । ऐसें विचारावें कांहीं ॥ ३ ॥

॥ ३५३६ ॥ मरोनियां गेली माया । मग तया कोण पुसे ॥ धृ० ॥ पोरटियांची दाद कोणा । ऐसा जाणा प्रवाहो ॥ १ ॥ निढळास निढळ जोडा । होय कोडा कवतुका ॥ २ ॥ तुका ह्मणे देवाऐसी । आहों सरसीं आपण ॥ ३ ॥

॥ ३५३७ ॥ संसाराची कोण गोडी । दिली जोडी करुनी ॥ धृ० ॥ निष्ठुर तूं बहु देवा । पुरे हेवा न ह्मणवी ॥ १ ॥ पाहोनियां कर्म डोळां । निराळा तो वर्जीना ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज माझें । ह्मणतां ओझें फुकट ॥ ३ ॥

॥ ३५३८ ॥ नव्हतें तें कळों आलें । तरी बोलें अबोला ॥ धृ० ॥ तुज मज घातली तुटी । एके भेटीपासुनी ॥ १ ॥ आतां याची न धरीं चाड । कांहीं कोड कवतुकें ॥ २ ॥ तुका ह्मणे यावें जावें । एका भावें खंडलें ॥ ३ ॥

॥ ३५३९ ॥ आतां दोघांमध्यें काय । उरलें होय वाणीजेसें ॥ धृ० ॥ निष्ठुर हें केलें मन । समाधान न करुनी ॥ १ ॥ झुरावें तें तेथींच्या परी । घरिच्याघरीं अवघिया ॥ २ ॥ तुका ह्मणे देवपण । गुंडाळून असों दे ॥ ३ ॥

॥ ३५४० ॥ मागितल्यास आस करा । उरी धरा कांहीं बाहीं ॥ धृ० ॥ ह्मणऊनि सारिली आस । होती यास मूळ तें ॥ १ ॥ माझ्या मोहें तुज पान्हा । लोटे स्तना वोरस ॥ २ ॥ तुका ह्मणे आळवणें । माझ्या देणें उत्तर ॥ ३ ॥

॥ ३५४१ ॥ आतां बरें घरिंच्या घरीं । आपली उरी आपणापें ॥ धृ० ॥ वोइटबरें न पडे दृष्टी । मग कष्टी होइजेना ॥ १ ॥ बोलों जातां वाढे बोल । वांयां फोल खटखट ॥ २ ॥ काकुलती यावें देवा । तो तों सेवा इच्छितो ॥ ३ ॥ हिशोबाचे खटखटे । चढे तुटे घडेना ॥ ४ ॥ तुका ह्मणे कळों आलें । दुसरें भलें तों नव्हे ॥ ५ ॥

॥ ३५४२ ॥ आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां तें मग गोवी नाहीं ॥ धृ० ॥ ऐसा चालोनियां आला शिष्टाचार । गोवीचा वेव्हार पापपुण्य ॥ १ ॥ पळणें तों पळा सांडूनि कांबळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें शूर तो निवडे । पडिले बापुडे कालचक्रीं ॥ ३ ॥

॥ ३५४३ ॥ उद्धत त्या जाती । द्रवें रंगल्या उद्धती ॥ धृ० ॥ ह्मणऊनि बहु फार । त्यांसी असावें अंतर ॥ १ ॥ केंचें पाठी पोट । गोडविषासी शेवट ॥ २ ॥ तुका ह्मणे सापा । न कळे कुरवाळिलें बापा ॥ ३ ॥

॥ ३५४४ ॥ आह्मां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ॥ धृ० ॥ जैसी तैसी माय बरी । मानिल्या त्या माना येरी ॥ १ ॥ व्यालीचा कळवळा । जीव बहुत कोंवळा ॥ २ ॥ कवतुकें वावरें । तुका ह्मणे या आधारें ॥ ३ ॥

॥ ३५४५ ॥ पाळितों वचन । परि बहु भीतें मन ॥ धृ० ॥ करितों पायांशीं सलगी ।

नये बैसों अंगसंगीं ॥ १ ॥ जोडोनियां कर । उभें असावें समोर ॥ २ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी मी बहु पतित ॥ ३ ॥

॥ ३५४६ ॥ जैसा तैसा आतां । मज प्रमाण अनंता ॥ धृ० ॥ पायां पडणें न संडीं । पोटीं तेंच वर तोंडीं ॥ १ ॥ एका भावें चाड । आहे तैसें अंतीं गोड ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां । टळणेंचि नाहीं नेमा ॥ ३ ॥

॥ ३५४७ ॥ चुकलों या ऐशा वर्मा । तरी कर्मा सांपडलों ॥ धृ० ॥ पाठी लागे करी नास । गर्भवास भोगवी ॥ १ ॥ माझें तुझें भिन्नभावें । गळा शवें मोहाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे पाठेळ केलों । नसत्या भ्यालों छंदासी ॥ ३ ॥

॥ ३५४८ ॥ देह प्रारब्धा शिरीं । असोन करी उद्वेग ॥ धृ० ॥ धांव घालीं नारायणा । माझ्या मना जागवीं ॥ १ ॥ ऐसी चुकोनियां वर्मे । पीडा भ्रमें पावलों ॥ २ ॥ तुका ह्मणे कैंचा भोग । नव्हे रोग अंगींचा ॥ ३ ॥

॥ ३५४९ ॥ अनंताच्या ऐकों कीर्ती । ज्याच्या चित्तीं हरिनाम । उलंघूनि गेले सिंधू । हा भवबंधु तोडोनियां ॥ १ ॥ आतां हळुहळु तेंचि वाहीं । चालों कांहीं अधिकारें ॥ धृ० ॥ खुंटूनियां गेले नावा । नाहीं हेवा खोळंबला । नलगे मोल द्यावा रुका । भावें एका कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहतों वाट । उभा नीट पाउलीं । भीमातिरीं थडवा केला । उठा चला लवलाहें ॥ ३ ॥

॥ ३५५० ॥ तरींच म्यां देवा । साटी करूनियां जीवा ॥ धृ० ॥ येथें बैसलों धरणें । दृढ कायावाचामनें ॥ १ ॥ आवरिल्या वृत्ती । मन घेऊनियां हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे जरा । बाहेर येऊं नेदीं घरा ॥ ३ ॥

॥ ३५५१ ॥ हें तों एक संतांठायीं । लाभ पायीं उत्तम ॥ धृ० ॥ ह्मणवितां त्याचे दास । पुढें आस उरेना ॥ १ ॥ कृपादान केलें संतीं । कल्पांतीही सरेना ॥ २ ॥ तुका ह्मणे संतसेवा । हाचि हेवा उत्तम ॥ ३ ॥

॥ ३५५२ ॥ नारायणा ऐसा । सेवूं नेणतील रसा ॥ धृ० ॥ जेणें भवव्याध तुटे । दुःख मातें न भेटे ॥ १ ॥ नलगे कांहीं आटी । बाधा राहों न सके पोटीं ॥ २ ॥ कैवल्य तें जोडे । पालट लवकरी घडे ॥ ३ ॥ जन्ममरणदुःख अटे । जाळें भवघेंचि तुटे ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाला । याचा गुण बहुतांला ॥ ५ ॥

॥ ३५५३ ॥ अनेक दोषांचें काट । जे जे गादले निर्वाट । होती हरिनामें चोखट । क्षण एक न लगतां ॥ १ ॥ तुह्मी हरि ह्मणा हरि ह्मणा । महादोषांचें छेदना ॥ धृ० ॥ अतिप्रीतीचा बांधला । नष्ट चांडाळीं रतला । क्षण न लगता नेला । वैकुंठासी हरि ह्मणतां ॥ २ ॥ अनंत दोषांचें मूळ । जालें वाल्मिका सबळ । जाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पैं जैसा ॥ ३ ॥ हरि ह्मणतां तरले । महादोषी गणिके नेले । कुंटणी भिली उद्धरिलें । वैकुंठासी हरि ह्मणतां ॥ ४ ॥ हरिविण जन्म नको वांया । जैसी दर्पणींची छाया । ह्मणोनि तुका लागे पायां । शरण तया हरीसी ॥ ५ ॥

॥ ३५५४ ॥ भजन या नासिलें हेंडी । दंभा लंडा आवडी ॥ धृ० ॥ जेवीत ना

आइता पाक । नासी ताक घुसळुनीं ॥ १ ॥ एकाएकीं इच्छी पाठ । नेणें चाट कां जेवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे मुलाम्याचें । बंधन साचें सेवटीं ॥ ३ ॥

॥ ३९९५ ॥ जैसा निर्मळ गंगाओघ । तैसा भाग वोगरीं ॥ धृ० ॥ प्रेम वाढे भासोभासीं । ब्रह्मरसीं भोजन ॥ १ ॥ तृप्तीवरि आवडी उरे । ऐसे बरे प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे पाखमन । नारायण तें भोगी ॥ ३ ॥

॥ ३९९६ ॥ सुख सुखा विरजण जालें । तें मथलें नवनीत ॥ धृ० ॥ झाले डोले हरुषे काया । निवती बाह्या नयन ॥ १ ॥ प्रबल तो नारायण । गुणें गुण वाढला ॥ २ ॥ तुका ह्मणे भरली सींग । वरी मग वोसंडे ॥ ३ ॥

॥ ३९९७ ॥ कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगिकारी ॥ धृ० ॥ होईल यमपुरी । यमदंड यातना ॥ १ ॥ कोण जाली लगबग । काय करिसि तेथें मग ॥ २ ॥ कां रे भरला ताटा । करिती वोज नेतां वाटा ॥ ३ ॥ तोंडा पडिली खिळणी । जिव्हा पिटिती वोढुनी ॥ ४ ॥ कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ॥ ५ ॥ लाज धरीं ह्मणे तुका । नको वांयां जाऊं फुका ॥ ६ ॥

॥ ३९९८ ॥ देवों कपाट । कीं कोणें काळें राखों वाट ॥ धृ० ॥ काय येईल तें चिरीं । आज्ञा धरूनियां करीं ॥ १ ॥ करूं कळे तैसी मात । किंवा राखावा एकांत ॥ २ ॥ तुका ह्मणे जागों । किंवा कोणा नेदूं वागों ॥ ३ ॥

॥ ३९९९ ॥ क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपणचि खेळे आपणाशीं ॥ धृ० ॥ मधील ते वाव अवघी उपाधी । तुह्मांआह्मांमधीं तेच्चि परी ॥ १ ॥ घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि तें ॥ २ ॥ तुका ह्मणे बीजें बीज राखविलें । फल पुष्प आलें गेलें वांयां ॥ ३ ॥

॥ ३९६० ॥ एक आतां तुह्मी करा । मज दातारा सत्तेनें ॥ धृ० ॥ विश्वास तो पायांवरी । ठेवूनि हरि राहिलों ॥ १ ॥ जाणतचि तुजें नाहीं । आणिक कांहीं प्रकार ॥ २ ॥ तुका ह्मणे शरण आलों । काय बोलों विनवितों ॥ ३ ॥

॥ ३९६१ ॥ काय विनवावें कोण तो निवाड । केलें माझ्या कोड वचनाचें ॥ धृ० ॥ आहो कृपानिधि गुणांच्या निधाना । माझ्या अनुमाना नयेचि हें ॥ १ ॥ बहुत करुणा केलेंसें भाषण । एकही वचन नाहीं आलें ॥ २ ॥ माझी कांहीं सेवा होईल पावली । निश्चिती मानिली होती ऐसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी उरली ते आटी । अभय कर कटी न देखेंची ॥ ४ ॥

॥ ३९६२ ॥ लाजोनियां काळें राहिलें लिखित । नेदितांही चित्त समाधान ॥ धृ० ॥ कैसें सुख वाटे वचनाचे तुटी । प्रीतीविण भेटी रुचि नेदी ॥ १ ॥ एकाच्यिये भेटी एकाचा कोंपर । मावेचा पदर कळों येतो ॥ २ ॥ होत्या आपल्या त्या वेचूनियां शक्ती । पुढें जालों युक्ति कळाहीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी समर्थ जी देवा । दुर्बळाची सेवा कोठें पावे ॥ ४ ॥

॥ ३९६३ ॥ आशाबद्ध बहु असें निलाजिरें । होय ह्मणे धीरें फळ टोंकें ॥ धृ० ॥

कारणापें चित्त न पाहें अपमान । चित्त समाधान लाभासाठीं ॥ १ ॥ तुका ह्मणे हातें लोटिलें न कळे । झांकितसें डोळे पांडुरंगा ॥ २ ॥

॥ ३९६४ ॥ साता पांचां तरीं वचनां शेवटीं । निरोप कां भेटी एक तरी ॥ धृ० ॥ कां नेणें निष्ठुर केलें नारायणा । न देखें हें मना येतां कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा न देखें निवाड । कडू किंवा गोड फळ पोटीं ॥ ३ ॥

॥ ३९६५ ॥ वांयां ऐसा जन्म गेला । हें विठ्ठला दुःख वाटे ॥ धृ० ॥ नाहीं सरता जालों पायीं । तुह्मी जईं न पुसा ॥ १ ॥ कां मी जीतों संवसारीं । अद्यापवरी भूमिभार ॥ २ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । सबळ व्यथा भवरोग ॥ ३ ॥

॥ ३९६६ ॥ कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड कां एक केला नाहीं ॥ धृ० ॥ मग तळमळ न करितें मन । जालें तें कारण कळों येतें ॥ १ ॥ तुका ह्मणे केला पाहिजे निवाड । वैद्यासी ते भीड मरण रोग्या ॥ २ ॥

॥ ३९६७ ॥ ऐसें कोण पाप बळी । जें जवळी येऊं नेदी ॥ धृ० ॥ तुह्मां तंव होइल ठावें । नेदावें कां कळों हें ॥ १ ॥ कोण झाला अंतराय । कां ते पाय अंतरले ॥ २ ॥ तुका ह्मणे निमित्याचा । आला सुचा अनुभव ॥ ३ ॥

॥ ३९६८ ॥ ब्रह्मज्ञानाची भरोवरी । पुढिला सांगे आपण न करी ॥ धृ० ॥ थू थू त्याच्या तोंडावरी । व्यर्थ सिणवी वैखरी ॥ १ ॥ कथा करी वरिवरी । प्रेम नसेचि अंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कवित्व करी । मान वस्तु हे आदरी ॥ ३ ॥

॥ ३९६९ ॥ कधीं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ धृ० ॥ भेटी लागीं पंढरिनाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥ १ ॥ सिणलें माझें मन । वाट पाहतां लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे लागली भूक । तुझें पहावया श्रीमुख ॥ ३ ॥

॥ ३९७० ॥ उच्चारूं यासाठीं । आह्मी नाम तुझें कंठीं ॥ धृ० ॥ येसी धांवत धांवत । माउलिये कृपावंते ॥ १ ॥ पाय चित्तीं धरूं । क्रीडा भलते ठायीं करूं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे गंगे । प्रेमभरित पांडुरंगे ॥ ३ ॥

॥ ३९७१ ॥ दगडाच्या देवा बगाड नवस । बाईल कथेस जाऊं नेदी ॥ धृ० ॥ वेची धनरासी बांधलें स्मशान । दारीं वृंदावन झाड मानी ॥ १ ॥ चोरें नागविला न करी त्याची खंती । परि द्विजाहातीं नेदी रुका ॥ २ ॥ करी पाहुणेर व्याह्याजांवयासी । आल्या अतितासी पाठमोरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो धिग त्याचें जिणें । भार वाही सीण वर्म नेणें ॥ ४ ॥

॥ ३९७२ ॥ करूनि विनवणी । माथा ठेवितों चरणीं ॥ धृ० ॥ होतें तेंचि असों द्यावें । रूप सौम्यचि बरवें ॥ १ ॥ भया भेणें तुमचा ठाव । तुमच्या कोपें कोठें जावें ॥ २ ॥ तुका पायां लागे । दान समुदाय मागे ॥ ३ ॥

॥ ३९७३ ॥ प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणें ॥ धृ० ॥ कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंगसंगें ॥ १ ॥ पोटामध्यें कोणें सांगितलें

सर्पा । उपजत लपा ह्मणउनी ॥ २ ॥ बोलों नेणें परि जाणें गोड क्षार । अंतरीं विचार त्यासी ठावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरें विचारावें मनीं । आणिक भल्यांनीं पुसों नये ॥ ४ ॥

॥ ३५७४ ॥ आतां मी पतित ऐसा साच भावें । कळों अनुभवें आलें देवा ॥ धृ० ॥ काय करावें तें रोकडेंचि करीं । राहिली हे उरी नाहीं दोघां ॥ १ ॥ येर येरा दृष्टि द्यावया उत्तरा । यासी काय करा गोष्टी आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे मेलों सांगत सांगतां । तेंचि आलें आतां कळों तुह्मां ॥ ३ ॥

॥ ३५७५ ॥ काय तुज मागें नाहीं जाणवलें । माझें नाहीं केलें हित कांहीं ॥ धृ० ॥ डोळे झांकूनियां होसी अबोलणा । तेव्हां नारायणा आतां कैसा ॥ १ ॥ न कळे उचित न संगतां स्पष्ट । ऐसा क्रियानष्ट काय जाणें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा घात तुह्मां ठावा । तरि कां आधीं देवा वारूं नये ॥ ३ ॥

॥ ३५७६ ॥ नये ऐसें बोलों कठिण उत्तरें । सलगी लेंकुरें केली पुढें ॥ धृ० ॥ अपराध कीजे घडला तो क्षमा । सिकवा उत्तमा आमुचिया ॥ १ ॥ धरूं धांवें आगी पोळेल तें नेणें । ओढिलिया होणें माते बाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भार ज्याचा जार त्यासी । प्रवीण येविशीं असा तुह्मी ॥ ३ ॥

॥ ३५७७ ॥ लडिवाळ ह्मणोनी निष्ठुर न बोला । परि सांभाळिला लागे घात ॥ धृ० ॥ बहु वागवीत आणिलें दुरुनी । दासांची पोसनी बहु आहे ॥ १ ॥ नाहीं लागों दिला आघाताचा वारा । निष्ठुर उत्तरा कोमेजतों ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी कृपावंत हरी । शांतवा उत्तरीं अमृताच्या ॥ ३ ॥

॥ ३५७८ ॥ आत्मस्थिति मज नको हा विचार । देईं निरंतर चरणसेवा ॥ धृ० ॥ जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेचि गोडी माझ्या देईं जीवा ॥ १ ॥ काय सायुज्यता मुक्ति हेचि गोड । देवभक्त कोड तेथें नाहीं ॥ २ ॥ काय तें निर्गुण पाहों कैशापरी । वर्णूं तुह्मी हरि कीर्ति कैसी ॥ ३ ॥ गोड चरणसेवा देवभक्तपणें । मज देवा ह्मणें दुराविसी ॥ ४ ॥ जाणिवेपासूनि सोडवीं माझ्या जीवा । देईं चरणसेवा निरंतर ॥ ५ ॥ तुका ह्मणे गोडागोड नलगे प्रीती । सेवेविण चित्तीं सार नाहीं ॥ ६ ॥

॥ ३५७९ ॥ चालें दंडवत घालीं नारायणा । आपुल्या कल्याणा लागूनियां ॥ धृ० ॥ बैसविला पदीं पुत्र राज्य करी । पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची ॥ १ ॥ तुका ह्मणे आहे ठायींचाचि मान । आतां अनुमान कायसा तो ॥ २ ॥

॥ ३५८० ॥ समर्थाचें बाळ पांघरें वाकळ । हसती सकळ लोक कोणा ॥ धृ० ॥ समर्थासी लाज आपुल्या नांवाची । शरण आल्याची लागे चिंता ॥ १ ॥ जरी तुज कांहीं होईल उचित । तरी हा पतित तारीं तुका ॥ २ ॥

॥ ३५८१ ॥ न करीं रे मना कांहींच कल्पना । चिंतीं या चरणां विठोबाच्या ॥ धृ० ॥ येथें सुखाचिया अमुपचि रासी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥ १ ॥ सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख । शोक मोह दुःख पाहातां नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें होईल विसांवा । तुटतील हांवा पुढिलिया ॥ ३ ॥

॥ ३९८२ ॥ काय करूं मज नागविलें आळसें । बहुत या सोसें पीडा केली ॥ धृ० ॥ हिरोनियां नेला मुखींचा उचार । पडिलें अंतर जवळीच ॥ १ ॥ द्वैताचिया कैसा सांपडलों हातीं । बहुत करती ओढाओढी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुलिया सवें । न्यावें मज देवें सोडवुनी ॥ ३ ॥

॥ ३९८३ ॥ नाहीं देवाचा विश्वास । करी संतांचा उपहास ॥ धृ० ॥ त्याचे तोंडीं पडे माती । हीन शूकराची जाती ॥ १ ॥ घोकुनी अक्षर । वाद छळणा करीत फिरे ॥ २ ॥ ह्मणे देवासी पाषाण । तुका ह्मणे भावहीन ॥ ३ ॥

॥ ३९८४ ॥ हेंचि सर्वसुख जपावा विठ्ठल । न दवडावा पळ क्षण वांयां ॥ धृ० ॥ हेंचि एक सर्वसाधनांचें मूळ । आतुडे गोपाळ येणें पंथें ॥ १ ॥ न लगती कांहीं तपांचिया रासी । करणें वाराणसी नाना तीर्थें ॥ २ ॥ कल्पना हे तिळ देहीं अभिमान । नये नारायण जवळी त्यांच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामें देव नेदी भेटी । ह्मणे त्याचे होंटीं कुष्ट होय ॥ ४ ॥

॥ ३९८५ ॥ माझे विषयीं तुज पडतो विसर । नको धरूं दूर पांडुरंगा ॥ धृ० ॥ तुझा ह्मणवितों हेंचि लाज तुला । आतां ह्मणी मला विसरेसी ॥ १ ॥ तुका ह्मणे तुह्मी माझी नाहीं उरी । आतां केली खरी देवराया ॥ २ ॥

॥ ३९८६ ॥ अभक्ताचे गांवीं साधु ह्मणजे काय । व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥ धृ० ॥ कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण । बस्वणाची आण तया काई ॥ १ ॥ केळीं आणि बोरी वसती सेजारी । संवाद कोणे परी घडे येथें ॥ २ ॥ तुका ह्मणे खीर केली कान्हेळ्याची । शुद्ध गोडी कैची वसे तेथें ॥ ३ ॥

॥ ३९८७ ॥ भागल्यांचा तूं विसांवा । करीं नांवा निंबलोण ॥ धृ० ॥ परमानंदा पुरुषोत्तमा । हरीं या भ्रमापासुनी ॥ १ ॥ अनाथांचा अंगिकार । करितां भार न मनिसी ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छा पुरे । ऐसे धुरे गे विठ्ठले ॥ ३ ॥

॥ ३९८८ ॥ घालूनियां कास । बळें आलों मागायास ॥ धृ० ॥ प्रेमें देई पाठवुनी । पांडुरंगा सेवाऋणी ॥ १ ॥ होई रे शाहाणा । कळों नेदावें या जना ॥ २ ॥ तुका ह्मणे पायीं । जडलों मग उरलें काई ॥ ३ ॥

॥ ३९८९ ॥ भेटीलागीं पंढरिनाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥ धृ० ॥ कैं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ १ ॥ सीणलें माझें मन । वाट पाहातां लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे भूक । तुझें पाहावया मुख ॥ ३ ॥

॥ ३९९० ॥ सांडियेली काया । वरी ओंवाळुनी पायां ॥ धृ० ॥ शरण शरण नारायणा । मज अंगिकारा दीना ॥ १ ॥ आलों लोटांगणीं । रुळें तुमचे चरणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कई । डोई ठेवीन हे पायीं ॥ ३ ॥

॥ ३९९१ ॥ तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥ धृ० ॥ धरणें घेतलें घरांत । नको धरून उठवूं हात ॥ १ ॥ घेतली मुरकुंडी । थोर जालों मी लंडी ॥ २ ॥ तुका ह्मणे जगजीवना । ब्रिदें पाहें नारायणा ॥ ३ ॥

॥ ३५९२ ॥ पडिलों बाहेरि आपल्या कर्तव्यें । संसाराचा जीवें वीट आला ॥ धृ० ॥ एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडलिया ॥ १ ॥ दोनी जालीं नांवें एकाच्या मथनें । भुस सार गुणें वेगळालीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें वसे मुक्ताफळ । सिपल्याचें स्थळ खंडलिया ॥ ३ ॥

॥ ३५९३ ॥ पाहातां हें बरवें जालें । कळों आलें यावरी ॥ धृ० ॥ मागिलांचा जाला झाडा । त्या निवाडास्तव ॥ १ ॥ विसांवलें अंग दिसे । सरिसे बुद्धि अनुभव ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें जालें । देवें नेलें गवसुनी ॥ ३ ॥

॥ ३५९४ ॥ चक्रफेरीं गळीं गळा । होता गोवियेला माळा ॥ धृ० ॥ फुटोनियां गेला कुंभ । जालों निष्काम स्वयंभ ॥ १ ॥ धरितचि नाहीं थारा । वेठी भ्रमण खोंकरा ॥ २ ॥ तुका ह्मणे कौतुक कोडें । आगी काय जाणें मढें ॥ ३ ॥

॥ ३५९५ ॥ श्रमपरिहारा । मूळ हें जालें दातारा ॥ धृ० ॥ देह निवेदूनि पायीं । जालों रिकामा उतराई ॥ १ ॥ आपली ते सत्ता । येथें असों नेदीं आतां ॥ २ ॥ राहिला निराळा । तुका कटकटे वेगळा ॥ ३ ॥

॥ ३५९६ ॥ पाठवाल तेथें गर्जेन पवाडे । कायीं देहाकडे नांवलोकीं ॥ धृ० ॥ ह्मणऊनि मागें कंठींचा सौरस । पावतील नास विघ्नें पुढें ॥ १ ॥ कृपेच्या कटाक्षें न भें कळिकाळा । येतां येत बळाशक्तीपुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे गुढी आणीन पायांपें । जगा होइल सोपें नाम तुझें ॥ ३ ॥

॥ ३५९७ ॥ उपजल्या काळें शुभ कां शकुन । आतां आवरोन राहिलेती ॥ धृ० ॥ नाहीं मागितली वचनाची जोडी । निष्काम रोकडी वरिवरी ॥ १ ॥ सत्याविण काय उगीच लांबणी । कारियाची वाणी येर भूस ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी कोणा चाळवणी । न विचारा मनीं पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३५९८ ॥ नव्हें मी आहाच आशेचें बाधलें । जें हें टोंकाविलें नारायणा ॥ धृ० ॥ अंतर तों तुह्मां बरें कळों येतें । वेव्हार उचितें चाळवीजे ॥ १ ॥ मनें कल्पिलें आवरितां पाप । संकल्पीं विकल्प याचि नांवें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां न सोसे जळजळ । सिजल्यावरी जाळ कढ खोटा ॥ ३ ॥

॥ ३५९९ ॥ ताकें कृपण तो जेवूं काय घाली । आहाच ते चालीवरुनि कळे ॥ धृ० ॥ काय तुह्मां वेचे घातलें सांकडें । माझें आलें कोडें आजिवरी ॥ १ ॥ सेवेविण आह्मी न लिंपों हे काया । जाला देवराया निर्धार हा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी राखावया ब्रीदें । येथें अनुवादें कारियासी ॥ ३ ॥

॥ ३६०० ॥ वृत्तिवरी आह्मां येणें काशासाठीं । एवढी हे आटी सोसावया ॥ धृ० ॥ जाणतसां परि नेणते जी देवा । भ्रमचि बरवा राखावा तो ॥ १ ॥ मोडूनि क्षरलों अभेदाची मूस । तुह्मां कां आळस वोढवला ॥ २ ॥ तुका ह्मणे होई लवकरी उदार । लांबणीचें फार काम नाहीं ॥ ३ ॥

॥ ३६०१ ॥ सुलभ कीर्तनें दिलें ठसावूनी । करितां धरणी उरी कोण ॥ धृ० ॥ आतं

न टळावें केलिया नेमासी । उदाराचा होसी हीन काय ॥ १ ॥ एका नेमें कोठें दुसरा पालट । पादर तो धीट ह्मणती त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे किती बोलसील उणें । एकाच्च वचनें खंड करीं ॥ ३ ॥

॥ ३६०२ ॥ जेथें माझी दृष्टि राहिली बैसोन । तेथेंचि हें मन गुंडाळतें ॥ धृ० ॥ टाळावीते पीडा आपुल्यापासुन । दिठावलें अन्न ओकावितें ॥ १ ॥ तुह्मांसी कां कोडें कोणेही विशीचें । नवलाव याचें वाटतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे वेगीं उभारा जी कर । कीर्ति मुखें थोर गर्जईन ॥ ३ ॥

॥ ३६०३ ॥ इच्छेपाशीं आलों फिरोनि मागुता । स्वामिसेवकता आवडीचे ॥ धृ० ॥ घ्यावें लवकरी मागितलें दान । मुळींचें जतन करूनि असें ॥ १ ॥ उपाय हे करीं एकाचि वचना । दावूनियां खुणा ठाया येतों ॥ २ ॥ तुका ह्मणे गांठी किती तुजपाशीं । जगाच्या तोडिसी चिंतनानें ॥ ३ ॥

॥ ३६०४ ॥ कोठें आतां आह्मी वेचावी हे वाणी । कोण मना आणी जाणोनियां ॥ धृ० ॥ न करावी सांडी आतां टाळाटाळी । देइन ये काळीं होइल माजी ॥ १ ॥ घरोघरीं जाल्या ज्ञानाचिया गोष्टी । सत्यासवें गांठी न पडावी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां भाकितां करुणा । भलताचि शाहाणा शोध काढी ॥ ३ ॥

॥ ३६०५ ॥ डगमगी मन निराशेच्या गुणें । हें तों नारायणें सांतवीजे ॥ धृ० ॥ धीरें तूं गंभीर जीवन जगाचें । जळो विभागाचें आत्रीतत्या ॥ १ ॥ भेईल जीव हें देखोनि कठिण । केला जातो सीण तो तो वांया ॥ २ ॥ तुका ह्मणे आवश्यक हें वचन । पाळावेंचि दान समयो आहे ॥ ३ ॥

॥ ३६०६ ॥ आह्मी पाहा कैसीं एकतत्त्व जालों । राखणें लागलों वासनेसी ॥ धृ० ॥ तुह्मांविण कांहीं नावडावें जीवा । केला तोचि देवा केला पण ॥ १ ॥ वर्म नेणों परि वृत्ति भंगों नेदूं । वंदिलेंचि वंदूं आवडीनें ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे नामाचें जीवन । वारताही भिन्न नेणों आतां ॥ ३ ॥

॥ ३६०७ ॥ आपण तों असा । समर्थ जी हृषीकेषी ॥ धृ० ॥ करा करा बुझावणी । काय विलंब वचनीं ॥ १ ॥ हेंगे ऐसें ह्मणा । उठूनि लागेन चरणा ॥ २ ॥ घेऊनियां सुखें । नाचेल तुका कवतुकें ॥ ३ ॥

॥ ३६०८ ॥ ह्याल ऐसें दिसे । तुमचें साचपण इच्छे ॥ धृ० ॥ ह्मणऊनि न भंगे निर्धार । केलें लोचनें सादर ॥ १ ॥ सुखाचीच वास । पुरला पाहे अवकाश ॥ २ ॥ तुका ह्मणे कळे । काय लाभ कोणें वेळे ॥ ३ ॥

॥ ३६०९ ॥ तुह्मी तों सदैव । आधीरपणें माझी हांव ॥ धृ० ॥ जळो आशेचें तें जिणें । टोंकतसों दीनपणें ॥ १ ॥ येथूनि सोडवा । आतां अनुभवेंसी देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें । एक मग हें निमालें ॥ ३ ॥

॥ ३६१० ॥ कैसें भलें देवा अनुभवा कां नये । उसीर तो काय तुह्मांपाशीं ॥ धृ० ॥ आहे तें मागतों दिसतें जवळी । केल्यामध्यें काळि कोण साध्य ॥ १ ॥ नाहीं सांडीत मी

सेवेची मर्यादा । लाविला तो धंदा नित्य करीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हात आवरिला गुंती । माझे तंव चित्तीं नाहीं दुजें ॥ ३ ॥

॥ ३६११ ॥ हुंदकी पिसवी हलवी दाढी । मणी वोढी निंदेचे ॥ धृ० ॥ त्याचें फळ पाकीं यमाचे दंड । घर केलें कुंड कुंभपाक ॥ १ ॥ क्रोध पोटीं मांग आणिला अंतरा । भुंकोनि कुतरा जप करी ॥ २ ॥ तुका ह्मणे स्नान केलें मळमूत्रें । जेववि‍लीं पितरें अमंगळें ॥ ३ ॥

॥ ३६१२ ॥ अंगा भरला ताठा । नये वळणी जैसें खुंटा ॥ धृ० ॥ कैसा न कळे त्या डेंगा । हित आदळलें अंगा ॥ १ ॥ जीव जाते वेळे । भरे लकडा ताठी डोळे ॥ २ ॥ मुसळाचें धनू । तुका ह्मणे नव्हे अनू ॥ ३ ॥

॥ ३६१३ ॥ करूनि कडविड । जमा घडिली लगड ॥ धृ० ॥ आतां होतें तेंचि जालें । नाम ठायींचें चांगलें ॥ १ ॥ उतरलें डाईं । उत्तम ते सुलाख ताई ॥ २ ॥ हिंडवितां देश । तुका ह्मणे नाहीं नाश ॥ ३ ॥

॥ ३६१४ ॥ पढीयंतें मागा पांडुरंगापाशीं । मज दुर्बळासी काय पीडा ॥ धृ० ॥ याच साठीं दुराविला संवसार । वाढे हे अपार माया तृष्णा ॥ १ ॥ कांहीं करितां कोठें नव्हे समाधान । विचारितां पुण्य तेंचि पाप ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां निश्चळचि भलें । तुज आठविलें पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३६१५ ॥ नव्हे मी शाहाणा । तरी ह्मणा नारायणा ॥ धृ० ॥ तुह्मां बोलवाया कांहीं । येच भरलोंसे वाहीं ॥ १ ॥ आणावेति रूपा । कोपलेती तरी कोपा ॥ २ ॥ कळोनि आवडी । तुका ह्मणे जाते घडी ॥ ३ ॥

॥ ३६१६ ॥ आह्मी भाविकें हे काय जाणों खोडी । आइकोनि प्रौढि विनविलें ॥ धृ० ॥ नाहीं ऐसें येथें जालेती असतां । वाढविली चिंता अधिक सोसें ॥ १ ॥ न कळेचि आधीं करितां विचार । न धरितां धीर आहाचता ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां वचनें वचन । वाढलें तीक्षण बुद्धि जाली ॥ ३ ॥

॥ ३६१७ ॥ कोठें देवा बोलों । तुह्मां भीड घालूं गेलों ॥ धृ० ॥ करावया सत्त्वहानी । भांडवलाची टांचणी ॥ १ ॥ दुर्बळा मागतां । त्याच्या प्रवर्तला घाता ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । मज कळलें ऐसें कांहीं ॥ ३ ॥

॥ ३६१८ ॥ काय त्या दिवस उचिताचा आला । मागील जो केला श्रम होता ॥ धृ० ॥ ठेवियेला पूर्ण करूनि संकेत । तयापाशीं चित्त लागलेंसे ॥ १ ॥ जाणसी गे माते लेंकरांचे लाड । नये पडों आड निष्ठुरता ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मीं करावें वचन । तुह्मांसी जतन करणें तें ॥ ३ ॥

॥ ३६१९ ॥ पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें । संकल्प ते मनें जिरवले ॥ धृ० ॥ चेष्टविले तरी सांगावें कारण । भक्ति ते उजवण करावया ॥ १ ॥ लावूनियां दृष्टि घेतली सामोरी । बैसलें जिव्हारीं डसोन तें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवा लाविला तो चाळा । करावें गोपाळा शीघ्र दान ॥ ३ ॥

॥ ३६२० ॥ मागील विसर होईल सकळ । केली तळमळ दुःखाची ते ॥ धृ० ॥ दोहींचें ऐक्य घाली गडसरीं । स्थिरावेल बुद्धि पायांपाशीं ॥ १ ॥ अहाच या केलों देहपरिचारें । तुमचें तें खरें वाटों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें लवकरी उदार । मी आहें सादर प्रतिग्रहासी ॥ ३ ॥

॥ ३६२१ ॥ वाढवावा पुढें आणीक प्रकार । एकचि तें फार रुचि नेदी ॥ धृ० ॥ निच नवें लेणें देह हा पवाडा । पालट रोकडा बरावरी ॥ १ ॥ दिसे शोभिवंत सेवेनें सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे आजी पाववा संतोष । करूनि कीर्तिघोष नाचईन ॥ ३ ॥

॥ ३६२२ ॥ क्षोभ आणि कृपा मातेची समान । विभाग जतन करूनि ठेवी ॥ धृ० ॥ क्षणभंगुर ते उपजली चिंता । खरी अखंडता आवडीची ॥ १ ॥ सिकवूं जाणें ते गोमाटियासाठीं । लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ॥ २ ॥ अवघेंचि मिथ्या समया आरतें । देता तो उचितें काळ जाणे ॥ ३ ॥ न करी वेव्हार नेदी गांजूं कोणा । भेडसावी तान्हें हाऊ आला ॥ ४ ॥ तुका ह्मणे करी जिवाची जतन । उचकुनि मन जवळी आणी ॥ ५ ॥

॥ ३६२३ ॥ संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ॥ धृ० ॥ हागों जातां दगड सोंची । अंतरींही संकल्प ॥ १ ॥ लाज तेवढी नारायणीं । वांकडी वाणी पोरांपें ॥ २ ॥ तुका ह्मणे बेशरमा । श्रमावरी पडिभरू ॥ ३ ॥

॥ ३६२४ ॥ मी त्यांसी अनन्य ती कोणा असती । ऐसें तंव चित्तीं विचारावें ॥ धृ० ॥ आहे तो विचार आपणयापाशीं । कळा बिंबाऐसी प्रतिबिंबीं ॥ १ ॥ शुभ शकुन तो शुभ लाभें फळे । पुढील तें कळे अनुभवें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा असेल आठव । तैसा माझा भाव तुझ्या पायीं ॥ ३ ॥

॥ ३६२५ ॥ बहु कृपावंतें माझीं मायबापें । मी माझ्या संकल्पें अंतरलों ॥ धृ० ॥ संचितानें नाहीं चुकों दिली वाट । लाविलें अदृष्ट मजसवें ॥ १ ॥ आतां मी रुसतों न कळतां वर्म । परि ठावे धर्म सर्व देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे उभा राहिला न बैसे । आमची माय असे उद्वेग त्या ॥ ३ ॥

॥ ३६२६ ॥ कैसीं दिसों बरीं । आह्मीं आळवितां हरी ॥ धृ० ॥ नाहीं सोंग अळंकार । दास जाला संवसार ॥ १ ॥ दुःख आह्मां नाहीं चिंता । हरिचे दास ह्मणवितां ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । ऐसीं जालों करितां सेवा ॥ ३ ॥

॥ ३६२७ ॥ आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं । सखीं सहोदरीं मोकलिलों ॥ धृ० ॥ जनाचारामध्यें उडाला पातेरा । जालों निलाजिरा ह्मणउनी ॥ १ ॥ कोणाचिया दारा जावेनासें जालें । म्यांच विटंबिलें आपणासी ॥ २ ॥ कोण जाला माझे बुद्धीसी संचार । नाहीं कोठें थार ऐसें जालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज भक्त जाले फार । ह्मणोनियां थार नाहीं येथें ॥ ४ ॥

॥ ३६२८ ॥ जेथें जातों तेथें पडतो मतोळा । न देखिजे डोळां लाभ कांहीं ॥ धृ० ॥ कपाळीची रेखा असती उत्तम । तरि कां हा श्रम पावतों मी ॥ १ ॥ नव्हेचि तुह्मांस

माझा अंगिकार । थीता संवसार अंतरला ॥ २ ॥ भोग तंव जाला खरा भोगावया तो । भांडवल नेतो आयुष्य काळ ॥ ३ ॥ कोठें तुझी कीर्ति आइकिली देवा । मुक्तों कां जीवा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३६२९ ॥ कां जी आह्मां होतें दोषांचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥ धृ० ॥ पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळही ॥ १ ॥ कां जी आह्मांवरि आणिकांची सत्ता । तुह्मांसी असतां जवळिकें ॥ २ ॥ तुका ह्मणे पायीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता ॥ ३ ॥

॥ ३६३० ॥ निदावें हें जग । ऐसा भागा आला भाग ॥ धृ० ॥ होतें तैसें आलें फळ । गेलें निवडूनि सकळ ॥ १ ॥ दुसऱ्याच्या मता । मिळेनासें जालें चित्ता ॥ २ ॥ तुका जाला सांडा । विटंबिती पोरें रांडा ॥ ३ ॥

॥ ३६३१ ॥ माझे माथां तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ॥ धृ० ॥ ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ॥ १ ॥ येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ॥ ३ ॥

॥ ३६३२ ॥ सत्य त्यागाचि समान । नलगे वेचावें वचन ॥ धृ० ॥ नारायणा ऐसे दास । येरयेरांचीच आस ॥ १ ॥ मळ नाहीं चित्ता । तेथें देवाचीच सत्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे जाण । तेंच भल्याचें वचन ॥ ३ ॥

॥ ३६३३ ॥ माझिये बुद्धीचा खुंटला उपाव । करिसील काय पाहेन तें ॥ धृ० ॥ सूत्रधारी तूं हें सकळचाळिता । कासया अनंता भार वाहों ॥ १ ॥ वाहिले संकल्प न पवती सिद्धी । येऊं देहबुद्धीवरी नये ॥ २ ॥ तुका ह्मणे दुःखी करिती तरंग । चिंतूं पांडुरंग आवरून ॥ ३ ॥

॥ ३६३४ ॥ देखिलें तें धरिन मनें । समाधानें राहेन ॥ धृ० ॥ भाव माझी सांटवण । जगजीवन कळावया ॥ १ ॥ बोळवीन एकसरें । उत्तरें या करुणेच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे नयों रूपा । काय बापा करीसी ॥ ३ ॥

॥ ३६३५ ॥ वांया जाय ऐसा । आतां उगवावा फांसा ॥ धृ० ॥ माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदुःखाचीं वचनें ॥ १ ॥ हाचि आह्मां ठाव । पायीं निरोपाया भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे जार । तुझा तुज देवा भार ॥ ३ ॥

॥ ३६३६ ॥ खादलेंच खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥ धृ० ॥ वीट नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्त तें ॥ १ ॥ इंद्रियांची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ॥ २ ॥ तुका ह्मणे पोट भरे । परि ते उरे भूक पुढें ॥ ३ ॥

॥ ३६३७ ॥ सत्य आठवितां देव । जातो भेव पळोनी ॥ धृ० ॥ न लगे कांहीं करणें चिंता । धरी सत्ता सर्व तो ॥ १ ॥ भावें भाव राहे पायीं । देव तैं संनिध ॥ २ ॥ तुका ह्मणे कृष्णनामें । शीतळ प्रेम सर्वांसी ॥ ३ ॥

॥ ३६३८ ॥ ब्रीद ज्याचें जगदानी । तोचि मनीं स्मरावा ॥ धृ० ॥ सम पाय कर

कटीं । उभा तटीं भींवरेच्या ॥ १ ॥ पाहिलिया वेध लावी । बैसे जीवीं जडोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तिकाजा । धांवे लाजा लवलाहें ॥ ३ ॥

॥ ३६३९ ॥ माझिया मनाची बैसली आवडी । अवसान घडी एकी नेघे ॥ धृ० ॥ पाय चित्तीं रूप डोळांच राहिलें । चिंतनें गोविलें मुख सदा ॥ १ ॥ अवधियांचा जाला विसर हा मागें । वेध हा श्रीरंगें लावियेला ॥ २ ॥ तुका ह्मणे कानीं आइकली मात । तोचि जाला घात जीवपणा ॥ ३ ॥

॥ ३६४० ॥ याची कोठें लागली चट । बहु तट जालेंसे ॥ धृ० ॥ देवपिसीं देवपिसीं । मजऐसीं जग ह्मणे ॥ १ ॥ एकांताचें बाहेर आलें । लपविलें झांकेना ॥ २ ॥ तुका ह्मणे याचे भेटी । जाली तुटी आपल्यासी ॥ ३ ॥

॥ ३६४१ ॥ दीन आणि दुर्बळांसी । सुखरासी हरिकथा ॥ धृ० ॥ तारू भवसागरींचें । उंचनीच अधिकार ॥ १ ॥ चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आवडी धरीं कृपा । करी ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ ३६४२ ॥ संतोषे माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥ धृ० ॥ तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥ १ ॥ सेवा करी साहे निष्ठुर उत्तरें । त्याचे वाहे बरें तेंच मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे इच्छावसे खेळ खेळें । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥ ३ ॥

॥ ३६४३ ॥ विनवीजे ऐसें कांहीं । उरलें नाहीं यावरी ॥ धृ० ॥ आतां असो पंढरिनाथा । पायीं माथां तुमचिये ॥ १ ॥ मागें सारिली युक्ती । कांहीं होती जवळी ते ॥ २ ॥ निराशेची न करी आस । तुका दास माघारी ॥ ३ ॥

॥ ३६४४ ॥ आतां येथें जाली जीवासवें सांठी । होतें तैसें पोटीं फळ आलें ॥ धृ० ॥ आतां धरिले ते न सोडीं चरण । सांपडलें धन निजठेवा ॥ १ ॥ आतां हा आळस असो परता दुरी । नेदावी ते उरी उरों कांहीं ॥ २ ॥ आतां याचा मज न व्हावा विसर । भरोनी अंतर राहो रूप ॥ ३ ॥ आतां लोकलाज नयो येथें आड । बहु जालें गोड ब्रह्मरस ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां जन्म हा सफळ । अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥ ५ ॥

॥ ३६४५ ॥ अनंतां जीवांची तोडिलीं बंधनें । मजहि येणें काळें कृपा कीजे ॥ धृ० ॥ अनंत पवाडे तुझे विश्वंभरा । भक्तकरुणाकरा नारायणा ॥ १ ॥ अंतरींचें कळों देईं गुह्य गुज । अंतरीं तें बीज राखईन ॥ २ ॥ समदृष्टि तुझीं पाहेन पाउलें । धरीन संचलें हृदयांत ॥ ३ ॥ तेणें या चित्ताची राहेल तळमळ । होतील शीतळ सकळ गात्रें ॥ ४ ॥ तुका ह्मणे शांति करील प्रवेश । मग नव्हे नाश अखंड तो ॥ ५ ॥

॥ ३६४६ ॥ पराधीन माझें करूनियां जीणें । सांडी काय गुणें केली देवा ॥ धृ० ॥ उदार हे कीर्ति असे जगामाजी । कां तें ऐसें आजि पालटिलें ॥ १ ॥ आळवितां परि न पुरेचि रीग । उचित तो त्याग नाहीं तुह्मां ॥ २ ॥ तुका ह्मणे कां बा मुळींच व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३६४७ ॥ नेणपणें नाहीं केला हा बोभाट । आतां आली वाट कळों खरी ॥ धृ० ॥

आतां बहु शीघ्र यावें लवकरी । वाट पाहें हरि भेटी देईं ॥ १ ॥ समर्थाच्या बाळा करुणेचें भाषण । तरी त्याची कोण नांदणुक ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु बोलिले बडिवार । पडिलें अंतर लौकिकीं तें ॥ ३ ॥

॥ ३६४८ ॥ जें जें केलें तें तें साहे । कैसे पाहे भाविक ॥ धृ० ॥ ओंवाळूनि माझी काया । सांडिली यावरुनी ॥ १ ॥ काय होय नव्हे करूं । नेणें धरूं सत्ता ते ॥ २ ॥ तुका ह्मणे कटीं कर । उभें धीर धरुनी ॥ ३ ॥

॥ ३६४९ ॥ नाहीं मज कृपा केली पांडुरंगें । संताचिया संगें पोट भरीं ॥ धृ० ॥ चतुराचे सभे पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास ॥ १ ॥ तुका ह्मणे नेणें करूं समाधान । धरिले चरण विठोचे ॥ २ ॥

॥ ३६५० ॥ तुह्मी माझा देवा करिजे अंगिकार । हा नाहीं विचार मजपाशीं ॥ धृ० ॥ आतां दोही पक्षीं लागलें लंछन । देवभक्तपण लाजविलें ॥ १ ॥ एकांतीं एकलें न राहे निश्चळ । न राहेच पळ मन ठायीं ॥ २ ॥ पायीं महत्वाची पडिली शृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥ ३ ॥ शरीर सोकलें देखिलिया सुखा । कदान्न हें मुखा मान्य नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाला अवगुणांचा थारा । वाढली हे निद्रा आळस बहू ॥ ५ ॥

॥ ३६५१ ॥ बोलिलिया गुणीं नाहीं पाविजेत । देवा नाहीं होत हित तेथें ॥ धृ० ॥ कवतुक तुझें नवल यावरी । घेसील तें शिरीं काय नव्हे ॥ १ ॥ नाहीं मिळों येत संचितांच्या मता । पुराणीं पाहतां अघटित ॥ २ ॥ तुका ह्मणे पायीं निरोपिला भाव । न्याल तैसा जाओ सिद्धि देवा ॥ ३ ॥

॥ ३६५२ ॥ हा तों नव्हता दीन । टाळायाचा ऐसा क्षण ॥ धृ० ॥ कां जी नेणों राखा हात । कैसें देखावें रडत ॥ १ ॥ दावूनियां आस । दूर पळवितां कास ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव । घेतां न पुरेचि हांव ॥ ३ ॥

॥ ३६५३ ॥ आर्तभूतां द्यावें दान । खरें पुण्य त्या नांवें ॥ धृ० ॥ होणार तें सुखें घडो । लाभ जोडे महाबुद्धी ॥ १ ॥ सत्य संकल्पाचे साठीं । जळा पोटीं रविबिंब ॥ २ ॥ तुका ह्मणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ॥ ३ ॥

॥ ३६५४ ॥ कवतुकवाणी बोलतसें लाडें । आरुष वांकडें करुनि मुख ॥ धृ० ॥ दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननीबाळकामध्यें भेद ॥ १ ॥ सलगी तुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग ॥ २ ॥ धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज आमचीच गोडी । ऐसी हे आवडी कळों आली ॥ ४ ॥

॥ ३६५५ ॥ ऐकें पांडुरंगा वचन माझें एक । जालों मी सेवक दास तुझा ॥ धृ० ॥ कळे तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ॥ १ ॥ दंभ मान माझा करूं पाहे घात । जालियाही धीत कारणाचा ॥ २ ॥ हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसों पाहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज विघडतां क्षण । न लगे जतन करीं देवा ॥ ४ ॥

॥ ३६५६ ॥ जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देई प्रेमसुख ॥ धृ० ॥ देहभाव राख दीन करूनियां । अनाचारी वांयां जाय तैसा ॥ १ ॥ द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ॥ २ ॥ तुझें नाम माझें धरूनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझें जडोनियां पायीं । जालों उतराई पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३६५७ ॥ काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ धृ० ॥ काय द्यावें त्यांचें व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ १ ॥ सहज बोलणें हितउपदेश । करूनि सायास शिकविती ॥ २ ॥ तुका ह्मणे वत्स धेनुवेच्या चित्तीं । तैसें मज येती सांभाळीत ॥ ३ ॥

॥ ३६५८ ॥ देव जाणता देव जाणता । आपलीच सत्ता एकाएकीं ॥ धृ० ॥ देव चतुर देव चतुर । जाणोनि अंतर वर्ततसे ॥ १ ॥ देव निराळा देव निराळा । अलिप्त विटाळा तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ३६५९ ॥ आपण चाळक बुद्धीचा संचारा । आह्मांसी वेव्हारा पात्र केलें ॥ धृ० ॥ काय जालें तरी नेघा तुह्मी भार । आणिक कोणां थोर ह्मणों सांगा ॥ १ ॥ पंचभूतें बंद चर्माचिया मोटा । येथें खरा खोटा कोण भाव ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं बोलावया जागा । कां देवा वाउगा श्रम करूं ॥ ३ ॥

॥ ३६६० ॥ एका एक वर्म लावूनियां अंगीं । ठेवितों प्रसंगीं सांभाळीन ॥ धृ० ॥ नेघावा जी तुह्मी वांव बहु फार । धरूनि अंतर ठायावाव ॥ १ ॥ वेव्हारें आलें तें समानचि होतें । बळ नाहीं येथें चालों येत ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां निवाडाच साटीं । संवसारें तुटी करुनी ठेलों ॥ ३ ॥

॥ ३६६१ ॥ आतां येथें खरें । फिरतां माघारें ॥ धृ० ॥ होय तैसी हो आबाळी । देहनिमित्य या बळी ॥ १ ॥ तुह्मांसवें गांठी । देवा जीवाचिये साटीं ॥ २ ॥ तुका नव्हे लेंड । करूं चौघांमध्यें खंड ॥ ३ ॥

॥ ३६६२ ॥ कां हो वाढवितां देवा । मज घरीं समजावा । केवढा हो गोवा । फार केलें थोड्याचें ॥ धृ० ॥ ठेविन पायांवरी डोई । यासी तुमचें वेचे काई । जालों उतराई । जाणा एकएकांचे ॥ १ ॥ निवाड आपणियांपाशीं । असोन कां व्हावें अपेशी । होती गांठी तैशी । सोडूनियां ठेविली ॥ २ ॥ तुका ह्मणे गोड । होतें जालिया निवाड । दर्शनें ही चाड । आवडीच वाढेल ॥ ३ ॥

॥ ३६६३ ॥ नव्हों सभाधीट । समोर बोलाया नीट । एकलीं एकट । दुजें नाहीं देखिलें ॥ धृ० ॥ आतां अवघें तुह्मी जाणां । तुमचें माझें नारायणा । येईल करुणा । तेचि बरा तुह्मांसी ॥ १ ॥ ताळ नाहीं माझें बुद्धी । धरली न धरवे शुद्धी । आतां बळ कधीं । कोण्या जन्में निवाड ॥ २ ॥ आतां शेवटींचे । उत्तर तें हेंचि साचें । शरण आलें त्याचें । तुका ह्मणे सांभाळा ॥ ३ ॥

॥ ३६६४ ॥ ऐसा तंव मोळा । तुमाचा नसेल गोपाळा ॥ धृ० ॥ मागत्याची टाळा-

टाळी । झिज्या ओढोनि कपाळीं ॥ १ ॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ३ ॥

॥ ३६६५ ॥ माझ्या कपाळाच्या गुणें । किंवा सरलेंसे नेणें ॥ धृ० ॥ नये वचन बाहेरी । उभें तिष्ठतसें द्वारीं ॥ १ ॥ काय सांगायास वेचे । रीग आरंभीं ठायींचे ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । भीड धरावी पुढती ॥ ३ ॥

॥ ३६६६ ॥ कांहीं एक तरी असावा आधार । कासयानें धीर उपजावा ॥ धृ० ॥ ह्मणविल्यासाठीं कैसें पडे रुजू । धणी नाहीं उजू सन्मुख तो ॥ १ ॥ वेचल्या दिसांचा कोणावरी लेखा । घालावा हा सुखासुखा आह्मीं ॥ २ ॥ नाहीं मनोगत तोंवरि हे देवा । तुका ह्मणे सेवा नेघीजे तों ॥ ३ ॥

॥ ३६६७ ॥ मनाचिये साक्षी जाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपला तो ॥ धृ० ॥ तुह्मा परामृश घेणें सत्ताबळें । धरितां निराळें कैसीं वांचों ॥ १ ॥ मी माझें सांडून यावया पसारा । आणिक हातारा काय काज ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तुजविण एका । निढळ लौकिका माजी असों ॥ ३ ॥

॥ ३६६८ ॥ घालूनि लोळणी पडिलों अंगणीं । सिंचा सिंचवणी तीर्थ वरी ॥ धृ० ॥ वोल्हावेल तनु होईल शीतळ । जाली हळहळ बहु तापें ॥ १ ॥ पावेन या ठाया कई जालें होतें । आलों अवचितें उष्टयावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणी जाणावा राउळीं । येइल जवळी पांडुरंग ॥ ३ ॥

॥ ३६६९ ॥ तरीं भलें वांयां गेलों । जन्मा आलों मागुता । ह्मणऊनि ठेलों दास । सावकास निर्भयें ॥ १ ॥ उणें पुरें काय माझें । त्याचें ओझें तुह्मांसी ॥ धृ० ॥ सांभाळावें तें म्या काई । अवो आई विठ्ठले । भागें जया जाइन स्थळा । तुज गोपाळा विसरेंना ॥ २ ॥ आपलें म्यां एकसरें । करूनि बरें घेतलें । तुका ह्मणे नारायणा । आतां जाणा आपुलें ॥ ३ ॥

॥ ३६७० ॥ उरलें तें भक्ती । डोळां मुख पाहावें । अंतरींचें कां हो नेणां । नारायणा माझिये ॥ १ ॥ पुरवां तैसी केली आळी । बळी जगदानियां ॥ धृ० ॥ हातीं घेऊनि चोरां भातें । दावां रितें बाळका । साजत हें थोरपण । नाहीं विण वत्सला ॥ २ ॥ शाहणें तरीं लाड दावी । बाळ जेवीं मातेसी । तुका ह्मणे पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ॥ ३ ॥

॥ ३६७१ ॥ धरूनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोबासी ॥ धृ० ॥ संकल्प तो नाहीं दुजा । महाराजा विनवितों ॥ १ ॥ पायांवरि ठेविन भाळ । येणें सकळ पावलें ॥ २ ॥ तुका ह्मणे डोळेभरी । पाहिन हरि श्रीमुख ॥ ३ ॥

॥ ३६७२ ॥ तुह्मां उद्धरणें फार । मज दुसरी नाहीं थार ॥ धृ० ॥ आतां जैसें तैसें सोसा । काय करणें हृषीकेशा ॥ १ ॥ बरें न दिसेल ओळी । एका अन्न एका गाळी ॥ २ ॥ लावितो आभार । तुका विसरलेती फार ॥ ३ ॥

॥ ३६७३ ॥ न कळे जीं भक्ति काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसें ॥ धृ० ॥ जोडोनियां कर राहिलों निवांत । पायांपाशीं चित्त ठेवूनियां ॥ १ ॥ दिशाभुली करीं

स्थळीं प्रदक्षणा । भ्रमें नारायणा कष्टविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला ॥ ३ ॥

॥ ३६७४ ॥ एकविध वृत्ति न राहे अंतरीं । स्मरणींच हरि विस्मृति हे ॥ धृ० ॥ कैसा हा नवलाव वाटतो अनुभवें । मज माझ्या जीवें साक्षित्वेसी ॥ १ ॥ न राहे निश्चळ जागवितां मन । किती क्षणेंक्षण सावरावें ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु केले वेवसाव । तेणें रंगें जीव रंगलासे ॥ ३ ॥

॥ ३६७५ ॥ आतां सोडवणें न या नारायणा । तरि मी न वंचें जाणा काळा हातीं ॥ धृ० ॥ ऐसें सांगोनियां जालों उतराई । आणिक तें काई माझे हातीं ॥ १ ॥ केलियाचें माप नये सेवटासी । करितील नासि अंतराय ॥ २ ॥ तुका ह्मणे भय वाटतसे जीवा । धांवणिया धांवा लवकरी ॥ ३ ॥

॥ ३६७६ ॥ सत्या माप वाढे । गबाळाची चाली खोडे ॥ धृ० ॥ उतरे तें कळे कसीं । विखरोन सर्वदेशीं ॥ १ ॥ घरामध्यें राजा । नव्हे हो वा पाटपूजा ॥ २ ॥ तुका ह्मणे साचें । रूप तें दर्पणाचें ॥ ३ ॥

॥ ३६७७ ॥ नाहीं खंड जाला । माझा तुमचा विठ्ठला ॥ धृ० ॥ कैसें कैसें हो दुश्चित । आहे चौघांपाशीं नीत ॥ १ ॥ मुळींचें लिहिलें । मज आतां सांपडलें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज । न लगे बोलणें सहज ॥ ३ ॥

॥ ३६७८ ॥ हेचि वारकाची कळा । नाहीं येऊं येत बळा ॥ धृ० ॥ धीर करावा करावा । तरी तो आहे आह्मां देवा ॥ १ ॥ रिघावें पोटांत । पायां पडोन घ्यावा अंत ॥ २ ॥ तुका ह्मणे वरी । गोडा आणावा उत्तरीं ॥ ३ ॥

॥ ३६७९ ॥ एक परि बहिर बरें । परि तीं ढोरें ग्यानगडें ॥ धृ० ॥ कपाळास लागली अगी । अभागी कां जीतसे ॥ १ ॥ एके परि बरें वेडें । तार्किक कुडें जळो तें ॥ २ ॥ तुका ह्मणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥ ३ ॥

॥ ३६८० ॥ खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कौतुक विनोदें निरंजनी ॥ धृ० ॥ पचीं पडिलें तें रुचे वेळोवेळां । होतसे डोहळा आवडीस ॥ १ ॥ एकांताचें सुख जडलें जिव्हारीं । वीट परिचारीं बरा आला ॥ २ ॥ जगाऐसी बुद्धि नव्हे आतां कदा । लंपट गोविंदा जालों पायीं ॥ ३ ॥ आणिक ते चिंता न लगे करावी । नित्य नित्य नवी आवडी हे ॥ ४ ॥ तुका ह्मणे धडा राहिला पडोन । पांडुरंगीं मन विसांवलें ॥ ५ ॥

॥ ३६८१ ॥ उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपलें सकळ । ते प्रसंगीं पाहिजे ॥ धृ० ॥ नेम नाहीं लाभ हानी । अवचित घडती दोनी । विचारूनि मनीं । पाहिजे तें प्रयोजावें ॥ १ ॥ जाळ जाळा काळें । करपों नेदावें आगळें । जेवितां वेगळें । ज्याचें त्याचें तेथें शोभे ॥ २ ॥ पाळी नांगर पाभारीं । तन निवडूनि सोंकरी । तुका ह्मणे धरी । सेज जमा सेवटीं ॥ ३ ॥

॥ ३६८२ ॥ पडिलिया ताळा । मग अवघाचि निर्वाळा । तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ॥ धृ० ॥ जोडिलें तें लागे हातीं । आपआपली निश्चिती । हर्ष आणि

खंती । तेथें दोनी नासलीं ॥ १ ॥ सहज सरलिया कारण । मग एकला आपण । दिसे तरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥ २ ॥ करूनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा । निश्चिंतीच्या गोडा । गोष्टी ह्मूण लागती ॥ ३ ॥

॥ ३६८३ ॥ जीविता तो माझा पिता । उखता तो उखत्यांचा ॥ धृ० ॥ जनार्दनीं सरती कर्मे । बाधा भ्रमे अन्यत्र ॥ १ ॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धि न धरितां ॥ २ ॥ तुका ह्मणे खांद्या पानें । सिंचतां भिन्न कोरडीं ॥ ३ ॥

॥ ३६८४ ॥ माउलीची चाली लेंकराचे ओढी । तयालागीं काढी प्राणें प्रीती ॥ धृ० ॥ ऐसी बळिवंत आवडी जी देवा । संतमहानुभावा विनवितों ॥ १ ॥ मोहें मोहियेलें सर्वकाळ चित्त । विसरु तो घेत नाहीं क्षणें ॥ २ ॥ तुका ह्मणे दिला प्रेमाचा वोरस । सांभाळिलें दास आपुलें तें ॥ ३ ॥

॥ ३६८५ ॥ केवढा तो अहंकार । माझा तुह्मां नव्हे दूर ॥ धृ० ॥ आतां कोण पडे पायां । तुमच्या अहो पंढरिराया ॥ १ ॥ कां जी कृपेनें कृपण । वेचत असे ऐसें धन ॥ २ ॥ तुका ह्मणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ॥ ३ ॥

॥ ३६८६ ॥ अपराधी ह्मणोनि येतों काकुलती । नाहीं तरी होती काय चाड ॥ धृ० ॥ येईल तारूं तरीं ताराजी देवा । नाहीं तरी सेवा द्यावी भार ॥ १ ॥ कासया मी आतां वेंचूं हें शरीर । आहें बारगीर जाई जनें ॥ २ ॥ तुका ह्मणे मन करूनि मोकळें । आहें साळेंढाळें उदार मी ॥ ३ ॥

॥ ३६८७ ॥ माझे तों फुकाचे कायेचेचि कष्ट । नव्हे क्रियानष्ट तुह्मांऐसा ॥ धृ० ॥ कांहींच न वेंचीं आजिच्या प्रसंगीं । सकळाही अंगीं करीन पूजा ॥ १ ॥ द्यावें कांहीं तुह्मी हें तों नाहीं आस । असों या उदास देहभावें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी मावळली खंती । समाधान चित्तीं सर्वकाळ ॥ ३ ॥

॥ ३६८८ ॥ स्वामीचिया सत्ता । आधीं वर्म येतें हाता । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ॥ धृ० ॥ करीं कवतुकाचे बोल । परि जिव्हाळ्याची ओल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचें ॥ १ ॥ मनें मेळविलें मना । नाहीं अभावीं शाहाणा । अंतरींच्या खुणा । वरि दिल्या उमटोनी ॥ २ ॥ नाहीं पराश्रमें काळा । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ॥ ३ ॥

॥ ३६८९ ॥ ऐके ठायीं अन्नपाणी । श्वासोश्वासीं चिंतनीं ॥ धृ० ॥ वेळोवेळां जागवितों । दुजें येइल ह्मूण भीतों ॥ १ ॥ नाहीं गुंतत उपचारीं । मानदंभाचे वेव्हारीं ॥ २ ॥ तुका जालासे शाहाणा । आड लपे नारायणा ॥ ३ ॥

॥ ३६९० ॥ वैरागरापाशीं रत्नांचिया खाणी । हेंचि द्यावी धणी फावेल तों ॥ धृ० ॥ येथें नाहीं तर्कवितर्कांची चाड । होतसे निवाड खऱ्याखोट्यां ॥ १ ॥ उगाच सारावा वाढिला तो ठाव । वाढितिया भाव कळतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे नव्हे टांचणीचें पाणी । येथें झरवणी जैशातैसें ॥ ३ ॥

॥ ३६९१ ॥ समर्थ या नांवें दीनांचा कृपाळ । हें तंव सकळ स्वामीअंगीं ॥ धृ० ॥

मज काय लागे करणें विनवणी । विदित चरणीं सकळ आहे ॥ १ ॥ दयासिंधु तुह्मां भांडवल दया । सिंचावें आतां या कृपापीयुषें ॥ २ ॥ तुका ह्मणे अवो पंढरिनिवासे । बहु जीव आसे लागलासे ॥ ३ ॥

॥ ३६९२ ॥ लेखिलें कवित्व माझे सहज बोल । नलगेचि ओल जिव्हाळयाची ॥ धृ० ॥ नयेचि उत्तर कांहीं परतोनी । जालों नारायणीं न सरतें ॥ १ ॥ लाजिरवाणी कां वदली हे वाचा । नव्हेच ठायींचा मननशीळ ॥ २ ॥ तुका ह्मणे फळ नव्हेचि सायासा । पंढरीनिवासा काय जालें ॥ ३ ॥

॥ ३६९३ ॥ येणें जाला तुमचे पोतडीचा झाडा । केलासी उघडा पांडुरंगा ॥ धृ० ॥ भरूनियां घरीं राहिलों वाखतीं । आपुली निश्चिती आपल्यापें ॥ १ ॥ आतां काय उरी उरली ते सांगा । आणिलेति जगाचिये साक्षी ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें पाहोंजासी आतां । माझी जाली सत्ता तुह्मांवरी ॥ ३ ॥

॥ ३६९४ ॥ तुमच्या पाळणा ओढतसे मन । गेलों विसरोन आपणासी ॥ धृ० ॥ लागेल पालटें फेडावें उसणें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ॥ १ ॥ तुमचे आवडी संबंधाचा त्याग । घेतला ये लाग जगनिंदेचा ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसा माझा जीव ओढे । तैसेंच तिकडे पाहिजेल ॥ ३ ॥

॥ ३६९५ ॥ नाहीं मज कोणी उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडांत ॥ धृ० ॥ कासया जी माझी करणें येविसीं । भयाची मानसीं चिंता संतीं ॥ १ ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । सत्तेनें तो चाळी आपुलिये ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें पाळणपोषण । करितां आपण पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३६९६ ॥ मज कांहीं सीण न व्हावा यासाठीं । कृपा तुह्मां पोटीं उपजली ॥ धृ० ॥ होतें तैसें केलें आपलें उचित । शिकविलें हित बहु बरें ॥ १ ॥ आह्मी न मानावी कोणाची आशंका । तुह्मां भय लोकां आहे मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां संचिताचा ठेवा । वोडवला घ्यावा जैसा तैसा ॥ ३ ॥

॥ ३६९७ ॥ कोणाचें चिंतन करूं ऐशा काळें । पायांचिया बळें कंठीतसें ॥ धृ० ॥ पाहातसें वाट येई गा विठ्ठला । मज कां हा केला परदेश ॥ १ ॥ बहुतांचे सत्ते जालों कासाविस । जाय रात्री दिस वैरियांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे बैसें मनाचिये मुळीं । तरींच हीं जाळीं उगवती ॥ ३ ॥

॥ ३६९८ ॥ कां जी तुह्मी ऐसे नव्हा कृपावंत । निवे माझें चित्त ठायिंच्या ठायीं ॥ धृ० ॥ कांहीं शम नये विषम अंतरा । शांतीचा तो बरा ऐसा योग ॥ १ ॥ दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्वें दातारें राखावीं तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण ह्मणउनी ॥ ३ ॥

॥ ३६९९ ॥ मागत्याची कोठें घडते निरास । लेंकरा उदास नाहीं होतें ॥ धृ० ॥ कासया मी होऊं उताविळ जीवीं । जाणता गोसावी सर्व आहे ॥ १ ॥ जाला तरी वेळ

कवतुकासाठीं । निर्दया तों पोटीं उपजेना ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यासी ठाउकें उचित । होईल संकेत नेमियेला ॥ ३ ॥

॥ ३७०० ॥ आरुषा वचनीं मातेची आवडी । ह्मणऊनि तांतडी घेती नाहीं ॥ धृ० ॥ काय होईल माझें मांडिलें कवतुक । आदराची भूक रडारोवी ॥ १ ॥ लपोनियां करी चुकुर माउली । नाहीं होती केली निष्ठासांडी ॥ २ ॥ तुका ह्मणे करी पारखीं वचनें । भेवऊनि तान्हें आळवावें ॥ ३ ॥

॥ ३७०१ ॥ प्रीतीच्या भांडणा नाहीं शिरपाव । वचनाचेंचि भाव निष्ठुरता ॥ धृ० ॥ जिणें तरि एका जीवें उभयता । पुत्राचिया पिता दुखवें दुःखें ॥ १ ॥ काय जाणें तुटों मायेचें लिगाड । विषम तें आड उरों नेणें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज करुणा उत्तरें करितां विश्वंभरें पाविजेल ॥ ३ ॥

॥ ३७०२ ॥ नको घालूं झांसा । मना उपाधिवोळसा ॥ धृ० ॥ जे जे वाहावे संकल्प । पुण्य तरी तेचि पाप ॥ १ ॥ उपजतो भेव । होतो कासाविस जीव ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहों । होइल तें निवांत राहों ॥ ३ ॥

॥ ३७०३ ॥ बीजीं फळाचा भरवसा । जतन सिंचनासरिसा । चाविलिया आसा । काकुलती ते नाड ॥ धृ० ॥ हा तों गडसंदीचा टाव । पिके पिकविला भाव । संकोचोनि जीव । दशा केली जतन ॥ १ ॥ माती घाली धनावरी । रांडा रोटा वरीवरी । सुखाचे सेजारीं । दुःख भ्रमें भोगीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे दिशाभुली । जाल्या उफराटी चाली । निवाडाची बोली । अनुभवें साक्षीसी ॥ ३ ॥

॥ ३७०४ ॥ काय उरली ते करूं विनवणी । वेचलों वचनीं पांडुरंगा ॥ धृ० ॥ अव्हेरलों आतां कैचें नामरूप । आदर निरोप तरि तो नाहीं ॥ १ ॥ माझा मायबाप ये गेलों सलगी । तों हे तुह्मां जगीं सोयइरिका ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां जोडोनियां हात । करी दंडवत ठायिंचाठायीं ॥ ३ ॥

॥ ३७०५ ॥ आवडी धरूनि करूं गेलों लाड । भक्तिप्रेमकोड न पुरेची ॥ धृ० ॥ ह्मणऊनि जीव ठेला आसावोनी । खेद होतो मनीं बहुसाळ ॥ १ ॥ वेठी ऐसें वाटे निर्फळ कारण । शीतळ होउन खोडावलों ॥ २ ॥ तुका ह्मणे सरतें नव्हेंचि पायांपें । बळ केलें पापें नव्हेंचि भेटी ॥ ३ ॥

॥ ३७०६ ॥ प्रीतीचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा ॥ धृ० ॥ बहु नेदी रडों माता । दुश्चित होतां धीर नव्हे ॥ १ ॥ वरी वरी तोंडापुरतें । मोहोरी तें कळतसे ॥ २ ॥ जाणोनियां नेणता तुका । नव्हे लोकांसारिखा ॥ ३ ॥

॥ ३७०७ ॥ हा गे हाचि आतां लाहो । माझा अहो विठ्ठला ॥ धृ० ॥ दंडवत दंडवत । वेगळी मात न बोलें ॥ १ ॥ वेगळाल्या कोठें भागें । लाग लागें लावावा ॥ २ ॥ तुका ह्मणे केल्या जमा । वृत्तितमा भाजूनी ॥ ३ ॥

॥ ३७०८ ॥ तुह्मांसी न कळे सांगा काय एक । कासया संकल्प वागवूं मी ॥ धृ० ॥ आहे तेथें सत्ता ठेविलें स्थापुनी । प्रमाणेंचि वाणी वदे आज्ञा ॥ १ ॥ कृपा जाली मग

न लगे अंगसंग । निजध्यासें रंग चढता राहे ॥ २ ॥ तुका ह्मणे मागें बोलिलों तें वाव । आतां हाचि भाव दृढ जाला ॥ ३ ॥

॥ ३७०९ ॥ आवडी न पुरे मायबापापासीं । घडों का येविसीं सकाईल ॥ धृ० ॥ होईल नेमलें आपुलिया काळें । आलीयाचा बळें आग्रो उरे ॥ १ ॥ जाणविलें तेथें थोडें एकवेळा । सकळही कळा सर्वोत्तमीं ॥ २ ॥ तुका ह्मणे निवेदिलें गुह्य गुज । आतां तुझी तुज सकळ चिंता ॥ ३ ॥

॥ ३७१० ॥ वोखटा तरी मी विटलों देहासी । पुरे आतां ऐसी जोडी पुन्हां ॥ धृ० ॥ किती मरमर सोसावी पुढती । राहिलों संगती विठोबाचे ॥ १ ॥ आतां कोण याचा करील आदर । जावो कळिवर विटंबोनी ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां सांडी तेंचि सांडीं । कोण फिरे लंडी यासी मागें ॥ ३ ॥

॥ ३७११ ॥ हेंही ऐसें तेंही ऐसें । उभय पिसें अविचार ॥ धृ० ॥ अभिमानाचें ठेलाठेलीं । मधीं जाली हिंपुष्टी ॥ १ ॥ धीरा शांति ठाव नुरे । हाचि उरे आबाळ्या ॥ २ ॥ कौतुक हें पाहे तुका । कढतां लोकां अधणीं ॥ ३ ॥

॥ ३७१२ ॥ हित जाणें चित्त । कळों येतसे उचित ॥ धृ० ॥ परिहार ते संपादनी । सत्य कारण कारणीं ॥ १ ॥ वरदळ तें नुतरे कसीं । आगीमध्यें तें रसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे करुनी खरें । ठेवितां तें पुढें बरें ॥ ३ ॥

॥ ३७१३ ॥ देवें दिला देह भजना गोमटा । तो या जाला भांटा बाधिकेच्या ॥ धृ० ॥ ताठोनियां मान राहिली वरती । अहंकारा हातीं लवों नव्हे ॥ १ ॥ दास ह्मणावया न वळे रसना । सइरवचना बासे गळा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें ठेवावा विटाळ । स्नानें निर्मळ व्हावयासी ॥ ३ ॥

॥ ३७१४ ॥ काय करूं पोरा लागली चट । धरी वाट देउळाची ॥ धृ० ॥ सांगितलें नेघे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ॥ १ ॥ काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ॥ २ ॥ आमचे कुळीं नव्हतें ऐसें । हेंच पिसें निवडलें ॥ ३ ॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नरका जाणें । त्या वचनें दुष्टांचीं ॥ ५ ॥

॥ ३७१५ ॥ कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥ धृ० ॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणींच संतोष ॥ १ ॥ पाहिजे तो कळवळा । मग बळा काय उणें ॥ २ ॥ तुका ह्मणे उदारपणें । काय उणें मनाचें ॥ ३ ॥

॥ ३७१६ ॥ नव्हती हे उसणें बोल । आहाच फोल रंजवण ॥ धृ० ॥ अनुभव तो बराबरी । नाहीं दुरी वेगळा ॥ १ ॥ पाहिजे तें आलें रुची । काचाकुचीं काशाची ॥ २ ॥ तुका ह्मणे लाजे आड । त्याची चाड कोणासी ॥ ३ ॥

॥ ३७१७ ॥ जों जों घ्यावा सोस । माझे वारीं गर्भवास । लटिक्याचा दोष । अधिक जडे अंगेसीं ॥ धृ० ॥ आतां आहे तैसें असो । अनुताप अंगीं वसो । येवढेंचि नसो । माझें आणि परावें ॥ १ ॥ जागाजालेपणें । काय नासावें स्वप्नें । शब्दाचिया शिणें । कष्ट

मिथ्या मानावें ॥ २ ॥ छाये माकड विटे । धांवे कूपीं काय भेटे । तुका ह्मणे फुटे । डोई गुडघे कोंपर ॥ ३ ॥

॥ ३७१८ ॥ गुणांचाचि सांटा । करूं न वजों आणिका वाटा ॥ धृ० ॥ करिती छंद नानापरी । भरोन सिणती आडभरी ॥ १ ॥ नेमली पंगती । आह्मां संतांची संगती ॥ २ ॥ तुका ह्मणे लीळा । येर कवतुक पाहे डोळां ॥ ३ ॥

॥ ३७१९ ॥ शिकल्या शब्दाचें उत्पादितों ज्ञान । दरपणींचें धन उपर वांयां ॥ धृ० ॥ अनुभव कइं होईन भोगिता । सांकडें तें आतां हेंचि आलें ॥ १ ॥ गायें नाचें करीं शरीराचे धर्म । बीजकळावर्म तुमचें दान ॥ २ ॥ तुका ह्मणे केला उशीर न साहे । द्याल तरी आहे सर्व सिद्ध ॥ ३ ॥

॥ ३७२० ॥ सिकविला तैसा पढों जाणें पुसा । कैंची साच दशा तैसी अंगीं । स्वप्नींच्या सुखें नाहीं होत राजा । तैसा दिसे माझा अनुभव ॥ १ ॥ कासया हा केला जिव्हे अळंकार । पायांसी अंतर दिसतसे ॥ धृ० ॥ दर्पणींचें धन हातीं ना पदरीं । डोळां दिसे परि सत्याचिये । आस केली तरी लाळचि घोंटावी । ठकाठकी तेवीं दिसतसे ॥ २ ॥ कवित्वें रसाळ वदविली वाणी । साक्ष हीं पुराणीं घडे ऐसी । तुका ह्मणे गुरें राखोनि गोंवारी । माझीं ह्मणे परि लाभ नाहीं ॥ ३ ॥

॥ ३७२१ ॥ अनुभव तो नाहीं अमुचिया दर्शनें । अइकिलें कानें वदे वाणी । जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । ह्मणतां मांडे पुरी काय होतें ॥ १ ॥ नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा । कां जी हरिहरा चाळविलें ॥ धृ० ॥ पत्रीं कुशळता भेटी अनादर । काय तें उत्तर येइल मानूं । अंतरीं सबाह्यीं कां नाहीं सारिखें । धरूनि पारिखें वर्त्ततसां ॥ २ ॥ आलों आलों ऐसी दाऊनियां आस । वाहों बुडतयास काय द्यावें । तुका ह्मणे आहो चतुरा शिरोमणी । किती माझी वाणी तुह्मी कोठें ॥ ३ ॥

॥ ३७२२ ॥ केलें तरी आतां साचाचि करावें । विचारिलें द्यावें कृपादान ॥ धृ० ॥ संकल्पासी नाहीं बोलिला विकल्प । तुह्मां पुण्यपाप कळे देवा ॥ १ ॥ उदार शक्ति तंव तुमची भूमंडळीं । ऐसी ब्रीदावळी गर्जतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे अहो रकुमादेवीवरा । उपरोध कां धरा माझा आतां ॥ ३ ॥

॥ ३७२३ ॥ अहो पुरुषोत्तमा । तुह्मां कायाची उपमा ॥ धृ० ॥ सतत तो नाहीं बुद्धी । नाळवितां नाहीं शुद्धी ॥ १ ॥ जागविलें तरी । तुह्मां व्यक्ति येणें हरी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुह्मां नित्य दिस नवा ॥ ३ ॥

॥ ३७२४ ॥ मथनें भोगे सार । ताकें घडे उपकार ॥ धृ० ॥ बरवी सायासाची जोडी । अनुभविया ठावी गोडी ॥ १ ॥ पाक आणि रुची । जेथें तेथें ते कइंची ॥ २ ॥ वाढितो पंगती । तुका आवडी संगती ॥ ३ ॥

॥ ३७२५ ॥ चिंतनाची जोडी । हाचि लाभ घडोघडी ॥ धृ० ॥ तुह्मी वसूनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥ १ ॥ जाय जेथें मन । आड घाला सुदर्शन ॥ २ ॥ तुका ह्मणे भोजें । नाचें हो ऐसें न लजें ॥ ३ ॥

॥ ३७२६ ॥ आवडीची न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥ धृ० ॥ नित्य नवा कळवळा । मायबाळामध्यें तो ॥ १ ॥ सुख सुखा भेटों आलें । होय वाल्हें पोटींचें ॥ २ ॥ तुका ह्मणे ब्रह्मानंदें । संतवृंदें चरणापें ॥ ३ ॥

॥ ३७२७ ॥ जडलों तों आतां पायीं । होऊं काई वेगळा ॥ धृ० ॥ तुह्मीं संतीं कृपा केली । गंगे चाली ओघाची ॥ १ ॥ सांभाळिलों मायबापा । केलों तापावेगळा ॥ २ ॥ बोरसें या जीव धाला । तुका ठेला मौन्यची ॥ ३ ॥

॥ ३७२८ ॥ काळावरी सत्ता । ऐशा करितो वारता ॥ धृ० ॥ तो मी हीणाहूनि सांडें । देवा तुन्हें काळतोंडें ॥ १ ॥ मानूनी भरंवसा । होतों दासा मी ऐसा ॥ २ ॥ तुका ह्मणे मान । गेलों वाढवूं थोरपण ॥ ३ ॥

॥ ३७२९ ॥ समर्थाचे सेवे कोठें नाहीं घात । पाहों नये अंत पांडुरंगा ॥ धृ० ॥ आहे तैसी नीत विचारावी बरी । येउनी भीतरी वास करा ॥ १ ॥ निढळ राखिलें तरी भयाभीत । हर्षामर्ष चित्त पावतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी कळेल निवाड । दर्शनाची चाड शुभकीर्ती ॥ ३ ॥

॥ ३७३० ॥ बहु धीर केला । जाण न होसी विठ्ठला ॥ धृ० ॥ आतां धरीन पदरीं । करीन तुज मज सरी ॥ १ ॥ जालों जीवासी उदार । उभा राहिलों समोर ॥ २ ॥ तुका विनवी संता । ऐसें सांगा पंढरिनाथा ॥ ३ ॥

॥ ३७३१ ॥ नेदावी सलगी न करावा संग । करी चित्ता भंग वेळोवेळां ॥ धृ० ॥ सर्प शांतिरूप न ह्मणावा भला । झोंबे खवळीला तात्काळ तो ॥ १ ॥ तुका ह्मणे दुरी राखावा दुर्जन । करावें वचन न घडे तें ॥ २ ॥

॥ ३७३२ ॥ मज अभयदान देई तूं दातारा । कृपेच्या सागरा मायबापा ॥ धृ० ॥ देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणिक मी कांहीं तुजें नेणें ॥ १ ॥ सेवाभक्तिहीन नेणता पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें सर्वही साधन । नाम संकीर्तन विठोबाचें ॥ ३ ॥

॥ ३७३३ ॥ करावा वर्षाव । तृषाक्रांत जाला जीव ॥ धृ० ॥ पाहें आकाशाची वास । जाणता तूं जगनिवास ॥ १ ॥ संयोगें विस्तार । वाढी लागे तो अंकुर ॥ २ ॥ तुका ह्मणे फळें । चरणांबुजें तीं सकळें ॥ ३ ॥

॥ ३७३४ ॥ करीं ऐसी धांवाधांवी । चित्त लावी चरणापें ॥ धृ० ॥ मग तो माझा मायबाप । घेइल ताप हरुनी ॥ १ ॥ बहुतांच्या मतें गोवा । होऊं जीवा नेदावा ॥ २ ॥ तुका ह्मणे करुणाबोलें । धीर विठ्ठलें निघेना ॥ ३ ॥

॥ ३७३५ ॥ एकविध नारायण । तेथें विषमाचा सीण । पालटेंचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥ धृ० ॥ अवघें सारावें गाबाळ । चुकवूनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकांत ॥ १ ॥ कायावाचामन । स्वरूपींच अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणें पाडें लवलाहो ॥ २ ॥ तुका ह्मणे आळस निद्रा । येथें देऊनियां चिरा । देऊनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥ ३ ॥

॥ ३७३६ ॥ हारपोनी गेली निशी । निद्रातीं कैसी न देखों ॥ धृ० ॥ नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ॥ १ ॥ अवघा रुधविला ठाव । नेला वाव मी माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे एके ठायीं । असूं नाहीं क्षण भिन्न ॥ ३ ॥

॥ ३७३७ ॥ पाहा कैसे कैसे । देवें उद्धरिले अनायासें ॥ धृ० ॥ ऐका नवल्याची ठेव । नेणतां भक्तिभाव ॥ १ ॥ कैलासासी नेला । भिल्ल पानेडी बैसला ॥ २ ॥ पांखांच्या फडल्कारीं । उद्धरुनी नेली घारी ॥ ३ ॥ चोरें पिंडी दिला पाव । त्या पूजनें धाये देव ॥ ४ ॥ तुका ह्मणे भोळा । स्वामि माझा हो कोवळा ॥ ५ ॥

॥ ३७३८ ॥ अनुभव ऐसा । मज लागला सरिसा ॥ धृ० ॥ पाठी बैसली सेजारीं । नव्हे शांत कोणे परी ॥ १ ॥ कोठें नलगे जावें । कांहीं घालावया ठावें ॥ २ ॥ तुका ह्मणे कोटी । दुःखाच्याच तये पोटीं ॥ ३ ॥

॥ ३७३९ ॥ पाठीवरी भार । जातो वाहूनियां खर ॥ धृ० ॥ संत नेतील त्या ठाया । माझी आधीन त्यां काया ॥ १ ॥ मोटचौफळ । अंगीं उच्छिष्टाचें बळ ॥ २ ॥ न संडीं मारग । येथें न चोरूनि अंग ॥ ३ ॥ आपुलिया सत्ता । चालविती नाहीं चिंता ॥ ४ ॥ काळवळिला तुका । घराचार येथें नका ॥ ५ ॥

॥ ३७४० ॥ मागें पुढें जालों लाटा । अवघा मोटा सरळ ॥ धृ० ॥ नाहीं कोठें रितें अंग । नित्य रंग नवाची ॥ १ ॥ पोसिद्याचे पडिलों हातीं । वोझें माती चुकली ॥ २ ॥ जोगावलों पोटीं खर । पाठी भार वरि नाहीं ॥ ३ ॥ अवघिया मोकळ्या दिशा । नाहीं वोळसा कामाचा ॥ ४ ॥ संतांचिये लोळें द्वारीं । पळती दुरी गोमाशा ॥ ५ ॥ कांहीं न साहिसा जाला । तुका नेला समर्थ ॥ ६ ॥ पाहातो गे महाद्वारीं । वरि झुली वाकळा ॥ ७ ॥

॥ ३७४१ ॥ करणें न करणें वारलें जेथें । जातों तेणें पंथें संतसंगें ॥ धृ० ॥ संतीं हें पहिलें लाविलें निशाण । ते खुणा पाहोन गर्जे नाम ॥ १ ॥ तुका ह्मणे तुह्मी चला याचि वाटे । भरवशानें भेटे पांडुरंग ॥ २ ॥

॥ ३७४२ ॥ कइंचें कारण । तृष्णा वाढविते सीण ॥ धृ० ॥ काय करूनि ऐसा संग । सोसेंचि तूं पांडुरंग ॥ १ ॥ रूपीं नाहीं गोडी । हांवें हांवें उर फोडी ॥ २ ॥ तुका न पडे भरी । ऐशा वरढाळाचे थोरी ॥ ३ ॥

॥ ३७४३ ॥ धन्य तो ग्राम जेथें हरिदास । धन्य तोचि वास भाग्य तया ॥ धृ० ॥ ब्रह्मज्ञान तेथें असे घरोघरीं । धन्य त्या नरनारी चतुर्भुज ॥ १ ॥ नाहीं पापा रिघ काळाचें जीवन । हरिनामकीर्त्तन घरोघरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तिहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळासहित जीव ॥ ३ ॥

॥ ३७४४ ॥ मारूं नये सर्प संतांचिये दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥ धृ० ॥ एक सूत्र जीवशिवीं आइक्यता । रोम उपडितां अंग कांपे ॥ १ ॥ नाहीं साहों येत दुःखाची ते जाती । परपीडा भूतीं साम्य जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे दिला नीतीचा संकेत । पुजा नांवें चित्त सुखी तेणें ॥ ३ ॥

॥ ३७४५ ॥ भय होतें आह्मीपणें । पाठी येणें घातलें ॥ धृ० ॥ अवघा आपुलाचि देश ।

काळा लेश उरेचि ना ॥ १ ॥ समर्थाचें नाम घेतां । मग चिंता काशाची ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणें । जालें जिणें सुखाचें ॥ ३ ॥

॥ ३७४६ ॥ विषम वाटे दुरवरी । चालुनि परती धरी । मागील ते उरी । नाहीं उरली भयाची ॥ धृ० ॥ मुख्य न व्हावा तो नाड । सेवटाचे हातीं गोड । सरलिया चाड । मग कैचे उद्वेग ॥ १ ॥ होता पहिला अभ्यास । समयीं घालावया कास । तेव्हां लटिके दोष । योगें अनुतापाच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे । बुद्धि केलियानें साहे । जवळीच पाहें । देव वाट स्मरणाची ॥ ३ ॥

॥ ३७४७ ॥ आतां कोठें धांवें मन । तुझे चरण देखिलिया ॥ धृ० ॥ भाग गेला सीण गेला । अवघा जाला आनंदू ॥ १ ॥ प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां जोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥ ३ ॥

॥ ३७४८ ॥ विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचा सार ॥ धृ० ॥ जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥ १ ॥ व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ २ ॥ जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥ ३ ॥ सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥ ४ ॥

॥ ३७४९ ॥ निरोधती परि न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥ धृ० ॥ राहातोंति तुह्मी भरोनि अंतरीं । होतों तदाकारीं निर्विषयची ॥ १ ॥ कृपेचिया साक्षी असती जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे ताळा मेळवणीपाशीं । विनंति पायापाशीं हेचि करीं ॥ ३ ॥

॥ ३७५० ॥ अद्वयचि द्वय जालेंचि कारण । धरिलें नारायणें भक्तिसुख ॥ धृ० ॥ अपरोक्ष आकार जाला चतुर्भुज । एकतत्त्व बीज भिन्न नाहीं ॥ १ ॥ शून्य निरसूनि राहिलें निर्मळ । तें दिसे केवळ विटेवरी ॥ २ ॥ सुखें घ्यावें नाम वदनाही चाड । सरिता वापी आड एक पाणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मीच आहें तेणें सुखें । भेद नाहीं मुखें नाम गातां ॥ ४ ॥

॥ ३७५१ ॥ उदार चक्रवर्ती । वैकुंठीचा भूपती । पुंडलिकाचिया प्रीती । विटेवरी राहिला ॥ धृ० ॥ सर्वसिद्धींचा दातार । सवें आणिला परिवार । भक्तां अभयंकर । घ्या घ्या ऐसें ह्मणतसे ॥ १ ॥ जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षी देवा संस्थापिलें । एकविस स्वर्गांतें धरिलें । सत्तामात्रें आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंत । इच्छिले पुरवी अर्थ । रिद्धिसिद्धिमुक्ति देत । शेखीं संग आपुला ॥ ३ ॥

॥ ३७५२ ॥ सकलगुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ॥ धृ० ॥ वरकड कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ॥ १ ॥ षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंतीं जाण ॥ २ ॥ तुका ह्मणे जें जें बोला । तें तें साजे या विठ्ठला ॥ ३ ॥

॥ ३७५३ ॥ वैकुंठींचें सुख पंढरिये आलें । अवघें पुंडलिकें सांटविलें ॥ धृ० ॥ घ्यारे घ्यारे माझे बाप । जिव्हा घेऊनि खरें माप । करा एक खेप । मग करणें न लगे ॥ १ ॥ विषय गुंडोनी ठेवीं पसारा । मग धांव घ्या पंढरपुरा ॥ २ ॥ जंव आहे आयुष्याचा

लेश । तंव करीं पंढरीचा वास ॥ ३ ॥ आळस न करीं लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥ ४ ॥

॥ ३७५४ ॥ देवाचें चरित्र नाठवे सर्वथा । विनोदार्थ कथा गोड वाटे ॥ धृ० ॥ हातावरि हात हासोनि आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ॥ १ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ २ ॥

॥ ३७५५ ॥ अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान । गोड हें चरण सेवा तुझी ॥ धृ० ॥ करुनी उचित देईं हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥ १ ॥ देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवुनी निराळा दावीं मज ॥ २ ॥ तुका ह्मणे आहे तुझें हें सकळ । कोणी एके काळें देईं मज ॥ ३ ॥

॥ ३७५६ ॥ हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ धृ० ॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ १ ॥ हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ २ ॥ हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि जपध्यान नाम तुझें ॥ ३ ॥ हेंचि माझें ज्ञान श्रवण मनन । हेंचि निजध्यासन नाम तुझें ॥ ४ ॥ हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ५ ॥ हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम तुझें ॥ ६ ॥ तुका ह्मणे दुजें सांगायासि नाहीं । नामेंविण कांहीं धनवित्त ॥ ७ ॥

॥ ३७५७ ॥ कोणें साक्षीविण । केलें उद्धारा भजन ॥ धृ० ॥ ऐसें सांगा जी दातारा । माझी भक्ति परंपरा ॥ १ ॥ कोणें नाहीं केली आळी । ब्रह्मज्ञानाहुनि वेगळी ॥ २ ॥ कोणाचें तों कोंड । नाहीं पुरविला लाड ॥ ३ ॥ कोणाच्या उद्धारा । केला विलंब माघारा ॥ ४ ॥ तुका ह्मणे भिन्न । कांहीं बोलें साक्षीविण ॥ ५ ॥

॥ ३७५८ ॥ सुखरूप चाली । हळूहळू उसंतिली ॥ धृ० ॥ बाळगोपाळांची वाट । सेव्यसेवकता नीट ॥ १ ॥ जरी झाला श्रम । तरी पडों नये भ्रम ॥ २ ॥ तुका ह्मणे दासां । देव सरिसा सरिसा ॥ ३ ॥

॥ ३७५९ ॥ चुकली ते वाट । पुढें सांपडवी नीट ॥ धृ० ॥ ह्मणउनी गर्भवास । नेणती ते हरिचे दास ॥ १ ॥ संचिताचा संग । काय जाणों पावे भंग ॥ २ ॥ तुका ह्मणे दृष्टी । उघडितों नव्हे कष्टी ॥ ३ ॥

॥ ३७६० ॥ कइं तो दिवस देखेन मी डोळां । कल्याण मंगळामंगळांचें ॥ धृ० ॥ आयुष्याच्या शेवटीं पायांसवें भेटी । कळिवरें तुटी जाल्या त्वरें ॥ १ ॥ सरो हें संचित पदरींचा गोवा । उतावीळ देवा मन झालें ॥ २ ॥ पाउलापाउलीं करितां विचार । अनंतविकार चित्ता अंगीं ॥ ३ ॥ ह्मणऊनि भयाभीत होतो जीव । भाकितसें कींव अट्टाहासें ॥ ४ ॥ तुका ह्मणे होइल आइकिलें कानीं । तरि चक्रपाणि धांव घाला ॥ ५ ॥ दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय । पाहणें तों काय अजून अंत ॥ ६ ॥

॥ ३७६१ ॥ कळों येतें वर्म । तरी न पवतों श्रम ॥ धृ० ॥ तुह्मां शिरीं होता भार ।

आह्मां केचा संचार ॥ १ ॥ होतें अभयदान । तरी स्थिर होतें मन ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहें । ऐसी वाट उभा आहें ॥ ३ ॥

॥ ३७६२ ॥ वारंवार हाचि न पडावा विसर । वसावें अंतर तुमच्या गुणीं ॥ धृ० ॥ इच्छेचा ये दाता तूं एक समर्था । अगा कृपावंता मायबापा ॥ १ ॥ लाभाचिये वोढी उताविळ मन । त्यापरि चिंतन चरणाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ॥ ३ ॥

॥ ३७६३ ॥ आइका माझीं कवतुक उत्तरें । देउनी सादरें चित्त देवा ॥ धृ० ॥ वोरसें आवडी आलों पायापाशीं । होय तें मनेसीं सुख कीजे ॥ १ ॥ तुमचें न भंगे सर्वोत्तमपण । करितां समाधान लेंकराचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी बोलतों बोबडे । तरी वाडे कोडें कवतुक ॥ ३ ॥

॥ ३७६४ ॥ जन्मा आलियाचा लाभ । पद्मनाभदरुषणें ॥ धृ० ॥ पाठीलागा येतो काळ । तूं कृपाळ माउली ॥ १ ॥ कोण्या उपायें हें घडे । भव आंगडें सुटकेचें ॥ २ ॥ बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं जननी । ये निर्वाणी विठ्ठले ॥ ४ ॥

॥ ३७६५ ॥ नाहीं गुणदोष लिपो देत अंगीं । झाडितां प्रसंगीं वरावरी ॥ धृ० ॥ निकटवासिया आळवितों धांवा । तेथूनियां देवा सोडवुनी ॥ १ ॥ उमटे अंतरीं तें करूं प्रगट । काळोनी बोभाट धांव घाली ॥ २ ॥ तुका ह्मणे तरि वांचलों या काळें । समर्थाचे बळें सुखी असों ॥ ३ ॥

॥ ३७६६ ॥ आतां येणें पडिलपाडें । रस सेवूं हा निवाडें । मुंगी नेली गोडें । ठेवियलें अडचणी ॥ धृ० ॥ तैसें होय माझ्या जीवा । चरण न सोडीं केशवा । विषयबुद्धि हेवा । वोस पडो सकळ ॥ १ ॥ भुकेलिया श्वाना । गांठ पडे सवें अन्ना । भुंको पाहे प्राणा । परि तोंडींची न सोडी ॥ २ ॥ काय जिंकियेलें मन । जीवित्व कामातुरा तृण । मागे व्यभिचारिण । भक्ति तुका ये जाती ॥ ३ ॥

॥ ३७६७ ॥ न पवीजे तया ठाया । आलों कायाक्लेशेसीं ॥ धृ० ॥ आतां माझें आणीं मना । नारायणा ओजेचें ॥ १ ॥ बहु रिणें पिडिलों फार । परिहार करावा ॥ २ ॥ तुका ह्मणे निर्बळशक्ती । काकुलती म्हूण येतों ॥ ३ ॥

॥ ३७६८ ॥ बहु फिरलों ठायाठाव । कोठें भाव पुरेचिना ॥ धृ० ॥ समाधान तों पावलों । उरलों बोलों यावरी ॥ १ ॥ घे गा देवा आशीर्वाद । आमुच्या नांद भाग्यानें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेवूं आधी । खवखव मधीं सारावी ॥ ३ ॥

॥ ३७६९ ॥ कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठाया ॥ धृ० ॥ तातडी ते काय आतां । ज्याची चिंता तयासी ॥ १ ॥ नांवासाठीं नेघे भार । नलगे फार वित्पत्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे नलगे जावें । कोठें देवें सूचनें ॥ ३ ॥

॥ ३७७० ॥ इंद्रियाचें पुरे कोड । तेंचि गोड पुढतीही ॥ धृ० ॥ जावें ह्मणती पंढर-

पुरा । हाचि बरा संसार ॥ १ ॥ बैसलें तें मनामुळीं । सुख डोळीं देखिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे देती कान । वाणावाण निवडुनी ॥ ३ ॥

॥ ३७७१ ॥ आतां देवा मोकळिलें । तुह्मी भलें दिसेना ॥ धृ० ॥ आतां नाहीं जीव भाव । उरला ठाव वेगळा ॥ १ ॥ सांभाळुन घ्यावें देवा । आपणासवा यावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे नम्र भाज । तरि ते लाज स्वामीसी ॥ ३ ॥

॥ ३७७२ ॥ आशाबद्ध आह्मी भाकितसों कींव । तत्पर हा जीव कार्यापाशीं ॥ धृ० ॥ प्रतिउत्तराची पाहातसें वाट । करूनि बोभाट महाद्वारीं ॥ १ ॥ आपुल्या उचितें करूनियां ठेवीं । संबंध गोसावी तोडोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे एक जालिया निवाड । कोण बडबड करी मग ॥ ३ ॥

॥ ३७७३ ॥ खद्योतें फुलविलें रविपुढें ढुंग । साक्षी तंव जग उभयतां ॥ धृ० ॥ आपल्या आपण नाहीं शोभों येत । चार करी स्फीत दाखवुनी ॥ १ ॥ खाणार ताकाचें असें तें माजीरें । आपणेंचि अधीर कळों येतें ॥ २ ॥ तुका ह्मणे जळो मैंदाची मवाळी । दावुनियां नळी कापी सुखें ॥ ३ ॥

॥ ३७७४ ॥ नाहीं सरों येत कोरड्या उत्तरीं । जिव्हाळ्याची बरी ओल ठायीं ॥ धृ० ॥ आपुलिया हिता मानिसी कारण । सत्या नारायण साह्य असो ॥ १ ॥ निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें । तप्त लोह सुखें धरितां हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे नेम न टळतां बरें । खऱ्यासीचि खरें ऐसें नांव ॥ ३ ॥

॥ ३७७५ ॥ आलों उल्लंघूनि दुःखाचे पर्वत । पायांपाशीं हित तुमच्या तरी ॥ धृ० ॥ न देखेल लासा दुःखी होतें मन । कठिणें कठिण वाटतसे ॥ १ ॥ नव्हे सांडींपरि वाटतें निरास । नये माझा दिस संकल्पाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं सदैव जी देवा । माझ्या हाचि जीवा एक ठाव ॥ ३ ॥

॥ ३७७६ ॥ किती सोसिती करंटीं । नेणों संसाराची आटी । सर्वकाळ पोटीं । चिंतेची हळहळ ॥ धृ० ॥ रिकामिया तोंडें राम । काय उच्चारितां श्रम । उफराटा भ्रम । गोवी विषय माजिरा ॥ १ ॥ कळतां न कळे । उघडे झाकियेले डोळे । भरलें त्याचे चाळे । अंगीं वारें मायेचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जन । ऐसें नांव बुद्धिहीन । बहुरंगें भिन्न । एकीं एक निमालें ॥ ३ ॥

॥ ३७७७ ॥ मंगळाचा मंगळ सांटा । विट तोटा नेणें तें ॥ धृ० ॥ हें भरा सातें आलें । भलें भलें ह्मणवावें ॥ १ ॥ जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥ २ ॥ तुका ह्मणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥ ३ ॥

॥ ३७७८ ॥ नामाचा महिमा बोलिलों उत्कर्ष । अंगा कांहीं रस न येचि तो ॥ धृ० ॥ कैसें समाधान राहे पांडुरंगा । न लगेचि अंगा आणी कांहीं ॥ १ ॥ लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचें तें फिकें वेवसाव ॥ २ ॥ तुका ह्मणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरी माझ्या ॥ ३ ॥

॥ ३७७९ ॥ हेंचि वारंवार । पडताळुनी उत्तर ॥ धृ० ॥ करितों पायांसी विनंती ।

नुपेक्षावें कमळापती ॥ १ ॥ गंगोदकें गंगे । अर्घ्य द्यावें पांडुरंगे ॥ २ ॥ जोडोनियां हात । करी तुका प्रणिपात ॥ ३ ॥

॥ ३७८० ॥ अवचित या तुमच्या पायां । देवराया पावलों ॥ धृ० ॥ बरवें जालें देशाउर । आल्या दुर सारिखें ॥ १ ॥ राहोनियां जातों ठाया । आलियाची निशाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे चरणसेवा । जोडी हेवा लाधली ॥ ३ ॥

॥ ३७८१ ॥ आतां पाविजेल घरा । या दातारा संगती ॥ धृ० ॥ पायांवरि ठेवूं माथां । सर्वथा हा नुपेक्षी ॥ १ ॥ तेथून तेथूवरि आतां । नाहीं सत्ता आणिकांची ॥ २ ॥ तुका ह्मणे चक्रपाणी । शिरोमणि बळियांचा ॥ ३ ॥

॥ ३७८२ ॥ बरवें माझ्या केलें मनें । पंथें येणें निघालें ॥ धृ० ॥ अभयेंचि चावें ठाया । देवराया प्रतापें ॥ १ ॥ साधनाचा न लगे पांग । अवघें सांग कीर्तन ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता थोरी । कोण करी खोळंबा ॥ ३ ॥

॥ ३७८३ ॥ मागें पुढें नाहीं । तुजें यावेगळें कांहीं ॥ धृ० ॥ नाहीं उरलें आणीक । केला झाडा सकळिक ॥ १ ॥ विश्वासावांचून । नांवें तुजियाचें शून्य ॥ २ ॥ देवाविण कांहीं । तुका ह्मणे उरी नाहीं ॥ ३ ॥

॥ ३७८४ ॥ वैराग्याचा अंगीं जालासे संचार । इच्छी वनांतर सेवावया ॥ धृ० ॥ कां जी याचें करूं नये समाधान । वियोगानें मन सिणतसे ॥ १ ॥ नयेचि न्यावया पंढरीचें मूळ । न देवेचि माळ कंठींची हो ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें अप्रीतीचें जिणें । लाजिर हें वाणें सेवा करी ॥ ३ ॥

॥ ३७८५ ॥ आळिकरा कोठें साहातें कठिण । आपुला तें प्राण देऊं पाहे ॥ धृ० ॥ सांभाळावें मायबापें कृपादृष्टी । पीडितां तों दृष्टि देखों नये ॥ १ ॥ अंतरलों मागें संवसारा हातीं । पायांपें सरतीं जालों नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी विचारा जी देवा । ठेवाल तें ठेवा कोणे परी ॥ ३ ॥

॥ ३७८६ ॥ स्वमींचें हें धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरि होऊं नये ॥ धृ० ॥ आजुनि कां करा चाळवाचाळवी । सावकाशें द्यावी सत्य भेटी ॥ १ ॥ बोलोनियां फेडा जीवींची काजळी । पाहेन कोमळीं चरणांबुजें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवींचिया जीवा । सारूनियां ठेवा पडदा आतां ॥ ३ ॥

॥ ३७८७ ॥ येतील अंतरा शिष्टाचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥ धृ० ॥ आतां माझा जीव घेउनियां बळी । बैसवावें वोळी संतांचिये ॥ १ ॥ विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडेचि बोल फोस वांझे ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों निर्वाणाच वरी । राहों नेदीं उरी नारायणा ॥ ३ ॥

॥ ३७८८ ॥ ह्मणउनि काय जीऊं भक्तपणें । जायाचीं भूषणें अळंकारा ॥ धृ० ॥ आपुल्या कष्टाची करूनियां जोडी । मिरवीन उघडी इच्छावसें ॥ १ ॥ तुकें तरि तुकीं खऱ्याचें उत्तम । मुलाम्याचा भ्रम कोठवरी ॥ २ ॥ तुका ह्मणे पुढें आणि मागें फांस । पावें ऐसा नास न करीं देवा ॥ ३ ॥

॥ ३७८९ ॥ आपणचि व्हाल साहे । कासियाला हे धांवणी ॥ धृ० ॥ भाकिली ते उरली कींव । आहे जीव जीवपणें ॥ १ ॥ आहाच कैचा बीजा मोड । प्रीति कोड वांचूनी ॥ २ ॥ तुका ह्मणे दंडिन काया । याल तया धांवणिया ॥ ३ ॥

॥ ३७९० ॥ निश्चितीनें होतों करुनियां सेवा । कां जी मन देवा उद्वेगिलें ॥ धृ० ॥ अनंत उठती चित्ताचे तरंग । करावा हा त्याग वाटतसे ॥ १ ॥ कोण तुह्मांविण मनाचा चाळक । तुजें सांगा एक नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा मांडिला विनोद । करऊं नेणें छंद कराल काई ॥ ३ ॥

॥ ३७९१ ॥ आश्वासावे दास । तरी घडे तो विश्वास ॥ धृ० ॥ नाहीं चुकत चाकरी । फुटे लाडस्याचे थोरी ॥ १ ॥ स्वामीच्या उत्तरें । सुख वाटे अभयें करें ॥ २ ॥ न मागें परि भातें । तुका ह्मणे निढळ वाटे ॥ ३ ॥

॥ ३७९२ ॥ जेणें होय हित । तें तूं जाणसी उचित ॥ धृ० ॥ मज नको लावूं तैसें । वांयां जायें ऐसें पिसें ॥ १ ॥ धरितोसी सत्ता । होसी सकळ जाणता ॥ २ ॥ चतुराच्या राया । अंगीकारावें तुकया ॥ ३ ॥

॥ ३७९३ ॥ राहे उभा वादावादीं । तरी फंदीं सांपडे ॥ धृ० ॥ लव्हाळ्यासी कोठें बळ । करिल जळ आपुलें ॥ १ ॥ कठिणासी बळ जोडा । नम्र पीडा देखेना ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वरसीं । मिळे त्यासी गोत तें ॥ ३ ॥

॥ ३७९४ ॥ ह्मणउनि जाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ॥ धृ० ॥ दाखविलें देवें वर्म । अवघा भ्रम नासला ॥ १ ॥ हातें सुरगाळितां कान । नाहीं भिन्न वेदना ॥ २ ॥ तुका ह्मणे एकांतसुखें । अवघें गोतें गुंतलें ॥ ३ ॥

॥ ३७९५ ॥ न पडो हाडीं घाव । मध्यें कींव नासक ॥ धृ० ॥ करविली आत्महत्या । जीवा कां त्या द्वंद्वाच्या ॥ १ ॥ आशापाशीं गुंतला गळा । तेणें कळाहीन जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे लावूं मुळी । जीवकुळी थारेसी ॥ ३ ॥

॥ ३७९६ ॥ सामावे कारण । नाहीं सोसत धरणें ॥ धृ० ॥ लादी थींके लाजिरवाणी । हीनकमाईची घाणी ॥ १ ॥ पुष्प जवळी नाका । दुर्गंधीच्या नांवें थुंका ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । उपदेशहीन जाती ॥ ३ ॥

॥ ३७९७ ॥ असाल ते तुह्मी असा । आह्मी सहसा निवडों ना ॥ धृ० ॥ अनुसरलों एका चित्तें । हातोंहातें गीवसीत ॥ १ ॥ गुणदोष काशासाठीं । तुमचे पोटीं वागवूं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुजें आतां । कोठें चित्ता आतळों ॥ ३ ॥

॥ ३७९८ ॥ सोंवळा होऊं तों वोंवळें जडलें । सांडीमांडी बोलतोंडीं बीजीं ॥ धृ० ॥ एकसरीं केली कळिवरें साटी । आतां नका तुटी पायांसवें ॥ १ ॥ संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जुसर्प मुळ मरणाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे हें तूं ब्रह्मांड चाळिता । मी कां करूं चिंता पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३७९९ ॥ आहे तैसा आतां आहें ठायीं बरा । ठेवितों दातारा उचितें त्या ॥ धृ० ॥ वचनाचा भार पडिलिया शिरीं । जालें मग भारी उतरेना ॥ १ ॥ अबोल्याची सवे ला-

वुनियां मना । फाकों नेदीं गुणा ऐसें करूं ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां गोंवळ्याचा संग । राखतें तें अंग जाणतसों ॥ ३ ॥

॥ ३८०० । तूं माझा कोंवसा । परी न कळे या धसां ॥ धृ० ॥ कूट खाती मागें पुढें । जाती निरयगांवा पुढें ॥ १ ॥ मज ह्मणताती कवी । निषेधुनि पापी जीवीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । आतां कोण लेखी जगा ॥ ३ ॥

॥ ३८०१ ॥ दर्पणासी बुजे । नखटें तोंड पळवी लाजे ॥ धृ० ॥ गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यासी पीडा करी ॥ १ ॥ चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ॥ २ ॥ तुका ह्मणे जन । देवा असे भाग्यहीन ॥ ३ ॥

॥ ३८०२ ॥ ह्मणउनि शरण जावें । सर्वभावें देवासी ॥ धृ० ॥ तो हा उतरील पार । भवदुस्तरनदीचा ॥ १ ॥ बहु आहे करुणावंत । अनंत हें नाम ज्या ॥ २ ॥ तुका ह्मणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ॥ ३ ॥

॥ ३८०३ ॥ ऐसीं वर्में आह्मां असोनियां हातीं । कां होऊं नेणतीं दिशाभुली ॥ धृ० ॥ पोटाळुनी पाय कवळीन उभा । कृपे पद्मनाभा हालों नेदीं ॥ १ ॥ आपुले इच्छेसी घालीन संपुष्टीं । श्रीमुख तें दृष्टि न्याहाळीन ॥ २ ॥ तुका ह्मणे बहु सांडियेलीं मतें । आपुल्या पुरतें धरुनी ठेलों ॥ ३ ॥

॥ ३८०४ ॥ रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी । आव्हेरुनी बुरी अधिकारें ॥ धृ० ॥ जातिस्वभाव आला डोळ्यां आड । तया घडे नाड न कळतां. ॥ १ ॥ कामधेनु देखे जैशा गाईह्मैसी । आणिकांतें ऐसी करोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे काय बोलोनियां फार । जयाचा वेव्हार तया साजे ॥ ३ ॥

॥ ३८०५ ॥ तरीच हीं केलीं । दानें वाईट चांगलीं ॥ धृ० ॥ एकें एका शोभवावें । केलें कवतुक देवें ॥ १ ॥ काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळिता ॥ २ ॥ तुका ह्मणे धुरें । डोळे भरिले परि खरें ॥ ३ ॥

॥ ३८०६ ॥ अंधळें तें सांगे सांगितल्या खुणा । अनुभव देखणा प्रगट त्या ॥ धृ० ॥ नांदणुक सांगे वडिलाचें बळ । कैसा तो दुर्बळ सुख पावे ॥ १ ॥ तुका ह्मणे नांदों आपल्या प्रतापें । तयाची लोकांपें स्तुति सांगों ॥ २ ॥

॥ ३८०७ ॥ करी आणिकांचा अपमान । खळ छळवादी ब्राह्मण । तया देतां दान । नरका जाती उभयतां ॥ धृ० ॥ तैसें जालें दोघांजणां । मागतिया यजमाना । जाळियलें वनां । आपणासहित कांचणी ॥ १ ॥ घडितां दगडाची नाव । मोल क्लेश गेले वाव । तरता नाहीं ठाव । बुडवी तारूं तरतीया ॥ २ ॥ चोरा दिधला सांटा । तेणें मारियेल्या वाटा । तुका ह्मणे ताटा । हें तंव दोघे नाडती ॥ ३ ॥

॥ ३८०८ ॥ जळो ते जाणिव जळो ते शाहाणींव । राहो माझा भाव विठ्ठलपायीं ॥ धृ० ॥ जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थिर विठ्ठलपायीं ॥ १ ॥ जळो हा लौकिक जळो दंभमान । लागो जीवा ध्यान विठ्ठलाचें ॥ २ ॥ जळो हें शरीर जळो

हा संबंध । राहो परमानंद माझ्या कंठीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें अवघेंचि होय । धरीं मना सोय विठोबाची ॥ ४ ॥

॥ ३८०९ ॥ विश्वास धरूनि राहिलों निवांत । ठेवूनियां चित्त तुझे पायीं ॥ धृ० ॥ तरावें बुडावें तुझिया वचनें । निर्धार हा मनें केला माझ्या ॥ १ ॥ न कळे हें मज साच चाळविलें । देसी तें उगलें घेइन देवा ॥ २ ॥ मागणें तें सरे ऐसें करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥ ३ ॥ करावें कांहीं कीं पाहावें उगलें । तुका ह्मणे बोलें पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३८१० ॥ कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागे देखी ॥ धृ० ॥ बुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥ १ ॥ तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मायबापाचें उचित । करावें हें हित बाळकाचें ॥ ३ ॥

॥ ३८११ ॥ देवाचिये पायीं देई मना बुडी । नको धांवों वोढी इंद्रियांचे ॥ धृ० ॥ सर्व सुखें तेथें होती एकवेळे । न सरती काळें कल्पांतींही ॥ १ ॥ जाणें येणें खुंटे धांवे वेरझार । न लगे डोंगर उसंतावे ॥ २ ॥ सांगणें तें तुज इतुलेंचि आतां । मानीं धन कांता विषतुल्य ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझे होती उपकार । उतरों हा पार भवसिंधू ॥ ४ ॥

॥ ३८१२ ॥ आह्मी विठ्ठलाचे दास जालों आतां । न चले हे सत्ता आणिकांची ॥ धृ० ॥ नावरे तयासी ऐसें नाहीं दुजें । करितां पंढरिराजें काय नव्हे ॥ १ ॥ कोठें तुज ठाव व्यावयासी धांवा । मना तूं विसावा घेई आतां ॥ २ ॥ इंद्रियांची वोढी मोडिला व्यापार । ज्या अंगें संचार चाली तुज ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी जिंकोनियां काळ । बैसलों निश्चळ होऊनियां ॥ ४ ॥

॥ ३८१३ ॥ सांगतों तरि तुह्मी भजा रे विठ्ठला । नाहीं तरि गेला जन्म वांयां ॥ धृ० ॥ करितां भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पुरीं वाहवसी ॥ १ ॥ कांहीं न लगे एक भावचि कारण । तुका ह्मणे आण विठ्ठलाची ॥ २ ॥

॥ ३८१४ ॥ शब्दज्ञानी येऊं नेदीं दृष्टीपुढें । छळवादी कुडे अभक्त ते ॥ धृ० ॥ जळो ते जाणींव जळो त्याचे दंभ । जळो त्याचें तोंड दुर्जनाचें ॥ १ ॥ तुका ह्मणे येती हाटूनि छळाया । त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥ २ ॥

॥ ३८१५ ॥ अन्यायासी राजा जरि न करी दंड । बहुच ते लंड पीडिती जना ॥ धृ० ॥ न करी निगा कुणबी न काढितां तण । कैंचे येती कण हातासी ते ॥ १ ॥ तुका ह्मणे संता करूं नये अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां ॥ २ ॥

॥ ३८१६ ॥ भले लोक नाहीं सांडीत वोळखी । हे तों झाली देखी दुसऱ्याची ॥ धृ० ॥ असो आतां यासी काय चाले बळ । आपुलें कपाळ वोडवलें ॥ १ ॥ समर्थासी काय कोणें ह्मणावें । आपुलियां जावें भोगावरी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां बोल नाहीं देवा । नाहीं केली सेवा मनोभावें ॥ ३ ॥

॥ ३८१७ ॥ मुकें होतां तुझ्या पदरींचें जातें । काय तें भोगितें मीमीपण ॥ धृ० ॥

आपुलिये घरीं मैंद होउनी बसे । कवण कवणासी बोलों नका ॥ १ ॥ तुका ह्मणे तुह्मां सांगतों मी खुण । देवासी तें ध्यान लावूनि बसा ॥ २ ॥

॥ ३८१८ ॥ आषाढी निकट । आणी कार्तिकीचा हाट ॥ धृ० ॥ पुरे दोन्हीच बाजार । न लगे आणिक व्यापार ॥ १ ॥ तेंचि घ्यावें तेंचि द्यावें । कैवल्याच्या रासी भावें ॥ २ ॥ कांहीं कोणा नेणें । विठो वांचूनि तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३८१९ ॥ देऊनियां प्रेम मागितलें चित्त । जाली फिटाफिट तुह्मां आह्मां ॥ धृ० ॥ काशानें उदार तुह्मासी ह्मणावें । एक नेसी भावें एक देसी ॥ १ ॥ देऊनियां थोडें नेसील हें फार । कुंठिसी विचार अवघियांचा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां भांडवल चित्त । देउनी दुश्चित पाडियेलें ॥ ३ ॥

॥ ३८२० ॥ तातडीची धांव अंगा आणि भाव । खोळंबा तो वाव निश्चयाचा ॥ धृ० ॥ ह्मणऊनि बरी विचारावी चाली । उरीचि ते बोली कामा येते ॥ १ ॥ कोरडें वैराग्य माजिरा बडिवार । उतरे तो शूर अंगींचें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे बरी झऱ्याची ते चाली । सांचवण्या खोली कैसीयांची ॥ ३ ॥

॥ ३८२१ ॥ मी तों बहु सुखी आनंदभरिता । आहें साधुसंतां मेळीं सदा ॥ धृ० ॥ कांहीं व्हावें ऐसें नाहीं माझ्या जीवा । आणिक केशवा तुजविण ॥ १ ॥ न लगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसें ॥ २ ॥ मृत्युलोकीं कोण धरील वासना । पावावया जनासवें दुःख ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझा दास ऐसें लोकां । कांहीं सकळिकां कळों यावें ॥ ४ ॥

॥ ३८२२ ॥ घ्यारे लुटी प्रेम सुख । फेडा आजि धणी । चुकला तो मुकला । जाली वेरझार हानी ॥ धृ० ॥ घाला घातला वैकुंठीं । करूनियां जीवें साटी । पुरविली पाठी । वैष्णवीं काळाची ॥ १ ॥ अवघें आणिलें अंबर । विठोसहित तेथें धूर । भेदूनि जिव्हार । नामबाणीं धरियेला ॥ २ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघीं जालीं जालीं गहन । केलीं पापपुण्यें । देशधडी बापुडीं ॥ ३ ॥ आनंदें गर्जती निर्भर । घोष करिती निरंतर । कांपती असुर । वीर कवणा नागवती ॥ ४ ॥ जें दुर्लभ ब्रह्मादिकां । आजि सांपडलें फुका । घ्यारे ह्मणे तुका । सावाचित्त होउनी ॥ ५ ॥

॥ ३८२३ ॥ तुझिया दासांचा हीन झालों दास । न धरीं उदास मायबापा ॥ धृ० ॥ तुजविण प्राण कैसा राहों पाहे । वियोग न साहे क्षणभरी ॥ १ ॥ आणिक माझ्या जीवें मोकलिली आस । पाहे तुझी वास पांडुरंगा ॥ २ ॥ सर्वभावें तुज आणिला उचित । राहिलों निश्चित तुझे पायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज असो माझा भार । बोलतों मी फार काय जाणें ॥ ४ ॥

॥ ३८२४ ॥ तेंचि करीं मात । जेणें होईल तुझें हित ॥ धृ० ॥ काय बडबड अमित । सुख जिव्हारीं सिणविसी ॥ १ ॥ जो मुळव्याधि पीडिला । त्यासी देखोन हांसे खरजुला ॥ २ ॥ आरथकरी सोसी । त्यासी हांसे तो आळसी ॥ ३ ॥ क्षयरोगी ह्मणे परता । सर

रोगिया तूं आतां ॥ ४ ॥ वडस दोहीं डोळां वाढले । आणिकां कानें कोंचें ह्मणे ॥ ५ ॥ तुका ह्मणे लागों पायां । शुद्ध करा आपणियां ॥ ६ ॥

॥ ३८२५ ॥ कळों आला भाव माझा मज देवा । वांयांविण जीवा आठविलें ॥ धृ० ॥ जोडूनि अक्षरें केलीं तोंडपिटी । न लगे शेवटीं हातीं कांहीं ॥ १ ॥ तुका ह्मणे माझे गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे मज ॥ २ ॥

॥ ३८२६ ॥ आतां तरी मज सांगा साच भावें । काय म्यां करावें ऐसें देवा ॥ धृ० ॥ चुकावया कर्म नव्हतें कारण । केला होय सीण अवघाची ॥ १ ॥ तुका ह्मणे नको पाहूं निरवाण । देईं कृपादान याचकासी ॥ २ ॥

॥ ३८२७ ॥ बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आह्मी अविश्वासी सर्वभावें ॥ धृ० ॥ दंभें करी भक्ति सोंग दावी जना । अंतरीं भावना वेगळिया ॥ १ ॥ तुका ह्मणे देवा तूं काय करिसी । कर्मा दुस्तरासी आमुचिया ॥ २ ॥

॥ ३८२८ ॥ नामधारकासी नाहीं वर्णावर्ण । लेखंड प्रमाण नाना जात ॥ धृ० ॥ शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार । परिसीं संस्कार सकळही हेम ॥ १ ॥ पर्जन्य वर्षतां जीवना वाहावठ । तें समसकट गंगे मिळे ॥ २ ॥ सर्व तें हें जाय गंगाचि होऊन । तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ॥ ३ ॥ महापुरी जैसें जातसे उदक । मध्यें तें तारक नाव जैसी ॥ ४ ॥ तये नावेसंगें ब्राह्मण तरती । केवीं ते बुडती अनामिक ॥ ५ ॥ नाना काष्ठजात पडतां हुताशनीं । ते जात होउनी एकरूप ॥ ६ ॥ तेथें निवडेना घुरे कीं चंदन । तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ७ ॥ पूर्वानुओळख तेंचि पैं मरण । जरि पावे जीवन नामामृत ॥ ८ ॥ नामामृतें जालें मुळीचें स्मरण । सहज साधन तुका ह्मणे ॥ ९ ॥

॥ ३८२९ ॥ काय वांचोनियां जालों भूमिभार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥ धृ० ॥ जातां भले काय डोळियांचें काम । जरि पुरुषोत्तम न देखती ॥ १ ॥ काय मुख बिळ श्वापदाचें धाम । नित्य तुझें नाम नुचारितां ॥ २ ॥ तुका ह्मणे पैं या पांडुरंगाविण । न वचेचि क्षण जीव भला ॥ ३ ॥

॥ ३८३० ॥ सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा । कांडितो ढोंमरा संतांलागीं ॥ धृ० ॥ गाईशीं देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ १ ॥ पान फुल नेतो वेश्येसी उदंड । ब्राह्मणासी खांड देऊं नेदी ॥ २ ॥ पर्वकाळीं धर्म न करी नासरी । वेची राजद्वारीं उदंडची ॥ ३ ॥ कीर्तना जावया होतसे हिंपुष्टी । खेळतो सोंकटीं रात्रंदिवस ॥ ४ ॥ बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितियासी दवडितो ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ६ ॥

॥ ३८३१ ॥ कां हो पांडुरंगा न करा धांवणें । तरि मज कोणें सोडवावें ॥ धृ० ॥ तुझा ह्मणऊनि आणिकापें उभा । राहों हें तों शोभा नेदी आतां ॥ १ ॥ काळें पुरवली पाठी दुरवरी । पुढें पायां धीरी राहों नेदी ॥ २ ॥ नको आणूं माझें संचित मनासी । पावना आहेसी पतिता तूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चाले आणिकांची सत्ता । तुज आळवितां नवल हें ॥ ४ ॥

॥ ३८३२ ॥ कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥ धृ० ॥ गजालागीं केला कस्तुरीचा लेप । तिचें तो स्वरूप काय जाणें ॥ १ ॥ बकापुढें सांगे भावार्थवचन । वाउगाचि सीण होय त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे अभाविक जन । त्यांसी वांयां सीण करूं नये ॥ ३ ॥

॥ ३८३३ ॥ आतां धरितों पदरीं । तुज मज करीन सरी ॥ धृ० ॥ जालों जीवासी उदार । उभा ठाकलों समोर ॥ १ ॥ तुका विनवीतसे संतां । ऐसें सांगा पंढरिनाथा ॥ २ ॥

॥ ३८३४ ॥ न कळसी ज्ञाना न कळसी ध्याना । न कळसी दर्शना धुंडाळितां ॥ धृ० ॥ न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा वेदां पार ॥ १ ॥ तुका ह्मणे तुझा नाहीं अंतपार । ह्मणोनि विचार पडिला मज ॥ २ ॥

॥ ३८३५ ॥ पायां लावूनियां दोरी । भृंग बांधिला लेंकुरीं ॥ धृ० ॥ तैसा पावसी बंधन । मग सोडवील कोण ॥ १ ॥ गळां बांधोनियां दोरी । वानर हिंडवी घरोघरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहें । रीस धांपा देत आहे ॥ ३ ॥

॥ ३८३६ ॥ मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥ धृ० ॥ तैसा नव्हे देव-राव । याचा कृपाळु स्वभाव ॥ १ ॥ मनासारिखें न होता । बाळकासी मारी माता ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगूं किती । बाप लेंकासी मारिती ॥ ३ ॥

॥ ३८३७ ॥ धन मेळवूनि कोटी । सवें नये रे लंगोटी ॥ धृ० ॥ पानें खाशील उदंड । अंतीं जासी सुकल्या तोंडें ॥ १ ॥ पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगाती ॥ २ ॥ तुका ह्मणे राम । एक विसरतां श्रम ॥ ३ ॥

॥ ३८३८ ॥ विनवितों चतुरा तुज विश्वंभरा । परियेसीं दातारा पांडुरंगा ॥ धृ० ॥ तुझे दास ऐसें जगीं वाखाणिलें । आतां नव्हे भलें मोकलितां ॥ १ ॥ माझे गुणदोष कोण जाणे मात । पावनपतित नाम तुझें ॥ २ ॥ लोभ मोह माया आह्मां बांधविता । तरि हा अनंता बोल कोणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों पतितचि खरा । परि आलों दातारा शरण तुज ॥ ४ ॥

॥ ३८३९ ॥ त्राहे त्राहे त्राहे सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे पायीं ॥ धृ० ॥ एकाचि मागणें देईं तुझी गोडी । न लगे आवडी आणिकाची ॥ १ ॥ तुझें नाम गुण वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें नाचों रंगीं ॥ २ ॥ बापा विठ्ठलराया हेंचि देईं दान । जोडती चरण जेणें तुझे ॥ ३ ॥ आवडीसारिखें मागितलें जरी । तुका ह्मणे करीं समा-धान ॥ ४ ॥

॥ ३८४० ॥ सुगरणीबाई थिता नास केला । गुळ तो घातला भाजीमध्यें ॥ धृ० ॥ क्षीरीमध्यें हिंग दुधामध्यें बोळ । थितेंचि वोंगळ कैसें केलें ॥ १ ॥ दळण दळोनी भरूं गेली पाळी । भरडोनि वोंगळी नास केला ॥ २ ॥ कापुराचे सांतें आणिला लसण । वागवितां सीण दुःख होय ॥ ३ ॥ रत्नाचा जोहारी रत्नाचि पारखी । येर देखोदेखीं हातीं घेती ॥ ४ ॥ तुका ह्मणे जरी योग घडे निका । न घडतां थुंका तोंडावरी ॥ ५ ॥

॥ ३८४१ ॥ बाप माझा दिनानाथ । वाट भक्तांची पहात ॥ धृ० ॥ कर ठेवूनियां

कटीं । उभा चंद्रभागे तटीं ॥ १ ॥ गळां वैजयंती माळा । रूपें डोळस सांवळा ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥ ३ ॥

॥ ३८४२ ॥ माझें जीवन तुझे पाय । कृपाळु तूं माझी माय ॥ धृ० ॥ नेदीं दिसों किविलवाणें । पांडुरंगा तुझें तान्हें ॥ १ ॥ जन्ममरण तुजसाटीं । आणिक नेणें दुजी गोष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुजविण । कोण हरिल माझा सीण ॥ ३ ॥

॥ ३८४३ ॥ कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥ धृ० ॥ ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली विट ॥ १ ॥ युगें जालीं अठ्ठाविस । अजुनी न ह्मणसी बैस ॥ २ ॥ भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुंडलिका । तूंचि बळिया एक निका ॥ ४ ॥

॥ ३८४४ ॥ तुज पाहातां समोरी । दृष्टि न फिरे माघारी ॥ धृ० ॥ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडिली पंढरिराया ॥ १ ॥ नव्हे सारिता निराळें । लवण मेळवितां जळें ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । जीव दिला पायांतळीं ॥ ३ ॥

॥ ३८४५ ॥ उपदेश किती करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ॥ धृ० ॥ शुद्ध कां वासना नव्हे चांडाळाची । होळी संचिताची केली तेणें ॥ १ ॥ नाहीं भाव मनीं नाइके वचन । आपला आपण उणें घेतो ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यासी काय व्याली रांड । करी बडबड रिती दिसे ॥ ३ ॥

॥ ३८४६ ॥ समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आल्याची लागे चिंता ॥ धृ० ॥ न पाहे तयाचे गुण दोष अन्याय । सुख देऊनि साहे दुःख त्याचें ॥ १ ॥ मान अलेपण नाहीं फुकासाठीं । जयावरि गांठी झीज साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे हें तूं सर्वही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥ ३ ॥

॥ ३८४७ ॥ आनंदें कीर्तन कथा करीं घोष । आवडीचा रस प्रेमसुख ॥ धृ० ॥ मज या आवडे वैष्णवांचा संग । तेथें नाहीं लाग कळिकाळा ॥ १ ॥ स्वल्प मंत्र वाचे बैसलासे निका । रामकृष्ण सखा नारायण ॥ २ ॥ विचारितां दुजें वाटे मज लाज । उपदेशें काज आणिक नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त रंगलेंसे ठायीं । माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३८४८ ॥ ब्रह्मज्ञान जेथें आहे घरोघरीं । सर्व निरंतरीं चतुर्भुज ॥ धृ० ॥ पापा नाहीं रीग काळाचें खंडण । हरिनामकीर्तन परोपरी ॥ १ ॥ तुका ह्मणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गति चाड मज ॥ २ ॥

॥ ३८४९ ॥ मज नाहीं कोठें उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडींही ॥ धृ० ॥ कासया जिकीर करणें येविसीं । भयाची मानसीं चिंता खंती ॥ १ ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । संत नेतीं चाली आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें पाळण पोषण । करी नारायण सर्वस्वेंसी ॥ ३ ॥

॥ ३८५० ॥ नाहीं हित ठावें जननीजनका । दाविले लौकिकाचार तींहीं ॥ धृ० ॥ अंधळ्याचे काठी लागले आंधळे । घात एकवेळे मागेंपुढें ॥ १ ॥ न ठेवावी चाली

करावा विचार । वरील आहार गळीं लावी ॥ २ ॥ तुका ह्मणे केला निवाडा रोकडा । राऊत हा घोडा हातोहातीं ॥ ३ ॥

॥ ३८५१ ॥ आतां पहाशील काय माझा अंत । आलों शरणागत तुज देवा ॥ धृ० ॥ करीं अंगीकार राखें पायांपाशीं । ह्मणीं दिसों देसी कींविलवाणें ॥ १ ॥ नाहीं आइकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥ ३ ॥

॥ ३८५२ ॥ होईल तो भोग भोगीन आपुला । न घलीं विठ्ठला भार तुज ॥ धृ० ॥ तुह्मांपासाव हें इच्छीतसें दान । अंतरींचें ध्यान मुखीं नाम ॥ १ ॥ नये काकुलती गर्भवासांसाठीं । न धरीं हें पोटीं भय कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मज उदंड एवढें । न वाचावें पुढें मायबापा ॥ ३ ॥

॥ ३८५३ ॥ माझा तों स्वभाव आहे अनावर । तुज देतां भार कांहीं नव्हे ॥ धृ० ॥ ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृतीहि स्वप्ना ताळ नाहीं ॥ १ ॥ संपादिला तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्या नाहीं पाठी पोट । असोनि निघोट काय जातीं ॥ ३ ॥

॥ ३८५४ ॥ काय तुझी ऐसी वेचते गांठोळी । माझी टाळाटाळी करीतसां ॥ धृ० ॥ चतुराच्या राया आहो पांडुरंगा । ऐसें तरि सांगा निवडुनी ॥ १ ॥ कोण तुह्मां सुख असे या कवतुकें । भोगितां अनेकें दुःखें आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जालासीं निर्गुण । आह्मां येथें कोण सोडवील ॥ ३ ॥

॥ ३८५५ ॥ देवाची पूजा हे भूताचें पाळण । मत्सर तो सीण बहुतांचा ॥ धृ० ॥ रुसावें फुगावें आपुलियावरी । उरला तो हरि सकळही ॥ १ ॥ तुका ह्मणे संतपण यांचि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥ २ ॥

॥ ३८५६ ॥ नाहीं जप तप जीवाची आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥ धृ० ॥ निजलिया ठायीं पोकारिला धांवा । सांकडें तें देवा निवारावें ॥ १ ॥ नाहीं आणूनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मीं वेचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें साच भावें ॥ ३ ॥

॥ ३८५७ ॥ देह तंव आहे प्रारब्धा आधीन । याचा मी कां सीण वाहूं भार ॥ धृ० ॥ सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥ १ ॥ लाभ तो न दिसे याहूनि दुसरा । आणिक दातारा येणें जन्में ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों सोसीत संकटें । मी माझें वोखटें आहे देवा ॥ ३ ॥

॥ ३८५८ ॥ सकळ तुझे पायीं मानिला विश्वास । न करीं उदास आतां मज ॥ धृ० ॥ जीवीं गातां गोड आइकतां कानीं । पाहातां लोचनीं मूर्ति तुझी ॥ १ ॥ मन स्थिर माझें जालेंस निश्चळ । वारिलीं सकळ आशापाश ॥ २ ॥ जन्मजराव्याधि निवारलें दुःख । वोसंडलें सुख प्रेम धरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज जाला हा निर्धार । आतां वांयां फार काय बोलों ॥ ४ ॥

॥ ३८५९ ॥ नये माझा तुह्मां होऊं शब्दस्पर्श । विप्रवृंदा तुह्मां ब्राह्मणांसी ॥ धृ० ॥ ह्मणोनियां तुह्मां करितों विनंती । द्यावें शेष हातीं उरलें तें ॥ १ ॥ वेदीं कर्म जैसें बोलिलें विहित । करावी ते नीत विचारुनी ॥ २ ॥ तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३८६० ॥ बहुत असती मागें सुखी केली । अनाथा माउली जिवांची तूं ॥ धृ० ॥ माझिया संकटा न धरीं आळस । लावूनियां कास पार पावीं ॥ १ ॥ कृपावंता करा ज्याचा अंगिकार । तया संवसार नाहीं पुन्हां ॥ २ ॥ विचारितां नाहीं दुजा बळिवंत । ऐसा सर्वगत व्यापी कोणी ॥ ३ ॥ ह्मणऊनि दिला मुळीं जीवभाव । देह केला वाव समाधिस्थ ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं जाणत आणिक । तुजविण एक पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ३८६१ ॥ वैभवाचे धनी सकळ शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिलें तें ॥ धृ० ॥ नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायाठाव ॥ १ ॥ जाणोनि नेणती अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणेची ॥ २ ॥ तुका ह्मणे बरें धाकट्याचें जिणें । माता स्तनपानें वाढविते ॥ ३ ॥

॥ ३८६२ ॥ आह्मां देणें धरा सांगतों तें कानीं । चिंता पाय मनीं विठोबाचे ॥ धृ० ॥ तेणें माझें चित्त होय समाधान । विलास मिष्टान्न न लगे सोनें ॥ १ ॥ व्रत एकादशी दारीं वृंदावनें । कंठीं ल्यारे लेणें तुळसीमाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचे घरींची उष्टावळी । मज ते दिवाळी दसरा सण ॥ ३ ॥

॥ ३८६३ ॥ आतां मी अनन्य येथें अधिकारी । होइन कोणे परि नेणें देवा ॥ धृ० ॥ पुराणींचा अर्थ ऐकतां मानस । होतो कासाविस जीव माझा ॥ १ ॥ इंद्रियांचे आह्मी पांगिलों अंकित । त्यांच्या संगें चित्त रंगलें तें ॥ २ ॥ एकाचेंही जेथें न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरीं मोकळिसी आतां । तरी मी अनंता वांयां गेलों ॥ ४ ॥

॥ ३८६४ ॥ आवडी धरोनी आलेती आकारा । केला हा पसारा याजसाठीं ॥ धृ० ॥ तें मी तुझें नाम गाईन आवडी । क्षण एक घडी विसंबेना ॥ १ ॥ वर्म जाणावें हा मुख्यधर्मसार । अवघे प्रकार तयापासीं ॥ २ ॥ वेगळ्या विचारें वेगळाले भाव । धरायासी ठाव बहु नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे घालूं इच्छेचिये पोटीं । कवळुनी धाकुटी मूर्ति जीवें ॥ ४ ॥

॥ ३८६५ ॥ भागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें आश्वासीजे ॥ धृ० ॥ देऊनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें हीं ढातारें निववावीं ॥ १ ॥ अमृताची दृष्टि घालूनियां वरी । शीतळ हा करीं जीव माझा ॥ २ ॥ घेईं उचलूनि पुसें तानभूक । पुसीं माझें मुख पितांबरें ॥ ३ ॥ बुझावोनि माझी धरीं हनुवटी । ओवाळुनी दिठी करुनी सांडीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे बापा आहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥ ५ ॥

॥ ३८६६ ॥ न सरे लुटितां मागें बहुतां जनीं । जुनाट हे खाणी उघडिली ॥ धृ० ॥ सिद्ध महामुनि साधक संपन्न । तिहीं हें जतन केलें होतें ॥ १ ॥ पायाळाच्या गुणें पडिलें

ठाऊकें । जगा पुंडलिकें दाखविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें होतों मी दुबळा । आलें या कपाळा थोडें बहू ॥ ३ ॥

॥ ३८६७ ॥ भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ धृ० ॥ वाढवुनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंबुवेषा सहज स्थिती ॥ १ ॥ कोरोनियां भूमि करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंची ॥ ३ ॥

॥ ३८६८ ॥ धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखिला धणीवरी ॥ धृ० ॥ धन्य जालें मुख निवाली रसना । नाम नारायणा घोष करूं ॥ १ ॥ धन्य हें मस्तक सर्वांग शोभलें । संतांचीं पाउलें लागताती ॥ २ ॥ धन्य आजि पंथें चालती पाउलें । टाळिया शोभले धन्य कर ॥ ३ ॥ धन्य तुका ह्मणे आह्मांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ॥ ४ ॥

॥ ३८६९ ॥ बरवी हे वेळ सांपडली संधी । साह्य झाली बुद्धि संचितासी ॥ धृ० ॥ येणें पंथें माझीं चालिलीं पाउलें । दरुषण जालें संतांपायीं ॥ १ ॥ त्रासिलें दरिद्रें दोषा जाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत जाला ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला आवघा व्यापार । आली वेरझार फळासी हे ॥ ३ ॥

॥ ३८७० ॥ आपणा लागे काम वाण्या घरीं गुळ । त्याचे याति कुळ काय कीजे ॥ धृ० ॥ उकरड्यावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठायागुणें ॥ १ ॥ गाईचा जो भक्ष अमंगळ खाय । तिचें दूध काय सेवूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे काय सलपटासी काज । फणसांतील बीज काढूनि घ्यावें ॥ ३ ॥

॥ ३८७१ ॥ जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरीं ॥ धृ० ॥ अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं जया ॥ १ ॥ मंजुळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं विघडी जीवप्राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥ ३ ॥

॥ ३८७२ ॥ वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ॥ धृ० ॥ तेवीं शब्दज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनियां ॥ १ ॥ बोलाचिच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण जाला ॥ २ ॥ कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ४ ॥

॥ ३८७३ ॥ तुझिया पाळणा ओढे माझें मन । गेलों विसरोन देहभाव ॥ धृ० ॥ लागला पालट फेडणें उसणें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ॥ १ ॥ तुका ह्मणे माझा जीव जैसा ओढे । तैसाचि तिकडे पाहिजेल ॥ २ ॥

॥ ३८७४ ॥ मी दास तयांचा जयां चाड नाहीं । सुखदुःख दोहीं विरहित ॥ धृ० ॥ राहिलासे उभा भीवरेच्या तीरीं । कट दोहीं करीं धरोनियां ॥ १ ॥ नवल काय तरी पाचारितां पावे । न स्मरत धांवे भक्तकाजा ॥ २ ॥ सर्व भार माझा त्यासी आहे चिंता ।

तोचि माझा दाता स्वहिताचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यासी गाईन मी गीतीं । आणिक तें चित्तीं न धरीं कांहीं ॥ ४ ॥

॥ ३८७५ ॥ झुंझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख । करितां हें दुःख थोर आहे ॥ धृ० ॥ तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ १ ॥ पिंड पोसिलिया विषयांचा पाइक । वैकुंठनायक कैंचा तेथें ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें देहासी उदार । रकुमादेवीवर जोडावया ॥ ३ ॥

॥ ३८७६ ॥ पाषाण प्रतिमा सोन्याच्या पादुका । हें हो हातीं एका समर्थाचे ॥ धृ० ॥ अनामिका हातीं समर्थाचा सिक्का । न मानितां लोकां येइल कळों ॥ १ ॥ तुका ह्मणे येथें दुराग्रह खोटा । आपुल्या अदृष्टा शरण जावें ॥ २ ॥

॥ ३८७७ ॥ बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । टाकोनियां मनीं ठेविला सीण ॥ धृ० ॥ आतां पायांपाशीं लपवावें देवा । नको पाहूं सेवा भक्ति माझी ॥ १ ॥ बहु भय वाटे एकाच्या बोभाटें । आली घायवटे फिरोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे सिगे भरूं आलें माप । वियोग संताप जाला तुझा ॥ ३ ॥

॥ ३८७८ ॥ धरूनियां मनीं बोलिलों संकल्प । होसी तरि बाप सिद्धि पाव ॥ धृ० ॥ उत्कंठा हे आजी जाली माझे पोटीं । मोकळिली गोष्टी टाळाटाळ ॥ १ ॥ माझा मज असे ठाउका निर्धार । उपाधि उत्तर न साहे पैं ॥ २ ॥ तुका ह्मणे जरि दिली आठवण । तरि अभिमान धरीं याचा ॥ ३ ॥

॥ ३८७९ ॥ आजिवरी होतों संसाराचे हातीं । आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥ धृ० ॥ तुला शरणागत व्हावें नारायणा । अंगिकारा दीना आपुलिया ॥ १ ॥ विसरलों काम याजसाठीं धंदा । सकळ गोविंदा माझें तुझें ॥ २ ॥ तुका ह्मणे विज्ञापना परिसावी । आवडी हे जीवीं जाली तैसी ॥ ३ ॥

॥ ३८८० ॥ धन्यधन्य ज्यास पंढरिसीं वास । धन्य ते जन्मास प्राणी आले ॥ धृ० ॥ चहु खाणीमध्यें होत कोणी एक । त्रिगुण कीटक पक्षिराज ॥ १ ॥ उत्तम चांडाळ नरनारी बाळ । अवघेचि सकळ चतुर्भुज ॥ २ ॥ अवघा विठ्ठल तेथें दुजा नाहीं । भरला अंतर्बाहीं सदोदित ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें होउनी राहेन । सांडोवा पाषाण पंढरीचा ॥ ४ ॥

॥ ३८८१ ॥ असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनास निष्ठुर अति वादी ॥ धृ० ॥ अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखियापरी आपेंआप ॥ १ ॥ संत ते समय वोळखती वेळ । चतुष्ट निर्मळ चित्त सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे हित उचित अनुचित । मज लागे नित आचरावें ॥ ३ ॥

॥ ३८८२ ॥ आतां काय खावें कोणीकडे जावें । गांवांत रहावें कोण्या बळें ॥ धृ० ॥ कोपला पाटील ये गांवींच्या लोकां । आतां मज भिका कोण घाली ॥ १ ॥ आतां येणें चवी सांडिली ह्मणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ २ ॥ भल्या लोकीं यासी सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे याचा संग नव्हे भला । शोधित विठ्ठला जाऊं आतां ॥ ४ ॥

॥ ३८८३ ॥ विठ्ठलावांचोनि ब्रह्म जें बोलती । वचन तें संतीं मानूं नये ॥ धृ० ॥ विठ्ठलावांचूनी जे जे उपासना । अवघाचि जाणा संभ्रमू तो ॥ १ ॥ विठ्ठलावांचूनि सांगतील गोष्टी । वांयां ते हिंपुटी होत जाणा ॥ २ ॥ विठ्ठलावांचूनि जें कांहीं जाणती । तितुल्या विपत्ति वाऊगिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे एक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाउगाची ॥ ४ ॥

॥ ३८८४ ॥ *सर्व काळ डोळां बैसो नारायण । नयो अभिमान आड मध्यें ॥ धृ० ॥ धाड पडो तुझ्या थोरपणावरी । वाचे नरहरि उच्चारीना ॥ १ ॥ जळो अंतरींचें सर्व जाणपण । विवादवचन अहंतेचें ॥ २ ॥ सकळां चरणीं गळित माझा जीव । तुका ह्मणे भाव एकविध ॥ ३ ॥

॥ ३८८५ ॥ मधुरा उत्तरासवें नाहीं चाड । अंतरंगीं वाड भाव असो ॥ धृ० ॥ प्राणावेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥ १ ॥ जननिंदा होय तो बरा विचार । थोरवीचा भार कामा नये ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं भाव निष्ठावंत । दया क्षमा शांत सर्वां भूतीं ॥ ३ ॥

॥ ३८८६ ॥ झाडा वरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळोवेळां ॥ धृ० ॥ वल्कलें नेसूनि ढुंगा गुंडाळुनी । सांडी जवळुनी देहभान ॥ १ ॥ लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाटीं ॥ २ ॥ सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ॥ ३ ॥ ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका ह्मणे त्याचा पांग फिटे ॥ ४ ॥

॥ ३८८७ ॥ भक्तिभावें करी बैसोनि निश्चित । नको गोवूं चित्त प्रपंचासी ॥ धृ० ॥ एक दृढ करीं पंढरीचा राव । मग तुज उपाव पुढील सुचे ॥ १ ॥ नको करूं कांहीं देवतापूजन । जप तप ध्यान तेंहीं नको ॥ २ ॥ मानिसील ह्मणी आपलिक कांहीं । येरझार पाहीं न चुके कदा ॥ ३ ॥ ऐसे जन्म किती पावलासी देहीं । अझूनि कां नाहीं कळली सोय ॥ ४ ॥ सोय धरीं आतां होय पां सावध । अनुभव आनंद आहे कैसा ॥ ५ ॥ सहज कैसें आहे तेथीचें तें गुज । अनुभवें निज पाहे तुकीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां होईं तूं सावध । तोडीं भवबंध एका जन्में ॥ ७ ॥

॥ ३८८८ ॥ दोराच्या आधारें पर्वत चढला । पाउलासाठीं केला अपघात ॥ धृ० ॥ अष्टोत्तरशतें व्याधि ज्या वैद्यें दवडुनी । तो मारूनि उत्तीर्ण जाला ॥ १ ॥ नव मास माया वाहिल उदरीं । ते माता चौबारीं नग्न केली ॥ २ ॥ गायत्रीचें क्षीर पिळुनी घेउनी । उपवासी बांधोनी ताडन करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे दासा निंदी त्याचें तोंड । पहातां नरककुंड पूर्वजांसी ॥ ४ ॥

॥ ३८८९ ॥ न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका वेव्हार करीतसे ॥ धृ० ॥ विश्वामित्रा पोटीं तयाचा अवतार । नांव महाखर चांडाळाचें ॥ १ ॥ द्रव्यइच्छेसाठीं करीतसे कथा । काय त्या पापिष्ठा न मिळे खाया ॥ २ ॥ पोट पोसावया तोंडें बडबडी ।

नाहीं घडफुडी एक गोष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया काय व्याली रांड । येऊनियां भंड जनामध्यें ॥ ४ ॥

॥ ३८९० ॥ नित्य उठोनियां खायाचीच चिंता । आपुल्या तूं हिता नाठविसी ॥ धृ० ॥ जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुह्मी तेव्हां केली तेणें ॥ १ ॥ चातका लागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥ २ ॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरी । तयांलागीं हरि उपेक्षीना ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव धरून राहें चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ॥ ४ ॥

॥ ३८९१ ॥ जे जे आळी केली ते ते गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ धृ० ॥ काय समाधान केलें कोणे वेळे । कोणे माझे लळे पाळियेले ॥ १ ॥ अभ्यास तो नाहीं स्वप्नींही दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां कैंचाचि तो ॥ २ ॥ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसें जगामाजी जालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं भरवसा । मोकालिसी ऐसा वाटतोसी ॥ ४ ॥

॥ ३८९२ ॥ पूर्वींहूनि बहु भक्त सांभाळिले । नाहीं अव्हेरिले दास कोणी ॥ धृ० ॥ जे जे शरण आले ते ते आपंगिले । पवाडे विठ्ठले ऐसे तुझे ॥ १ ॥ मिरवे चरणीं ऐसीये गोष्टीचें । भक्तसांभाळाचें ब्रीद ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मांसाठीं येणें रूपा । माझ्या मायबापा पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३८९३ ॥ दर्दुराचें पिलुं ह्मणे रामराम । नाहीं उदक उष्ण होऊं दिलें ॥ धृ० ॥ कढेमाजी बाळ करी तळमळ । गोविंद गोपाळ पावें वेगीं ॥ १ ॥ आज्ञा तये काळीं केली पावकासी । ह्मणी पिलीयासी तापवीसी ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझे ऐसे हे पवाडे । वर्णितां निवाडे सुख वाटे ॥ ३ ॥

॥ ३८९४ ॥ करुणा बहुत तुझिया अंतरा । मज विश्वंभरा कळों आलें ॥ धृ० ॥ पक्षीयासी तुझें नाम जें ठेविलें । तयें उद्धरिलें गणिकेसी ॥ १ ॥ कुंटिणी ते दोष बहु आचरली । नाम घेतां आली करुणा तुज ॥ २ ॥ हृदय कोमळ तुझें नारायणा । ऐसें बहुता जनां तारियेलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सीमा नाहीं तुझे दये । कोमळ हृदय पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३८९५ ॥ अजामिळ अंत मरणासी आला । तोंवरि स्मरला नाहीं तुज ॥ धृ० ॥ प्राण जातेवेळे ह्मणे नारायण । त्यासाठीं विमान पाठविलें ॥ १ ॥ बहुत कृपाळु होसी जगन्नाथा । त्रैलोक्यसमर्था सोइरिया ॥ २ ॥ तुका ह्मणे भक्तकाज तूं कैवारी । तुज साही चारी वर्णिताती ॥ ३ ॥

॥ ३८९६ ॥ धर्म रक्षावया अवतार घेशी । आपुल्या पाळिसी भक्तजना ॥ धृ० ॥ अंबऋषीसाठीं जन्म सोसियेले । दुष्ट निर्दाळिले किती एक ॥ १ ॥ धन्य तुज कृपासिंधु ह्मणतील । आपुला तूं बोल साच करीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज वर्णिती पुराणें । होय नारायण दयासिंधू ॥ ३ ॥

॥ ३८९७ ॥ येउनी जाउनी पाहें तुजकडे । पहिल्या सांकडें नारायणा ॥ धृ० ॥

आणिक कोणाचा मज नाहीं आधार । तुजवरि भार जीवें भावें ॥ १ ॥ निष्ठुर अथवा होई तूं कृपाळ । तुज सर्वकाळ विसरेंना ॥ २ ॥ आपुलें वचन राहावें सांभाळुन । तुह्मां आह्मां जाण पडिपाडू ॥ ३ ॥ ज्याच्या वचनासी अंतर पडेल । बोल तो होईल तया-कडे ॥ ४ ॥ तुह्मां आह्मां तैसें नाहीं ह्मणे तुका । होसील तूं सखा जीवलग ॥ ५ ॥

॥ ३८९८ ॥ आइक नारायणा वचन माझें खरें । सांगतों निर्धारें तुजपासीं ॥ धृ० ॥ नाहीं भाव मज पडिली लोकलाज । राहिलेंसे काज तुझे पायीं ॥ १ ॥ जरि तुज कांहीं करणें उचित । तारीं तूं पतित तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ३८९९ ॥ अनाथ परदेशी हीनदीन भोळे । उगलेंचि लोळे तुझे रंगीं ॥ धृ० ॥ आपुलें ह्मणावें मज नुपेक्षावें । प्रेमसुख द्यावें मायबापा ॥ १ ॥ कासवीचे परि दृष्टि पाहें मज । विज्ञानीं उमज ठावूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा जालों शरणागत । काया वाचा चित्त दुजें नाहीं ॥ ३ ॥

॥ ३९०० ॥ पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजि दिन सोनियाचा ॥ धृ० ॥ पावलों पंढरी आनंदगजरें । वाजतील तुरें शंख भेरी ॥ १ ॥ पावलों पंढरी क्षेमआलिं-गनीं । संत या सज्जनीं निववीलें ॥ २ ॥ पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ॥ ३ ॥ पावलों पंढरी येरझार खुंटली । माउली वोळली प्रेमपान्हा ॥ ४ ॥ पावलों पंढरी आपुलें माहेर । नाहीं संवसार तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ३९०१ ॥ अभयदान मज देईंगा उदारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ धृ० ॥ देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणिक मी कांहीं नेणें दुजें ॥ १ ॥ सेवा भक्ति भाव नेणें मी पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥ २ ॥ अवघा निरोपिला तुज देहभाव । आतां मज पाव पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुझें नाम दीनानाथ । तें मज उचित करीं आतां ॥ ४ ॥

॥ ३९०२ ॥ लागो तुझी सोय ऐसे कोणी करी । माझे विठाबाई जननिये ॥ धृ० ॥ पतितपावन ह्मणविसी जरी । आवरण करीं तरी माझें ॥ १ ॥ नाहीं तरी ब्रीद टाकीं सोडूनियां । न धरिसी माया जरी माझी ॥ २ ॥ बोलिला तो बोल करावा साचार । तरि लोक बरें ह्मणतील ॥ ३ ॥ करावा संसार लोकलाजे भेणें । वचनासी उणें येऊं नेदी ॥ ४ ॥ तुह्मां आह्मां तैसें नाहीं ह्मणे तुका । होशील तूं सखा जीवलग ॥ ५ ॥

॥ ३९०३ ॥ तूं आह्मां सोयरा सज्जन सांगाती । तुजलागीं प्रीति चालो सदा ॥ धृ० ॥ तूं माझा जिव्हाळा जीवाचा जिवलग । होसी अंतरंग अंतरींचा ॥ १ ॥ गण गोत मित्र तूं माझें जीवन । अनन्यशरण तुझ्या पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्वगुणें तुझा दास । आवडे अभ्यास सदा तुझा ॥ ३ ॥

॥ ३९०४ ॥ आवडेल तैसें तुज आळवीन । वाटे समाधान जीवा तैसें ॥ धृ० ॥ नाहीं येथें कांहीं लौकिकाची चाड । तुजविण गोड देवराया ॥ १ ॥ पुरवीं मनोरथ अंतरींचें आर्त । धायेवरि गीत गाईं तुझे ॥ २ ॥ तुका ह्मणे लेंकी आळवी माहेरा । गाऊं या संसारा तुज तैसें ॥ ३ ॥

॥ ३९०५ ॥ माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ राम कृष्ण ॥ धृ० ॥ अबद्ध चांगलें गाऊं भलतेसें । कळलें हें जैसें मायबापा ॥ १ ॥ तुका ह्मणे मज न लगे वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥ २ ॥

॥ ३९०६ ॥ यालागीं आवडी ह्मणा राम कृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥ धृ० ॥ सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरी ॥ १ ॥ न लगती कष्ट न लगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥ २ ॥ न लगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाठीं ॥ ४ ॥

॥ ३९०७ ॥ झांकूनियां नेत्र काय जपतोसी । जों नाहीं मानसीं प्रेमभाव ॥ धृ० ॥ रामनाम ह्मणा उघड मंत्र जाणा । चुकती यातना गर्भवास ॥ १ ॥ मंत्र यंत्र संध्या करिसी जडीबुटी । तेणें भूतसृष्टि पावसील ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐक सुंदर मंत्र एक । भवसिंधुतारक रामनाम ॥ ३ ॥

॥ ३९०८ ॥ पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयालागीं आवडे गाणें त्याला ॥ धृ० ॥ ब्राह्मणा दक्षिणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटीतसे ॥ १ ॥ वीतभरि लंगोटी नेदी अतिताला । खीरम्या देतो शाला भोरप्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ३ ॥

॥ ३९०९ ॥ क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥ धृ० ॥ तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥ १ ॥ मांजरें देखिला लोणियांचा गोळा । लावूनियां डोळा बैसलेंसे ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माये तुझे पायीं ॥ ३ ॥

॥ ३९१० ॥ स्वामीसी संकट पडे जे गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ॥ धृ० ॥ दुःखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागेना तुजपासीं ॥ १ ॥ रिद्धि सिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस याची जीवें ॥ २ ॥ तुका ह्मणे एके वेळे देई भेटी । चोरसोनि पोटीं आलिंगावें ॥ ३ ॥

॥ ३९११ ॥ देव तिहीं बळें धरिला सायासें । करूनियां नास उपाधीचा ॥ धृ० ॥ पर्वपक्षी धातु धिःकारिलें जन । स्वयें जनार्दन तेचि जाले ॥ १ ॥ तुका ह्मणे यासी न चले तांतडी । अनुभवें गोडी येइल कळों ॥ २ ॥

॥ ३९१२ ॥ भेटीवांचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणें काकुलती याजसाठीं ॥ धृ० ॥ भेटोनियां बोलें आवडीचें गुज । आनंदाच्या भोजे जेवूं संगें ॥ १ ॥ मायलेकरासी नाहीं दुजी परी । जेऊं बरोबरी बैसोनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें अंतरींचें आर्त । यावें जी त्वरित नारायणा ॥ ३ ॥

॥ ३९१३ ॥ आमिषाचे आसे गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावे ॥ धृ० ॥ मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ १ ॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका ह्मणे सुखा पार नाहीं ॥ २ ॥

॥ ३९१४ ॥ जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपिनाथ पावेचि ना ॥ धृ० ॥ तुम्ही संत सारे कृपेचे सागर । माझा निरोप फार सांगा देवा ॥ १ ॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायापें विठ्ठला ठेवीं मज ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें करावें निर्वाण । मग तो रक्षण करिल माझें ॥ ३ ॥

॥ ३९१५ ॥ त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ॥ धृ० ॥ ऐसें माझे मनीं वाटे नारायणा । घालावी चरणावरि मिठी ॥ १ ॥ कइं तें सुंदर देखोनि रूपडें । आवडीच्या कोडें आळंगीन ॥ २ ॥ नाहीं पूर्व पुण्य मज पापरासी । ह्मणोनि पायांसी अंतरलों ॥ ३ ॥ अलभ्य लाभ कैंचा संचितावेगळा । विनवी गोपाळा दास तुका ॥ ४ ॥

॥ ३९१६ ॥ मोलाचें आयुष्य वेचूनियां जाय । पूर्वपुण्यें होय लाभ याचा ॥ धृ० ॥ अनंतजन्मींचे शेवट पाहतां । नर देह हातां आला तुझ्या ॥ १ ॥ कराल ते जोडी येईल कार्यासी । ध्यावें विठ्ठलासी सुखालागीं ॥ २ ॥ सांचवियां धन होईल ठेवणें । तैसा नारायण जोडी करा ॥ ३ ॥ करा हरिभक्ति परलोकीं ये कामा । सोडवील यमापासोनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे करा आयुष्याचें मोल । नका वेचूं बोल नामेंविण ॥ ५ ॥

॥ ३९१७ ॥ काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरिनाथा कष्ट नाहीं ॥ धृ० ॥ सर्वकाळ वाचे उच्चारितां हरी । तया सुखासरी पाड नाहीं ॥ १ ॥ रामकृष्णरंगीं रसना रंगली । अमृताची उकळी नाम तुझें ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ॥ ३ ॥

॥ ३९१८ ॥ कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरिचा राव संगीं आहे ॥ धृ० ॥ भक्त जाय सदा हरि कीर्ति गात । त्यासवें अनंत हिंडतसे ॥ १ ॥ त्रैलोक्य भ्रमण नारद । त्यासंगें गोविंद फिरतसे ॥ २ ॥ नारद मंजुळ सुस्वरें गीत गाये । मार्गीं चालताहे संगें हरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याला गोडी कीर्त्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥ ४ ॥

॥ ३९१९ ॥ बाळेंविण माय क्षणभरि न राहे । न देखतां होये कासाविस ॥ धृ० ॥ आणिक उदंड बुझाविती जरी । छंद त्या अंतरीं माउलीचा ॥ १ ॥ नावडती तया बोल आणिकांचे । देखोनियां नाचे माय दृष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी विठ्ठल माउली । आणिकांचे बोलीं चाड नाहीं ॥ ३ ॥

॥ ३९२० ॥ हरिचिया भक्ता नाहीं भयचिंता । दुःखनिवारिता नारायण ॥ धृ० ॥ नलगे वाहणे संसारउद्वेग । जडों नेदी पांग देवराया ॥ १ ॥ असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळींच ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें एकें ॥ ३ ॥

॥ ३९२१ ॥ दसरा दिवाळी तोचि आह्मां सण । सखे संतजन भेटतील ॥ धृ० ॥ आमुप जोडल्या सुखाचियाराशी । पार या भाग्यासी न दिसे आतां ॥ १ ॥ धन्य दिवस

आजि जाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ॥ २ ॥ तुका ह्मणे काय होऊं उतराई । जीव ठेऊं पायीं संताचिये ॥ ३ ॥

॥ ३९२२ ॥ खिस्ती उदीम ब्राह्मण कलयुगीं । महारवाडीं मांगीं हिंडतसे ॥ धृ० ॥ वेवसाव करितां पर्वत मांगासी । तेपैं विटाळासी न मानिती ॥ १ ॥ मांगिणीशीं नित्य करीतसे लेखा । तोंडावरी थुंका पडतसे ॥ २ ॥ आशा माया रांडा नांव हें कागदीं । आठवीना कधीं नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे देह जाला पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥ ४ ॥

॥ ३९२३ ॥ अंगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चांडाळाचे ॥ धृ० ॥ अंत्यजा खिचडी घेताती मागुन । गाळियाप्रदान मायबहिणी ॥ १ ॥ उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कुळ उभयतां ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी कलियुगाची चाली । स्वार्थें बुडविली आचरणें ॥ ३ ॥

॥ ३९२४ ॥ हाचि माझा नेम धरिलाहो धंदा । यावरि गोविंदा भेटी द्यावी ॥ धृ० ॥ हाचि माझा ध्यास सदा सर्वकाळ । न्यावयासी मूळ येसी कधीं ॥ १ ॥ डोळियांची भूक पाहातां श्रीमुख । आलिंगणें सुख निवती भुजा ॥ २ ॥ बहु चित्त ओढे तयाचिये सोई । पुरला हा कांहीं नवस नेणें ॥ ३ ॥ बहुबहु काळ जालों कासाविस । वाहिलें बहुवस कळेवर ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां पाडावें हें ओझें । पांडुरंगा माझें इयावरी ॥ ५ ॥

॥ ३९२५ ॥ जेणें माझें हित होईल तो उपाव । करिसील भाव जाणोनियां ॥ धृ० ॥ मज नाहीं सुख दुःख तया खंती । भावना हे चित्तीं नाना छंदें ॥ १ ॥ तोडीं हे संबंध तोडीं आशापाशा । मजहो सायास न करितां ॥ २ ॥ तुका ह्मणे मी तों राहिलों निश्चित । कवळोनि एकांतसुख तुझें ॥ ३ ॥

॥ ३९२६ ॥ शिखा सूत्र तुझा गुंतला जमान । तंववरी तूं जाण श्रुतिदास ॥ धृ० ॥ त्याची तुज कांहीं चुकतांचि नीत । होसील पतित नरकवासी ॥ १ ॥ बहुत जालासी चतुर शाहणा । शुद्ध आचरणा चुकों नको ॥ २ ॥ शिखा सूत्र याचा तोडीं तूं संबंध । मग तुज बाध नाहीं नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरि वर्त्तूनि निराळा । उमटती कळा ब्रह्मींचिया ॥ ४ ॥

॥ ३९२७ ॥ पतिव्रता ऐसी जगामध्यें मात । भोगी पांच सात अंधारीं ते ॥ धृ० ॥ भ्रतारासी लेखी श्वानाचे समान । परपुरुषीं जाण संभ्रम तो ॥ १ ॥ तुका ह्मणे तिच्या दोषा नाहीं पार । भोगील अघोर कुंभपाक ॥ २ ॥

॥ ३९२८ ॥ सिदळीसी नाहीं पोराची पैं आस । राहे बीज त्यास काय करी ॥ धृ० ॥ अथवा सेतीं बीज पेरिलें भाजोन । सारा देइल कोण काका त्याचा ॥ १ ॥ तुका ह्मणे नाहीं खायाची ते चाड । तरि कां लिगाड करुनी घेतो ॥ २ ॥

॥ ३९२९ ॥ संसारा आलिया एक सुख आहे । अठवावे पाये विठोबाचे ॥ धृ० ॥ येणें होय सर्व संसार सुखाचा । न लगे दुःखाचा लेश कांहीं ॥ १ ॥ घेतील तयांसी सोपें आहे सुख । बोलियेलें मुखें नारायण ॥ २ ॥ सांगितली सोय करुणासागरें । तुह्मां कां

हो बरें न वाटे तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेणें उपकार केला । भोळ्याभाविकाला तरावया ॥ ४ ॥

॥ ३९३० ॥ चाले हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीविण ॥ धृ० ॥ देखवी दाखवी एक नारायण । तयाचें भजन चुकों नका ॥ १ ॥ मानसाची देव चालवी अहंता । मीचि एक कर्त्ता ह्मणोनियां ॥ २ ॥ वृक्षाचेंही पान हाले ज्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठो भरला सबाहीं । तया उणें कांहीं चराचरीं ॥ ४ ॥

॥ ३९३१ ॥ मायारूपें ऐसें मोहिलेंसे जन । भोगिती पतन नानाकर्मे ॥ धृ० ॥ काय याची प्रीति करितां आदर । दुरावितां दूर तेंचि भलें ॥ १ ॥ नाना छंद अंगीं बैसती विकार । छळियेले फार तपोनिधी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसें शिकवितों तुज । आतां धरीं लाज मना पुढें ॥ ३ ॥

॥ ३९३२ ॥ जे जे कांहीं मज होईल वासना । ते ते नारायणा व्हावें तुह्मी ॥ धृ० ॥ काय भाव एक निवडूं निराळा । जाणसी तूं कळा अंतरींची ॥ १ ॥ तुजविण मज कोण आहे सखा । जें सांगों आणिकां जीवभावा ॥ २ ॥ अवघें पिशुन जालें असे जन । आपपर कोणना आठवे हें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूंचि जीवांचें जीवन । माझें समाधान तुझे हातीं ॥ ४ ॥

॥ ३९३३ ॥ कैसी करूं आतां सांग तुझी सेवा । शब्दज्ञानें देवा नाश केला ॥ धृ० ॥ आतां तुझें वर्म न कळे अनंता । तुज न सांगतां बुडूं पाहें ॥ १ ॥ संध्या स्नान केली आचाराची नासी । काय तयापासीं ह्मणती एक ॥ २ ॥ बुडविली भक्ति ह्मणती पाषाण । पिंडाचें पाळण स्यापूनियां ॥ ३ ॥ न करावी कथा ह्मणती एकादशी । भजनाची नासी मांडियेली ॥ ४ ॥ न जावें देउळा ह्मणती देवघरीं । बुडविलें या परि तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ३९३४ ॥ नमोनमो तुज माझें हें कारण । काय जालें उणें करितां स्नान ॥ धृ० ॥ संतांचा मारग चालतों झाडुनी । हो का लाभ हानि कांहींतरी ॥ १ ॥ न करिसी तरि हेंचि कोडें मज । भक्ति गोड काज आणिक नाहीं ॥ २ ॥ करीं सेवा कथा नाचेन रंगणीं । प्रेमसुखधणी पुरेल तों ॥ ३ ॥ महाद्वारीं सुख वैष्णवांचे मेळीं । वैकुंठ जवळी वसे तेथें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं मुक्तिसवें चाड । हेंचि जन्म गोड घेतां मज ॥ ५ ॥

॥ ३९३५ ॥ होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयांची ॥ धृ० ॥ निंदिती कदान्न इच्छिती देवान्न । पाहाताती मान आदराचा ॥ १ ॥ तुका ह्मणे ऐसें दांभिक भजन । तया जनार्दन भेटे केवीं ॥ २ ॥

॥ ३९३६ ॥ लांबवूनि जटा नेसोनि कांसोटा । अभिमान मोठा करिताती ॥ धृ० ॥ सर्वांगा करिती विभूतिलेपन । पहाती मिष्टान्न भक्षावया ॥ १ ॥ तुका ह्मणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्यावाद ॥ २ ॥

॥ ३९३७ ॥ कान फाडूनियां मुद्रा ते घालिती । नाथ ह्मणविती जगामाजी ॥ धृ० ॥

घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परि शंकरासी नोळखती ॥ १ ॥ पोट भरावया शिकती उपाय । तुका ह्मणे जाय नर्का लोका ॥ २ ॥

॥ ३९३८ ॥ कौडीकौडीसाठीं फोडितातीं शिर । काढूनि रुधिर मलंग ते ॥ धृ० ॥ पांघरती चर्म लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ॥ १ ॥ तुका ह्मणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । न कळेचि वर्म गोविंदाचें ॥ २ ॥

॥ ३९३९ ॥ दाढी डोई मुंडी मुंडूनियां सर्व । पांघुरती बरवें वस्त्र काळें ॥ धृ० ॥ उफराटी काठी घेऊनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रासी ॥ १ ॥ चाळवुनी रांडा देऊनियां भेष । तुका ह्मणे त्यास यम दंडी ॥ २ ॥

॥ ३९४० ॥ होउनी जंगम विभूति लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥ धृ० ॥ शिवाचें निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाठीं ॥ १ ॥ तुका ह्मणे त्यासी नाहीं शिवभक्ती । व्यापार करिती संसाराचा ॥ २ ॥

॥ ३९४१ ॥ लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडे पोटासाठीं देशोदेशीं ॥ धृ० ॥ नेसोनि कोपीन शुभ्रवर्ण आण । पहाती पक्वान्न क्षेत्रींचें तें ॥ १ ॥ तुका ह्मणे ऐसे मावेचे मईद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ २ ॥

॥ ३९४२ ॥ ऐसे नाना भेष घेउनी हिंडती । पोटासाठीं घेती प्रतिग्रह ॥ धृ० ॥ परमार्थासी कोण त्यजी संवसार । सांगापा साचार नांव त्याचें ॥ १ ॥ जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ३९४३ ॥ स्त्रिया पुत्र कलत्र हें तंव मायावंत । शेवटींचा अंत नाहीं कोणी ॥ धृ० ॥ यमाचिये हातीं बांधोनियां देती । भूषणेंही घेती काढूनियां ॥ १ ॥ ऐसिया चोरांचा कैसा हा विश्वास । धरिली तुझी कास तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ३९४४ ॥ न लगती मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचूनिया ॥ धृ० ॥ ह्मणऊनि तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणिकांचें ॥ १ ॥ काय ते महत्त्वीं करावी मान्यता । तुज न देखतां पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज विधल्यावांचुनी । न राहे त्याहूनि होइन वेडा ॥ ३ ॥

॥ ३९४५ ॥ तुझा ह्मणोनियां दिसतों मी दीन । हाचि अभिमान सरे तुझा ॥ धृ० ॥ अज्ञान बाळका कोपली जननी । तयासी निर्वाणीं कोण पावे ॥ १ ॥ तैसा विठो तुजविण परदेशी । नको या दुःखासीं गोऊं मज ॥ २ ॥ तुका ह्मणे मज सर्व तुझी आशा । अगा जगदीशा पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३९४६ ॥ जन्म मृत्यु फार जाले माझ्या जीवा । ऐक माझा धांवा पांडुरंगा ॥ धृ० ॥ सिणलों बहुत करितां येरझारा । रखमाईच्या वरा पावें वेगीं ॥ १ ॥ तुका ह्मणे तूं गा पतितपावन । घेई माझा सीण जन्मांतर ॥ २ ॥

॥ ३९४७ ॥ आतां माझ्या दुःखा कोण हो सांगाती । रखुमाईचा पति पावेचि ना ॥ धृ० ॥ कायविधा त्यानें घातली रेखा । सुटका या दुःखा न होयची ॥ १ ॥ तुका ह्मणे माझी विसरूं नको चिंता । अगा पंढरिनाथा पाव वेगीं ॥ २ ॥

॥ ३९४८ ॥ पंढरीसी जावें ऐसें माझे मनीं । विठाई जननी भेटे केव्हां ॥ धृ० ॥ न लगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्नीचिया ॥ १ ॥ तुका ह्मणे त्याचे पाहिलिया पाय । मग दुःख जाय सर्व माझें ॥ २ ॥

॥ ३९४९ ॥ तन मन धन दिलें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ॥ धृ० ॥ अर्थचाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ॥ १ ॥ तुका ह्मणे एक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका ॥ २ ॥

॥ ३९५० ॥ आलिया संसारा उठा वेग करा शरण जा उदारा पांडुरंगा ॥ धृ० ॥ देह हें देवाचें धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे ॥ १ ॥ देता देवविता नेता नेवविता । येथें याची सत्ता काय आहे ॥ २ ॥ निमित्याचा धनी केला असे प्राणी । माझें माझें ह्मणोनि व्यर्थ गेला ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां रे नाशवंतासाठीं । देवासवें आटी पाडितोसी ॥ ४ ॥

॥ ३९५१ ॥ माय वनीं धाल्या धाये । गर्भ आंवतणें न पाहे ॥ धृ० ॥ तैसें पूजितां वैष्णव । सुखें संतोषतो देव ॥ १ ॥ पुत्राच्या विजयें । पिता सुखातें जाये ॥ २ ॥ तुका ह्मणे अमृतसिद्धी । हरे क्षुधा आणि व्याधी ॥ ३ ॥

॥ ३९५२ ॥ तुझें अंगभूत । आह्मी जाणतों समस्त ॥ धृ० ॥ येरा वाटतसे जन । गुढारसें नारायण ॥ १ ॥ ठावा थारा मारा । घरचिया संव चोरा ॥ २ ॥ तुका ह्मणे करूनि करितों संवाद ॥ ३ ॥

॥ ३९५३ ॥ तुज दिला देह । आजूनि वागवितों भय ॥ धृ० ॥ ऐसा विश्वासघातकी । घडली कळतां हे चुकी ॥ १ ॥ बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभविलें लंडें ॥ २ ॥ दंड लाहे केला । तुका ह्मणे जी विठ्ठला ॥ ३ ॥

॥ ३९५४ ॥ माते लेकरांत भिन्न । नाहीं उत्तरांचा सीण ॥ धृ० ॥ धाडीधाडीं वो भातुकें । रंजविल्याचें कौतुकें ॥ १ ॥ करूनि नवल । याचे बोलिलों ते बोल ॥ २ ॥ तुका ह्मणे माते । पांडुरंगे कृपावंते ॥ ३ ॥

॥ ३९५५ ॥ जरि न भरे पोट । तरि सेवूं दरकूट ॥ धृ० ॥ परि न घलूं तुज भार । हाचि आमुचा निर्धार ॥ १ ॥ तुझें नाम अमोलिक । नेणती हे ब्रह्मादिक ॥ २ ॥ ऐसें नाम तुझें खरें । तुका ह्मणे भासे पुरें ॥ ३ ॥

॥ ३९५६ ॥ सर्वस्वाची साटी । तरीच देवासवें गांठी ॥ धृ० ॥ नाहीं तरी जया तैसा । भोग भोगवील इच्छा ॥ १ ॥ द्यावें तेंचि घ्यावें । ह्मणऊनि जीवें जावें ॥ २ ॥ तुका ह्मणे उरी । मागें तुरवित बरी ॥ ३ ॥

॥ ३९५७ ॥ सुख पंढरीसी आलें । पुंडलिकें साठविलें ॥ धृ० ॥ आतां धांवा माझे बाप । जिव्हा घेऊनियां माप ॥ १ ॥ करा एक खेप । मग न लगे हिंडावें ॥ २ ॥ विषय गुंडूनि पसारा । धांव घ्यारे पंढरपुरा ॥ ३ ॥ आयुष्य वेचें जंव आहे । तोंचि धांवोनियां जायें ॥ ४ ॥ आळस न करी या लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥ ५ ॥

॥ ३९५८ ॥ गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ॥ धृ० ॥ त्याचें भुंकणें

न राहे । स्वभावासी करील काये ॥ १ ॥ श्वान शिबिके बैसविलें । भुंकतां न राहे उगलें ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वभावकर्म । कांहीं केल्या न सुटे धर्म ॥ ३ ॥

॥ ३९५९ ॥ सेकीं हें ना तैसें जालें । बोलणें तितुकें वांयां गेलें ॥ धृ० ॥ स्वयें आपणचि रिता । रडे पुढिलांच्या हिता ॥ १ ॥ सुखसागरीं नेघे वस्ती । अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे गाढव लेखा । जेथें भेटेल तेथें ठोंका ॥ ३ ॥

॥ ३९६० ॥ आवडे सकळां मिष्टान्न । रोग्या विषा त्या समान ॥ धृ० ॥ दर्पण नावडे तया एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ १ ॥ तुका ह्मणे तैशा खळा । उपदेशाचा कांटाळा ॥ २ ॥

॥ ३९६१ ॥ अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धी ॥ धृ० ॥ काय ह्मणावें तयासी । तो केवळ पापरासी ॥ १ ॥ जो स्मरे रामराम । तयासी ह्मणावें रिकामें ॥ २ ॥ जो तीर्थव्रत करी । तयासी ह्मणावें भिकारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे विंच्वाची नांगी । तैसा दुर्जन सर्वांगीं ॥ ४ ॥

॥ ३९६२ ॥ यारे नाचों अवघेजण । भावें प्रेमें परिपूर्ण ॥ धृ० ॥ गाऊं पंढरीचा राणा । क्षेम देऊनि संतजना ॥ १ ॥ सुख साधु सुखासाठीं । नाम हरिनाम बोभाटीं ॥ २ ॥ प्रेमा वाटितो उदार । देतां नाहीं सानाथोर ॥ ३ ॥ पापें पळालीं बापुडीं । काळ झाला देशधडी ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन्य काळ । आजि प्रेमाचा सुकाळ ॥ ५ ॥

॥ ३९६३ ॥ उपजलों मनीं । हे तों स्वामीची करणी ॥ धृ० ॥ होइल प्रसादाचें दान । तरि हें कवतुक पाहेन ॥ १ ॥ येइल अभय जरी । तरि हे आज्ञा वंदिन शिरीं ॥ २ ॥ भक्तिप्रयोजना । प्रयोजावें बंदिजना ॥ ३ ॥ यश स्वामिचिये शिरीं । दास्य करावें किंकरीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे आळिकरा । त्यासी योजावें उत्तरा ॥ ५ ॥

॥ ३९६४ ॥ माझें मन पाहे कसून । चित्त न ढळे तुजपासून ॥ धृ० ॥ कापूनि देइन शिर । पाहा कृपण कीं उदार ॥ १ ॥ मजवरि घालीं घण । परि मी न सोडीं चरण ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । तुजवांचूनि नाहीं गती ॥ ३ ॥

॥ ३९६५ ॥ भूमीवरि कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ॥ धृ० ॥ सुखें नाचा हो कीर्त्तनीं । जयजयकारें गर्जा वाणी ॥ १ ॥ काळा सुटे पळ । जाती दुरितें सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं । साच माना हे निश्चिती ॥ ३ ॥

॥ ३९६६ ॥ जातीचा ब्राह्मण । न करितां संध्यास्नान ॥ धृ० ॥ तो एक नांवाचा ब्राह्मण । होय हीनाहूनि हीन ॥ १ ॥ सांडूनियां शाळिग्राम । नित्य वेश्येचा समागम ॥ २ ॥ नेघे संतांचें जो तीर्थ । अखंड वेश्येचा जो आर्थ ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे पापी । पाहूं नका पुनरपी ॥ ४ ॥

॥ ३९६७ ॥ जाला जीवासी उदार । त्यासी काय भीडभार ॥ धृ० ॥ करीन आडक्या धोंगडें । उभें बाजारीं उघडें ॥ १ ॥ जों जों धरिली भीड । तों तों बहु केली चीड ॥ २ ॥ तुका ह्मणे मूळ । तुझें उचारीन कुळ ॥ ३ ॥

॥ ३९६८ ॥ आह्मां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम ॥ धृ० ॥ आयुष्य मोलाची

हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ १ ॥ अमृताची खाणी । याचें ठायीं वेचूं वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । माझ्या जिवाच्या जिवलगा ॥ ३ ॥

॥ ३९६९ ॥ मिळे हरिदासांची दाटी । रीग न होय शेवटीं ॥ धृ० ॥ तेथें म्यां काय करावें । माझें कोणें आइकावें ॥ १ ॥ कैसें तुज लाजवावें । भक्त ह्मणोनियां भावें ॥ २ ॥ नाचतां नये ताळीं । मज वाजवितां टाळी ॥ ३ ॥ अति मंडित भूषणें । शरीर माझें दैन्य वाणें ॥ ४ ॥ तुका ह्मणे कमळापती । मज न द्यावें त्या हातीं ॥ ५ ॥

॥ ३९७० ॥ जाणों नेणों काय । चित्तीं धरूं तुझे पाय ॥ धृ० ॥ आतां हेंचि वर्म । गाऊं धरूनियां प्रेम ॥ १ ॥ काय सांडूं मांडूं । भावें हृदयींच कोंडूं ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । जन्मोजन्मीं मागें सेवा ॥ ३ ॥

॥ ३९७१ ॥ जाळें घातलें सागरीं । बिंदु न राहे भीतरीं ॥ धृ० ॥ तैसें पापियाचें मन । तया नावडे कीर्त्तन ॥ १ ॥ गाढव गंगेसी न्हाणिलें । जाऊनि उकरड्यावरि लोळे ॥ २ ॥ प्रीति पोसिलें काउळें । जाऊनि विष्ठेवरी लोळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसा हरी । कीरव्या नावडे कस्तुरी ॥ ४ ॥

॥ ३९७२ ॥ तरलों ह्मणूनि धरिला ताठा । त्यासी चळ जाला फांटा ॥ धृ० ॥ वांयां-विण तुटे दोंड । मानें सुख इच्छी भांड ॥ १ ॥ ग्वाहीविण मात । स्थापी आपुली सतंत ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसीं किती । नरका गेलीं अधोगती ॥ ३ ॥

॥ ३९७३ ॥ आतां येथें खरें । नये फिरतां माघारें ॥ धृ० ॥ होईल तैसी हो आबाळी । देह निमित्त या बळीं ॥ १ ॥ तुह्मांसवें गांठी । देहजिवाचिये साटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे लेंड । करूं चौघांमध्यें भंड ॥ ३ ॥

॥ ३९७४ ॥ कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरी तें चांग ॥ धृ० ॥ तैसा करी कां विचार । शुद्ध कारणं अंतर ॥ १ ॥ वरि कांटे फणसफळा । माजि अंतरीं जिव्हाळा ॥ २ ॥ ऊंस बाहेरी कठिण काळा । माजी रसाचा जिव्हाळा ॥ ३ ॥ मिठें रुचविलें अन्न । नये सतंत कारण ॥ ४ ॥

॥ ३९७५ ॥ सकळ तीर्थांहुनी । पंढरिनाथ मुगुटमणी ॥ धृ० ॥ धन्यधन्य पंढरी । जे मोक्षाची अक्षय पुरी ॥ १ ॥ विश्रांतीचा ठाव । तो हा माझा पंढरिराव ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगें स्पष्ट । दुजी पंढरी वैकुंठ ॥ ३ ॥

॥ ३९७६ ॥ भाते भरूनि हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ धृ० ॥ अनंतनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ १ ॥ नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचे अंकित त्यावांचुन ॥ २ ॥ रिद्धि सिद्धि ज्या कामारी । तुका ह्मणे ज्याचे घरीं ॥ ३ ॥

॥ ३९७७ ॥ ज्याची जया आस । तयाजवळी त्या वास ॥ धृ० ॥ येर जवळी तें दुरी । धेनु वत्स सांडी घरीं ॥ १ ॥ गोडी प्रियापाशीं । सुख उपजे येरासी ॥ २ ॥ तुका ह्मणे बोल । घडे तयाठायीं मोल ॥ ३ ॥

॥ ३९७८ ॥ बाळ माते निष्ठुर होये । परि ते स्नेह करीत आहे ॥ धृ० ॥ तैसा तूं गा पुरुषोत्तमा । घडी न विसंबसि आह्मां ॥ १ ॥ नेणती भागली । कडे घेतां अंग घाली

॥ २ ॥ भूक साहे तान्ह । त्याचें राखे समाधान ॥ ३ ॥ त्याच्या दुःखें धाये । आपला जीव देऊं पाहे ॥ ४ ॥ नांवें घाली उडी । तुका ह्मणे प्राण काढी ॥ ५ ॥

॥ ३९७९ ॥ हे तों टाळाटाळी । परि भोवता हा काळी ॥ धृ० ॥ बरें नव्हेल शेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥ १ ॥ मुरगाळिल कान । गोसमाळी सावधान ॥ २ ॥ धन्य ह्मणे आतां । येथें तुधवा माथां ॥ ३ ॥ अबोलणा तुका । ऐसें कांहीं लेखूं नका ॥ ४ ॥

॥ ३९८० ॥ किती लाजिरवाणा । मेरे उपजोनि शाहाणा ॥ धृ० ॥ एका वाईं न करीं तुटी । न निघें देवासोई भेटी ॥ १ ॥ सोसूनि आबाळी । घायाळ तें ढुंग चोळी ॥ २ ॥ सावध करी तुका । ह्मणे निजले हो आइका ॥ ३ ॥

॥ ३९८१ ॥ दाता लक्ष्मीचा पती । माझें मागणें तें किती ॥ धृ० ॥ जाणें तान्हे-ल्याची तान । पितां गंगा नव्हे न्यून ॥ १ ॥ कल्पतरु जाला देता । तेथें पोटाचा मागता ॥ २ ॥ तुका ह्मणे सतत ध्यातां । परब्रह्मचि आलें हातां ॥ ३ ॥

॥ ३९८२ ॥ कुरवंडी करीन काया । वरोनि पायां गोजिरिया ॥ धृ० ॥ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ १ ॥ परतें न सरवे दुरी । आवडी पुरी बैसली ॥ २ ॥ तुका ह्मणे विसावलों । येथें धालों धणीवरी ॥ ३ ॥

॥ ३९८३ ॥ साधनाचे कष्ट मोठे । भय वाटे थोर हें ॥ धृ० ॥ मुखें गावें भावें गीत । सर्व हित बैसलिया ॥ १ ॥ दासा नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ॥ २ ॥ तुका ह्मणे आत्मनिष्ठा । भागे चेष्टा मनाची ॥ ३ ॥

॥ ३९८४ ॥ घेतां आणिकांचा जीव । तेव्हां कींव कराना ॥ धृ० ॥ आपलें तें वर-दळ नेदा । हे गोविंदा कृपणता ॥ १ ॥ सेवा तरी इच्छा सांग । चोरिलें अंग साहेना ॥ २ ॥ तुका ह्मणे अरे धन्या । निसंतान्या विठोबा ॥ ३ ॥

॥ ३९८५ ॥ आह्मां केलें गुणवंत । तें उचित राखावें ॥ धृ० ॥ तुह्मांसी तों चाड नाहीं । आणिकां कांहीं सुखदुःखा ॥ १ ॥ दासांचें तें देखों नये । उणें काय होइल तें ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरा । दृष्टि करा सामोरी ॥ ३ ॥

॥ ३९८६ ॥ अगत्य ज्या नरका जाणें । कीर्तनीं तो वीट मानी ॥ धृ० ॥ नावडेसा झाला बाप । आलें पाप वस्तीसी ॥ १ ॥ नारायण नाहीं वाचे । ते यमाचे अंदण ॥ २ ॥ तुका ह्मणे अभक्तासी । माता दासी जग झोडी ॥ ३ ॥

॥ ३९८७ ॥ आह्मी हरीचे हरिचे । शूर कळिकाळा यमाचे ॥ धृ० ॥ नामघोष बाण साचे । भाले तुळसी मंजुरेचे ॥ १ ॥ आह्मी हरिचे हरिचे दास । कळिकाळावरि घालूं कास ॥ २ ॥ आह्मी हरिचे हरिचे दूत । पुढें पळती यमदूत ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मांवरी । सुदर्शन घरटी करी ॥ ४ ॥

॥ ३९८८ ॥ देवाचिये पायीं वेचों सर्व शक्ती । होतील विपत्ति ज्या ज्या कांहीं ॥ धृ० ॥ नेघे माझी वाचा पुढें कांहीं वाव । आणि तुजे भाव बोलायाचे ॥ १ ॥ मनाची वांटणी चित्ताचा विक्षेप । राहो हा अनुताप आहे तैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे घेई विठ्ठलाचा छंद । आनंदाचा कंद विस्तारेल ॥ ३ ॥

॥ ३९८९ ॥ पांडुरंगा आतां ऐका हे विनंती । बहु माझे चित्तीं भय वाटे ॥ धृ० ॥ नाहीं आइकिलें संतांचिया मुखें । तें या मज लोकें भेडसाविलें ॥ १ ॥ विष्णुदासां गति नाहीं तरावया । ह्मणती गेले वांयां कष्टतही ॥ २ ॥ धिक्कारिती मज करितां कीर्तन । काय सांगों शीण ते काळिचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज वाटतें उदास । काय करूं यास पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३९९० ॥ वेढा वेढा रे पंढरी । मोर्चे लावा भीमातिरीं ॥ धृ० ॥ चला चला संत जन । करा देवासी भांडण ॥ १ ॥ लुटा लुटा पंढरपुर । धरा रखुमाईचा वर ॥ २ ॥ तुका ह्मणे चला । घाव निशाणी घातला ॥ ३ ॥

॥ ३९९१ ॥ पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥ धृ० ॥ प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥ १ ॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर झाले तरी ॥ ३ ॥

॥ ३९९२ ॥ निजसेजेची अंतुरी । पादलिया कोण मारी ॥ धृ० ॥ तैसा आह्मासी उबगतां । तुका विनवितो संतां ॥ १ ॥ मूल मांडीवरी हागलें । तें बा कोणें रे त्यागिलें ॥ २ ॥ दासी कामासी चुकली । ते बा कोणें रे विकली ॥ ३ ॥ पांडुरंगाचा तुका पापी । संत साहें काळासि दापी ॥ ४ ॥

॥ ३९९३ ॥ श्वानाचियापरी लोळें तुझ्या द्वारीं । भुंकों हरिहरि नाम तुझें ॥ धृ० ॥ भुंकीं उठीं बैसें न वजायें वेगळा । लुडबुडीं गोपाळा पायांपाशीं ॥ १ ॥ तुका ह्मणे आह्मां वर्म आहे ठावें । मागेन तें द्यावें प्रेमसुख ॥ २ ॥

॥ ३९९४ ॥ सोइरे धायरे दिल्याघेतल्याचे । अंत हें काळीचें नाहीं कोणी ॥ धृ० ॥ सख्या गोत्रबहिणी सुखाचे संगती । मोकलुनी देती अंतकाळीं ॥ १ ॥ आपुलें शरीर आपणा पारिखें । परावीं होतील नवल काई ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां सोड यांची आस । धरीं रे या कास पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३९९५ ॥ जन्ममरणांची कायसी चिंता । तुझ्या शरणागता पंढरिराया ॥ धृ० ॥ वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय कवणा ॥ १ ॥ हृदयीं तुझें रूप बिंबलें साकार । तेथें कोण पार संसाराचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझ्या चरणांची पाखर । असतां कळिकाळ पायां तळीं ॥ ३ ॥

॥ ३९९६ ॥ क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥ धृ० ॥ तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नी । जाय तो विझोनी आपसया ॥ १ ॥ तुका ह्मणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥ २ ॥

॥ ३९९७ ॥ यातिगुणें रूपें काय ते वानर । तयांच्या विचारें वर्ते राम ॥ धृ० ॥ ब्रह्महत्यारासि पातकी अनेक । तो वंद्य वाल्मीक तिहीं लोकीं ॥ १ ॥ तुका ह्मणे नव्हे चोरीचा व्यापार । ह्मणा रघुवीर वेळोवेळां ॥ २ ॥

॥ ३९९८ ॥ पानें जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्या ॥ धृ० ॥

तमाखू ओढूनि काढला जो धूर । बुडेल तें घर तेणें पापें ॥ १ ॥ कीर्तनीं बडबड करील जो कोणी । बेडुक होउनी येइल जन्मा ॥ २ ॥ जयाचिये मनीं कथेचा कंटाळा । होती त्या चांडाळा बहु जाच ॥ ३ ॥ जाच होती पाठीं उडती यमदंड । त्याचें काळें तोंड तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३९९९ ॥ कामांमध्यें काम । कांहीं ह्मणा रामराम । जाइल भवश्रम । सुख होईल दुःखाचें ॥ धृ० ॥ कळों येईल अंतकाळीं । प्राणप्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ॥ १ ॥ जीतां जीसी जैसा तैसा । पुढें आहे रे वोळसा । उगवूनि फांसा । काय करणें तें करीं ॥ २ ॥ केलें होतें याचि जन्में । अवघें विठोबाच्या नामें । तुका ह्मणे कर्मे । जाळोनियां तरसी ॥ ३ ॥

॥ ४००० ॥ तुज मज ऐसी परी । जैसे तरंग सागरीं ॥ धृ० ॥ दोहींमाजी एक जाणा । विठ्ठल पंढरीचा राणा ॥ १ ॥ देव भक्त ऐसी बोली । जंव भ्रांति नाहीं गेली ॥ २ ॥ तंतु पट जेवीं एक । तैसा विश्वेंसीं व्यापक ॥ ३ ॥

॥ ४००१ ॥ कोठें गुंतलासी योगीयांचे ध्यानीं । आनंदकीर्तनीं पंढरीच्या ॥ धृ० ॥ काय काज कोठें पडलीसे गुंती । कानीं न पडती बोल माझे ॥ १ ॥ काय शेषशयनीं सुखनिद्रा आली । सोय कां सांडिली तुह्मी देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोठें गुंतलेती सांगा । किती पांडुरंगा वाट पाहूं ॥ ३ ॥

॥ ४००२ ॥ माउलीसी सांगे कोण । प्रेम वाढवी ताहानें ॥ धृ० ॥ अंतरींचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा ॥ १ ॥ मायबापाची उपमा । तुज देऊं मेघश्यामा ॥ २ ॥ तेही साजेना पाहतां । जीवलगा पंढरिनाथा ॥ ३ ॥ माय पाळी संसारीं । परलोक राहे दुरी ॥ ४ ॥ तैसा नव्हेसी अनंता । काळावरी तुझी सत्ता ॥ ५ ॥ तुका ह्मणे नारायणा । तुह्मा बहुत करुणा ॥ ६ ॥

॥ ४००३ ॥ कोड आवडीचें । पुरवीना बाळकाचें ॥ धृ० ॥ तेव्हां कैसी ते माउली । जाणा काशासाठीं व्याली ॥ १ ॥ वत्साचिये आसे । धेनु धांवेना गोरसें ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । बाळ टाकिलें वानरीं ॥ ३ ॥

॥ ४००४ ॥ भक्तांचीं सांकडीं स्वयें सोसी देव । त्यांपाशीं केशव सर्वकाळ ॥ धृ० ॥ जये ठायीं कीर्तन वैष्णव करिती । तेथें हा श्रीपति उभा असे ॥ १ ॥ तुका ह्मणे देव सर्वांठायीं जाला । भरुनी उरला पांडुरंग ॥ २ ॥

॥ ४००५ ॥ तुझिया नामाचा विसर न पडावा । ध्यानीं तो राहावा पांडुरंग ॥ धृ० ॥ सांगितला मंत्र श्रीरामनामाचा । सर्वकाळ वाचा हेचि बोले ॥ १ ॥ उफराटें नाम वाल्मीक बोलिला । तोही वंद्य केला नारायणें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज तुझाचि भरवसा । धांवूनिया कैसा येसी देवा ॥ ३ ॥

॥ ४००६ ॥ अवघ्या पातकांची मी एक रासी । अवघा तूं होसी सर्वोत्तम ॥ धृ० ॥ जैस तैसा लागे करणें अंगिकार । माझा सर्व भार चालविणें ॥ १ ॥ अवघेंचि मज

गिळियेलें काळें। अवघींच बळें तुझे अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां खुंटला उपाय। अवघेचि पाय तुझे मज ॥ ३ ॥

॥ ४००७ ॥ मूर्तिमंत देव नांदतो पंढरी । येर ते दिगांतरी प्रतिमारूप ॥ धृ० ॥ जाऊनियां वना करावें कीर्तन । मानुनी पाषाण विठ्ठलरूप ॥ १ ॥ तुका ह्मणे मुख्य पाहिजे हा भाव। भावापासीं देव शीघ्र उभा ॥ २ ॥

॥ ४००८ ॥ धरिल्या देहाचें सार्थक करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ धृ० ॥ लावीन निशाण जावया वैकुंठा। माजविन पेठा कीर्तनाच्या ॥ १ ॥ नामाचिया नौका करीन सहस्रवरी। नावाडा श्रीहरि पांडुरंग ॥ २ ॥ भाविक हो येथें धरारे आवांका। ह्मणे दास तुका शुद्धयाती ॥ ३ ॥

॥ ४००९ ॥ अनुसरे त्यासी फिरों नेदी मागें। राहे समागमें अंगसंगें ॥ धृ० ॥ अंग-संगें असे कर्मसाक्ष देव । जैसा ज्याचा भाव तैसा राहे ॥ १ ॥ फळपाकीं देव देतील प्राणीयें। तुका ह्मणे नये सवें कांहीं ॥ २ ॥

॥ ४०१० ॥ संसारीं असतां हरिनाम घेसी । तरींच उद्धरसी पूर्वजेंसी ॥ धृ० ॥ अवघींच इंद्रियें न येतील कामा। जिव्हे रामनामा उच्चारीं वेगीं ॥१॥ शरीरसंपत्ति नव्हेरे धाबुली। भ्रांतीची साउली अवघी व्यर्थ ॥ २ ॥ तुका ह्मणे सार हरिनामउच्चार। येऱ्हवी येरझार हरीविण ॥ ३ ॥

॥ ४०११ ॥ सावळें सुंदर रूप मनोहर। राहो निरंतर हृदयीं माझे ॥ धृ० ॥ आणिक कांहीं इच्छा आह्मां नाहीं चाड। तुझें नाम गोड पांडुरंगे ॥ १ ॥ जन्मोजन्मीं ऐसें मागि-तलें तुज। आह्मांसी सहज द्यावें आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज ऐसे दयाळ । धुंडितां सकळ नाहीं आह्मां ॥ ३ ॥

॥ ४०१२ ॥ हिरोनियां नेला मुखींचा उच्चार । पाडिलें अंतर जवळीच ॥ धृ० ॥ द्वैताचिये कैसा पाडियेलों हातीं। बहुत करिती ओढाओढी ॥ १ ॥ काय करूं मज नागविलें आळसें। बहुत या सोसें पीडा केली ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां आपुलिया सवा। करूनियां देवा राखें मज ॥ ३ ॥

॥ ४०१३ ॥ भक्तांहूनि देवा आवडतें काई । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥ धृ० ॥ नावडे वैकुंठ क्षीराचा सागर। धरोनी अंतर राहे दासा ॥ १ ॥ सर्वभावें त्याचें सर्वस्वेंही गोड। तुळसीदळ कोड करुनी घ्यावें ॥ २ ॥ सर्वस्वें त्याचा ह्मणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तिसुखाचा बांधिला। आणिक विठ्ठला धर्म नाहीं ॥ ४ ॥

॥ ४०१४ ॥ राम कृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारि पांडुरंगा ॥ धृ० ॥ लक्ष्मीनिवासा पाहें दिनबंधू। तुझा लागो छंदु सदा मज ॥ १ ॥ तुझे नामीं प्रेम देईं अखंडित। नेणें तप व्रत दान कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें हेंचि गा मागणें। अखंडही गाणें नाम तुझें ॥ ३ ॥

॥ ४०१५ ॥ हरि तुझें नाम गाईन अखंड । याविण पाखंड नेणें कांहीं ॥ धृ० ॥

अंतरीं विश्वास अखंड नामाचा । कायामनेंवाचा देईं हेंची ॥ १ ॥ तुका ह्मणे आतां देईं संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ॥ २ ॥

॥ ४०१६ ॥ गाबाळाचे ग्रंथीं कां रे पडों सदा । मिथ्या भेदवादा वागवितां ॥ धृ० ॥ संसार गाबाळीं पडसी निखळ । जालासी तूं खळ तेणें मना ॥ १ ॥ साधनसंकटीं गुंतसी कासया । व्यर्थ गा अपायामाजी गुंती ॥ २ ॥ निर्मळ फुकाचें नाम गोविंदाचें । अनंतजन्माचे फेडी मळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे नको करूं कांहीं कष्ट । नाम वाचे स्पष्ट हरि बोलें ॥ ४ ॥

॥ ४०१७ ॥ भाव धरिला चरणीं ह्मणवितों दास । अहिर्निशीं ध्यास करीतसें ॥ धृ० ॥ करीतसें ध्यास हृदयीं सकळ । भाव तो सबळ धरियेला ॥ १ ॥ धरिले निश्चळ न सोडीं ते पाय । तुका ह्मणे सोय करीं माझी ॥ २ ॥

॥ ४०१८ ॥ तुझें नाम गाया न सोपें डवळा । गाऊं कळवळा प्रेमाचिया ॥ धृ० ॥ येइल आवडी जैसी अंतरींची । तैसी मनाची कीर्ति गाऊं ॥ १ ॥ माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ रामकृष्ण ॥ २ ॥ अबद्ध चांगलें गाऊं जैसें तैसें । बाहे बाळ जैसें मायबाप ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज न लावीं वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥ ४ ॥

॥ ४०१९ ॥ आतां तुज मज नाहीं दुजेपण । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ धृ० ॥ तुज रूप रेखा नाम गुण नाहीं । एक स्थान पाहीं गांव सिंव ॥ १ ॥ नावडे संगति तुज दुज-याची । आपुल्या भक्तांची प्रीति तुह्मां ॥ २ ॥ परि आह्मांसाटीं होसील सगुण । स्तंभासी फोडून जयापरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसें तुज काय उणें । देईं दरुषण चरणांचें ॥ ४ ॥

॥ ४०२० ॥ करणें तें हेंचि करा । नरका अघोरा कां जातां ॥ धृ० ॥ जयामध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें एक ॥ १ ॥ शरणागता देव राखे । येरां वाखे विघ्नांचे ॥ २ ॥ तुका ह्मणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ॥ ३ ॥

॥ ४०२१ ॥ आणिक नका करूं चेष्टा । व्हाल कष्टा वरपडी ॥ धृ० ॥ सुखें करा हरिकथा । सर्वथा हे तारील ॥ १ ॥ अनाथाचा नाथ देव । अनुभव सत्य हा ॥ २ ॥ तुका ह्मणे बहुतां रिती । धरा चित्तीं सकळ ॥ ३ ॥

॥ ४०२२ ॥ मुखें सांगे ब्रह्मज्ञान । जन लोकांची कापितो मान ॥ धृ० ॥ ज्ञान सांगतो जनासी । नाहीं अनुभव आपणासी ॥ १ ॥ कथा करितो देवाची । अंतरीं आशा बहु लोभाची ॥ २ ॥ तुका ह्मणे तोचि वेडा । त्याचें हाणूनि थोबाड फोडा ॥ ३ ॥

॥ ४०२३ ॥ कांहीं दुसरा विचार । नलगे करावाचि फार ॥ धृ० ॥ सेव्या ना चौधरी । पांडेपण वाहे शिरीं ॥ १ ॥ पाप नलगे धुंडावें । पाहिजे तरि तेथें जावें ॥ २ ॥ जकातीचा धंदा । तेथें पाप वसे सदा ॥ ३ ॥ गाई ह्मैसी हेड । तुप विकी महा द्वाड ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाहीं । तेथें पुण्या रीघ नाहीं ॥ ५ ॥

॥ ४०२४ ॥ तुझी माझी आहे जुनी सोयरीक । आधीं बंधु लेंक मग जाले ॥ धृ० ॥ लेंकीचें लेंकरूं नातु वाटेकरी म्हूण न पुसती आतां । परि आहे सत्ता करीन ते ॥ १ ॥ बाईलेचा भाऊ पिसुना सोयरा । ह्मणउनि जाल्यावरी । मंगळाही दुरि अंतरलों ॥ २ ॥ आकुळीं तों करूं नये तेंचि केलें । न बोलावें भलें तोंचि करा विनोद हा ॥ ३ ॥

आतां ॥ ४ ॥ न ह्मणसी लेंकी माउसी बहिणी । आह्मां केलें धणी पापाचें त्या ॥ ५ ॥ बहु पांचांजणी केली विटंबना । नये शकूं जना तोंड ऐसें ॥ ६ ॥ तुका ह्मणे आधीं मूळ तेंचि धरूं । मागील तें करूं उरी आतां ॥ ७ ॥

॥ ४०२५ ॥ मागें बहुत जाले खेळ । आतां बळ वोसरलें ॥ धृ० ॥ हालों नये चालों आतां । घट रिता पोकळ ॥ १ ॥ भाजल्याची दिसे घडी । पट ओढी न साहे ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहतां घडी । जगा जोडी अंगारा ॥ ३ ॥

॥ ४०२६ ॥ आळस आला अंगा । धांव घालीं पांडुरंगा ॥ धृ० ॥ सोसूं शरीराचे भाव । पडती अवगुणाचे घाव ॥ १ ॥ करावीं व्यसनें । दुरी येऊनि नारायणें ॥ २ ॥ जवळील दुरी । जालों देवा धरीं करीं ॥ ३ ॥ ह्मणऊनि देवा । वेळोवेळां करीं धांवा ॥ ४ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । दुरी धरूं नका अंगा ॥ ५ ॥

॥ ४०२७ ॥ झंवविली महारें । त्याची व्याली असे पोरें ॥ धृ० ॥ करी संताचा मत्सर । कोपें उभारोनि कर ॥ १ ॥ बीज तैसें फळ । वरी आलें अमंगळ ॥ २ ॥ तुका ह्मणे ठावें । ऐसें जालें अनुभवें ॥ ३ ॥

॥ ४०२८ ॥ पापी तो नाठवी आपुल्या संचिता । ठेवी भगवंता वरी बोल ॥ धृ० ॥ भेईना करितां पापाचे डोंगर । दुर्जन पामर दुराचारी ॥ १ ॥ नाठवी तो खळ आपुली करणी । देवासी निंदोनि बोलतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याच्या तोंडा लागो काटी । नाहीं जगजेठीं जया चित्तीं ॥ ३ ॥

॥ ४०२९ ॥ आधीं देह पाहतां वाव । कैचा प्रारब्धासी ठाव ॥ धृ० ॥ कां रे रडतोसी माना । लागें विठ्ठलचरणा ॥ १ ॥ दुजेपण जालें वाव । त्रिभुवनासि नाहीं ठाव ॥ २ ॥ तुका ह्मणे खरे पाहें । विठ्ठल पाहोनियां राहें ॥ ३ ॥

॥ ४०३० ॥ स्त्रिया धन बा हें खोटें । नागवले मोठे मोठे ॥ धृ० ॥ ह्मणोनि सांडा दोनी । सुख पावाल निदानीं ॥ १ ॥ सर्व दुःखासी कारण । हींच दोन्हींचीं प्रमाण ॥ २ ॥ आशा सर्वस्वें सांडावी । तेणें निजपदवी पावावी ॥ ३ ॥ देह लोभें नाडला । घाला यमाचा पडला ॥ ४ ॥ तुका ह्मणे निरापेक्षा । कांहीं न धरावी अपेक्षा ॥ ५ ॥

॥ ४०३१ ॥ जें जें व्हावें संकल्पें । तेंचि पुण्य होय पाप ॥ धृ० ॥ कारण तें मनापासीं । मेळविल्या मिळे रसीं ॥ १ ॥ सांडी मांडी हाली चाली । राहे तरि भली बोली ॥ २ ॥ तुका ह्मणे सार । नांव जीवनाचे सागर ॥ ३ ॥

॥ ४०३२ ॥ ओले मातीचा भरवसा । कां रे धरिशी मानसा ॥ धृ० ॥ डोळे चिरीव चांगले । वृद्धपणीं सरक्या जाले ॥ १ ॥ नाक सरळ चांगलें । येऊन हानवटीला लागलें ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें नाहीं । तंव हरिला भजरे कांहीं ॥ ३ ॥

॥ ४०३३ ॥ तुह्मां सांगतों कलियुगा फळ । पुढें होइल ब्रह्मगोळ ॥ धृ० ॥ आतां ह्मणतील कंटक । ऐसा पाडिती दंडक ॥ १ ॥ स्त्रिया पूजुनि सरे देती । भलते स्त्रियेसि भलते जाती ॥ २ ॥ श्रेष्ठ वर्ण वेदविद्वांस । अंगिकारी मद्यमांस ॥ ३ ॥ चारी वर्ण अठरा याती । कवळ करिती एक पंक्ती ॥ ४ ॥ ह्मणती अंबेचा क्रीडाकल्लोळ । शिवरूप प्राणी सकळ ॥ ५ ॥

ऐसें होइल शकुन देतों । अगोदर सांगुन जातों ॥ ६ ॥ तुका सद्गुरुदास्य करी । सिद्धि पाणी वाहे घरीं ॥ ७ ॥

॥ ४०३४ ॥ त्या हरिदासांची भेटी घेता । नर्का उभयतासी जाता ॥ धृ० ॥ माते परीस थोरी कथा । भाड घेतां न लाजे ॥ १ ॥ देतां घेतां नरकवासी । उभयतांसी रवरव ॥ २ ॥ तुका ह्मणे नरकगांवा । जाती हांवा धरोनी ॥ ३ ॥

॥ ४०३५ ॥ देव गावा ध्यावा ऐसें जालें । परदेशी नाहीं उगलें । वडील आणि धाकुलें । नाहीं ऐसें जालें दुसरें तें ॥ धृ० ॥ नाहीं लागत मुळीहुनी । सुहृद जन आणि जननी । लागल्या लागें त्यागें सांडुनी । लोभीये मांडणी संयोगाची ॥ १ ॥ शिव बाटला जीवदशे । बहुत ओतत आलें ठसें । हीन जालें भूषणाचें इच्छे । निवडतीं कस गुणागुण ॥ २ ॥ आतां हे हुताश तों बरें । अवघे एकच मोहरें । पिटिलिया विण नव्हे खरें । निवडे बरें जातिशुद्ध ॥ ३ ॥ तुका उतावेळ याजसाटीं । आहे तें निवेदीन पोटीं । आवडी द्यावी जी येथें लाटी । तुझी जगजेठी कीर्ति वाखाणीन ॥ ४ ॥

॥ ४०३६ ॥ भोगी जाला त्याग । गीती गातां पांडुरंग । इंद्रियांचा लाग । आह्मां-वरूनि चुकला ॥ धृ० ॥ करूनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं तळमळ । घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ॥ १ ॥ तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंची चारा धरीं । आणूनियां घरीं । मुखीं घाली बाळका ॥ २ ॥ तुका ह्मणे ये आवडी । आह्मी पांयीं दिली बुडी । आहे तेथें जोडी । जन्मांतरींचें ठेवणें ॥ ३ ॥

॥ ४०३७ ॥ कुंकवाची टेवाटेवी । बोडकादेवी काशाला ॥ धृ० ॥ दिवस गमा भरा पोट । कांगे नट नटावा ॥ १ ॥ दिमाख हा कोणां दावा । लटकी जीवा चरफड ॥ २ ॥ तुका ह्मणे झोंडगीं हो । फुंदा कां हो कोरडी ॥ ३ ॥

॥ ४०३८ ॥ तुझें प्रेम माझ्या हृदयीं आवडी । चरण न सोडीं पांडुरंगा ॥ धृ० ॥ कासया सिणविसी थोरिवाकारणें । काय तुझें उणें होइल देवा ॥ १ ॥ चातकाची चिंता हरली जलधरें । काय त्याचें सरे थोरपण ॥ २ ॥ चंद्र चकोरांचा पुरवी सोहळा । काय त्याची कळा न्यून होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज अनाथा सांभाळीं । हृदयकमळीं स्थिर राहें ॥ ४ ॥

॥ ४०३९ ॥ आह्मी आइते जेवणार । न लगे सोसावे डोंगर । सुखाचा वेव्हार । तेणेंचि वाढलें ॥ धृ० ॥ ठेवा जोडला मिरासी । ठाव जाला पायांपासी । नव्हे आणि-कांसी । रीघ तेथें यावया ॥ १ ॥ बळी दिला जीवभाव । नेणें आणिकांचें नांव । धरिला एक भाव । तो विश्वास फळला ॥ २ ॥ तुका ह्मणे जालों बळी । आह्मी निकट जवळी । बोलिलों तें पाळीं । वचन स्वामि आमचें ॥ ३ ॥

॥ ४०४० ॥ न लगावी दिठी । माझी तुझे मुखवटी ॥ धृ० ॥ आधीं पाउलें पाउलें । ते मी पाहेन तें भलें ॥ १ ॥ देईन हे काया । वरि सांडणें सांडाया ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । बहु आवडसी जीवा ॥ ३ ॥

॥ ४०४१ ॥ कोण आमचीं योगतपें । करूं बापें जाणावीं ॥ धृ० ॥ गीत संतसंगें

गाऊं । उभीं ठाऊं जागरणीं ॥ १ ॥ आमुचा तो नव्हे लाग । करूं त्याग जावया ॥ २ ॥ तुका ह्मणे इंद्रियांसी । येचि रसीं रंगवूं ॥ ३ ॥

॥ ४०४२ ॥ नाम तारक भवसिंधू । विठ्ठल तारक भवसिंधू ॥ धृ० ॥ नामधारक तया अरि मित्र । समता त्यागूनियां क्रोधू ॥ १ ॥ नामधारक तया । कदापि न घडे विषयाचा बाधू ॥ २ ॥ ज्या नामें तरले शुकादिक । नारद संत मुनिजन साधू ॥ ३ ॥ जाणूनियां जे नसरे। ते नेणति जैसा गज अंधू ॥ ४ ॥ सहज तुकया। नामचि जपतां स्वरूपीं वेधू ॥ ५ ॥

॥ ४०४३ ॥ आह्मां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा एका भावें ॥ धृ० ॥ तरीच हरिचे दास ह्मणवितां श्लाघीजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ॥ १ ॥ गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मगों तुज ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा ऐसी यांची सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

॥ ४०४४ ॥ पावलों हा देह कागतालि न्यायें । न घडे उपायें घडों आलें ॥ धृ० ॥ आतां माझीं खंडीं देह देहांतरें । अभय दातारें देऊनियां ॥ १ ॥ अंधळ्याचे पार्टी धनाची चरवी । अघटित तेंवि घडों आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे योग घडला बरवा । आतां कास देवा न सोडीं मी ॥ ३ ॥

॥ ४०४५ ॥ कळे परि न सुटे गांठी । जालें पोटीं कुपथ्य ॥ धृ० ॥ अहंकाराचें आंदणें जीव । राहे कींव केली ते ॥ १ ॥ हेंकडाची एकीच वोढी । तेही खोडी सांगती ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगों किती । कांहीं चित्तीं न राहे ॥ ३ ॥

॥ ४०४६ ॥ सांडावी हे भीड अधमाचे चाळे । मद्यपी बरळे भलत्या छंदें ॥ धृ० ॥ ऐसे तंव तुह्मी नाहीं जी दिसत । कां हें अनुचित वदलेत ॥ १ ॥ फांटा जाला त्यासी नाहीं वोढा वारा । वेरसाचि खरा हाटो गुण ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं ज्याच्या बापा ताळा । तो देखे विटाळा संतां अंगीं ॥ ३ ॥

॥ ४०४७ ॥ आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ॥ धृ० ॥ आतां दृष्टिपुढें ऐसाचि तूं राहीं । जों मी तुज पाहें पांडुरंगा ॥ १ ॥ लाचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडीं ऐसें जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी केली जे लडिवाळी । पुरवावी आळी मायबापें ॥ ३ ॥

॥ ४०४८ ॥ तिळ एक अर्ध राई । सीतबुंद पावे काई । तया सुखा नाहीं । अंतपार पाहतां ॥ धृ० ॥ ह्मणउनी करा लाहो । नका मागें पुढें पाहों । अवघ्यामध्यें आहों । अवघे सावचित्त तों ॥ १ ॥ तीर्थें न येती तुळणी । आजिया सुखाची धणी । जे काशी गयेहुनी । जीं आगळीं असती ॥ २ ॥ येथें धरी लाज । वर्णा अभिमान काज । नाडला सहज । तुका ह्मणे तो येथें ॥ ३ ॥

॥ ४०४९ ॥ विठोबाचें नाम ज्याचे मुखीं नित्य । त्या देखिल्या पतित उद्धरती ॥ धृ० ॥ विठ्ठल विठ्ठल भावें ह्मणे वाचे । तरी तो काळाचे दांत ठेंसी ॥ १ ॥ बहुत तारिले सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे म्यां ही ऐकोनियां कीर्ती । धरिला एकांतीं हृदयामाजी ॥ ३ ॥

॥ ४०५० ॥ भोळे भक्त भाव धरिती मानसीं । त्यांसी हृषीकेशी अवळीच ॥ धृ० ॥ भाव नाहीं मनीं अभाविक सदा । त्याचिया मी खेदा काय सांगों ॥ १ ॥ गणिकेसारिखीं नामें उद्धरिलीं । सज्ञानें पडिलीं खटाटोपीं ॥ २ ॥ तुका ह्मणे काय शुद्ध माझी जाती । थोर केली ख्याति हरिनामें ॥ ३ ॥

॥ ४०५१ ॥ आड पडे काडी । तरि ते बहुत पाणी खोडी ॥ धृ० ॥ दुर्जनांचे संगती । बहुतांचे घात होती ॥ १ ॥ एक पडे मासी । तरी ते बहु अन्न नासी ॥ २ ॥ तुका ह्मणे रांड । ऐसी कां ते व्याली भांड ॥ ३ ॥

॥ ४०५२ ॥ पंढरीचें बा भूत मोठें । आल्या गेल्या झडपी वाटे ॥ धृ० ॥ तेथें जाऊं नका कोणी । गेले नाहीं आले परतोनी ॥ १ ॥ तुका पंढरीसी गेला । पुन्हा जन्मा नाहीं आला ॥ २ ॥

॥ ४०५३ ॥ बरवे दुकानीं बैसावें । श्रवण मनन असावें ॥ धृ० ॥ सारअसाराचीं पोतीं । ग्राहिक पाहोनि करा रितीं ॥ १ ॥ उगेचि फुगवूं नका गाल । पूर्ण सांठवावा माल ॥ २ ॥ सत्य तराजू पैं धरा । नका कृत्रिम विकरा ॥ ३ ॥ तुका जाला वाणी । चुकवूनि चौऱ्यासींच्या खाणी ॥ ४ ॥

॥ ४०५४ ॥ काय करूं आतां या मना । न संडी विषयांची वासना । प्रार्थितांही राहेना । आदरें पतना नेऊं पाहे ॥ धृ० ॥ आतां धांवें धांवें गा श्रीहरी । गेलों वांयां नाहीं तरी । न दिसे कोणी आवरी । आणिक दुजा तयासी ॥ १ ॥ न राहे एके ठायीं एकी घडी । चित्त तडतडा तोडी । भरलें विषयभोंवडी । घालूं पाहे उडी भवडोहीं ॥ २ ॥ आशा तृष्णा कल्पना पापिणी । घात मांडला माझा यांणीं । तुका ह्मणे चक्रपाणी । काय अजोनि पाहातोसी ॥ ३ ॥

॥ ४०५५ ॥ पाषाण परिस भूमि जांबूनद । वंशाचा संबंध धातयाचा ॥ धृ० ॥ सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा राक्षसांचा ॥ १ ॥ ऐसी सहस्र त्या सुंदरा कामिनी । माजी मुखरणी मंदोदरी ॥ २ ॥ पुत्रपौत्राचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हरि इंद्रा आणी ॥ ३ ॥ चौदा चौकडिया आयुष्यगणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्याचे देव बांदवडी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ५ ॥

॥ ४०५६ ॥ पापाचीं संचितें देहासी दंडणा । तुज नारायणा बोल नाहीं ॥ धृ० ॥ पेरी कडू जिरें मागे अमृतफळें । अर्का वृक्षा केळें कैसीं येती ॥ १ ॥ सुख अथवा दुःख भोग हा देहाचा । नास हा ज्ञानाचा न करावा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां देवा कां रुसावें । मनासी पुसावें काय केलें ॥ ३ ॥

॥ ४०५७ ॥ लाभ पुढें करीं । घात नारायण वारी ॥ धृ० ॥ ऐसी भक्ताची माउली । करी कृपेची साउली ॥ १ ॥ माय बाळकासी । जीव भाव वेंची तैसी ॥ २ ॥ तुका ह्मणे माड । नाहीं शरणागत आड ॥ ३ ॥

॥ ४०५८ ॥ आपुलेंसें करुनी घ्यावें । आश्वासावें नाभीसें ॥ धृ० ॥ ह्मणऊनि धरिले

पाय । आवो माय विठ्ठले ॥ १ ॥ कळलासे सीण चित्ता । शम आतां करावा ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवीं वसें । मज नसें वेगळा ॥ ३ ॥

॥ ४०५९ ॥ तुजविण कांहीं । स्थिर राहे ऐसें नाहीं ॥ धृ० ॥ कळों आलें बहुता रीती । पांडुरंगा माझ्या चित्तीं ॥ १ ॥ मोकलिली आस । सर्वभावें जालों दास ॥ २ ॥ तुका ह्मणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥ ३ ॥

॥ ४०६० ॥ खोंकरीं आधण होय पाकसिद्धी । हें तों घडों कधीं शकेचिना ॥ धृ० ॥ खापराचे अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढिलिया ॥ १ ॥ पालथे घागरी रिचवितां जळ । तुका ह्मणे खळ तैसे कथे ॥ २ ॥

॥ ४०६१ ॥ नागलें देखोनि चांगलें बोले । आपुलें वेचूनि त्याजपुढें खुले ॥ धृ० ॥ अधमाचे ओंगळ गुण । उचित नेणें तो धर्म कोण ॥ १ ॥ आर्तभूता न घाली पाण्याचा चुळ । न मागे त्यासी घाली साखर गुळ ॥ २ ॥ एकासी आड पडोनी हों करी । एकासी देखोनि लपवी भाकरी ॥ ३ ॥ एकासी धड न बोले वाचा । एकासी ह्मणे मी तुझे बांदीचा ॥ ४ ॥ तुका ह्मणे ते गाढवपशू । लाभेंविण केला आयुष्यनाशू ॥ ५ ॥

॥ ४०६२ ॥ पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी । ह्मणी दृष्टिभेटी न हो त्याची ॥ धृ० ॥ नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशालागीं पात्र जाला ॥ १ ॥ पोहों नेणें कासे लावितो आणिका । ह्मणावें त्या मूर्खा काय आतां ॥ २ ॥ सिणलें तें गेलें सिणलिया पासी । जाली त्या दोघांसी एक गती ॥ ३ ॥ तुका ह्मणे अहो देवा दीनानाथा । दरुषन आतां नको त्याचें ॥ ४ ॥

॥ ४०६३ ॥ संतचिन्हें लेऊनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥ धृ० ॥ पाडिले दुःखाचे सागरीं । वहावले ते भवपुरीं ॥ १ ॥ कामक्रोधलोभ चित्तीं । वरिवरि दाविती विरक्ती ॥ २ ॥ आशापाशीं बांधोनि चित्त । ह्मणती झालों आह्मी मुक्त ॥ ३ ॥ त्यांचे लागले संगती । झाली त्यांसी तेचि गती ॥ ४ ॥ तुका ह्मणे शब्दज्ञानें । जग नाडियलें तेणें ॥ ५ ॥

॥ ४०६४ ॥ दोष करूनि आह्मी पतित सिद्ध जालों । पावन मागों आलों ब्रीद तुझें ॥ धृ० ॥ आतां पतिता तारावें कीं ब्रीद हें सोडावें । यांत जें पुरवे तेंचि सांगा ॥ १ ॥ उद्धार तुमच्यानें नव्हे हो श्रीहरी । सोडा झडकरी ब्रीद आतां ॥ २ ॥ तें ब्रीद घेउनी हिंडों दारोदारीं । सांगूं तुझी कीर्ति रे पांडुरंगा ॥ ३ ॥ देवें हारविलें ब्रीद हें सोडिलें । पतितें जिंकिलें आह्मीं देवा ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मीं उठलों दैन्यवरी । विचारा श्रीहरि तुह्मी आतां ॥ ५ ॥

॥ ४०६५ ॥ राम कृष्ण ऐसीं उच्चारितां नामें । नाचेन मी प्रेमें संतांपुढें ॥ धृ० ॥ काय घडेल तें घडो ये सेवटीं । लाभ हानि तुटी देव जाणें ॥ १ ॥ चिंता मोह आशा ठेवूनि निराळीं । देईन हा बळी जीव पायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं उरों नेदीं उरी । सांडीन हे थोरी ओवाळोनी ॥ ३ ॥

॥ ४०६६ ॥ देव धरी नाना सोंगें । नाम श्रेष्ठ पांडुरंग ॥ धृ० ॥ तो हा गवळियाचे घरीं । नाम सारितो मुरारी ॥ १ ॥ धन्य यशोदेचें प्रारब्ध । नाचे अंगणीं गोविंद ॥ २ ॥

ऐशीं भक्तांसाठीं देवें । नाना धरियेलीं नांवें ॥ ३ ॥ होय दासांचा जो दास । तुका ह्मणे विठ्ठलास ॥ ४ ॥

॥ ४०६७ ॥ आइत्या भाग्या धणी व्हावें । कोणें ध्यावें न सरे तें ॥ धृ० ॥ केणें आलें पंढरपुरीं । उधाराचें लाभीक ॥ १ ॥ बाखराची करुनी रीती । भरा पोतीं लवलाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे संतांपाडें । करूं पुढें वाखती ॥ ३ ॥

॥ ४०६८ ॥ जन्मोजन्मीं दास । व्हावें हेंचि माझी आस ॥ धृ० ॥ पंढरीचा वारकरी । वारी चुकों नेदी हरी ॥ १ ॥ संतसमागम । अंगीं स्थिरावलें प्रेम ॥ २ ॥ स्नान चंद्रभागे । तुका ह्मणे हेंचि मागें ॥ ३ ॥

॥ ४०६९ ॥ कांगा कोणी न ह्मणे पंढरीची आई । बोलाविते पाहीं चाल नेटें ॥ धृ० ॥ तेव्हां माझ्या मना होइल समाधान । जाइल सर्व शीण जन्मांतरिंचा ॥ १ ॥ तुका ह्मणे माझी होशील माउली । वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥ २ ॥

॥ ४०७० ॥ वेद अनंत बोलिला । अर्थ इतकाचि साधिला ॥ धृ० ॥ विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें ॥ १ ॥ सकळशास्त्रांचा विचार । अंतीं इतकाचि निर्धार ॥ २ ॥ अठरापुराणीं सिद्धांत । तुका ह्मणे हाचि हेत ॥ ३ ॥

॥ ४०७१ ॥ मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव । दुःखें तरी लव धडधडी ॥ धृ० ॥ न लभे हा काळ न सुटे हातींचा । न बोलवे वाचा खोडावली ॥ १ ॥ न पवे धांवणें न पवेचि लाग । न चलती माग धरावया ॥ २ ॥ भेणें तरि अंगा लावियेल्या राखा । परि त्यासी वाखा करीतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेदी हाका मारूं देवा । लोकापाठीं हेवा लागलासे ॥ ४ ॥

॥ ४०७२ ॥ धिग तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ तया माया प्रसवली ॥ धृ० ॥ कठिण हृदय तया चांडाळाचें । जो नेणें पराचें दुःख कांहीं ॥ १ ॥ आपुला हा प्राण तैसे सकळ लोक । न करी विवेक पशु जैसा ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ३ ॥

॥ ४०७३ ॥ गरुडावरि बैसोनि येतो जगजेठी । त्याचे चरणीं मिठी घालूं चला ॥ धृ० ॥ सांवळें रूपडें देखिलें लोचनीं । शंख चक्र दोन्ही शोभताहे ॥ १ ॥ पितांबर झळके हेंचि त्यांची खूण । वाकी रुणझुण करिताती ॥ २ ॥ गरुडाचा चपेटा येत असे नेटें । कस्तुरीमळवट शोभताहे ॥ ३ ॥ पदक एकावळी शोभताहे कंठीं । तुका ह्मणे मिठी घालूं चला ॥ ४ ॥

॥ ४०७४ ॥ नाहीं पाक होत उफराटे चालीं । बोलिली ते केली व्हावी नीत ॥ धृ० ॥ नाहीं मानूं येत वांजटाचे बोल । कोरडेंच फोल चवी नाहीं ॥ १ ॥ तरुवरा आधीं कोठें आहे फळ । चावटा बरळ ह्मणा त्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे किती ठकलीं बापुडीं । गव्हा आहे गोडी मांडे पुऱ्या ॥ ३ ॥

॥ ४०७५ ॥ जाली हरिकथा रंग वोरसला । उचितासी आला पांडुरंग ॥ धृ० ॥ वांटितो हें प्रेम उचिताचा दाता । घेंई रे तूं आतां धणीवरी ॥ १ ॥ प्रेम देऊनियां अवघीं

सुखी केलीं । जीं होतीं रंगलीं विटलीं तीं ॥ २ ॥ तुकें हें दुर्बळ देखियलें संतीं । ह्मणऊनि पुढती आणियेलें ॥ ३ ॥

॥ ४०७६ ॥ संकल्पिला तुज सकळही भाव । कोण एक ठाव उरला तेथें ॥ धृ० ॥ इंद्रियव्यापार जें जें कांहीं कर्म । करितों ते धर्म सकळ तुझे ॥ १ ॥ माझें हित फार लागला विचार । तुज सर्व भार चालवणें ॥ २ ॥ जो कांहीं लौकिक करिसी तो तुझा । अपमान पूजा कांहींतरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी तों राहिलों निश्चित । तुज काळे हित तैसें करीं ॥ ४ ॥

॥ ४०७७ ॥ भय नाहीं भेव । अनुतापीं नव्हतां जीव ॥ धृ० ॥ जेथें देवाची तळमळ । तेथें काशाचा विटाळ ॥ १ ॥ उच्चारितां दोष । नाहीं उरों देत लेश ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्त । होय आवडीं मिश्रित ॥ ३ ॥

॥ ४०७८ ॥ ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनासहित पालटे काया ॥ धृ० ॥ तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण जाला हरी ॥ १ ॥ चित्तचैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टी ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगों काय । एकाएकीं हरिवृत्तिमय ॥ ३ ॥.

॥ ४०७९ ॥ कोणाही केंडावें हा आह्मां अधर्म । जो जो पावे श्रम तो तो देव ॥ धृ० ॥ ह्मणऊनि चित्ता शिकविलें वोजें । आतां हेंचि दुजें न बोलावें ॥ १ ॥ हालविलें जरि पर-उपकारें । जिव्हे पाप खरें उपाधीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव प्रारब्धा आधीन । कोण वाहे सीण करुणा शोभे ॥ ३ ॥

॥ ४०८० ॥ देव तिळीं आला । गोडें गोड जीव धाला ॥ धृ० ॥ साधला हा पर्वकाळ । गेला अंतरींचा मळ ॥ १ ॥ पापपुण्य गेलें । एका स्नानेंचि खुंटलें ॥ २ ॥ तुका ह्मणे वाणी । शुद्ध जनार्दनीं जनीं ॥ ३ ॥

॥ ४०८१ ॥ काय उणें मज पांडुरंगा पायीं । रिद्धिसिद्धि ठायीं वोळगती ॥ धृ० ॥ कोण पाहे सुखा नाशिवंताकडे । तृष्णेचें बापुडें नव्हों आह्मी ॥ १ ॥ स्वर्गसुखें आह्मीं केलीं पावटणी । पापपुण्यें दोन्ही उलंडिलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं आणिलें वैकुंठ । वसविली पेठ वैष्णवांची ॥ ३ ॥

॥ ४०८२ ॥ माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पती ॥ धृ० ॥ तान्हेल्यानें पीतां पाणी । तेणें गंगा नव्हे उणी ॥ १ ॥ कल्पतरु जाला देता । तेथें पोटाचा मागता ॥ २ ॥ तुका ह्मणे संतां ध्यातां । परब्रह्म आलें हाता ॥ ३ ॥

॥ ४०८३ ॥ अर्भकाचे साटीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ धृ० ॥ तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥ १ ॥ बालकाचे चाली । माता जाणूनि पाउल घाली ॥ २ ॥ तुका ह्मणे नाव । जानासाटीं उदकीं ठाव ॥ ३ ॥

॥ ४०८४ ॥ जन्मोजन्मींची संगत । भेटी जाली अकस्मात ॥ धृ० ॥ आतां सोडितां सुटेना । तंतु प्रीतीचा तुटेना ॥ १ ॥ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडिली पंढरिराया ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं । तुझी माझी एक गती ॥ ३ ॥

॥ ४०८५ ॥ सांग पांडुरंगा मज हा उपाव । जेणें तुझे पाव आतुडती ॥ धृ० ॥

न कळे हा निर्धार ब्रह्मादिकां पार । कायसा विचार माझा तेथें ॥ १ ॥ तुका ह्मणे आतां धरूनियां धीर । राहूं कोठवर मायबापा ॥ २ ॥

॥ ४०८६ ॥ काय फार जरी जालों मी शाहाणा । तरी नारायणा नातुडसी ॥ धृ० ॥ काय जालें जरी मानी मज जन । परि नातुडति चरण तुझे देवा ॥ १ ॥ काय जालें जरी जालों उदासीन । परि वर्म भिन्न तुझें देवा ॥ २ ॥ काय जालें जरी केले म्यां सायास । ह्मणवितों दास भक्त तुझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज दाविल्यावांचून । तुझें वर्म कोण जाणें देवा ॥ ४ ॥

॥ ४०८७ ॥ जातां पंढरीच्या मार्गे । काय वर्णू सुखा मग ॥ धृ० ॥ घडे लाभ लक्ष-कोटी । परब्रह्मीं होईल भेटी ॥ १ ॥ नाम गर्जत येती संत । त्यांच्या दर्शनें होईजे मुक्त ॥ २ ॥ जो अलक्ष्य ब्रह्मादिकां । आला संनिध ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ४०८८ ॥ सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचें ॥ धृ० ॥ तयाच्या चिंतनें निरसलें संकट । तरलों दुर्घट भवसिंधु ॥ १ ॥ जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरी हाचि नेम अहिर्निशीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कोटि कुळें तीं पुनीत । भावें गातां गीत विठोबाचें ॥ ३ ॥

॥ ४०८९ ॥ मोल घेऊनियां कथा जरी करीं । तरी भंगो हरि देह माझा ॥ धृ० ॥ माझी कथा करा ऐसें ह्मणें कोणा ॥ तरी झडो जाणा जिव्हा माझी ॥ १ ॥ साह्य तूं जालासी काय उणें तुपें । आणिक भूतांपें काय मागों ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व सिद्धि तुझें पायीं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ४०९० ॥ जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥ धृ० ॥ कोठोनियां कांहीं न लगे आणावें । न लगे कोठें जावें तरावया ॥ १ ॥ जरी देव कांहीं धरिल पैं चित्तीं । तरि हेचि होती दिव्य चक्षू ॥ २ ॥ तुका ह्मणे देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥ ३ ॥

॥ ४०९१ ॥ पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरिसील सत्ता सकळही ॥ धृ० ॥ कां जी आह्मांवरी आणिकांची सत्ता । तुह्मासी असतां जवळिक ॥ १ ॥ तुका ह्मणे पायीं केलें निवेदन । उचित हें दान करीं आतां ॥ २ ॥

॥ ४०९२ ॥ रात्री दिवस आह्मां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥ धृ० ॥ जीवाही आगोज पडती आघात । येऊनियां नित्य नित्य करी ॥ १ ॥ तुका ह्मणे तुझ्या नामाचिया बळें । अवघीयांचें काळें केलें तोंड ॥ २ ॥

॥ ४०९३ ॥ होइन खडे गोटे । चरणरज साने मोठे । पंढरीचे वाटे । संतचरणीं लागेन ॥ धृ० ॥ आणिक काय दुजें । म्या मागणें तुजपासीं । अविट तें सुख । भय नास नाहीं ज्यासी ॥ १ ॥ होइन मोचे वाहणा । पायीं सकळां संतजनां । मांजर सुकर सुणा । जवळी शेष घ्यावया ॥ २ ॥ सांडोवा पायरी । वोहळ बावी गंगातिरी । होइन तयावरी । संतसज्जन चालती ॥ ३ ॥ लागें संतां पायीं । ऐसा ठेवीं भलते ठायीं । तुका ह्मणे देईं । धाक नाहीं जन्माचा ॥ ४ ॥

हेंचि थोर चिंता लागली मनासी । निजतां निद्रेसी न लगे डोळा ॥ १ ॥ जेवितां जेवणीं नलगे गोड धड । वाटतें काबाड विषयसुख ॥ २ ॥ ऐसिया संकटीं पाव कृपानिधी । लावीं संतपदीं प्रेमभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी नेणों कांहीं हित । तुजविण अनाथ पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ४१११ ॥ पंढरीचा वास धन्य तेचि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देही ॥ धृ० ॥ मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरी दयारूप ॥ १ ॥ शांति क्षमा अंगीं विरक्ति सकळ । नैराश्य निर्मळ नारी नर ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं वर्णा अभिमान । अवघे जीवन्मुक्त लोक ॥ ३ ॥

॥ ४११२ ॥ जेणें तुझी कास भावें धरियेली । त्याची नाहीं केली सांडी देवा ॥ धृ० ॥ काय माझा भोग आहे तो नकळे । सुखें तुह्मी डोळे झांका देवा ॥ १ ॥ राव रंक तुह्मां सारिकेचि जाणा । नाहीं थोर साना तुह्मांपासीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं आपंगिलें भक्तां । माझिया संचिता कृपा नये ॥ ३ ॥

॥ ४११३ ॥ देखीचें तें ज्ञान करावें तें काई । अनुभव नाहीं आपणासी ॥ धृ० ॥ इंद्रियांचे गोडी ठकलीं बहुतें । सोडितां मागुतें आवरेना ॥ १ ॥ युक्तीचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ॥ २ ॥ नाव रेवाळितां घालीं घाली वारा । तैसा तो पसारा अहंतेचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बुद्धि आपुले अधीन । करी नारायण आतुडे तों ॥ ४ ॥

॥ ४११४ ॥ नरनारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥ धृ० ॥ न यो काम क्रोध द्वेष निंदा द्वंद्व । अवघा गोविंद निःसंदेह ॥ १ ॥ असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझे पायीं ॥ २ ॥ करोनियां साह्य पुरवीं मनोरथ । व्हावें कृपावंत तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ४११५ ॥ आपुल्या पोटासाठीं । करी लोकांचिया गोष्टी ॥ धृ० ॥ जेणें घातलें संसारीं । विसरला तोचि हरी ॥ १ ॥ पोटा घातलें अन्न । न ह्मणे पतितपावन ॥ २ ॥ मी कोठील आणि कोण । हें न कळे ज्या लागून ॥ ३ ॥ तुका ह्मणे नरस्तुती । करितो भाट त्रिजगतीं ॥ ४ ॥

॥ ४११६ ॥ स्वयें आपणचि रिता । रडे पुढिलांच्या हिता ॥ धृ० ॥ सेकीं हें ना तेंतें जालें । बोलणें तितुकें वांयां गेलें ॥ १ ॥ सुखसागरीं नेघे वस्ती । अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥ २ ॥ तुका ह्मणे गाढव लेखा । जेथें भेटेल तेथें ठोका ॥ ३ ॥

॥ ४११७ ॥ जगीं कीर्ति व्हावी । ह्मणोनी जालासी गोसावी ॥ धृ० ॥ बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलेंसे दूर ॥ १ ॥ चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ॥ २ ॥ तुका ह्मणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥ ३ ॥

॥ ४११८ ॥ प्राक्तनाच्या योगें आळशावरी गंगा । स्नान काय जगा करूं नये ॥ धृ० ॥ उभी कामधेनु मांगाचे अंगणीं । तिसी काय ब्राह्मणीं वंदूं नये ॥ १ ॥ कोढियाचे हातें परिसें होय सोनें । अपवित्र ह्मणोन घेऊं नये ॥ २ ॥ यातिहीन जाला गांवींचा

मोकासी । त्याच्या वचनासी मानूं नये ॥ ३ ॥ भावारूढ तुका मुद्रा विठोबाची । न मनीं तयांचीं तोंडें काळीं ॥ ४ ॥

॥ ४११९ ॥ बोलिलों उत्कर्षें । प्रेमरस हासल्वें ॥ धृ० ॥ साच करिता नारायण । जया शरण गेलों तो ॥ १ ॥ समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवी ॥ २ ॥ तुका ह्मणे लडिवाळाचें । द्यावें साचें करूनियां ॥ ३ ॥

॥ ४१२० ॥ विचा केला ठोबा । ह्मणोनि नांव तो विठोबा ॥ धृ० ॥ कांरे नेणां त्यांचें नांव । काय वेदासि नाहीं ठाव ॥ १ ॥ शेष स्तुति प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग जाला ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । ज्याची काळाचिये माथा ॥ ३ ॥

॥ ४१२१ ॥ भ्रतार अंगसंगें सुखाची वेवस्था । आधीं तों सांगतां नये कोणा ॥ धृ० ॥ तथापि सांगणें कुमारिकेपाशीं । ते काय मानसीं सुख मानी ॥ १ ॥ तैसा आत्मबोध आधीं बोलों नये । बोलासी तो काय सांपडेल ॥ २ ॥ तथापि सांगणें बहिर्मुखापाशीं । तो काय संतोषासी मूळ होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत सुखाचे विभागी । ब्रह्मानंद जगीं साधुरूपें ॥ ४ ॥

॥ ४१२२ ॥ कलयुगामाजी थोर जालें बंड । नष्ट लोक लंड जाले फार ॥ धृ० ॥ न धरिती सोय न पुसती कोणा । येतें जैसें मना तैसें चाले ॥ १ ॥ सज्जनाचा वारा टेकों नेदी द्वारा । ऐसिया पामरा तारी कोण ॥ २ ॥ विश्वास तयाचा बैसेना कोठेंही । स्तुति निंदा पाहीं जीवीं धरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैसें केलें नारायणें । जाणावें हें कोणें तयाविण ॥ ४ ॥

॥ ४१२३ ॥ आपुली बुटबुट घ्यावी । माझी परताप द्यावी ॥ धृ० ॥ आपुला मंत्र नव्हे बरा । माझा बईल चुकला मोरा ॥ १ ॥ तुका ह्मणे ऐशा नरा । परिस न झोंबे खापरा ॥ २ ॥

॥ ४१२४ ॥ भावभक्तिवादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ धृ० ॥ अन्न पाणी धन द्रव्य नारायण । विठ्ठलावांचून बोलूं नये ॥ १ ॥ सप्रेम करावें देवाचें कीर्तन । भय द्या सोडून शरीराचें ॥ २ ॥ तरी मग जोडे विठ्ठलनिधान । केलिया कीर्तन सिद्धि पावे ॥ ३ ॥ देव जोडिलिया तया काय उणें । तुका ह्मणे मन धीट करा ॥ ४ ॥

॥ ४१२५ ॥ चोरासी चांदणें वेश्येसी सेजार । परिसेंसी खापर काय होय ॥ धृ० ॥ दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥ १ ॥ तुका ह्मणे जरि पूर्वपुण्यें सिद्धी । तरिच राहे बुद्धि संतसंगीं ॥ २ ॥

॥ ४१२६ ॥ रोगिया मिष्टान्न मर्कटा चंदन । कागासी लेपन कर्पूराचें ॥ धृ० ॥ निर्नासिका जैसा नावडे आरिसा । मूर्खालागीं तैसा शास्त्रबोध ॥ १ ॥ दास तुका ह्मणे विठ्ठल उदारें । अज्ञान अंधारें दूरी केलें ॥ २ ॥

॥ ४१२७ ॥ मथनासाठीं धर्माधर्म । त्याचें वर्म नवनीत ॥ धृ० ॥ तेंचि तें घाटूं नये । आलें जाय नासुनी ॥ १ ॥ सांभाळावें वरावर । वर्म दूर न वजावें ॥ २ ॥ तुका ह्मणे धालें पोट । मग बोटचाटणी ॥ ३ ॥

॥ ४१२८ ॥ माझा घात पात अथवा हित फार । अवघा विचार तु
॥ धृ० ॥ ठेवूनि जीव भाव तुझ्या ठायीं चित्त । राहिलों निवांत पांडुरंग
चित्ताचा चाळक बुद्धीचा जनिता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ २ ॥ तु
काय करिसी तें पाहीन । ठेविसी राहीन सुखें तेथें ॥ ३ ॥

॥ ४१२९ ॥ संतपाउलें साजिरीं । गंगा आली आम्हांवरी ॥ धृ० ॥ जेथें
धुळी । तेथें करावी अंघोळी ॥ १ ॥ स्वेतबंद वाराणसी । अवघीं तीर्थें तयापा
तुका ह्मणे धन्य जालों । संतसागरीं मिळालों ॥ ३ ॥

॥ ४१३० ॥ न घडे मायबापें बाळकाचा घात । आपणादेखत होऊं नेदी
कां मी मनीं चिंता वाहूं भय धाक । काय नव्हे एक करितां तुज ॥ १ ॥
त्याच्या हिताचे उपाय । तान भूक वाहे कडिये खांदीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तूं ग
भारी । ऐसें मज हरि कळों आलें ॥ ३ ॥

॥ ४१३१ ॥ करावें कीर्तन । मुखीं गावे हरिचे गुण ॥ धृ० ॥ मग त
बाधा । काम दुर्जनाच्या क्रोधा ॥ १ ॥ शांतिखड्ग हातीं । काळासी ते नागवि
तुका ह्मणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ॥ ३ ॥

॥ ४१३२ ॥ तुझी कीर्ति सांगों तुजपुढें जरी । ब्रह्मांडींही हरि माईनाते
मेरूची लेखणी सागराची शाई । कागद हा मही न पुरेची ॥ १ ॥ अनंत अप
गिले भक्त । माझेंचि संचित ओडवेना ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मां बोल नाहीं दे
म्यां सेवा केली नाहीं ॥ ३ ॥

॥ ४१३३ ॥ काय साधनाच्या कोटी । केल्या आटी होती त्या ॥ धृ० ॥
करी जरी । होय उजरी स्वरूपीं ॥ १ ॥ केले होते व्यर्थ श्रम । उपरम न हो
तुका ह्मणे कळों आलें । सर्व जालें आपरूप ॥ ३ ॥

॥ ४१३४ ॥ तुज काय करूं मज एक सार । अमृतसागर नाम तुझें ॥ धृ
येणें उणें आह्मां तया पोटीं । गोवितां हे कंठीं कामधेनू ॥ १ ॥ नोळखे तानुलें
कोण । वोरसें देखून शोक त्याचा ॥ २ ॥ जो नाहीं देखिला याचक नयनीं
घेऊनि लज्जा दान ॥ ३ ॥ नामासाठीं प्राण सांडियेला रणीं । शूर ते भांडणीं
॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी गातां गीतीं भला । भेटुनी विठ्ठला काय चाड ॥ ५ ॥

॥ ४१३५ ॥ कृपेचे सागर हेचि साधुजन । तिहीं कृपादान केलें मज
बोबडे वाणीचा केला अंगिकार । तेणें माझा स्थिर केला जीव ॥ १ ॥ तेणें
स्थिर जालें ठायीं । संतीं दिला पायीं ठाव मज ॥ २ ॥ नाभी नाभी ऐसें बोलि
तें माझें कल्याण सर्वस्वही ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों आनंदनिर्भर । नाम नि
करूं ॥ ४ ॥

॥ ४१३६ ॥ भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं । तया घरीं शांति क्षमा दया
अष्ट महा सिद्धि वोळगती द्वारीं । न वजती दुरी दवडितां ॥ १ ॥ तेथें दुष्ट गुण
नःशेष । चैतन्याचा वास जयामाजी ॥ २ ॥ संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ

इळहळ त्रिगुणाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें काय तो संदेह । आमचें गौरव आह्मी करूं ॥ ४ ॥

॥ ४१३७ ॥ साच हा विठ्ठल साच हें करणें । संत जें वचनें बोलियेले ॥ धृ० ॥ साच तें स्वहित साच ते प्रचित । साच वेद नीत सांगतील ॥ १ ॥ तुका ह्मणे घेती साच साच भावें । लटिकें वर्म ठावें नाहीं त्यांसी ॥ २ ॥

॥ ४१३८ ॥ संगें वाढे सीण न घडे भजन । त्रिविध हें जन बहु देवा ॥ धृ० ॥ याचि मुळें आला संगाचा कांटाळा । दिसताती डोळां नानाछंद ॥ १ ॥ एकविध भाव राहावया ठाव । नेदी हा संदेह राहों चित्तीं ॥ २ ॥ शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणिक देखिलें नावडे त्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां एकलेंचि भलें । बैसोनि उगलें राहावें तें ॥ ४ ॥

॥ ४१३९ ॥ तुझें वर्म आह्मां कळों आलें सुखें । संतांचिया मुखें पांडुरंगा ॥ धृ० ॥ अवघाचि नट वाउगा पसारा । चेईला तूं खरा तूंचि एक ॥ १ ॥ ह्मणऊनि देहबुद्धि नासिवंता । नातळे या चित्ता नेदावया ॥ २ ॥ सोय हे लागली पुढिलांचीं वाट । पावले जे नीट तुजपाशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं कोणासवें काज । बोलायाचें मज अंतरींचें ॥ ४ ॥

॥ ४१४० ॥ पुण्यपापा ठाव नाहीं सुखदुःखा । हानिलाभशंका नासलिया ॥ धृ० ॥ जितां मरण आलें आप पर गेलें । मूळ छेदियेलें संसाराचें ॥ १ ॥ अधिकार जाती वर्णधर्मयाती । ठाव नाहीं सत्य असत्याशी ॥ २ ॥ जन वन भिन्न आचेत चळण । नाहीं दुजेपण ठाव यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देह वाईलें विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्व पूजा ॥ ४ ॥

॥ ४१४१ ॥ संकोचतो जीव महत्त्वाच्या भारें । दासत्वचि बरें बहु वाटे ॥ धृ० ॥ कळावी जी माझी आवडी हे संतां । देणें तरि आतां हेंचि द्यावें ॥ १ ॥ तुमचें चरण पावविलों सेवा । ह्मणऊनि हेवा हाचि करीं ॥ २ ॥ विनउनी तुका वंदितो चरण । लेखा रजरेण चरणींचें ॥ ३ ॥

॥ ४१४२ ॥ देव कैंचा तया दुरी । भाका बरी करुणा ॥ धृ० ॥ आळविल्या नलगे धर । माय जाणें रे भातुकें ॥ १ ॥ नावे तरी ज्याचा भार । पैल पार जवळी त्या ॥ २ ॥ आतां परदेशी तुका । जाला लोकां वेगळा ॥ ३ ॥

॥ ४१४३ ॥ भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयांची गोडी ॥ धृ० ॥ तो नरचि नव्हे पाहीं । खर जाणावा तो देहीं ॥ १ ॥ भजन पूजन हीं नेणे । काय स्वरूपासी जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याला । ओवंडून बाहेर घाला ॥ ३ ॥

॥ ४१४४ ॥ समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा । भगिनी ते रमा शंखाची या ॥ धृ० ॥ मेहुणा जयाचा द्वारकेचा हरी । शंख दारोदारीं भीक मागे ॥ १ ॥ दुष्ट हें जाणावें आपुलें स्वहित । तुका ह्मणे मात ऐसी आहे ॥ २ ॥

॥ ४१४५ ॥ भवांचिया संगें बहुच नाडिले । कळिकाळें पाडिले तोंडघसीं ॥ धृ० ॥ तया भवसंगें गुंतलासी वांयां । धन पुत्र जाया भुलों नको ॥ १ ॥ जे जे घडी जाय ते ते

काळ खाय । प्राण्या तरणोपाय काय केला ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं सर्वही तूं त्याग । अर्पीं हें सर्वांग जगदीशीं ॥ ३ ॥

॥ ४१४६ ॥ रुचे सकळा मिष्टान्न । रोग्या विखाच्या समान ॥ धृ० ॥ तरि कां तया एकासाटीं । कामें अवघीं करणें खोटीं ॥ १ ॥ दर्पण नावडे एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ २ ॥ तुका ह्मणे खळा । उपदेशाचा कांटाळा ॥ ३ ॥

॥ ४१४७ ॥ जागा घरटी फिरे तस्कराची दिवसाराती । नीदसुरें नाडिलीं असो ऐसीं मागें किती ॥ धृ० ॥ हाट करी सकळ जन । वस्तु करा रे जतन ॥ १ ॥ हुशार ठायीं । निजनिजेलिया पाहीं ॥ २ ॥ सावचित्त असे खरा । लाभ घेऊन जाये घरा ॥ ३ ॥ तराळ बोंबे उतराई । राखा आपुलिया भाई ॥ ४ ॥ हरिच्या नामीं घालूं जागा । तुका ह्मणे हुशार गा ॥ ५ ॥

॥ ४१४८ ॥ संतांनीं सरता केलों तैसेपरी । चंदनीं ते बोरी व्यापियेली ॥ धृ० ॥ गुण दोष याती न विचारितां कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया ॥ १ ॥ तुका ह्मणे आलें समर्थाच्या मना । तरि होय राणा रंक त्याचा ॥ २ ॥

॥ ४१४९ ॥ चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान । अखंड मुखीं नाम वर्णावे गुण ॥ धृ० ॥ हेंचि एक देवा तुह्मां मागणें दातारा । उचित तें करा माझा भाव जाणुनी ॥ १ ॥ खुंटली जाणींव माझें बोलणें आतां । करूं यावी तैसी करावी बाळकाची चिंता ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां नको देऊं अंतर । न कळे पुढें काय बोलों विचार ॥ ३ ॥

॥ ४१५० ॥ संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ॥ धृ० ॥ भजनविधि नेणें साधन उपाय । सकळ सिद्धि पाय हरिदासांचे ॥ १ ॥ ध्यान-गति मति आसन समाधी । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ॥ २ ॥ नेणता निर्लज्ज नेणें नाद-भेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ॥ ३ ॥ सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका ह्मणे संतमहंतपाय ॥ ४ ॥

॥ ४१५१ ॥ हरिजनीं प्राण विकली हे काया । अंकिला मी तया घरीं जालों ॥ धृ० ॥ ह्मणियें सत्वर करीन सांगतां । घेईन मी देतां शेष त्यांचें ॥ १ ॥ आस करूनियां राहेन अंगणीं । उच्छिष्टाची धणी घ्यावयासी ॥ २ ॥ चालतां ते मार्गीं चरणींचे रज । उडती सहज घेइन आतां ॥ ३ ॥ दुरि त्यांपासूनि न वजें दवडितां । तुका ह्मणे लाता घेइन अंगीं ॥ ४ ॥

॥ ४१५२ ॥ पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्यउदयाचा ठसा । जाला सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥ धृ० ॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥ १ ॥ आलिंगनें संतांचिया । दिव्य जाली माझी काया । मस्तक हा पाया । वरी त्यांच्या ठेवितां ॥ २ ॥ तुका ह्मणे धन्य झालों । सुखें संतां-चिया धालों । लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ॥ ३ ॥

॥ ४१५३ ॥ ठाव देऊनियां राखें पायापासीं । मी तों आहें रासी पातकाची ॥ धृ० ॥ पातकाची रासी ह्मणतां लागे वेळ । ऐके तो कृपाळ नारायण ॥ १ ॥ नारायणनामें

अवघें सांग जालें । असंगाचि केलें एकमय ॥ २ ॥ एकमय जालें विठोबाच्या नामें । भेदाभेद कर्मे आणिक कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्तीं चिंतिलें जें होतें । तें होय आपैतें नामें याच्या ॥ ४ ॥

॥ ४१५४ ॥ आतां आह्मां भय नाहीं बा कोणाचें । बळ विठोबाचें जालें असे ॥ धृ० ॥ धीर दिला आह्मां येणें पांडुरंगें । न पांगों या पांगें संसाराच्या ॥ १ ॥ तुका ह्मणे माझा कैवारी हा देव । नाहीं भय भेव त्याच्या संगें ॥ २ ॥

॥ ४१५५ ॥ भक्ति आह्मी केली सांडुनी उद्वेग । पावलों हें सांग सुख याचें ॥ धृ० ॥ सुख आह्मां जालें धरितां यांचा संग । पळाले उद्वेग सांडूनियां ॥ १ ॥ तुका ह्मणे सुख बहु जालें जीवा । घडली या सेवा विठोबाची ॥ २ ॥

॥ ४१५६ ॥ शास्त्रज्ञ हो ज्ञाते असती बहुत । परि नाहीं चित्त हाता आलें ॥ धृ० ॥ क्षणा एकासाठीं न धरवे धीर । तेणें हा रघुवीर अंतरतो ॥ १ ॥ तोळाभर सोनें रतिभार राई । मेळविल्या पाहीं नास होतो ॥ २ ॥ हरीचे अंकित असती विरळागत । तयांसी अच्युत कृपा करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय धुडवण्या गोष्टी । जंव नाहीं गांठी चित्त आलें ॥ ४ ॥

॥ ४१५७ ॥ इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम ह्मणोनि काई ॥ धृ० ॥ जेविं माशीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ १ ॥ कीर्तन करावें । तैसें करुनी दावावें ॥ २ ॥ हें तों अंगीं नाहीं चिन्हें । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥ ३ ॥ तुका ह्मणे रागा । संत शिवूं नेदिती अंगा ॥ ४ ॥

॥ ४१५८ ॥ न लगे देवा तुझें आह्मांसी वैकुंठ । सायुज्याचा पट नलगे मज ॥ धृ० ॥ देईं तुझें नाम मज सर्वकाळीं । मागेन वनमाळी हेंचि तुज ॥१॥ नारद तुंबर उद्धव प्रल्हाद । बळी रुक्मांगद नाम ध्याती ॥ २ ॥ सिद्ध मुनिगण गंधर्व किन्नर । करिताती गजर रामनामें ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरि देईं तुझें नाम । अखंडित प्रेम हेंचि द्यावें ॥ ४ ॥

॥ ४१५९ ॥ पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । जालें या चित्तासी समाधान ॥ धृ० ॥ मायबाप माझा उभा कृपादानी । विटेसम जोडुनी पादांबुजें ॥ १ ॥ सांभाळासी येऊं नेदीच उणीव । अधिकारगौरव राखे तैसें ॥ २ ॥ तुका ह्मणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळुनी ॥ ३ ॥

॥ ४१६० ॥ होतें तैसें पायीं केलें निवेदन । अंतरलों दिन बहुत होतों ॥ धृ० ॥ संबोखुनी केलें समाधान चित्त । वोगरूनि भातें प्रेमरस ॥ १ ॥ नामरत्नमणि करुनी भूषण । अळंकारमंडण माळा दिली ॥ २ ॥ तुका ह्मणे सुखें जालों निरामय । नामीं नामसोय निमग्नता ॥ ३ ॥

॥ ४१६१ ॥ स्थिरावली - वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खुण पावूनियां ॥ धृ० ॥ सुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीलित । कंठ सद्गदित रोमांच आले ॥ १ ॥ चित्त चाकाटलें स्वरूपा माझारी । न निघे बाहेरी सुखावलों ॥ २ ॥ सुनीळ प्रकाश उदैजेला दिन ।

अमृताचें पान जीवनकळा ॥ ३ ॥ शशिसूर्या जाली जीवें ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ॥ ४ ॥ तुका ह्मणे सुखें प्रेमासी डुलत । वीरालों निश्चित निश्चितीनें ॥ ५ ॥

॥ ४१६२ ॥ बौध्यअवतार माझिया अदृष्टा । मौन्य मुखें निष्ठा धरियेली ॥ धृ० ॥ लोकांचियेसाठीं शाम चतुर्भुज । संतांसवें गुज बोलतसां ॥ १ ॥ आलें कलियुग माझिया संचिता । डोळां हाकलितां न पडेसी ॥ २ ॥ म्यांच तुझें काय केलें नारायणा । कां नये करुणा तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ४१६३ ॥ मुखीं विठ्ठलाचें नाम । मग कैचा भवभ्रम ॥ धृ० ॥ चालतां बोलतां खातां । जेवितां निद्रा करितां ॥ १ ॥ सुखें असों संसारीं । मग जवळीच हरी ॥ २ ॥ मुक्तिवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥ ३ ॥ मग देवभक्त जाला । तुका तुकीं उतरला ॥ ४ ॥

॥ ४१६४ ॥ प्रेम जडलें तुझे पायीं । आणिक न सुचे मजला कांहीं ॥ धृ० ॥ रात्रींदिवस तुझें ध्यान । तेंचि माझें अनुष्ठान ॥ १ ॥ नामापरतें नेणें दुजें । ऐसें कळलें मजला निज ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतकाळीं । आह्मां सोडवीं तात्काळीं ॥ ३ ॥

॥ ४१६५ ॥ तुझे पाय माझी काशी । कोण जाय माझें काशी ॥ धृ० ॥ तुझें रूप तेंचि ध्यान । तेंचि माझें अनुष्ठान ॥ १ ॥ तुझे चरण तेचि गया । जालें गयावर्जन देहा ॥ २ ॥ तुका ह्मणे सकळ तीर्थें । तुझे पायीं वसती येथें ॥ ३ ॥

॥ ४१६६ ॥ क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नावडे । पहावया धांवे कोल्हांटासी ॥ धृ० ॥ कथेसी साक्षेपें पाचारिला जरी । ह्मणे माझ्या घरीं कोणी नाहीं ॥ १ ॥ बलात्कारें जरी आणिला कथेसी । निद्रा घे लोडेंसी टेंकूनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ३ ॥

॥ ४१६७ ॥ श्रीराम सखा ऐसा धरीं भाव । मीपणाचा ठाव पुसीं मना ॥ धृ० ॥ शरण निरंतर ह्मणे तूं गोविंदा । वाचे लावीं धंदा नारायण ॥ १ ॥ यापरि सोपान नाहीं रे साधन । वाह्रातसें आण तुझी मना ॥ २ ॥ नको कांहीं करूं आळस अंतरीं । जपें निरंतरी रघुपती ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोठा लाभ नरदेहीं । देहीच विदेही होई नामें ॥ ४ ॥

॥ ४१६८ ॥ सर्वांपरी तुझे गुण गा उत्तम । तुझे ठायीं प्रेम राहो माझें ॥ धृ० ॥ माउलीपरिस आहेसी उदार । तरि कां निष्ठुर मन केलें ॥ १ ॥ गजेंद्राकारणें केलें त्वां धांवणें । तरि कां निर्वाण पाहातोसी ॥ २ ॥ प्रल्हादा संकटीं रक्षिलें त्वां देवा । तरि कां केशवा सांडी केली ॥ ३ ॥ अन्यायी अजामेळ तो जाला पावन । ऐसें हें पुराण हाका मारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझे थोर अपराध । नाम करी छेद क्षणमात्रें ॥ ५ ॥

॥ ४१६९ ॥ आतां वाटों नेदीं आपुलें हें मन । न सोडीं चरण विठोबाचे ॥ धृ० ॥ दुजिया चा संग लागों नेदीं वारा । आपुल्या शरीरावरूनिया ॥ १ ॥ यावें जावें आह्मीं देवा चे सांगातें । मागुती करीत हेंचि आलों ॥ २ ॥ काय वांयां गेलों तो करूं उद्वेग ।

उभा पांडुरंग मागें पुढें ॥ ३ ॥ तुका ह्मणे प्रेम मागतों आगळें । येथें भोगूं फळें वैकुंठींचीं ॥ ४ ॥

॥ ४१७० ॥ आतां आह्मां हेंचि काम । वाचे स्मरों रामराम ॥ धृ० ॥ ऐसी मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ १ ॥ अमृताची खाणी । तये ठायीं वेंचूं वाणी ॥ २ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । माझ्या जीवींच्या जिवलगा ॥ ३ ॥

॥ ४१७१ ॥ आतां जावें पंढरीसी । दंडवत विठोबासी ॥ धृ० ॥ जेथें चंद्रभागातिरीं । आह्मी नाचों पंढरपुरीं ॥ १ ॥ जेथें संतांची दाटणी । त्याचें घेऊं पायवणी ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी बळी । जीव दिधला पायां तळीं ॥ ३ ॥

॥ ४१७२ ॥ आह्मी नरका जातां काय येइल तुझ्या हाता । ऐसा तूं अनंता विचारीं पां ॥ धृ० ॥ तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ । विचारा दयाळ कृपानिधी ॥ १ ॥ तुझें पावनपण न चले आह्मांसीं । ऐसें हृषीकेशी कळों आलें ॥ २ ॥ आह्मी दुःख पावों जन्ममरण व्यथा । काय तुझ्या हाता येत असे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी खाइली हो रडी । आह्मी धरली शेंडी नाम तुझें ॥ ४ ॥

॥ ४१७३ ॥ पांडुरंगे पाहा खाइलीसे रडी । परि नामशेंडी धरिली आह्मीं ॥ धृ० ॥ आतां संतांनीं करावी पंचाईत । कोण हा फजितखोर येथें ॥ १ ॥ कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आह्मी पातकीही ॥ २ ॥ याचें पावनपण सोडवांचि तुह्मी । पतितपावन आह्मी आहों खरें ॥ ३ ॥ आह्मी तंव आहों अन्यायी सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी मेलों तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥ ५ ॥

॥ ४१७४ ॥ घालूनियां मध्यावर्ती । दाटूनि उपदेश देती ॥ धृ० ॥ ऐसे पोटभरे संत । तयां कैंचा भगवंत ॥ १ ॥ रांडापोरांतें गोविती । वर्षासन ते लाविती ॥ २ ॥ जसें बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया । तमोगुणियाची क्रिया ॥ ४ ॥

॥ ४१७५ ॥ वैभव तें राज्य संपत्ति टाकावी । उदरार्थ मागावी माधोकरी ॥ धृ० ॥ आपुलें तें आधीं करावें स्वहित । ऐसी आहे नीत स्वधर्माची ॥ १ ॥ वर्ण कुळ जाति याचा अभिमान । त्यजावा सन्मान लौकिकाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे राहे एकाकी निःशंक । देऊनियां हाक कंठीं काळ ॥ ३ ॥

॥ ४१७६ ॥ हातपाय मिळोनि मेळा । चला ह्मणती पाहों डोळा ॥ धृ० ॥ देखणी नव्हे देखती कैसे । सकळांचा देखणा डोळाचि असे ॥ १ ॥ डोळ्याचा डोळा पाहों गेला । तुका ह्मणे तो पाहों ठेला ॥ २ ॥

॥ ४१७७ ॥ मुखें सती इंद्रियें जती । आणिक नेणे भाव भक्ती ॥ धृ० ॥ देवा हेंचि दोन्ही पदें । येर गाइलीं विनोदें ॥ १ ॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्त्तन ॥ २ ॥

॥ ४१७८ ॥ धांवोनियां आलों पहावया मुख । गेलें माझें दुःख जन्मांतरींचें ॥ धृ० ॥

ऐकिलेंही होतें तैसेंचि पाहिलें । मन स्थिरावलें तुझ्या पायीं ॥ १ ॥ तुका ह्मणे माझी इच्छा पूर्ण जाली । कांहीं न राहिली वासना हे ॥ २ ॥

॥ ४१७९ ॥ गावलोकिकांहीं लावियेलें पिसें । काय सांगों ऐसें तुजपासीं ॥ धृ० ॥ तोंड काळें केलें फिरविलें मज । नाहीं धरिली लाज पांडुरंगा ॥ १ ॥ काय तुजपासीं सांगों हें गाऱ्हाणें । मग काय जिणें तुझें माझें ॥ २ ॥ कोणासाठीं आतां करावा संसार । केली वारावार आपणची ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी मोडिला घरचार । धरियेला धीर तुझ्या पायीं ॥ ४ ॥

॥ ४१८० ॥ जीवें जीव नेणें पापी सारिकाची । नळी तुजयाची कापूं बैसे ॥ धृ० ॥ आत्मा नारायण सर्वां घटीं आहे । पशूमध्यें काय कळों नये ॥ १ ॥ देखत हा जीव तुंबरे वरडत । निष्ठुराचे हात वाहाती कैसे ॥ २ ॥ तुका ह्मणे तया चांडाळासी नर्क । भोगिती अनेक महादुःखें ॥ ३ ॥

॥ ४१८१ ॥ मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती पाहीं ॥ धृ० ॥ पाहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥ १ ॥ शुद्ध पाहोनियां भाव । त्याचे हृदयीं वसे देव ॥ २ ॥ तुका ह्मणे विठोबासीं । ठाव देई चरणापासीं ॥ ३ ॥

॥ ४१८२ ॥ भागल्याचें तारूं शिणल्याची साउली । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥ धृ० ॥ ऐसी हे कृपाळू अनाथांची वेशी । सुखाचीच राशी पांडुरंग ॥ १ ॥ सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टी । पाहे बहु भेटी उताविळा ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें आतां उरला कैंचा । अनंता जन्मींचा शीण भाग ॥ ३ ॥

॥ ४१८३ ॥ काय न्यून आहे सांगा । पांडुरंगा तुह्मांपें ॥ धृ० ॥ आमुची तों न पुरे इच्छा । पिता ऐसा मस्तकीं ॥ १ ॥ कैसी तुह्मां होय सांडी । करुणा तोंडीं उच्चारें ॥ २ ॥ आश्चर्यचि करी तुका । हे नायका वैकुंठिंचिया ॥ ३ ॥

॥ ४१८४ ॥ चित्त गुंतलें प्रपंचें । जालें वेडें ममतेचें ॥ धृ० ॥ आतां सोडवीं पांडुरंगा । आलें निवारीं तें आंगा ॥ १ ॥ गुंतली चावटी । नामीं रूपीं जाली तुटी ॥ २ ॥ तुका ह्मणे चाली । पुढें वाट खोळंबली ॥ ३ ॥

॥ ४१८५ ॥ किती एका दिवशीं । बुद्धि जाली होती ऐसी ॥ धृ० ॥ कांहीं करावें स्वहित । तों हें न घडे उचित ॥ १ ॥ अवलंबुनी भीक । लाज सांडिली लौकिक ॥ २ ॥ तुका ह्मणे दीन । जालों मनुष्यपणा हीन ॥ ३ ॥

॥ ४१८६ ॥ आतां बरें जालें । सकाळींच कळों आलें ॥ धृ० ॥ मज न ठेवीं इहलोकीं । आलों तेव्हां जाली चुकी ॥ १ ॥ युगमहिमा ठावा । नव्हता ऐसा पुढें देवा ॥ २ ॥ तुका ह्मणे ठेवीं । भोगासाठीं निरयगांवीं ॥ ३ ॥

॥ ४१८७ ॥ परि आतां माझी परिसावी विनंती । रखुमाईच्या पति पांडुरंगा ॥ धृ० ॥ चुकलिया बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥ १ ॥ तुका ह्मणे तुझा ह्मणताती मज । आतां आहे लाज हेचि तुह्मां ॥ २ ॥

॥ ४१८८ ॥ पापाचिया मुळें । जाले सत्याचें वाटोळें ॥ धृ० ॥ दोष जाले बळिवंत ।

नाहीं ऐसी जाली नीत ॥ १ ॥ मेघ पडों भीती । पिकें सांडियेली क्षिती ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं । वेदा वीर्य शक्ति नाहीं ॥ ३ ॥

॥ ४१८९ ॥ ऐसा दुस्तर भवसागर । नेणों कैसा उतरूं पार ॥ धृ० ॥ कामक्रोधादि सावजें थोर । दिसताती भयंकर ॥ १ ॥ मायाममतेचे भोवरे । घेती भयानक फेरे ॥ २ ॥ वासनेच्या लहरी येती । उद्योगहेलकावे बसती ॥ ३ ॥ तरावया एक युक्ति असे । तुका नामनावेमधीं बैसे ॥ ४ ॥

॥ ४१९० ॥ देव जडला जाइना अंगा । यासी काय करूं सांगा ॥ धृ० ॥ वरकड देव येती जाती । हा देव जन्माचा सांगाती ॥ १ ॥ अंगीं भरलें देवाचें वारें । देव जगचि दिसे सारें ॥ २ ॥ भूत न बोले निरुतें । कांहीं केल्या न सुटे तें ॥ ३ ॥ जीव खादला दैवतें । माझ्या आणि पंचभूतें ॥ ४ ॥ तुका ह्मणे वाडें कोडें । उभें पुंडलिकापुढें ॥ ५ ॥

॥ ४१९१ ॥ हरिदासाचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥ धृ० ॥ ह्मणसी कांहीं मागा । हेंचि देगा पांडुरंगा ॥ १ ॥ संतां लोटांगणीं । जातां लाजों नको मनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगीं । शक्ति देईं नाचें रंगीं ॥ ३ ॥

॥ ४१९२ ॥ लटिक्याचें आंवतणें जेविलिया साच । काय त्या विश्वास तोचि खरा ॥ धृ० ॥ कोल्हांटिणी लागे आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ॥ १ ॥ जळमंडपयाचे घोडे राउत नाचती । ते काय तडवती युद्धालागीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसें मतवादीयांचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांची ॥ ३ ॥

॥ ४१९३ ॥ काय आह्मीं केलें ऐसें । तुद्धरी जेसें सांगावें ॥ धृ० ॥ हरण कोल्हें वैकुंठवासी । कोण त्यासी अधिकार ॥ १ ॥ गजा नाड्या सरोवरीं । नाहीं हरि विचारिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे गणिका नष्ट । माझे कष्ट त्याहुनी ॥ ३ ॥

॥ ४१९४ ॥ भाग्यासाठीं गुरु केला । नाहीं आह्मांसी फळला ॥ धृ० ॥ याचा मंत्र पडतां कानीं । आमच्या पेवांत गेलें पाणी ॥ १ ॥ गुरु केला घरवासी । आमच्या चुकल्या गाईम्हसी ॥ २ ॥ स्वामि आपुली बुटबुट घ्यावी । आमुची प्रताप टाकुन द्यावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे नष्ट । त्यांसी दुणे होती कष्ट ॥ ४ ॥

॥ ४१९५ ॥ गुणा आला विटेवरी । पितांबरधारी सुंदर ॥ धृ० ॥ डोळे कान त्याच्या ठायीं । मन पायीं राहो हें ॥ १ ॥ निवारोनी जाय माया । ऐसी छाया जयासी ॥ २ ॥ तुका ह्मणे समध्यान । हे चरण सकुमार ॥ ३ ॥

॥ ४१९६ ॥ रंगीं रंगें नारायण । उभा करितों कीर्त्तन ॥ धृ० ॥ हातीं घेऊनियां विणा । कंठीं राहे नारायणा ॥ १ ॥ देखिलीसे मूर्ती । माझ्या हृदयाची विश्रांती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । देईं कीर्त्तनाचा हेवा ॥ ३ ॥

॥ ४१९७ ॥ तुझा भरवसा आह्मां । फार होता पुरुषोत्तमा ॥ धृ० ॥ भवसागरसंकटीं । तारिशील जगजेठी ॥ १ ॥ नाम आदित्याचें झाड । त्याचा न पडे उजड ॥ २ ॥ सिलंगणींचें सोनें । त्यासी गाहाण ठेवी कोण ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । ब्रीद सोडूनियां देवा ॥ ४ ॥

॥ ४१९८ ॥ जालों आतां दास । माझी पुरवीं हे आस ॥ धृ० ॥ पंढरीचा वारकरी । वारी चुकों नेदीं हरी ॥ १ ॥ संतसमागम । अंगीं भरोनियां प्रेम ॥ २ ॥ चंद्रभागे स्नान । तुका ह्मणे हेंचि दान ॥ ३ ॥

॥ ४१९९ ॥ यासाठीं करितों निष्ठुर भाषण । आहेसी तूं जाण सर्वदाता ॥ धृ० ॥ ऐसें दुःख कोण आहे निवारिता । तों मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ १ ॥ बैसलासी केणें करूनि एक घरीं । नाहीं येथें उरी दुसऱ्याची ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें अवघें पायांपें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ३ ॥

॥ ४२०० ॥ पोरा लागलीसे चट । धरी वाट देवळाची ॥ धृ० ॥ सांगितलें नेघे कानीं । तुझें मनीं विठ्ठल ॥ १ ॥ काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित्त ॥ २ ॥ आमुचे कुळीं नव्हतें ऐसें । हेंचि पिसें निवडलें ॥ ३ ॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ४ ॥ तुका ह्मणे नरका जाणें । या या वचनें दुष्टाचे ॥ ५ ॥

॥ ४२०१ ॥ देवा बोलें आतां बोला । त्वां कां धरिला अबोला ॥ धृ० ॥ भेऊं नको देई भेटी । तूं कां पडिलासी संकटीं ॥ १ ॥ तुझ्या जीवींचें मी जाणें । ह्मणसी मुक्ति आह्मां देणें ॥ २ ॥ तुका ह्मणे न लगे कांहीं । चित्त राहो तुझे पायीं ॥ ३ ॥

॥ ४२०२ ॥ यमधर्म आणिक ब्रह्मादिक देव । त्यांचा पूर्ण भाव तुझे पायीं ॥ धृ० ॥ करिती स्मरण पार्वतीशंकर । तेथें मी किंकर कोणीकडे ॥ १ ॥ सहस्रमुखेंसी घोष फणिवराचा । मज किंकराचा पाड काय ॥ २ ॥ चंद्र सूर्य आणि सर्व तारांगणें । करिती भ्रमण प्रदक्षिणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांसी स्वरूप कळेना । तेथें मज दीना कोण पुसे ॥ ४ ॥

॥ ४२०३ ॥ विठोबाचे पायीं जीव म्यां ठेविला । भक्तिभावें केला देव ऋणी ॥ धृ० ॥ देव माझा ऋणी आहे सहाकारी । परस्परें वारी भवभय ॥ १ ॥ भवभयडोहीं बुडों नेदी पाहीं । धरूनियां बाहीं तारी मज ॥ २ ॥ तारियेलें दास पडिल्या संकटीं । विष केलें पोटीं अमृतमय ॥ ३ ॥ अमृतातें सेवीतसे नामरसा । तोडियेला फांसा बंधनाचा ॥ ४ ॥ बंधनाचा फांसा आह्मीं कांहीं नेणों । पाय तुझे जाणों पद्मनाभा ॥ ५ ॥ पद्मनाभा नाभिकमळीं ब्रह्मादिक । त्रैलोक्यनायक ह्मणविसी ॥ ६ ॥ ह्मणविसी देवा दासाचा अंकित । मनाचा संकेत पाहोनियां ॥ ७ ॥ पाहोनियां दृढ निश्चय तयाचा । तोंचि दास साचा जवळीक ॥ ८ ॥ जवळीक जाली ब्रह्मीं सुखावले । मार्ग दाखविले मूढ जनां ॥ ९ ॥ मूढ जनामाजी दास तुझा मूढ । कास तुझी दृढ धरियेली ॥ १० ॥ धरियेले तुझे पाय रे विठ्ठला । तुका सुखी जाला तुझ्या नामें ॥ ११ ॥

॥ ४२०४ ॥ बहु क्लेशी जालों या हो नरदेहीं । कृपादृष्टी पाहीं पांडुरंगा ॥ धृ० ॥ पांडुरंगा सर्वदेवांचिया देवा । द्यावी माझी सेवा दीनानाथा ॥ १ ॥ दीनानाथ ब्रीद त्रिभुवनीं तुझें । मायबापा ओझें उतरावें ॥ २ ॥ उतरीं सत्वर पैलथडी नेईं । पूर्णसुख देईं पायांपाशीं ॥ ३ ॥ पायांपाशीं मज ठेवीं निरंतर । आशा तुझी फार दिवस केली ॥ ४ ॥ केली आस तुझी वाट मीं पाहातों । निशिदिनीं ध्यातों नाम तुझें ॥ ५ ॥ नाम तुझें गोड स्वभक्ता आवडे । भक्तांलागीं कडे खांदा घेसी ॥ ६ ॥ घेसी खांद्यावरी खेळविसी लोभें । पाउल

तें शोभे विटेवरी ॥ ७ ॥ विटेवरि उभा देखिलासी डोळां । मनाचा सोहळा पुरविसी ॥ ८॥ पुरवीं सत्वर त्रैलोक्यस्वामिया । मिठी घाली पायां तुका भावें ॥ ९ ॥

॥ ४२०५ ॥ एक वेळे तरी जाईन माहेरा । बहुजन्म फेरा जाल्यावरी ॥ धृ० ॥ चित्ता हे बैसली अविट आवडी । पालट ती घडी नेघे एकी ॥ १ ॥ करावें तें करी कारणशरीर । अंतरीं त्या धीर जीवनाचा ॥ २ ॥ तुका ह्मणे तरी होइल विलंब । परि माझा लाभ खरा जाला ॥ ३ ॥

॥ ४२०६ ॥ सांग त्वां कोणासी तारिलें । संतांवेगळें उद्धरिलें ॥ धृ० ॥ संत शब्द उपदेशी । मग तूं हो ह्मणशी ॥ १ ॥ तुका ह्मणे नाहीं तुझा उपकार । करूं संतांचा उच्चार ॥ २ ॥

॥ ४२०७ ॥ उभा रमा एकी सरी । वाराणसी ते पंढरी ॥धृ०॥ दोघे सारिखे सारिखे । विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ १ ॥ तेथें असे भागीरथी । येथें जाणा भीमरथी ॥ २ ॥ वाराणशी त्रिशुलावरी । सुदर्शनावरि पंढरी ॥ ३ ॥ मनकर्णिका मनोहर । चंद्रभागा सरोवर ॥ ४॥ वाराणशी भैरवकाळ । पुंडलिक क्षेत्रपाळ ॥ ५ ॥ धुंडिराज दंडपाणी । उभा गरुड कर जोडुनी ॥ ६ ॥ गया तेंचि गोपाळपुर । प्रयाग निरानरसिंहपुर ॥ ७ ॥ तेथें असती बयावळ । येथें गाई आणि गोपाळ ॥ ८ ॥ शमीपत्रपिंड देती । येथें काला निजसुख-प्राप्ती ॥ ९ ॥ संतसज्जनीं केला काला । तुका प्रसाद लाधला ॥ १० ॥

॥ ४२०८ ॥ फव्याचें बडबडे चवी ना सवाद । आपुलाचि वाद आपणींसी ॥ धृ० ॥ कोणें या शब्दाचे मरावें घसणी । अंतरें शाहाणीं राहिजे हो ॥ १ ॥ गाढवाचा भुंक आइकतां कानीं । काय कोडवाणी ऐसियेचें ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यासी करावें वचन । त्याचे येती गुण अंगास ते ॥ ३ ॥

॥ ४२०९ ॥ दिवसा व्यापारचावटी । रात्री कुटुंबचिंता मोठी ॥ धृ० ॥ काय करूं या मनासी । नाठवे कां हृषीकेशी ॥ १ ॥ वेश्येपाशीं रात्रीं जागे । हरिकीर्त्तनीं निद्रा लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जालासी । वृथा संसारा आलासी ॥ ३ ॥

॥ ४२१० ॥ अहो कृपावंता । होईं बुद्धीचा ये दाता ॥ धृ० ॥ जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पायीं थार ॥ १ ॥ वदवी हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझें अंतर वसवा ॥ ३ ॥

॥ ४२११ ॥ निंदक तो परउपकारी । काय वर्णूं त्याची थोरी । जो रजकाहुनि भला परी । सर्व गुणें आगळा ॥ धृ० ॥ नेघे मोल धुतो फुका । पाप वरच्यावरि देखा । करी-तसे साधका । शुद्ध सरते तिहीं लोकीं ॥ १ ॥ मुखसंवदणी सांगाते । अवघें सांठविलें तेथें । जिव्हा साबण निरुतें । दोष काढी जन्माचे ॥ २ ॥ तया ठाव यमपुरीं । वास करणें अघोरीं । त्यासी दंडण करी । तुका ह्मणे न्हाणी ते ॥ ३ ॥

॥ ४२१२ ॥ विद्या अल्प परि गर्वशिरोमणी । मजहुनी ज्ञानी कोण आहे ॥ धृ० ॥ अंगीं भरला ताठा कोणातें मानिना । साधूची छळणा स्वयें करी ॥ १ ॥ साधूचे देहाचा मानी जो विटाळ । त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ॥ २ ॥ संतांची जो निंदा करी मुखें

जपे । खतेला सकळ पापें तोचि एक ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे मा
गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

॥ ४२१३ ॥ प्रपंचाची पीडा सोसिती अघोरी । जया क्षणभर
नाम नाठविती आत्मया रामाचें । धिग जिणें त्याचें भवा मूळ ॥
आचरण तयाचें । नाहीं राघवाचें स्मरण त्या ॥ २ ॥ स्मरण भ
आंदणीया दासी यमदूतां ॥ ३ ॥ चिंतन रामाचें न करी तो दोष
बोलों नये ॥ ४ ॥ नये त्याचा संग धरूं ह्मणे तुका । धरितां पातका

॥ ४२१४ ॥ अर्थेंविण पाठांतर कासया करावें । व्यर्थचि मरावें
घोकूनियां काय वेगीं अर्थ पाहे । अर्थरूप राहे होऊनियां ॥ १ ॥
अर्थीं आहे भेटी । नाहीं तरी गोष्टी बोलों नका ॥ २ ॥

॥ ४२१५ ॥ बसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धी । देखतांचि चिध
व्यभिचाऱ्यापासीं बैसतां क्षणभरी । देखतांचि नारी मन धांवे ॥ १
टाकूनियां गोवा । धरावें केशवा हृदयांत ॥ २ ॥ सांडूनियां देई संसा
नाची गोडी धरावी गा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुला सांगतों मी एक । रु
गावा ॥ ४ ॥

॥ ४२१६ ॥ मस्तकीं सहावें टांकियासी जाण । तेव्हां देवपण भे
आपुलिये स्तुति निंदा अथवा मान । टाकावा थुंकोन पैलीकडे ॥ १
अमृतपान । करुनी प्राशन बैसावें गा ॥ २ ॥ आपुल्या मस्तकीं पडोत
माहेर टाकूं नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां सांगूं तुला किती । जिण्या
नये ॥ ४ ॥

॥ ४२१७ ॥ स्वामिसेवा गोड । माते बाळकाचें कोड ॥ धृ० ॥ जें
तें तें पुरवी कौतुकें ॥ १ ॥ खेळविलें कोडें । हरुषें बोले कीं बोबडें ॥
लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ३ ॥

॥ ४२१८ ॥ तुझें नाम पंढरिनाथा । भावेंविण नये हाता ॥ धृ० ।
नये । पंनासां साटां नये ॥ १ ॥ शांनये सहस्रा नये । लक्षकोडीलागीं न
ह्मणे पंढरिनाथा । भावेंविण नये हाता ॥ ३ ॥

॥ ४२१९ ॥ संतांपायीं विन्मुख जाला । तो जरि संगति मागों आ
त्याहूनि दुरी जावें । सुखें एकांतीं बैसावें ॥ १ ॥ आत्मचर्चा नाहीं जेथें
यावी तेथें ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ३ ॥

॥ ४२२० ॥ हिरा ठेवितां काळें गाहाण । मोल न तुटे दुकाळीं जा
संतजन पाहीं । विनटले श्रीहरिपायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे भक्त ।
निंदित ॥ ३ ॥

॥ ४२२१ ॥ परिसें गे सुनेबाई । नको वेचूं दूध दहीं ॥ धृ० ॥ आवा च
वेसीपासुनी आली घरा ॥ १ ॥ ऐकें गोष्टी सादर बाळे । करीं जतन फुट

माझे हातींचा कलवडू । मजवांचुनी नको फोडूं ॥ ३ ॥ वळवटक्षिरीचें लिंपन । नको फोडूं मजवांचून ॥ ४ ॥ उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥ ५ ॥ भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥ ६ ॥ भक्षीं परिमित आहारू । नको फारसी वरो सारू ॥ ७ ॥ सून ह्मणे बहुत निकें । तुह्मी यात्रेसि जावें सुखें ॥ ८ ॥ सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥ ९ ॥ सुनमुखीचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ॥ १० ॥ सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ॥ ११ ॥ आतां कासया यात्रे जाऊं । काय जाऊनि तेथें पाहूं ॥ १२ ॥ मुलें लेंकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपुर ॥ १३ ॥ तुका ह्मणे ऐसें जन । गोवियेलें मायें करून ॥ १४ ॥

॥ ४२२२ ॥ एक ते गाढव मनुष्याचे वेष । हालविती पुस पुढें दाढी ॥ धृ० ॥ निंदा हें भोजन जेवण तयांसी । जोडी घरीं रासी पातकांच्या ॥ १ ॥ तुका ह्मणे सुखें बैसोनियां खाती । कुंभपाकीं होती नर्कवासी ॥ २ ॥

॥ ४२२३ ॥ मागत्याची टाळाटाळी । झिझ्या वोढूनि कपाळीं ॥ धृ० ॥ ऐसा तंव मोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥ १ ॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥ २ ॥ तुका ह्मणे जाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ३ ॥

॥ ४२२४ ॥ संसार करिती मोठ्या महत्त्वानें । दिसे लोकां उणें न कळे त्यां ॥ धृ० ॥ पावित्रपण आपुले घरच्यासीच दिसे । बाहेर उदास निंदिताती ॥ १ ॥ आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलाचे दोषगुण वाखाणिती ॥ २ ॥ विषयाचे ध्यासें जग बांधियेलें । ह्मणोनी लागले जन्ममृत्यू ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें संचितचि असे । देवाजीचें पिसें सहजगुण ॥ ४ ॥

॥ ४२२५ ॥ गव्हराचें ज्ञान अवघा रजोगुण । सुखवासी होऊन विषय भोगी ॥ धृ० ॥ त्यासी जरी ज्ञानउपदेश केला । संगेंविण त्याला राहावेना ॥ १ ॥ तुका ह्मणे संग उत्तम असावा । याविण उपावा काय सांगों ॥ २ ॥

॥ ४२२६ ॥ भाग्यालागीं लांचावले । देवधर्म ते राहिले ॥ धृ० ॥ कथे जातां अळसे मन । प्रपंचाचें मोठें ज्ञान ॥ १ ॥ अखंडप्रीति जाया । नेणें भजनाच्या ठाया ॥ २ ॥ कथाकीर्त्तन धनाचें । सर्वकाळ विषयीं नाचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरिराया । ऐसे जन्मविले वांया ॥ ४ ॥

॥ ४२२७ ॥ पतिव्रतेची कीर्ति वाखाणितां । सिंदळीच्या माथां तिडिक उठे ॥ धृ० ॥ आमुचें तें आहे सहज बोलणें । नाहीं विचारून केलें कोणीं ॥ १ ॥ अंगें उणें त्याच्या बैसे टाळक्यांत । तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी काय करणें त्यासी । ढका खवंदासी लागतसे ॥ ३ ॥

॥ ४२२८ ॥ आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥ धृ० ॥ आवडी आवडी कळिवराकळिवरी । वरिली अंतरीं ताळी पडे ॥ १ ॥ अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी । रडूं मागे तुटी हर्षयोगें ॥ २ ॥ तुका ह्मणे एकें कळतें दुसरें । बरियाचें बरें आहाचाचें आहाच ॥ ३ ॥

॥ ४२२९ ॥ हेंचि माझें चित्तीं । राहो भावप्रीती । विठ्ठल सुषुप्ती । जागृति स्वप्नासी ॥ धृ० ॥ आणिक नाहीं तुज मागणें । राज्यचाड संपत्ति धन । जिव्हे सुख तेणें । घेतां देहीं नाम तुझें ॥ १ ॥ तुझें रूप सर्वांठायीं । देखें ऐसें प्रेम देई । न ठेवावा ठायीं । अनुभव चित्ताचा ॥ २ ॥ जन्ममरणाचा बाध । समूळनि तुटे कंद । लागो हाचि छंद । हरि गोविंद वाचेसी ॥ ३ ॥ काया पालटे दरुषणें । अवघें कोंदाटे चैतन्य । जीवशिवा खंडण । होय तरे चिंतितां ॥ ४ ॥ तुका ह्मणे याचि भावें । आह्मी धालों तुझ्या नांवें । सुखें होत जन्में । भलते याती भलतैसीं ॥ ५ ॥

॥ ४२३० ॥ मौन कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देई माझ्या ॥ धृ० ॥ तूं माझें संचित तूंचि पूर्वपुण्य । तूं माझें प्राचीन पांडुरंगा ॥ १ ॥ तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म । तूंचि नित्यनेम नारायणा ॥ २ ॥ कृपावचनाची वाट पाहातसें । करुणा वोरसें बोल कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । बोल सर्वोत्तमा मजसवें ॥ ४ ॥

॥ ४२३१ ॥ काय करूं आतां धरूनियां भीड । निःशंक हें तोंड वाजविलें ॥ धृ० ॥ नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण । सार्थक लाजोनी नव्हे हित ॥ १ ॥ आलें तें उत्तर बोलें स्वामीसवें । धीट नीट जीवें होऊनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे मना समर्थासीं गांठी । घालावी हे मांडी थापटूनी ॥ ३ ॥

॥ ४२३२ ॥ माझिया तों जीवें घेतला हा सोस । पाहें तुझी वास भेटावया ॥ धृ० ॥ मातेविण बाळ न मनी आणिका । सर्वकाळ धोका स्तनपाना ॥ १ ॥ बोसंगा निघाल्या वांचूनि न राहे । त्याचें आर्त माय पुरवीते ॥ २ ॥ तुका ह्मणे माते भक्तां तूं कृपाळ । गिळियेले जाळ वनांतरीं ॥ ३ ॥

॥ ४२३३ ॥ ते काय पवाडे नाहीं म्यां ऐकिले । गोपाळ रक्षिले वनांतरीं ॥ धृ० ॥ मावेचा वोणवा होऊनि राक्षस । लागला वनास चहूंकडे ॥ १ ॥ गगनासी ज्वाला लागती तुंबळ । गोधनें गोपाळ वेडावलीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें पळावया वाट । नाहीं बा निपट ऐसें जालें ॥ ३ ॥

॥ ४२३४ ॥ धडकला अग्नि आह्मा येती वरी । गोपाळ श्रीहरि विनविती ॥ धृ० ॥ अरे कृष्णा काय विचार करावा । आलारे वोणवा जळों आतां ॥ १ ॥ अरे कृष्णा तुझें नाम बळिवंत । होय कृपावंत राख आतां ॥ २ ॥ तुका ह्मणे अरे कृष्णा नारायणा । गोपाळ करुणा भाकितिले ॥ ३ ॥

॥ ४२३५ ॥ अरे कृष्णा आह्मी तुझे निज गडी । नवनीत आवडी देत होतों ॥ धृ० ॥ अरे कृष्णा आतां राखें कैसें तरी । संकटाभीतरीं पडियेलों ॥ १ ॥ वरुषला इंद्र जेव्हां शिळाधारीं । गोवर्धन गिरि उचलिला ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझे पवाडे गोपाळ । वर्णिती सकळ नारायणा ॥ ३ ॥

॥ ४२३६ ॥ अरे कृष्णा तुवां काळया नाथिला । दाढे रगडिला रिठासुर ॥ धृ० ॥ अरे कृष्णा तुवां पूतना शोषिली । दुर्बुद्धि कळली अंतरींची ॥ १ ॥ गोपाळ करुणा ऐसी

नानापरी । भाकिती श्रीहरि तुजपुढें ॥ २ ॥ तुझें नाम कामधेनु करुणेची । तुका ह्मणे त्यांची आली कृपा ॥ ३ ॥

॥ ४२३७ ॥ चहुंकडूनियां येती ते कल्लोळ । सभोंवते जाळ जवळि आले ॥ धृ० ॥ सकुमार मूर्ति श्रीकृष्ण धाकुटी । घोंगडी आणि काठी खांद्यावरी ॥ १ ॥ लहान लेंकरूं होतें तें सगुण । विक्राळ वदन पसरिलें ॥ २ ॥ चाभाड तें एक गगनीं लागलें । एक तें ठेविलें भूमिवरी ॥ ३ ॥ तये वेळे अवघे गोपाळही भ्याले । तुकेंही लपालें भेऊनियां ॥ ४ ॥

॥ ४२३८ ॥ श्रीमुख वोणवा गिळीत चालिलें । भ्यासुर वासिलें वदनांबुज ॥ धृ० ॥ विक्राळ त्या दाढा भ्यानें पाहावेना । धाउनी रसना ज्वाळ गिळी ॥ १ ॥ जिव्हा लांब धांवे गोळा करी ज्वाळ । मोठें मुखकमळ त्यांत घाली ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघा वोणवा गीळिला । आनंद जाहला गोपाळांसी ॥ ३ ॥

॥ ४२३९ ॥ गोपाळ प्रीतीनें कैसे विनविती । विक्राळ श्रीपति होऊं नको ॥ धृ० ॥ नको रे बा कृष्णा धरूं ऐसें रूप । आह्मां चळकांप सुटलासे ॥ १ ॥ होईं बा धाकुटा शाम चतुर्भुज । बैसोनियां गुज सुखें बोलों ॥ २ ॥ वोणव्याच्या रागें गिळिशील आह्मा । तुका मेघश्यामा पायां लागे ॥ ३ ॥

॥ ४२४० ॥ सांडियेलें रूप विक्राळ भ्यासुर । झालें सकुमार कोडिसवाणें ॥ धृ० ॥ शाम चतुर्भुज मुकुट कुंडलें । सुंदर दंडलें नव बाळ ॥ १ ॥ गोपाळ ह्मणती कैसें रे बा कृष्णा । रूप नारायणा धरियेलें ॥ २ ॥ कैसा वाढलासी विक्राळ जालासी । गटगटा ज्वाळांसी गिळियेलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें पुसती गोपाळ । अनाथवत्सल ह्मणोनियां ॥ ४ ॥

॥ ४२४१ ॥ बा रे कृष्णा तुझें मुख कीं कोमळ । कैसे येवढे ज्वाळ ग्रासियेले ॥ धृ० ॥ बा रे कृष्णा तुझी जिव्हा कीं कोवळी । होईल पोळली नारायणा ॥ १ ॥ बैसें कृष्णा तुझें पाहूं मुखकमळ । असेल पोळलें कोणे ठायीं ॥ २ ॥ घोंगडिया खालीं घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें आकळिला देव । कृपासिंधुराव त्रैलोक्याचा ॥ ४ ॥

॥ ४२४२ ॥ एक ह्मणती मुख वासीं नारायणा । पाहों दे वदना डोळेभरी ॥ धृ० ॥ वासूनियां मुख पहाती सकळ । अवघे गोपाळ व्योमाकार ॥ १ ॥ ह्मणती गोपाळ बेटे हा हा देव । स्वरूपाचा ठाव न कळे याच्या ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे विठोबाभोंवते । मिळाले नेणते लहानथोर ॥ ३ ॥

॥ ४२४३ ॥ एक ह्मणती कृष्णा वासिलें त्वां मुख । तेव्हां थोर धाक पडिला आह्मां ॥ धृ० ॥ गिळों लागलासी अग्नीचे कल्लोळ । आह्मी चळचळ कांपतसों ॥ १ ॥ ज्वाळांबरोबरि गिळशील आह्मां । ऐसें मेघश्यामा भय वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे भाग्याचे गोपाळ । फुटकें कपाळ आमुचेंची ॥ ३ ॥

॥ ४२४४ ॥ गोपाळाचें कैसें केलें समाधान । देऊनि आलिंगन निववीले ॥ धृ० ॥ ज्वाळांबरोबरि तुह्मां कां ग्रासीन । अवतार घेणें तुह्मांसाठीं ॥ १ ॥ निर्गुण निर्भय मी

सर्वांनिराळा । प्रकृति वेगळा गुणातीत ॥ २ ॥ चिन्मय चिद्रूप अवघें चिदाकार । तुका ह्मणे पार नेणें ब्रह्मा ॥ ३ ॥

॥ ४२४५ ॥ ऐसा मी अपार पार नाहीं अंत । परि कृपावंत भाविकांचा ॥ धृ० ॥ दुर्जना चांडाळां करीं निर्दाळण । करीं संक्षरण अंकिताचें ॥ १ ॥ भक्त माझे सखे जिवलग सांगाती । सर्वांग त्यांप्रती वोडवीन ॥ २ ॥ पीतांबरछाया करीन त्यांवरी । सदा त्यांचे घरीं द्वारीं उभा ॥ ३ ॥ माझे भक्त मज सदा जे रातले । त्यां घरीं घेतलें धरणें म्यां ॥ ४ ॥ कोठें हें वचन ठेविलें ये वेळे । तुका ह्मणे डोळे झांकियेले ॥ ५ ॥

॥ ४२४६ ॥ भ्रतारेंसी भार्या बोले गुज गोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥ धृ० ॥ अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ॥ १ ॥ जोडितसां तुह्मी खाती इरेंचोरें । माझीं तंव पोरें हळहळीती ॥ २ ॥ तुमची व्याली माझे डाई हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥ ३ ॥ दुष्टवृत्ति नंदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्या सुखें ॥ ४ ॥ भावा दीर कांहीं धड हा न बोले । नांदों कोणा खालें कैसी आतां ॥ ५ ॥ माझ्या अंगसंगें तुह्मांसी विश्रांती । मग धडगति नाहीं तुमची ॥ ६ ॥ ठाकतें ठमकतें जीव मुठी धरुनी । परि तुह्मी अजुनी न धरी लाज ॥ ७ ॥ वेगळे निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥ ८ ॥ तुका ह्मणे जाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसा वर्ते ॥ ९ ॥

॥ ४२४७ ॥ कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित्त निरंतर ॥ धृ० ॥ माझीं मायबापें बंधु हो बहिण । तुज करीं सीण त्यागीन मी ॥ १ ॥ त्यांचें जरि तोंड पाहेन मागुता । तरि मज हत्या घडो तुझी ॥ २ ॥ सकाळ उठोन वेगळा निघेन । वाहातों तुझी आण निश्चयेंसी ॥ ३ ॥ वेगळें निघतां घडीन दोरे चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥ ४ ॥ ताईत सांकळी गळांचि दुलडी । बाजुबंदजोडी हातसर ॥ ५ ॥ वेणीचे जे नग सर्वही करीन । नको धरूं सीण मनीं कांहीं ॥ ६ ॥ नेसावया सांडी सेलारी चुनडी । अंगींची कांचोळी जाळिया फुलें ॥ ७ ॥ तुका ह्मणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥ ८ ॥

॥ ४२४८ ॥ उजळितां उजळे दीपकाची वाती । स्वयंभ ते ज्योति हिऱ्या अंगीं ॥ धृ० ॥ एकीं महाकष्टें मेळविलें धन । एकासी जतन दैवयोगें ॥ १ ॥ परिमळें केलें चंदनाचें चिन्ह । निवडी ते भिन्न गाढव तो ॥ २ ॥ तुका ह्मणे जया अंगीं हरिठसा । तो तरे सहसा वंद्य होय ॥ ३ ॥

॥ ४२४९ ॥ बारावर्षें बाळपण । तेंही वेचलें अज्ञानें ॥ धृ० ॥ ऐसा जन्म गेला वांया । न भजतां पंढरिराया ॥ १ ॥ बाकी उरलीं आठ्यायशीं । तीस वेचलीं कामासी ॥ २ ॥ बाकी उरली आठावन्न । तीस वेचलीं ममतेनें ॥ ३ ॥ बाकी उरली आठावीस । देहगेह विसरलास ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसा झाडा । संसार हा आहे थोडा ॥ ५ ॥

॥ ४२५० ॥ सोवळा तो जाला । अंगिकार देवें केला ॥ धृ० ॥ येर करिती भोजन ।

पोट पोसाया दुर्जन ॥ १ ॥ चुकला हा भार । तयाचीच येरझार ॥ २ ॥ तुका ह्मणे दास । जाला तया नाहीं नास ॥ ३ ॥

॥ ४२५१ ॥ आजि शिवला मांग । माझें विटाळलें आंग ॥ धृ० ॥ यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठलविठ्ठल हृदयांत ॥ १ ॥ जाली क्रोधासी भेटी । तोंडावाटे नर्क लोटी ॥ २ ॥ अनुतापीं न्हाऊं । तुका ह्मणे रवि पाहूं ॥ ३ ॥

॥ ४२५२ ॥ ठाव तुह्मांपाशीं । जाला आतां हृषीकेशी ॥ धृ० ॥ न लगे जागावें सतत । येथें स्वभावें हे नीत ॥ १ ॥ चोऱ्यासी थारा । येथें कैंचा जी दातारा ॥ २ ॥ तुका ह्मणे मनें । आतां जालें समाधान ॥ ३ ॥

॥ ४२५३ ॥ पाळियेले लळे । माझे विठ्ठलें कृपाळें ॥ धृ० ॥ बहुजन्माचें पोषणें । सरतें पायांपाशीं तेणें ॥ १ ॥ सवे दिली लागों । भातें आवडीचें मागों ॥ २ ॥ तुका ह्मणे भिन्न । नाहीं दिसों दिलें क्षण ॥ ३ ॥

॥ ४२५४ ॥ जो या गेला पंढरपुरा । आणिक यात्रा न मनी तो ॥ धृ० ॥ सुलभ माय पंढरिराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ॥ १ ॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी । वारी त्यासी पंढरी ॥ २ ॥ बाहेर येतां प्राण फुटे । रडें दाटे गहिवरें ॥ ३ ॥ दधिमंगळभोजन सारा । ह्मणती करा मुरडींव ॥ ४ ॥ मागुता हा पाहों ठाव । पंढरिराव दर्शनें ॥ ५ ॥ तुका ह्मणे भूवैकुंठ । वाळुवंट भींवरा ॥ ६ ॥

॥ ४२५५ ॥ न मिळती एकाएक । जये नगरीचे लोक ॥ धृ० ॥ भलीं तेथें राहूं नये । क्षणें होईल न कळे काय ॥ १ ॥ न करितां अन्याय । बळें करिती अपाय ॥ २ ॥ नाहीं धुराणाची प्रीती । ठायींठायीं पंचाइती ॥ ३ ॥ भल्या बुऱ्या मारी । होतां कोणी न निवारी ॥ ४ ॥ अविचाऱ्या हातीं । देउनी प्रजा नागविती ॥ ५ ॥ तुका ह्मणे दरी । सुखें सेवावी ते बरी ॥ ६ ॥

॥ ४२५६ ॥ शिकवणें नाक झाडी । पुढील जोडी कळेना ॥ धृ० ॥ निरयगांवीं भोग देता । तेथें सत्ता आणिकांची ॥ १ ॥ अवगुणांचा सांटा करी । तेचि धरी जीवासी ॥ २ ॥ तुका ह्मणे जडबुद्धी । कर्मशुद्धि सांडवी ॥ ३ ॥

॥ ४२५७ ॥ गोपीचंदन मुद्रा धरणें । आह्मां लेणें वैष्णवां ॥ धृ० ॥ मिरवूं अळंकार लेणें । हीं भूषणें स्वामीचीं ॥ १ ॥ विकलों ते सेवा जीवें । एक्या भावें एकविध ॥ २ ॥ तुका ह्मणे शूर जालों । बाहेर आलों संसारा ॥ ३ ॥

॥ ४२५८ ॥ विषयांचें लोलिंगत । ते फजीत होतील ॥ धृ० ॥ न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळबीज व्हावें ॥ १ ॥ शिखासूत्र सोंग वरी । दुराचारी दंड पावे ॥ २ ॥ तुका ह्मणे अभिमाना । नारायणा न सोसे ॥ ३ ॥

॥ ४२५९ ॥ वडिलें दिलें भूमिदान । तें जो मागे अभिलासून ॥ धृ० ॥ अग्रपूजेचा अधिकारी । श्रेष्ठ दंड यमा घरीं ॥ १ ॥ उभयकुल समवेत । नर्कीं प्रवेश अद्भुत ॥ २ ॥ तप्त लोहें भेटी । तुका ह्मणे कल्पकोटी ॥ ३ ॥

॥ ४२६० ॥ लटिकी ग्वाही सभेआंत । देतां पतित आगळा ॥ धृ० ॥ कुंभपाकीं

वस्ती करूं । होय धुरु कुळेसी ॥ १ ॥ रजस्वला रुधिर स्रवे । तेंचि घ्यावें तृषेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे जन्मा आला । काळ जाला कुळासी ॥ ३ ॥

॥ ४२६१ ॥ आचरें दोष न धरी धाक । परिपाक दुःखाचा ॥ धृ० ॥ चांडाळ तो दुराचारी । अंगिकारी कोण त्या ॥ १ ॥ नव्हे संतान वोस घर । अंधकार कुळासी ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें दान । घेतां पतन दुःखासी ॥ ३ ॥

॥ ४२६२ ॥ कींविलवाणा जाला आतां । दोष करितां न विचारी ॥ धृ० ॥ अभिलाषी नारी धन । झकवी जन लटिकेची ॥ १ ॥ विश्वासिया करी घात । न धरी चित्त कांटाळा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं आला । वृथा गेला जन्मासी ॥ ३ ॥

॥ ४२६३ ॥ घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिलाषीं ॥ धृ० ॥ तोही येथें कामा नये । नर्का जाय ह्मणोनी ॥ १ ॥ विकी स्नानसंध्या जप । करी तप पुढिलांचें ॥ २ ॥ तुका ह्मणे दांभिक तो । नर्का जातो स्वइच्छा ॥ ३ ॥

॥ ४२६४ ॥ सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ धृ० ॥ सर्वसुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुलतसों ॥ १ ॥ असों ऐसा कोठें आठवही नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी झालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य आतां ॥ ३ ॥

॥ ४२६५ ॥ वरिवरि बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्या भेटी नाहीं जाली ॥ धृ० ॥ पराव्याचे भार पाहूनियां दृष्टी । कांपतसे पोटीं थरथरां ॥ १ ॥ मनाचा उदार रायाचा जुंझार । फिरंगीचा मार मारीतसे ॥ २ ॥ धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ॥ ३ ॥ तुका ह्मणे साधु बोले खरगधार । खोंचतें अंतर दुर्जनाचें ॥ ४ ॥

॥ ४२६६ ॥ गंधर्वनगरीं क्षण एक राहावें । तेंचि पैं करावें मूळक्षेत्र ॥ धृ० ॥ खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥ १ ॥ वंध्यापुत्राचा लग्नाचा सोहळा । आपुलिया डोळां पाहों वेगीं ॥ २ ॥ मृगजळा पोहीं घालूनि सज्ञाना । तापलिया जना निववावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मिथ्या देहेंद्रियकर्म । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥ ४ ॥

॥ ४२६७ ॥ तुझा ह्मणविलों दास । केली उच्छिष्टाची आस ॥ धृ० ॥ मुखीं घालावा कवळ । जरी तूं होशील कृपाळ ॥ १ ॥ सीण भाग माझा पुसें । तुका ह्मणे न करीं हांसें ॥ २ ॥

॥ ४२६८ ॥ काय मागें आह्मी गुंतलों काशानीं । पुढें वाहों मनीं धाक देवा ॥ धृ० ॥ कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे । भेटोनियां काय द्यावें आह्मां ॥ १ ॥ घेउनी धरणें बैसती उपवासी । हट आह्मांपासीं नाहीं तैसा ॥ २ ॥ तातडी तयांनीं केली विटंबणा । आह्मां नारायणा काय उणें ॥ ३ ॥ नाहीं मुक्तिचाड वास वैकुंठींचा । जीव भाव आमुचा देऊं तुज ॥ ४ ॥ तुका ह्मणे काय मानेल तें आतां । तूं घेई अनंता सर्व माझें ॥ ५ ॥

॥ ४२६९ ॥ जालों बळिवंत । होऊनियां शरणागत ॥ धृ० ॥ केला घरांत रिघावा । ठायीं पाडियेला ठेवा ॥ १ ॥ हाता चढे धन । ऐसें रचलें कारण ॥ २ ॥ तुका ह्मणे मिठी पायीं देऊनि केली लुटी ॥ ३ ॥

॥ ४२७० ॥ दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्का द्वारीं ॥ धृ० ॥ ऐसे सांगों जातां जना । नये कोणाचिया मना ॥ १ ॥ बरें विचारुनी पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥ २ ॥ तुका ह्मणे रांडलेंका । अंतीं जासिल यमलोका ॥ ३ ॥

॥ ४२७१ ॥ गुळ सांडूनि गोडी घ्यावी । मीठ सांडूनि चवि चाखावी ॥ धृ० ॥ ऐसा प्रपंच सांडूनि द्यावा । मग परमार्थ जोडावा ॥ १ ॥ साकरेचा नव्हे ऊस । आह्मां कैंचा गर्भवास ॥ २ ॥ बीज भाजूनि केली लाही । जन्ममरण आह्मां नाहीं ॥ ३ ॥ आकाशासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष जाला वाव ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघें जग । सर्वां घटीं पांडुरंग ॥ ५ ॥

॥ ४२७२ ॥ आमुचें दंडवत पायांवरि डोई । व्हावें उतराई ठेवूनियां ॥ धृ० ॥ करालतें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडिया ॥ १ ॥ तुका ह्मणे आह्मी लडिवाळें अनाथें । ह्मणोनि दीनानाथें सांभाळावें ॥ २ ॥

॥ ४२७३ ॥ भाग्यवंत आह्मी विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ धृ० ॥ नाहीं तें पुरवीत आणूनि जवळी । गाउनी माउली गीत सुखें ॥ १ ॥ प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । वोळली सकळ सुखें ठायीं ॥ २ ॥ आपुल्या स्वभावें जैसे जेथें असों । तैसे तेथें दिसों साजिरेची ॥ ३ ॥ वासनेचा कंद उपडिलें मूळ । दुरितें सकळ निवारिलीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे भक्तजनाची माउली । करील साउली विठ्ठल आह्मा ॥ ५ ॥

॥ ४२७४ ॥ तीर्थें फळती काळें जन्में आगळिया । संतदृष्टि पाया हेळामात्रें ॥ धृ० ॥ सुखाचे सुगम वैष्णवांचे पाय । अंतरींचा जाय महाभेव ॥ १ ॥ काळेंहि न सरे तपें समाधान । कथे मूढजन समाधिस्थ ॥ २ ॥ उपमा द्यावया सांगतां आणिक । नाहीं तिन्ही लोक धुंडाळितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी राहिलों येणें सुखें । संतसंगें दुःखें नासावया ॥ ४ ॥

॥ ४२७५ ॥ संतजना माझी यावया करुणा । ह्मणउनी दीन हीन जालों ॥ धृ० ॥ नेणें योग युक्ति नाहीं ज्ञान मती । गातसें या गीती पांडुरंगा ॥ १ ॥ भाव भक्ति नेणें तप अनुष्ठान । करितों कीर्त्तन विठ्ठलाचें ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान ध्यान न कळे धारणा । एका नारायणा वांचूनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा विठोबासी भार । जाणे हा विचार तोचि माझा ॥ ४ ॥

॥ ४२७६ ॥ ऐसें काय उणें जालें तुज देवा । भावेंविण सेवा घेसी माझी ॥ धृ० ॥ काय मज द्यावा न लगे मुशारा । पहावें दातारा विचारुनी ॥ १ ॥ करितों पाखांडें जोडूनि अक्षरें । नव्हे ज्ञान खरें भक्तिरस ॥ २ ॥ गुणवाद तुझे न बोलवे वाणी । आणिका छळणी वाद सांगें ॥ ३ ॥ तरी आतां मज राखें तुझे पायीं । देखसील कांहीं प्रेमरस ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुज हांसतील लोक । निष्काम सेवक ह्मणोनियां ॥ ५ ॥

॥ ४२७७ ॥ भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ॥ धृ० ॥ मनुष्याचे परि बोले रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥ १ ॥ तिमयाचा बैल करी

सिकविलें । चित्रींचें बाहुलें गोष्टी सांगे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुगातें ॥ ३ ॥

॥ ४२७८ ॥ अंगीं घेऊनियां वारें दया देती । तया भक्ता हातीं चोट आहे ॥ धृ० ॥ देव्हारा बैसोनि हालविती सुपें । ऐसीं पापी पापें लिंपताती ॥ १ ॥ एकीबेकीन्यायें होवसे प्रचित । तेणें लोक समस्त भुलताती ॥ २ ॥ तयाचे स्वाधीन दैवतें असती । तरि कां मरती त्यांचीं पोरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होबाचा तो ही नव्हे ॥ ४ ॥

॥ ४२७९ ॥ कोणा एकाचिया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागें देखी ॥ धृ० ॥ बुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥ १ ॥ तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मायबापाचें उचित । करावें तें हित बाळकाचें ॥ ३ ॥

॥ ४२८० ॥ पंढरपुरींचें दैवत भजावें । काया वाचा जावें शरण त्या ॥ धृ० ॥ मनीं ध्यान करी अहंता धरुनी । तया चक्रपाणी दूर ठेला ॥ १ ॥ मान अभिमान सांडूनियां द्यावे । अवघ्यां नीच व्हावें तरी प्राप्त ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि कोणासी सांगावें । सादर होउनि भावें भजें देवा ॥ ३ ॥

॥ ४२८१ ॥ अधमाचें चित्त अहंकारीं मन । उपदेश शीण तया केला ॥ धृ० ॥ पापियाचें मन न करी आचार । विधवे शृंगार व्यर्थ केला ॥ १ ॥ अधमाचें चित्त दुश्चित्त ऐकेना । वांयां सीण मना करूं काय ॥ २ ॥ गर्धवासी दिली चंदनाची उटी । केशर ललाटीं सूकराच्या ॥ ३ ॥ पतिवंचकेसी सांगतां उदंड । परि तें पाषांड तिचे मनीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तैसें अभाविका सांगतां । वाउगाचि चित्ता सीण होय ॥ ५ ॥

॥ ४२८२ ॥ किती उपदेश करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ॥ धृ० ॥ शुद्ध हे वासना नाहीं चांडाळाची । होळी आयुष्याची केली तेणें ॥ १ ॥ नाहीं शुद्ध भाव नायके वचन । आपण्या आपण नाडियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे त्यासी काय व्याली रांड । करितो बडबड रात्रंदिस ॥ ३ ॥

॥ ४२८३ ॥ संत देखोनियां स्वयें दृष्टि टाळी । आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥ धृ० ॥ वीट ये कर्णासी संतवाक्यामृता । स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥ १ ॥ कथेमाजी निज वाटे नित्यक्षणीं । स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणीं ॥ ३ ॥

॥ ४२८४ ॥ मणि पडिला दाढेसी मकरतोंडीं । सुखें हस्तेंचि काढवेल प्रौढीं ॥ धृ० ॥ परि मूर्खाचें चित्त बोधवेना । दुधें कूर्माच्या पाळवेल सेना ॥ १ ॥ सकळ पृथ्वी हिंडतां कदाचित । ससीसिंगची प्राप्त होय तेथें ॥ २ ॥ अति प्रयत्नें गाळितां वाळुवेतें । दिव्य तेलाची प्राप्त होय तेथें ॥ ३ ॥ अति क्रोधें खवळला फणी पाहीं । धरूं येतो मस्तकीं पुष्पप्रायी ॥ ४ ॥ पहा ब्रह्मानंदेंचि एकी हेळा । महापातकी तो तुका मुक्त केला ॥ ५ ॥

॥ ४२८५ ॥ भोळे भाविक हे जुनाट चांगले । होय तैसें केलें भक्तिभावें ॥ धृ० ॥

म्हणऊनि चिंता नाहीं आम्हां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ॥ १ ॥ आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्व सुखें ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हां देवाचा सांगात । नाहीं विसंबत येर येरां ॥ ३ ॥

॥ ४२८६ ॥ आतां तरी माझी परिसा विनंती । रखुमाईच्या पति पांडुरंगा ॥ धृ० ॥ चुकलिया बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥ १ ॥ तुका म्हणे तुम्हा म्हणवितो मज । आतां आहे लाज हेंचि तुम्हां ॥ २ ॥

॥ ४२८७ ॥ नाहीं बळयोग अभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥ धृ० ॥ तुझिये भेटीचें प्रेम अंतरंगीं । नाहीं बळ अंगीं भजनाचें ॥ १ ॥ काय पांडुरंगा करूं बा विचार । झुरतें अंतर भेटावया ॥ २ ॥ तुका म्हणे सांगा वडिलपणें बुद्धी । तुजविण दयानिधि पुसों कोणां ॥ ३ ॥

॥ ४२८८ ॥ जिहीं तुझी कास भावें धरियेली । त्यांची नाहीं केली सांड देवा ॥ धृ० ॥ काय माझा भोग आहे तो न कळे । सुखें तुम्ही डोळे झांकियेले ॥ १ ॥ राव रंक तुज सारिखेचि जन । नाहीं थोर लहान तुजपाशीं ॥ २ ॥ तुका म्हणे मागें आपंगिले भक्तां । माझिया संचिता कृपा नये ॥ ३ ॥

॥ ४२८९ ॥ कोणतें कारण राहिलें यामुळें । तें म्यां तुज बळें कष्टवावें ॥ धृ० ॥ नाहीं जात जीव नाहीं होत हानी । सहज तें मनीं आठवलें ॥ १ ॥ नाहीं चिंता कांहीं मरतों उपासी । अथवा त्या ऐसी गाई व्हाव्या ॥ २ ॥ हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लापणीक वरी साच भाव ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा नासिवंतासाठीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥ ४ ॥

॥ ४२९० ॥ पहावया तुझा जरि बोलें अंत । तरि माझे जात डोळे देवा ॥ धृ० ॥ स्तंबीं तुज नाहीं घातलें प्रल्हादें । आपुल्या आनंदें अवतार ॥ १ ॥ भक्ताचिया काजा जालासी सगुण । तुज नाहीं गुण रूप नाम ॥ २ ॥ ऐसा कोण देवा अधम यातीचा । निर्धार हा साचा नाहीं तुझा ॥ ३ ॥ तुका म्हणे बोले करतुकें गोष्टी । नेदीं येऊं पोटीं राग देवा ॥ ४ ॥

॥ ४२९१ ॥ प्रगट व्हावें हे अज्ञानवासना । माझी नारायणा हीनबुद्धी ॥ धृ० ॥ खाणीवाणी होसी काष्ठीं तूं पाषाणीं । जंतु जीवाजनीं प्रसिद्ध हा ॥ १ ॥ ज्ञानहीन तुज पाहें अल्पमती । लहान हा चित्तीं धरोनियां ॥ २ ॥ परि तूं कृपाळ होसी देवराणा । ब्रिदें तुझीं जना प्रसिद्ध हें ॥ ३ ॥ उतावीळ बहु भक्तांचिया काजा । होसी केशीराजा तुका म्हणे ॥ ४ ॥

॥ ४२९२ ॥ जरी तुझा मज नसता आधार । कैसा हा संसार उल्हावता ॥ धृ० ॥ ऐसा बळी कोण होईल पुरता । जो हे वारी चिंता आशापाश ॥ १ ॥ मायामोहफांसा लोकलाजबेडी । तुजविण तोडी कोण एक ॥ २ ॥ हें तों मज कळों आलें अनुभवें । बरें माझ्या जीवें पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका म्हणे यास तूंचि माझा ग्वाही । परि भाव नाहीं जना लोकां ॥ ४ ॥

॥ ४२९३ ॥ तुजविण चाड आणिकांची कांहीं । धरीन हें नाहीं तुज ठावें ॥ धृ० ॥ तरणउपाय योगक्षेम माझा । ठेवियेला तुझ्या पायीं देवा ॥ १ ॥ कोण मज आळी काय हे तांतडी । सोनियाची घडी जाय दिस ॥ २ ॥ तुझिया नामाचें ल्यालोंसें भूषण । कृपा संतजन करितील ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाला आनंदाचा वास । ह्रदया या नास नव्हे कधीं ॥ ४ ॥

॥ ४२९४ ॥ हेंचि सुख पुढें मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥ धृ० ॥ जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥ १ ॥ दुजा भाव आड येऊं नेदीं चित्ता । करावा अनंता नास त्याचा ॥ २ ॥ अभय देऊनि करावें सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरु पुरविसी ॥ ४ ॥

॥ ४२९५ ॥ तुज केलिया नव्हे ऐसें काई । डोंगराची राई क्षणमात्रें ॥ धृ० ॥ मज या लोकांचा न साहे आघात । देखणें प्रचित जीव घेती ॥ १ ॥ सहज विनोदें बोलियेलों गोष्टी । आरंभी तों पोटीं न धरावी ॥ २ ॥ दीनरूप मज करावें नेणता । याहुनी अनंता आहें तैसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेणें मज तूं भोगसी । तें करीं जनासीं चाड नाहीं ॥ ४ ॥

॥ ४२९६ ॥ ऐसा सर्व भाव तुज निरोपिला । तूं मज एकला सर्वभावें ॥ धृ० ॥ अंतरींची कां हे नेणसील गोष्टी । परि सुखासाठीं बोलविसी ॥ १ ॥ सर्व माझा भार तुज चालवणें । तेथें म्यां बोलणें काय एक ॥ २ ॥ स्वभावें स्वहित हिताचें कारण । कौतुक करून निवाडिसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं हें जाणसी गा देवा । आमुच्या स्वभावा अंतरींच्या ॥ ४ ॥

॥ ४२९७ ॥ लोखंडाचे न पाहे दोष । शिवोन परीस सोनें करी ॥ धृ० ॥ जैसी तैसी तरी वाणी । मना आणी माउली ॥ १ ॥ लेकराचें स्नेहे गोड । करी कोड त्यागुणें ॥ २ ॥ मागें पुढें रिघे लोटी । साहे खेटी करी तें ॥ ३ ॥ तुका विनवी पांडुरंगा । ऐसें सांगा आहे हें ॥ ४ ॥

॥ ४२९८ ॥ पर्वकाळीं धर्म न करी नासरी । खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी ॥ धृ० ॥ सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा । कांडवी ठोंबरा संतांलागीं ॥ १ ॥ बाइलेचीं सर्व आवडीनें पोसी । मातापितरांसी दवडोनी ॥ २ ॥ श्राद्धीं कष्टी होय सांगतां ब्राह्मण । गोवार मागून सावडीतो ॥ ३ ॥ नेतो पानें फुलें वेश्येला उदंड । ब्राह्मणासी खांड नेदी एक ॥ ४ ॥ हातें मोऱ्या शोधी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कांटाळतो ॥ ५ ॥ सारा वेळ धंदा करितां श्रमेना । साधूच्या दर्शना जातां कुंथे ॥ ६ ॥ हरीच्या कीर्तनीं गुंगायासि लागे । येरवीं तो जागे उगलाची ॥ ७ ॥ पुराणीं बैसतां नाहीं रिकामटी । खेळतो सोंगटी अहोरात्रीं ॥ ८ ॥ देवाच्या विभूति न पाहे सर्वथा । करी पानवथा नेत्रभिक्षा ॥ ९ ॥ गाईला देखोनी बदबदां मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥ १० ॥ ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा । प्रेमें घेतो घोंटा घटघटां ॥ ११ ॥ तुका ह्मणे ऐसे प्रपंचीं गुंतले । जन्मोनि मुकले विठोबासी ॥ १२ ॥

॥ ४२९९ ॥ आपुल्या पोटासाटीं लोकांची प्रौढी वाणी । संतांची वदनीं निंदा करी ॥ धृ० ॥ पोटा घातलें जेणें अन्न । न ह्मणे पतितपावन ॥ १ ॥ जेणें घातलें संसारीं ।

विसरला तया हरी ॥ २ ॥ मी कोठील आणि कोण । हें न कळे जयालागुन ॥ ३ ॥ तुका ह्मणे नरस्तुती । करितो भाट त्रिजगतीं ॥ ४ ॥

॥ ४३०० ॥ आह्मी रामाचे राऊत । वीर जुंझार बहुत ॥ धृ० ॥ मनपवनतुरंग । हातीं नामाची फिरंग ॥ १ ॥ वारू चालवूं चहूं खुरीं । घाला घालूं यमपुरी ॥ २ ॥ तुका ह्मणे पेणें । आह्मां वैकुंठासी जाणें ॥ ३ ॥

॥ ४३०१ ॥ पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास घेती जन्म ॥ धृ० ॥ कर्मधर्म त्याचे जाला नारायण । त्याचेनी पावन तिन्ही लोक ॥ १ ॥ वर्णअभिमानें कोण जाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ २ ॥ अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयाचीं पुराणें भाट झालीं ॥ ३ ॥ वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥ ४ ॥ कबीर मोमीन लतिफ मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥ ५ ॥ कान्होपात्र खोदु पिंजारी तो दादू । भजनीं अभेदु हरिचे पायीं ॥ ६ ॥ चोखामेळा बंका जातीचा माहार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥ ७ ॥ नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरिराव तियेसवें ॥ ८ ॥ मैराळा जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें काय सांगों ॥ ९ ॥ यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ १० ॥ तुका ह्मणे तुह्मी विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥ ११ ॥

॥ ४३०२ ॥ नामासारिखी करणी । हे तों न दिसे त्रिभुवनीं ॥ धृ० ॥ सिलंगणीचें सोनें । ठेवूं नये तें गाहाण ॥ १ ॥ आदित्याचीं झाडें । काय त्याचा उजड पडे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । ब्रीदें सोडोनियां ठेवा ॥ ३ ॥

॥ ४३०३ ॥ येऊनि संसारा काय हित केलें । आयुष्य नासिलें शिश्नोदरा ॥ धृ० ॥ विषय सेवितां कोण तृप्त जाला । इंधनीं निवाला अग्नि कोठें ॥ १ ॥ देखोनी मृगजळ भांबावलीं वेडीं । विचाराची थडी न टाकिती ॥ २ ॥ ऐसिया जीवांसी सोय न लाविसी । निष्ठुर कां होसी कृपाळुवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा अगाध पैं थोरी । सर्वांचे अंतरीं पुरलासी ॥ ४ ॥

॥ ४३०४ ॥ समर्थाचे सेवे बहु असे हित । विचार हृदयांत करुनी पाहें ॥ धृ० ॥ वरकडा ऐसा नव्हे हा समर्थ । क्षणेंचि घडित सृष्टि नासे ॥ १ ॥ ज्याची कृपा होतां आपणा ऐसें करी । उरों नेदी उरी दारिद्र्याची ॥ २ ॥ ऐशालागीं मन वोळगे अहर्निशीं । तेणें वंद्य होशी ब्रह्मादिकां ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि आहे पैं मुद्दल । सत्य माझा बोल हाचि माना ॥ ४ ॥

॥ ४३०५ ॥ पिकलिये सेंदे कडूपण गेलें । तैसें आह्मां केलें पांडुरंगें ॥ धृ० ॥ काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि जाली ॥ १ ॥ आठव नाठव गेले भावाभाव । जाला स्वयमेव पांडुरंग ॥ २ ॥ तुका ह्मणे भाग्य या नांवें ह्मणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं ॥ ३ ॥

॥ ४३०६ ॥ येऊनि नरदेहा विचारावें सार । धरावा पैं धीर भजनमार्गीं ॥ धृ० ॥ चंचळ चित्तासी ठेवूनियां ठायीं । संतांचिये पायीं लीन व्हावें ॥ १ ॥ भावाचा पैं हात

धरावा निश्चयें । तेणें भवभय देशधडी ॥ २ ॥ नामापरतें जगीं सांधन सोपें नाहीं । आवडीनें गाई सर्वकाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य वंश त्या नराचा । ऐसा निश्चयाचा मेरु जाला ॥ ४ ॥

॥ ४३०७ ॥ षड्रसीं रांधिलें खापरीं घातलें । चोहोटा ठेविलें मध्यरात्रीं ॥ धृ० ॥ त्यासी सदाचारी लोक न शिवती । श्वानासी निश्चिती फावलें तें ॥ १ ॥ तैसें दुष्टकर्म जालें हरिभक्ता । त्यागिली ममता विषयासक्ती ॥ २ ॥ इहपरलोक उभय विटाळ । मानिती केवळ हरिचे दास ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा आवडे हे सेवा । अनुदिनीं व्हावा पूर्ण हेतू ॥ ४ ॥

॥ ४३०८ ॥ बीज भाजूनि केली लाही । आह्मां जन्ममरण नाहीं ॥ धृ० ॥ आकारासी कैंचा ठाव । देहप्रत्यक्ष जाला देव ॥ १ ॥ साकरेचा नव्हे ऊस । आह्मां कैंचा गर्भवास ॥ २ ॥ तुका ह्मणे औघा जोग । सर्वां घटीं पांडुरंग ॥ ३ ॥

॥ ४३०९ ॥ वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलिक ॥ धृ० ॥ धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ॥ १ ॥ पितृसेवा पुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥ २ ॥ अंगसंगें रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ॥ ३ ॥ धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याती । तुका ह्मणे मुक्ति पायीं लोळे ॥ ४ ॥

॥ ४३१० ॥ मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ धृ० ॥ भाग्यवंत घेती वेचूनियां मोलें । भारवाही मेले वाहतां ओझें ॥ १ ॥ चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ २ ॥ अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षवंता दृष्टि रत्न जैसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय अंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वांया जाय ॥ ४ ॥

॥ ४३११ ॥ आलिया संसारीं देखिली पंढरी । कीर्ति महाद्वारीं वाणूं तुझी ॥ धृ० ॥ पताकांचे भार नामाचे गजर । देखिल्या संसार सफळ जाला ॥ १ ॥ साधुसंतांचिया धन्य जाल्या भेटी । सांपडली लुटी मोक्षाची हे ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां हेंचि पैं मागणें । पुढती नाहीं येणें संसारासी ॥ ३ ॥

॥ ४३१२ ॥ ऐसे कैसे जाले भोंदू । कर्म करोनि ह्मणती साधू ॥ धृ० ॥ अंगा लावूनियां राख । डोळे झांकुनी करिती पाप ॥ १ ॥ दावूनि वैराग्याची कळा । भोगी विषयाचा सोहळा ॥ २ ॥ तुका ह्मणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥ ३ ॥

॥ ४३१३ ॥ कोणी निंदा कोणी वंदा । आह्मां स्वहिताचा धंदा ॥ धृ० ॥ काय तुह्मांसी गरज । आह्मी भजूं पंढरिराज ॥ १ ॥ तुह्मांसारिखें चालावें । तव्हां स्वहिता मुकावें ॥ २ ॥ तुका ह्मणे हो कां कांहीं । गळ दिला विठ्ठल पायीं ॥ ३ ॥

॥ ४३१४ ॥ तुझे नामीं दीनानाथा । आह्मी उघडा घातला माथा ॥ धृ० ॥ आतां न धरावें दुरी । बोल येईल ब्रीदावरी ॥ १ ॥ पतित होतों ऐसा ठावा । आधीं कां न विचारावा ॥ २ ॥ तुका ह्मणे तुझे पायीं । आह्मीं मिरास केली पाहीं ॥ ३ ॥

॥ ४३१५ ॥ रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥ धृ० ॥ तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि जाली । कल्पना निवाली द्वैताद्वैत ॥ १ ॥ देशकालवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥ २ ॥ न जाला प्रपंच आहे परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें ॥ ३ ॥ तत्त्वमसी विद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि जाला अंगें तुका आतां ॥ ४ ॥

॥ ४३१६ ॥ नीत सांडोनि अवनीत चाले । भंडउभंड भलतेंचि बोले ॥ धृ० ॥ त्यांत कोणाचें काय बा गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ॥ १ ॥ ज्यासि वंदावें त्यासी निंदी । मैत्री सांडोनि होतसे दंदी ॥ २ ॥ आन यातीचे संगति लागे । संतसज्जनामध्यें ना वागे ॥ ३ ॥ केल्याविण पराक्रम सांगे । जेथें सांगे तेथेंचि भीक मागे ॥ ४ ॥ करी आपुलाचि संभ्रम । परि पुढें कठीण फार यम ॥ ५ ॥ तुका ह्मणे कांहीं नित्यनेम । चित्तीं न धरी तो अधम ॥ ६ ॥

॥ ४३१७ ॥ मानूं कांहीं आह्मी आपुलिया इच्छा । नाहीं तरि सरिसा रंकरावो ॥ धृ० ॥ आपुल्या उदास आहों देहभावीं । मग लज्जाजीवीं चाड नाहीं ॥ १ ॥ तुका ह्मणे खेळों आह्मी सहज लीळे । ह्मणोनी निराळे सुखदुःखा ॥ २ ॥

॥ ४३१८ ॥ बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥ धृ० ॥ अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥ १ ॥ त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥ २ ॥ तुका ह्मणे देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ३ ॥

॥ ४३१९ ॥ पाण्या निघाली गुजरी । मन ठेविलें दो घागरीं । चाले मोकळ्या पदरीं । परी लक्ष तेथें ॥ धृ० ॥ वावडी उडाली अंबरीं । हातीं धरोनियां दोरी । दिसे दुरिच्या दुरी । परी लक्ष तेथें ॥ १ ॥ चोर चोरी करी । ठेवी वनांतरीं । वर्ततसे चराचरीं । परी लक्ष तेथें ॥ २ ॥ व्यभिचारिणी नारी । घराश्रम करी । परपुरुष जिवारीं । परी लक्ष तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे असों । भलतिये व्यापारीं । लक्ष सर्वेश्वरीं । चुकों नेदी ॥ ४ ॥

॥ ४३२० ॥ जनाचिया मना जावें काशिसी । माझी वाराणसी पांडुरंग ॥ धृ० ॥ तेथें भागीरथी येथें भीमरथी । अधिक ह्मणती चंद्रभागा ॥ १ ॥ तेथें माधवराव येथें यादवराव । जाणोनियां भाव पुंडलिकाचा ॥ २ ॥ विष्णुपद गया तेंचि येथें आहे । प्रत्यक्ष हें पाहे विटेवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि प्रपंच उद्धरी । आतां पंढरपुरी घडो बापा ॥ ४ ॥

॥ ४३२१ ॥ नको येऊं लाजे होय तूं परती । भजोंदे श्रीपति सखा माझा ॥ धृ० ॥ तुझे संगतीनें मोठा जाला घात । जालों मी अंकित दुर्जनाचा ॥ १ ॥ तुका ह्मणे रांडे घेइन काठीवरी । धनी सहाकारी राम केला ॥ २ ॥

॥ ४३२२ ॥ भक्तिऋण घेतलें माझें । चरण गाहाण आहेत तुझे ॥ धृ० ॥ प्रेम व्याज देई हरी । माझा हिशेब लवकरी करीं ॥ १ ॥ माझें मीं न सोडीं धन । नित्य करितों कीर्त्तन ॥ २ ॥ तुझें नाम आहे खत । सुखें करीं पंचाईत ॥ ३ ॥ तुका ह्मणे गरुडध्वजा । यासी साक्ष श्रीगुरुराजा ॥ ४ ॥

॥ ४३२३ ॥ फिरविलें देऊळ जगामाजी ख्याती । नामदेवा हातीं दूध प्याला ॥ धृ० ॥ भरियेली हुंडी नरसी मेहत्याची । धनाजीजाटाचीं सेतें पेरी ॥ १ ॥ मिराबाईसाठीं

घेतो विष प्याला । दामाजीचा जाला पाडेवार ॥ २ ॥ कबीराचें मागीं विणूं लागे शेले । उठविलें मूल कुंभाराचें ॥ ३ ॥ आतां तुह्मी दया करा पंढरिराया । तुका विनवी पायां वेळोवेळां ॥ ४ ॥

॥ ४३२४ ॥ हेचि वेळ देवा नका मागें घेऊं । तुह्मांविण जाऊं शरण कोणा ॥ धृ० ॥ नारायणा ये रे पाहें विचारुन । तुजविण कोण आहे मज ॥ १ ॥ रात्र दिवस तुज आठवूनि आहें । पाहातोसी काये सत्त्व माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे किती येऊं काकुलती । कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ॥ ३ ॥

॥ ४३२५ ॥ वृंदावना केलें साकरेचें आळें । न संडे वेगळें कडूपण ॥ धृ० ॥ कावळ्याचें पिलूं कौतुकें पोशिलें । न राहे उगलें विष्ठेविण ॥ १ ॥ क्षेम देतां अंगा गांधेलाचीं पोळीं । करवी नादाळी महाशब्द ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसे न होती ते भले । घालिती ते घाले साधुजना ॥ ३ ॥

॥ ४३२६ ॥ मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा । पाषाण पिळितां रस कैंचा ॥ धृ० ॥ वांझे बाळा जैसें दूध नाहीं स्तनीं । गारा त्या अधणीं न शिजती ॥ १ ॥ नवखंड पृथ्वी पिके मृगजळें । डोंगर भेदे बळें असमानासी ॥ २ ॥ नैश्वर देह तैसें तेव्हां होय ब्रह्म । तुका ह्मणे श्रम करुनी काय ॥ ३ ॥

॥ ४३२७ ॥ धन्या आतां काय करूं । माझें तान्हुलें लेंकरूं ॥ धृ० ॥ धन्या अवचित मरण आलें । मज कोणासी निरविलें ॥ १ ॥ माझें दार नका पाडूं । त्याचे हात पाय तोडूं ॥ २ ॥ एके हातीं धरली दाढी । घे कुऱ्हाडी दुजे हातीं ॥ ३ ॥ येरी घाव घालूं पाहे । तंव तो उठोनि उभा राहे ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघीं चोरें । सेखीं रामनाम सोइरें ॥ ५ ॥

॥ ४३२८ ॥ निरंजनीं आह्मीं बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलों आह्मी ॥ धृ० ॥ निराभासीं पूर्ण जालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आह्मी ॥ १ ॥ तुका ह्मणे आतां नाहीं अहंकार । जालों तदाकार नित्य शुद्ध ॥ २ ॥

॥ ४३२९ ॥ पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥ धृ० ॥ जीवशिवा सेज रचिली आनंदें । आउठावे पदीं आरोहण ॥ १ ॥ निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहातें बाळका हलरु गाती ॥ २ ॥

॥ ४३३० ॥ नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ती । पाठांतरें होती वाचाळ ते ॥ धृ० ॥ माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥ १ ॥ यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥ २ ॥ तुका ह्मणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागे ॥ ३ ॥

॥ ४३३१ ॥ नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी । नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥ धृ० ॥ हर्षामर्षे अंगीं आदळती लाटा । कामक्रोधें तटा सांडियेलें ॥ १ ॥ न सरे ते भक्ति विठोबाचे पायीं । उपरति नाहीं जेथें चित्ता ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख देहनिरसनें । चिंतनें चिंतनें तद्रूपता ॥ ३ ॥

॥ ४३३२ ॥ शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ॥ धृ० ॥ ह्मणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्यें अभिषेक ॥ १ ॥ एकछत्र झळके उन्मनीं निशाणी । अनुहात ध्वनि गगन गर्जे ॥ २ ॥ तुक्या स्वामि स्थापी निजपदीं दासा । करूनि उल्हासा सप्रेमता ॥ ३ ॥

॥ ४३३३ ॥ प्रवृत्तिनिवृत्तीचे आटूनियां भाग । उतरिलें चांग रसायण ॥ धृ० ॥ ज्ञानाग्निहुताशीं कडशिले वीजा । आत्मसिद्धिकाजा । लागूनियां ॥ १ ॥ ब्रह्मीं ब्रह्मरस शीघ्र जाला पाक । घेतला रुक प्रतीतीसुखें ॥ २ ॥ स्वानुभवें अंगीं जाला समरस । साधनी निजध्यास श्वासोश्वासीं ॥ ३ ॥ आरोग्यता तुका पावला अष्टांगीं । मिरविला रंगीं निजात्मरंगें ॥ ४ ॥

॥ ४३३४ ॥ काय बा करिशी सोवळें ओवळें । मन नाहीं निर्मळ वाउगेंची ॥ धृ० ॥ काय बा करीसी पुस्तकांची मोट । घोकितां हृदयस्फोट हातां नये ॥ १ ॥ काय बा करीसी टाळ आणि मृदंग । जेथें पांडुरंग रंगला नाहीं ॥ २ ॥ काय बा करीसी ज्ञानाचिया गोष्टी । करणी नाहीं पोटीं बोलण्याची ॥ ३ ॥ काय बा करीसी दंभलौकिकातें । हित नाहीं मातें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४३३५ ॥ स्वामि तूंही कैसा न पडसी डोळां । सुंदर सांवळा घवघवीत ॥ धृ० ॥ चतुर्भुज माळा रुळे एकावळी । कस्तुरी निडळीं रेखिलीसे ॥ १ ॥ शंख चक्र गदा रुळे वैजयंती । कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वामि आतां दावीं पाय । पांडुरंग माय कृपावंते ॥ ३ ॥

॥ ४३३६ ॥ आणिक कोणापुढें वासूं मुख सांग । माझें अंतरंग कोण जाणें ॥ धृ० ॥ आहें तुजकडे येऊनी जाऊनी । पांडुरंगा मनीं विचारावें ॥ १ ॥ भय चिंता अवघे उद्योग सांडिले । आठवुनी पाउलें असें तुझीं ॥ २ ॥ नका विसरूं मज वैकुंठनायका । विनविती तुका बंदीजन ॥ ३ ॥

॥ ४३३७ ॥ सद्गुरूचे चरणीं ठेविला मस्तक । देऊनियां हस्तक उठविलें ॥ धृ० ॥ उठविलें मज देऊनियां प्रेम । भावार्थे सप्रेम नमस्कारीं ॥ १ ॥ नमस्कारीं त्याला सद्गुरुत्याला । तुका ह्मणे बोला नाम वाचे ॥ २ ॥

॥ ४३३८ ॥ सद्गुरूनें मज आशीर्वाद दिला । हरुष भरला हृदयीं माझे ॥ धृ० ॥ हृदयींचा भाव कळला गुरूसी । आनंदउल्हासीं बोले मज ॥ १ ॥ बोले मज गुरु कृपा तो करुनी । तुका ह्मणे मनीं आनंदलों ॥ २ ॥

॥ ४३३९ ॥ आनंदाचा कंद गाइयेला गीतीं । पाहियेला चित्तीं देवराव ॥ धृ० ॥ देवराव तोही आहे निश्चयेसीं । अखंड नामासीं बोलवितो ॥ १ ॥ बोलवितो मज कृपा तो करुनी । तुका ह्मणे मनीं धरा भाव ॥ २ ॥

॥ ४३४० ॥ सातादिवसांचा जरी जाला उपवासी । तरी कीर्तनासी टाकूं नये ॥धृ०॥ फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । नामाचा गजर सोडूं नये ॥ १ ॥ शरीराचे होत दोनी तेही

भाग । परि कीर्त्तनाचा रंग सोडों नये ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव असे ॥ ३ ॥

॥ ४३४१ ॥ चला आळंदीला जाऊं । ज्ञानदेवा डोळां पाहूं ॥ धृ० ॥ होतील संताचिया भेटी । सुखाचिया सांगों गोष्टी ॥ १ ॥ ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखीं ह्मणतां चुकती फेर ॥ २ ॥ तुह्मा जन्म नाहीं एक । तुका ह्मणे माझी भाक ॥ ३ ॥

॥ ४३४२ ॥ चरणीं नमन सद्गुरूच्या पूर्ण । नित्य हरिगुण गाऊं सदा ॥ धृ० ॥ गोवर्धन जेणें नखीं हो धरिला । काळया नाथिला महाबळी ॥ १ ॥ ऐसे हरिगुण गातो वाचेवरी । पतितासी तारी जनार्दन ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि सज्जना जीवन । वाचेसी स्मरण गोविंदाचें ॥ ३ ॥

॥ ४३४३ ॥ सद्गुरूवांचूनि प्रेतरूप वाणी । बोलती पुराणीं व्यासऋषी ॥ धृ० ॥ ह्मणोनि तयाचें पाहूं नये तोंड । निगुरा अखंड सुतकाळा ॥ १ ॥ कोणे परि तया नव्हेचि सुटका । देह त्याचा लटिका जाणा तुह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसीं बोलती पुराणें । संतांचीं वचनें मागिलां हो ॥ ३ ॥

॥ ४३४४ ॥ डिवेना डसेना बुजेना निर्मळ । परि अमंगळ स्वीकारीना ॥ धृ० ॥ परंतु गर्धब अपवित्र जाणा । पर्वकाळीं दाना देऊं नये ॥ १ ॥ डिवी लात्री बुजे बहु नेदी दुध । मुखीं नाहीं शुद्ध विष्टा खाय ॥ २ ॥ परंतु ते गाय पवित्र हो जाणा । पर्वकाळीं दाना देऊं जेते ॥ ३ ॥ ब्राह्मणें ब्राह्मणा सद्गुरु करावा । परि न करावा शूद्रादिका ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवें सांगितली सोय । ह्मणोनि त्याचे पाय धरिले जीवें ॥ ५ ॥

॥ ४३४५ ॥ संसारींचें ओझें वाहता वाहाविता । तुजविण अनंता नाहीं कोणी ॥ धृ० ॥ गीतेमाजी शब्द दुंदभीचा गाजे । योगक्षेमकाज करणें त्याचें ॥ १ ॥ चतुर्भुजा करीं वारु शृंगारावे । सारथ्य करावें अर्जुनाचें ॥ २ ॥ श्वपच अंत्यज भक्तिस्नेहें जाला । अचळपदीं केला ध्रुव तुका ॥ ३ ॥

॥ ४३४६ ॥ कवणादिस येइल कैसा । न कळे संपत्तीचा भरंवसा ॥ धृ० ॥ चौदा चौकडिया लंकापती । त्याची कोण जाली गती ॥ १ ॥ लंकेसारिखें भुवन । त्याचें त्यासी पारखें जाण ॥ २ ॥ तेहतीस कोटि बांदवडी । राज्य जातां न लगे घडी ॥ ३ ॥ ऐसे अहंतेनें नाडिले । तुका ह्मणे वांयां गेले ॥ ४ ॥

॥ ४३४७ ॥ लटिका प्रपंच वांझेची संतती । तत्त्वज्ञा हे भ्रांति बाधूं नेणें ॥ धृ० ॥ सूर्यबिंबीं काय अंधार रिघेल । मृगजळें तिंबेल नभ काई ॥ १ ॥ तैसा दृश्यभास नाडळेचि डोळा । प्रकाशसोहळा भोगीतसे ॥ २ ॥ भोग भोग्य भोक्ता नाडळेचि कांहीं । चैतन्यविग्रहीं पूर्णकाम ॥ ३ ॥ तुका ब्रह्मानंदीं आहे तुकब्रह्म । प्रपंचाचें बंड न देखे डोळा ॥ ४ ॥

॥ ४३४८ ॥ न ह्मणे वो आह्मी आपुलेनि चित्तीं । निःशेष अति प्रीति विषयीं तो ॥ धृ० ॥ खोटा तो विटाळ खोटा तो विटाळ । ह्मणोनि गाबाळ सांडियेलें ॥ १ ॥ भांग-

तमाखूचा चित्ताचा आदर । कोरडें उत्तर चाटावें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी नव्हों फजितखोर । तुटीचा व्यापार करावया ॥ ३ ॥

॥ ४३४९ ॥ अनाथाचा नाथ पतितपावन । दीनाचें रक्षण करीतसे ॥ धृ० ॥ ऐसें आणोनियां नामीं विश्वासलों । भीमातिरा आलों धांवतची ॥ १ ॥ स्नान हें करितां त्रिताप निवाले । महाद्वारा आलें मन माझें ॥ २ ॥ तेथें अणुमात्र रीग नव्हे याचा । परतलों साचा तेथूनियां ॥ ३ ॥ पुंडलिकापाशीं येऊनि पुसिलें । चिन्मय दाटलें जनार्दन ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां तुजा देव नाहीं । बाप तरी आई तोचि विठो ॥ ५ ॥

॥ ४३५० ॥ ढालतरवारें गुंतले हे कर । ह्मणे तो झुंझार कैसा झुंजों ॥ धृ० ॥ पेटी पडदळे सिले टोप ओझें । हें तों जालें तुजें मरणमूळ ॥ १ ॥ बैसविलें मला येणें अश्वावरी । धांवूं पळूं तरी कैसा आतां ॥ २ ॥ असोनि उपाय ह्मणे हे अपाय । ह्मणे हायहाय काय करूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणें वर्म संतचरण ॥ ४ ॥

॥ ४३५१ ॥ किडा अन्नाचें माणुस । त्याचा ह्मणविल्या दास ॥ धृ० ॥ तेंही त्यासी उपेक्षीना । बोल आपुला सांडीना ॥ १ ॥ तो तूं नराचा नरेंद्र । तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभर । तुज वर्णी फणीवर ॥ ३ ॥

॥ ४३५२ ॥ कोटिजन्म पुण्यसाधन साधिलें । तेणें हाता आलें हरिदास्य ॥ धृ० ॥ रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन । कायावाचामन भगवंतीं ॥ १ ॥ ऐसिया प्रेमळा ह्मणताती वेडा । संसार रोकडा बुडविला ॥ २ ॥ एकवीस कुळें जेणें उद्धरिलीं । हे तों न कळे खोलीं भाग्यमंदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याची पायधुळी मिळे । भवभय पळे वंदितांची ॥ ४ ॥

॥ ४३५३ ॥ उपजला प्राणी न राहे संसारीं । बैसला सेजारी काळ उसा ॥ धृ० ॥ पाहा तों उंदीर घेऊनि जाय बोका । तैसा काळ लोका नेत असे ॥ १ ॥ खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहें । कसाबाची गाय वांचे कैसी ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं करा काढाकाढी । जाती ऐसी घडी पुन्हा नये ॥ ३ ॥

॥ ४३५४ ॥ पंढरीस जाऊं ह्मणती । यम थोर चिंता करिती ॥ धृ० ॥ यारे नाचों ब्रह्मानंदें । विठ्ठलनामाचिया छंदें ॥ १ ॥ धरिली पंढरीची वाट । पापें रिगालीं कपाट ॥ २ ॥ केलें भीमरेचें स्नान । यमपुरी पडिलें खान ॥ ३ ॥ दुरोनि देखिली पंढरी । पापें गेलीं दुरच्यादुरी ॥ ४ ॥ दुरोनि देखिलें राउळ । हरुषें नाचती गोपाळ ॥ ५ ॥ तुका ह्मणे नाहीं जाणें । अखंड पंढरिये राहाणें ॥ ६ ॥

॥ ४३५५ ॥ पय दधि घृत आणि नवनीत । तैसें दृश्यजात एकपणें ॥ धृ० ॥ कनकाचे पाहीं अलंकार केले । कनकत्वा आले एकपणें ॥ १ ॥ मृत्तिकेचे घट जाले नानापरी । मृत्तिका अवधारीं एकपणें ॥ २ ॥ तुका ह्मणे एक एक ते अनेक । अनेकत्वीं एक एकपणा ॥ ३ ॥

॥ ४३५६ ॥ पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार झाला । विठोबा भेटला निराकार ॥ धृ० ॥ भांबगिरिपाठारीं वस्ति जाण केली । वृत्ति थिरावली परब्रह्मीं ॥ १ ॥ निर्वाण

जाणोनि आसन घातलें । ध्यान आरंभिलें देवाजीचें ॥ २ ॥ सर्प विंचू व्याघ्र आंगासीं झोंबले । पीडूं जे लागले सकाळिक ॥ ३ ॥ दीपकीं कर्पूर कैसा तो विराला । तैसा देह जाला तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४३५७ ॥ अज्ञान हा देह स्वरूपीं मीनला । सर्व वोसावला देहपात ॥ धृ० ॥ ज्ञान-स्वरूपाची सांगड मिळाली । अंतरीं पाहिली ज्ञानज्योती ॥ १ ॥ तुका ह्मणे चित्त स्वरूपीं राहिलें । देह विसावलें तुझ्या पायीं ॥ २ ॥

॥ ४३५८ ॥ दामाजीपंताची रसद गुदरली । लज्जा सांभाळिली देवरायें ॥ धृ० ॥ तयाचें चरित्र परिसा हो सादरें । करितों नमस्कार संतजना ॥ १ ॥ मंगळवेढा असे वस्ति कुटुंबेंसीं । व्यापारी सर्वांसीं मान्य सदा ॥ २ ॥ कर्म काय करी ठाणाचा हवाला । तों कांहीं पडला कठिण काळ ॥ ३ ॥ धान्याचीं भांडारें होतीं तीं फोडिलीं । पंढरी रक्षिली दुष्काळांत ॥ ४ ॥ दुबळीं अनाथ तींही वांचविलीं । राष्ट्रांत ते जाली कीर्ति मोठी ॥ ५ ॥ मुजुम करीत होता कानडा ब्राह्मण । फिर्याद लिहून पाठविली ॥ ६ ॥ अबिदाचें राज्य बेदरीं असतां । कागद पाहतां तलब केली ॥ ७ ॥ दामाजीपंतासी धरोनि चालविलें । इकडे या विठ्ठलें माव केली ॥ ८ ॥ विकते धारणे सवाईचें मोल । धान्याचें सकळ द्रव्य केलें ॥ ९ ॥ दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त । लिहून खलेती मुद्रा केली ॥ १० ॥ विठो पाडेवार भक्तां साह्य जाला । बेदरासी गेला रायापासीं ॥ ११ ॥ जोहार मायबाप पुसती कोठील । तंव तो ह्मणे स्थळ मंगळवेढें ॥ १२ ॥ दामाजीपंतांनीं रसद पाठविली । खलेती ओतिली अर्जदास्त ॥ १३ ॥ देखोनियां राजा संतोष पावला । ह्मणे व्यर्थ त्याला तलब केली ॥ १४ ॥ काय तुझें नांव पुसती यंत्रधारी । तो ह्मणे बेगारी विठा कीं जी ॥ १५ ॥ पावल्याचा जाब द्यावा मायबाप । करोनि घेतों माप ह्मणती ते ॥ १६ ॥ पावल्याचा जाब दिधला लिहून । तसरीफ देऊन पाठविला ॥ १७ ॥ छत्री घोडा शिबिका आभरणांसहित । दिला सवें दूत पाठवुनी ॥ १८ ॥ वाटे चुकामूक जाली याची त्यांची । ते आले तैसेचि मंगळवेढा ॥ १९ ॥ दामाजीपंतासी बेदरासी नेलें । राजा ह्मणे जालें कवतुक ॥ २० ॥ काल गेला विठा बेगारी देऊन । तसरीफ देऊन जाब दिला ॥ २१ ॥ काय तुमचें काज सांगा जी सत्वर । बोलाजी निर्धार वचनाचा ॥ २२ ॥ कैंचा विठा कोण पाठविला कधीं । काढोनियां आधीं जाब दिला ॥ २३ ॥ पहातांचि जाब हृदय फुटलें । नयन निडारले राजा देखे ॥ २४ ॥ सावळें सकुमार रूप मनोहर । माथां तेणें भार वाहियेला ॥ २५ ॥ दामाजीपंतासी रायें सन्मानिलें । तो ह्मणे आपुलें कर्म नव्हे ॥ २६ ॥ आतां तुमची सेवा पुरे जी स्वामिया । शिणविलें सखया विठोबासी ॥ २७ ॥ निरोप घेऊनि आला स्वस्थळासी । उदास सर्वांसीं होता जाला ॥ २८ ॥ दामाजीपंतांनीं सेविली पंढरी । ऐसा त्याचा हरि निकटवृत्ती ॥ २९ ॥ तुका ह्मणे विठो अनाथ कैवारी । नुपेक्षी हा हरि दासालागीं ॥ ३० ॥

॥ ४३५९ ॥ पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥ धृ० ॥ दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥ १ ॥ तिसरी माझी

ओवी तिळा नाहीं ठाव । अवघाचि देव जनीं वनीं ॥ २ ॥ चवथी माझी ओवी वैरिलें दळण । गाईन निधान पांडुरंग ॥ ३ ॥ पांचवी माझी ओवी माझिया माहेरा । गाईन निरंतरा पांडुरंगा ॥ ४ ॥ साहावी माझी ओवी साहाही आटले । गुरुमूर्ति भेटले पांडुरंग ॥ ५ ॥ सातवी माझी ओवी आठवे वेळोवेळां । बैसलासे डोळां पांडुरंग ॥ ६ ॥ आठवी माझी ओवी आठावीस युगें । उभा चंद्रभागे पांडुरंग ॥ ७ ॥ नववी माझी ओवी सरलें दळण । चुकलें मरण संसारींचें ॥ ८ ॥ दाहावी माझी ओवी दाहा अवतारा । न यावें संसारा तुका ह्मणे ॥ ९ ॥

॥ ४३६० ॥ धरोनियां फरश करी । भक्तजनाचीं विघ्नें वारी ॥ धृ० ॥ ऐसा गजानन महाराजा । त्याचे चरणीं हालो लागो माझा ॥ १ ॥ सेंदुर शमी बहुप्रिय ज्याला । तुरा दुर्वांचा शोभला ॥ २ ॥ उंदिर असे जयाचें वहन । माथां जडितमुगुट पूर्ण ॥ ३ ॥ नागयज्ञोपवीत रुळे । शुभ्र वस्त्र शोभित साजिरें ॥ ४ ॥ भावमोदक हरभरी । तुका भावें हे पूजा करी ॥ ५ ॥

॥ ४३६१ ॥ नाम आहे जयापाशीं । जेथें राहे तेथेंचि काशी ॥ धृ० ॥ ऐसा नामाचा महिमा । जाणें वाल्मीक शंकर उमा ॥ १ ॥ नाम प्रल्हादबाळ । जाणें पापी आजामेळ ॥ २ ॥ नाम जाणें तो नारद । नामें ध्रुवा अक्षय पद ॥ ३ ॥ नाम गणिकेतें तारी । पशु गजेंद्र उद्धारी ॥ ४ ॥ नाम जाणें हनुमंत । जाणताति महासंत ॥ ५ ॥ नाम जाणें शुकमूर्ती । जाणें राजा परिक्षिती ॥ ६ ॥ नाम जाणें तुका । नाहीं संसाराचा धोका ॥ ७ ॥

॥ ४३६२ ॥ बहुतां जन्मा अंतीं जन्मलासी नरा । देव तूं सोइरा करीं आतां ॥ धृ० ॥ करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडीं आतां ॥ १ ॥ सांडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥ २ ॥ पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरी ॥ ३ ॥ विटेवरि नीट आनंदाचा कंद । तुका नाचे छंद नामघोषें ॥ ४ ॥

॥ ४३६३ ॥ किती सांगों तरि नाइकति बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥ धृ० ॥ नका नका करूं रांडेची संगती । नेवोनी अधोगति घालिल यम ॥ १ ॥ तुका ह्मणे जरी देवीं नाहीं चाड । ह्मणोनि थोबाड फोडिल यम ॥ २ ॥

॥ ४३६४ ॥ उधानु काटीवरि चोपडुची आस । नवरा राजस मिरवतसे ॥ धृ० ॥ जिव्हाळ्याच्या काठीं उबाळ्याच्या मोटा । नवरा चोहटा मिरवतसे ॥ १ ॥ तुळसीची माळ नवरीचे कंठीं । नोवरा वैकुंठीं वाट पाहे ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐसी नोवऱ्याची कथा । परमार्थ वृथा बुडविला ॥ ३ ॥

॥ ४३६५ ॥ न कळे महिमा वेद मौनावले । जेथें पांगुळले मनपवन ॥ धृ० ॥ चंद्र सूर्य ज्याचें तेज वागविती । तेथें माझी मति कोणीकडे ॥ १ ॥ काय म्यां वाणावें तुझ्या थोरपणा । सहस्रवदना वर्णवेना ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी बाळ तूं माउली । कृपेची साउली करीं देवा ॥ ३ ॥

॥ ४३६६ ॥ संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥ धृ० ॥ मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥ १ ॥ कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥ २ ॥ तुका ह्मणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ३ ॥

॥ ४३६७ ॥ विधवेसि एक सुत । अहर्निशीं तेथें चित्त ॥ धृ० ॥ तैसा तूं मज एकला । नको मोकलूं विठ्ठला ॥ १ ॥ सुपुत्रालागीं बाप । अवघे तेथेंचि संकल्प ॥ २ ॥ तुका ह्मणे चित्तीं । पतिव्रते जैसा पती ॥ ३ ॥

॥ ४३६८ ॥ ह्मणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरि वाहाण ॥ धृ० ॥ नको नको दर्शन त्याचें । गलितकुष्ट भरो वाचे ॥ १ ॥ शाळिग्रामासि ह्मणे धोंडा । किडे पडोत त्याच्या तोंडा ॥ २ ॥ भावी सद्गुरु मनुष्य । त्याचें खंडो का आयुष्य ॥ ३ ॥ हरिभक्ताच्या करी चेष्टा । त्याचे तोंडीं पडो विष्टा ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती ऐकों । कोठवरी मर्यादा राखों ॥ ५ ॥

॥ ४३६९ ॥ स्वर्गींचे अमर इच्छिताति देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आह्मां ॥ धृ० ॥ नारायणनामें होऊं जीवन्मुक्त । कीर्त्तनीं अनंत गाऊं गीती ॥ १ ॥ वैकुंठींचे जन सदा चिंतिताती । कइं येथें येती हरिचे दास ॥ २ ॥ यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पावावया पैल पार । नाममंत्र सार भाविकासी ॥ ४ ॥

॥ ४३७० ॥ व्यापक हा विश्वंभर । चराचर याचेनी ॥ धृ० ॥ पंढरिराव विटेवरी । त्याचीं धरीं पाउलें ॥ १ ॥ अवघियांचा हाचि ठाव । देवोदेवीं सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे करीं सोस । भेदें दोष उफराटे ॥ ३ ॥

॥ ४३७१ ॥ पसरोनि मुखें । कैसे धालों बा हारिखें ॥ धृ० ॥ ब्रह्मादिका दुर्लभ वांटा । आह्मां फावला राणटा ॥ १ ॥ गोड लागे काय तरी । कृपावंत जाला हरी ॥ २ ॥ उडती थेंबुटें । अमृताहूनि गोमटें ॥ ३ ॥ गोडाहूनि गोड । जिव्हा नाचे वाटे कोड ॥ ४ ॥ खुणावुनि तुका । दावी वर्म बोलों नका ॥ ५ ॥

॥ ४३७२ ॥ आमुची मिरास पंढरी । आमुचें घर भीमातिरीं ॥ धृ० ॥ पांडुरंग आमुचा पिता । रकुमाबाई आमुची माता ॥ १ ॥ भाऊ पुंडलिक मुनी । चंद्रभागा आमुची बहिणी ॥ २ ॥ तुका जुन्हाट मिराशी । ठाव दिला पायांपाशीं ॥ ३ ॥

॥ ४३७३ ॥ गंगा गेली सिंधूपाशीं । जरी तो ठाव नेदी तिशीं ॥ धृ० ॥ तिणें जावें कवण्या ठाया । मज सांगा पंढरिराया ॥ १ ॥ जळ क्षोभलें जलचरा । माता बाळा नेदी थारा ॥ २ ॥ तुका ह्मणे आलों शरण । देवा त्वां कां धरिलें मौन्य ॥ ३ ॥

॥ ४३७४ ॥ बैसो आतां मनीं । आलें तैसेंचि वदनीं ॥ धृ० ॥ मग अवघेंचि गोड । पुरे सकळहि कोड ॥ १ ॥ बाहेरील भावहि तैसा अंतरींणी वाव ॥ २ ॥ तुका ह्मणे मणी । शोभा राखवी कोंदणीं ॥ ३ ॥

॥ ४३७५ ॥ वेठी ऐसा भाव । न करी अहाच उपाव ॥ धृ० ॥ रूप डसवी न जिवा ।

अवघा येच ठायीं देवा ॥ १ ॥ कृपणाचे परी । लेखा पळनिमिषे वरी ॥ २ ॥ तुका ह्मणे असा । संनिधचि जगदीशा ॥ ३ ॥

॥ ४३७६ ॥ सर्वसुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ॥ धृ० ॥ सर्वांगें तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीचें ॥ १ ॥ ऐशी उभारिली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरंवसा ॥ ३ ॥

॥ ४३७७ ॥ जो का निर्गुण निराकार । तेणें धरियेले अवतार ॥ धृ० ॥ निर्गुण होता तो सगुणासि आला । भक्तीसाठीं प्रगटला ॥ १ ॥ जो का त्रिभुवनचाळक । तो हा नंदाचा बाळक ॥ २ ॥ सोडविलें वसुदेवदेवकिसी । अवतार धरिला तिचे कुशी ॥ ३ ॥ मारियेला कंसराणा । राज्यीं स्थापिलें उग्रसेना ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवाधिदेव । तो हा उभा पंढरिराव ॥ ५ ॥

॥ ४३७८ ॥ जुनाट हें धन अंत नाहीं पार । खात आले फार सरलें नाहीं ॥ धृ० ॥ नारद हा मुनि शुक सनकादिक । उरलें अमूप तुह्मां आह्मां ॥ १ ॥ येथूनियां धना खाती बहुत जन । वाल गुंज उणें जालें नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे धना नाहीं अंतपार । कुंठित हे चार वाचा तेथें ॥ ३ ॥

॥ ४३७९ ॥ कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ॥ धृ० ॥ त्यासि अंतरीं रिझे कोण । जवळी जातां चिळसवाण ॥ १ ॥ प्रेतदेह गौरविलें । तैसें विटंबवाणें जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे खाणें विष्ठा । तैशा देहबुद्धि चेष्टा ॥ ३ ॥

॥ ४३८० ॥ पाया जाला नारू । तेथें बांधला कापुरू । तेथें बिबव्याचें काम । अधमासि तों अधम ॥ धृ० ॥ रुसला गुलाम । धणी करीतो सलाम । तेथें चाकराचें काम । अधमासि तों अधम ॥ १ ॥ रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसी । तेथें बटकीचें काम । अधमासि तों अधम ॥ २ ॥ देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपूजा नावडे त्याला । तेथें पैजारेचें काम । अधमासि तों अधम ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाती । जातीसाठीं खाती माती ॥ ४ ॥

॥ ४३८१ ॥ ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गंवसे परब्रह्म नामें एका ॥ धृ० ॥ लहानथोरासि करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥ १ ॥ सर्वांप्रति माझी हेचि असे विनंती । आठवा श्रीपति मनामाजी ॥ २ ॥ केशव नारायण करितां आचमन । तेचि संध्या स्नान कर्म क्रिया ॥ ३ ॥ नामें करा नित्य भजन भोजन । ब्रह्मकर्म ध्यान याचे पायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हेंचि निर्वाणींचें शस्त्र । ह्मणोनि सर्वत्र स्मरा वेगीं ॥ ५ ॥

॥ ४३८२ ॥ नरदेह वांयां जाय । सेवीं सद्गुरूचे पाय ॥ धृ० ॥ सांडोनियां अहंभाव । धरीं भक्ति पूजीं देव ॥ १ ॥ थोराचिये वाटे । जातां भवशोक आटे ॥ २ ॥ प्रल्हादातें तारी । तुका ह्मणे तो कंठीं धरी ॥ ३ ॥

॥ ४३८३ ॥ संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धि नव जाय ॥ धृ० ॥ ज्याचा जैसा ठेवा तो त्यापाशीं धांवे । न लगती करावे उपदेश ॥ १ ॥ घेऊन उठती आपुलाले गुण । भविष्याप्रमाणें तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ४३८४ ॥ कुरंगीपाडस चुकलेंसे वनीं । फुटे दुःखेंकरोनि हृदय त्याचें ॥ धृ० ॥ तैसा परदेशी जालों तुजविण । नको हो निर्वाण पाहूं माझें ॥ १ ॥ अपराधाच्या कोटि घालीं सर्व पोटीं । नको या शेवटीं उपेक्षूं गा ॥ २ ॥ तुका ह्मणे असों द्यावी माझी चिंता । कृपाळु अनंता पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ४३८५ ॥ धन्य जालों हो संसारीं । आह्मी देखिली पंढरी ॥ धृ० ॥ चंद्रभागे करूं स्नान । पुंडलिकाचें दर्शन ॥ १ ॥ करूं क्षेत्रप्रदक्षिणा । भेटूं संत या सज्जना ॥ २ ॥ उभे राहूं गरुडपारीं । डोळेंभरुनी पाहों हरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाळवंटीं । महालाभ फुकासाठीं ॥ ४ ॥

॥ ४३८६ ॥ पंढरीचा वारकरी । खेपा वैकुंठबंदरीं ॥ धृ० ॥ तया नाहीं आणखी येणें । सदा वैकुंठीं राहाणें ॥ १ ॥ आला गेला केल्या यात्रा । उद्धरिलें कुळा सर्वत्रा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । यासि संदेह कल्पांतींही ॥ ३ ॥

॥ ४३८७ ॥ सोडियेल्या गाई नवलक्ष गोपाळीं । सवें वनमाळी चालियेला ॥ धृ० ॥ सुदीनसुवेळीं भाग्याच्या उदयीं । चारावया गाई वनामाजी ॥ १ ॥ गाईगोपाळांच्या संगें चाले हरी । क्रीडा नानापरि खेळताती ॥ २ ॥ काठी कांबळीया मोहरीया पोंवा । सिदोरी गांजिवा खांद्यावरी ॥ ३ ॥ गोधनें संवगडे खेळे नानापरी । आले भीमातीरीं वेणुनादा ॥ ४ ॥ तेथें उभा ठेला गोपाळांसहित । सिदोरिया सोडीत बैसे तेथें ॥ ५ ॥ तुका ह्मणे ज्यांनीं आणिल्या भाकरी । नेऊनियां हरीपुढें देती ॥ ६ ॥

॥ ४३८८ ॥ ज्यां जैसी आवडी त्यां तैसा विभाग । देत पांडुरंग तृप्ति जाली ॥ धृ० ॥ मुखींचें उच्छिष्ट हिरोनियां खातां । विस्मित विधाता देखोनियां ॥ १ ॥ दिलें जें गोपाळां तें नाहीं कोणासी । विस्मित मानसीं सुरवर ॥ २ ॥ देव ऋषि मुनि सिद्ध हे चारण । शिव मरुद्गण चंद्र सूर्य ॥ ३ ॥ तुका ह्मणे आले सकळहि सुरवर । आनंदें निर्भर पाहावया ॥ ४ ॥

॥ ४३८९ ॥ आले सुरवर नानापक्षी जाले । सकळ अवतरले श्वापदवेषें ॥ धृ० ॥ श्वानखररूपी होऊनियां आले । उच्छिष्ट कवळ वेचिताती ॥ १ ॥ होऊनियां दीन हात पसरिती । मागोनियां घेती उष्टावळी ॥ २ ॥ अभिमान आड घालोनि बाहेरी । तयां ह्मणे हरि ह्यारे धणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे धणी लाधली अपार । तया सुखा पार काय सांगों ॥ ४ ॥

॥ ४३९० ॥ एकमेकीं घेती थडका । पाडी धडका देउनी ॥ धृ० ॥ एकमेका पाठीवरी । बैसोनि करिती ढवाळी ॥ १ ॥ हाता हात हाणे लाही । पळतां घाई चुकविती ॥ २ ॥ तुका ह्मणे लपणी चपणी । एका हाणी पाठीवरी ॥ ३ ॥

॥ ४३९१ ॥ चला वळूं गाई । दूर अंतरल्या भाई ॥ धृ० ॥ खेळ खेळतां जाला शीण । कोण करी वणवण ॥ १ ॥ गाई हकारी कान्हया । ह्मणोनि लागती ते पायां ॥ २ ॥ तुका ह्मणे द्यावें । नाम संकीर्तन बरवें ॥ ३ ॥

॥ ४३९२ ॥ नाहीं संसाराची चाड । गाऊं हरिचें नाम गोड ॥ धृ० ॥ हो का प्राणा-

च्याहीं घात । परि हा न सोडीं अनंत ॥ १ ॥ जन्मोजन्मीं हाचि धंदा । संतसंग राहो सदा ॥ २ ॥ तुका ह्मणे भाव । तो हा जाणा पंढरिराव ॥ ३ ॥

॥ ४३९३ ॥ हरीविण जिणें व्यर्थचि संसारीं । प्रेत अळंकारीं मिरवत । धृ० ॥ देवाविण शब्द व्यर्थचि कारण । भांड रंजवण सभेसी गा ॥ १ ॥ आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ २ ॥ तुका ह्मणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं ॥ ३ ॥

॥ ४३९४ ॥ जालासि पंडित पुराण सांगसी । परि तूं नेणसी मी हें कोण ॥ धृ० ॥ गाढवभरी पोथ्या उलथिशी पानें । परि गुरुगम्यखुणे नेणशी बापा ॥ १ ॥ तुका कुणबियाचा नेणें शास्त्रमत । एक पंढरिनाथ विसंबेना ॥ २ ॥

॥ ४३९५ ॥ स्वप्नींच्या व्यवहारा काळांतर लेखा । जागृतीसि रुका गांठी नाहीं ॥ धृ० ॥ तेवीं शब्दज्ञानें करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकों नये ॥ १ ॥ बोलाचीच कढी बोलाचाची भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ॥ २ ॥ कागदीं लिहिली नांवाची साकर । चाटितां मधुर केवीं लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो जळो त्याचें ज्ञान । यमपुरी कोण वंड साहे ॥ ४ ॥

॥ ४३९६ ॥ भूत नावरे कोणासी । पुंडलिकें खिळिलें त्यासी ॥ धृ० ॥ समचरण असे विटे । कटिकर उभें नीट ॥ १ ॥ वाळुवंटीं नाचती संत । प्रेमामृतें डुल्लत ॥ २ ॥ तुका ह्मणे पुंडलिका । भक्तिबळें तूंचि निका ॥ ३ ॥

॥ ४३९७ ॥ आपुले वरदळ नेदा । एवढी गोविंदा कृपणता ॥ धृ० ॥ यावर तुमचा मोळा । हा गोपाळा कळेना ॥ १ ॥ सेवा तरी घेतां सांग । चोरिलें अंग सहावेना ॥ २ ॥ तुका जसी क्रियानष्ट । तरि कां कष्ट घेतसां ॥ ३ ॥

॥ ४३९८ ॥ भीमातिरींचा नाटक । यानें लावियेलें चेटक ॥ धृ० ॥ मन बुद्धि जाली ठक । नेणे संसाराची टुक ॥ १ ॥ कैशी प्रसंगीक वाणी । प्रत्यादर कडसणी ॥ २ ॥ तुका ह्मणे मोठा ठक । जेथें तेथें उभा ठाके ॥ ३ ॥

॥ ४३९९ ॥ कां रे दाटोन होतां वेडे । देव आहे तुह्मांपुढें ॥ धृ० ॥ ज्यासि पाट नाहीं पोट । करी त्रैलोक्याचा घोंट ॥ १ ॥ तुमची तुह्मां नाहीं सोय । कोणाचें बा काय जाय ॥ २ ॥ तुका गातो नामीं । तेथें नाहीं आह्मी तुह्मी ॥ ३ ॥

॥ ४४०० ॥ नव्हे हें कवित्व टांकसाळी नाणें । घेती भले जन भले लोक ॥ धृ० ॥ लागलासे झरा पूर्ण नवनीतें । सेविलियां हित फार होय ॥ १ ॥ तुका ह्मणे देवा केला बलात्कार । अंगा आलें फार महंतपण ॥ २ ॥

॥ ४४०१ ॥ सांवळें सुंदर पाहे दृष्टिभरी । ऐसें कांहीं करीं मन माझें ॥ धृ० ॥ मना तुज ठाव दिला त्याचे पायीं । राहें विठाबाईसवें सदा ॥ १ ॥ मना नको धरूं आणिक ांचा संग । नाहीं पांडुरंग जया मनीं ॥ २ ॥ वरपंग भाव नको ह्मणे तुका । करीं प्राणसखा नारायण ॥ ३ ॥

॥ ४४०२ ॥ एकलीं वना चालली राना । चोरूनि जना घराचारी ॥ धृ० ॥ कोणी

नाहीं संगीसवें । देहभावें उदास ॥ १ ॥ जाऊनि पडे दुर्वटवनीं । श्वापदांनीं वेढिली ॥ २ ॥ मार्गे न चले जातां पुढें । भय गाढें उदेलें ॥ ३ ॥ मागील मार्गे अंतरलीं । पुढील चाली खोळंबा ॥ ४ ॥ तुका ह्मणे चिंती यासी । हृदयस्थासी आपुल्या ॥ ५ ॥

॥ ४४०३ ॥ पडली घोर रजनी । संगी कोणी नसेची ॥ धृ० ॥ पहा हो कैसे चाल-विलें । पिसें गोवलें लावुनी ॥ १ ॥ कोठें लपविलें तें अंग । होता संग दिला तो ॥ २ ॥ मज कधीं नव्हतें ठावें । दोही भावें वाटोळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैंची उरी न दोहींपरि नाडिलें ॥ ४ ॥

॥ ४४०४ ॥ उदार कृपाळ पतितपावना । ब्रीदें नारायणा जाती वांया ॥ धृ० ॥ वर्णि-लासि श्रुति नेणें तुझा पार । राहे मौनाकार नेति ऐसें ॥ १ ॥ तेथें माझा धांवा पावे कोणीकडे । अदृष्ट हें पुढें वोढवलें ॥ २ ॥ कोण ऐसा भक्त लाधला भाग्यासी । आठवण ऐसी द्यावी तुज ॥ ३ ॥ तुका ह्मणे नको पाहों माझा अंत । जाणोनि हे मात उडी घालीं ॥ ४ ॥

॥ ४४०५ ॥ ज्याचें जैसें भावी मन । त्यासि देणें दरुषन ॥ धृ० ॥ पुरवूं जाणें मनिची खूण । समाधान करोनी ॥ १ ॥ आपणियातें प्रगट करी । छाया वरी कृपेची ॥ २ ॥ तुका ह्मणे केलें दान । मन उन्मन हरिनामीं ॥ ३ ॥

॥ ४४०६ ॥ कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥ धृ० ॥ वस्ति क्षीरसा-गरवासी । आला उभा पंढरीसी ॥ १ ॥ भक्ति देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ २ ॥ तुका ह्मणे बळी । तूंचि एक भूमंडळीं ॥ ३ ॥

॥ ४४०७ ॥ शेवटींची विनंती । ऐका ऐका कमळापती ॥ धृ० ॥ काया वाचा मन । चरणीं असे समर्पण ॥ १ ॥ जीवपरमात्मा ऐक्यासी । सदा वसो हृदयेंसी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । कंठीं वसावें केशवा ॥ ३ ॥

॥ ४४०८ ॥ माझें परिसावें गाऱ्हाणें । चित्त द्यावें नारायणें ॥ धृ० ॥ माझे हृदयींचें वर्म । देवा जाणशी तूं कर्म ॥ १ ॥ सबाह्यअंतरसाक्ष । ऐसा वेदीं केला पक्ष ॥ २ ॥ तुका ह्मणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ३ ॥

॥ ४४०९ ॥ गुरूचिया मुखें होइल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमखूण विठोबाची ॥ धृ० ॥ वेदातें विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥ १ ॥ तुका ह्मणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत ॥ २ ॥

॥ ४४१० ॥ देव आतां आह्मीं केला असे ऋणी । आणिका वांचुनी काय गुंता ॥ धृ० ॥ एकाचें आर्जव करूं एकनिष्ठ । आणिकांचा बोभाट कामा नये ॥ १ ॥ बहु-तांचें आर्जव केलिया खटपट । नाहीं हा शेवट शुद्ध होत ॥ २ ॥ पुरता विचार आणोनी मानसीं । अंतरलों सर्वांसी पाईं देखा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा चरणीं असो भाव । तेणें माझा जीव संतोष हा ॥ ४ ॥

॥ ४४११ ॥ पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहूनि अंधळा बराच मी ॥ धृ० ॥ निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनि ठेवीं देवा ॥ १ ॥ अपवित्र वाणी नको

माझ्या मुखा । त्याजहुनी मुका बराच मी ॥ २ ॥ नको मज कधीं परस्त्रीसंगती । जनांतून माती उठतां भली ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज अवघ्याचा कांटाळा । तूं एक गोपाळा आवडसी ॥ ४ ॥

॥ ४४१२ ॥ कीर्त्तनाचा विकरा मातेचें गमन । भाड खाई धन विटाळ तो ॥ धृ० ॥ हरिभक्ताची माता हे हरिगुणकीर्त्ती । इजवर पोट भरिती चांडाळ ते ॥ १ ॥ अंत्यज हा ऐसें कल्पांतीं करींना । भाड हे खाईना जननीची ॥ २ ॥ तुका ह्मणे त्याचें दर्शनही खोटें । पूर्वजांसी नेटें नरका धाडी ॥ ३ ॥

॥ ४४१३ ॥ पंढरी पावन जालें माझें मन । आतां करूं ध्यान विठोबाचें ॥ धृ० ॥ आतां ऐसें करूं नाम गाऊं गीतीं । सुखाचा सांगाती विठो करूं ॥ १ ॥ संग करूं त्याचा तो सखा आमचा । अनंता जन्मांचा मायबाप ॥ २ ॥ परतोनि सोई धरीं कां रे मना । विठ्ठलचरणा घालीं मिठी ॥ ३ ॥ घातलीसे मिठी नाहीं भक्तिभाव । उदार पंढरिराव तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४४१४ ॥ येईं गे विठ्ठले विश्वजीवनकले । सुंदर घननीळे पांडुरंगे ॥ धृ० ॥ येईं गे विठ्ठले करुणाकल्लोळे । जीव कळवळे भेटावया ॥ १ ॥ न लगती गोड आणिक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ॥ २ ॥ तुका ह्मणे धांव घालीं कृष्णाबाई । क्षेम चहूंबाहीं देईं मज ॥ ३ ॥

॥ ४४१५ ॥ कटावरी कर कासया ठेविले । जननी विठ्ठले जीवलगे ॥ धृ० ॥ शंखचक्रगदाकमळमंडित । आयुधें मंडित कृष्णाबाई ॥ १ ॥ क्षण एक धीर होत नाहीं चित्ता । केव्हां पंढरिनाथा भेटशील ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंचि करीं देईं क्षेमा । तईंच विश्रामा पावईन ॥ ३ ॥

॥ ४४१६ ॥ आतां मोकलावें नव्हे हें उचित । तरी कृपावंत ह्मणवावें ॥ धृ० ॥ पूर्वी भक्त जाले सर्व आपंगिले । नाहीं उपेक्षिले तुह्मीं कोणी ॥ १ ॥ माझिया वेळेसि कां गा लपालासी । विश्व पोसितोसि लपोनियां ॥ २ ॥ करावी ह्मणावी सर्वां भूतीं दया । तरी भेटावया येईन मी ॥ ३ ॥ तरी माझे हातीं देईं मनबुद्धी । जरि दयानिधि येशील तूं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूंचि अवघा सूत्रधारी । माझी सत्ता हरि काय आहे ॥ ५ ॥

॥ ४४१७ ॥ माझें कोण आहे तुजविण देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ धृ० ॥ वाट पाहतसें कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ॥ १ ॥ साच करीं हरि आपुली ब्रिदावळी । कृपेनें सांभाळीं महाराजा ॥ २ ॥ क्षमा करीं सर्व अपराध माझा । लडिवाळ मी तुझा पांडुरंगा ॥ ३ ॥ साह्य होसी तरी जाती साही वैरी । मग सुखें अंतरीं ध्यान तुझें ॥ ४ ॥ कृपा करोनि देईं दया क्षमा शांती । तेणें तुझी भक्ति लाभईल ॥ ५ ॥ माझें हें सामर्थ्य नव्हे नारायणा । जरी कांहीं करुणा येईल तुज ॥ ६ ॥ तुका ह्मणे मज कैसें आपंगा जी । आपुलेंसें करा जी पांडुरंगा ॥ ७ ॥

॥ ४४१८ ॥ अपराध जाले जरी असंख्यात । तरी कृपावंत नाम तुझें ॥ धृ० ॥ तुझें लडिवाळ तुज कृपा यावी । म्यां वाट पाहावी कवणाची ॥ १ ॥ मायबाप माझा रुक्मादे-

देवीवर । हा दृढ निर्धार अंतरींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे कोणे गोष्टीचें संक
मज भेट नारायण ॥ ३ ॥

॥ ४४१९ ॥ आधीं कां मज लावियेली सवे । आतां न राहवे तुजवि
पाहिलेंचि तोंडक कां गा नाहीं केलें । आतां उपेक्षिलें न सोडीं मी ॥
सागरा न पाहें निर्वाण । जालों तुजवीण कासावीस ॥ २ ॥ तुका ह्मणे व
हरी । येईं झडकरी पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ४४२० ॥ बा रे पांडुरंगा केव्हां येशी भेटी । जाहालों हिंपुटी तुजवी
तुजविण सखें न वटे मज कोणी । वाटतें चरणीं घालूं मिठी ॥ १ ॥ ओवा
चरणांवरोनी । केव्हां चक्रपाणी भेटशील ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी पुरवीं
घालीं उडी नारायणा ॥ ३ ॥

॥ ४४२१ ॥ पंचाग्निसाधन करूं धूम्रपान । काय तीर्थाटण करूं सांग
कोणे देशीं आहे तुझें गांव । घेऊनियां धांव येऊं तेथें ॥ १ ॥ सांग कांहीं
करूं व्रत । जेणें कृपावंत होशील तूं ॥ २ ॥ वाटतें सेवटीं जालासि निष्ठु
उत्तर तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ४४२२ ॥ तुजविण तीळभरी रिता ठाव । नाहीं ऐसें विश्व बोल
बोलियेले योगी मुनि साधु संत । आहेसि या आंत सर्वांठायीं ॥ १ ॥ मी
आलों शरणागत । पूर्वीचें अपत्य आहें तुझें ॥ २ ॥ अनंत ब्रह्मांडें भरो
मजला जालासि कोठें नाहीं ॥ ३ ॥ अंतपार नाहीं माझिया रूपासी । क
भेट देऊं ॥ ४ ॥ ऐसें विचारिलें ह्मणोनि न येशी । सांग हृषीकेशी मा
तुका ह्मणे काय करावा उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥ ६ ॥

॥ ४४२३ ॥ काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे
घवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ १ ॥ आतां कैंचा मज
यण । गेला अंतरोन पांडुरंग ॥ २ ॥ तुका ह्मणे व्यर्थ मोलाचें शरीर । के
कळों आला ॥ ३ ॥

॥ ४४२४ ॥ नव्हे निष्ठावंत तुज काय बोल । सेवेविण मोल मागतसें ॥
भजन शुद्ध भावनिष्ठा । आपुल्या अदृष्टावरी बोल ॥ १ ॥ पूर्वीं जाले
विरक्त । काम क्रोध अहंते निर्दाळिलें ॥ २ ॥ ऐसी अंगवण नाहीं मज देव
हेवा भेटायाचा ॥ ३ ॥ कृपा करोनियां पुरवीं असोसी । आपुल्या ब्रिदा
॥ ४ ॥ तुका ह्मणे एक बाळक अज्ञातें । त्यासि हे पोसित मायबापें ॥ ५ ॥

## नाटाचे.

॥ ४४२५ ॥ अगा ये मधुसूदना माधवा । अगा ये कमळापति यादवा ।
केशवा । अगा बांधवा द्रौपदीच्या ॥ धृ० ॥ अगा विश्वव्यापका जनार्दना ।
गोपिकारमणा । अगा गुणनिधि गुणनिधाना । अगा मर्दना कंसाचिया

सर्वोत्तमा सर्वेश्वरा । गुणातीता विश्वंभरा । अगा निर्गुणा निराकारा । अगा आधारा दीनाचिया ॥ २ ॥ अगा उपमन्यसंहाकारा । अगा शयना फणिवरा । अगा काळकृतांत असुरा । अगा अपारा अलक्षा ॥ ३ ॥ अगा वैकुंठनिवासा । अगा अयोध्यापति राजहंसा । अगा ये पंढरिनिवासा । अगा सर्वेशा सहजरूपा ॥ ४ ॥ अगा परमात्मा परमपुरुषा । अगा अव्यया जगदीशा । अगा कृपाळुवा आपुल्या दासा । तोडीं भवपाशा तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४४२६ ॥ कैसी करूं तुझी सेवा । ऐसें सांगावें जी देवा । कैसा आणूं अनुभवा । होशी ठावा कैशापरी ॥ धृ० ॥ कर्मभ्रष्ट माझें मन । नेणें जप तप अनुष्ठान । नाहीं इंद्रियांसि दमन । नव्हे मन एकविध ॥ १ ॥ नेणें यातीचा आचार । नेणें भक्तीचा विचार । मज नाहीं संतांचा आधार । नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ २ ॥ न सुटे मायाजाळ । नाहीं वैराग्याचें बळ । न जिंकवती सबळ । काम क्रोध शरीरीं ॥ ३ ॥ आतां राख कैसें तरी । मज नुपेक्षावें हरी । तुझीं ब्रीदें चराचरीं । तैसीं साच करीं तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४४२७ ॥ भीमातीरवासी । तेथें निश्चयेंसी काशी ॥ धृ० ॥ मुख्यमुक्तीचें माहेर । ऐसें जाणा पंढरपुर ॥ १ ॥ घडे भींवरेशीं स्नान । त्यासी पुन्हा नाहीं जन्म ॥ २ ॥ भाव धरोनि नेटका । मोक्ष जवळी ह्मणे तुका ॥ ३ ॥

॥ ४४२८ ॥ जाली गाढवी दुधाळ । महिमा गाईची पावेल ॥ धृ० ॥ श्वान जालेंसे चांगलें । तरी कां सांगातें जेवील ॥ १ ॥ जाली सिंदळा चांगली । तरि कां पतिव्रता जाली ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा जाती । काय उंचपण पावती ॥ ३ ॥

॥ ४४२९ ॥ काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीची जाण एक यात्रा ॥ धृ० ॥ काशी देह विटंबणें द्वारके जाळणें । पंढरीशी होणें ब्रह्मरूप ॥ १ ॥ अठरापगड यातीं सकळाहि वैष्णव । दुजा नाहीं भाव पंढरीसी ॥ २ ॥ तुका ह्मणे असो अथवा नसो भाव । दर्शनें पंढरिराव मोक्ष देतो ॥ ३ ॥

॥ ४४३० ॥ हेंचि मागणें विठाबाई । पायीं ठेवूनियां डोई ॥ धृ० ॥ शांति दया अंतःकरणीं । रंगो रामनामीं वाणी ॥ १ ॥ मूळ द्वंद्वाचें विघडो । निजानंदीं वृत्ति जडो ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । आतां आपुलेंसें करीं ॥ ३ ॥

॥ ४४३१ ॥ करोनि स्नानविधि आणि देवधर्म । क्रिया नित्यनेम तुजसाठीं ॥ धृ० ॥ तुजलागीं दानें तुजलागीं तीर्थें । सकळही व्रतें तुजलागीं ॥ १ ॥ सकळ चित्तवृत्ति दिवस आणि राती । आवडशी प्रीति नारायणा ॥ २ ॥ तुका ह्मणे याहो पवित्राच्या राया । प्राणविसावया पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ४४३२ ॥ पहावा नयनीं विठ्ठलचि एक । कांहीं तरी सार्थक संसाराचें ॥ धृ० ॥ कोठें पाहों तुज कां गा लपालासी । कांहीं बोल मशीं नारायणा ॥ १ ॥ वाटतें उदास मज दाही दिशा । तुजविण हृषीकेशा वांचोनियां ॥ २ ॥ नको ठेवूं मज आपणा वेगळें । बहुत कळवळें तुजलागीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी देईं नारायणा । घडी कंठवेना तुजविण ॥ ४ ॥

॥ ४४३३ ॥ पूर्वीं बहुतांचे केले प्रतिपाळ । तें मज सकळ श्रुत आहे ॥ धृ० ॥ अज अविनाश निर्गुण निरामय । विचारिलें काय त्यांचे वेळे ॥ १ ॥ तयांचिये वेळे होशी कृपावंत । माझाचि कां अंत पहातोसी ॥ २ ॥ नारद प्रल्हाद उपमन्यु धुरू । त्यांचा अंगिकारु कैसा केला ॥ ३ ॥ अंबऋषीसाठीं गर्भवास जाले । कां गा मोकलिलें कृपासिंधू ॥ ४ ॥ धर्माचें उच्छिष्ट अर्जुनाचीं घोडीं । आणिक सांकडीं कितीएक ॥ ५ ॥ जालासि लुगडीं तया द्रौपदीचीं । न ये कां आमुची कृपा कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे कां गा जालासि कठीण । माझा भाग सीण कोण जाणे ॥ ७ ॥

॥ ४४३४ ॥ कासयासि व्यर्थ घातलें संसारीं । होतें तैसें जरी तुझे चित्तीं ॥ धृ० ॥ तुझिये भेटीची थोर असे आस । दिसोनी निरास आली मज ॥ १ ॥ आतां काय जिणें जालें निरर्थक । वैकुंठनायक भेटेचि ना ॥ २ ॥ आडलासि काय कृपेच्या सागरा । रुकुमादेवीवरा सोइरिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे देईं चरणाची सेवा । नुपेक्षीं केशवा मायबापा ॥ ४ ॥

॥ ४४३५ ॥ पक्षियाचे घरीं नाहीं सामुगरी । त्यांची चिंता करी नारायण ॥ धृ० ॥ अजगर जनावर वारुळांत राहे । त्याजकडे पाहे पांडुरंग ॥ १ ॥ चातक हा पक्षी नेघे भूमिजळ । त्यासाठीं घननीळ नित्य वर्षे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी पिप्पलिकांची जात । पुरवीं मनोरथ पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ४४३६ ॥ रामनाम हाचि मांडिला दुकान । आहे वानोवाण ध्यारे कोणी ॥ धृ० ॥ नका कोणी करूं घेतां रे आळस । वांटितों तुह्मांस फुकाचें हें ॥ १ ॥ संचितासारिखें पडे त्याच्या हाता । फारसें सांगतां तरी न ये ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मीं सांठविलें सार । उरलिया थार विचारितां ॥ ३ ॥

॥ ४४३७ ॥ बहुजन्मां शेवटीं स्वामि तुझी भेटी । बहु मोह पोटीं थोर जाला ॥ धृ० ॥ बहु पुरें पाहिलीं बहु दिशा शोधिली । बहु चिंता वाहिली दुर्भराची ॥ १ ॥ बहु काळ गेले अनुचित केलें । बहु नाहीं गाइलें नाम तुझें ॥ २ ॥ ऐसा मी अपराधी अगा कृपानिधी । बहु संतां संनिधि ठेवीं तुका ॥ ३ ॥

॥ ४४३८ ॥ कोण तो उपाव करूं भेटावया । जाळावी हे काया ऐसें वाटे ॥ धृ० ॥ सोडोनियां गांव जाऊं वनांतरा । रुकुमादेवीवरा पहावया ॥ १ ॥ करूं उपवास शोधूं हें शरीर । न धरवे धीर नारायणा ॥ २ ॥ जाती आयुष्याचे दिवस हे चारी । मग केव्हां हरि भेटशील ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं सांगा विचारोनी । विठो तुझे मनीं असेल तें ॥ ४ ॥

॥ ४४३९ ॥ माय बाप बंधु सोइरा सांगाती । तूंचि माझी प्रीति गण गोत ॥ धृ० ॥ शरण आलीं त्यांचीं वारिलीं दुरितें । तारिले पतित असंख्यात ॥ १ ॥ इतर कोण जाणें पावले विश्रांती । न येतां तुजप्रति शरणागत ॥ २ ॥ तयामध्यें मज ठेवीं नारायणा । लक्षुमीरमणा सोइरिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे देईं दर्शनाचा लाभ । जे पाय दुर्लभ ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

॥ ४४४० ॥ पाप ताप माझे गुणदोष निवारीं । कृष्णा विष्णु हरि नारायणा ॥ धृ० ॥ काम क्रोध वैरी घालोनि बाहेरी । तूं राहें अंतरीं पांडुरंगा ॥ १ ॥ करिशील तरी नव्हे काइ एक । निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥ २ ॥ समर्थासि काय आह्मीं शिकवावें । तुका ह्मणे यावें पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ४४४१ ॥ ये गा महाविष्णु अनंतभुजाच्या । आह्मां अनाथांच्या माहेरा ये ॥ धृ० ॥ भेटावया तुज ओढे माझा जीव । एकवेळा पाय दावी डोळां ॥ १ ॥ आणिक हें आर्त नाहीं नारायणा । ओढे हे वासना भेटावया ॥ २ ॥ वाटे चित्तीं काय करावा विचार । चरण सुंदर पहावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझे पुरवीं मनोरथ । येईगा न संवरीत पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ४४४२ ॥ काय पाहतोसि कृपेच्या सागरा । नराच्या नरेंद्रा पांडुरंगा ॥ धृ० ॥ नामाचा प्रताप ब्रीदाचा बडिवार । करावा साचार नारायणा ॥ १ ॥ कलीमाजी देव बौध्यरूप जाला । जगाचिया बोला लागूं नका ॥ २ ॥ माय पुत्रा काय मारूं पाहे काळीं । जगाची ढवाळी काय काज ॥ ३ ॥ तुका ह्मणे याहो कृपेच्या सागरा । रुकुमादेवीवरा मायबापा ॥ ४ ॥

॥ ४४४३ ॥ रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥ धृ० ॥ धन्य तो एक संसारीं । रामनाम जो उच्चारी ॥ १ ॥ रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ २ ॥ तुका ह्मणे रामनामीं । कृत्यकृत्य जालों आह्मी ॥ ३ ॥

॥ ४४४४ ॥ येइल घरा देव न धरीं संदेहा । फकिराचा यावा व्हावा जेव्हां ॥ धृ० ॥ होइल फकीर योगी महानुभाव । घडीघडी देव सांभाळील ॥ १ ॥ तुका ह्मणे ऐसें बोलती बहुत । येणें गुणें संत जाले राम ॥ २ ॥

॥ ४४४५ ॥ भक्तीविण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥ धृ० ॥ वीसलक्ष योनि वृक्षामाजी घ्याव्या । जलचरीं भोगाव्या नवलक्ष ॥ १ ॥ अकरालक्ष योनि किड्यांमाजी घ्याव्या । दशलक्ष भोगाव्या पक्ष्यांमध्यें ॥ २ ॥ तीसलक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवाभीतरीं चारलक्ष ॥ ३ ॥ एकएक योनि कोटिकोटि फेरा । मनुष्य देहाचा वारा मग लागे ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ५ ॥

॥ ४४४६ ॥ तुजवांचून कोणा शरण । जाऊं आतां कर जोडून ॥ धृ० ॥ कोण करील माझें साहे । चित्तीं विचारूनि पाहें ॥ १ ॥ तूं तंव कृपेचा सागर । दीनबंधु जगदोद्धार ॥ २ ॥ तुका ह्मणे निका । भवसिंधु तारक नौका ॥ ३ ॥

॥ ४४४७ ॥ हातीं धरिलियाची लाज । देवा असों दे गा तुज ॥ धृ० ॥ आहें अमंगळ दुर्बळ । होईं दीन तूं दयाळ ॥ १ ॥ बाळ शेंबडें मातेसी । काय नावडे तियेसी ॥ २ ॥ तुका ह्मणे जाणें । करीन देहाचें सांडणें ॥ ३ ॥

॥ ४४४८ ॥ जळोजळो तें गुरुपण । जळोजळो तें चेलेपण ॥ धृ० ॥ गुरु आला

वेशीद्वारीं । शिष्य पळती खिडोरीं ॥ १ ॥ काशासाठीं जालें येणें । त्याचें आलें वर्षासन ॥ २ ॥ तुका ह्मणे चेला । गुरु दोघेहि नरकाला ॥ ३ ॥

॥ ४४४९ ॥ अगा पंढरीच्या राया । वेगीं येईं तूं सावया ॥ धृ० ॥ दीनबंधु तुझें नाम । देईं आपुलें आह्मां प्रेम ॥ १ ॥ जीवनकळा तूं विश्वाची । तूंचि माउली अनाथाची ॥ २ ॥ तुका ह्मणे पुंडलिका । ठेवीं मस्तकीं पादुका ॥ ३ ॥

॥ ४४५० ॥ विटेवरी समचरण । तो हा रुक्मिणीरमण ॥ धृ० ॥ वेदशास्त्रा माहेर । केले दासा उपकार ॥ १ ॥ नामापाशीं चारी मुक्ती । पहा हृदयीं प्रतिती ॥ २ ॥ तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ३ ॥

॥ ४४५१ ॥ सकळ हे माया नागवे कवणा । भांबाविलें जना दाही दिशा ॥ धृ० ॥ आशा तृष्णा दंभ लागलीं हीं पाठीं । नेदी बैसों हाटीं मोह ठायीं ॥ १ ॥ काम क्रोध घरा लावितील आगी । निंदा हिंसा दोघी पळतां खाती ॥ २ ॥ लाज पुढें उभी राहिली आडवी । ते करी गाढवी थोर घात ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंता घाली गर्भवासीं । ओढोनियां पाशीं चहूंकडे ॥ ४ ॥

॥ ४४५२ ॥ सकळतीर्थांहुनी । पंढरी हे मुगुटमणी ॥ धृ० ॥ काय सांगों तेथिल शोभा । रमावल्लभ जेथें उभा ॥ १ ॥ न लभे व्रततीर्थदानीं । तें या विठ्ठलदर्शनीं ॥ २ ॥ साधु संत गाती नाम । सकळ भूतांचा विश्राम ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्तुती । करूं काय सांगों किती ॥ ४ ॥

॥ ४४५३ ॥ गव्हांच्या घुगऱ्या । नाचण्यांच्या पुऱ्या । बऱ्या त्याचि बऱ्या । पाधाणी त्या पाधाणीं ॥ धृ० ॥ काय थोरपण । वांयां जाळावा तो शीण । कारणापें भिन्न । निवडे तें निराळें ॥ १ ॥ रुचि वोजेपाशीं । गरज ते जैशी तैशी ॥ करूं नका नाशी । खावें खाणें जालें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मोठा । काय करावा तो ताठा । नाहीं वीण नीटा । पाविजेत मारग ॥ ३ ॥

॥ ४४५४ ॥ आपुलिया ऐसें करी । संग धरी ज्याचा हो ॥ धृ० ॥ ह्मणऊनि परपरतें । वरवरतें पळतसें ॥ १ ॥ लोभिक तें लोभा लावी । बांधल्या गोवी वांचुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे नामगोठी । पुरे भेटी तुझी देवा ॥ ३ ॥

॥ ४४५५ ॥ बरें जालियाचे अवघे सांगाती । वाइटाचे अंतीं कोणी नाहीं ॥ धृ० ॥ नोहे मातापिता नोहे कांतासुत । इतरांची मात काय सांगों ॥ १ ॥ तुका ह्मणे जन दुतोंडी सावज । सांपडे सहज तिकडे धरी ॥ २ ॥

॥ ४४५६ ॥ मिथ्या आहे सर्व अवघें हें मायिक । न कळे विवेक मज कांहीं ॥ धृ० ॥ सर्व बाजागिरी वाटती ही खरी । पहातां येथें उरी कांहीं नाहीं ॥ १ ॥ आतां मज दुःख वाटतें अंतरीं । उपाय झडकरी सांग कांहीं ॥ २ ॥ पुढें कोण गति न कळे सर्वथा । तुझे पायीं माथा ठेवियेला ॥ ३ ॥ करणें तें करीं सुखें आतां हरी । तुज म्यां निर्धारीं धरियेलें ॥ ४ ॥ स्वहित तें काय न कळे सर्वथा । तारीं तूं अनंता तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४४५७ ॥ अवघ्या कोल्ह्यांचें वर्म अंडीं । धरितां तोंडीं खीळ पडे ॥ धृ० ॥ भुंकूं

नका भुंकूं नका । आला तुका विष्णुदास ॥ १ ॥ कवणे ठायीं सादर व्हावें । नाहीं ठावें गाढवा ॥ २ ॥ दुर्जनासि पंचानन । तुका रजरेणु संतांचा ॥ ३ ॥

॥ ४४५८ ॥ तुझें ह्मणों आह्मां । मग उणें पुरुषोत्तमा ॥ धृ० ॥ ऐसा धर्म काय । अमृतानें मृत्यु होय ॥ १ ॥ कल्पवृक्षा तळीं । गांठी बांधलिया झोळी ॥ २ ॥ तुका ह्मणे परीस । सांपडल्या उपवास ॥ ३ ॥

॥ ४४५९ ॥ कोरडिया गोष्टी नावडती मना । नाहीं ब्रह्मज्ञानाविण चाड ॥ धृ० ॥ दाखवीं आपुलें सगुण रूपडें । वंदीन मीं कोडें पाय तुझे ॥ १ ॥ न लगे तो मोक्ष मज सायुज्यता । नावडे हे वार्ता शून्याकारी ॥ २ ॥ तुका ह्मणे चाड धरीन श्रीमुखें । येशिल कवतुकें जवळीक ॥ ३ ॥

॥ ४४६० ॥ गणेश सारजा करिती गायना । आणि देवांगना रंभे ऐशा ॥ धृ० ॥ तेथें आह्मीं मानवांहीं विनवावें तें काय । सुरवर पाय वंदिति जेथें ॥ १ ॥ ज्याच्या गायनासि तटस्थ शंकर । त्याहि परि पार न कळे तुझा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी किंकर ते किती । इंद्राचीहि मति नागविशी ॥ ३ ॥

॥ ४४६१ ॥ डोळियांचें दैव आजि उभें ठेलें । निधान देखिलें पंढरीये ॥ धृ० ॥ काय तें वानावें वाचेचे पालवें । वेदा न बोलवे रूप ज्याचें ॥ १ ॥ आनंदाच्या रसें ओंतीव चांगलें । देखतां रंगलें चित्त माझें ॥ २ ॥ तुका ह्मणे मी तों सगळाच विरालों । विठ्ठलचि जालों दर्शनानें ॥ ३ ॥

॥ ४४६२ ॥ भोगियेल्या नारी । परि तो बाळब्रह्मचारी ॥ धृ० ॥ ऐसी ज्याचे अंगीं कळा । पार न कळे वेदाला ॥ १ ॥ बळीबळी थोरथोर । मोडोनियां केले चूर ॥ २ ॥ वांकडी कुबज्या । सरसी आणियेली वोजा ॥ ३ ॥ मल्ल रगडिला पायीं । गज झुगारिला बाहीं ॥ ४ ॥ जिवें मारियेला मामा । धांवे भक्ताचिया कामा ॥ ५ ॥ तुका ह्मणे पूर्ण । दावी भक्तीचीं विंदानें ॥ ६ ॥

॥ ४४६३ ॥ वृद्धपणीं आली जरा । शरीर कांपे थरथरा ॥ धृ० ॥ आयुष्य गेलें हें कळेना । स्मरा वेगीं पंढरिराणा ॥ १ ॥ दांत दाढा पडिल्या ओस । हनुवटि भेटे नाकास ॥ २ ॥ हात पाय राहिले कान । नेत्रा पाझर हाले मान ॥ ३ ॥ अंगकांति परतली । चिरगुटा ऐसी जाली ॥ ४ ॥ आड पडे जिव्हा लोटे । शब्द नये मुखा वाटे ॥ ५ ॥ लांब लोंबताती अंड । भरभरा वाजे गांड ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां तरी । स्मरा वेगीं हरि हरी ॥ ७ ॥

॥ ४४६४ ॥ वृद्धपणीं न पुसे कोणी । विटंबणी देहाची ॥ धृ० ॥ नव द्वारें जाली मोकळीक । गांड सरली वाजती ॥ १ ॥ दंत दाढा गळे थुंका । लागे नाका हनुवटी ॥ २ ॥ शब्द नये मुखावाटा । करिती चेष्टा पोरें तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे अजून तरी । स्मरें श्रीहरि सोडवील ॥ ४ ॥

॥ ४४६५ ॥ अतित्याई देतां जीव । नये कींव देवासी ॥ धृ० ॥ थोड्यासाठीं राग

आला । जीव दिला गंगेंत ॥ १ ॥ त्यासि परलोकिं नाहीं मुक्ती । अधोगति चुकेना ॥२॥ तुका ह्मणे कृष्णराम । स्मरतां श्रम वारती ॥ ३ ॥

॥ ४४६६ ॥ तुझें रूप पाहतां देवा । सुख जालें माझ्या जीवा ॥ धृ० ॥ हें तों वाचे बोलवेना । काय सांगों नारायणा ॥ १ ॥ जन्मोजन्मींचें सुकृत । तुझे पायीं रमे चित्त ॥ २ ॥ जरी योगाचा अभ्यास । तेव्हां तुझा निजध्यास ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्त । गोड गाऊं हरिचे गीत ॥ ४ ॥

॥ ४४६७ ॥ तुजवीण मज कोण आहे देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ धृ० ॥ जोडोनियां कर कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ॥ १ ॥ साच करीं हरि आपुली ब्रिदावळी । कृपेनें सांभाळीं मायबापा ॥ २ ॥ साह्य होसी जरी जाती सहा वैरी । मग ध्यान करीं आवडीनें ॥ ३ ॥ सर्व अपराध क्षमा करीं माझा । लडिवाळ तुझा पांडुरंगा ॥ ४ ॥ कृपा करोनियां द्यावी क्षमा शांती । तेणें तुझी भक्ति घडेल देवा ॥ ५ ॥ ऐसें तों सामर्थ्य नाहीं नारायणा । जरी तुज करुणा येइल कांहीं ॥ ६ ॥ तुका ह्मणे आतां आपंगावें मज । राखें माझी लाज पांडुरंगा ॥ ७ ॥

॥ ४४६८ ॥ नको विद्या वयसा आयुष्य फारसें । नाहीं मज पिसें मुक्तीचें ही ॥ धृ० ॥ रामकृष्ण ह्मणतां जावो माझा प्राण । हेंचि कृपादान मागतसें ॥ १ ॥ नको धन मान न वाढो संतान । मुखीं नारायण प्राण जावा ॥ २ ॥ तुका ह्मणे दीन काकुलती येतों । तुज निरवितों पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ४४६९ ॥ शिष्या सांगे उपदेश । गुरुपूजा हे विशेष ॥ धृ० ॥ दावी आचार सोंवळे । दंडकमंडलु माळे ॥ १ ॥ छाटी भगवी मानसीं । व्यर्थ ह्मणवी संन्यासी ॥ २ ॥ तुका ह्मणे लोभ । न सुटे नाहीं लाभ ॥ ३ ॥

॥ ४४७० ॥ जिकडे पाहें तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ धृ० ॥ डोळां बैसलें बैसलें । रूप राहोनि संचलें ॥ १ ॥ न वर्जितां दाही दिशा । जिकडे पाहें तिकडे सरिसा ॥ २ ॥ तुका ह्मणे समपदीं । उभा दिठीचिये आधीं ॥ ३ ॥

॥ ४४७१ ॥ आपटा संवदड रानचारा । दसऱ्याचा होय तुरा ॥ धृ० ॥ तैसा देवामुळें मान । नाहीं तरी पुसे कोण ॥ १ ॥ मृत्तिकेची ते घागरी । पाण्यासाठीं बैसे शिरीं ॥ २ ॥ तुका ह्मणे माप जाण । दाण्यासवें घेणें देणें ॥ ३ ॥

॥ ४४७२ ॥ काळ सार्थक केला त्यांणीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ धृ० ॥ नाम वाचे श्रवण कीर्ति । पाउलें चित्तीं समान ॥ १ ॥ कीर्त्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वरूपसिद्धी । नित्य समाधि हरिनामीं ॥ ३ ॥

॥ ४४७३ ॥ आह्मी जातों आपुल्या गांवा । आमुचा रामराम घ्यावा ॥ धृ० ॥ तुमची आमची हेचि भेटी । येथुनियां जन्मतुटी ॥ १ ॥ आतां असों द्यावी दया । तुमच्या लागतसें पायां ॥ २ ॥ येतां निजधामीं कोणी । विठ्ठलविठ्ठल बोला वाणी ॥ ३ ॥ रामकृष्ण मुखीं बोला । तुका जातो वैकुंठाला ॥ ४ ॥

॥ ४४७४ ॥ कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥ धृ० ॥ ऐसें आह्मां

मांडियेलें । विठो त्वां कां सांडियेलें ॥ १ ॥ बैसोनि कल्पद्रुमातळीं । पोटासाठीं तळमळी ॥ २ ॥ तुका ह्मणे नारायणा । बरें लोकीं हें दीसेना ॥ ३ ॥

॥ ४४७५ ॥ तुझें नाम माझे मुखीं असो देवा । विनवितों राघवा दास तुझा ॥ धृ० ॥ तुझ्या नामबळें तरले पतित । ह्मणोनि माझें चित्त तुझे पायीं ॥ १ ॥ तुका ह्मणे तुझें नाम हें सादर । गातां निरंतर सुख वाटे ॥ २ ॥

॥ ४४७६ ॥ उभय भाग्यवंत तरीच समान । स्थळीं समाधान तरीच राहे ॥ धृ० ॥ युक्तीचें गौरव नसतां जिव्हाळा । सांचवणी जळा परी नाश ॥ १ ॥ लोखंडा परीस ज्ञानिया तो शठ । नांवाचा पालट दगड खरा ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे विनोदाचे ठाव । एकात्मक भाव नाहीं तेथें ॥ ३ ॥

॥ ४४७७ ॥ दो दिवसांचा पाहुणा चालतो उताणा । कां रे नारायणा न भजसी ॥ धृ० ॥ तूं अखंड दुश्चित्ता तुज नेती अवचिता । मग पंढरिनाथा भजसी केव्हां ॥ १ ॥ तुका ह्मणे ऐसे आहेत उदंड । तया केशव प्रचंड केवीं भेटे ॥ २ ॥

॥ ४४७८ ॥ तुझे पाय माझें भाळ । एकत्रता सर्वकाळ ॥ धृ० ॥ हेंचि देईं विठाबाई । पांडुरंगे माझे आई ॥ १ ॥ नाहीं मोक्ष मुक्ति चाड । तुझी सेवा लागे गोड ॥ २ ॥ सदा संग सज्जनांचा । नको वियोग पंढरीचा ॥ ३ ॥ नित्य चंद्रभागे स्नान । करीं क्षेत्रप्रद-क्षण ॥ ४ ॥ पुंडलिक पाहोन दृष्टी । हर्षें नाचों वाळवंटीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । तुझें स्वरूप चंद्रभागा ॥ ६ ॥

॥ ४४७९ ॥ बाईल चालिली माहेरा । संगें दिधला ह्मातारा ॥ धृ० ॥ सिधा सामग्री पोटाची । सवें स्वारी बइलाची ॥ १ ॥ जातां पाडिली ढोरानें । सिव्या देती अन्योविन्ये ॥ २ ॥ न सावरी आपणातें । नग्न सावलें वरतें ॥ ३ ॥ फजित केलें जनलोकीं । मेला ह्मणे पडे नरकीं ॥ ४ ॥ गोहाची हे गेली लाज । गांजितां कां तुह्मी मज ॥ ५ ॥ तुका ह्मणे जनीं । छी थू केली विटंबणी ॥ ६ ॥

॥ ४४८० ॥ तुळसीवृंदावनीं उपजला कांदा । नावडे गोविंदा कांहीं केल्या ॥ धृ० ॥ तैसे वंशामध्यें जाले जे मानव । जाणावे दानव अभक्त ते ॥ १ ॥ केवडग्रामधील निर्गंध कणसें । तैशीं तीं माणसें भक्तिहीन ॥ २ ॥ तुका ह्मणे जेवीं चंदनांतिल आळी । न चढे निढळीं देवाचिया ॥ ३ ॥

॥ ४४८१ ॥ संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धि नव जाय ॥ धृ० ॥ ज्याचा जैसा ठेवा तो त्याप्रति धांवे । न लगती करावे उपदेश ॥ १ ॥ घेऊनियां उठे आपुलाला गुण । भविष्य प्रमाण तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ४४८२ ॥ शिव शक्ति आणि सूर्य गणपती । एकचि ह्मणती विष्णूसही ॥ धृ० ॥ हिरा गार दोनी मानिती समान । राजस भजनें वांयां जाती ॥ १ ॥ अन्य देवतांसि देव ह्मणऊन । तामस जीवन तमोयोग्या ॥ २ ॥ वांयां जायासाठीं केलासे हव्यास । अन्य-देवतांस देवपण ॥ ३ ॥ आपुलिया मुखें सांगतसे धणी । नव्हे माझी वाणी पदरींची

॥ ४ ॥ धन्य ते वैष्णव भजती केशव । सात्त्विक हे जीव मोक्षा योग्य ॥ ५ ॥ तुका ह्मणे मोक्ष नाहीं कोणापासीं । एका गोविंदासी शरण व्हारे ॥ ६ ॥

॥ ४४८३ ॥ तुह्मी साधु संत कैवल्यसागर । मोक्षाचे आगर तुह्मां घरीं ॥ धृ० ॥ तेथें मतिमंद काय बोलों वाणी । अमृताचे धणी पाणी कां द्या ॥ १ ॥ कोटी भानु तेजीं खद्योत बापुडें । तैसा तुह्मांपुढें काय बोलों ॥ २ ॥ तुह्मी अवघे चिंतामणि कल्पतरूचीं वनें । त्यापुढें धांवणें मशकांनीं ॥ ३ ॥ वाराणशीक्षेत्र गंगा वाहे कोड । काय तेथें पाड कोंकणाचे ॥ ४ ॥ पद्मशाचा वारा हिमकरीं काय । गगनावरी छाय कोण करी ॥ ५ ॥ समुद्राची तृषा हरि ऐसा कोण । जगाची जी तान्ह निववीतो ॥ ६ ॥ मेरूचा पाठार अवघी ते क्षिती । मशकाचे हातीं मुष्टि फावे ॥ ७ ॥ सिंहापुढें काय जंबूक आरोळी । मोतियांचे वोळी कांच काय ॥ ८ ॥ कापुरासि काय लावूनि उटावें । काय ओवाळावें दीपकासी ॥ ९ ॥ तैसे तुह्मी निरे ज्ञानाचे भरीव । तेथें म्यां बोलावें पाड काय ॥ १० ॥ कृपानिधि तुह्मीं बोलविलें बोला । सुखें न्याय केला तूमचा मीं ॥ ११ ॥ अज्ञान मी वेडें ह्मणवितों बाळ । माझा प्रतिपाळ करणें तुह्मां ॥ १२ ॥ बोबडें बोलणें न धरावा कोप । क्षमा करा बाप कृपासिंधू ॥ १३ ॥ तुका ह्मणे तुह्मी संत बापमाय । भयें धरिले पाय कृपानिधीं ॥ १४ ॥

॥ ४४८४ ॥ देहीं असोनियां देव । वृथा फिरतो निर्दैव ॥ धृ० ॥ देव आहे अंतर्यामीं । व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं ॥ १ ॥ नाभी मृगाचे कस्तुरी । व्यर्थ हिंडे वनांतरीं ॥ २ ॥ साखरेचें मूळ ऊंस । तैसा देहीं देव दिसे ॥ ३ ॥ दुधीं असतां नवनीत । नेणें तयाचें मथित ॥ ४ ॥ तुका सांगे मूढजना । देहीं देव कां पाहाना ॥ ५ ॥

॥ ४४८५ ॥ जयजय ह्मणा राम । हातें टाळी वाचे नाम ॥ धृ० ॥ आटाआटी नाहीं क्यास । न वेचे मोल न पडे खांस ॥ १ ॥ आपण ह्मणे आणिकां हातीं । यज्ञादिकीं नये ते मती ॥ २ ॥ आसन भोजन करितां काम । ध्यानसमाधि ह्मणतां राम ॥ ३ ॥ मंत्र जपा हाचि सार । वर्णा याती जयजयकार ॥ ४ ॥ ह्मणतां राम ह्मणे तुका । वेळोंवेळां चुकों नका ॥ ५ ॥

॥ ४४८६ ॥ शिकवणेसाठीं वाटते तळमळ । पुढें येईल काळ फोडों डोई ॥ धृ० ॥ तेव्हां त्यासि काय देशील उत्तर । मेळउनी अंतर ठेवितोसी ॥ १ ॥ येथींचिया सोंगें भोरपियाचे परी । होईल तें दुरि शृंगारिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कां रे राखिलें खरकटें । रागेल्याचे तंट रागेलें का ॥ ३ ॥

॥ ४४८७ ॥ होईं आतां माझ्या भोगाचा भोगिता । सकळ अनंता शुभाशुभ ॥ धृ० ॥ आठवुनी पाय राहिलों हृदयीं । निवारली तई सकळ चिंता ॥ १ ॥ अचळ न चळे देहाचें चळण । आहे हें वळण प्रारब्धेंची ॥ २ ॥ तुका ह्मणे जालें एकचि वचन । केलिया कीर्त्तन आराणुक ॥ ३ ॥

॥ ४४८८ ॥ लेखीं तुखण्यासमान । वेचला नारायणीं क्षण । उद्यांचें आजिच मरण । आणोनि ह्मणे हरि भोक्ता ॥ धृ० ॥ नाहीं कांहीं पडों येत तुटी । जाणें तो आहे सेवटीं ।

लाभ विचारोनि पोटीं । होईं सेवटीं जागृत ॥ १ ॥ आहे ते उरे कटा । लावूनि चळ आपुला फाटा । पुरे हें न पुरे सेवटा । तरण्या बळकटा सदा वास ॥ २ ॥ ह्मणोनि मोडावा कांटाळा । अविद्यात्मक कोंवळा । होतील प्रबळा । आशा तृष्णा माया ॥ ३ ॥ क्षण या देहाच्या अंतीं । जड होऊनि राहेल माती । परदेश ते परवर होती । चिळसविती नाकडोळे ॥ ४ ॥ जंव या नाहीं पातल्या विपत्ती । आयुष्य भविष्य आहे हातीं । लाभ विचारोनि गुंती । तुका ह्मणे अंतीं सर्व विसुनें ॥ ५ ॥

॥ ४४८९ ॥ आसावलें मन जीवनाचे ओढी । नामरूपीं गोडी लावियेली ॥ धृ० ॥ काय तुझे पायीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥ १ ॥ काय लोखंडाचे पाहे गुणदोष । सिवोन परीस सोनें करी ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें अवघें असो द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥ ३ ॥

॥ ४४९० ॥ पंढरीची वारी जयांचिये घरीं । पायधुळी शिरीं वंदिन त्यांची ॥ धृ० ॥ दासाचा मी दास पोसणा डोंगर । आतां बहु फार काय बोलें ॥ १ ॥ जातीचें मी हीन न कळे भजन । ह्मणोनि संतचरण इच्छीतसें ॥ २ ॥ तुका ह्मणे मज ह्मणावें आपुलें । बहुतां तारिलें संतजनीं ॥ ३ ॥

॥ ४४९१ ॥ नाम पावन पावन । त्याहून पवित्र आहे कोण ॥ धृ० ॥ शिव हालाहालें तापला । तोही नामें शीतळ झाला ॥ १ ॥ शिवास नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर ॥ २ ॥ मरण झालें काशीपुरी । तेथें नामचि उद्धरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोइरें ॥ ४ ॥

॥ ४४९२ ॥ अल्प विद्या परि गर्वशिरोमणी । मजहूनि ज्ञानी कोण आहे ॥ धृ० ॥ अंगीं भरे ताठा कोणासी मानीना । साधूची हेळणा स्वयें करी ॥ १ ॥ सज्जनाच्या देहीं मानी जो विटाळ । त्रैलोकीं चांडाळ तोचि एक ॥ २ ॥ संतांची जो निंदा करी मुर्खी जप । खतेलें तें पाप वज्रलेप ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

॥ ४४९३ ॥ नाहीं संतांशीं शरण । काय वाचोनि पुराण ॥ धृ० ॥ ह्मणे विठ्ठलाचा दास । देखोनी परनारीस हांसे ॥ १ ॥ करिती विठोबाची भक्ती । दयाधर्म नाहीं चित्तीं ॥ २ ॥ तेथें नाहीं माझा देव । व्यर्थ भ्रमवी हा जीव ॥ ३ ॥ अंगीं नाहीं क्षमा दया । ह्मणती भेट पंढरिराया ॥ ४ ॥ नाहीं धर्माची वासना । काय करोनि प्रदक्षिणा ॥ ५ ॥ ऐसें नव्हे भक्तिवर्म । तेथें नाहीं माझा राम ॥ ६ ॥ नये कृपा कांहीं केल्या । नये घाम जीव गेल्या ॥ ७ ॥ जैसी खड्गाची धार । विठ्ठलचरणीं तुका शूर ॥ ८ ॥

॥ ४४९४ ॥ नाहीं रिकामीक परी वाहे मनीं । तया चक्रपाणि साह्य होय ॥ धृ० ॥ उद्वेग जीवासि पंढरीचें ध्यान । तया नारायण साह्य करी ॥ १ ॥ शरीरासि बळ नाहीं स्वता भाव । तया पंढरिराव साह्य करी ॥ २ ॥ असो नसो बळ राहे पराधीन । तरी अनुमान करूं नका ॥ ३ ॥ तुका ह्मणे येणें करोनि चिंतन । तया नारायण जवळीक ॥ ४ ॥

॥ ४४९५ ॥ दारिद्रानें विप्र पीडिला अपार । तया पोटीं पोर एक असे ॥ धृ० ॥

बाहेरी मिष्टान्न मिळे एके दिशीं । घेऊनी छंदासि त्याचि बैसे ॥ १ ॥ क्षुधाकाळीं रडे देखिलें तें मागे । कांहीं केल्या नेघे दुजें कांहीं ॥ २ ॥ सहज कौतुकें बोले बापमाये । देवापाशीं आहे मागशी तें ॥ ३ ॥ तेव्हां तुजलागीं स्मरे नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ ४ ॥ लागली हे क्षुधा जात असे प्राण । काय हें निर्वाण पाहातोसी ॥ ५ ॥ ब्रह्मांडनायक विश्वाचा पाळक । वरी तिन्ही लोक पोसितोसी ॥ ६ ॥ प्राण हा उत्कर्ष जाहला विव्हळ । तेव्हां तो कृपाळ धांव घाली ॥ ७ ॥ सांडूनि वैकुंठ धांव घाली तई । आलंगिला बाहीं कृपावंतें ॥ ८ ॥ तुका ह्मणे दिला क्षीराचा सागर । राहे निरंतर त्यापासीं ॥ ९ ॥

॥ ४४९६ ॥ अनाथाचा सखा ऐकिला प्रताप । होसि कृपावंत मजवरी ॥ धृ० ॥ माझिया गा चित्ता करिं शिकवण । जेणें तुझे चरण जोडतील ॥ १ ॥ जोडोनियां कर येतों काकुलती । रखुमाईच्या पति कृपावंता ॥ २ ॥ हरुषें निर्भर करीं माझें मन । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ ३ ॥ तुझे भेटीविण जन्म गेला वांयां । भजन कराया शक्ति नाहीं ॥ ४ ॥ न घडे तुझी सेवा न घडे पूजन । जन्मोनि निष्कारण जाऊं पाहे ॥ ५ ॥ तुका ह्मणे हरि करावें या काय । भजनासि साह्य होईं बापा ॥ ६ ॥

॥ ४४९७ ॥ हीनवर बीजवर दोघी त्या गडणी । अखंड कहाणी संसाराची ॥ धृ० ॥ माझा पति बहु लहानचि आहे । खेळावया जाय पोरांसवें ॥ १ ॥ माझें दुःख जरी ऐकसील सई । ह्मातारा तो बाई खोकतसे ॥ २ ॥ खेळे सांजवरी बाहेरी तो राहे । वाट मी तो पाहे सेजेवरी ॥ ३ ॥ पूर्व पुण्य माझें नाहीं बाई नीट । बहु होती कष्ट सांगों काई ॥ ४ ॥ जवळ मी जातें अंगा अंग लावूं । नेदी जवळ येऊं कांटाळतो ॥ ५ ॥ पूर्व सुकृताचा हाचि बाई ठेवा । तुका ह्मणे देवा काय बोल ॥ ६ ॥

॥ ४४९८ ॥ स्वामीच्या सामर्थ्यें । चाले बोलिला पुरुषार्थ ॥ धृ० ॥ पाठी देवाचें हें बळ । मग लाभे हातीं काळ ॥ १ ॥ देव ज्यासी साह्य । तेणें केलें सर्व होय ॥ २ ॥ तुका ह्मणे स्वामीसत्ता । मग नाहीं भय चिंता ॥ ३ ॥

॥ ४४९९ ॥ नामांचा डांगोरा फिरवीं घरोघरीं । ह्मणा हरिहरी सर्वभावें ॥ धृ० ॥ नामें हरती कर्में वैकुंठीची पै वस्ती । संनिध श्रीपति सदोदित ॥ १ ॥ नामाचा महिमा बहुतां कळला । नामें उद्धरिला अजामेळ ॥ २ ॥ गजेंद्राची स्थिति पुराणीं बोलती । नामेंचि श्रीपति पावलासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम घेतां मुक्ति आहे । नामें सर्व पाहें आकळिलें ॥ ४ ॥

॥ ४५०० ॥ यमाचे हे पाश नाटोपती कोणातें । आह्मां दिनानाथें रक्षियेलें ॥ धृ० ॥ यम नेतां तुह्मां रक्षील हें कोण । तुह्मां धन्यधन्य कोण ह्मणती ॥ १ ॥ संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ती । त्यांनीं उत्तम स्थिति सांगितली ॥ २ ॥ तेंचि धरोनि चित्तीं तुका हित करी । यमासि पांपरी हाणे आतां ॥ ३ ॥

॥ ४५०१ ॥ देवासीं पैं भांडों एकचित्त करुनी । आह्मांसि सज्जनीं सांगितलें ॥ धृ० ॥ आह्मां काय आतां देवें आडो परी । भेटी नेदी तरी सुखें नेदो ॥ १ ॥ तोचि

नांदो सदा हरि पैं वैकुंठीं । आह्मां देशवटी देवो सुखें ॥ २ ॥ देवें अभिमान चित्तांत धरिला । तरी तो एकला राहो आतां ॥ ३ ॥ चित्तीं धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षें गाऊं गीत गोविंदाचें ॥ ४ ॥ तुका ह्मणे सर्व देवाची नष्टाई । आह्मी सुखें पाहीं डुलतसों ॥ ५ ॥

॥ ४५०२ ॥ भरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापारा ॥ धृ० ॥ उधार घ्यारे उधार घ्यारे । अवघे यारे जातीचे ॥ १ ॥ येथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं लहान ॥ २ ॥ तुका ह्मणे लाभ घ्यावा । मुद्दल भावा जतन ॥ ३ ॥

॥ ४५०३ ॥ ग्रासोग्रासीं भाव । तरी देहिंच जेवी देव ॥ धृ० ॥ धरीं स्मरण तें सार । नाहीं दुरी तें अंतर ॥ १ ॥ भोगितां तूं भावें । देव जेऊं बैसे सर्वें ॥ २ ॥ तुज पावो देवा । भावें अंतरींची सेवा ॥ ३ ॥ गुंतला साधनीं । देव नाहीं त्रिभुवनीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे ज्ञातीं । न धरितां गमाविती ॥ ५ ॥

॥ ४५०४ ॥ कामिनीसी जैसा आवडे भ्रतार । इच्छीत चकोर चंद्र जैसा ॥ धृ० ॥ तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं । लागलिया नाहीं गर्भवास ॥ १ ॥ दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन । आणिक जीवन तृषाक्रांता ॥ २ ॥ कामातुर जैसा भय लज्जा सांडोनी । आवडे कामिनी सर्वभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसी राहिली आवडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ४ ॥

॥ ४५०५ ॥ ॐ तत्सदिति सूत्राचें सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥ धृ० ॥ हरिःॐ सहित उदत्त अनुदत्त । प्रचुरीश्वरासहित पांडुरंग ॥ १ ॥ गोब्राह्मणहिता होऊनि निराळें । वेदाचें तें मूळ तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ४५०६ ॥ सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ धृ० ॥ उष्ण तान भूक एवढिये आकांतीं । ओसंगा लाविती काय म्हूण ॥ १ ॥ खांद्यावरि शूळ मरणाचिये वाटे । अन्यायही मोठे केले साच ॥ २ ॥ हातींचा हिरोनि घातला पाठीसी । तुका ह्मणे ऐसी परी जाली ॥ ३ ॥

॥ ४५०७ ॥ सिंदळीचें चित्त परपुरुषावरी । पति चुरमुरी रात्रदिवस ॥ धृ० ॥ ऐसी ते वोंगळी जाय वो नरका । तिच्या दोषा देखा पति जाय ॥ १ ॥ आपण बुडती पति बुडविती । दोन्ही कुळें नेती अधःपाता ॥ २ ॥ तुका ह्मणे तिची न करावी संगती । होईल फजिती मागें पुढें ॥ ३ ॥

॥ ४५०८ ॥ हेचि व्हावी माझी आस । जन्मोजन्मीं तुझा दास ॥ धृ० ॥ पंढरीचा वारकरी । वारी चुकों नेदीं हरी ॥ १ ॥ संतसंग सर्वकाळ । अखंड प्रेमाचा सुकाळ ॥ २ ॥ चंद्रभागे स्नान । तुका मागे हेंचि दान ॥ ३ ॥

॥ ४५०९ ॥ आन नेघों देसी तरी । रिद्धि सिद्धि मुक्ति चारी ॥ धृ० ॥ संतसंग सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥ १ ॥ तुका ह्मणे नाम । तेणें पुरे माझें काम ॥ २ ॥

॥ ४५१० ॥ दिवाळखोर नारायण । यावरी बहुतांचें ऋण ॥ धृ० ॥ उठतांचि उभे द्वारीं । अवघे दे दे ह्मणती हरी ॥ १ ॥ माजघरीं दडे हरी । माया तडकी आड करी

॥ २ ॥ युगायुगींचें हें ऋण । ह्मणउनि धरिलेंसें मौन्य ॥ ३ ॥ रोखापत्र पाहीं । वेदशास्त्र देती ग्वाही ॥ ४ ॥ धनकोनाम तुका वाणी । रिणकोनाम विठ्ठल धणी ॥ ५ ॥

॥ ४५११ ॥ गरुडाचे पायीं । ठेवीं वेळोवेळां डोई ॥ धृ० ॥ वेगीं आणावा तो हरी । मज दीनातें उद्धरी ॥ १ ॥ पाय लक्ष्मीच्या हातीं । तिसी यावें काकुलती ॥ २ ॥ तुका ह्मणे शेषा । जागे करा हृषीकेशा ॥ ३ ॥

॥ ४५१२ ॥ जाली महाकर्मे । दावी निजसुखवर्मे ॥ धृ० ॥ ऐसें कळलें आह्मां एक । जालों नामाचे धारक ॥ १ ॥ तपाचे सायास । नलगे घ्यावा वनवास ॥ २ ॥ तुका ह्मणे येणें । कळिकाळ हें ठेंगणें ॥ ३ ॥

॥ ४५१३ ॥ माझ्या वडिलांची मिराशी देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥ धृ० ॥ उपास पारणीं राखिला दारवंटा । केला भोगवटा आह्मांलागीं ॥ १ ॥ वंशपरंपरा दास मी अंकित । तुका मोकलितां लाज कोणा ॥ २ ॥

॥ ४५१४ ॥ आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां नित्य ध्येय योगियांचे ॥ धृ० ॥ ते हे समचरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥ १ ॥ पुराणासी वाड श्रुति नेण्याती पार । तें जालें साकार पुंडलिका ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्यातें सनकादिक ध्यात । तें आमुचें कुळदैवत पांडुरंग ॥ ३ ॥

॥ ४५१५ ॥ संतकृपा जाली । इमारत फळा आली ॥ धृ० ॥ ज्ञानदेवें रचिलें पाया ॥ रचियेलें देवालया ॥ १ ॥ नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥ २ ॥ जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥ ३ ॥ भजन करा सावकाश । तुका जालासे कळस ॥ ४ ॥

॥ ४५१६ ॥ त्याचिया चरणा माझें दंडवत । ज्याचें धन वित्त पांडुरंग ॥ धृ० ॥ तेथें माझा जीव पावला विसावा । ह्मणउनी हावा भरलोंसें ॥ १ ॥ चरणीचे रज लावीन कपाळा । जे पदें राउळा सोयी जाती ॥ २ ॥ आणीक तें भाग्य येथें कुरवंडी । करुनियां सांडी इंद्रा ऐसी ॥ ३ ॥ वैष्णवांच्या घरीं देवाची वसती । विश्वास हा चित्तीं सर्वभावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे सखे हरिचे ते दास । आतां पुढें आस दुजी नाहीं ॥ ५ ॥

॥ ४५१७ ॥ पाळुनियां गोमटे । त्याच्या बोलें बोळखी ॥ धृ० ॥ जवळुनी न वजे दुरी । लाडें करी कवतुक ॥ १ ॥ खुण उभा इटेवरी । कट करीं धरियेलें ॥ २ ॥ तुका ह्मणे घातली वरी । झुली थोरी मोलाची ॥ ३ ॥

॥ ४५१८ ॥ आतां काय विठो पाहासील अंत । आलों शरणागत तुजलागीं ॥ धृ० ॥ करीं अंगीकार राखें पायांपाशीं । ह्मणी दिसो देशी कींविलवाणें ॥ १ ॥ नाहीं ऐकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥ ३ ॥

॥ ४५१९ ॥ मीतूंपण ऐसी परी । जैसें लवण सागरीं ॥ धृ० ॥ दोहीं माजी एक जाणा । विठ्ठल पंढरीचा राणा ॥ १ ॥ देव भक्त ऐसी बोली । जंव भ्रांति नाहीं गेली ॥ २ ॥ तंतुपट जैंवी एक । जैसा विश्वेशीं व्यापक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपा । जगीं विश्रांति कैंची बापा ॥ ४ ॥

॥ ४५२० ॥ नेणें जप तप जीवासी आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥ धृ० ॥ नाहीं आणुनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥ १ ॥ बैसलिया ठायीं पोकारिला धांवा । सांकडें तें देवा निवारावें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी वेचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें साचभावें ॥ ३ ॥

॥ ४५२१ ॥ जेणें देवा तुह्मी करा अंगीकार । हा नाहीं विचार मजमाजी ॥ धृ० ॥ आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन । देवभक्तपण लाजविलें ॥ १ ॥ एकांत एकलें मन हें निश्चळ । न राहे चपळ एके ठायीं ॥ २ ॥ महत्त्वाची पायीं पडिली शृंखळा । बांधविला गळा स्नेहाहातीं ॥ ३ ॥ शरीर सोकलें देखिलिया सुखा । कदान्नतें मुखा रुचि नेदी ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाला अवगुणांचा थारा । वाढविली निद्रा आळस बहू ॥ ५ ॥

॥ ४५२२ ॥ कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे । भेटुनि त्वां काय द्यावें आह्मां ॥ धृ० ॥ घेउनि धरणें बैसति उपवासी । हा हाट आह्मांसी नाहीं तैसा ॥ १ ॥ तांतडी तयांनीं केली विटंबणा । आह्मां नारायणा काय उणें ॥ २ ॥ नाहीं मुक्ति चाड वास वैकुंठींचा । पिकलीसे वाचा रामनामें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय व्हावें उतराई । जीव ठेवूं पायीं संतां-चिया ॥ ४ ॥

॥ ४५२३ ॥ आतां मज तरी सांगसील भावें । काय म्यां करावें ऐसें देवा ॥ धृ० ॥ वर्म चुकलिया नव्हे तें कारण । केला होय शीण आवघाचि ॥ १ ॥ तुका ह्मणे नको पाहों हें निर्वाण । देई कृपादान याचकासी ॥ २ ॥

॥ ४५२४ ॥ कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंगसंग ॥ धृ० ॥ नये दाखवितां प्रेम बोलतां सांगतां । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥ १ ॥ पोटामध्यें कोणें सांगि-तलें सर्पा । उपजत लपा ह्मणऊनी ॥ २ ॥ सांगों नेणे परी जाणे गोड क्षार । अंतरीं विचार त्यासी ठावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें तों विचारावें मनीं । आणीक भल्यांनीं पुसूं नये ॥ ४ ॥

॥ ४५२५ ॥ एक ह्मणती आह्मी देवचि पैं जालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥ धृ० ॥ एक ह्मणती आह्मीं देवाचीं पैं रूपें । तरी तुमचिया बापें न चुके जन्म ॥ १ ॥ देवें उचलिली स्वकरें मेदिनी । तुमचेनीं गोणी नुचलवे ॥ २ ॥ देवें मारियेले दैत्य दानव मोटे । तुमचेनीं न तुटे तृणमात्र ॥ ३ ॥ राया विठोबाचें पद जो अभिळाषी । पातकाची राशी तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४५२६ ॥ जयासी नावडे संतांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरींचा ॥ धृ० ॥ अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं तया ॥ १ ॥ मंजुळ वचनीं बचना-गाची कांडी । सेवटीची घडी जीव प्राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥ ३ ॥

॥ ४५२७ ॥ आंगीं भरला ताठा । वळणी नये जैसा खुंटा ॥ धृ० ॥ किती सांगावें त्या डेंगा । हित आदळेना आंगा ॥ १ ॥ तुका ह्मणे अनू । मुसळाचें नव्हे धनू ॥ २ ॥

॥ ४५२८ ॥ मागितल्याची परती करा । उरी धरा कांहीं बाही ॥ धृ० ॥ ह्मणोनी

सारिली आस । होती यास मूळ ते ॥ १ ॥ माझ्या मोहें तुज पान्हा । लोटे स्तना वोरसे ॥ २ ॥ तुका ह्मणे आळवणे । माझ्या देणें उत्तरा ॥ ३ ॥

॥ ४५२९ ॥ आंगीं लावुनियां राख । डोळे झाकुनी करिती पाप ॥ धृ० ॥ दाउनी वैराग्याची कळा । भोगिती विषयाचा सोहाळा ॥ १ ॥ तुका ह्मणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥ २ ॥

॥ ४५३० ॥ पुराणीक ह्मणविती । जाणोनी कांदे भक्षिती ॥ धृ० ॥ अगस्तीचें मूत्र मळ । लाउनी ह्मणति कृष्णावळ ॥ १ ॥ श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ॥ २ ॥ बदराहीच्या पाडी दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ॥ ३ ॥

॥ ४५३१ ॥ जयाची वदे पूर्ण वेदांतवाणी । ह्मणावें कसें हो तयालागि वाणी । परब्रह्मरूपी असा जो तुकावा । तयाचे तुकीं असा कोण तुकावा ॥ धृ० ॥ जयादर्शनें स्पर्शनें मुक्त होती । तुका नाम वाचे ह्मणे आणिताती । पुनर्जन्म त्या प्राणियालागिं कैंचा । तुकाराम वाणी जया नाम वाचा ॥ १ ॥ परंधाम टाकून कैसा उडाला । जिवन्मुक्त होऊनी ब्रह्मीं बुडाला । जयाची तनू ब्रह्मरूपीं बुडाली । भवभ्रांति हे जाण कैसी गळाली ॥ २ ॥ तुका यासि कोठें तुकायासि दिसेना । जनीं हिंडतांना तुकावा दिसेना । तुका वा तो कसा चतुर्भुज जाला । निराकार ब्रह्मीं स्वरूपीं निराळा ॥ ३ ॥ तुका ब्रह्मरूपी स्वरूपीं रहातो । जया दीपन्यायें जयासी पाहातो । तुका बैसला ज्ञानवैराग्यधामीं । वसे चित्कळा पूर्णब्रह्मीं आरामीं ॥ ४ ॥ जयाचे मुखीं भारती वेदमाता । तया प्राप्तिची कायसी जाण चिंता । निजानंदआनंद तो मग्न झाला । निराकार ब्रह्मस्वरूपीं मिळाला ॥ ५ ॥ कृपासागरें नाव निर्माण केली । असंख्यात बुद्धी तरोनीच गेली । पुढेंही तरायासी उपाय केला । ह्मणोनी तुका मृत्यलोकासी आला ॥ ६ ॥ कसें भर्जिलें तें बीज उगवेना । तसें सर्व संपादिलें तें कळेना । पहा बोध त्या जाहला वामनाला । सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला ॥ ७ ॥

॥ ४५३२ ॥ मना या साक्षीसी जाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपुला तो ॥ धृ० ॥ तुह्मां परामृष घेतां सत्ताबळें । धरितां निराळे कैसीं वांचों ॥ १ ॥ मी माझी सांडोनी यावया पसारा । आणीक दातारा काय काज ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी तुज विणें एका । निढळ लौकिकामाजी असों ॥ ३ ॥

॥ ४५३३ ॥ उपजोनी मरों किती वेळोंवेळां । कोणा कळवळा येत माझा ॥ धृ० ॥ ह्मणउनी धांवा करी काकुलती । यावें बा श्रीपति सोडावया ॥ १ ॥ बहुत या काळें केलों भयाभीत । येतों गिवसीत पाठीलागीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी दावितां स्वरूप । माझें कांहीं पाप निरसतें ॥ ३ ॥

॥ ४५३४ ॥ हाका मारी ज्याच्या नांवें । त्याचें गांवचि नाहीं ठावें ॥ धृ० ॥ काय गातों हें कळेना । राग आळवितों नाना ॥ १ ॥ आशा धरूनियां मनीं । कांहीं देईल ह्मणउनी ॥ २ ॥ वितीभरी पोटासाटीं । तुका ह्मणे पडिली तुटी ॥ ३ ॥

॥ ४५३५ ॥ संतचरणीं नाहीं गोडी । ज्यासि विषयीं आवडी ॥ धृ० ॥ त्यासि कैंचा

भेटे देव । संतचरणीं नाहीं भाव ॥ १ ॥ संतसेवेसि आंग चोरी । दृष्टि न पडो तयावरी ॥ २ ॥ पाहे गुणदोष संतांचे । जळो काळें तोंड त्याचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतसेवा । आमुच्या पूर्वजांचा ठेवा ॥ ४ ॥

॥ ४५३६ ॥ स्वप्नींचें धन चित्रींच्या ब्राह्मणा । जातकर्म जाणा वांटिती पैं ॥ धृ० ॥ तैसें शब्दज्ञान करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकूनियां ॥ १ ॥ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेउनियां तृप्त कोण जाला ॥ २ ॥ कागदीं लिहीतां नामाची साकर । चाखतां मधुर कैंवि लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जळो तैसें ज्ञानबंड । यमपुरी दंड कठिण आहे ॥ ४ ॥

॥ ४५३७ ॥ आतां बरें धरीं । आपली उरी आपणापें ॥ धृ० ॥ वाईट बरें न पडे दृष्टी । मग कष्टी होईजे ना ॥ १ ॥ बोलों जातां वाढे बोल । वायां फोल खटपट ॥ २ ॥ काकुलती यावें देवा । तों तो सेवा इच्छितो ॥ ३ ॥ हिशेबाचें खोटें सारें । खटपट तुटेना ॥ ४ ॥ तुका ह्मणे कळों आलें । दुसरें भलें तें नव्हे ॥ ५ ॥

॥ ४५३८ ॥ कारणापें असतां दृष्टी । काम पोटीं नुपजे ॥ धृ० ॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणींच संतोषें ॥ १ ॥ पाहिजे तो कळवळा । मग बळा काय उणें ॥ २ ॥ तुका ह्मणे उदारपणें । काय उणें मनासी ॥ ३ ॥

॥ ४५३९ ॥ कार्यकरुनि करी धंदा । चित्त गोविंदा तुझे पायीं ॥ धृ० ॥ ऐशा संकल्पाची संधी । माझे बुद्धि धीर देवा ॥ १ ॥ कुटुंबाचा तुह्मां भार । मज व्यवहारनिमित्य ॥ २ ॥ तुका ह्मणे करितां काम । हृदयीं नाम धरीन ॥ ३ ॥

॥ ४५४० ॥ आजि नव्हे कालिच्या ऐसें । अनारिसें पालटे ॥ धृ० ॥ आतां लागवेग करा । ज्याचें धरा टाके तें ॥ १ ॥ नका सांगों वाउग्या गोष्टी । चाहुल खोटी येठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे मोडा माग । आपल्या लागवरूनी ॥ ३ ॥

॥ ४५४१ ॥ खाणोरियांचीं पुसों घरें । जीं हीं बरीं पाळती ॥ धृ० ॥ सांगती त्या जावें वाटा । धरुनी पोटामध्यें गोष्टी ॥ १ ॥ आली गेली होती ठाया । सत्य छाया कळली ॥ २ ॥ तुका ह्मणे आपुलें बळ । युक्ति काळ कारण ॥ ३ ॥

॥ ४५४२ ॥ स्वगोत्रींचा पुत्र परगोत्रीं अर्पिला । विभागा मुकला पितृधना ॥ धृ० ॥ तैसें मजलागीं न धरावें दुरी । नव्हे परगोत्री पोटिंचाची ॥ १ ॥ सुतकासी त्याचें नाहीं प्रयोजन । जनिता ह्मणोनि तीन दिवस ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं ठावें हें कोणासी । पुसावें वेदांसी देती ग्वाही ॥ ३ ॥

॥ ४५४३ ॥ एक ब्रह्मचारी गाढवा झोंबतां । हाणोनियां लाता पळाले तें ॥ धृ० ॥ गाढवही गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें झालें जगामाजी ॥ १ ॥ होणार तैसें जालें हें ना तैसें केलें । तुका ह्मणे गेलें वांयांचि तें ॥ २ ॥

## बालक्रीडा.

॥ ४५४४ ॥ देवा आदिदेवा जगत्रयजीवा । परियेसीं केशवा विनंति माझी ॥ धृ० ॥ माझी वाणी तुझे वर्णी गुण नाम । ऐसें देई प्रेम कांहीं कळा ॥ १ ॥ कळा तुजपाशीं

आमुचें जीवन । उचित करून देई आह्मां ॥ २ ॥ आह्मां शरणागतां तुझाचि आधार । तूं तंव सागर कृपासिंधू ॥ ३ ॥ सिंधु पायवाट होय तुझ्या नामें । जाळीं महाकर्मे दुस्तरें तीं ॥ ४ ॥ तीं फळें उत्तमें तुझा निजध्यास । नाहीं गर्भवास सेविलिया ॥ ५ ॥ सेविलिया राम कृष्ण नारायण । नाहीं त्या बंधन संसाराचें ॥ ६ ॥ संसार तें काय तृणवतमय । अग्नि त्यासी खाय क्षणमात्रें ॥ ७ ॥ क्षणमात्रें जाळी दोषांचिया राशी । निंद्य उत्तमासी वंद्य करी ॥ ८ ॥ करीं ब्रिदें साच आपलीं आपण । पतितपावन दीनानाथ ॥ ९ ॥ नाथ अनाथांचा पति गोपिकांचा । पुरवी चित्तींचा मनोरथ ॥ १० ॥ चित्तीं जें धरावें तुका ह्मणे दासीं । पुरविता होसी मनोरथ ॥ ११ ॥

॥ ४५४५ ॥ मनोरथ जैसे गोकुळींच्या जना । पुरवावी वासना तयापरी ॥ धृ० ॥ शिण फेडावया अवतार केला । अविनाश आला आकारासी ॥ १ ॥ सीण जाला वसुदेवदेवकीस । वधी बाळें कंस दुराचारी ॥ २ ॥ दुराचारियासी नाहीं भूतदया । आपपर तया पाप पुण्य ॥ ३ ॥ पुण्यकाळ त्याचा राहिलासे उभा । देवकीच्या गर्भा देव आले ॥ ४ ॥ गर्भासी तयांच्या आला नारायण । तुटलें बंधन आपेंआप ॥ ५ ॥ आपेंआप बेड्या तुटल्या शृंखळा । बंदाच्या आगळा किलिया कोंडे ॥ ६ ॥ कोंडमार केला होता बहु दिस । सोडवी निमिष्य न लगतां ॥ ७ ॥ न कळे तो त्यासी सांगितला भाव । आपपासी ठाव नंदाघरीं ॥ ८ ॥ नंदाघरीं जातां येतां वसुदेवा । नाहीं जाला गोवा सर्वें देव ॥ ९ ॥ सर्वें देव तया आड नये कांहीं । तुका ह्मणे नाहीं भय चिंता ॥ १० ॥

॥ ४५४६ ॥ चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरी केला देवें ॥ धृ० ॥ देव आला घरा नंदाचिया गांवा । धन्य त्याच्या दैवा दैव आलें ॥ १ ॥ आलें अविनाश धरूनि आकार । दैत्याचा संहार करावया ॥ २ ॥ करावया भक्तजनाचें पालन । आले रामकृष्ण गोकुळासी ॥ ३ ॥ गोकुळीं आनंद प्रगटलें सुख । निर्भर हे लोक घरोघरीं ॥ ४ ॥ घरोघरीं जाला लक्ष्मीचा वास । दैन्यदारिद्र्यास त्रास आला ॥ ५ ॥ आला नारायण तयांच्या अंतरा । दया क्षमा नरा नारीलोकां ॥ ६ ॥ लोकां गोकुळींच्या जालें ब्रह्मज्ञान । केलियावांचून जपतपें ॥ ७ ॥ जपतपें काय करावीं साधनें । जंव नारायणें कृपा केली ॥ ८ ॥ केली नारायणें आपुलीं अंकित । तोचि त्यांचें हित सर्व जाणे ॥ ९ ॥ सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणीक दुसरा नाहीं नाहीं ॥ १० ॥ नाहीं भक्ता दुजें तिहीं त्रिभुवनीं । एका चक्रपाणीवांचूनियां ॥ ११ ॥ याच्या सुखसंगें घेती गर्भवास । तुका ह्मणे आस त्यजूनियां ॥ १२ ॥

॥ ४५४७ ॥ यांच्या पूर्वपुण्या कोण लेखा करी । जिहीं तो मुरारि खेळविला ॥ धृ० ॥ खेळविला जिहीं अंतर्बाह्यसुखें । मेळवूनि मुखें चुंबन दिलें ॥ १ ॥ दिलें त्यांसी सुख अंतरींचें देवें । जिहीं एका भावें जाणितला ॥ २ ॥ जाणितला तिहीं कामातुर नारी । कृष्णभोगावरी चित्त ज्यांचें ॥ ३ ॥ ज्यांचें कृष्णीं तन मन जालें रत । गृह पति सुत विसरल्या ॥ ४ ॥ विष तयां जालें धन मान जन । वसविती वन एकांतीं त्या ॥ ५ ॥ एकांतीं त्या जाती हरीसी घेउनी । भोगइच्छाधणी फेडावया ॥ ६ ॥ वयाच्या संपन्ना

तैसा त्यांकारणें । अंतरींचा देणें इच्छाभोग ॥ ७ ॥ भोग त्याग नाहीं दोन्ही जयापासीं । तुका ह्मणे जैसी स्फटिकशिळा ॥ ८ ॥

॥ ४५४८ ॥ शिळा स्फटिकाची न पालटे भेदें । दाउनियां छंदें जैसी तैसी ॥ धृ० ॥ जैसा केला तैसा होय क्षणक्षणा । फेडावी वासना भक्तिभावें ॥ १ ॥ फेडावया आला अवघियांची धणी । गोपाळ गौळणी मायबापा ॥ २ ॥ मायबापा सोडविलें बंदीहूनी । चाणूर मर्दुनी कंसादिक ॥ ३ ॥ दिक नाहीं देणें अरिमित्रा एक । पूतना कंटक मुक्त केली ॥ ४ ॥ मुक्त केला मामा कंस महादोषी । बाळहत्या रासी पातकांच्या ॥ ५ ॥ पाप कोठें राहे हरि आठवितां । भक्ति द्वेषें चिंता जैसा तैसा ॥ ६ ॥ साक्षी तयापाशीं पूर्वील कर्माच्या । बांधला सेवेच्या ऋणें देव ॥ ७ ॥ देव भोळा धांवे भक्ता पाठोवाठी । उच्चारितां कंठीं मागेंमागें ॥ ८ ॥ मानाचा कंटाळा तुका ह्मणे त्यासी । धांवे तो घरासी भाविकांच्या ॥ ९ ॥

॥ ४५४९ ॥ चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । बांधवी तो हातीं गौळणीच्या ॥ धृ० ॥ गौळणिया गळा बांधिती धारणीं । पायां चक्रपाणि लागे तया ॥ १ ॥ तयाघरीं रिघे चोरावया लोणी । रितें पाळतूनि शिरे माजी ॥ २ ॥ माजी शिरोनियां नवनीत खाये । कवाड तें आहे जैसें तैसें ॥ ३ ॥ जैसा तैसा आहे अंतर्बाह्याकारीं । ह्मणउनि चोरी नसंपडे ॥ ४ ॥ नसंपडे तयां करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥ ५ ॥ वर्म जाणती त्या एकल्या एकटा । बैसतील वाटा निरोधूनी ॥ ६ ॥ निवांत राहिल्या निःसंग होऊनी । निश्चळ ज्या ध्यानीं कृष्णध्यान ॥ ७ ॥ न ये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । धरिती गौळणी भाविका त्या ॥ ८ ॥ भाविका तयांसी येतो काकुलती । शाहाण्या मरती नसंपडे ॥ ९ ॥ नलगे वेचावी टोली धनानांवें । तुका ह्मणे भावें चाड एका ॥ १० ॥

॥ ४५५० ॥ चाड अनन्याची धरी नारायण । आपणासमान करी रंका ॥ धृ० ॥ रंक होती राजे यमाचिये घरीं । आचरणें बरीं नाहीं म्हूण ॥ १ ॥ नसंपडे इंद्रचंद्रब्रह्मादिकां । अभिमानें एका तिळमात्रें ॥ २ ॥ तिळमात्र जरी होय अभिमान । मेरु तो समान भार देवा ॥ ३ ॥ भार पृथिवीचा वाहिला सकळ । जड होती खळ दुष्ट लोक ॥ ४ ॥ दुष्ट अभक्त जे निष्ठुर मानसीं । केली हे तयांसी यमपुरी ॥ ५ ॥ यमदूत त्यांसी करिती यातना । नाहीं नारायणा भजिजेलें ॥ ६ ॥ जे नाहीं भजले एका भावें हरी । तयां दंड करी यमधर्म ॥ ७ ॥ यमधर्म ह्मणे तयां दोषियांसी । कां रे केशवासी चुकलेती ॥ ८ ॥ चुकलेती कथा पुराणश्रवण । होते तुह्मां कान डोळे मुख ॥ ९ ॥ कान डोळे मुख संतांची संगती । न धराच चित्तीं सांगितलें ॥ १० ॥ सांगितलें संतीं तुह्मां उगवूनी । गर्भासी येऊनि यमदंड ॥ ११ ॥ दंडूं आह्मीं रागें ह्मणे यमधर्म । देवा होय श्रम दुर्जनाचा ॥ १२ ॥ दुर्जनाचा येणें करूनि संहार । पूर्णअवतार रामकृष्ण ॥ १३ ॥ रामकृष्णनामें रंगले जे नर । तुका ह्मणे घर वैकुंठीं त्यां ॥ १४ ॥

॥ ४५५१ ॥ वैकुंठींच्या लोकां दुर्लभ हरिजन । तया नारायण समागमें ॥ धृ० ॥ समागम त्यांचा धरिला अनंतें । जिहीं चित्तवित्त समर्पिलें ॥ १ ॥ समर्थ तीं गातीं

हरीचे पवाडे । येर ते बापुडे रावराणे ॥ २ ॥ रामकृष्णें केलें कौतुक गोकुळीं । गोपाळांचे मेळीं गाई चारी ॥ ३ ॥ गाई चारी मोहोरी पांवा वाहे पाठी । धन्य जाली काठी कांबळी ते ॥ ४ ॥ काय गौळियांच्या होत्या पुण्यरासी । आणीक त्या ह्मैसी गाई पशू ॥ ५ ॥ सुख तें अमुप लुटिलें सकळीं । गोपिका गोपाळीं धणीवरी ॥ ६ ॥ धणीवरि त्यांसी सांगितली मात । जयाचें जें आर्त तयापरी ॥ ७ ॥ परी याचें तुह्मी आइका नवल । दुर्गम जो खोल साधनासी ॥ ८ ॥ शिक्या लावूनियां घालिती बाहेरी । पाहाती भीतरी सर्वेंचि तो ॥ ९ ॥ तोंडाकडे त्यांच्या पाहे कवतुकें । शिव्या देतां सुखें हांसतसे ॥ १० ॥ हांसतसे शिव्या देतां त्या गौळणी । मरतां जपध्यानीं न बोले तो ॥ ११ ॥ तो जेंजें करिल तें दिसे उत्तम । तुका ह्मणे वर्म दावी सोपें ॥ १२ ॥

॥ ४५५२ ॥ दावी वर्म सोपें भाविकां गोपाळां । वाहे त्यांच्या गळां पालें माळा ॥ धृ० ॥ मान देती आधीं मागतील डाव । देवा तें गौरव माने सुख ॥ १ ॥ मानती ते मंत्र ह्मामा हुंबरी । सितोडिती वरि स्नान तेणें ॥ २ ॥ वस्त्रें घोंगडिया घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ३ ॥ तिहीं लोकांसी जो दुर्लभ चिंतना । तो धांवे गोधना वळतियां ॥ ४ ॥ यांच्या वचनाचीं पुष्पें वाहे शिरीं । नैवेद्य त्यांकरीं कवळ मागे ॥ ५ ॥ त्यांचिये मुखींचें हिरोनियां घ्यावें । उच्छिष्ट तें खावें धणीवरी ॥ ६ ॥ वरी माथां गुंफे मोरपिसांवेटी । नाचे टाळी पिटी त्यांच्या छंदें ॥ ७ ॥ छंदें नाचतील जयासवें हरी । देहभाव वरी विसरलीं ॥ ८ ॥ विसरली वरी देहाची भावना । तेचि नारायणा सर्वपूजा ॥ ९ ॥ पूजा भाविकांची न कळतां घ्यावी । न मागतां दावी निज ठाव ॥ १० ॥ ठाव पावावया हिंडे मागें मागें । तुका ह्मणे संगें भक्तांचिया ॥ ११ ॥

॥ ४५५३ ॥ भक्तजनां दिलें निजसुख देवें । गोपिका त्या भावें आळंगिल्या ॥ धृ० ॥ आळंगिल्या गोपी गुणवंता नारी । त्यांच्या जन्मांतरीं हरि ऋणी ॥ १ ॥ रुसलिया त्यांचें करी समाधान । करविता आण क्रिया करी ॥ २ ॥ क्रिया करी तुह्मां न वजें पासुनी । अवघियाजणी गोपिकांसी ॥ ३ ॥ गोपिकांसी ह्मणे वैकुंठींचा पती । तुह्मी माझ्या चित्तीं सर्वभावें ॥ ४ ॥ भाव जैसा माझ्याठायीं तुह्मी धरा । तैसाचि मी खरा तुह्मांलागीं ॥ ५ ॥ तुह्मां कळों द्या हा माझा साच भाव । तुमचाचि जीव तुह्मां ग्वाही ॥ ६ ॥ ग्वाही तुह्मां आह्मां असे नारायण । आपलीच आण वाहातसे ॥ ७ ॥ सत्य बोले देव भक्तिभाव जैसा । अनुभवें रसा आणूनियां ॥ ८ ॥ यांसी बुझावितो वेगळाल्या भावें । एकीचें हें ठावें नाहीं एकी ॥ ९ ॥ एकी क्रिया नाहीं आवघियांचा भाव । पृथक हा देव घेतो तैसें ॥ १० ॥ तैसें कळों नेदी जो मी कोठें नाहीं । अवघियांचे ठायीं जैसा तैसा ॥ ११ ॥ जैसा मनोरथ जये चित्तीं काम । तैसा मेघश्याम पुरवितो ॥ १२ ॥ पुरविले मनोरथ गोपिकांचे । आणिक लोकांचे गोकुळींच्या ॥ १३ ॥ गोकुळींच्या लोकां लावियेला छंद । बैसला गोविंद त्यांचे चित्तीं ॥ १४ ॥ चित्तेंही चोरूनि घेतलीं सकळा । आवडी गोपाळांवरी तयां ॥ १५ ॥ आवडे तयांसी वैकुंठनायक । गेलीं सकळिक विसरोनी ॥ १६ ॥ निंदा स्तुति कोणी न करी कोणाची । नाहीं या देहाची शुद्धि कोणा

॥ १७ ॥ कोणासी नाठवे कन्या पुत्र माया । देव ह्मणूनि तया चुंबन देती ॥ १८ ॥ देती या टाकून भ्रतारांसी घरीं । लाज ते अंतरीं आथींच ना ॥ १९ ॥ नाहीं कोणा धाक कोणासी कोणाचा । तुका ह्मणे वाचा काया मनें ॥ २० ॥

॥ ४५५४ ॥ मनें हरिरूपीं गुंतल्या वासना । उदास या सुना गौळियांच्या ॥ धृ० ॥ यांच्या भ्रतारांचीं धरूनियां रूपें । त्यांच्या घरीं त्यांपें भोग करी ॥ १ ॥ करी कवतुक त्यांचे तयापरी । एकां दिसे हरि एकां लेंक ॥ २ ॥ एक भाव नाहीं सकळांच्या चित्तीं । ह्मणऊनि प्रीति तैसें रूप ॥ ३ ॥ रूप याचें आहे अवघेंचि एक । परि कवतुक दाखविलें ॥ ४ ॥ लेंकरूं न कळे स्थूल कीं लहान । खेळे नारायण कवतुकें ॥ ५ ॥ कवतुक केलें सोंग बहुरूप । तुका ह्मणे बाप जगाचा हा ॥ ६ ॥

॥ ४५५५ ॥ जगाचा हा बाप दाखविलें माये । माती खातां जाये मारावया ॥ धृ० ॥ मारावया तिणें उगारिली काठी । भुवनें त्या पोटीं चौदा देखे ॥ १ ॥ देखे भयानक झांकियेले डोळे । मागुता तो खेळे तियेपुढें ॥ २ ॥ पुढे रिघोनियां घाली गळां कव । कळों नेदी भाव मायावंता ॥ ३ ॥ मायावंत विश्वरूप काय जाणे । माझें माझें ह्मणे बाळ देवा ॥ ४ ॥ बाळपणीं रीठा रगडिला दाढे । मारियेले गाढे कागबग ॥ ५ ॥ गळां बांधऊनि उखळासी दावें । उन्मळी त्या भावें विमळार्जुन ॥ ६ ॥ न कळे जुनाट जगाचा जीवन । घातलें मोहन गौळियांसी ॥ ७ ॥ सिंकीं उतरूनि खाय नवनीत । न कळे बहुत होय तरी ॥ ८ ॥ तरीं दुधें डेरे भरले रांजण । खाय ते भरून दावी दुणी ॥ ९ ॥ दुणी जालें त्याचा मानिती संतोष । दुभत्याची आस धरूनियां ॥ १० ॥ आशाबद्धा देव असोनि जवळी । नेणती ते काळीं स्वार्थामुळें ॥ ११ ॥ मुळें याच देव न कळे तयांसी । चित्त आशापाशीं गोवियेलें ॥ १२ ॥ लेंकरूं आमचें ह्मणे दसवंती । नंदाचिये चित्तीं तोचि भाव ॥ १३ ॥ भाव जाणावया चरित्र दाखवी । घुसळितां रवी डेरियांत ॥ १४ ॥ डेरियांत लोणी खादलें रिघोनी । पाहे तों जननी हातीं लागे ॥ १५ ॥ हातीं धरूनियां काढिला बाहेरी । देखोनियां करी चोज त्यासी ॥ १६ ॥ सिकवी विचार नेणें त्याची गती । होता कोणे रीति डेरियांत ॥ १७ ॥ यांसी पुत्रलोभें न कळे हा भाव । कळों नेदी माव देव त्यांसी ॥ १८ ॥ त्यांसी पायामोहजाळ घाली फांस । देव आपणास कळों नेदी ॥ १९ ॥ नेदी भाव राहों लोभिकांचे चित्तीं । जाणतांचि होतीं अंधळीं तीं ॥ २० ॥ अंधळीं तीं तुका ह्मणे संवसारीं । जिहीं नाहीं हरि ओळखिला ॥ २१ ॥

॥ ४५५६ ॥ ओळखी तयांसी होय एका भावें । दुसरिया देवें न पविजे ॥ धृ० ॥ न पविजे करा उन्मत्त जालिया । डंबु तोचि वांयां नागवण ॥ १ ॥ वनवास देवाकारणें एकांत । करावीं हीं व्रततपें याग ॥ २ ॥ व्रत याग यांसी फळलीं बहुतें । होतीं या संचितें गौळियांचीं ॥ ३ ॥ यांसी देवें तारियेलें न कळतां । मागील अनंता ठावें होतें ॥ ४ ॥ होतें तें द्यावया आला नारायण । मायबापां रीण गौळियांचें ॥ ५ ॥ गौळियांचें सुख दुर्लभ आणिकां । नाहीं ब्रह्मादिकां तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४५५७ ॥ नेणतियांसाठीं नेणता लाहान । थिंकोनी भोजन मागे
माया दोनी यास बाप नारायणा । सारखी भावना तयांवरी ॥ १ ॥
समचित्त भाव । देवकीवसुदेव नंद दोघे ॥ २ ॥ घेऊनियां एके ठायीं
केला थोर वाढवुनी ॥ ३ ॥ उणा पुरा यासी नाहीं कोणी ठाव । सारिखा
यांसी ॥ ४ ॥ यासी दोनी ठाव सारिखे अनंता । आधील मागुता व
वाढला तो सेवाभक्तिचिया गुणें । उपचारमिष्टान्नें करूनियां ॥ ६ ॥
मेळविलें धन । तेंही कृष्णार्पण केलें तीहीं ॥ ७ ॥ कृष्णासी सकळ
समर्पिल्या दासी जीवें भावें ॥ ८ ॥ जीवें भावें त्याची करितील सेव
नांवा क्षणभरी ॥ ९ ॥ क्षणभरी होतां वेगळा तयांस । होती कासाव
॥ १० ॥ त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरी । देह काम करी चित्त त्यापें ॥
चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण ॥ १२ ॥ कृष्ण
गेला दारा । कृष्ण हा सोयिरा भेटो कृष्णा ॥ १३ ॥ कृष्ण गातां ओंव्या
कृष्ण हा भोजनीं पाचारिती ॥ १४ ॥ कृष्ण तयां ध्यानीं आसनीं श
स्वप्नीं कृष्णरूप ॥ १५ ॥ कृष्ण त्यांस दिसे आभास दुश्चितां । धन्य
ह्मणे ॥ १६ ॥

॥ ४५५८ ॥ कृष्ण हा परिचारी कृष्ण हा वेव्हारी । कृष्ण द्या वो
ह्मणे ॥ धृ० ॥ ह्मणे कृष्णाविण कैसें तुह्मां गमे । विळ हा करमे वांयांवि
विण तुह्मी पिटितां चावटी । द्या गे जगजेठी क्षणभरी ॥ २ ॥ क्षणभरी
सोहळा । पाहा एकवेळा घेऊनियां ॥ ३ ॥ याचें सुख तुह्मां कळलिया वरी
न फिराल ॥ ४ ॥ लटिकें हें तुह्मां वाटेल खेळणें । एका कृष्णाविणें अ
अवघ्यांचा तुह्मी टाकाल सांगात । घेऊनि अनंत जाल राना ॥ ६ ॥
आणिक बोलिलें । मग हें लागलें हरिध्यान ॥ ७ ॥ न करा हा मग या
टोकवाल बाळा आणिकाही ॥ ८ ॥ आणिका ही तुह्मा येती काकुलती ।
क्षण बैसों ॥ ९ ॥ बैसों चला पाहों गोपाळाचें सुख । एकी एक सुख सां
सांगे जंव ऐसी मात दसवंती । तंव त्या धरिती चित्तीं बाळा ॥ ११ ॥ ब
घेऊनियां जाती । नाहीं त्या परती तुका ह्मणे ॥ १२ ॥

॥ ४५५९ ॥ तुका ह्मणे पुन्हा न येती मागुत्या । कृष्णासीं खेळतां वि
दिवसराती कांहीं नाठवे तयांसी । पाहातां मुखासी कृष्णाचिया ॥ १
नये डोळयासी वीट । राहिले हे नीट ताटस्तची ॥ २ ॥ ताटस्थ राहिले
इंद्रियें व्यापार विसरलीं ॥ ३ ॥ विसरल्या तान भूक घर दार । नाहीं ह
कोठें ॥ ४ ॥ कोठें असों कोण जाला वेळ काळ । नाठवे सकळ विसरल्य
रल्या आह्मी कोणीये जातीच्या । वर्णांही चहूंच्या एक जाल्या ॥ ६
तेव्हां कृष्णाचिया सुखें । निःशंक भातुकें खेळतील ॥ ७ ॥ खेळती भा
सहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचें ॥ ८ ॥ चित्तीं तो गोविंद लटिकें

हें जन करी तैसें ॥ ९ ॥ जन करी तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करू-नियां ॥ १० ॥ करिती आपला आवघा गोविंद । जना साच फंद लटिका त्या ॥ ११ ॥ त्यांनीं केला हरि सासुरें माहेर । बंधु हे कुमार दीर भावें ॥ १२ ॥ भावना राहिली एका-चिये ठायीं । तुका ह्मणे पायीं गोविंदाचे ॥ १३ ॥

॥ ४५६० ॥ गोविंद भ्रतार गोविंद मुळहारी । नामें भेद परि एकचि तो ॥ धृ० ॥ एकाचीच नामें ठेवियेलीं दोनी । कल्पितील मनीं यावें जावें ॥ १ ॥ जावें यावें तिहीं घरीं-चिया घरीं । तेथिची सिदोरी तेथें न्यावी ॥ २ ॥ विचारितां दिसे येणें जाणें खोटें । दाविती गोमटें लोकां ऐसें ॥ ३ ॥ लोक करूनियां साच वर्तताती । तैशा त्या खेळती लटिक्याची ॥ ४ ॥ लटिकीं करिती मंगळदायकें । लटिकींच एकें एकां व्याही ॥ ५ ॥ व्याही भाई हरि सोयरा जावायी । अवघियांच्या ठायीं केला एक ॥ ६ ॥ एकासिच पावे जें कांहीं करिती । उपचार संपत्ति नाना भोग ॥ ७ ॥ भोग देती सर्व एका नारायणा । लटिक्या भावना व्याही भाई ॥ ८ ॥ लटिकाच त्यांणीं केला संवसार । जाणती साचार वेगळ्या त्या ॥ ९ ॥ त्यांणीं मृत्तिकेचें करूनि अवघें । खेळतील दोघें पुरुषनारी ॥ १० ॥ पुरुषनारी त्यांणीं ठेवियेलीं नांवें । कवतुकभावें विचरती ॥ ११ ॥ विचरती जैसे साच भावें लोक । तैसें नाहीं सुख खेळतीया ॥ १२ ॥ यांणीं जाणितलें आपआपणया । लटिकें हें वांयां खेळतों तें ॥ १३ ॥ खेळतों ते आह्मी नव्हों नारीनर । ह्मणोनि विकार नाहीं तयां ॥ १४ ॥ तयां ठावें आहे आह्मी अवघीं एक । ह्मणोनि निःशंक खेळतील ॥ १५ ॥ तयां ठावें नाहीं हरिचिया गुणें । आह्मी कोणकोणें काय खेळों ॥ १६ ॥ काय खातों आह्मी कासया सांगातें । कैसें हें लागतें नेणों मुखीं ॥ १७ ॥ मुखीं चवी नाहीं वरी अंगीं लाज । वर्ण याती काज न धरिती ॥ १८ ॥ न धरिती कांहीं संकोच त्या मना । हांसतां या जना नाइ-कती ॥ १९ ॥ नाइकती बोल आणिकांचे कानीं । हरि चित्तीं मनीं बैसलासे ॥ २० ॥ बैसलासे हरि जयांचिये चित्तीं । तयां नावडती मायबापें ॥ २१ ॥ मायबापें त्यांचीं नेतीं पाचारुनी । बळें परि मनीं हरि वसे ॥ २२ ॥ वसतील बाळा आपलाले घरीं । ध्यान त्या अंतरीं गोविंदाचें ॥ २३ ॥ गोविंदाचें ध्यान निजलिया जाग्या । आणिक वाउग्या न बोलती ॥ २४ ॥ न बोलती निजलिया हरिविण । जागृति सपन एक जालें ॥ २५ ॥ एक-विध सुख घेती नित्य बाळा । भ्रमर परिमळालागीं तैसा ॥ २६ ॥ तैसा त्यांचा भाव घेतला त्यांपरी । तुका ह्मणे हरि बाळलीला ॥ २७ ॥

॥ ४५६१ ॥ लीलाविग्रही तो लेववी खाववी । यशोदा बैसवी मांडीवरी ॥ धृ० ॥ मांडी-वरी भार पुष्पाचिये परी । बैसोनियां करी स्तनपान ॥ १ ॥ नभाचाही साक्षी पाताळा-परता । कुर्वाळिते माता हातें त्यासी ॥ २ ॥ हातें कुर्वाळुनी मुखीं घाली घांस । पुरे ह्मणे तीस पोट धालें ॥ ३ ॥ पोट धालें मग देतसे ढेंकर । भक्तीचें तें फार तुळसीदळ ॥ ४ ॥ तुळसीदळ भावें सहित देवापाणी । फार तें त्याहुनि क्षीरसागरा ॥ ५ ॥ क्षीराचा कांटाळा असे एकवेळ । भक्तीचें तें जळ गोड देवा ॥ ६ ॥ देवा भक्त जिवाहुनी आवडती ।

सकळांहि प्रीति त्यांच्याठायीं ॥ ७ ॥ त्यांचा हा आंकित सर्व भावें हरी । तुका ह्मणे करीं सर्व काज ॥ ८ ॥

॥ ४५६२ ॥ जयेवेळीं चोरूनियां नेलीं वत्सें । तयालागीं तैसें होणें लागे ॥ धृ० ॥ लागे दोहीं ठायीं करावें पाळण । जगाचा जीवन मायबाप ॥ १ ॥ माय जाल्यावरी अवघ्या वत्सांची । घरीं वत्सें जींचीं तैसा जाला ॥ २ ॥ जाला तैसा जैसे घरिंचे गोपाळ । आणिक सकळ मोहरी पांवे ॥ ३ ॥ मोहरी पांवे सिंगें वाहिल्या काहाळा । देखिला सोहाळा ब्रह्मादिकीं ॥ ४ ॥ ब्रह्मादिकां सुख स्वपनींही नाहीं । तैसें दोहीं ठायीं वोसंडलें ॥ ५ ॥ वोसंडल्या क्षीर अमुप त्या गायी । जैसी ज्याची आई तैसा जाला ॥ ६ ॥ लाघव कळलें ब्रह्मयासी याचें । परब्रह्म साचें अवतरलें ॥ ७ ॥ तरले हे जन सकळही आतां । ऐसें तो विधाता बोलियेला ॥ ८ ॥ लागला हे स्तुति करूं अनंताची । चतुर्मुख वाची भक्ति स्तोत्रें ॥ ९ ॥ भक्तिकाजें देवें केला अवतार । पृथ्वीचा भार फेडावया ॥ १० ॥ पृथिवी दाटिली होती या असुरीं । नासाहावे वरी भार तये ॥ ११ ॥ तया काकुलती आपल्या दासांची । तयालागीं वेची सर्वस्वही ॥ १२ ॥ स्वहित दासांचें करावयालागीं । अव्यक्त हें जगीं व्यक्ति आलें ॥ १३ ॥ लेखा कोण करी त्यांचिया पुण्याचा । जयांसवें वाचा बोले हरी ॥ १४ ॥ हरि नाममात्रें पातकांच्या रासी । तो आला घरासि गौळियांच्या ॥ १५ ॥ गौळियें अवघीं जालीं कृष्णमय । नामें लोकत्रय तरतील ॥ १६ ॥ तरतील नामें कृष्णाचिया दोषी । बहुत ज्यांपाशीं होइल पाप ॥ १७ ॥ पाप ऐसें नाहीं कृष्णनामें राहे । धन्य तोचि पाहे कृष्णमुख ॥ १८ ॥ मुख माझें काय जो मी वर्णू पार । मग नमस्कार घाली ब्रह्मा ॥ १९ ॥ ब्रह्मा नमस्कार घाली गोधनासी । कळला तयासि हाचि देव ॥ २० ॥ देवचि अवघा जालासे सकळ । गाई हा गोपाळ वत्सें तेथें ॥ २१ ॥ तेथें पाहाणें जें आणीक दुसरें । मूर्ख त्या अंतरें दुजा नाहीं ॥ २२ ॥ दुजा भाव तुका ह्मणे जया चित्तीं । रवरव भोगिती कुंभपाक ॥ २३ ॥

॥ ४५६३ ॥ कुंभपाक लागे तयासि भोगणें । अवघाचि नेणे देव ऐसा ॥ धृ० ॥ देव ऐसा ठावा नाहीं जया जना । तयासि यातना यम करी ॥ १ ॥ कळला हा देव तया साच खरा । गाई वत्सें घरा धाडी ब्रह्मा ॥ २ ॥ ब्रह्मादिकां ऐसा देव अगोचर । कैसा त्याचा पार जाणवेल ॥ ३ ॥ जाणवेल देव गौळियांच्या भावें । तुका ह्मणे व्हावें संचित हें ॥ ४ ॥

॥ ४५६४ ॥ संचित उत्तम भूमि कसूनियां । जाऊं नेणे वांयां परि त्याचें ॥ धृ० ॥ त्याचिया पिकासि आलिया घुमरी । आल्या गाईवरी आणिक गाई ॥ १ ॥ गाई दवडूनि घालिती बाहेरी । तंव ह्मणे हरि बांधा त्याही ॥ २ ॥ त्याही तुह्मी बांधा तुमच्या सारिख्या । भोवंडा पारिख्या वाड्यांतुनी ॥ ३ ॥ पारिख्या न येती कोणाचिया घरा । सूत्रधारी खरा नारायण ॥ ४ ॥ नारायण नांदे जयाचिये ठायीं । सहज तेथें नाहीं घालमेली ॥ ५ ॥ मेलीं हीं शाहाणीं करितां सायास । नाहीं सुखलेश तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४५६५ ॥ तुका ह्मणे सुख घेतलें गोपाळीं । नाचती कांबळीं करुनि ध्वजा ॥ धृ० ॥

करूनियां टिरी आपुल्या मांदळ । वाजविती टाळ दगडाचे ॥ १ ॥ दगडाचे टाळ कोण त्यांचा नाद । गीत गातां छंद ताल नाहीं ॥ २ ॥ ताल नाहीं गातां नाचतां गोपाळां । घननीळ सावळा तयामध्यें ॥ ३ ॥ मध्यें जयां हरि तें सुख आगळें । देहभाव काळें नाहीं तयां ॥ ४ ॥ तयांसि आळंगी आपुलिया करीं । जाती भूमिवरी लोटांगणीं ॥ ५ ॥ निजभाव देखे जयांचिये अंगीं । तुका ह्मणे संगीं क्रीडे तयां ॥ ६ ॥

॥ ४५६६ ॥ तयांसवें करी काला दहींभात । सिदोऱ्या अनंत मेळवुनी ॥ धृ० ॥ मेळवुनी अवघियांचे एके ठायीं । मागें पुढें कांहीं उरों नेदी ॥ १ ॥ नेदी चोरी करूं जाणे अंतरींचें । आपलेंही साचें द्यावें तेथें ॥ २ ॥ द्यावा दहींभात आपले प्रकार । तयांचा वेव्हार सांडवावा ॥ ३ ॥ वांटी सकळांसि हातें आपुलिया । जैसें मागे तया तैसें द्यावें ॥ ४ ॥ द्यावें सांभाळुनी सम तुकभावें । आपणहि खावें त्यांचें तुक ॥ ५ ॥ तुक सकळांचें गोविंदाचे हातीं । कोण कोणे गति भला बुरा ॥ ६ ॥ राखे त्यासि तैसें आपलाल्या भावें । विचारुनि द्यावें जैसें तैसें ॥ ७ ॥ तैसें सुख नाहीं वैकुंठींच्या लोकां । तें दिलें भाविकां गोपाळांसी ॥ ८ ॥ गोपाळांचे मुखीं देउनी कवळ । घांस माखे लाळ खाय त्यांची ॥ ९ ॥ त्यांचिये मुखींचे काढूनियां घांस । झोंबतां हातांस खाय बळें ॥ १० ॥ बळें जयाचिया ठेंगणें सकळ । तयातें गोपाळ पाडितील ॥ ११ ॥ पाठी उचलूनि वाहातील खांदीं । नाचतील मांदी मेळवुनी ॥ १२ ॥ मांदी मेळवुनी धणी दिली आह्मां । तुका ह्मणे जमा केल्या गाई ॥ १३ ॥

॥ ४५६७ ॥ केला पुढें हरि अस्तमाना दिसा । मागें त्या सरिसा थाट चाले ॥ धृ० ॥ थाट चाले गाई गोपाळांची धूम । पुढें कृष्ण राम तयां सोयी ॥ १ ॥ सोयी लागलिया तयांची अनंतीं । न बोलावितां येती मागें तया ॥ २ ॥ तयांचिये चित्तीं बैसला अनंत । घेती नित्यनित्य तेंचि सुख ॥ ३ ॥ सुख नाहीं कोणा हरिच्या वियोगें । तुका ह्मणे जुगें घडी जाय ॥ ४ ॥

॥ ४५६८ ॥ जाय फाकोनियां निवडोनि गाई । आपलाल्या सोयी घराचिये ॥ धृ० ॥ घराचिये सोयी अंतरला देव । गोपाळांचे जीव गोविंदापें ॥ १ ॥ गोविंदें वेधिलें तुका ह्मणे मन । वियोगेंही ध्यान संयोगाचें ॥ २ ॥

॥ ४५६९ ॥ संयोग सकळां असे सर्वकाळ । तुश्चित्त गोपाळ आला दिसे ॥ धृ० ॥ गोपाळ गुणाचा ह्मणे गुणमय । निंबलोण माये उतरिलें ॥ १ ॥ उतरूनि हातें धरि हनुवटी । ओवाळूनि दिठी सांडियेली ॥ २ ॥ दिठी घाली माता विश्वाच्या जनका । भक्तिचिया सुखा गोडावला ॥ ३ ॥ लहान हा थोर जीवजंतु भूतें । आपण दैवतें जाला देवी ॥ ४ ॥ देवी ह्मैसासुर मुंजिया खेचर । लहानहि थोर देव हरी ॥ ५ ॥ हरि तुका ह्मणे अवघा एकला । परि या धाकुला भक्तीसाठीं ॥ ६ ॥

॥ ४५७० ॥ भक्तीसाठीं केली यशोदेसी आळी । थिकोनियां चोळी डोळे देव ॥ धृ० ॥ देव गिळुनियां धरिलें मोहन । माय ह्मणे कोण येथें दुजें ॥ १ ॥ दुजें येथें कोणी नाहीं कृष्णाविण । निरुतें जाणोन पुसे देवा ॥ २ ॥ देवापाशीं पुसे देव काय जाला । हांसें

आलें बोला याचें हरी ॥ ३ ॥ यांचे मी जवळी देव तो नेणती । लटिकें मानिती साच खरें ॥ ४ ॥ लटिकें तें साच साच तें लटिकें । नेणती लोभिकें आशाबद्ध ॥ ५ ॥ सांग ह्मणे माय येरु वासी तोंड । तंव तें ब्रह्मांड देखे माजी ॥ ६ ॥ माजी जया चंद्र सूर्य तारांगणें । तो भक्तांकारणें बाळलीळा ॥ ७ ॥ लीळा कोण जाणें याचें महिमान । जगाचें जीवन देवादिदेव ॥ ८ ॥ देवें कवतुक दाखविलें तयां । लागतील पायां मायबापें ॥ ९ ॥ मायबाप ह्मण हाचि देव खरा । आणिक पसारा लटिका तो ॥ १० ॥ तोहि त्यांचा देव दिला नारायणें । माझें हें करणें तोहि मीच ॥ ११ ॥ मींच ह्मणऊनि जें जें जेथें ध्याती । तेथें मी श्रीपति भोगिता तें ॥ १२ ॥ तें मज वेगळें मी तया निराळा । नाहीं या सकळा ब्रह्मांडांत ॥ १३ ॥ तद्भावना तैसें भविष्य तयाचें । फळ देता साचें मीच एक ॥ १४ ॥ मीच एक खरा बोलें नारायण । दाविलें निर्वाण निजदासां ॥ १५ ॥ निजदासां खूण दाविली निरुती । तुका ह्मणे भूतीं नारायण ॥ १६ ॥

॥ ४५७१ ॥ नारायण भूतीं न कळे जयांसि । तयां गर्भवासीं येणें जाणें ॥ धृ० ॥ येणें जाणें होय भूतांच्या मत्सरें । न कळतां खरें देव ऐसा ॥ १ ॥ देव ऐसा जया कळला सकळ । गेली तळमळ द्वेषबुद्धी ॥ २ ॥ बुद्धीचा पालट नव्हे कोणे काळीं । हरि जळीं स्थळीं तयां चित्तीं ॥ ३ ॥ चित्त तें निर्मळ जैसें नवनीत । जाणिजे अनंत तयामाजी ॥ ४ ॥ तयामाजी हरि जाणिजे त्या भावें । आपलें परावें सारखेंची ॥ ५ ॥ चितनें तयाच्या तरतीं आणिक । जो हें सकळिक देव देखे ॥ ६ ॥ देव देखे तोही देव कसा नव्हे । उरला संदेहे काय त्यासी ॥ ७ ॥ काया वाचा मनें पूजावे वैष्णव । ह्मणऊनि भाव धरूनियां ॥ ८ ॥ यांसि कवतुक दाखविलें रानीं । वोणवा गिळूनि गोपाळांसी ॥ ९ ॥ गोपाळांसि डोळे झांकविले हातें । धरिलें अनंतें विश्वरूप ॥ १० ॥ पसरूनि मुख गिळियेलें ज्वाळ । पहाती गोपाळ बोटां सांदीं ॥ ११ ॥ संधि सारूनियां पाहिलें अनंता । ह्मणती ते आतां कळलासी ॥ १२ ॥ कळला हा तुझा देह नव्हे देवा । गिळिला वोणवा आणिक तो ॥ १३ ॥ तो तयां कळला आरुषां गोपाळां । दुर्गम सकळां साधनांसी ॥ १४ ॥ साण उरे तुका ह्मणे साधनाचा । भाविकांसि साचा भाव दावी ॥ १५ ॥

॥ ४५७२ ॥ भाव दावी शुद्ध देखोनियां चित्त । आपल्या अंकित निजदासां ॥ धृ० ॥ सांगे गोपाळांसि काय पुण्य होतें । वांचलों जळते आगी हातीं ॥ १ ॥ आजि आह्मां येथें राखियेलें देवें । नाहीं तरी जीवें न वांचतों ॥ २ ॥ न वांचत्या गाई जळतों सकळें । पूर्वपुण्यबळें वांचविलें ॥ ३ ॥ पूर्वपुण्य होतें तुमचिये गांठी । बोले जगजेठी गोपाळांसी ॥ ४ ॥ गोपाळांसि ह्मणे वैकुंठनायक । भले तुह्मी एक पुण्यवंत ॥ ५ ॥ करी तुका ह्मणे करवीं आपण । द्यावें थोरपण सेवकांसी ॥ ६ ॥

॥ ४५७३ ॥ काय आह्मां चाळविसी वायांविण । ह्मणती दुरून देखिलासी ॥ धृ० ॥ लावूनियां डोळे नव्हतों दुश्चित । तुज परचित्त भाव होती ॥ १ ॥ होती दृष्टि आंत उघडी आमची । बाहेरी ते वांयांचि कुंची झाकूं ॥ २ ॥ जालासि थोरला थोरल्या

तोंडाचा । गिळियेला वाचा धूर आगी ॥ ३ ॥ आगी खातो ऐसा आमचा सांगाती । आनंदें नाचती भोंवताली ॥ ४ ॥ भोंवतीं आपणा मेळविलीं देवें । तुका ह्मणे ठावें नाहीं ज्ञान ॥ ५ ॥

॥ ४५७४ ॥ नाहीं त्याची शंका वैकुंठनायका । नेणती ते एकाविण दुजा ॥ धृ० ॥ जाणतियां सर्वे येऊं नेदी हरी । तर्कवादीं दुरी दुराविले ॥ १ ॥ वादियासि भेद निंदा अहंकार । देऊनियां दूर दुराविले ॥ २ ॥ दुरावले दूर आशाबद्ध देवा । कारितां या सेवा कुटुंबाची ॥ ३ ॥ चित्तीं द्रव्यदारा पुत्रादिसंपत्ती । समान ते होती पशु नर ॥ ४ ॥ नरक साधिले विसरोनि देवा । बुडाले ते भवा नदीमाजी ॥ ५ ॥ जीहीं हरिसंग केला संवसारीं । तुका ह्मणे खरी खेप त्यांची ॥ ६ ॥

॥ ४५७५ ॥ खेळींमेळीं आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपाशीं ॥ धृ० ॥ मातेपाशीं एक नवल सांगती । जाली तैसी ख्याति वोणव्याची ॥ १ ॥ ओंवाळिलें तिनें करूनि आरती । पुसे दसवंती गोपाळांसी ॥ २ ॥ पुसे पडताळुनी मागुती मागुती । गोपाळ सांगती कवतुक ॥ ३ ॥ कवतुक कानीं आइकतां त्यांचे । बोलतां य वाचे वीट नये ॥ ४ ॥ नयन गुंतले श्रीमुख पाहतां । न साहे लवतां आड पातें ॥ ५ ॥ तेव्हां कवतुक कळों आलें कांहीं । हळुहळु दोहीं मायबापां ॥ ६ ॥ हळुहळु त्यांचें पुण्य जालें वाड । वारलें हें जाड तिमिराचें ॥ ७ ॥ तिमिर हें तेथें राहों शके कैसें । जालियां प्रकाशें गोविंदाच्या ॥ ८ ॥ दावी तुका ह्मणे देव ज्या आपणा । पालटे तें क्षणामाजी एका ॥ ९ ॥

॥ ४५७६ ॥ काय आतां यासि ह्मणावें लेंकरूं । जगाचा हा गुरु मायबाप ॥ धृ० ॥ माया याची यासि राहिली व्यापुन । कळों नये क्षण एक होतां ॥ १ ॥ क्षण एक होतां विसरलीं त्यासी । माझेंमाझें ऐसें करी बाळा ॥ २ ॥ करी कवतुक कळों नेदी कोणा । योजूनि कारणा तेंचि खेळे ॥ ३ ॥ तें सुख लुटिलें घरिंचिया घरीं । तुका ह्मणे परि आपुलाल्या ॥ ४ ॥

॥ ४५७७ ॥ आपुलाल्या परि करितील सेवा । गीत गाती देवा खेळवुनी ॥ धृ० ॥ खेळु मांडियेला यमुनें पावळीं । यारे चेंडुफळी खेळूं आतां ॥ १ ॥ आणविल्या डांगा चवगुणां काठी । बैसोनियां वांटी गडिया गडी ॥ २ ॥ गडी जंव पाहे आपणासमान । नाहीं नारायण ह्मणे दुजा ॥ ३ ॥ जाणोनि गोविंदें सकळांचा भाव । तयांसि उपाव तोचि सांगे ॥ ४ ॥ सांगे सकळांसि व्हारे एकीकडे । चेंडू राखा गडे तुह्मी माझा ॥ ५ ॥ मज हा न लगे आणिक सांगाती । राखावी बहुतीं हाल माझी ॥ ६ ॥ माझे हाके हाक मेळवा सकळ । नव जा बरळ एकमेकां ॥ ७ ॥ एका समतुकें अवघेचि राहा । जाईल तो पाहा धरा चेंडू ॥ ८ ॥ चेंडू धरा ऐसें सांगतो सकळां । आपण निराळा एकलाची ॥ ९ ॥ चिंतूनियां चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें । ठेलीं सकळिक पाहातांची ॥ १० ॥ पाहातांचि ठेलीं न चलतां कांहीं । येरू लवलाहीं ह्मणे धरा ॥ ११ ॥ धरावा तयानें त्याचें बळ ज्यासी । येरा आणिकांसि लाग नव्हे ॥ १२ ॥ नव्हे काम बळ बुद्धि नाहीं त्याचें । न धरवे निचें उंचाविण ॥ १३ ॥ विचारीं पडिले

देखिले गोपाळ । या ह्मणे सकळ मजमागें ॥ १४ ॥ मार्ग देवाविण न दिसे आणिका । चतुर होत का बहुत जन ॥ १५ ॥ चतुर चिंतिती बहुत मारग । हरि जाय लाग पाहोनियां ॥ १६ ॥ यामागें जे गेले गोविंदा गोपाळ । ते नेले सीतळ पंथ ठायां ॥ १७ ॥ पंथ जे चुकले आपले मतीचे । तयांमागें त्यांचे तेचि हाल ॥ १८ ॥ हाल दोघां एक मोहरां मागिल्यां । चालतां चुकलां वाट पंथ ॥ १९ ॥ पंथ पुढिलांसी चालतां न कळे । मागिलांनी डोळे उघडावे ॥ २० ॥ वयाचा प्रबोध विचार ज्यां नाहीं । समान तो देहीं बाळकांसी ॥ २१ ॥ सिकविलें हित नायिके जो कानीं । त्यामागें भल्यांनीं जाऊं नये ॥ २२ ॥ नये तेंचि करी श्रेष्ठाचिया मना । मूर्ख एक जाणा तोचि खरा ॥ २३ ॥ रानभरी जाले न कळे मारग । मग तो श्रीरंग आठविला ॥ २४ ॥ लाज सांडूनियां मारितील हाका । कळलें नायका वैकुंठींच्या ॥ २५ ॥ चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । तया अति प्रीति गोपाळांची ॥ २६ ॥ गोपाळांचा धांवा आइकिला कानीं । सोयी चक्रपाणि पालविले ॥ २७ ॥ सोयी धरूनियां आले हरिपासीं । लहान थोरांसी सांभाळिलें ॥ २८ ॥ सांभाळिलें तुका ह्मणे सकळही । सुखी जाले तेही हरिमुखें ॥ २९ ॥

॥ ४५७८ ॥ मुखें सांगे त्यांसि पैल चेंडू पाहा । उदकांत डोहाचिये माथां ॥ धृ० ॥ माथां कळंबाचे अववडा ठायीं । दाविये़ला डोहीं जळामाजी ॥ १ ॥ जळांत पाहातां हाडति या दृष्टी । ह्मणे जगजेठी ऐसें नव्हे ॥ २ ॥ नव्हे साच चेंडू छाया दिसे आंत । खरा तेथें चित्त लावा वरी ॥ ३ ॥ वरी देखियेला अवघ्यांनीं डोळां । ह्मणतां गोपाळा आतां कैसें ॥ ४ ॥ कैसें करूनियां उतरावा खालीं । देखोनियां भ्यालीं अवघीं डोहो ॥ ५ ॥ डोहो बहु खोल काळया भीतरीं । सरलीं माघारीं अवघीं जणें ॥ ६ ॥ जयाचें कारण तयासीच ठावें । पुसे त्याच्या भावें त्यास हरी ॥ ७ ॥ त्यासि नारायण ह्मणे राहा तळीं । चढे वनमाळी झाडावरी ॥ ८ ॥ वरि जातां वरि पाहाती गोपाळ । ह्मणती सकळ आह्मी नेणों ॥ ९ ॥ नेणों ह्मणती हें करितोसि काई । आह्मां तुझी आई देइल सिव्या ॥ १० ॥ आपुलिया कानां ठेवूनियां हात । सकळीं निमित्य टाळियेलें ॥ ११ ॥ निमित्याकारणें रचिलें कारण । गेला नारायण खांदीवरी ॥ १२ ॥ खांदीवरी पाव ठेविला देवें । पाडावा त्या भावें चेंडू तळीं ॥ १३ ॥ तळील नेणती तुका ह्मणे भाव । अंतरीचा देव जाणों नेदी ॥ १४ ॥

॥ ४५७९ ॥ नेदी कळों केल्याविण तें कारण । दाखवी आणून अनुभवा ॥ धृ० ॥ न पुरेसा हात घाली चेंडूकडे । ह्मणीतलें गडे सांभाळावें ॥ १ ॥ सांभाळ करितां सकळां जिवांचा । गोपाळांसि वाचा ह्मणे बरें ॥ २ ॥ बरें विचारुनी करावें कारण । ह्मणे नारायण बऱ्या बरें ॥ ३ ॥ बरें ह्मणऊनि तयांकडे पाहे । सोडविला जाय चेंडू तळा ॥ ४ ॥ तयासवें उडी घातली अनंतें । गोपाळ रडते येती घरा ॥ ५ ॥ येतां त्यांचा लोकीं देखिला कोल्हाळ । सामोरीं सकळ आलीं पुढें ॥ ६ ॥ पुसती ते मात आपआपल्यासी । हरिदुःखें त्यांसि न बोलवे ॥ ७ ॥ न बोलवे हरि बुडालासें मुखें । कुटितील दुःखें उर माथे ॥ ८ ॥ मायबापें तुका ह्मणे न देखती । ऐसें दुःख चित्तीं गोपाळांच्या ॥ ९ ॥

॥ ४५८० ॥ गोपाळां उभडु नावरे दुःखाचा । कुंठित हे वाचा जाली त्यांची ॥ धृ० ॥ जालें काय ऐसें न कळे कोणासी । ह्मणती तुह्मांपासीं देव होता ॥ १ ॥ देवासवें दुःख न पवतें ऐसें । कांहीं अनारिसें दिसे आजी ॥ २ ॥ आजि दिसे हरि फांकला यांपाशीं । ह्मण-ऊनि ऐशी परि जाली ॥ ३ ॥ जाणविल्याविण कैसें कळे त्यांसी । शाहाणे तयांसि कळों आलें ॥ ४ ॥ कळों आलें तीहीं फुंद शांत केला । ठायींचाच त्यांला थोडा होता ॥ ५ ॥ होता तो विचार सांगितला जना । गोपाळ शाहाणा होता त्याणें ॥ ६ ॥ सांगे आतां हरि तुह्मां आह्मा नाहीं । बुडाला तो डोहीं यमुनेच्या ॥ ७ ॥ यासि अवकाश नव्हेचि पुसतां । जालिया अनंता कोण परी ॥ ८ ॥ परि त्या दुःखाची काय सांगों आतां । तुका ह्मणे माता लोकपाळा ॥ ९ ॥

॥ ४५८१ ॥ पाषाण फुटती तें दुःख देखोनी । करितां गौळणी शोक लोकां ॥ धृ० ॥ काय ऐसें पाप होतें आह्मांपासीं । बोलती एकासी एक एका ॥ १ ॥ एकांचिये डोळां असुं बाह्यात्कारी । नाहीं तीं अंतरीं जळतील ॥ २ ॥ जळतील एकें अंतर्बाह्यात्कारें । टाकिलीं लेकुरें कडियेहुनी ॥ ३ ॥ निवांतचि एकें राहिलीं निश्चित । बाहेरी ना आंत जीव त्यांचे ॥ ४ ॥ त्यांचे जीव वरी आले त्या सकळां । एका त्या गोपाळांवांचूनियां ॥ ५ ॥ वांचणें तें आतां खोटें संवसारीं । नव्हे भेटी जरी हरिसवें ॥ ६ ॥ सवें घेऊनियां चाललीं गोपाळां । अवघींच बाळा नरनारी ॥ ७ ॥ नरनारी नाहीं मनुष्याचें नांव । गोकुळ हें गांव सांडियेलें ॥ ८ ॥ सांडियेलीं अन्नें संपदा सकळ । चित्तीं तो गोपाळ धरुनी जाती ॥ ९ ॥ तिरीं माना घालूनियां उभ्या गाई । तटस्थ या डोहीं यमुनेच्या ॥ १० ॥ यमुनेच्या तिरीं झाडें वृक्ष वल्ली । दुःखें कोमाइलीं कृष्णाचिया ॥ ११ ॥ यांचें त्यांचें दुःख एक जालें तिरीं । मग शोक करी मायबाप ॥ १२ ॥ मायबाप तुका ह्मणे सहोदर । तोंवरीच तीर न पवतां ॥ १३ ॥

॥ ४५८२ ॥ तीर देखोनियां यमुनेचें जळ । कांटींच कोल्हाळ करितातीं ॥ धृ० ॥ कइवाड नव्हे घालावया उडी । आपणासि ओढी भय मागें ॥ १ ॥ मागें सरे माय पाउला पाउलीं । आपलेंच घाली धाकें अंग ॥ २ ॥ अंग राखोनियां माय खेद करी । अंतरींचें हरि जाणवलें ॥ ३ ॥ जाणवलें मग देवें दिली बुडी । तुका ह्मणे कुडी भावना हे ॥ ४ ॥

॥ ४५८३ ॥ भावनेच्या मुळें अंतरला देव । शिरला संदेह भयें पोटीं ॥ धृ० ॥ पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें । बोलिल्या सरिसें न करवे ॥ १ ॥ न करवे त्याग या जीवाचा नास । नारायण त्यास अंतरला ॥ २ ॥ अंतरला बहु बोलतां वाउगें । अंतरींच्या त्यागें-विण गोष्टी ॥ ३ ॥ गोष्टी सकळांच्या आइकिल्या देवें । कोण कोण्याभावें रडती तीं ॥ ४ ॥ तीं गेलीं घरास आपल्या सकळ । गोधनें गोपाळ लोक माय ॥ ५ ॥ मायबापांची तों ऐसी जाली गती । तुका ह्मणे अंतीं कळों आलें ॥ ६ ॥

॥ ४५८४ ॥ आला त्यांचा भाव देवाचिया मना । अंतरीं कारणांसाठीं होता ॥ धृ० ॥ होता भाव त्यांचा पाहोनि निराळा । नव्हता पाताळा गेला आधीं ॥ १ ॥ आधीं पाठी-मोरीं जालीं तीं सकळें । मग या गोपाळें बुडी दिली ॥ २ ॥ दिली हाक त्याणें जाऊनि

पाताळा । जागविलें काळा भुजंगासी ॥ ३ ॥ भुजंग हा होता निजला मंदिरीं । निर्भर अंतरीं गर्वनिधी ॥ ४ ॥ गर्व हरावया आला नारायण । मिस या करून चेंडुवाचें ॥ ५ ॥ चेंडुवाचे मिसें काळया नाथावा । तुका ह्मणे देवा कारण हें ॥ ६ ॥

॥ ४५८५ ॥ काळयाचे मागे चेंडू पत्नीपाशीं । तेजःपुंज राशी देखियेला ॥ धृ० ॥ लावण्यपुतळा मुखप्रभाराशी । कोटि रविशशी उगवले ॥ १ ॥ उगवला खांब कर्दळीचा गाभा । ब्रीदें वांकी नभा देखे पायीं ॥ २ ॥ पाहिला सकळ तिनें न्याहाळुनी । कोण या जननी विसरली ॥ ३ ॥ विसरु हा तीस कैसा याचा जाला । जीवाहुनि वाला दिसतसे ॥ ४ ॥ दिसतसें रूप गोजिरें लाहान । पाहातां लोचन सुखावले ॥ ५ ॥ पाहिलें पतीनिं काळा दुष्टाकडे । मग ह्मणे कुडें जालें आतां ॥ ६ ॥ आतां हा उठोनि खाईल या बाळा । देईल या वेल्हाळा माय जीव ॥ ७ ॥ जीव याचा कैसा वांचे ह्मणे नारी । मोहिली अंतरीं हरिरूपें ॥ ८ ॥ रूपें अनंताचीं अनंतप्रकार । न कळे साचार तुका ह्मणे ॥ ९ ॥

॥ ४५८६ ॥ ह्मणे चेंडू कोणें आणिला या ठाया । आलों पुरवाया कोड त्याचें ॥ धृ० ॥ त्याचें आइकोन निष्ठुर वचन । भयाभीत मन जालें तीचें ॥ १ ॥ तिची चित्तवृत्ति होती देवावरी । आधीं ते माघारी फिरली वेगीं ॥ २ ॥ वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयी । विघ्न आलें कांहीं आह्मांवरी ॥ ३ ॥ वरि उदकास अंत नाहीं पार । अक्षोभ सागर भरलासे ॥ ४ ॥ संचार करूनि कोण्या वाटे आला । ठायींच देखिला अवचिता ॥ ५ ॥ अवचिता नेणों येथें उगवला । दिसे तो धाकुला बोल मोठे ॥ ६ ॥ मोठ्यानें बोलतो भय नाहीं मनीं । केला उठवुनी काळ जागा ॥ ७ ॥ जागविला काळसर्प तये वेळीं । उठिला कल्लोळीं विषाचिये ॥ ८ ॥ यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळयाकृतांतधुधुकारें ॥ ९ ॥ कारणें ज्या येथें आला नारायण । जालें दरुषण दोघांमध्यें ॥ १० ॥ दोघांमध्यें जाले बोल परस्परें । प्रसंग उत्तरें युद्धाचिया ॥ ११ ॥ चिंतावला चित्तीं तोंडें बोले काळ । करीन सकळ ग्रास तुझा ॥ १२ ॥ जाला सावकाश झेंप घाली वरी । तंव हाणे हरि मुष्टिघातें ॥ १३ ॥ तेणें काळें त्यासि दिसे काळ तैसा । हरावया जैसा जीव आला ॥ १४ ॥ आठवलें काळा हाकारिलें गोत । मिळालीं बहुत नागकुळें ॥ १५ ॥ कल्हारीं संधानीं वेष्टियेला हरी । अवघा विखारीं व्यापियेला ॥ १६ ॥ यांस तुका ह्मणे नाहीं भक्ताविण । गरुडाचें चिंतन केलें मनीं ॥ १७ ॥

॥ ४५८७ ॥ निजदास उभा तात्काळ पायापें । स्वामि देखे सर्पें वेष्टियेला ॥ धृ० ॥ लहानथोरें होतीं मिळालीं अपारें । त्याच्या धुधुकारें निवारलीं ॥ १ ॥ निघतां आपटी धरूनि धांवामधीं । एकाचेंचि वधी माथें पायें ॥ २ ॥ एकीं जीव दिले येतांच त्या धाकें । येतील तीं एकें काकुलती ॥ ३ ॥ यथेष्ट भक्षिलीं पोट धाये वरी । तंव ह्मणे हरि पुरे आतां ॥ ४ ॥ आतां करूं काम आलों जयासाठीं । हरि घाली मिठी काळयासी ॥ ५ ॥ यासि नाथूनियां नाकीं दिली दोरी । चेंडू भार शिरीं कमळांचा ॥ ६ ॥ चालविला वरी बैसे नारायण । गरुडा आळंगुन बहुडविलें ॥ ७ ॥ विसरु न पडे संवगड्या गाई । यमु-

नेच्या डोहीं लक्ष त्यांचें ॥ ८ ॥ त्याच्या गोष्टी कांठीं बैसोनि सांगती । बुडाला दाविती येथें हरी ॥ ९ ॥ हरीचें चिंतन करितां आठव । तुका ह्मणे देव आला वरी ॥ १० ॥

॥ ४५८८ ॥ अवचित त्यांणीं देखिला भुजंग । पळतील मग हाउ आला ॥ धृ० ॥ आला घेऊनियां यमुने बाहेरी । पालविती करीं गडियांसी ॥ १ ॥ गडियांसि ह्मणे वैकुंठनायक । यारे सकळिक मजपाशीं ॥ २ ॥ मजपाशीं तुह्मां भय काय करी । जवळि या दुरी जाऊं नका ॥ ३ ॥ कानीं आइकिले गोविंदाचे बोल । ह्मणती नवल चला पाहों ॥ ४ ॥ पाहों आले हरीजवळ सकळ । गोविंदें गोपाळ आळिंगिले ॥ ५ ॥ आल्या गाई वरी घालितील माना । वोरसलें स्तना क्षीर लोटें ॥ ६ ॥ लोटती सकळें एकावरी एक । होऊनि पृथक कुर्वाळलीं ॥ ७ ॥ कुर्वाळलीं आनंदें घेती चारापाणी । तिहीं चक्रपाणि देखियेला ॥ ८ ॥ त्यांच पाशीं होता पार केली माव । न कळे संदेह पडलिया ॥ ९ ॥ याति वृक्षवल्ली ह्मल्या कोमेलिया । त्यांसि कृष्णें काया दिव्य दिली ॥ १० ॥ दिलें गोविंदें त्या पदा नाहीं नाश । तुका ह्मणे आस निरसली ॥ ११ ॥

॥ ४५८९ ॥ आस निरसली गोविंदाचे भेटी । संवसारा तुटी पुढिलिया ॥ धृ० ॥ पुढें पाठविलें गोविंदें गोपाळां । देऊनि चपळां हातीं गुढी ॥ १ ॥ हाका आरोळियां देऊनि नाचती । एक दाखविती हरि आला ॥ २ ॥ आरंधीं पडिली होतीं तयां घरीं । संकीर्ण त्या नारी नरलोक ॥ ३ ॥ लोकां भूक तान नाहीं निद्रा डोळा । रूप वेळोवेळां आठविती ॥ ४ ॥ आहाकटा मग करिती गेलिया । आधीं ठावा तयां नाहीं कोणा ॥ ५ ॥ आधीं चुकी मग घडे आठवण । तुका ह्मणे जन परिचयें ॥ ६ ॥

॥ ४५९० ॥ जननी हे ह्मणे आहा काय जालें । शरीर रक्षिलें काय काजें ॥ धृ० ॥ काय काज आतां हरिविण जिणें । नित्य दुःख कोणें सोसावें हें ॥ १ ॥ हें दुःख न सरे हरि न भेटे तों । त्यामागेंचि जातों एका वेळे ॥ २ ॥ एक वेळ जरी देखतें मी आतां । तरी जीवापरता न करितें ॥ ३ ॥ करितां हे मात हरीचें चिंतन । शुभ तो शकुन तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४५९१ ॥ शुभ मात तिहीं आणिली गोपाळीं । चेंडू वनमाळी घेउनि आले ॥ धृ० ॥ आली दारा देखे हरुषाची गुढी । सांगितली पुढी हरुषें मात ॥ १ ॥ हरुषलीं माता केलें निंबलोण । गोपाळांवरून कुरवंडी ॥ २ ॥ गोपाळां भोवतें मिळालें गोकुळ । अवघीं सकळ लहान थोरें ॥ ३ ॥ थोर सुख जालें ते काळीं आनंद । सांगती गोविंद वरि आला ॥ ४ ॥ आले वरि बैसोनियां नारायण । काळया नाथून वहन केलें ॥ ५ ॥ नगराबाहेरी निघाले आनंदें । लावूनियां वाद्यें नाना घोष ॥ ६ ॥ नारायणापुढें गोपाळ चालती । आनंदें नाचती गाती गीत ॥ ७ ॥ तंव तो देखिला वैकुंठींचा पती । लोटांगणीं जाती सकळही ॥ ८ ॥ सकळही एका भावें आलिंगिले । अवघियां जाले अवघे हरी ॥ ९ ॥ हरि आलिंगनें हरिरूप जालीं । आप विसरलीं आपणास ॥ १० ॥ सकळांसी सुख एक दिलें देवें । मायबापभावें लोकपाळां ॥ ११ ॥ मायबाप देवा नाहीं लोकपाळ । सारिखीं सकळ तुका ह्मणे ॥ १२ ॥

॥ ४५९२ ॥ नेणें वर्ण धर्म जीं आलीं सामोरीं । अवघींच हरि आलिंगिलीं
हरि लोकपाळ आले नगरांत । सकळांसहित मायबाप ॥ १ ॥ पारणें तयांचें
वेळे । देखिलें सावळें परब्रह्म ॥ २ ॥ ब्रह्मानंदें लोक सकळ नाचती । गुढिया
घरोघरीं ॥ ३ ॥ घरोघरीं सुख आनंद सोहळा । सडे रंग माळा चौकहारीं ॥
वृंदावनें तुळसीचीं बनें । रामकृष्णगाणें नारायण ॥ ५ ॥ नारायण तिहीं पूजिल
नाना पुष्पयाती करूनियां ॥ ६ ॥ यांचें ऋण नाहीं फिटलें मागील । पुढें
जोडिती हीं ॥ ७ ॥ हीं नव्हतां कधीं या देवा वेगळीं । केला वनमाळी सेवाऋण
सेवाऋणें तुका ह्मणे रूपधारी । भक्तांचा कैवारी नारायण ॥ ९ ॥

॥ ४५९३ ॥ नारायण आले निजमंदिरासी । जाले या लोकांसि बहुडविते
बहुडविले बहु केलें समाधान । विसरु तो क्षण नका माझा ॥ १ ॥ मात
सकळ वृत्तांत । केलें दंडवत सकळांनीं ॥ २ ॥ सकळां भातुकें वांटिल्या साखर
लाल्या घरा लोक गेले ॥ ३ ॥ लोक गेले कामा गाईपें गोपाळ । वारली सकळ
पाठी ॥ ४ ॥ लोभ दावूनियां आपला विसर । पाडितो कुमर धनआशा ॥ ५ ॥
बांधले तुका ह्मणे जन । काय नारायण ऐसा जाणें ॥ ६ ॥

॥ ४५९४ ॥ जाला कवतुक करितां रोकडें । आणिकही पुढें नारायण
येऊनियां पुढें धरिला मारग । हरावया भाग इंद्रयाजीं ॥ १ ॥ इंद्रा दहीं दुध
लोणी । घतलें हिरोनि वाटे त्यांचें ॥ २ ॥ हिरोनि घेतल्या कावडी सकळा ।
गोपाळा बरें नव्हे ॥ ३ ॥ नव्हे तेंचि करी न भे कळिकाळा । तुका ह्मणे लीव
देव ॥ ४ ॥

॥ ४५९५ ॥ खेळ नव्हे बरा इंद्र कोपलिया । देव ह्मणे तयां भेऊं नका ॥ धृ०
धरूं भय धाक कांहीं मनीं । बोले चक्रपाणि गौळियांसी ॥ १ ॥ गौळियांसि ध
या वचनें । आशंकितमनें वेडावलीं ॥ २ ॥ वेडावलीं त्यासि न कळतां माव । देव
देव नोळखतां ॥ ३ ॥ नोळखतां दुःखें वाहाती शरीरीं । तुका ह्मणे वरि भारवाही
॥ ४५९६ ॥ भारवाही नोळखती या अनंता । जवळी असतां अंगसंगें ॥ धृ०
संगें तया न कळे हा देव । कळोनि संदेह मागुताला ॥ १ ॥ मागुती पडती
डोहीं । जयाची हे नाहीं बुद्धि स्थिर ॥ २ ॥ बुद्धि स्थिर होऊं नेदी नारायण । अ
जन लोभिकांची ॥ ३ ॥ लोभिकां न साहे देवाचें करणें । तुका ह्मणे तेणें दुःखी हो
॥ ४५९७ ॥ दुःखी होती लोभें करावें तें काई । उडतील गाई ह्मसी आतां
आणिकही कांहीं होईल अरिष्ट । नायिके हा धीट सांगितलें ॥ १ ॥ सांगों चल
मायबापांपाशीं । निघाले घरासि देवा रागें ॥ २ ॥ रागें काला देतां न घेती
ठोकवी गोपाळ क्रोधियांसी ॥ ३ ॥ क्रोध देवावरि धरियेला राग । तुका ह्मणे
लभती ॥ ४ ॥

॥ ४५९८ ॥ भाग त्या सुखाचे वांकड्यां बोबड्यां । आपलिया गड्यां भा
॥ धृ० ॥ भारवाही गेले टाकूनि कावडी । नवनीतगोडी भाविकांसी ॥ १

करूनियां वांटिलां सकळां । आनंदें गोपाळांमाजी खेळे ॥ २ ॥ खेळेंमेळें दहीं दुध तूप खाती । भय नाहीं चित्तीं कवणाचें ॥ ३ ॥ कवणाचें चाले तुका ह्मणे बळ । जयासि गोपाळ साह्य जाला ॥ ४ ॥

॥ ४५९९ ॥ जाणवलें इंद्रा चरित्र सकळ । वांकुल्या गोपाळा दाविताती ॥ धृ० ॥ तातडिया मेघां आज्ञा करी राव । गोकुळींचा ठाव उरों नेदा ॥ १ ॥ नेदाविया गाई ह्मसी वांचा लोक । पुरा सकळिक सिळाधारीं ॥ २ ॥ धाक नाहीं माझा गोवळियां पोरां । सकळिक मारा ह्मणे मेघां ॥ ३ ॥ ह्मणविती देव आपणा तोंवरि । जंव नाहीं वरी कोपलों मी ॥ ४ ॥ मीपणें हा देव न कळेचि त्यांसी । अभिमानें रासि गर्वाचिया ॥ ५ ॥ अभिमानरासि जयाचिये ठायीं । तुका ह्मणे तई देव दुरी ॥ ६ ॥

॥ ४६०० ॥ देव त्यां फावला भाविकां गोपाळां । नाहीं तेथें कळा अभिमान ॥ धृ० ॥ नाडलीं आपल्या आपणचि एकें । संदेहदायकें बहुफारें ॥ १ ॥ फारें चाळविलीं नेदी कळों भाव । देवा आदिदेव विश्वंभर ॥ २ ॥ विश्वासावांचुनी कळों नये खरा । अभक्तां अबीरा जैसा तैसा ॥ ३ ॥ जैसा भाव तैसा जवळि त्या दुरी । तुका ह्मणे हरि देतो घेतो ॥ ४ ॥

॥ ४६०१ ॥ तो या साच भावें न कळेचि इंद्रा । ह्मणऊनि धारा घाली सिळा ॥ धृ० ॥ घाली धारा मेघ कडाडिला माथा । वरि अवचिता देखियेला ॥ १ ॥ देखती पाऊस बोळला गोपाळ । भ्याले हे सकळ विचारिती ॥ २ ॥ विचार पडला विसरले खेळ । अन्याय गोपाळ ह्मणती केला ॥ ३ ॥ लागलेंसे गोड न कळे तें काळीं । भेणें वनमाळी आठविती ॥ ४ ॥ आतां काय कैसा करावा विचार । गोधनासि थार आपणिया ॥ ५ ॥ यांचिया विचारें होणार तें काई । तुका ह्मणे ठायीं वेडावलीं ॥ ६ ॥

॥ ४६०२ ॥ वेडावलीं काय करावें या काळीं । ह्मणे वनमाळी गोपाळांसी ॥ धृ० ॥ शिरीं धरूं गोवर्द्धन उचलुनी । ह्मणे तुह्मी कोणी भिऊं नका ॥ १ ॥ नका सांडूं कोणी आपला आवांका । मारितां या हाका आरोळिया ॥ २ ॥ अशंकित चित्तें न वटे त्यां खरें । धाकेंच तें बरें ह्मणती चला ॥ ३ ॥ चित्तीं धाक परि जवळी अनंत । तुका ह्मणे घात होऊं नेदी ॥ ४ ॥

॥ ४६०३ ॥ नेदी दुःख देखों दासा नारायण । ठेवी निवारून आल्या आधीं ॥ धृ० ॥ आधीं पुढें शुद्ध करावा मारग । दासांमागें मग सुखरूप ॥ १ ॥ पर्वतासि हात लाविला अनंतें । तो जाय वरतें आपेंआप ॥ २ ॥ आपल्याआपण उचलिला गिरी । गोपाळ हे करी निमित्यासी ॥ ३ ॥ निमित्य करूनि करावें कारण । करितां आपण कळों नेदी ॥ ४ ॥ दिनाचा कृपाळु पतितपावन । हें करी वचन सांच खरें ॥ ५ ॥ सांगणें न लगे सुखदुःख दासा । तुका ह्मणे ऐसा कृपावंत ॥ ६ ॥

॥ ४६०४ ॥ कृपावंतें हाक दिली सकळिकां । माजिया रे नका राहों कोणी ॥ धृ० ॥ निघाले या भेणें पाउसाच्या जन । देखे गोवर्द्धन उचलिला ॥ १ ॥ लाविले गोपाळ फेरीं चहूंकडे । हांसे फुडे रडे कोणी धाकें ॥ २ ॥ धाकें हीं सकळ निघालीं भीतरी । उचलिला गिरी तयाखालीं ॥ ३ ॥ तयाखालीं गाई वत्सें आलीं लोक । पक्षी सकळिक

जीवजाती ॥ ४ ॥ जिहीं ह्मणविलें हरीचे अंकित । जातीचे ते होत कोणी तरी ॥ ५ ॥ जाति कुळ नाहीं तयासि प्रमाण । अनन्या अनन्य तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४६०५ ॥ त्यांसि राखे बळें आपुले जे दास । कळिकाळासि त्रास पाहों नेदी ॥ धृ० ॥ पाउस न येतां केली यांची थार । लागला तुषार येऊं मग ॥ १ ॥ येउनी दगड बैसतील गिरी । वरुषला धारीं शिळांचिये ॥ २ ॥ शिळांचिये धारीं वरुषला आकांत । होता दिवस सात एक सरें ॥ ३ ॥ एक सरें गिरि धरिला गोपाळीं । होतों भाव बळी आह्मी ऐसे ॥ ४ ॥ ऐसें कळों आलें देवाचिया चित्ता । ह्मणे तुह्मी आतां हात सोडा ॥ ५ ॥ हांसती गोपाळ करूनि नवल । आइकोनि बोल गोविंदाचे ॥ ६ ॥ हावितील डोया गुडघे कोपर । फुटले ते भार उचलितां ॥ ७ ॥ भार आह्मांवरि घालूनि निराळा । राहिलासी डोळा चुकवुनी ॥ ८ ॥ निमित्य अंगुळी लावियेली वरी । पाहों कैसा गिरि धरितोसी ॥ ९ ॥ सिणले हे होते ठायींच्या त्या भावें । लटिकेंचि खरें मानूनियां ॥ १० ॥ यांणीं अंत पाहो आदरिला याचा । तुका ह्मणे वाचा वाचाळ ते ॥ ११ ॥

॥ ४६०६ ॥ वाचाळ लटिके अभक्त जे खळ । आपुलें तें बळ वाखाणावें ॥ धृ० ॥ बळें हुंबरती सत्य त्यां न कळे । नुघडती डोळे अंधळ्यांचे ॥ १ ॥ आसुडिल्या माना हात पाय नेटें । तंव भार बोटें उचलिला ॥ २ ॥ लटिकाचि आह्मीं सीण केला देवा । कळों आले तेव्हां सकळांसी ॥ ३ ॥ आलें कळों तुका ह्मणे अनुभवें । मग अहंभावें सांडवले ॥ ४ ॥

॥ ४६०७ ॥ सांडवले सकळांचे अभिमान । आणिले शरण लोटांगणीं ॥ धृ० ॥ लोटांगणीं आले होऊनियां दीन । मग नारायण ह्मणे भलें ॥ १ ॥ भला आजि तुह्मी केला सांचपण । गिरि गोवर्धन उचलिला ॥ २ ॥ लागती चरणा सकळ ते काळीं । आह्मांमध्यें बळी तूंचि एक ॥ ३ ॥ एका तुजविण नयों आह्मी कामा । कळों कृष्णा रामा आलें आजी ॥ ४ ॥ आजिवरि आह्मां होता अभिमान । नेणतां चरणमहिमा तुझा ॥ ५ ॥ तुझा पार आह्मी नेणों नारायणा । नखीं गोवर्द्धना राखियेलें ॥ ६ ॥ राखियेलें गोकुळ आह्मां सकळांसी । दगडाच्या राशि वरुषतां ॥ ७ ॥ वर्णावें तें काय तुझें महिमान । धरिती चरण सकळही ॥ ८ ॥ सकळही तान विसरलीं भूक । सकळही सुख दिलें त्यांसी ॥ ९ ॥ त्यांसि कळों आला वैकुंठनायक । तुका ह्मणे लोक निर्भर ते ॥ १० ॥

॥ ४६०८ ॥ लोकां कळों आला देव आह्मांमधीं । टाकिली उपाधि तिहीं शंका ॥ धृ० ॥ शंका नाहीं थोरां लाहानां जीवांसी । कळला हा हृषीकेशी मग ॥ १ ॥ मग मनीं जाले निर्भर सकळ । संगें लोकपाळ कृष्णाचिया ॥ २ ॥ कृष्णाचिया ओंव्या गाणें गाती गीत । कृष्णमय चित्त जालें त्यांचें ॥ ३ ॥ त्यांसि ठावा नाहीं बाहेरिल भाव । अंतरींच वाव सुख जालें ॥ ४ ॥ सुखें तया दीस न कळे हे राती । अखंड या ज्योती गोविंदाची ॥ ५ ॥ चिंतनेंचि धालीं न लगे अन्नपाणी । तुका ह्मणे मनीं समाधान ॥ ६ ॥

॥ ४६०९ ॥ समाधान त्यांचीं इंद्रियें सकळ । जयां तो गोपाळ समागमें ॥ धृ० ॥ गोविंदाचा जाला प्रकाश भीतरी । मग त्यां बाहेरी काय काज ॥ १ ॥ काज काम त्यांचें

सरले व्यापार । नाहीं आपपर माझें तुझें ॥ २ ॥ माया सकळांची सकळांही वरी । विषम तें हरि दिसों नेदी ॥ ३ ॥ दिसे तया आप परावें सारिखें । तुका ह्मणे सुखें कृष्णाचिया ॥ ४ ॥

॥ ४६१० ॥ कृष्णाचिया सुखें भुक्त नाहीं तान । सदा समाधान सकळांचें ॥ धृ० ॥ कळलेंचि नाहीं जाले किती दिस । बाहेरिल वास विसरलीं ॥ १ ॥ विसरु कामाचा तुका ह्मणे जाला । उद्वेग राहिला जावें यावें ॥ २ ॥

॥ ४६११ ॥ जावें बाहेरी हा नाठवे विचार । नाहीं समाचार ठावा कांहीं ॥ धृ० ॥ कांहीं न कळे तें कळों अलें देवा । मांडिला रिघावा कवतुक ॥ १ ॥ कवतुकासाठीं भक्त देहावरी । आणिताहे हरि बोलावया ॥ २ ॥ यासि नांवरूप नाहीं हा आकार । कळला साचार भक्ता मुखें ॥ ३ ॥ मुखें भक्तांचिया बोलतो आपण । अंगसंगें भिन्न नाहीं दोघे ॥ ४ ॥ दोघे वेगळाले लेखिल जो कोणी । तयाचा मेदिनी बहु भार ॥ ५ ॥ तयासी घडलीं सकळही पापें । भक्तांचिया कोपें निंदा द्वेषें ॥ ६ ॥ द्वेषियाचा संग न घडावा कोणा । विष जेंवी प्राणां नाश करी ॥ ७ ॥ करितां आइके निंदा या संतांची । तया होती तेचि अधःपात ॥ ८ ॥ पतन उद्धार संगाचा महिमा । त्यजावें अधमा संत सेवीं ॥ ९ ॥ संतसेवीं जोडे महालाभरासी । तुका ह्मणे यासि नाश नाहीं ॥ १० ॥

॥ ४६१२ ॥ नाहीं नाश हरि आठवितां मुखें । जोडतील सुखें सकळही ॥ धृ० ॥ सकळही सुखें वोळलीं अंतरीं । मग त्याबाहेरी काय काज ॥ १ ॥ येऊं विसरलीं बाहेरी गोपाळें । तल्लीन सकळें कृष्णसुखें ॥ २ ॥ सुख तें योगियां नाहीं समाधीस । दिलें गाई वत्स पशु जीवां ॥ ३ ॥ वारला पाऊस केव्हां नाहीं ठावा । तुका ह्मणे देवावांचूनियां ॥ ४ ॥

॥ ४६१३ ॥ यांसि समाचार सांगतों सकळा । चलावें गोकुळा ह्मणे देव ॥ धृ० ॥ देव राखे तया आडलिया काळें । देव सुखफळें देतो दासां ॥ १ ॥ दासां दुःख देखों नेदी आपुलिया । निवारी आलिया न कळतां ॥ २ ॥ नाहीं मेघ येतां जातां देखियेला । धारीं वरुषला शिळांचिये ॥ ३ ॥ एवढें भक्तांचें सांकडें अनंता । होय निवारिता तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४६१४ ॥ काकुलती एकें पाहाती बाहेरी । तया ह्मणे हरि वोसरला ॥ धृ० ॥ वोसरला मेघ आला होता काळ । बाहेरी सकळ आले लोक ॥ १ ॥ कवतुक जालें ते काळीं आनंद । कळला गोविंद साच भावें ॥ २ ॥ भावें तयापुढें नाचती सकळें । गातील मंगळें ओंव्या गीत ॥ ३ ॥ गीत गाती ओंव्या रामकृष्णावरी । गोपाळ मोहोरी वाती पावे ॥ ४ ॥ वत्सें गाई पशू नाचती आनंदें । वेधलिया छंदें गोविंदाच्या ॥ ५ ॥ चित्त वेधियेलें गोविंदें जयाचें । कोण तें देवाचें तयाहुनी ॥ ६ ॥ तयाहुनि कोणी नाहीं भाग्यवंत । अखंड सांगात गोविंदाचा ॥ ७ ॥ गोविंदाचा संग तुका ह्मणे ध्यान । गोविंद ते जन गोकुळींचे ॥ ८ ॥

॥ ४६१५ ॥ गोकुळींची गति कोण जाणे परी । पाहों आला वरी इंद्रराव ॥ धृ० ॥ इंद्रापाशीं मेघ बोलती बडिवार । सकळ संहार करुनी आलों ॥ १ ॥ आतां जीव नाहीं

सांगाया ते रानीं । पुरिलें पाषाणीं शिळाधारीं ॥ २ ॥ रिता कोठें नाहीं राहों दिला ठाव । जल्पती तो भाव न कळतां ॥ ३ ॥ न कळतां देव बळें हुंबरती । साच ते पावती अपमान ॥ ४ ॥ माव न कळतां केली तोंडपिटी । इंद्र आला दृष्टि पाहावया ॥ ५ ॥ पाहतां तें आहे जैसें होतें तैसें । नाचती विशेषें तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४६१६ ॥ नाचतां देखिलीं गाई वत्सें जन । विस्मित होऊन इंद्र ठेला ॥ धृ० ॥ लागला पाऊस शिळांचिये धारीं । वांचलीं हीं परि कैसीं येथें ॥ १ ॥ येथें आहे नारायण संदेह नाहीं । विघ्न केलें ठायीं निर्विघ्न तें ॥ २ ॥ विचारितां उचलिला गोवर्द्धन । अवतार पूर्ण कळों आला ॥ ३ ॥ आला गौळियांच्या घरा नारायण । करितो स्तवन इंद्र त्यांचें ॥ ४ ॥ त्यांच्या पुण्या पार कोण करी लेखा । न कळे चतुर्मुखा ब्रह्मयासी ॥ ५ ॥ सीणतां जो ध्याना न ये एकवेळा । तो तया गोपाळां समागमें ॥ ६ ॥ समागमें गाई वत्स पुण्यवंता । देह कुर्वाळितां अंगसंग ॥ ७ ॥ संग जाला मायबापां लोकपाळां । आलिंगिती गळा कंठाकंठ ॥ ८ ॥ करिते हे जाले स्तुति सकळिक । देव इंद्रादिक गोविंदाची ॥ ९ ॥ करितील वृष्टि पुष्पवरुषाव । देवा आदिदेव पूजियेला ॥ १० ॥ पुष्पांजुळी मंत्रघोष जयजयकार । दुमदुमी अंबर तेणें नादें ॥ ११ ॥ नामाचे गजर गंधर्वांचीं गाणीं । आनंद भुवनीं न माये तो ॥ १२ ॥ तो सुखसोहळा अनुपम्य रासी । गोकुळीं देवासी दोहीं ठायीं ॥ १३ ॥ दोहीं ठायीं सुख दिलें नारायणें । गेला हरुषणें वैरभाव ॥ १४ ॥ भावना भेदाची जाय उठाउठी । तुका ह्मणे भेटी गोविंदाचे ॥ १५ ॥

॥ ४६१७ ॥ गोविंदाचें नाम गोड घेतां वाचे । तेथें हे कइंचे वैरभाव ॥ धृ० ॥ भावें नमस्कार घातले सकळीं । लोटांगणें तळीं महीवरी ॥ १ ॥ वरि हातबाहे उभारिली देवें । कळाळिया भावें सकळांच्या ॥ २ ॥ सकळही वरि बहुडविले स्थळा । चलावें गोपाळा ह्मणे घरा ॥ ३ ॥ राहिलीं हीं नाचों गोविंदाच्या बोलें । पडिलीया डोलें छंदें हो तीं ॥ ४ ॥ छंद तो नावरे आपणा आपला । आनंदाचा आला होता त्यांसी ॥ ५ ॥ त्यांच्या तुका ह्मणे आनंदें सकळ । ठेगणें गोपाळ समागमें ॥ ६ ॥

॥ ४६१८ ॥ समागमें असे हरि नेणतियां । नेदी जाऊं वांयां अंकितांसी ॥ धृ० ॥ अंकितां सावध केलें नारायणें । गोपाळ गोधनें सकळिकां ॥ १ ॥ सकळही जन आले गोकुळासी । आनंद मानसीं सकळांच्या ॥ २ ॥ सकळांचा केला अंगिकार देवें । न कळतां भावें वांचवी त्यां ॥ ३ ॥ त्यां जाला निर्धार हरि आह्मांपासीं । निवांत मानसीं निर्भर तीं ॥ ४ ॥ निर्भर हे जन गोकुळींचे लोक । केले सकळिक नारायणें ॥ ५ ॥ नारायण भय येऊं नेदी गांवा । तुका ह्मणे नांवा अनुसरे त्या ॥ ६ ॥

॥ ४६१९ ॥ ये दशे चरित्र केलें नारायणें । रांगतां गोधनें राखिताहे ॥ धृ० ॥ हें सोंग सारिलें या रूपें अनंतें । पुढेंही बहु तें करणें आहे ॥ १ ॥ आहे तुका ह्मणे धर्मसंस्थापणें । केला नारायणें अवतार ॥ २ ॥

॥ ४६२० ॥ अवतार केला संहाराया दुष्ट । करिती हे नष्ट परपीडा ॥ धृ० ॥ परपीडा करी दैत्य कंसराव । पुढें तोही भाव आरंभिला ॥ १ ॥ लाविलें लाघव पाहोनियां संधी ।

सकळांही वधी दुष्टजना ॥ २ ॥ दुष्टजन परपीडक जे कोणी । ते या चक्रपाणि न साहती ॥ ३ ॥ न साहवे दुःख भक्तांचें या देवा । अवतार घ्यावा लागे रूप ॥ ४ ॥ रूप हें चांगलें रामकृष्ण नाम । हरे भवश्रम उच्चारितां ॥ ५ ॥ उच्चारितां नाम कंस वैरभावें । हरोनियां जीवें कृष्ण केला ॥ ६ ॥ कृष्णरूप त्यासि दिसे अवघें जन । पाहे तों आपण कृष्ण जाला ॥ ७ ॥ पाहिलें दर्पणीं आधील मुखासी । चतुर्भुज त्यासि तोचि जाला ॥ ८ ॥ जालीं कृष्णरूप कन्या पुत्र भाज । तुका ह्मणे राज्य सैन्य जन ॥ ९ ॥

॥ ४६२१ ॥ सैन्य जन हांसे राया जालें काई । वासपे तो ठायीं आपणासी ॥ धृ० ॥ आपणा आपण जयास तीं तैसीं । वैरभाव ज्यांसि भक्ति नाहीं ॥ १ ॥ नाहीं याचा त्याचा भाव एकविध । ह्मणऊनि छंद वेगळाले ॥ २ ॥ वेगळाल्या भावें तीं तया हांसती । तयांस दिसती अवघीं हरी ॥ ३ ॥ हरिला कंसाचा जीव भाव देवें । द्वेषाचिया भावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४६२२ ॥ द्वेषाचिया ध्यानें हरिरूप जालें । भाव हारपले देहादिक ॥ धृ० ॥ देहादिक कर्म अभिमान वाढे । तया कंसा जोडे नारायण ॥ १ ॥ नारायण जोडे एकविध भावें । तुका ह्मणे जीवें जाणें लागे ॥ २ ॥

॥ ४६२३ ॥ जीवभाव त्याचा गेला अभिमान । ह्मणऊनि जन हांसे कंसा ॥ धृ० ॥ सावध करितां नये देहावरी । देखोनियां दुरि पळे जन ॥ १ ॥ जन वन हरि जालासे आपण । मग हे लोचन झांकियेले ॥ २ ॥ झांकुनि लोचन मौन्येंचि राहिला । न हीं आतां बोलायाचें काम ॥ ३ ॥ बोलायासि तुजें नाहीं हें उरलें । जन कृष्ण जाले स्वयें रूप ॥ ४ ॥ रूप पालटलें गुण नाम याची । तुका ह्मणे भूतीं देव जाला ॥ ५ ॥

॥ ४६२४ ॥ जालों स्वयें कृष्ण आठव हा चित्तां । भेदें भयवृत्ति उरली आहे ॥ धृ० ॥ उरली आहे रूप नांव दिसे भिन्न । मी आणि हा कृष्ण आठवतो ॥ १ ॥ तोंवरि हा देव नाहीं तयापाशीं । आला दिसे त्यासि तोचि देव ॥ २ ॥ देवरूप त्याची दिसे वरी काया । अंतरीं तो भयाभीत भेदें ॥ ३ ॥ भेदें तुका ह्मणे अंतरे गोविंद । सांचें विण छंद वांयां जाय ॥ ४ ॥

॥ ४६२५ ॥ वांयां तैसे बोल हरिशीं अंतर । केले होती चार भयभेदें ॥ धृ० ॥ भेदभय गेलें नोळखे आपणा । भेटी नारायणा कंसा जाली ॥ १ ॥ जाली भेटी कंसा हरिशी निकट । सन्मुखचि नीट येरयेरां ॥ २ ॥ येरयेरां भेटी युद्धाच्या प्रसंगीं । त्याचें शस्त्र अंगीं हाणितले ॥ ३ ॥ त्याचें वर्म होतें ठावें या अनंता । तुका ह्मणे सत्ता नायक हा ॥ ४ ॥

॥ ४६२६ ॥ नारायणें कंस चाणूर मर्दिला । राज्यीं बैसविला उग्रसेन ॥ धृ० ॥ उग्रसेन स्थापियेला शरणागत । पुरविला अंत अभक्ताचा ॥ १ ॥ अवघेंचि केलें कारण अनंतें । आपुलिया हातें सकळही ॥ २ ॥ सकळही केलीं आपुलीं अंकित । राहे गोपिनाथ मथुरेसी ॥ ३ ॥ मथुरेसि आला वैकुंठनायक । जालें सकळिक एक राज्य ॥ ४ ॥ राज्य दिलें उग्रसेना शरणागता । सोडविलीं माता पिता दोन्ही ॥ ५ ॥ सोडवणें धांवे भक्ताच्या कैवारें । तुका ह्मणे करें शस्त्र धरी ॥ ६ ॥

॥ ४६२७ ॥ धरी दोही ठायीं सारखाचि भाव । देवकी वसुदेव नंद दोघे ॥ धृ० ॥ दोन्ही एके ठायीं केल्या नारायणें । वाढविला तिणें आणि व्याली ॥ १ ॥ व्याला वाढला हा आपल्या आपण । निमित्या कारणें मायबाप ॥ २ ॥ माय हा जगाची बाप नारायण । दुजा करी कोण यत्न यासी ॥ ३ ॥ कोण जाणें याचें अंतरींचा भाव । कळों नेदी माव तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४६२८ ॥ दिनाचा कृपाळु दुष्टजना काळ । एकला सकळ व्यापक हा ॥ धृ० ॥ हांसे बोले तैसा नव्हे हा अनंत । नये पराकृत ह्मणों यासी ॥ १ ॥ यासि कळावया एक भक्तिभाव । दुजा नाहीं ठाव धांडोळितां ॥ २ ॥ धांडोळितां श्रुति राहिल्या निश्चित । तो करी संकेत गोपींसवें ॥ ३ ॥ गोपिकांची वाट पाहे द्रुमातळीं । मागुता न्याहाळी न देखतां ॥ ४ ॥ न देखतां त्यांसि उठे बैसे पाहे । वेडावला राहे वेळोंवेळां ॥ ५ ॥ वेळोवेळां पंथ पाहे गोपिकांचा । तुका ह्मणे वाचा नातुडे तो ॥ ६ ॥

॥ ४६२९ ॥ तो बोल कोमळ निष्ठुर साहोनी । कोपतां गौळणी हास्य करी ॥ धृ० ॥ करावया हास्य भक्तांचें निर्लज्ज । कवतुकें रज माथां वंदी ॥ १ ॥ दिलें उग्रसेना मथुरेचें राज्य । सांगितलें काज करी त्याचें ॥ २ ॥ त्यासि होतां कांहीं अरिष्टनिर्माण । निवारी आपण शरणागतां ॥ ३ ॥ शरणागतां राखे सर्व भावें हरी । अवतार धरी तयांसाठीं ॥ ४ ॥ तयांसाठीं वाहे सुदर्शन गदा । उभा आहे सदा सांभाळित ॥ ५ ॥ तळमळ नाहीं तुका ह्मणे चित्ता । भक्तांचा अनंता भार माथां ॥ ६ ॥ मारिले असुर दाटले मेदिनी । होते कोणा कोणी पीडित ते ॥ ७ ॥ ते हा नारायण पाठवी अघोरा । संतांच्या मत्सरा घाता-वरी ॥ ८ ॥ वरिले ते दूतीं यमाचिया दंडीं । नुच्चारितां तोंडीं नारायण ॥ ९ ॥ नारायण नाम नावडे जयासी । ते जाले मिरासी कुंभपाकीं ॥ १० ॥ कुंभपाकीं सेल मान तो तयांचा । तुका ह्मणे वाचा संतनिंदा ॥ ११ ॥

॥ ४६३० ॥ वास नारायणें केला मथुरेसी । वधूनि दुष्टांसि तये ठायीं ॥ धृ० ॥ ठायीं पितियाचे मानी उग्रसेना । प्रतिपाळी जनांसहित लोकां ॥ १ ॥ लोकां दुःख नाहीं मागील आठव । देखियेला देव दृष्टि त्यांणीं ॥ २ ॥ देखोनियां देवा विसरलीं कंसा । ठावा नाहीं ऐसा होता येथें ॥ ३ ॥ येथें दुजा कोणी नाहीं कृष्णाविणें । ऐसें वाटे मनें काया वाचा ॥ ४ ॥ काया वाचा मन कृष्णीं रत जालें । सकळां लागलें कृष्णध्यान ॥ ५ ॥ ध्यान गोविंदाचें लागलें या लोकां । निर्भर हे तुका ह्मणे चित्तीं ॥ ६ ॥

॥ ४६३१ ॥ चिंतले पावलीं जयां कृष्णभेटी । एरवीं ते आटी वांयांविण ॥ धृ० ॥ वासना धरिती कृष्णाविणें कांहीं । सीण केला तिहीं साधनांचा ॥ १ ॥ चाळविलें डंबें एक अहंकारें । भोग जन्मांतरें न चुकती ॥ २ ॥ न चुकती भोग तपें दानें व्रतें । एकास्या अनंतेंवांचूनियां ॥ ३ ॥ चुकवूनि जन्म देईल आपणा । भजा नारायणा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४६३२ ॥ भजल्या गोपिका सर्व भावें देवा । नाहीं चित्तीं हेवा दुजा कांहीं ॥ धृ० ॥ दुजा छंदु नाहीं तयांचिये मनीं । जागृति सपनीं कृष्णध्यान ॥ १ ॥ ध्यान ज्यां

हरीचें हरीसि तयांचें । चित्त ग्वाही ज्यांचें तैशा भावें ॥ २ ॥ भाग्यें पूर्वपुण्यें आठविती लोक । अवघे सकळिक मथुरेचे ॥ ३ ॥ मथुरेचे लोक सुखी केले जन । तेथें नारायण राज्य करी ॥ ४ ॥ राज्य करी गोपीयादवांसहित । कर्मिलें बहुतकाळ तेथें ॥ ५ ॥ तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४६३३ ॥ रचियेला गांव सागराचे पोटीं । जडोनि गोमटीं नानारत्नें ॥ धृ० ॥ रत्न खणोखणी सोनियाच्या भिंती । लागलिया ज्योति रविकळा ॥ १ ॥ कळा सकळही गोविंदाचे हातीं । मंदिरें निगुतीं उभारिलीं ॥ २ ॥ उभारिलीं दुर्गें दारवंटे फांजी । कोटि चर्या माजी शोभलिया ॥ ३ ॥ शोभलें उत्तम गांव सागरांत । सकळांसहित आले हरी ॥ ४ ॥ आला नारायण द्वारका नगरा । उदार या शूरा मुगुटमणी ॥ ५ ॥ निवडीना याति समानचि केली । दणक धाकुलीं नारायणें ॥ ६ ॥ नारायणें दिलीं अक्षई मंदिरें । अभंग साचारें सकळांसी ॥ ७ ॥ सकळही धर्मशीळ पुण्यवंत । पवित्र विरक्त नारीनर ॥ ८ ॥ रचिलें तें देवें न मोडे कवणा । बळियांचा राणा नारायण ॥ ९ ॥ बळबुद्धीनें तीं देवाच सारिखीं । तुका ह्मणे मुखीं गाती ओंव्या ॥ १० ॥

॥ ४६३४ ॥ गाती ओंव्या कर्में करितां सकळें । हालवितां बाळें देवावरी ॥ धृ० ॥ ऋद्धिसिद्धि दासी दारीं ओळंगती । सकळ संपत्ति सर्वां घरीं ॥ १ ॥ घरीं बैसलिया जोडलें निधान । करिती कीर्त्तन नरनारी ॥ २ ॥ नारीनर लोक धन्य त्यांची याती । जयांसि संगति गोविंदाची ॥ ३ ॥ गोविंदें गोविंद केले लोकपाळ । चिंतनें सकळ तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४६३५ ॥ कांहीं चिंता कोणा नाहीं कोणेविशीं । करी द्वारकेसि राज्य देव ॥ धृ० ॥ द्वारकेसि राज्य करी नारायण । दुष्ट संहारून धर्म पाळी ॥ १ ॥ पाळी वेदआज्ञा ब्राह्मणांचा मान । अतितपूजन वैष्णवांचें ॥ २ ॥ अतित अलिप्त अवघियां वेगळा । नाहीं हा गोपाळा अभिमान ॥ ३ ॥ अभिमान नाहीं तुका ह्मणे त्यासी । नेदी आणिकांसि धरूं देव ॥ ४ ॥

॥ ४६३६ ॥ धरियेलें रूप कृष्ण नाम बुंथी । परब्रह्म क्षिती उतरलें ॥ धृ० ॥ उत्तम हें नाम राम कृष्ण जगीं । तरावयालागीं भवनदी ॥ १ ॥ दिनानाथब्रीदें रुळती चरणीं । वंदितील मुनि देव ऋषी ॥ २ ॥ ऋषीं मुनीं भेटी दिली नारायणें । आणिक कारणें बहु केलीं ॥ ३ ॥ बहु कासाविस जाला भक्तांसाठीं । तुका ह्मणे आटी सोसियेली ॥ ४ ॥

॥ ४६३७ ॥ सोसियेली आटी गर्भवास फेरे । आयुधांचे भारे वागवितां ॥ धृ० ॥ वाहोनि सकळ आपुलिये माथां । भार दासां चिंता वाहों नेदी ॥ १ ॥ नेदी काळाचिये हातीं सेवकांसी । तुका ह्मणे ऐसी ब्रिदावळी ॥ २ ॥

॥ ४६३८ ॥ ब्रिदावळी ज्याचे रुळते चरणीं । पाउलें मेदिनी सुखावे त्या ॥ धृ० ॥ सुखावे मेदिनी कृष्णाचिये चालीं । कुंकुमें शोभलीं होय रेखा ॥ १ ॥ होऊनि भ्रमर पाउलांचें सुख । घेती भक्त मुख लावूनियां ॥ २ ॥ याचसाठीं धरियेला अवतार । सुख दिलें

फार निजदासां ॥ ३ ॥ निज सुख तुका ह्मणे भक्तां ठावें । तींहींच जाणावें भोगूं त्यासी ॥ ४ ॥

॥ ४६३९ ॥ भोगिला गोपिकां यादवां सकळां । गौळणीगोपाळां गाईवत्सां ॥ धृ० ॥ गाती धणीवरी केला अंगसंग । पाहिला श्रीरंग डोळेभरी ॥ १ ॥ भक्ति नवविधा तयांसि घडली । अवघींच केलीं कृष्णरूप ॥ २ ॥ रूप दाखविलें होतां भिन्न भाव । भक्त आणि देव भिन्न नाहीं ॥ ३ ॥ नाहीं राहों दिलें जातां निजधामा । तुका ह्मणे आह्मांसहित गेला ॥ ४ ॥

॥ ४६४० ॥ गेला कोठें होता कोठूनियां आला । सहज व्यापला आहे नाहीं ॥ धृ० ॥ आहे साच भावें सकळव्यापक । नाहीं अभाविक लोकां कोठें ॥ १ ॥ कोठें नाहीं ऐसा नाहीं रिता ठाव । अनुभवी देव स्वयें जाले ॥ २ ॥ जातों येतों आह्मी देवाचे सांगात । तुका ह्मणे गात देवनाम ॥ ३ ॥

॥ ४६४१ ॥ मना वाटे तैसीं बोलिलों वचनें । केली धिटपणें सलगी देवा ॥ धृ० ॥ वाणी नाहीं शुद्ध याति एक ठाव । भक्ति नेणें भाव नाहीं मनीं ॥ १ ॥ नाहीं जालें ज्ञान पाहिलें अक्षर । मानी जैतें थोर थोरी नाहीं ॥ २ ॥ नाहीं मनीं लाज धरिली आशंका । नाहीं भ्यालों लोकां चतुरांसी ॥ ३ ॥ चतुरांच्या राया मी तुझें अंकित । जालों शरणागत देवदेवा ॥ ४ ॥ देवा आतां करीं सरतीं हीं वचनें । तुझ्या कृपादानें बोलिलों तीं ॥ ५ ॥ तुझें देणें तुझ्या समर्पूनि पायीं । जालों उतराई पांडुरंगा ॥ ६ ॥ रंक हुनी रंक दास मी दासांचें । सामर्थ्य हें कैचें बोलावया ॥ ७ ॥ बोलावया पुरे वाचा माझी कायी । तुका ह्मणे पायीं ठाव द्यावा ॥ ८ ॥

॥ ४६४२ ॥ चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । प्रत्यक्ष ये मूर्ति विठोबाची ॥ धृ० ॥ चहुंयुगांचें हें साधन साधिलें । अनुभवा आलें आपुलिया ॥ १ ॥ एवढें करूनि आपण निराळा । प्रत्यक्ष हें डोळां दाखविलें ॥ २ ॥ दावूनि सकळ प्रमाणाच्या युक्ती । जयजयकार करिती अवघे भक्त ॥ ३ ॥ भक्ति नवविधा पावली मुळची । जनार्दननामाची संख्या जाली ॥ ४ ॥ नवसें ओंव्या आदरें वाचितां । त्याच्या मनोरथा कार्यसिद्धी ॥ ५ ॥ सीमा न करवे आणिकही सुखा । तुका ह्मणे देखा पांडुरंगा ॥ ६ ॥

## ओंव्या.

॥ ४६४३ ॥ पांडुरंगा करूं प्रथम नमना । दुसरें चरणा संतांचिया ॥ धृ० ॥ याच्या कृपादानें कथेचा विस्तारू । बाबाजीसद्गुरुदास तुका ॥ १ ॥ काय माझी वाणी मानेल संतांसी । रंजवूं चित्तासी आपुलिया ॥ २ ॥ या मनासी लागो हरिनामाचा छंद । आवडी गोविंद गावयासी ॥ ३ ॥ सीण जाला मज संसारसंभ्रमें । सीतळ या नामें जाली काया ॥ ४ ॥ या सुखा उपमा नाहीं द्यावयासी । आलें आकारासी निर्विकार ॥ ५ ॥ नित्य धांवे तेथें नामाचा गजर । घोष जयजयकार आइकतां ॥ ६ ॥ तांतडी ते काय हरिगुण गाय । आणिक उपाय दुःखमूळ ॥ ७ ॥ मूळ नरकाचें राज्य मदें मातें । अंतरे

बहुत देव दुरी ॥ ८ ॥ दुरी अंतरला नामनिंदकासी । जैसें गोचिडासी क्षीर राहे ॥ ९ ॥ हे वाट गोमटी वैकुंठासी जातां । रामकृष्णकथा दिंडी ध्वजा ॥ १० ॥ जाणते तयांनीं सांगितलें करा । अंतरासी वारा आडूनियां ॥ ११ ॥ यांसी आहे ठावें परि अंध होती । विषयाची खंती वाटे जना ॥ १२ ॥ नाहीं त्या सुटलीं द्रव्य लोभ माया । भस्म दंड छाया तरुवराची ॥ १३ ॥ चित्त ज्याचें पुत्रपत्नीबंधूवरी । सुटेल हा परि कैसें जाणा ॥ १४ ॥ जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥ १५ ॥ माझी मज असे घडली प्रचित । नसेल पतित ऐसा कोणी ॥ १६ ॥ कोणी तरी कांहीं केलें आचरण । मज या कीर्तनेंविण नाहीं ॥ १७ ॥ नाहीं भय भक्ता तराया पोटाचें । देवासी तयाचें करणें लागे ॥ १८ ॥ लागे पाठोवाटीं पाहे पायांकडे । पीतांबरें खडे वाट झाडी ॥ १९ ॥ डिंकोनियां कां रे राहिले हे लोक । हेंचि कवतुक वाटे मज ॥ २० ॥ जयानें तारिले पाषाण सागरीं । तो ध्या रे अंतरीं स्वामी माझा ॥ २१ ॥ माझिया जीवाची केली सोडवण । ऐसा नारायण कृपाळु हा ॥ २२ ॥ हाचि माझा नेम हाचि माझा धर्म । नित्य वाचे नाम विठोबाचें ॥ २३ ॥ चेतवला अग्नि तापत्रयज्वाळ । तो करी शीतळ रामनाम ॥ २४ ॥ मना धीर करीं दृढ चित्तीं धरीं । तारील श्रीहरि मायबाप ॥ २५ ॥ बाप हा कृपाळु भक्तां भाविकांसी । घरीं होय दासी कामारी त्या ॥ २६ ॥ त्याचा भार माथां चालवी आपुला । जिहीं त्या दिधला सर्व भाव ॥ २७ ॥ भावेंविण जाणा नाहीं त्याची प्राप्ती । पुराणें बोलती ऐसी मात ॥ २८ ॥ मात त्याची जया आवडे जीवासी । तया गर्भवासीं नाहीं येणें ॥ २९ ॥ यावें गर्भवासीं तरींच विष्णुदासीं । उद्धार लोकांसी पूज्य होती ॥ ३० ॥ होती आवडते जीवाचे ताईत । त्यां घडी अच्युत न विसंभे ॥ ३१ ॥ भेदाभेद चिंता नाहीं दुःख कांहीं । वैकुंठ त्या ठायीं सदा वसे ॥ ३२ ॥ वसे तेथें देव सदा सर्वकाळ । करिती निर्मळ नामघोष ॥ ३३ ॥ संपदा तयांची न सरे कल्पांतीं । मेळविला भक्ति देवलाभ ॥ ३४ ॥ लाभ तयां जाला संसारा येऊनी । भगवंत ऋणी भक्ति केला ॥ ३५ ॥ लागलेंसे पिसें काय मूढजनां । काय नारायणा विसरलीं ॥ ३६ ॥ विसरलीं तयां थोर जाली हाणी । पचविल्या खाणी चौऱ्यासीच्या ॥ ३७ ॥ शिकविलें तरी नाहीं कोणा लाज । लागलीसे भाज धन गोड ॥ ३८ ॥ गोड एक आहे अविट गोविंद । आणीक तो छंद नासिवंत ॥ ३९ ॥ तळमळ त्याची कांहीं तरी करा । कां रे निरसुरा बुडावया ॥ ४० ॥ या जनासी भय यमाचें कां नाहीं । सांडियेलीं तिहीं एकराज्यें ॥ ४१ ॥ जेणें अग्निमाजी घातलासे पाव । नेणता तो राव जनक होता ॥ ४२ ॥ तान भूक जिहीं साहिले आघात । तया पाय हात काय नाहीं ॥ ४३ ॥ नाहीं ऐसा तिहीं केला संवसार । दुःखाचे डोंगर तोडावया ॥ ४४ ॥ याच जन्में घडे देवाचें भजन । आणीक हें ज्ञान नाहीं कोठें ॥ ४५ ॥ कोठें पुढें नाहीं ध्यावया विसांवा । फिरोनि या गांवा आल्याविण ॥ ४६ ॥ विनवितां दिवस बहुत लागती । म्हणऊनि चित्तीं देव धरा ॥ ४७ ॥ धरा पाय तुम्ही संतांचे जीवासी । वियोग तयांसी देवा नाहीं ॥ ४८ ॥ नाहीं चाड देवा आणीक सुखाची । आवडी नामाची त्याच्या तया ॥ ४९ ॥ त्याचीच

उच्छिष्ट बोलतों उत्तरें । सांगितलें खरें व्यासादिकीं ॥ ५० ॥ व्यासें सांगितलें भक्ति हेंचि सार । भवसिंधु पार तरावया ॥ ५१ ॥ तरावया जना केलें भागवत । गोवळ गोपी भक्त माता पिता ॥ ५२ ॥ तारुनियां खरें नेली एक्यासरें । निमित्तें उत्तरें ऋषीचिया ॥ ५३ ॥ यासी वर्म ठावें भक्तां तरावया । जननी बाळ माया राखे तान्हें ॥ ५४ ॥ तान्हेलें भुकेलें ह्मणे वेळोवेळां । न मगतां लळा जाणोनियां ॥ ५५ ॥ जाणोनियां वर्म देठ लाविथेला । द्रौपदीच्या बोलासवें धांवे ॥ ५६ ॥ धांवे सरवता धेनु जैसी वत्सा । भक्तालागीं तैसा नारायण ॥ ५७ ॥ नारायण व्हावा हांव ज्यांच्या जीवा । धन्य त्याच्या दैवा पार नाहीं ॥ ५८ ॥ पार नाहीं सुखा तें दिलें तयासी । अखंड वाचेसी रामनाम ॥ ५९ ॥ रामनाम दोनी उत्तम अक्षरें । भवानीशंकरें उपदेशिलीं ॥ ६० ॥ उपदेश करी विश्वनाथ कानीं । वाराणसी प्राणी मध्यें मरे ॥ ६१ ॥ मरणाचे अंतीं राम ह्मणे जरी । न लगे यमपुरीं जावें तया ॥ ६२ ॥ तयासी उत्तम वास वयकुंठीं । वसे नाम चित्तीं सर्वकाळ ॥ ६३ ॥ सर्वकाळ वसे वैष्णवांच्या घरीं । नसे क्षणभरी स्थिर कोठें ॥ ६४ ॥ कोठें नका पाहों करा हरिकथा । तेथें अवचिता सांपडेल ॥ ६५ ॥ सांपडे हा देव भाविकांचे हातीं । शाहाणे मरती तरी नाहीं ॥ ६६ ॥ नाहीं भलें भक्ति केलियावांचुनी । अहंता पापिणी नागवण ॥ ६७ ॥ नागवलों ह्मणे देव मी आपणा । लाभ दिला जना ठकलों तो ॥ ६८ ॥ तोचि देव थेर नव्हे ऐसें कांहीं । जनार्दन ठायीं चहूं खाणी ॥ ६९ ॥ खाणी भरूनियां राहिलासे आंत । बोलावया मात ठाव नाहीं ॥ ७० ॥ ठाव नाहीं रिता कोणी देवाविण । ऐसी ते सज्जन संतवाणी ॥ ७१ ॥ वाणी बोलूनियां गेलीं एक पुढें । तयासी वांकुडें जातां ठके ॥ ७२ ॥ ठका नाहीं अर्थ ठाउका वेदांचा । होऊनि भेदाचा दास ठेला ॥ ७३ ॥ दास ठेला पोट अर्थ दंभासाटीं । ह्मणऊनि तुटी देवासवें ॥ ७४ ॥ सर्वे देव द्विजातिही दुराविला । आणिकांचा आला कोण पाड ॥ ७५ ॥ पाड करूनियां नागविलीं फार । पंडित वेव्हार खळवादी ॥ ७६ ॥ वादका निंदका देवाचें दर्शन । नव्हे जाला पूर्ण षडकर्मी ॥ ७७ ॥ षडकर्मी हीन रामनाम कंठीं । तयासवें भेटी सत्य देवा ॥ ७८ ॥ देवासी आवडे भाविक जो भोळा । शुद्ध त्या चांडाळा करुनि मानी ॥ ७९ ॥ मानियेला नाहीं विश्वास या बोला । नाम घेतां मला युक्ति थोडी ॥ ८० ॥ युक्ति थोडी मज दुर्बळाची वाचा । प्रताप नामाचा बोलावया ॥ ८१ ॥ बोलतां पांगल्या श्रुति नेति नेती । खुंटलिया युक्ति पुढें त्यांच्या ॥ ८२ ॥ पुढें पार त्याचा न कळेचि जातां । पाउलें देखतां ब्रह्मादिकां ॥ ८३ ॥ काय भक्तिपिसें लागलें देवासी । इच्छा ज्याची जैसी तैसा होय ॥ ८४ ॥ होय हा सगुण निर्गुण आवडी । भक्तिप्रिय गोडी फेडावया ॥ ८५ ॥ या बापासी बाळ बोले लाडें कोडें । करुनि वांकुडें मुख तैसें ॥ ८६ ॥ तैसें याचकाचें समाधान दाता । होय हा राखता सत्त्वकाळीं ॥ ८७ ॥ सत्त्वकाळीं कामा न येती आयुधें । बळ हा संबंध सैन्यलोक ॥ ८८ ॥ सैन्यलोक तया दाखवी प्रताप । लोटला हा कोप कोपावरी ॥ ८९ ॥ कोपा मरण नाहीं शांत होय त्यासी । प्रमाण भल्यासी सत्त्वगुणीं ॥ ९० ॥ सत्त्वरजतम आपण नासती । करितां हे भक्ति विठोबाची ॥ ९१ ॥ चित्त रंगलिया चैतन्यचि होय ।

तेथें उणें काय निजसुखा ॥ ९२ ॥ सुखाचा सागरु आहे विटेवरी । कृपादान करी तोचि एक ॥ ९३ ॥ एक चित्त धरूं विठोबाचे पायीं । तेथें उणें कांहीं एक आह्मां ॥ ९४ ॥ आह्मांसी विश्वास याचिया नामाचा । ह्मणऊनि वाचा घोष करूं ॥ ९५ ॥ करूं हरि-कथा सुखाची समाधी । आणिकाची बुद्धि दुष्ट नासे ॥ ९६ ॥ नासे संवसार लोक मोहो माया । शरण जा रे तया विठोबासी ॥ ९७ ॥ शिकविलें मज मूढा संतजनीं । दृढ या वचनीं राहिलोंसें ॥ ९८ ॥ राहिलोंसें दृढ विठोबाचे पायीं । तुका ह्मणे कांहीं न लगे आतां ॥ ९९ ॥

॥ ४६४७ ॥ गाईन ओंविया पंढरीचा देव । आमुचा तो जीव पांडुरंग ॥ धृ० ॥ रंगलें हें चित्त माझें तया पायीं । ह्मणऊनि येई हाचि लाहो ॥ १ ॥ लाहो करीन मी हाचि संवसारीं । राम कृष्ण हरि नारायण ॥ २ ॥ नारायण नाम वालितां तुकासी । न येती या रासी तपतीर्थें ॥ ३ ॥ तीर्थें रज माथां वंदिती संतांचे । जे गाती हरीचे गुणवाद ॥ ४ ॥ गुणवाद ज्याचे गातां पूज्य झाले । बडिवार बोले कोण त्यांचा ॥ ५ ॥ त्यांचा नाहीं पार कळला वेदांसी । आणीकही ऋषि विचारितां ॥ ६ ॥ विचारितां तैसा होय त्यांच्या भावें । निजसुख ठावें नाहीं कोणा ॥ ७ ॥ कोणा कवतुक न कळे हे माव । निजलिया जीव करी धंदा ॥ ८ ॥ करुनी कवतुक खेळे हाचि लीळा । व्यापूनि वेगळा पाहातसे ॥ ९ ॥ सेवटीं आपण एकलाचि खरा । सोंग हा पसारा नष्ट केला ॥ १० ॥ लावियेलें चाळा मीपणें हें जन । भोग तया कोण भोगविशी ॥ ११ ॥ विषयीं गुंतलीं विसरलीं तुज । कन्या पुत्र भाज धनलोभें ॥ १२ ॥ लोभें गिळी फांसा आमिषाच्या आशा । सांपडोनि मासा तळमळी ॥ १३ ॥ तळमळ याची तरी शम होईल । जरी हा विठ्ठल आठविती ॥ १४ ॥ आठवे हा तरी संतांच्या सांगातें । किंवा हें संचित जन्मां-तर ॥ १५ ॥ जन्मांतरें तीन भोगितां कळती । केलें तें पावती करितां पुढें ॥ १६ ॥ पुढें जाणोनियां करावें संचित । पुजावे अतीत देव द्विज ॥ १७ ॥ जन्म तुटे ऐसें नव्हे तुह्मां जना । पुढिल्या पावना धर्म करा ॥ १८ ॥ करा जप तप अनुष्ठान याग । संतीं हा मारग स्थापियेला ॥ १९ ॥ लावियेलीं कर्में शुद्ध आचरणें । कोणा एका तेणें काळें पावे ॥ २० ॥ पावला सत्वर निष्काम उद्धार । जिंकिली अपार वासना हे ॥ २१ ॥ वासनेचें मूळ छेदिल्या वांचून । तरलोंसें कोणी न ह्मणावें ॥ २२ ॥ न ह्मणावें जाला पंडित वाचक । करी मंत्रघोष अक्षरांचा ॥ २३ ॥ चाळविलीं एकें तेचि आवडीनें । लोक दंभमानें देहसुखें ॥ २४ ॥ सुख तरीच घडे भजनाचें सार । वाचे निरंतर रामनाम ॥ २५ ॥ राम हा उच्चार तरीच बैसे वाचे । अनंता जन्मांचें पुण्य होय ॥ २६ ॥ पुण्य ऐसें काय रामनामापुढें । काय ते बापुडे यागयज्ञ ॥ २७ ॥ यागयज्ञ तप संसार दायकें । न तुटती एकें नामेंविण ॥ २८ ॥ नामेंविण भवसिंधु पावे पार । अइसा विचार नाहीं दुजा ॥ २९ ॥ जाणती हे भक्तराज महामुनी । नाम सुखधणी अमृताची ॥ ३० ॥ अमृ-ताचें सार निजतत्त्व बीज । गुह्याचें तें गुज रामनाम ॥ ३१ ॥ नामें असंख्यात तारिले अपार । पुराणीं हें सार प्रसिद्ध हे ॥ ३२ ॥ हेंचि सुख आह्मी घेऊं सर्वकाळ । करूनि

निर्मळ हरिकथा ॥ ३३ ॥ कथाकाळीं लागे सकळां समाधी । तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ॥ ३४ ॥ नासे लोभ मोहो आशा तृष्णा माया । गातां गुण तया विठोबाचे ॥ ३५ ॥ विठोबाचे गुण मज आवडती । आणीक हे चित्तीं न लगे कांहीं ॥ ३६ ॥ कांहीं कोणी नका सांगों हे उपाव । माझ्या मनीं भाव नाहीं दुजा ॥ ३७ ॥ जाणोनियां आह्मी दिला जीवभाव । दृढ याचे पाव धरियेले ॥ ३८ ॥ धरियेले आतां न सोडीं जीवेंसी । केला येच विशीं निरधार ॥ ३९ ॥ निरधार आतां राहिलों ये नेटीं । संवसारतुटी करूनियां ॥ ४० ॥ येणें अंगीकार केला पांडुरंगें । रंगविलों रंगें आपुलिया ॥ ४१ ॥ आपुली पाखर घालुनियां वरी । आह्मांसी तो करी यत्न देव ॥ ४२ ॥ देव राखे तया आणिकांचे काय । करितां उपाय चाले तेथें ॥ ४३ ॥ तेथें नाहीं रिग कळिकाळासी जातां । दास ह्मणवितां विठोबाचे ॥ ४४ ॥ विठोबाचे आह्मी लाडिके डिंगर । कांपती असुर काळ धाकें ॥ ४५ ॥ धाक तिहीं लोकीं जयाचा दरारा । स्मरण हें करा त्याचें तुह्मी ॥ ४६ ॥ तुह्मी निदसुर नका राहूं कोणी । चुकावया खाणी गर्भवास ॥ ४७ ॥ गर्भवासदुःख यमाचें दंडण । थोर होय शीण येतां जातां ॥ ४८ ॥ तान भुक पीडा जीतां ते आघात । मेल्या यमदूत जाच करिती ॥ ४९ ॥ जाच करिती हें कोणा आहे ठावें । नरकीं कौरवें बुडी दिली ॥ ५० ॥ बुडी दिली कुंभपाकीं दुर्योधनें । दावी ना लाजेनें मुख धर्मा ॥ ५१ ॥ धर्म हा कृपाळू आलासे जवळी । बैसला पाताळीं वरि नये ॥ ५२ ॥ न ये वरि कांहीं करितां उपाव । भोगवितो देव ज्याचें त्यासी ॥ ५३ ॥ त्यांसी अभिमान गर्व या देहाचा । नुचारिती वाचा नारायण ॥ ५४ ॥ नारायण विसरलीं संवसारीं । तयांसी अघोरीं वास सत्य ॥ ५५ ॥ सत्य मानूनियां संतांच्या वचना । जा रे नारायणा शरण तुह्मी ॥ ५६ ॥ तुह्मी नका मानूं कोणी विसवास । पुत्र पत्नी आस धन वित्त ॥ ५७ ॥ धन वित्त लोभ माया मोहपाश । मांडियेले फासे यमदूतीं ॥ ५८ ॥ दूतीं याच्या मुखा केलेंसे कुडण । वाचे नारायण येऊं नेदी ॥ ५९ ॥ नेदी शुद्धबुद्धि आतळों चित्तासी । नाना कर्म त्यासी दुरावती ॥ ६० ॥ दुराविली एकें जाणतीच फार । निंदा अहंकार वादभेद ॥ ६१ ॥ वादभेद निंदा हे फंदकाळाचे । गोवितील वाचे रिकामिकें ॥ ६२ ॥ रिकामिक देवा होय नव्हे मना । चिंतेचिये घाणा जुंपिजेसी ॥ ६३ ॥ सेवटीं हे गळा लावुनियां दोरी । सांभाळ ये करीं वासनेचा ॥ ६४ ॥ वासनेचा संग होय अंतकाळीं । तरी तपोबळी जन्म धरी ॥ ६५ ॥ धरूनियां देव राहातील चित्तीं । आधींचिया गति आठवाया ॥ ६६ ॥ आठवावा देव मरणाचे काळीं । ह्मणऊनि बळी जीव दिले ॥ ६७ ॥ दिले टाकूनियां भोग ऋषेश्वरीं । खाती वनांतरीं कंदमुळें ॥ ६८ ॥ मुळें सुखाचिया देव अंतरला । अल्पासाठीं नेला अधोगती ॥ ६९ ॥ गति हे उत्तम व्हावया उपाव । आहे धरा पाव विठोबाचे ॥ ७० ॥ विठोबाचे पायीं राहिलिया भावें । न लगे कोठें जावें वनांतरा ॥ ७१ ॥ तरती दुबळीं विठोबाच्या नांवें । संचित ज्या सवें नाहीं शुद्ध ॥ ७२ ॥ शुद्ध तरे याचें काय तें नवल । ह्मणतां विठ्ठल वेळोवेळां ॥ ७३ ॥ वेळा कांहीं नाहीं कवणाचे हातीं । न कळे हे गति भविष्याची ॥ ७४ ॥ भविष्य न सुटे भोगिल्या वांचूनी । संचित

जाणोनि शुद्ध करा ॥ ७५ ॥ करावे सायास आपुल्या हिताचे । येथें आलियाचे मनुष्यपण ॥ ७६ ॥ मनुष्यपण तरी साधी नारायण । नाहीं तरी हीन पशुहूनी ॥ ७७ ॥ पशु पाप पुण्य काय ते जाणती । मनुष्या या गति ठाउकिया ॥ ७८ ॥ ठाउकें हें असें पाप पुण्य लोका । देखती ते एका भोगितिया ॥ ७९ ॥ भोगतील एक दुःख संवसारीं । काय सांगों परी वेगळाल्या ॥ ८० ॥ त्यावें खावें बरें असावें सदैव । हेंचि करी हांव संवसारीं ॥ ८१ ॥ संवसारें जन गिळिले सकळ । भोगवितो फळ गर्भवासा ॥ ८२ ॥ वासनेचें मूळ छेदिल्यावांचून । नव्हे या खंडण गर्भवासा ॥ ८३ ॥ सायास केलियावांचुनि तें कांहीं । भोगावरी पाहीं घालूं नये ॥ ८४ ॥ नये बळें धड घालूं कांव्यावरी । जाये जीवें धरी सर्प हातीं ॥ ८५ ॥ हातीं आहे हित करील तयासी । ह्मणऊनि ऋषीं सांगितलें ॥ ८६ ॥ सांगती या लोका फजित करूनी । आपण जे कोणी तरले ते ॥ ८७ ॥ तेणें वाळवंटीं उभारिले कर । कृपेचा सागर पांडुरंग ॥ ८८ ॥ गंगाचरणीं करी पातकांची धुनी । पाउलें तीं मनीं चिंतिलिया ॥ ८९ ॥ चिंतनें जयाच्या तारिले पाषाण । उद्धरी चरण लावूनियां ॥ ९० ॥ लावूनियां टाळी नलगे बैसावें । प्रेमसुख ध्यावें संतसंगें ॥ ९१ ॥ संतसंगें कथा करावें कीर्तन । सुखाचें साधन रामनाम ॥ ९२ ॥ मग कोठें देव जाऊं न सके दुरी । बैसोनि भीतरी राहे कंठीं ॥ ९३ ॥ राहे व्यापूनियां सकळ शरीर । आपुला विसर पडों नेदी ॥ ९४ ॥ नेदी दुःख देखों आपुलिया दासा । वारी गर्भवासा यमदूता ॥ ९५ ॥ तान भूक त्यासी वाहों नेदी चिंता । दुश्चित हे घेतां नाम होती ॥ ९६ ॥ होती जीव त्यांचे सकळही जंत । परि ते अंकित संचिताचे ॥ ९७ ॥ चेवले जे कोणी देह अभिमानें । त्यांसी नारायणें कृपा केली ॥ ९८ ॥ कृपाळू हा देव अनाथा कोंवसा । आह्मी त्याच्या आशा लागलों सों ॥ ९९ ॥ लावियेले कासे येणें पांडुरंगें । तुका ह्मणे संगें संतांचिया ॥ १०० ॥

॥ ४६४८ ॥ विचार करिती बैसोनि गौळणी । ज्या कृष्णकामिनी कामातुरा ॥ धृ० ॥ एकांत एकल्या एकाच सुखाच्या । आवडती त्यांच्या गोष्टी त्यांला ॥ १ ॥ तर्कवितर्किणी दुराविल्या दुरी । मौन त्या परिचारी आरंभिलें ॥ २ ॥ कुशळा काविल्या कथिल्या लोभिका । त्याही येथें नका आह्मांपाशीं ॥ ३ ॥ बोलक्या वाचाळा कृष्णरता नाहीं । या चोरोनि तींहीं खेट केली ॥ ४ ॥ भेऊनियां जना एकी सवा जाल्या । वार्ती विक्षिल्या दाटोबळें ॥ ५ ॥ कृष्णसुख नाहीं कळलें मानसीं । निंदिती त्या त्यासी कृष्णरता ॥ ६ ॥ तो नये जवळी देखोनि कोल्हाळ । ह्मणऊनि समेळ मेळविला ॥ ७ ॥ अंतरीं कोमळा बाहेरी निर्मळा । तल्लीन त्या बाळा कृष्णध्यानीं ॥ ८ ॥ हरिरूपीं दृष्टि कानीं त्याच गोष्टी । आळंगिती कंठीं एका एकी ॥ ९ ॥ न साहे वियोग करिती रोदना । अभिष्ट भावना देहाचिया ॥ १० ॥ विसरल्या मागें गृह सुत पती । अवस्था याचिती गोविंदाची ॥ ११ ॥ अवस्था लागोनि निवळचि ठेल्या । एका एकी जाल्या कृष्णरूपा ॥ १२ ॥ कृष्णा ह्मणोनियां देती आलिंगन । विरहताप तेणें निवारेना ॥ १३ ॥ ताप कोण वारी गोविंदावांचुनी । साच तो नयनीं न देखतां ॥ १४ ॥ न देखतां त्यांचा

प्राण रिघों पाहे । आजि कामास ये उसिर केला ॥ १५ ॥ रित्या ज्ञानगोष्टी तयां नावडती । आलिंगन प्रीति कृष्णाचिया ॥ १६ ॥ मागें कांहीं आह्मी चुकलों त्याची सेवा । असेल या देवा राग आला ॥ १७ ॥ आठविती मागें पापपुण्यदोष । परिहार एकीस एक देती ॥ १८ ॥ अनुतापें जाल्या संतप्त त्या बाळा । टाकुनी विव्हळा धरणी अंग ॥ १९ ॥ जाणोनि चरित्र जवळीच होता । आली त्या अनंता कृपा मग ॥ २० ॥ होउनी प्रगट दाखविलें रूप । तापत्रय ताप निवविले ॥ २१ ॥ निवालिया देखोनि कृष्णाचें श्रीमुख । शोक मोह दुःख दुरावला ॥ २२ ॥ साच भाव त्यांचा आणुनियां मना । आळंगितो राणा वैकुंठींचा ॥ २३ ॥ हरि अंगसंगें हरिरूप जाल्या । बोलों विसरल्या तया सुखा ॥ २४ ॥ व्यभिचारभावें भोगिलें अनंता । वर्तोनि असतां घराचारी ॥ २५ ॥ सकळा चोरोनि हरि जयां चित्तीं । धन्य त्या नांदती तयामध्यें ॥ २६ ॥ उणें पुरें त्यांचें पडों नेदी कांहीं । राखे सर्वा ठायीं देव तयां ॥ २७ ॥ न कळे लाघव ब्रह्मादिकां माव । भक्तिभावें देव केला तैसा ॥ २८ ॥ तुका ह्मणे त्यांचा धन्य व्यभिचार । साधिलें अपार निजसुख ॥ २९ ॥



॥ श्री ॥

# तुकारामाचें चरित्र.

अलीकडच्या संतमालिकेंत तुकारामाप्रमाणें निःसीम भगवद्भक्त व अत्यंत विख्यात असा पुरुष फारच विरळा झाला. पुण्यापासून सुमारें आठ कोसांवर देहू या नांवाचें एक मध्यमप्रतीचें विस्तीर्ण असें गांव आहे, तेथें त्याचे पूर्वज रहात आले होते. ते जातीचे शूद्र ह्मणजे कुणबी असून धान्य, किराणा वगैरे जिन्नस इकडून तिकडे नेणें, खेपा करणें वगैरे हा वाणीपणाचा धंदा करीत असत. त्यांच्या कुलांत मुख्य आराध्य दैवत पंढरपुरचा **विठोबा** हेंच होय. तुकारामाच्या पूर्वींच्या सात पुरुषांपावेतों त्याच्या पूर्वजांची हकीकत महीपतीच्या भक्तलीलामृत वगैरे ग्रंथांत आढळते, तिजवरून ते बहुतेक सर्व भगवद्भक्तच होते असें दिसतें. शालिवाहन शके १५३० या सालीं[१] देहूमुक्कामीं तुकारामाचें जन्म झालें आणि शालिवाहन शके १५७१ विरोधिनामसंवत्सरीं फाल्गुन वद्य २ सोमवारीं सकाळीं प्रथम प्रहरीं ह्मणजे त्याच्या वयाच्या ४२ व्या वर्षी तो गुप्त[२] झाला.

तुकारामबावाचें खालील चरित्र त्यानें आपल्या गाथेंत ठिकठिकाणीं आपणाविषयीं जे अभंग लिहिले आहेत त्यांवरून रचलें आहे व या अभंगांतील हकीकतीची जुळणी करण्यास महीपतीनें भक्तलीलामृतांत जें तुकारामबावाचें चरित्र लिहिलें आहे त्याचें व तुकारामबावाच्या वंशजांत व इतर संतमंडळींत ज्या दंतकथा परंपरेनें

---

१. तुकाराम गुप्त झाल्याचें साल खेरीजकरून महीपतीनें शक, वर्ष वगैरे काल कोठेंच दाखविला नाहीं. १५३० हें साल, २१ व्या वर्षी तुकारामाच्या आयुष्याचें पूर्वार्ध संपलें अशा अर्थाची ओंवी लिहिली आहे तिजवरून. तुकारामाचें वय गुप्त होण्याच्या कालीं ४२ वर्षांचें होतें असें सर्व संतमंडळांत व तुकारामाच्या वंशजांत सर्वत्र प्रसिद्ध आहे त्यावरून आणि गुप्त झाल्याच्या सालावरून काढलें आहे.

२ देहू, तळेगांव व पंढरपूर येथील प्रतीवरून ( अभंग १६०९ पहा ) "गुप्त" असें लिहिलें आहे. परंतु जी प्रत तुकारामानें स्वतःच लिहिली असें ह्मणतात व जी डोहांत बुडविल्यापासून तेरादिवसांनीं वर तरून आल्याची प्रसिद्धि आहे व जिची देहूचे संस्थानीं अद्यापि पूजा करीत असतात त्या प्रतींत "तुकोबांनीं तीर्थास प्रयाण केलें" असें लिहिलें आहे त्याविषयीं या चरित्राच्या अखेरचा लेख पहा.

चालत आल्या आहेत त्यांचें साह्य घेतलें आहे. व कांहीं थोड्या गोष्टी भक्तलीलामृतांतूनही स्वतंत्र घेतल्या आहेत.

हें चरित्र लिहिण्यापूर्वी तुकारामाच्या पूर्वजांविषयीं थोडेंसें लिहिणें योग्य व आवश्यक आहे. तुकारामापासून त्याचा आठवा पूर्वज पुरुष विश्वंभर हा होय. याच्याही पूर्वींच याच्या कुळांत आराध्य दैवत **विठोबा** होता, आणि पंढरपुरची वारी करण्याचा संप्रदाय परंपर चालत आला होता. तरी विश्वंभराच्या वेळेपासून त्या कुळांत विठोबाची भक्ति वाढली आणि हल्लीं देहूस जें विठोबाचें देऊळ आहे तेंहीं विश्वंभराच्याच वेळेस झालें, सबब त्यापासूनच ही पुढील हकीकत देतों.

विश्वंभराच्या जन्माविषयीं व बाल्याविषयीं कांहीं माहिती नाहीं. तो अल्पवयांत असतां त्याचा बाप मरून गेल्यामुळें त्याच्या कुटुंबांत तो व त्याची आई हीं दोनच माणसें होतीं. विश्वंभर हा परंपर चालत आलेला व्यापार साकीनें करीत असून त्याची साधुसंतांवर व भगवद्भजनावर फार प्रीति असे. पुढें त्यानें लग्न करून संसार चालविला. तो साधुसंतांच्या सत्कारार्थ बरेंच द्रव्य वेची, आणि नित्य रात्रीं गांवांतील जन मिळवून मनापासून भजन करी.

आपला पुत्र स्वतंत्रपणें वारी करण्याजोगा झाला असें पाहून एकेवर्षी कार्तिकशुद्ध एकादशीच्या सुमारास विश्वंभराच्या आईनें त्यास सुचविलें कीं, आपल्या कुळांत आपले वाडवडील पंढरपुरची वारी करीत आले आहेत ती तूं आतां अंतरूं नको. म्हणजे तुझा संसार सफळ होऊन तुला परमार्थही साधेल. विश्वंभर हा मूळचाच प्रेमळ भक्त होता; त्यास ती सूचना फार योग्य वाटून तो मोठ्या उत्सुकतेनें वारी करण्यास गेला.

तेथें गेल्यावर वारकऱ्यांचा मोठा मेळा, विठोबाचें व इतर देवतांचीं स्थानें, भीमा अथवा चंद्रभागा या पवित्र नदीचें विस्तीर्ण तीर, पुंडलीक, नामदेव इत्यादि विठोबाच्या अनेक निःसीम भक्तांविषयींच्या परंपरेनें चालत आलेल्या अद्भुत कथा, त्यांचीं तेथील परमरम्य स्थानें, देवालयांतील उत्साह, सर्व लोकांचें विठोबारखुमाईच्या ठिकाणीं अतिशयित प्रेम इत्यादि गोष्टींनीं विश्वंभराच्या कोमळ व प्रेमळ अंतःकरणावर भगवद्भक्तीचा पूर्ण व कायम असा ठसा वठला. या वेळेस पंढरपुरास पांच दिवस राहून विश्वंभर देहूस परत आला. घरीं आल्यावर मातोश्रीस सर्व वृत्तांत मोठ्या आनंदानें कळवून दर पंधरवड्याच्या एकादशीस पंढरपुरची वारी करण्याचा त्यानें

निश्चय केला. आणि त्याप्रमाणें ज्येष्ठ वद्य एकादशीपावेतों एकंदर त्यानें सोळा वाऱ्या म्हणजे वेरझाऱ्या केल्या.

विश्वंभराचें चित्त वारींत गुंतल्यामुळें त्याच्या प्रापंचिक व्यवसायांत पुष्कळच अंतर पडूं लागलें व त्यामुळें गांवचे लोक त्याविषयीं अनेक प्रकारें अनेक गोष्टी बोलूं लागले. कोणी त्यास निंदूं लागले व कोणी वाखाणूं लागले. परंतु त्यानें आपला क्रम सोडिला नाहीं. वर लिहिल्याप्रमाणें क्रम चालला असतां आषाढ महिन्यांतील वारीस पंढरपुरास जावयाचें तों, शुद्ध अष्टमीच्या दिवशीं रात्रीं विश्वंभरास पंढरीस न येण्याविषयीं दृष्टांत होऊन विठोबारखुमाईची स्वयंभू मूर्ति देहू मुक्कामींच आंब्याच्या बनांत जमिनींत सांपडली असें ह्मणतात. पुढें देहू मुक्कामींच इंद्रायणीच्या तीरीं देऊळ बांधून त्या मूर्तीची यथाविधि स्थापना केली. आणि त्या दिवसापासून पुढें पंढरीस न जातां तेथेंच भजनपूजनाचा क्रम चालविला. याप्रमाणें कांहीं वर्षें लोटल्यानंतर विश्वंभरबावाचा काळ झाला.

विश्वंभराच्या मागें त्याची बायको आमाबाई[१] आणि एक हरि व दुसरा मुकुंद हे त्याचे दोन मुलगे इतकीं माणसें होतीं. आमाबाईस नवऱ्याप्रमाणेंच विठोबाची भक्ति असून तिनें नवऱ्याच्या मागें त्याचा जो भजनपूजनाचा क्रम होता तो यथास्थित चालविला. पुढें मुलगे मोठे होऊन त्यांची घरची स्थिति चांगली असल्यामुळें त्यांचीं लग्नकार्येंही झालीं. त्या उभयतांही बंधूंचें मन विठोबाच्या भजनपूजनाकडे तादृश नसून ऐहिक विचारांतच फार होतें. त्यांनीं मातोश्रीची इच्छा बिलकुल नसतांही एका राजाच्या[२] फौजेमध्यें अधिकार संपादून आपली मातोश्री व बायका देहूहून तिकडे नेल्या. पुढें कांहीं काळानें त्या राजावर परचक्र येऊन मोठी लढाई झाली, तींत हरि व मुकुंद हे दोघेही पडले. आपण आपल्या मातोश्रीच्या इच्छेप्रमाणें न वागल्यामुळें येथें येऊन विठोबाच्या भक्तीस अंतरलों, असें अंतकाळीं त्या उभयतां बंधूच्या मनांत येऊन त्यांस फार वाईट वाटलें. त्यांच्या मरणानंतर त्या राजधानीच्या नगरींत चोहोंकडे लुटालूट व पळापळ झाली. त्याच वेळेस धाकटा बंधु मुकुंद याच्या बायकोनें पतीच्या प्रेताबरोबर सहगमन केलें. वडील बंधु जो हरि त्याची बायको त्या काळीं गर्भार असल्यामुळें मागें राहिली. याप्रमाणें सर्व संसाराची वाताहत झाल्यावर आमाबाई तेथें त्रासून सुनेसुद्धां देहूस निघून गेली आणि

१ हीस "आमाई" असेंही महीपतीनें कोठें कोठें म्हटलें आहे. २ हा राजा कोण, याची राजधानी कोणती वगैरे महीपतीनें मुळींच कांहीं लिहिलें नाहीं.

सुनेस बाळंतपणासाठीं तिच्या माहेरीं पाठविलें. ती तिकडे गेल्यावर योग्य काळीं बाळंतीण होऊन तीस पुत्र झाला, त्याचें नांव विठोबा असें ठेविलें. काळें करून तो चांगला बोलता चालता झाला. पुढें त्याच्या आईस सासूच्या अजारीपणाचें वर्तमान कळून ती मुलास घेऊन देहूस आली. परंतु हीं दोघें येऊन पोचण्याच्या पूर्वीं नुकताच आमाबाईचा काळ झाला होता. विठोबा हा वयांत आल्यावर त्याला आईच्या मुखानें पूर्वजांचा इतिहास कळून तोही मातेसुद्धां मनापासून विठ्ठलाच्या भक्तीस लागला. त्यानें पंढरपुरची वारी पुनः सुरू केली. त्याचें लग्नकार्य होऊन संसार चांगला झाला. पुढें त्याचा पुत्र पदाजी नामें झाला तोही भगवद्भक्तच होता. पदाजीचा पुत्र शंकर, शंकराचा पुत्र कान्होबा, कान्होबाचा पुत्र बोल्होबा आणि बोल्होबाचा पुत्र तुकारामबावा. तुकारामबावापावेतों झालेले सर्व पूर्वज कमी जास्त भगवद्भक्तच होऊन आषाढी कार्तिकीस पंढरपुरची वारी करीतच आले होते. त्यांतही बोल्होबाचें लक्ष भजनपूजनाकडे अधिक होतें. प्रतिवर्षीं आषाढी-कार्तिकीची पंढरपुरची वारी तो सतत चोवीस वर्षें करीत होता. त्याची पत्नी कनकाई ही नवऱ्याप्रमाणेंच भाविक असून चांगली साध्वी होती. हीं चोवीस वर्षें गेल्यानंतर मग भगवत्कृपेंकरून त्या दांपत्यास निरनिराळ्या वेळीं तीन पुत्र झाले. त्यांपैकीं एकाचें नांव सावजी, दुसऱ्याचें नांव तुकाराम, आणि तिसऱ्याचें नांव कान्होबा याप्रमाणें होतीं. हे तिघे पुत्र अनुक्रमें सांब, विष्णु व ब्रह्मा या तीन देवांच्या वरांपासून झाले, असें भाविक लोक मानितात; आणि त्यांतही तुकाराम हा नामदेवाचाच अवतार होय असेंही मानितात. याविषयीं महीपतीनें भक्तलीलामृतांत बहुत लिहिलें आहे. नामदेवाची शतकोटि अभंग करण्याची प्रतिज्ञा असून चोऱ्याण्णव कोटि एकुणपन्नास लक्ष अभंग करून तो निवर्तला; तेव्हां राहिलेले पांच[1] कोटि एकावन्न लक्ष अभंग करण्याकरितां पुनः तुकारामाच्या रूपानें त्यानें अवतार घेतला असें ते लोक म्हणतात. याविषयींच एका विद्वान् मित्राकडून एक स्फुट अभंगही सांपडला आहे तो खालीं दाखल करतों:—

वेदाचे अभंग केले श्रुतिपर। द्वादशसहस्र संहितेचे ॥ १ ॥ निरुक्त निघंट आणि ब्रह्म-

१ विठोबाचें तुकारामवीं स्वप्नांत भाषण—ओंवी—चाळीस लक्ष चौऱ्याण्णव कोटी । नव लक्ष स्खलित आले शेवटीं । मग (नामदेव) आला वैकुंठीं । स्वइच्छा ॥ ३९ ॥ एकावन्न लक्ष पांच कोटी जाणें । शेष राहिले यांचें (नामदेवाचें) बोलणें । ते तूं वदें प्रसादवचनें । सप्रेम जीवन मी देतों ॥ ४० ॥ महीपति, अध्याय ९.

सूत्र । अवतार सहस्र उपग्रंथ ॥ २ ॥ अभंग ते कोटी भक्तिपर केले । ज्ञानपर केले तितुकेंची ॥ ३ ॥ पंचाहत्तर लक्ष वैराग्य वर्णिलें । नाम तें गाइलें तितुकेंची ॥ ४ ॥ साठीलक्ष केला बोधक जनासी । वर्णिलें रूपासी तितुकेंची ॥ ५ ॥ द्वादशसहस्र आत्मबोध केला । अनुभव घेतला एक[१] सर्व ॥ ६ ॥ चौतीस सहस्र लक्ष कोटि पांच । सांगोनियां साच तुका गेला ॥ ७ ॥

या अभंगांत दिलेल्या संख्यांची एकंदर बेरीज घेतां पांच कोटि, सत्तर लक्ष, चौतीस हजार ( ५,७०,३४००० ) अभंग होतात; याच्याच सातव्या कडव्यांत पांच कोटि एक लक्ष (?) आणि चौतीस हजार ही एकंदर अभंगांची संख्या दिली आहे; आणि तुकारामाच्या सर्व गाथेंत जी अभंगाची संख्या आढळते ती सुमारें शेचाळीसशें ( ४६०० ) हून अधिक आढळत नाहीं. या परस्पर विरुद्ध संख्यांचा मेळ पाडण्याची कांहीं युक्ति दिसत नाहीं.

वर लिहिलेला अभंग तुकारामाच्या कोणी एखाद्या भक्तानें केला असावा. त्याच्या शेवटल्या चरणांत " तुका " असें पद नेहमींच्या शैलीप्रमाणें आहे तरी तो आह्मी जमविलेल्या गाथ्याच्या कोणत्याही प्रसिद्ध व अप्रसिद्ध पुस्तकांत आढळत नाहीं, यास्तव तो तुकारामाचा नव्हे असें दिसतें.

वर लिहिलेले बोल्होबाचे तिघे पुत्र मोठे झाल्यानंतर त्यांचीं लग्नकार्यें वगैरे झालीं. बोल्होबाचा वृद्धापकाळ झाला तसा त्यानें सावजीच्या गळ्यांत प्रपंचाची माळ घालण्याचा विचार केला व तो त्यास व्यापार व प्रपंच यांजसंबंधी हकीकत सांगूं लागला. परंतु सावजीचें चित्त संसारांत नसून वैराग्याकडेसच फार होतें. ह्मणून त्यानें बापास तशाच प्रकारचें स्पष्ट उत्तर सांगितलें. बोल्होबा हा स्वतःच भगवद्भक्त व कांहींसा विरक्त असल्यामुळें त्यास सावजीच्या वृत्तीवरून फारसें वाईट वाटलें नाहीं. नंतर त्यानें व्यापार व संसार यांजसंबंधी माहिती तुकाराम सुमारें १३ वर्षांचा असतां त्यास करून दिली व तुकारामानेंही चांगल्या प्रकारें परंपरागत व्यापार वगैरे चालविला व त्यामुळें त्याच्या मातापितरांस वगैरे अर्थात् मोठा संतोष झाला. तुकारामाच्या पहिल्या बायकोस दम्याचा उपद्रव असल्यामुळें पुण्यांत आपाजी गुळव्या नांवाचा एक सधन व्यापारी होता त्याची कन्या तुकारामास दुसरी बायको केली. तुकारामाच्या लहानपणाच्या वर्तनाविषयीं व विद्याभ्यासाविषयीं कांहींच लेख कोठें आढळत नाहीं.

पुढें चार वर्षें गेल्यानंतर म्हणजे तुकारामाच्या १७ व्या वर्षीं त्याच्या आईबा-

---

१ एक कोटि.

पांचा काळ झाला. तेणेंकरून त्या सर्व कुटुंबावर फार दुःख ओरसलें. त्यांत संसाराचें ओझें तुकारामाच्या शिरीं असल्यामुळें व एकाएकीं वडिलांचा आधार तुटल्यामुळें त्यास अतिशयच दुःख झालें. पुढें थोड्याच काळानें तुकारामाचा वडील बंधु सावजी याची पत्नी निवर्तली त्यामुळें त्यास पुनः नवीन दुःख झालें. सावजी हा मुळींच भगवद्भक्त व विरक्त होता. आपण तीर्थाटनास जावें असें त्याच्या मनांत फार दिवसांपासून वागतच होतें. परंतु तीर्थरूप वृद्ध असल्यामुळें व गळ्यांत भार्येचा पाश असल्यामुळें तो अडकून राहिला होता. आईबाप मरून जाऊन भार्या निवर्ततांच तो उठून तीर्थयात्रेस चालता झाला. त्याच्या वियोगामुळें तुकारामास आधींच झालेलें दुःख फारच वृद्धिंगत झालें. या वेळेस त्याचें वय फक्त अठरा वर्षांचें होतें. त्याच्या पदरीं कुटुंब मोठें असल्यामुळें खर्च फार अफाट होता. वरील दुःखांच्या अनेक प्रसंगांमुळें त्याचें चित्त संसारांतून उडून उदासीनता वाढली व कांहीं देवभोळेपणाही वाढला. देवभोळेपणामुळें लोकांकडील येणें थकत चाललें. त्याच्या बरोबरीचे लोक त्याच्या चेंगट व उदासीन स्वभावामुळें त्याचा फार कंटाळा करूं लागले. व्यापार बसला. नंतर द्रव्य मिळविण्याकरितां अनेक प्रकारें उद्योग केला; परंतु महर्गता वगैरे असल्यानें त्याच्या संसारासच पुरवठा पडेना. त्यांतच दुष्काळ पडून एक शेराची धारण झाली. त्याच्या विसाव्या वर्षीं त्याची थोरली बायको अन्नावांचून मेली व दुसरी राहिली ती मोठी कर्कशा होती. नंतर संतु नांवाचा त्याचा वडील पुत्र होता तो त्याच वर्षीं वारला. त्यांतच पुढें एकावर्षानें ह्मणजे तुकारामाच्या एकविसाव्या वर्षीं त्याच्या पदरीं चार ढोरें होतीं तीं मरून गेलीं व तुकारामाचें निखालस दिवाळें निघालें. त्यामुळें लोकांत त्यास लज्जा वाटूं लागली. या सर्व गोष्टींमुळें अंतःकरणांत विरक्ति बाणून सर्व सोडून देऊन तो ईश्वरभजनास लागला. याप्रमाणें तुकारामाच्या आयुष्याचें पूर्वार्ध संपलें. एकाप्रसंगीं तुह्मास वैराग्य कसें झालें असें तुकारामास कांहीं संतांनीं विचारलें असतां त्यानें उत्तर दिलें तें:—

॥ १३३३ ॥ याती शूद्र वंश केला वेवसाव । आदि तो हा देव कुळपूज्य ॥ धृ० ॥ नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुह्मीं संतीं ॥ १ ॥ संवसारें जालों अतीदुःखें दुःखी । मायबाप सेखीं क्रमिलिया ॥ २ ॥ दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ॥ ३ ॥ लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखें तुटी येतां ॥ ४ ॥ देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ५ ॥ आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासी चित्त आधीं ॥ ६ ॥ कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ७ ॥ गाती पुढें त्यांचें धरावें धृपद । भावें

चित्त शुद्ध करोनियां ॥ ८ ॥ संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ ९ ॥ टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवुनी ॥ १० ॥ वचन मानिलें नाहीं सुहृदाचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ ११ ॥ सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १२ ॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १३ ॥ यावरिया जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १४ ॥ निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १५ ॥ बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १६ ॥ विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १७ ॥ आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १८ ॥ भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ १९ ॥ तुका ह्मणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २० ॥

॥ १३३४ ॥ ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित । काय काजें प्रीत । करी-तसां आदरें ॥ धृ० ॥ माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं । एकाचिये वांहीं । एक देखीं मानिती ॥ १ ॥ बहु पीडिलों संसारें । मोडीं पुसें पिटीं ढोरें । न पडतां पुरें । या विचारें राहिलों ॥ २ ॥ सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तेंही ॥ त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥ ३ ॥ प्रियापुत्रबंधू । यांचा तोडिला संबंधू । सहज जालों मंदू । भाग्यहीन करंटा ॥ ४ ॥ तोंड न दाखवे जना । शिरें सांदी भरें राणां । एकांत तो जाणां । तयासाठीं लागला ॥ ५ ॥ पोटें पिटिलों काहारें । दया नाहीं या विचारें । बोला-वितां बरें । सहज ह्मणें यासाठीं ॥ ६ ॥ सहज वडिलां होती सेवा । ह्मणोनि पूजितों या देवा । तुका ह्मणे भावा । साटीं ह्मणीं द्या कोणी ॥ ७ ॥

॥ १३३५ ॥ बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ धृ० ॥ अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ १ ॥ बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ २ ॥ बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ३ ॥ बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ४ ॥ बरें जालें तुझें केलें देवाईल । लेंकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे बरें व्रत एका-दशी । केलें उपवासी जागरण ॥ ६ ॥

तुकारामानें संसाराविषयीं विरक्त होऊन केवळ भगवद्भजनाकडेसच न लागावें ह्मणून त्याच्या बायकोनें व आप्तइष्टांनीं त्यास बहुत प्रकारें सांगितलें व अनेक उपा-यही केले; परंतु त्याचा निश्चय फिरला नाहीं. तो एकांतीं बसून पुष्कळ विचार करीत असे. तो एक वेळ कोणास न कळवितां देहूपासून दोन कोसांवर भांबनाथ नांवाचा एक डोंगर आहे त्याजवर जाऊन भगवद्ध्यान करीत होता. त्याचा कनिष्ठबंधु कान्होबा मागून त्याच्या शोधार्थ फिरतां फिरतां सात दिवसांनीं तेथें गेला. तेथें त्यास तुका-राम भेटला. याच ठिकाणीं तुकारामास साक्षात्कार झाला असें महीपति ह्मणतो. ज्या

स्थळीं त्यास ईश्वरदर्शन झालें तेथें पादुका स्थापिल्या आहेत त्या अद्यापि तेथें आहेत. तेथून कान्होबानें तुकारामास देहूस परत आणिल्यानंतर तुकारामानें कान्हयाकडून सर्व खतेंपत्रें बाहेर काढविलीं. आणि ह्मणाला कीं, हीं खतेंपत्रें म्हणजे केवळ कागदाचे घोडे आहेत. तीं असल्यापासून फक्त दुराशा मात्र वाढते. यास्तव हीं सर्व इंद्रायणींत बुडवून टाकावीं, कान्होबा ह्मणाला तुम्हीं विरक्त झाला तरी आमच्या पोटीं पोरें बाळें आहेत तेव्हां असें करतां येत नाहीं. हा त्याचा अभिप्राय पाहून तुकारामानें खतां पत्रांचे दोन विभाग केले व त्यांतील एक विभाग कान्होबास देऊन दुसरा इंद्रायणींत बुडविला. आणि सांगितलें कीं, आजपासून सर्व संसार तुह्मीं पाहावा, मला भगवद्भक्तिविरहित व्यापार करणें नाहीं. उदरनिर्वाह जसा चालेल तसा चालो. यावर कान्हयानें वेगळा संसार थाटला! आणि तुकारामानें भगवद्भक्ति प्रधान करून आपला वर्तनक्रम चालू केला. तो नेहमीं अल्पाहार करीत असे, व सर्वदा भगवद्भजनीं तत्पर असून मुखानें नामस्मरण करीत असे. सकाळीं स्नान करून विठोबाच्या देवळांत त्याची पूजा करून मग वनांत जात असे. देहूच्या पश्चिमेस तीन कोसांवर भांडारी नांवाचा डोंगर आहे त्याजवर जाऊन तो एकांतीं बसत असे. संध्याकाळीं परत येऊन रात्रीं देवळांत भजन करीत असे. तो पोटाकरितां भिक्षा मागत असे असें महीपति म्हणतो; परंतु भिक्षा मागण्याचा त्यास फारसा प्रसंग पडत नसे. आणि पोटाकरितां कांहीं उद्योग पडल्यास तो करावयाचा नाहीं असेंही त्याचें नव्हतें. भिक्षेनें जीवन करणें याविषयीं तो म्हणतो:—

॥ १४१० ॥ भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ धृ० ॥ देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पिला जीव । नाहीं तो हा व्यभिचार ॥ १ ॥ जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥ २ ॥ काय न करी विश्वंभर । सत्य कारितां निर्धार । तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ३ ॥

यावरून तो पोटाकरितां जमल्यास कांहीं तरी व्यापार करीत असे. महीपतीनें सहाव्या अध्यायांत अदमण दाणे घेण्याची बोली करून तुकाराम शेतास राखण राहिला असें लिहिलें व त्यांतच तुकारामाची बायको त्याच्या अगोदर जेवीत नसे असेंही लिहिलें आहे त्यावरून तो बहुश: आपल्या घरीं जेवीत असे अथवा त्याची बायको त्यास कधीं कधीं वाढूनही नेत असे असें दिसतें.

तुकाराम शेतास राखण राहिला त्याची हकीकत अशी आहे कीं, तो एके दिवशीं

इंद्रायणीच्या तीरीं भजन करीत बसला असतां त्याजकडे एक शेतकरी आला. त्याचें शेत तेथें जवळच उगवलें असून त्यास दाणा भरूं लागला होता. तो तुकारामास म्हणाला, "तुकारामशेट, उगीच रिकामे घरीं बसलां आहां तें माझें शेत राखाल तर तुह्मांस अदमण दाणे देईन, म्हणजे ते तुमच्या कुटुंबाच्या उपयोगीं पडतील आणि तुम्हांला कोठें तरी हरि हरि ह्मणायाचें तें तेथेंच ह्मणा." ही गोष्ट पतकरून तुकाराम त्याजबरोबर निघाला. शेतकऱ्यानें त्यास माळ्यावर नेऊन हातांत गोफण देऊन बसविलें आणि सांगितलें कीं "तुह्मी शेताची चांगली जतन करा. ह्मणजे राशीवर तुह्मांला अदमण दाणे देईन" अशी निरवानिरव करून शेतकरी खेप आणण्याकरितां दुसऱ्या गांवास गेला. तुकाराम शेत राखीत असतां पक्ष्यांचे थवे कणसांवर येऊन बसत; परंतु भुकेलेल्या प्राण्यांस हाकून द्यावें यांत दोष आहे असें वाटून तो त्यांस हाकीत नसे. तो शेत राखण्यास राहिल्याचें कळल्यावर त्याची बायको त्यास वाढून पाठवून मग आपण जेवीत असे. तुकारामानें माळ्यावर बसून सतत भजनाचा क्रम चालवावा. याप्रमाणें एक महिना लोटल्यावर शेतकरी खेप करून परत आला आणि मोठ्या उत्कंठेनें जाऊन शेत पाहतो तों तें पक्ष्यांनीं अगदीं भरून निघालेलें होतें. तेव्हां अर्थात् शेतकरी तुकारामावर रागावून त्यास बहुत अपशब्दही बोलला. पुढें गांवकऱ्यांपुढें पंचाईत होऊन त्यांनीं उभयतांचा मजकूर ऐकून घेतला. तुकारामानें सर्व खराच मजकूर सांगितला. पंचांनीं शेतकऱ्यास विचारलें कीं, "तुला दाणे किती उत्पन्न होत असतात?" त्यानें सांगितलें, "दोन खंडी" त्यावरून तेवढ्या गल्ल्याचा पैसा आकारून तुकारामापासून तेवढ्याबद्दल रोखा लिहून घेतला. आणि तो शेतकऱ्याच्या हातांत टाकला. नंतर शेताची वास्तविक स्थिति गांवकरी पहावयास जातात तों शेतांत आतोनात पीक लोटलें आहे. हें पाहून सर्वांस नवल वाटलें. शेतकऱ्याच्या तोंडास पाणी सुटून तो रोखा परत देण्यास कबूल झाला. परंतु गांवकऱ्यांनीं झालेला न्याय फिरायाचा नाहीं, असें सांगितलें. पुढें शेताची तजवीज गांवकऱ्यांनीं ठेवून मळणी केली तींत १७ खंडी दाणा उतरला. रास होतांच दोन खंडी दाणे शेतकऱ्यास देऊन रोखा परत घेतला. बाकीचे दाणे तुकारामास ने म्हणून सांगितलें असतां तो नेईना, सबब त्या गांवचा देशपांड्या महादाजीपंत म्हणून भाविक ब्राह्मण होता त्याजकडे तो दाणा नेऊन सांठविला. पुढें तुकारामानें देहू येथें पूर्वजांनीं बांधलेलें विठोबाचें देऊळ अगदीं मोडकळीस आलें होतें त्याचा जीर्णोद्धार केला. त्याकामीं त्या दाण्यांचा उपयोग पडला.

पुढें त्यास आपण स्वतः कथा करावी अशी इच्छा उपजून त्यानें तो गुण संपादन करण्याची अनेक प्रकारें तजवीज चालविली. कोठें कथा झाली कीं तो नियमानें व भक्तीनें जात असे आणि कथेस उभा राहिला असेल त्याच्या मागें उभा राहून ध्रुपद म्हणजे अकड कडवें म्हणत असे, त्यायोगें त्यास श्रवण फार झालें. कथेंत जें जें कानीं पडे त्याचें तो घरीं येऊन मनन करीत असे. त्यानें नामदेवाचे पुष्कळ अभंग आणि कबीराची कविता हीं पाठ केलीं; ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, भावार्थ रामायण, योगवासिष्ठ, अमृतानुभव इत्यादि आध्यात्मिक ग्रंथ वाचून त्यांचें चागलें मनन केलें. याखेरीज श्रीमद्भागवत व दुसरीं कितीएक पुराणें व स्फुटकथा ह्या त्यानें चित्त देऊन ऐकिल्या. या ग्रंथांच्या अभ्यासाकरितां व मननाकरितां तो बहुतकरून भंडाऱ्या डोंगरावर एकांतीं जाऊन बसत असे. तो एकादशीचें व्रत नियमानें करीत असे.

याप्रमाणें क्रम कांहीं दिवस चालल्यानंतर तुकारामास एका माघ शुद्ध १० गुरुवारच्या पाहटेस स्वप्न पडलें तें असें कीं, सकाळच्या प्रहरीं गंगास्नानास जात असतां एक ब्राह्मण भेटला त्यानें आपणास रामकृष्णनामरूप गुरुमंत्रोपदेश केला व आपली गुरुशिष्यपरंपरा अशी सांगितली कीं, मूळ राघवचैतन्य, त्यांचे शिष्य केशव चैतन्य व त्यांचा शिष्य मी बाबा चैतन्य नामें होय. नंतर आपण त्यास भोजनास घरीं आणिलें. परंतु जिजाबाईनें कांहीं अनिवार दुरुत्तरें बोलून त्रास दिला, त्यामुळ तो ब्राह्मण निघून गेला; इतकें पाहून तुकाराम जागा झाला. याविषयीं त्याचा अभंगः—

॥ ३६८ ॥ सद्गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥ ध्रु० ॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ १ ॥ भोजना मागतो तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ २ ॥ कांहीं कळे उपजला अंतराय । म्हणोनिया काय त्वरा झाली ॥ ३ ॥ राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥ ४ ॥ बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्ण हरि ॥ ५ ॥ माघशुद्ध दशमी पाहुनि गुरुवार । केला अंगीकार तुका म्हणे ॥ ६ ॥

॥ ३६९ ॥ माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ ध्रु० ॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंपा कांहीं कोठें ॥ १ ॥ जाती पुढें एक उतरले पार । ह्या भवसागर साधुसंत ॥ २ ॥ जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ३७० ॥ घालूनियां भार राहिलों निश्चिंतीं । निरविलें संतीं विठोबासी ॥ धृ० ॥ लावूनियां हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ १ ॥ कटीं कर सम चरण साजिरे । राहिला भीवरे तीरीं उभा ॥ २ ॥ खुंटले सायास आणिकि या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥ ३ ॥ तुज वाटे आतां तें करी अनंता । तुका ह्मणे संता लाज माझी ॥ ४ ॥

॥ ३७१ ॥ माझिये मनींचा जाणा हा निर्धार । जिवासि उदार जालों आतां ॥ धृ० ॥ तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥ १ ॥ ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥ २ ॥ जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । हेंचि आतां नाहीं लाज तुह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतीं घातला हावाला । न सोडीं विठ्ठला पाय आतां ॥ ४ ॥

तुकाराम मोठा परोपकारी होता. त्यास कोणीं कोणतेंही काम सांगितलें असतां तो हौसेनें करीत असे. त्याची स्वार्थावर दृष्टि मुळींच नसे. तो नेहमीं स्वतः नामस्मरण करीत असे व लोकांसही तें करण्याकरितां मनोभावानें उपदेश करीत असे. याप्रमाणें कांहीं काळ लोटल्यानंतर तुकारामास कवित्व करण्याविषयीं स्वप्न पडलें. त्याविषयीं तो स्वतः असें ह्मणतोः—

॥ १३२० ॥ नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥ धृ० ॥ सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥ १ ॥ माप टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥ २ ॥ प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले शेवटीं लावी तुका ॥ ३ ॥

॥ १३२१ ॥ द्याल ठाव तरि राहेन संगती । संतांचे पंगती पायांपाशीं ॥ धृ० ॥ आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥ १ ॥ सेवटील स्थळ नीच माझी वृत्ती । आधारें विश्रांति रावईन ॥ २ ॥ नामदेवापायीं तुकया स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥ ३ ॥

॥ १३३२ ॥ त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणा जोगें । एक जातां लागें । एक पाठी लागतें ॥ धृ० ॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ । करितां कोल्हाळ । कृपें खांदां हरि वाहे ॥ १ ॥ पापपुण्यात्मयाच्या शक्ती । असती योजिल्या श्रीपती । यावें काकुलती । तेथें सत्तानायेका ॥ २ ॥ तुका उभा पैल थडी । तरी हे प्रकाश निवडी । घातल्या सांगडी । तापे पेटीं हाकारी ॥ ३ ॥

यापुढें तुकाराम कविता करूं लागला त्यांत आरंभीं त्यानें बाळक्रीडा (ओंव्या ९००) केल्या असें महीपति ह्मणतो. तो खरा साधु असें समजून त्याच्या भजनाचा व कथेचा मोठा जम पडत चालला होता. याच समयास चिंचवडास मंबाजी नामें एक ब्राह्मण राहत होता तो कांहीं दिवसांपासून देहूस गोसावी होऊन राहिला

होता. आपण साधु ब्राह्मण असतां आपणास कोणी मानीत नाहीं व तुकाराम जातीचा शूद्र असतां त्यास लोक फार मानतात हें पाहून व त्याच्या भजनाचा व कथेचा भरचक्क थाट पाहून तो मनांत फार हेवा करीत असे. तुकारामाचा दावा साधावा असें रात्रंदिवस त्याच्या मनांत वागत असे, तरी तो लौकिकार्थ प्रत्यहीं तुकारामाच्या भजनास व कथेस येत असे. एका एकादशीस देहूस यात्रा भरली असतां मंबाजीनें विठोबाच्या प्रदक्षिणेच्या वाटेजवळ बाग केली होती, तिच्या रक्षणार्थ कांट्या लावल्या होत्या त्या कांहींशा वाटेवर आल्या होत्या त्या तुकारामानें स्वहस्तें उपटून टाकिल्या. त्यावरून मंबाजीस क्रोध आला व नेहमीचा हेवा मनांत होताच त्यामुळें त्यानें तुकारामास गुराप्रमाणें काठ्यांनीं झोडपलें. आणि ते दिवशीं कथेस न येतां घरींच राहिला. तुकारामानें मोठ्या शांततेनें तें सर्व सहन करून आपण त्याच्या घरीं जाऊन त्यास कथेंत आणून उत्तम रीतीनें बोध केला असें महीपति लिहितो. याबद्दल तुकोबाचे अभंग आहेत तेः—

॥ ३५५ ॥ न सोडीं न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ॥ धृ० ॥ भलतें जड पडो भारी । जीवावरी आगोज ॥ १ ॥ शतखंड देह शस्त्रधारी । करितां परी न भीयें ॥ २ ॥ तुका ह्मणे केली आधीं । दृढ बुद्धि सावध ॥ ३ ॥

॥ ३५६ ॥ बरवें बरवें केलें विठोबा बरवें । पाहोनि अंत क्षमा अंगीं कांटीवरी मारविलें ॥ १ ॥ शिव्या गाळी नीत नाहीं । बहु फार विटंबिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे क्रोधा हातीं । सोडवूनि घेतलें रे ॥ ३ ॥

॥ ३५७ ॥ पावलों पावलों । देवा पावलों रे ॥ १ ॥ बरवें संचित होतें तैसें जालें रें । आतां काय बोलों रे ॥ २ ॥ सोज्जवळ कंटकवाटा भावें करूं गेलों रे । तुका ह्मणे करूनि वेगळा केलों रे ॥ ३ ॥

॥ ३५८ ॥ कां होती कां होती । देवा एवढी फजीती ॥ धृ० ॥ मुळीं वर्म नसतों चुकलों । तो मी ऐसें चित्तीं ॥ १ ॥ होणार होऊनि गेलें । मिथ्या आतां खंतीर ॥ २ ॥ तुका ह्मणे पुरे आतां । दुर्जनाची संगतीरे ॥ ३ ॥

॥ ३५९ ॥ सोडवा सोडवा । सोडवा हो अनंता ॥ धृ० ॥ तुजविण ऐसा । कोण दुजा प्राणदाता ॥ १ ॥ कोणा लाज नेणा ऐसें । आणिकां शरण आह्मी जातां ॥ २ ॥ तुका ह्मणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥ ३ ॥

॥ ३६० ॥ पुत्राची वारता । शुभ ऐके जेवीं माता ॥ धृ० ॥ तैसें राहे माझें मन । आतां ऐकतां हरिगुण ॥ १ ॥ नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥ २ ॥ तुका ह्मणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥ ३ ॥

या उपदेशापासून मंबाजी मनांत पराकाष्ठेचा लज्जित झाला.

तुकारामाचा प्रेमळ स्वभाव व शुद्धभाव पाहून बहुत लोक त्याचे शिष्य झाले. ते भजनास व कथेस नेहमीं सादर सिद्ध असत. त्यांतही गंगाधर मवाळ म्हणून एक कडूसकर देशस्थ ब्राह्मण होता तो व दुसरा संताजी ह्मणून एक चाकणकर तेली होता तो हे दोघे अष्टौप्रहर तुकारामाजवळ असून त्याची कविता लिहीत असत. ते दोघेही संसाराविषयीं विरक्त. असून तुकारामाच्या पाठीमागें भजनास व कथेस उभे राहून ध्रुपद धरीत असत.

तुकारामाची पत्नी त्यास संसारसंबंधानें नेहमीं फार दुरुत्तरें बोलत असे. कोणी अतिथि, अभ्यागत त्यानें घरीं आणिला असतां ती त्याजवर फारच संतापत असे. तुका तिचे बोल अभंगीं लिहितो:—

॥ ५६६ ॥ मजचि भोंवता केला येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥ धृ० ॥ चालोनियां घरा सर्व सुखें येतीं । माझी तों फजीती चुकेचि ना ॥ १ ॥ कोणाची बाईल होऊनिया वोढूं । संवसारीं काढूं आपदा किती ॥ २ ॥ काय तरी देऊं तोंडितील पोरें । मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥ कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर । सारवावया ढोर शेण नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे रांड न करितां विचार । वाहूनिया भार कुंथे माथा ॥ ५ ॥

॥ ५६७ ॥ काय नेणों होता दावेदार मेला । वैर तो साधिला होउनी गोहो ॥ धृ० ॥ किती सर्वकाळ सोसावें हें दुःख । किती लोकां मुख वासूं तरीं ॥ १ ॥ ह्मवे आपुली आई काय माझें केलें । धड या विठ्ठलें संसाराचें ॥ २ ॥ तुका ह्मणे येती बाइले असडे । फुंदोनियां रडे हांसे कांहीं ॥ ३ ॥

॥ ५६८ ॥ गोणी आली घरा । दाणे खाऊं नेदी पोरा ॥ धृ० ॥ भरी लोकांची पांटोरी मेला चोरटा खाणोरी ॥ १ ॥ खवळली पिसी । हाता झोंबे जैसी लांसी ॥ २ ॥ तुका ह्मणे खोटा । रांडे संचिताचा सांटा ॥ ३ ॥

॥ ५६९ ॥ आतां पोरा काय खासी । गोहो जाला देवलसी ॥ धृ० ॥ डोचकें तिंबी घातल्या माळा । उदमाचा सांडी चाळा ॥ १ ॥ आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसपार ॥ २ ॥ हातीं टाळ तोंड वासी । गाय देउळीं देवापासीं ॥ ३ ॥ आतां आह्मीं करूं काय । न बसे घरीं राणा जाय ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां धीरी । आझुनि नाहीं जालें तरी ॥ ५ ॥

॥ ५७० ॥ बरें जालें गेलें । आजी अवघें मिळालें ॥ धृ० ॥ आतां खाइन पोटभरी । ओल्या कोरड्या भाकरी ॥ १ ॥ किती तरी तोंड । याशीं वाजवूं मी रांड ॥ २ ॥ तुका बाइले मानवला । चीथू करूनियां बोला ॥ ३ ॥

॥ ५७१ ॥ न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ धृ० ॥ उठितें तें कुटितें टाळ ॥

अवघा मांडिला कोल्हाळ ॥ १ ॥ जीवंतचि मेले । लाजा वाटुनियां प्याले ॥ २ ॥ संवसाराकडे । न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥ तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नावें धोंडा ॥ ४ ॥ तुका ह्मणे बरें जालें । घे गे बाइले लीहिलें ॥ ५ ॥

॥ ५७२ ॥ कोण घरा येतें आमुच्या काशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥ धृ० ॥ देवासाठीं जालें ब्रह्मांड सोइरें । कोमळ्या उत्तरें काय वेचे ॥ १ ॥ मानें पाचारितां नव्हे आराणुक । ऐसे येती लोक प्रीतीसाठीं ॥ २ ॥ तुका ह्मणे रांडे नावडे भूषण । कांतेलेंसें श्वान लागे पाठीं ॥ ३ ॥

या स्थितीचा तुकारामास अतिशय कंटाळा येऊन तो एकदां अरण्यांत गेला व घरीं येणें वर्ज केलें. गांवांतून कोणी अन्न तेथें आणून दिल्यास खावें. रात्रीं भजनाकरितां देवळांत यावें. प्रातःकाळीं इंद्रायणीचें स्नान करून विठोबाची पूजा करून रानांत जावें, असा त्याचा क्रम दोन महिने चालला. नंतर एके दिवशीं एकादशीस तुकारामाची व जिजाबाईची अकस्मात् वाटेवर गांठ पडली. तेथें त्या दोघांचें कांहीं बोलणें होऊन तुमचें वचन मी मानीन असें वचन जिजाबाईनें दिल्यानंतर तुकाराम घरास आला. त्याच दिवशीं रात्रीं तुळसीवृंदावनाजवळ तुकाराम बसला असतां त्यानें बायकोस तेथें बोलावून विरक्तीचा उपदेश केला व सर्वस्व दान करण्यास सांगितलें. याबद्दल तो अभंगांत ह्मणतो कीः—

॥ १९८१ ॥ पिकल्या शेताचा आह्मां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग ॥ धृ० ॥ सत्तर टक्के बाकी उरली मागे तो हा । मागें झडले दाहा आजिवरी ॥ १ ॥ हांडा भांडीं गुरें दाखवीं ऐवज । माजघरीं बाजे बैसलासे ॥ २ ॥ मज यासी भांडतां जाब नेदी बळें । ह्मणे एकावेळे घ्याल वांटा ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्त्रिये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ॥ ४ ॥

॥ १९८२ ॥ करितां विचार अवघें एक राज्य । तुजा कोण मज पाठी घाली ॥ धृ० ॥ कोण्या रीती जावें आह्मी वो पळोनी । मोकळे अंगणीं मागें पुढें ॥ १ ॥ काय तें गव्हाणें हिंडावीं वो किती । दूत ते लागती याचे पाठीं ॥ कोठें याची करूं गेलों कुळवाडी । आतां हा न सोडी जीवें आह्मा ॥ ३ ॥ होऊनि बेबाख येथेंचि राहावें । देईल तें खावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १९८३ ॥ नागवूनि एकें नागवींच केलीं । फिरोनियां आलीं नाहीं येथें ॥ धृ० ॥ भेणें सुती कोणी न घेती पालवीं । करूनियां गोवी निसंतान ॥ १ ॥ एकें तीं गोविलीं घेऊनि जमान । हांसतील जन लोक तयां ॥ २ ॥ सरले तयांसी घाली वैकुंठीं । न सोडी हे साटी जिवें जाली ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों जाणोनि नेणतीं । सांपडलों हातीं याचे आह्मी ॥ ४ ॥

॥ १९८४ ॥ आतां तूं तयास होईं वो उदास । आरंभला नास माझ्या जीवा ॥ धृ० ॥

जरूर हें जालें मज कां नावडे । उपास सेकडे येती आतां ॥ १ ॥ बरें झ्या तुझिया जीवाचें तें काय । व्हावें तें हें पाहें विचारुनी ॥ २ ॥ तुज मज तुटी नव्हे या विचारें । सहित लेंकुरें राहों सुखें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी तुझा माझा संग । घडेल वियोग कधीं न हे ॥ ४ ॥

॥ १९८५ ॥ काय करूं आतां माझिया संचिता । तेणें जीव वित्ता साटी केली ॥ धृ० ॥ न ह्मणावें कोणी माझें हें करणें । हुकुम तो येणें देवें केला ॥ १ ॥ करूनि मोकळा सोडिलों भिकारी । पुरविली तरी पाठी माझी ॥ २ ॥ पाणिया भोंपळा जेवावया पानें । लाविलीं वो येणें देवें आह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे यासी नाहीं वो करुणा । आहे नागवणा ठावा मज ॥ २ ॥

॥ १९८६ ॥ नको धरूं आस व्हावें या बाळास । निर्माण तें त्यांस त्यांचें आहे ॥ धृ० ॥ आपुला तूं गळा घेई उगवुनी । चुकवीं जाचणी गर्भवास ॥ १ ॥ ऐवज देखोनि बांधितील गळा । ह्मणोनि निराळा पळतसें ॥ २ ॥ देखोनियां त्यांचा अवघड मार । कांपे थरथर जीव माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरी आहे माझी चाड । तरी करीं वाड चित्त आतां ॥ ४ ॥

॥ १९८७ ॥ भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥ धृ० ॥ ह्मणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेकुरें जालीं मज ॥ १ ॥ आस निरसूनि कठिण हें मन । करीं वो समान वज्र तैसें ॥ २ ॥ किंचित हें सुख टाकीं वो थुंकोनी । पावसील धनी परमानंद ॥ ३ ॥ तुका ह्मणे थोर चुकती सायास । भवबंध पाश तुटोनियां ॥ ४ ॥

॥ १९८८ ॥ आईक हें सुख होईल दोघांसी । सोहळा हे ऋषि करिती देव ॥ धृ० ॥ जडितविमानें बैसविती मानें । गंधर्वाचें गाणें नामघोष ॥ १ ॥ संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्व सुखा पुरे कोड तेथें ॥ २ ॥ आलिंगूनि लोळों त्यांच्या पायांवरी । जाऊं तेथवरी मायबापें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तया सुखा वर्णूं काय । जेव्हां बापमाय देखें डोळां ॥ ४ ॥

॥ १९८९ ॥ देव पाहवया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत ॥ धृ० ॥ दिन शुद्ध सोम सकाळीं पातला । द्वादशी घडला पर्वकाळ ॥ १ ॥ द्विजां पाचारूनि शुद्ध करीं मन । देईं वो हें दान यथाविध ॥ २ ॥ नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुरी सांगतों पाल्हाळीं । परी तो जवळी आहे आह्मां ॥ ४ ॥

॥ १९९० ॥ सुख हें नावडे आह्मां कोणा बळें । नेणसी अंधळे जालीशी तूं ॥ धृ० ॥ भूक तान कैसी राहिली निश्चळ । खुंटलें चपळ मन ठायीं ॥ १ ॥ द्रव्य जीवाहुनि आवडे या जना । आह्मांसी पाषाणाहूनि हीन ॥ २ ॥ सोइरे सज्जन जन आणि वन । अवघें समान काय गुणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां जवळीच आहे । सुख दुःख साहे पांडुरंग ॥ ४ ॥

॥ १९९१ ॥ गुरुकृपे मज बोलविलें देवें । होईल हें घ्यावें हित कांहीं ॥ धृ० ॥

सत्य देवें माझा केला अंगीकार । आणीक विचार नाहीं आतां ॥ १ ॥ होई बळकट घालूनियां कास । हाचि उपदेश तुज आतां ॥ २ ॥ सडा संमार्जन तुळसीवृंदावन । अतीत पूजन ब्राह्मणाचें ॥ ३ ॥ वैष्णवांची दासी होई सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥ ४ ॥ पूर्णबोध स्त्रीभ्रतारसंवाद । धन्य जींहीं वाद आइकीला ॥ ५ ॥ तुका ह्मणे आहे पांडुरंगकथा । तरेल जो चित्ता धरील कोणी ॥ ६ ॥

या अभंगापासून जिजाबाईस तात्काळ कांहीं विरक्ति झाली; परंतु ती सतत राहिली नाहीं.

तुकारामास महादेव ह्मणून जो वडील मुलगा होता तो लहान असतां त्याला मुतखडा होऊन त्या व्यथेनें तो अगदीं मरणोन्मुख झाला. जिजाबाई सर्व औषधें, भालदोऱ्या वगैरे सर्व प्रकारचे उपाय करून थकली. तुकाराम तिकडे लक्ष देईना. अखेरीस फार पोट फुगून मरतो असें झालें, तेव्हां जिजाबाई काळ्यावर ( ती विठोबास नेहमीं काळ्या म्हणत असे ) रागावून पोरास घेऊन देवळांत गेली आणि आतां पोर मूर्तीवर आपटणार तों असा ध्वनि तिला ऐकूं आला कीं, तुझा मुलगा बरा झाला. या गोष्टीचा चमत्कार वाटून ती मुलाकडे पाहते तों त्याला लघ्वी मनस्वी चालू झाली. ह्मणून तिनें त्याला देवळाच्या बाहेर आणून बसविला. लघ्वीच्या द्वारें सर्व रोग निघून गेला. नंतर त्यानें खावयास मागितलें. आणि खाल्यानंतर झोप घेऊन उठला तो चांगला बरा झाला.

पुढें दिवसानुदिवस तुकारामाची कीर्ति लोकांत वाढली. विठोबा प्रत्यहीं तुकारामाबरोबर भोजन करावयास येतो असें वर्तमान चोहोंकडे प्रसिद्ध झालें. हें ऐकून पुण्याजवळ चिंचवड ह्मणून जें खेडें आहे तेथील महागणपतिभक्त चिंतामणिदेव यांनीं हा चमत्कार पाहण्यासाठीं तुकारामास निरोप पाठविला कीं, तुह्मी एक वेळ येऊन आह्मांस भेटून जावें. त्यावरून तुकाराम चिंचवडास गेला. तेथें त्याच्या प्रथमच्या भाषणावरूनच चिंतामणिदेवांस त्याच्या खऱ्या भक्तीचा व त्याजवर भगवत्कृपा होती तिचा थोडासा चमत्कार समजला असें ह्मणतात. पुढें भोजनसमयीं तुकारामांनीं दोन पात्रें अधिक मांडवून चिंतामणिदेवास प्रत्यक्ष गणपतीस भोजनास आणण्यास सांगितलें परंतु देवांच्यानें तें झालें नाहीं. शेवटीं तुकारामानें गणपतीची व विठोबाची स्तुति व प्रार्थना करून त्यांस प्रत्यक्ष भोजनास आणिलें व त्या वेळेस देवांस मात्र त्यांचें प्रत्यक्ष दर्शन झालें. पंक्तींतील इतर लोकांस दर्शन झालें नाहीं; तरी पात्रावरचें अन्न वगैरे सरलेलें त्यांनीं पाहिलें असें म्हणतात. शेवटीं चिंतामण-

देवांस अतिशय आनंद होऊन त्यांनीं तुकारामाचें मोठें गौरव केलें. भोजन झाल्या-नंतर तुकाराम देहूस निघून गेला. याबद्दल तुकाराम आपल्या अभंगांत लिहितो कीं:—

॥ २८८२ ॥ वांझा गाई दुभती । देवा ऐशी तुझी ख्याती ॥ धृ० ॥ ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ॥ १ ॥ चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघ धारू ॥ २ ॥ पक्षी राजहंस । अमोलिक मोती त्यास ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । कां गा खोचलासी जीवा ॥ ४ ॥

॥ २८८३ ॥ परतें मी आहे सहजचि दुरी । वेगळें भिकारी नामरूपा ॥ धृ० ॥ न लगे रुसावें धरावा संकोच । सहज तें नीच आलें भागा ॥ १ ॥ पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावें । आर्थ तेंचि देवें केलें ऐसें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी आह्मां जी वेगळे । केलेती निराळे द्विज देवें ॥ ३ ॥

॥ २८८४ ॥ चिंतामणि देवा गणपतीशी आणा । करावें भोजना दुजे पात्रीं ॥ धृ० ॥ देव ह्मणती तुक्या एवढी कैंची थोरी । अभिमानाभीतरी नागवलों ॥ १ ॥ वाडवेळ जाला शिळें जालें अन्न । तटस्थ ब्राह्मण बैसलेती ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरित मोरयासी ॥ ३ ॥

॥ २८८५ ॥ भोक्ता नारायण लक्ष्मीचा पती । ह्मणोनी प्राणाहुती घेतलिया ॥ धृ० ॥ भर्ता आणि भोक्ता कर्ता आणि करविता । आपण सहजता पूर्ण काम ॥ १ ॥ विश्वंभर कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥ २ ॥ कवळोंकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २८८६ ॥ माझा स्वामी तुह्मी वागवितो लात । तेथें मी पतित काय आलों ॥ धृ० ॥ तीर्थें तुमच्या चरणीं जाहालीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वाणूं ॥ १ ॥ तुका ह्मणे तुह्मी देवा द्विजवंद्य । मी तों काय निंद्य हीनयाती ॥ २ ॥

तुकारामास तिघी कन्या होत्या—एक काशी, दुसरी भागिरथी आणि तिसरी गंगा. या वयस्क झाल्या त्या वेळेस जिजाबाईनें त्यांच्या लग्नाबद्दल तुकारामास निकड लाविली. तुकारामानें स्वजातीचे तीन मुलगे आणून तिघांसही हळदी लाविल्या. त्या मुलांच्या आईबापांसही त्या मुली मान्य होऊन त्यांनीं मोठ्या खुषीनें लग्नसमा-रंभ केले. गांवाच्या लोकांनीं तुकारामाच्या घरीं सर्व साहित्य करून रीतीप्रमाणें चार दिवस लग्नसमारंभ केला. या तीन सोयऱ्यांपैकीं एकाचें अडनांव मोझे, दुसऱ्याचें गाडे, आणि तिसऱ्याचें जांभुळकर अशीं होतीं.

पंढरपुरास एक ब्राह्मण आपणास शास्त्रव्युत्पत्ति व्हावी ह्मणून उपवास करीत बसला होता. त्यास तेथें आळंदीस जाण्याविषयीं दृष्टांत झाला. तो आळंदीस येऊन उपोषणें करीत बसला. तेथें तुकारामाकडे जावें असें ज्ञानदेव यानें स्वप्नीं येऊन

सांगितलें. तुकाराम जातीचा शूद्र यामुळें ब्राह्मणाची थोडीबहुत निराशा त्याच वेळीं झाली. तरी प्रत्यय पाहण्याकरितां तो तुकारामाकडे आला. ज्ञानेश्वरास पाहिजे तितकें सामर्थ्य असतां त्यानें आपणाकडे ब्राह्मण पाठविला याबद्दल मोठा विस्मय पावून तुकारामानें त्यास अकरा अभंग करून दिले व एक प्रसादाचा नारळ दिला. ब्राह्मणास संस्कृत व्युत्पत्तिज्ञान पाहिजे होतें सबब प्राकृत आपल्या उपयोगी नाहीं असें समजून तो अभंग व नारळ दोन्हीं टाकून आळंदीस गेला. त्यावर तुकारामानें १३ अभंगांचें ज्ञानेश्वरांस पत्र लिहिलें. ते ११ व १३ अभंग येणेंप्रमाणें:—

॥ २३२५ ॥ नको कांहीं पडों ग्रंथाचिये भरीं । शीघ्र वृत्त करीं हेंचि एक ॥ धृ० ॥ देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥ १ ॥ साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥ २ ॥ उधाराचा मोक्ष होय नव्हे ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥ ३ ॥ रोकडी पातली अंगसंगें जरा । आतां उजगरा कोठवरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे घालीं नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

॥ २३२६ ॥ नाहीं देवापाशीं मोक्षाचें गाठोळें । आणूनि निराळें द्यावें हातीं ॥ धृ० ॥ इंद्रियांचा जय साधुनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥ १ ॥ उपास पारणीं अक्षरांची आटी । सत्कर्मा शेवटीं असे फळ ॥ २ ॥ आदरें संकल्प वारीं अतिशय । सहज तें काय दुःख जाण ॥ ३ ॥ स्वप्नींच्या घायें विवळसी वांयां । रडे रडतियासवें मिथ्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे फळ आहे मूळापाशीं । शरण देवासी जाय वेगीं ॥ ५ ॥

॥ २३२७ ॥ त्यजिलें भेटवी आणूनि वासना । दाविल्याचे जना काय काज ॥ धृ० ॥ आळवावें देवा भाकूनि करुणा । आपुलीया मना साक्ष करीं ॥ १ ॥ नाहीं जावें यावें दुरूनि लागत । आहे साक्षभूत अंतरींचा ॥ २ ॥ तुका ह्मणे हा आहे कृपासिंधू । तोडी भवबंधु तात्काळिक ॥ ३ ॥

॥ २३२८ ॥ गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ धृ० ॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ १ ॥ आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ २ ॥ तुका ह्मणे आळी । जेंवी नुरेचि वेगळी ॥ ३ ॥

॥ २३२९ ॥ ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥ धृ० ॥ ह्मणऊनि अवघें सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ १ ॥ सम खुण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥ २ ॥ तुका ह्मणे नभा । परता अनूचाही गाभा ॥ ३ ॥

॥ २३३० ॥ पाहुनीयां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥ धृ० ॥ नाहीं तरि वांयां केली तोंडपिटी । उरी ते शेवटी उरलीसे ॥ १ ॥ पढोनियां वेद हरिगुण गावे । ठावें तें जाणावें तेव्हां जालें ॥ २ ॥ तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धी । स्थिर राहे बुद्धि हरिच्या नामीं ॥ ३ ॥ यागयज्ञादिक काय दानधर्म । तरि फळ नाम कंठीं राहे ॥ ४ ॥ तुका ह्मणे नको कावाडाचे भरी पडो सार धरीं हेंचि एक ॥ ५ ॥

॥ २३३१ ॥ सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥ धृ० ॥ त्याचें दिलें त्यासी । पावे फळ आपणासी ॥ १ ॥ आहे हा आधार । नाम त्याचें विश्वंभर ॥ २ ॥ नाहीं रिता ठाव । तुका ह्मणे पसरीं भाव ॥ ३ ॥

॥ २३३२ ॥ संकोचोनि काय जालासी लहान । घेई आपोशन ब्रह्मांडाचें ॥ धृ० ॥ करोनि पारणें आंचवें संसारा । उशीर उशिरा लावूं नको ॥ १ ॥ घरकुलानें होता पडिला अंधार । तेणें केलें फार कासावीस ॥ २ ॥ झुगारूनि दुरी लपविलें काखे । तुका ह्मणे वाखे कौतुकाचे ॥ ३ ॥

॥ २३३३ ॥ माझ्या बापें मज दिधलें भातुकें । ह्मणोनि कौतुकें क्रीडा करीं ॥ धृ० ॥ केली आळी पुढें बोलिलों वचन । उत्तम हें ज्ञान आलें त्याचें ॥ १ ॥ घेउनि विभाग जावें लवलाह्या । आलेति या ठाया आपुलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञानदेवीं समुदाय । करावा मी पाय येइन वंदूं ॥ ३ ॥

॥ २३३४ ॥ ज्ञानियांचा गुरु राजा महाराव । ह्मणती ज्ञानदेव ऐसें तुह्मां ॥ धृ० ॥ मज पामरा हें काय थोरपण । पायींची वाहण पायीं बरी ॥ १ ॥ ब्रह्मादिक जेथें तुह्मां ओळगणे । इतर तुळणे काय पुरे ॥ १ ॥ तुका ह्मणे नेणे युक्तीची ते खोली । ह्मणोनि ठेविली पायीं डोई ॥ ३ ॥

॥ २३३५ ॥ बोलिलीं लेंकुरें । वेडीं वाकुडीं उत्तरें ॥ धृ० ॥ करा क्षमा अपराध । महाराज तुह्मी सिद्ध ॥ १ ॥ नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥ ३ ॥

॥ २३३६ ॥ काय तुह्मी जाणां । करूं अव्हेर नारायणा ॥ धृ० ॥ तरी या लटिक्याचीं गोही । निवडली दुसरे ठायीं ॥ १ ॥ कळों अंतरींचा गुण । नये फिटल्यावांचून ॥ २ ॥ आणिलें अनुभवा । जनाच्या हें ज्ञानदेवा ॥ ३ ॥ आणीक कोणी भिती । त्यांच्या चिंतनें विश्रांती ॥ ४ ॥ तुका ह्मणे बीज पोटीं । फळ तैसेंचि सेवटीं ॥ ५ ॥

॥ २३३७ ॥ अविश्वासीयाचें शरीर सुतकी । विटाळ पातकी भेद वाही ॥ धृ० ॥ काय त्याचा वेल जाईल मांडवा । होता तैसा ठेवा आला पुढें ॥ १ ॥ मातेचा संकल्प व्हावा राजबिंडा । कपाळीचा धोंडा उभा ठाके ॥ २ ॥ तुका ह्मणे जैसा कुचराचा ह्मणा । परिपाकीं अन्ना न मिळे जैसा ॥ ३ ॥

॥ २३३८ ॥ तामसाचीं तपें पापाची सिदोरी । तमोगुणें भरी घातले ते ॥ धृ० ॥ राज्यमद्य आड सुखाची संपत्ति । उलंघूनि जाती निरयगांवा ॥ १ ॥ इंद्रियें दमिलीं इच्छा जीती जीवीं । नागविती ठावीं नाहीं पुढें ॥ २ ॥ तुका ह्मणे हरिभजनावांचून । करितो तो सीण पाहों नये ॥ ३ ॥

॥ २३३९ ॥ हरिकथेवांचून इच्छिती स्वहित । हरिजन चित्त न घला तेथें ॥ धृ० ॥ जाईल भंगोन आपुला विश्वास । होईल या नास कारणांचा ॥ १ ॥ ज्याचिया बैसावें भोजनपंगती । त्याचिया संगती तैसें खावें ॥ २ ॥ तुका ह्मणे काय जालेती आपतें । व्याही परते थोर तुह्मी ॥ ३ ॥

॥ २३४० ॥ सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हुंतूंपण कामा नये ॥ धृ० ॥ घेईल जीव कां सारील परतें । भंगलिया चित्तें सांदीजेना ॥ १ ॥ खद्योतें दावावी रवि केवीं वाट । आपुलेंचि नीट उसंतावें ॥ २ ॥ तुका ह्मणे तो ज्ञानाचा सागर । परि नेंदी अगर भिजों भेदें ॥ ३ ॥

॥ २३४१ ॥ जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥ धृ० ॥ करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥ १ ॥ जेणें हे घातली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥ २ ॥ तुका ह्मणे तेथें सुखा काय उणें । सहें समाधानें चित्ताचिया ॥ ३ ॥

॥ २३४२ ॥ बहुतां छंदाचें बहु वसे जन । नये वांटूं मन त्याच्या संगें ॥ धृ० ॥ करावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥ १ ॥ सुखाची समाधि हरिकथा माउली । विश्रांति साउली सिणलियांची ॥ २ ॥ तुका ह्मणे बुडे बांधोनि दगड । तेथें काय कोड धांवायाचें ॥ ३ ॥

॥ २३४३ ॥ हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥ धृ० ॥ त्याची वाणी अमंगळ । कान उंदराचें बीळ ॥ १ ॥ सांडुनि हा रस । करिती आणीक सायास ॥ २ ॥ तुका ह्मणे पिसीं । वांयां गेलीं किती ऐसीं ॥ ३ ॥

॥ २३४४ ॥ प्रेम अमृताची धार । वाहे देवाही समोर ॥ धृ० ॥ ऊर्ध्ववाहिनी हरिकथा । मुगुटमणि सकळां तीर्थां ॥ १ ॥ शिवाचें जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥ २ ॥ तुका ह्मणे हरी । इची स्तुति वाणी थोरी ॥ ३ ॥

॥ २३४५ ॥ आतां माझ्या मना । इची घडो उपासना ॥ धृ० ॥ ऐसें करीं पांडुरंगा । प्रेमवोसंडेसें अंगा ॥ १ ॥ सर्व काळ नये । वाचे वीट आड भये ॥ २ ॥ तुका वैष्णवांसंगती । हेंचि भजन पंगती ॥ ३ ॥

॥ २३४६ ॥ उपास कराडी । तिहीं करावीं बापुडीं ॥ धृ० ॥ आह्मी विठोबाचे दास । चिंता झुगारिली आस ॥ १ ॥ भक्तीच्या उत्कर्षें । नाहीं मुक्तीचें तें पिसें ॥ २ ॥ तुका ह्मणे बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ ३ ॥

॥ २३४७ ॥ करविली तैसी केली कटकट । वांकडें कीं नीट देव जाणे ॥ धृ० ॥ कोणांकारणें हें जालेंसे निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥ १ ॥ तुका ह्मणे मी या अभिमाना वेगळा । घालूनि गोपाळा भार असें ॥ २ ॥

॥ २३४८ ॥ तुह्मी येथें पाठविला धरणेकरी । त्याची जाली परी आइका ते ॥ धृ० ॥ आतां काय पुढें वाढवूनि विस्तार । जाला समाचार आइका तो ॥ १ ॥ देवाचें उचित एकादश अभंग । महाफळ त्याग करुनी गेला ॥ २ ॥ तुका ह्मणे सेवा समर्पूनि पायीं । आलों उतराई ठावें असो ॥ ३ ॥

नंतर त्या ब्राह्मणानें टाकलेले अकरा अभंग व नारळ कोंडोबा म्हणून एक शिवाजी राजाच्या पुराणिकाचा ब्राह्मण जात होता त्यास पाहून तुकारामानें ते त्यास देऊन

टाकले. पुढें त्यास ज्ञानप्राप्ति होऊन त्याचा मोठा लौकिक झाला असें म्हणतात. तो नारळ फोडिला त्यांत फक्त उत्तम मोत्यें निघालीं. याचें कारण असें ह्मणतात कीं, अमदाबादेच्या कोणी एका सावकारानें ज्ञानेश्वरास एक लाख रुपयांचें जवाहिर देण्याचा नवस केला होता. तो फेडण्याकरितां तो सावकार एक नारळ कोरून तो मोत्यानें भरून आळंदीस घेऊन आला; तेव्हां तो नारळ देहूस तुकारामाला द्यावा असा त्यास दृष्टांत झाला होता, सबब त्या सावकारानें तो तुकारामास आणून दिला होता, तोच नारळ हा होता.

यानंतर एक वेळ लोहगांवचे कांहीं भाविक लोक देहूस आले होते त्यांस तुकारामास आपल्या गांवीं घेऊन जावेंसें वाटून त्यांनीं त्यास विनंति केली ती तुकारामानें मान्य केली. मग ते त्यास लोहगांवास घेऊन गेले व तेथें त्याच्या भजनाचा व कीर्तनाचा मोठा समारंभ केला. व त्याप्रमाणें त्या गांवीं कितीएक दिवसपावेतों एकसारखी कीर्तनांची माळच लागली होती. गरीबगुरीबही तुकारामास शिधापाणी देऊन एक एक दिवस आपआपल्या घरीं कीर्तन करवीत. तेथें कांहीं अद्भुतचमत्कार झाले असेंही महीपति लिहितो. लोहगांवांत असल्या वेळीं तेथें परचक्राचा वेढा पडला होता त्याविषयीं तुकाराम आपल्या अभंगांत याप्रमाणें लिहितोः—

॥ ९९७ ॥ न देखवे डोळा ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥ धृ० ॥ काय तुह्मी येथें नसालसें जालें । आह्मीं न देखिलें पाहिजे हें ॥ १ ॥ परचक्र कोठें हरिदासांच्या वासें । न देखिजेत देशें राहातिया ॥ २ ॥ तुका ह्मणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥ ३ ॥

॥ ९९८ ॥ काय म्यां मानावें हरिकथेचें फळ । तरिजे सकळ जनीं ऐसें ॥ धृ० ॥ उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र ॥ १ ॥ पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसी रोकडें साक्ष आलें ॥ २ ॥ तुका ह्मणे जेथें वसतील दास । तेथें तुह्मा वास कैसा आतां ॥ ४ ॥

॥ ९९९ ॥ भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःखी होतां जाणा न देखवे ॥ धृ० ॥ आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुह्मी दातारा नेणां ऐसें ॥ १ ॥ भजनीं विक्षेप तेंची पैं मरण । न वजावा क्षण एक वांयां ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाव मागें ॥ ३ ॥

॥ ९६० ॥ फिरंगी वाखर लोखंडाचे विके । परि ते निराळे गुणमोल ॥ धृ० ॥ पाथरी प्रतिमा एकचि भाषण । परि तें महिमान वेगळालें ॥ १ ॥ तुका ह्मणे तैशा नव्हतील परी । संतजना सरी सारिखिया ॥ २ ॥

लोहगांवाहून तुकाराम परत देहूस आला. त्याची कीर्ति दिवसानुदिवस चोहोंकडे अतिशय पसरत चालली. कित्येक भाविक लोक त्याचा चमत्कार पाहण्याकरितां व दर्शन घेण्याकरितां दूरदूरच्या ठिकाणांहून येऊं लागले. कीर्तनाची व कवित्वाची मोठी झोड उठली. तो कथेंतल्या कथेंतच नवीन अभंग तात्कालिक करून कीर्तन करूं लागला. तो अगदीं निस्पृह, निर्भिड व स्पष्टवक्ता असल्यामुळें व त्याची वागणूक त्याच्या बोलण्याप्रमाणें असल्यामुळें व त्याचें कवन चित्तवेधक असल्यामुळें श्रोत्यांच्या अंतःकरणांत तें उत्तमप्रकारें बाणत असे. सामान्यतः ब्राह्मणांस व त्यांत विशेषतः भिक्षुक व शास्त्री यांस स्वकीयजातीच्या व विद्येच्या अभिमानामुळें तुकारामाचा उत्कर्ष अगदीं सहन होत नसे. ते त्याविषयीं अनेक प्रकारची अवाच्य बडबड करीत असत. पुण्याच्या ईशान्येस वाघोली म्हणून एक खेडें आहे तेथें रामेश्वरभट्ट ह्मणून एक विद्वान् व राजमान्य ब्राह्मण होता त्यास तुकारामाचा उत्कर्ष अतिशय असह्य झाला. तो ह्मणे तुकाराम जातीचा कुळंबट व ज्ञानशून्य असतां उगीच पाखंड माजविलें आहे. त्याचा चांगला बंदोबस्त केलाच पाहिजे. नंतर त्यानें ग्रामाधिकाऱ्याच्या मनांत तुकारामाविषयीं वक्रता व द्वेष उत्पन्न करून देऊन त्याजकडून देहूच्या पाटलास तुकारामाला गांवांतून हाकून देण्याविषयीं ताकीदचिटी पाठविली. पाटलानें ती चिटी तुकारामास दाखविली; तेव्हां त्यास मोठी काळजी पडाली कीं, हें देवस्थान टाकून कोठें जावें. यावेळीं त्यानें अभंग केला आहे तो:—

॥ ६७६ ॥ काय खावें आतां कोणीकडे जावें । गांवांत राहावें कोण्या बळें ॥ धृ० ॥ कोपला पाटील गांवचे हे लोक । आतां घाली भीक कोण मज ॥ १ ॥ आतां येणें चवी सांडिली ह्मणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ २ ॥ भल्या लोकीं यास सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे याचा संग नव्हे भला । शोधितां विठ्ठला जाऊं आतां ॥ ४ ॥

नंतर तुकाराम रामेश्वरभट्टास शरण गेला आणि तेथेंच त्यानें हरिकीर्तनास आरंभ केला. त्यामध्यें श्रुत्यर्थही येत आहेत असें पाहून रामेश्वरभट्ट म्हणाला तूं जातीचा शूद्र आहेस यास्तव हा अर्थ बोलणें व ऐकणें हीं नरकप्रद आहेत; यास्तव तूं हें कवित्व करूं नको. तुकाराम ह्मणाला पांडुरंगानें आज्ञा केल्यावरून ही बडबड करीत आलों. आतां आपण अपरसूर्य ब्राह्मण आज्ञा करतां त्यापक्षीं पुढें करणें सोडून देतों; परंतु पूर्वी केलेल्या कवित्वाचें काय करावें? रामेश्वरभट्ट ह्मणाला कीं, तें

सर्व जळांत बुडवावें. हें एकून तो देहूस आला व झालेला वृत्तांत विठोबाच्या मूर्तीस विदित केला आणि कवित्वाच्या वह्या वरखालीं दगडी चिपा बांधून त्यावरून घट्ट रुमाल बांधून त्या डोहांत टाकल्या. हें पाहून भाविकजनांस फार वाईट वाटलें व अभाविक जनास बरेंच वाटलें.

वह्या बुडवून पांच दिवस झाल्यानंतर कांहीं कुटिल लोक येऊन तुकारामास ह्मणाले कीं, डोहांत पूर्वी खतें बुडवून संसार बुडविला व आतां कवित्व बुडवून परमार्थही बुडविला. याप्रमाणें दोहोंकडूनही त्वां आपला नाश करून घेतला. हें ऐकून तुकारामास फार वाईट वाटलें. त्यानें अन्नोदक घेणें सोडून देऊन विठोबाच्या देवळांत तुळसीवृंदावनाजवळ एका दगडावर शयन केलें. त्या वेळेस शोकपर असे २० अभंग केले आहेत. तेः—

॥ २२२२ ॥ भूत बाधा आह्मां घरीं । हें तों आश्चर्य गा हरी ॥ धृ० ॥ जाला भक्तीचा कळस । आले वसतीसी दोष ॥ १ ॥ जागरणाचें फळ । दिली जोडोनी तळमळ ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । आहाच काळीं आली सेवा ॥ ३ ॥

॥ २२२३ ॥ नाहीं जों वेंचलों जिवाचिया त्यागें । तोंवरी वाउगें काय बोलों ॥ धृ० ॥ जाणिवलें आतां करीं ये उद्देश । जोडी किंवा नाश तुमची जीवें ॥ १ ॥ ठायींचेंचि आलें होतें ऐसें मना । जावें ऐसें वना दृढ जालें ॥ २ ॥ तुका ह्मणे मग वेचीन उत्तरें । उद्देशिलें खरें जाल्यावरी ॥ ३ ॥

॥ २२२४ ॥ करूं कवित्व काय नाहीं आतां लाज । मज भक्तराज हांसतील ॥ धृ० ॥ आतां आला एका निवाड्याचा दिस । सत्यविण रस विसरला ॥ १ ॥ अनुभवाविण कोण करी पाप । रितेंचि संकल्प लाजलावे ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥ ३ ॥

॥ २२२५ ॥ नाहीं आइकत तुह्मी माझे बोल । कासया हें फोल उपणूं भूस ॥ धृ० ॥ येसी तें करीन बैसालिया ठाया । तूंचि बुझावया जवळी देवा ॥ १ ॥ करावे ते केले सकळ उपाय । आतां पाहों काय अझुनी वास ॥ २ ॥ तुका ह्मणे आला आज्ञेसी शेवट । होऊनियां नीट पायां पडों ॥ ३ ॥

॥ २२२६ ॥ नव्हे तुह्मां सरी । येवढें कारण मुरारी ॥ धृ० ॥ मग जैसा तैसा काळ । दाट सारावा पातळ ॥ १ ॥ स्वामीचें तें सांडें । पुत्र होतां काळतोंडें ॥ २ ॥ शब्दा नाहीं रुची । मग कोठें तुका वेची ॥ ३ ॥

॥ २२२७ ॥ केल्या पुरती आळी । कांहीं होत्ये टाळाटाळी ॥ धृ० ॥ सत्यसंकल्पाचें फळ । होतां न दिसेचि बळ ॥ १ ॥ दळणाच्या ओंव्या । रित्या खरें मापें घ्याव्या ॥ २ ॥ जातीं उखळें चाटू । तुका ह्मणे राज्य घाटूं ॥ ३ ॥

॥ २२२८ ॥ आतां नेम जाला । याच कळसीं विठ्ठला ॥ धृ० ॥ हातीं न धरीं लेखणी काय भुसकट ते वाणी ॥ १ ॥ जाणें तेणें काळ । उरला सारीन सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे घाटी । चाटू कोरडा शेवटीं ॥ ३ ॥

॥ २२२९ ॥ पावावे संतोष । तुह्मी यासाठीं सायास ॥ धृ० ॥ करीं आवडी वचनें पालटूनि क्षणक्षणें ॥ १ ॥ द्यावें अभय दान । भूमी न पडावें वचन ॥ २ ॥ तुका ह्मणे परस्परें । कांहीं वाढवीं उत्तरें ॥ ३ ॥

॥ २२३० ॥ बोलतां वचन असा पाठमोरे । मज भाव बरे कळों आले ॥ धृ० ॥ मागितलें नये अरुचीनें हाता । नाहीं वरी सत्ता आदराची ॥ १ ॥ समाधानासाठीं लाविलासे कान । चोरलें तें मन दिसतसा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां तुमचेचि फंद । वरदळ छंद कळों येती ॥ ३ ॥

॥ २२३१ ॥ कशासाठीं बैसों करूनियां हाट । वाउगा बोभाट डांगोरा हा ॥ धृ० ॥ काय आलें एका जिवाच्या उद्धारें । पावशी उच्चारें काय हो तें ॥ १ ॥ नेदी पट परी अन्नें तों न मारी । आपुलिये थोरीसाठीं राजा ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां अव्हेरिलें तरी । मग कोण करी दुकान हा ॥ ३ ॥

॥ २२३२ ॥ माझा मज नाहीं । आला उबग तो कांहीं ॥ धृ० ॥ तुमच्या नामाची जतन । नव्हतां थोर वाटे सीण ॥ १ ॥ न पडावी निंदा । कानीं स्वामीची गोविंदा ॥ २ ॥ तुका ह्मणे लाज । आह्मां स्वामीचें तें काज ॥ ३ ॥

॥ २२३३ ॥ कांहीं मागणें हें आह्मां अनुचित । वडिलांची रीत जाणतसों ॥ धृ० ॥ देह तुच्छ जालें सकळ उपाधी । सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे ॥ १ ॥ शब्द तो उपाधि अचळ निश्चय । अनुभव हा काय नाहीं अंगीं ॥ २ ॥ तुका ह्मणे देह फांकिला विभागीं । उपकार अंगीं उरविला ॥ ३ ॥

॥ २२३४ ॥ मागितल्यास कर पसरी । पळतां भरी वाखती ॥ धृ० ॥ काय आह्मी नेणों वर्म । केला श्रम नेणतां ॥ १ ॥ बोलतां बरें येतां रागा । कठीण लागा मागेंमागें ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें बोली । असे चाली उफराटी ॥ ३ ॥

॥ २२३५ ॥ असो तुझें तुजपाशीं । आह्मां त्यासी काय चाड ॥ धृ० ॥ निरोधें कां कोंडूं मन । समाधानें असोनी ॥ १ ॥ करावा तो उरे आट । खटपट वाढतसे ॥ २ ॥ तुका ह्मणे येउनि रागा । कां मी भागा मुकेन ॥ ३ ॥

॥ २२३६ ॥ आहे तेंचि पुढें पाहों । बरें आहों येथेंचि ॥ धृ० ॥ काय वाढवूनि काम । उगाच श्रम तृष्णेचा ॥ १ ॥ स्थिरावतां ओघीं बरें । चाली पुरें पडेना ॥ २ ॥ तुका ह्मणे वळितां मन । आह्मां क्षण न लगे ॥ ३ ॥

॥ २२३७ ॥ सांगा दास नव्हें तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारुनी ॥ धृ० ॥ कोणासाठीं केली प्रपंचाची होळी । या पायां वेगळी मायबापा ॥ १ ॥ नसेल तो खावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटे ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं दुजें कांहीं ॥ ३ ॥

॥ २२३८ ॥ अनन्यासी ठाव एक सर्वकाजे । एकाविण दुजें नेणें चित्त ॥ धृ० ॥ न पुरतां आली देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ॥ १ ॥ लेंकराचा भार माउलीचे शिरीं । निढळ तें दुरी धरिलिया ॥ २ ॥ तुका ह्मणे किती घातली लांबणी । समर्थ होउनी केवळ्यासाठीं ॥ ३ ॥

॥ २२३९ ॥ स्तुति तरि करूं काय कोणापाशीं । कीर्ति तरि कैसी वाखाणावी ॥ ॥ धृ० ॥ खोट्या तव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो भ्रम वरि बरा ॥ १ ॥ ह्मणवावें त्याची खूण नाहीं हातीं । अवकळा फजिती सावकाशें ॥ २ ॥ तुका ह्मणे हेंगे तुमचें माझें तोंड । होउनीया लंड आळवितों ॥ ३ ॥

॥ २२४० ॥ कांहींच न लगे आदि अवसान । बहुत कठीण दिसतसां ॥ धृ० ॥ अवघ्याच माझ्या वेचविल्या शक्ती । न चलेसी युक्ति जाली पुढें ॥ १ ॥ बोलिलें वचन हारपलें नभीं । उतरलों तों उभीं आहों तैसीं ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं न करावेंसें जालें । थकितचि ठेलें चित्त उगें ॥ ३ ॥

॥ २२४१ ॥ रूपें गोविलें चित्त । पायीं राहिलें निश्चित ॥ धृ० ॥ तुह्मी देवा अवघेचि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥ धृ० ॥ जाली इंद्रिया विश्रांती । भ्रमतां पीडत ते होती ॥ २ ॥ तुका ह्मणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥ ३ ॥

इकडे पुण्यांत नागनाथ नामें एक जागृत दैवत होतें त्याजवर रामेश्वरभट्टाचा भाव असे. तो त्या देवाच्या दर्शनाकरितां गेला. तेथें एक अनगड नामें अवलिया फकीर आपल्या बागांत रहात होता. रामेश्वरभट्ट त्या बागांतील विहिरींत स्नानास गेला. स्नान करतांच त्याच्या अंगाचा दाहा होऊं लागला. तेव्हां तेथील फकिरानें कांहीं प्रयोग केला असें कोणी म्हणूं लागले, व तुकारामाचें कवित्व द्वेषानें बुडविलें त्याचा परिणाम हा झाला असेंही कोणी म्हणूं लागले. रामेश्वरभट्टाच्या अंगाचा दाहा शमेना तेव्हां तो अलकापुरीस (अळंदीस) गेला व ज्ञानदेवाची आराधना करूं लागला.

तुकारामानें मागें लिहिल्याप्रमाणें दगडावर शयन केलें. वह्या बुडवून तेरा दिवस लोटल्यावर चवदाव्या दिवशीं सकाळीं त्या डोहांतून बाहेर निघल्या व पाण्यावर तरूं लागल्या व त्या लोकांच्या दृष्टीस पडतांच त्यांनीं त्या बाहेर काढल्या व तुकारामास देवळांत येऊन तें वर्तमान कळविलें असें महीपति म्हणतो. त्यावरून आपण देवास कष्ट दिलेसे वाटून त्यानें पश्चात्तापप्रदर्शक असे सात अभंग केले तेः—

॥ २२४२ ॥ थोर अन्याय केला तुझा अंत म्यां पाहिला । जनाचिया बोलासाठीं चित्त क्षोभविलें ॥ धृ० ॥ भागविलासी केला सीण अधम मी यातिहीन । झांकुनी लोचन दिवस तेरा राहिलों ॥ १ ॥ अवघें घालूनियां कोडें तानभुकेचें सांकडें । योगक्षेम

पुढें तुज करणें लागेल ॥ २ ॥ उदकीं राखिले कागद चुकविला जनवाद । तुका ह्मणे ब्रीद साच केलें आपुलें ॥ ३ ॥

॥ २२४३ ॥ तूं कृपाळु माउली आह्मा दीनांची साउली । न सरित आली बाळवेसीं जवळी ॥ धृ० ॥ माझें केलें समाधान रूप गोजिरें सगुण । निवविलें मन आलिंगन देउनी ॥ १ ॥ कृपा केली जना हातीं पायीं ठाव दिला संतीं । कळों नये चित्तीं दुःख कैसें आहे तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मी अन्यायी क्षमा करीं वो माझे आई । आतां पुढें काई घालूं सांकडें ॥ ३ ॥

॥ २२४४ ॥ कापो कोणीं माझी मान सुखें पीडोत दुर्जन । तुज होय शीण तें मी न करीं सर्वथा ॥ धृ० ॥ चुकी जाली एकवेळा मजपासुनी चांडाळा । उभें करोनियां जळा माजी वह्या राखील्या ॥ १ ॥ नाहीं केला हा विचार माझा कोण अधिकार । समर्थासी भार न कळे कैसा घालावा ॥ २ ॥ गेलें होऊनियां मागें नये बोलों तें वाउगें । पुढिलिया प्रसंगें तुका ह्मणे जाणावें ॥ ३ ॥

॥ २२४५ ॥ काय जाणें मी पामर पांडुरंगा तुझा पार । धरिलिया धीर काय एक न करिसी ॥ धृ० ॥ उतावीळ जालों आधीं मतिमंद हीनबुद्धि । परि तूं कृपानिधि नाहीं केला अव्हेर ॥ १ ॥ तूं देवांचा ही देव अवघ्या ब्रह्मांडाचा जीव । आह्मां दासा कींव कां भाकणें लागली ॥ २ ॥ तुका ह्मणे विश्वंभरा मी तों पतितचि खरा । अन्याय दुसरा धरीं धरणें बैसलों ॥ ३ ॥

॥ २२४६ ॥ नव्हती आली सीसा सुरी अथवा घाय पाठीवरी । तो म्यां केला हरि एवढा तुह्मां आकांत ॥ धृ० ॥ वांटिलासी दोहीं ठायीं मजपाशीं आणि डोहीं । लागों दिला नाहीं येथें तेथें आघात ॥ १ ॥ जीव घेती मायबापें थोड्या अन्यायाच्या कोपें । हें तों नव्हे सोपें साहों तोंचि जाणीतलें ॥ २ ॥ तुका ह्मणे कृपावंता तुज ऐसा नाहीं दाता । काय वाणूं आतां वाणी माझी कुंठली ॥ ३ ॥

॥ २२४७ ॥ तूं माउलीहून मायाळ चंद्राहूनि शीतळ । पाणियाहूनि पातळ कल्लोळ प्रेमाचा ॥ ॥ धृ० ॥ देऊं काशाची उपमा दुजी तुज पुरुषोत्तमा । ओंवाळुनी नामा तुझ्या वरुनि टाकिलों ॥ १ ॥ तुवां केलें रे अमृता गोड त्या ही तूं परता । पांचा तत्त्वांचा जनिता सकळ सत्तानायका ॥ २ ॥ कांहीं न बोलोनि आतां उगाच चरणीं ठेवितों माथा । तुका ह्मणे पंढरिनाथा क्षमा करीं अपराध ॥ ३ ॥

॥ २२४८ ॥ मी अवगुणी अन्यायी किती ह्मणोन सांगों काई । आतां मज पायीं ठाव देई विठ्ठले ॥ धृ० ॥ पुरे पुरे हा संसार कर्म बळिवंत दुस्तर । राहों नेदी स्थिर एके ठायीं निश्चळ ॥ १ ॥ अनेक बुद्धीचे तरंग क्षणक्षणां पालटती रंग । धरूं जातां संग तंव तो होतो बाधक ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां अवघी तोडी माझी चिंता । येऊनि पंढरिनाथा वास करीं ह्रदयीं ॥ ३ ॥

तुकारामाच्या अभंगांच्या वह्या पाण्यांतून निघाल्याची वार्ता चोहोंकडे पसरली.

रामेश्वरभट्ट अळंदीस असतां त्यास तूं देहूस तुकारामाला शरण जा असा दृष्टांत झाला व तितक्यांत वह्या पाण्यांतून वर आल्याची वार्ताही त्याच्या कानीं आली. तेणें करून तुकारामाशीं द्वेश केल्याचा त्यास मोठा पश्चात्ताप झाला. नंतर त्यानं तुकारामाच्या स्तुतीचा एक अभंग लिहून विद्यार्थ्यांच्या हातीं तो तुकारामाकडे पाठविला. तुकारामानें तो वाचून त्यावर उत्तररूपानें एक अभंग लिहून दिला तोः—

॥ २७५१ ॥ चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे न खाती सर्प तया ॥ धृ० ॥ विष तें अमृत अघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ १ ॥ दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ २ ॥ आवडेल जीवां जीवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपा केली नारायणें । जाणिजे तें येणें अनुभवें ॥ ४ ॥

हा अभंग वाचतांच रामेश्वराच्या शरीराचा दाह शांत झाला असें ह्मणतात. नंतर रामेश्वर स्वतः तुकारामास भेटावयास आला, तेव्हां अळंदीच्या वाटेवरच तुकारामाची व रामेश्वराची गांठ पडल्यानंतर रामेश्वरानें तुकारामाची फार स्तुति केली व तुकारामानें मोठ्या नम्रतेनें त्याशीं भाषण केलें. त्यापुढें रामेश्वर निरंतर तुकारामाजवळच भक्तीनें भजनपूजन करीत राहिला असें ह्मणतात. रामेश्वरभट्ट भेटल्यावर तुकाराम अळंदीस जाऊन पुनः देहूस परत आला.

रामेश्वरभट्टाच्या आंगाचा दाह तुकारामाच्या अभंगानें शांत झाल्याचें वर्तमान अनघड फकिरास समजल्यावर त्यास चमत्कार वाटून तो देहूस तुकारामाच्या दर्शनास्तव आला व तुकारामाची भेट होऊन त्यास मोठा संतोष झाला.

यानंतर एके दिवशीं एक स्त्री तुकारामापासून विषयसुख प्राप्त व्हावें या बुद्धीनें त्यास एकटा पाहून त्याजवळ गेली. तीस मातोश्री असें ह्मणून फार सदुपदेश करून तुकारामानें परतून लाविलें.

॥ ५२३ ॥ स्त्रियांचा तो संग नको नारायणा । काष्ठा या पाषाणामृत्तिकेच्या ॥ धृ० ॥ नाठवे हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरे ना ॥ १ ॥ दृष्टिमुखें मरण इंद्रियाच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ २ ॥ तुका ह्मणे जरी अग्नि जाला साधू । परी पावे बाधू संघट्टणें ॥ ३ ॥

॥ ५२४ ॥ पराविया नारी रखुमाई समान । हें गेलें नेमून ठायींचेंची ॥ धृ० ॥ जाईं वो तूं माते न करीं सायास । आह्मी विष्णुदास नव्हों तैसे ॥ १ ॥ न साहवे मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ २ ॥ तुका ह्मणे तुज पाहिजे भ्रतार । तरी काय नर थोडे जाले ॥ ३ ॥

यानंतर पुनः तुकारामास एकवेळ लोहगांवचें बोलावणें आलें त्यावरून तो पुनः तेथें गेला. त्याजबरोबर नेहमी त्याचा भाऊ कान्होबा, रामेश्वरभट्ट, गंगाजी मवाळ व संताजी तेली हे सर्वत्र असत व दुसरेही कितीएक लोक असत. भजनास सर्व मागें उभे राहून ध्रुपद धरीत असत. लोहगांवीं गेल्यावर भजनाची व कथेची माळ लागली. तेथें शिवाजी कासार या नामें एक रहवासी होता तो मोठा कृपण असून तुकारामाची निंदा करीत असे; परंतु कांहीं काळानें तोही तुकारामाचा खरा भाव पाहून त्याचा मोठा भाविक भक्त झाला. तो संसार सोडून अक्षय तुकारामाच्या संगतीस राहूं लागला. तेव्हां अर्थात त्याची बायको नवऱ्यास संसारांतून काढल्या-मुळें तुकारामाचा द्वेष फार करूं लागली. तिनें एका प्रसंगीं तुकारामास आपल्या घरीं बोलावून आणून कपटानें फसवून त्याच्या अंगावर इतकें कढत पाणी ओतलें कीं, तेणेंकरून तुकारामाचें अंग भाजलें. त्या वेळेस त्यानें विठोबाचा धांवा केला तो अभंगः—

॥ ३३१८ ॥ जळे माझी काया लागला वोणवा । धांव रे केशवा मायबापा ॥ धृ० ॥ पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन झालें ॥ १ ॥ फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहातोसी काय हृदय माझें ॥ २ ॥ घेऊनि जिवन धांवें लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी तूं होसी जननी । आणीक निर्वाणीं कोण राखे ॥ ४ ॥

पुढें कांहीं काळानें तीही तुकारामास फार मानूं लागली.

तुकारामाच्या साधुत्वाची ख्याति दिवसानुदिवस जास्तच वाढत चालली. त्यांतही अभंगांच्या वह्या पाण्यांतून कोरड्या निघाल्या व रामेश्वरभट्टाच्या अंगाचा दाह शमला इत्यादि गोष्टी ऐकून दूरदूरच्या लोकांसही मोठा अचंबा वाटला. त्या गोष्टी त्या काळचा मोठा धर्माभिमानी जो शिवाजी राजा त्याच्या कानीं गेल्या. त्यावरून तुकारामास आपल्यापाशीं बोलावून आणावें ह्मणून त्यानें कारकून, घोडे, अबदागिरी वगैरे मोठा लवाजमा देहूस पाठविला. तुकारामानें तो पाहून आह्मां भगवंताच्या दासास यांचें कांहींच कारण नाहीं; यास्तव तुह्मीं आपला सरमजाम घेऊन आलां तसेच माघारे जा, असें कारकुनांस सांगितलें; त्याजबरोबर शिवाजीस व त्याच्या अष्टप्रधानांस उपदेशपर असे ७ अभंग लिहून पत्राच्या उत्तररूपानें दिले तेः—

॥ १८८५ ॥ दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ धृ० ॥ आतां येथें पंढरि-

राया । मज गोंविसी कासया ॥ १ ॥ मान दंभ चेष्टा । हे तों सूकराची विष्टा ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । माझे सोडवणें धांवा ॥ २ ॥

॥ १८८५ ॥ नावडे जें चित्ता तेंचि होसी पुरविता ॥ धृ० ॥ कां रे पुरविली पाठी । माझी केली जीवेसाटीं ॥ १ ॥ न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ २ ॥ सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥ जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥ तुका ह्मणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ५ ॥

॥ १८८६ ॥ विरंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना शुक्ती ॥ धृ० ॥ शुक्तीचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेंसी ॥ १ ॥ ऐसा तुझा प्रेमा कळे कांहीं एक । पाहूनियां लेख पत्रिकांचे ॥ २ ॥ शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्र-पति सूत्र विश्वाचें की ॥ ३ ॥ व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनि मोकळा जालासी तूं ॥ ४ ॥ हेत हा लागला आमुचीये भेटी । पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ५ ॥ याचें हें उत्तर ऐका गा भूपती । लिहिली विनंति हेताची हे ॥ ६ ॥ अरण्यवासी आह्मी फिरों उदासीन । वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळा-हारी ॥ ८ ॥ रोडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ ९ ॥ तुका ह्मणे माझी विनंति सलगीची । वार्ता हे भेटींची करूं नका ॥ १० ॥

॥ १८८७ ॥ ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे । हे त्या करुणा आहे हृदयस्थाची ॥ धृ० ॥ नहो कींविलवाणें नाहीं आह्मी दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ १ ॥ पांडुरंग आह्मा पाळिता पोसिता । आणिकांची कथा काय तेथें ॥ २ ॥ तुह्मी भेट घेणें काय हें मागणें । आशेचें हें शून्य केलें आह्मीं ॥ ३ ॥ निराशेचा गांव दिधला आह्मांसी । प्रवृत्तिभागासी सांडियेलें ॥ ४ ॥ पतिव्रतेचें हें मन पति भेटो । तैसे आह्मी विठोमाजी नांदों ॥ ५ ॥ तुज ही विठ्ठल ऐसेचि विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझें ही तयामाजी ॥ ६ ॥ तुज ही विठ्ठल ऐसेचि वाटलें । परि एक आलें आडवें हें ॥ ७ ॥ सद्गुरुश्रीरामदासाचें भूषण । तेथें घालीं मन चळों नको ॥ ८ ॥ बहुतां ठाईं वृत्ति चावळली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥ ९ ॥ तुका ह्मणे बापा चातुर्यसागरा । भक्तिभाव तारा भाविकांसी ॥ १० ॥

॥ १८८८ ॥ तुह्मांपाशीं आह्मीं येऊनियां काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥ धृ० ॥ मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासी हे थार चिंध्या बिदी ॥ १ ॥ निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ २ ॥ तेथें काय करणें कवणाची आस । वांया होय नाश आयुष्याचा ॥ ३ ॥ राजगृहा यावें मानाचिये आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥ रायाचिये घरीं भाग्यवंता मान । इतरा सामान्या मान नाहीं ॥ ५ ॥ देखो-नियां वस्त्रें भूषणाचें जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ६ ॥ ऐकोनियां मानाल उल्लसला जरी । तरी आह्मां हरि उपेक्षीना ॥ ७ ॥ आतां हेंचि तुह्मां सांगणें कौतुक । भिक्षे ऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥ तपव्रतयाग महा भले जन । आशाबद्ध हीन वर्त्तताती ॥ ९ ॥ तुका ह्मणे तुह्मीं श्रीमंत मानाचे । पूर्वींच देवांचे हरिभक्त ॥ १० ॥

॥ १८८९ ॥ आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये

॥ धृ० ॥ जेणें योगें तुह्मां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ १ ॥ निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ति चित्तीं आणूं नका ॥ २ ॥ परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनियां ॥ ३ ॥ सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ४ ॥ हेंचि ऐकोनियां चित्त समाधान । आणीक दर्शन चाड नाहीं ॥ ५ ॥ घेऊनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥ एक दोनी कर्में जाणोनियां वर्में । आपुलीया भ्रमें राहूं आतां ॥ ७ ॥ कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वां भूतीं देख एक आत्मा ॥ ८ ॥ आत्मारामीं मन ठेवूनियां राहें । रामदासीं पाहें आपणेयां ॥ ९ ॥ तुका ह्मणे राया धन्य जन्म क्षिती । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥ १० ॥

॥ १८९० ॥ आतां हे विनवणी प्रधान अष्टक । प्रभूसी विवेक समजावा ॥ धृ० ॥ प्रतिनिधि मानरक्षक चतुर । सात्विकाचें घर तुह्मांपाशीं ॥ १ ॥ मजुमुचें धणी लेखणकारक । पत्रांचा विवेक समजावा ॥ २ ॥ पेशवे सुरनिस चिटणिस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापती ॥ ३ ॥ भूषण पंडितराय विद्याधन । वैद्यराजा नमन माझें असे ॥ ४ ॥ पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनी । विवंचोनि श्रवणीं घाला तया ॥ ५ ॥ सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥ यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वांयां जाऊं नेदा ॥ ७ ॥ भिडेसाठीं बोला गाळूनि अर्थातें । अनर्थकारी तुमतें होईल तेणें ॥ ८ ॥ तुका ह्मणे तुह्मां नमन अधिकाऱ्या । सांगणें तें राया पत्र माझें ॥ ९ ॥

कारकून हें उत्तर घेऊन परत गेल्यावर शिवाजी राजास तुकारामाची इतकी निस्पृहता पाहून विशेषच चमत्कार वाटला आणि तो स्वतः त्याच्या दर्शनास जाण्यास सिद्ध झाला. बरोबर कांहीं प्रमुख प्रमुख लोक घेतले व नजराण्याकरितां पुष्कळ जड जवाहिर घेतलें. लोहगांवीं आल्यावर तुकारामास प्रणत होऊन जवाहिरानें भरलेलें तबक त्याच्या पुढें ठेविलें. तें पाहून तुकारामानें त्याचा मनापासून अतिशय तिरस्कार केला. त्या प्रसंगीचे अभंगः—

॥ १८९१ ॥ जाणोनि अंतर । टाळिसील करकर ॥ धृ० ॥ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ १ ॥ उठविसी दारीं । धरणें एखादिया परी ॥ २ ॥ तुका ह्मणे पाये । कैसे सोडीन ते पाहे ॥ ३ ॥

॥ १८९२ ॥ नाहीं विचारीत । मेघ हागणदारी सेत ॥ धृ० ॥ नये पाहों त्याचा अंत । ठेवीं कारणापें चित्त ॥ १ ॥ वर्जीत गंगा । नाहीं उत्तम अधम जगा ॥ २ ॥ तुका ह्मणे मळ । नाहीं अग्नीसी विटाळ ॥ ३ ॥

॥ १८९३ ॥ काय दिला ठेवा । आह्मां विठ्ठलचि व्हावा ॥ धृ० ॥ तुह्मी कळलेती उदार । साटीं परिसाची गार ॥ १ ॥ जीव दिला तरी । वचना माझ्या नये सरी ॥ २ ॥ तुका ह्मणे धन । आह्मां गोमासा समान ॥ ३ ॥

॥ १८९४ ॥ पिकवावें धन । ज्याची आस करी जन ॥ धृ० ॥ पुढें उरे खातां देतां ।

नव्हे खंडण मवितां ॥ १ ॥ खोलीं पडे ओलीं बीज । तरीच हातीं लागे निज ॥ २ ॥ तुका ह्मणे धनी । विठ्ठल अक्षरें हीं तिन्ही ॥ ३ ॥

॥ १८९५ ॥ मुंगी आणि राव । आह्मां सारखाची जीव ॥ धृ० ॥ गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ १ ॥ सोनें आणि माती । आह्मां समान हे चित्तीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आलें । घरा वैकुंठ सगळें ॥ ३ ॥

॥ १८९६ ॥ तिहीं त्रिभुवनीं । आह्मी वैभवाचे धनी ॥ धृ० ॥ हाता आलें घाव डाव । आमचा मायबाप देव ॥ १ ॥ काय त्रिभुवनीं बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे सत्ता । अवघी आमुचीच आतां ॥ ३ ॥

॥ १८९७ ॥ आह्मी तेणें सुखी । ह्मणा विठ्ठल विठ्ठल मुखी ॥ धृ० ॥ तुमचे येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ १ ॥ कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ २ ॥ ह्मणवा हरीचे दास । तुका ह्मणे मज हे आस ॥ ३ ॥

तुकारामानें शिवाजीस सांगितलें कीं, तुह्मी भगवद्भक्ति केली म्हणजे तोच आम्हांस नजराणा आहे. शिवाजीस ही निष्काम व निर्लोभ वृत्ति पाहून मोठाच अचंबा वाटला. त्यानें नजराण्याकरितां आणिलेलें सर्व द्रव्य तेथें ब्राह्मणांस वाटून टाकलें. लोहगांवीं तुकारामाचा भजन, पूजन, कीर्तन, नामस्मरण इत्यादि गोष्टींत कालक्षेप होत आहे असें पाहून शिवाजीस राज्यभोगादि विषय तुच्छसे वाटूं लागले. आणि दुसऱ्याच दिवसापासून मोठ्या सकाळीं वनांत एकांतीं जाऊन बसावें व संध्याकाळीं तुकारामाच्या कथेस येऊन बसावें असा क्रम त्यानें सुरू केला. प्रधानादिकांस परत जाऊन राज्यकारभार चालविण्यास सांगितलें. त्यांनीं तें वर्तमान शिवाजीची मातोश्री जिजाबाई यांस साद्यंत लिहून पाठविलें, त्यावरून तीस वाईट वाटून ती ताबडतोब तुकारामाजवळ स्वतः निघून गेली. आपला एकुलताएक पुत्र व तोही पुढें अपुत्रिक असतां राज्य टाकून विदेही झाला तर आतां राज्य कसें चालावें, असें बोलून शिवाजीस तुह्मी योग्य उपदेश करून पुनः संसारांत घाला ह्मणून जिजाबाईनें तुकारामाची मोठ्या नम्रतेनें व दीनवाणीनें प्रार्थना केली. तुकारामानें तीस आश्वासन दिलें कीं, शिवाजी रात्रीं कीर्तनास येईल त्यावेळीं त्यास दोन गोष्टी सांगूं, तुह्मी कांहीं काळजी न करितां देवाचें नांव घेत बसा. रात्रीं कीर्तनास आरंभ होतांच शिवाजी राजा तेथें आला. तुकारामानें तो समय साधून प्रथमतः कर्मकांडाचें निरूपण आरंभिलें. त्यांत त्यानें असें सांगितलें कीं, जो ज्याचा स्वधर्म तोच त्यानें आचरला पाहिजे; त्यावांचून त्यास दुसरा तरणोपाय नाहीं, दुसऱ्याचा धर्म चांगला दिसतो ह्मणून तो आपण केल्यास तो आपणास तरणोपाय होत नाहीं, असा शास्त्रांत

निर्णय केला आहे. त्यानंतर त्यानें ब्राह्मण क्षत्रियादि चारी वर्णांचीं व चारी आश्रमांचीं कर्में सांगितलीं व त्यांत विशेषतः क्षत्रिय धर्माचें विशेष स्पष्टीकरण करून त्यांत प्रजापालन करणें हाच त्याचा मुख्य धर्म व यापासूनच त्यास परमार्थसाधन होतें असें श्रोत्यांच्या व विशेषतः शिवाजीच्या मनांत पूर्णपणें बिंबवून दिलें. यावरून पुनः राज्यकारभार करण्याविषयीं शिवाजीचा निश्चय झाला. त्यानंतर आणखी चार दिवस तेथें राहून तुकारामाचा प्रसाद व आशीर्वाद घेऊन तो मातोश्रीसहवर्तमान आपल्या राजधानीस परत गेला.

याच समयास नावजी माळी ह्मणून कुणबी व कोंडभट पुराणिक ह्मणून एक ब्राह्मण हे तुकारामाचे निःसीम अनुयायी झाले. रामेश्वरभट्ट व कोंडभट हे दोघेही चांगले ज्ञाते होते असें महीपति ह्मणतो. यांसुद्धां एकंदर चौदा असामी त्याचे ठरलेले अनुयायी होते. जेथें जेथें तुकाराम जाई तेथें तेथें हे लोक त्याजमागें जात.

तुकाराम चार महिने लोहगांवास राहून नंतर पुनः देहूस परत आला. यानंतर तुकारामाच्या हातून दरिद्र्यास चमत्कारिक रीतीनें लक्ष्मी प्राप्त होणें, मुक्यास वाचा फुटणें, एका मनुष्याचें अन्न हजारों जणांस पुरणें, इत्यादि अनेक अद्भुत चमत्कार घडल्याविषयीं महीपतीनें पुष्कळ लिहिलें आहे.

आषाढी व कार्तिकी या एकादशांस तुकाराम वारकऱ्यांच्या मोठ्या मेळ्यासहवर्तमान पंढरीच्या वारीस नेमानें जात असे. परंतु एके समयीं त्या सुमारास असें झालें कीं, तो आजारी होऊन पडला, त्यामुळें वारीस जाण्यास सामर्थ्य उरलें नाहीं. तेव्हां चोहोंकडून पंढरीस जाण्याकरितां देहू मुक्कामीं सुमारें चौदाशें वारकरी पताका घेऊन आले होते त्यांजबरोबर तुकारामानें छत्तीस अभंगांचें एक पत्र लिहून पाठविलें. त्यांत आपण आजारी असून येण्यास असमर्थ असल्याचा व आपणावर विठोबानें करुणा करावी अशा प्रकारचा मजकूर लिहिला ते अभंगः—

॥ १९०९ ॥ कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात । चाल तुज पंढरिनाथ बोलावितो ॥ धृ०॥ मग मी न धरीं आस मागील बोभाट । वेगीं धरिन वाट माहेराची ॥ १ ॥ निरांजलें चित्त करितें तळमळ । केधवां देखती मूळ आलें डोळे ॥ २ ॥ तुका ह्मणे कई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥ ३ ॥

॥ १९१० ॥ कां माझा विसर पडिला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥ धृ०॥ कैसा कंठूनिया राहों संवसार । काय एक धीर देऊं मना ॥ १ ॥ नाहीं निरोपाची पावलीं वारता । करावी ते चिंता ऐसी कांहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे एक वेचूनि वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥ ३ ॥

॥ १९११ ॥ कांहीं माझें कळों आले गुणदोष । ह्मणऊनि उदास धरिलें ऐसें ॥ धृ० ॥ नाहीं तरी येथें न घडे अनुचित । नाहीं ऐसी रीत तया घरीं ॥ १ ॥ कळावें तें मना आपुलीया सवें । ठायींचें हें घ्यावें विचारुनी ॥ २ ॥ तुका ह्मणे मज अव्हेरिलें देवें । माझिया कर्त्तव्यें बुद्धीचिया ॥ ३ ॥

॥ १९१२ ॥ नव्हे धीर कांहीं पाठवूं निरोप । आला तरीं कोप येऊ सुखें ॥ धृ० ॥ कोपोनिया तरी देईल उत्तर । जैसें तैसें पर फिरावुनी ॥ १ ॥ नाहीं तया तरी काय एक पोर । मज तों माहेर आणिक नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे असे तयामध्यें हित । आपण निवांत असों नये ॥ ३ ॥

॥ १९१३ ॥ आतां पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥ धृ० ॥ काय करूं आतां नगमेसें जालें । बहुत सोसिलें बहु दिस ॥ १ ॥ घर लागे पाठी चिन्ता उभे वारे । आपुलें तें झुरे पाहवया ॥ २ ॥ तुका ह्मणे जीव गेला तरी जाव । धरिला तो देव भाव सिद्धी ॥ ३ ॥

॥ १९१४ ॥ विनवीजे ऐसें भाग्य नाहीं देवा । पायांशीं केशवा सलगी केली ॥ धृ० ॥ धीटपणें पत्र लिहिलें आवडी । पार नेणें थोडी मति माझी ॥ १ ॥ जेथें देवा तुझा न कळेचि पार । तेथें मी पामर काय वाणूं ॥ २ ॥ जैसे तैसे माझे बोल अंगीकारीं । बोबड्या उत्तरीं गौरवितों ॥ ३ ॥ तुका ह्मणे विटेवरि जीं पाउलें । तेथें म्यां ठेविलें मस्तक हें ॥ ४ ॥

॥ १९१५ ॥ देवांच्या ही देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याती त्रिभुवनीं ॥ धृ० ॥ पातकांच्या रासी नासितोसी नामें । जळतील कर्मे महादोष ॥ १ ॥ सर्व सुखें तुझ्या वोळगती पायीं । ऋद्धि सिद्धि ठायीं मुक्ति चारी ॥ २ ॥ इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीत गातां छंद वातां टाळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जड जीव शक्तिहीन । त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १९१६ ॥ काय जालें नेणों माझिया कपाळा । न देखिजे डोळा मूळ येता ॥ धृ० ॥ बहु दिस पाहें वचनाची वास । धरिलें उदास पांडुरंगा ॥ १ ॥ नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसें तों निष्ठुर न पाहिजे ॥ २ ॥ पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहूनि गोविंदा जरूरसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें वेचाचें सांकडें । देणें घेणें पुढें तों ही धाक ॥ ४ ॥

॥ १९१७ ॥ एवढा संकोच तरि कां व्यालासी । आह्मी कोणापाशीं तोंड वासूं ॥ धृ० ॥ कोण मज पुसे सिणलें भागलें । जरी मोकलिलें तुह्मी देवा ॥ १ ॥ कवणाची वाट पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जीवलग ॥ २ ॥ कोण जाणे माझें जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी देखिली निश्चिती । काय माझे चित्तीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १९१८ ॥ देई डोळां भेटी न धरीं संकोच । न घालीं कांहीं वेच तुजवरी ॥ धृ० ॥ तुज कुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेता थोडें ॥ १ ॥ फार थोडें कांहीं करूनि

पातळ । त्याजमध्यें काळ कडे लावूं ॥ २ ॥ आहे माझी तेचि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मा लेंकराची जाती । भेटावया खंती वाटतसे ॥ ४ ॥

॥ १९१९ ॥ सीण भाग हरे तर्थीच्या निरोपें । देखिलिया रूप उरी नुरे ॥ धृ० ॥ इंद्रियांची धांव होईल कुंठित । पाविल हें चित्त समाधान ॥ १ ॥ माहेर आहेसें लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥ २ ॥ आस नाहीं परी उरी बरी वाटे । आपलें तें भेटे आपणासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी अविट आवडी । खंडन तांतडी होऊं नेदीं ॥ ४ ॥

॥ १९२० ॥ धरितों वासना परी नये फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥ धृ० ॥ तळमळी चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीचिया ॥ १ ॥ प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥ २ ॥ जातों तळा येतों मागुताला वरी । वोळशाचे फेरी सांपडलों ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु करितों विचार । उत्तरें डोंगर एक चढे ॥ ४ ॥

॥ १९२१ ॥ कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हें न कळे पाप यांचें ॥ धृ० ॥ पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥ १ ॥ कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेम कां हस्तक न पावती ॥ २ ॥ कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होइना जिव्हा कीर्ती ॥ ३ ॥ तुका ह्मणे कई जाऊनि मोटकें । पडेन हा लोळें महाद्वारीं ॥ ४ ॥

॥ १९२२ ॥ काय पोरें जालीं फार । किंवा न साहे करकर ॥ धृ० ॥ ह्मणऊनि केली सांडी । घांस घेऊं न व्हां तोंडीं ॥ १ ॥ करूं कळागती । तुज भांडणें भोंवतीं ॥ २ ॥ तुका ह्मणे टांचें । घरीं जालेंसेवरोचें ॥ ३ ॥

॥ १९२३ ॥ कांहीं चिंतेविण । नाहीं उपजत सीण ॥ धृ० ॥ तरी हा पडिला विसर । माझा तुह्मां जाला भार ॥ १ ॥ आली कांहीं तुटी । गेली सुटोनियां गांठी ॥ २ ॥ तुका ह्मणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥ ३ ॥

॥ १९२४ ॥ निरोपासी वेचे । काय बोलतां फुकाचें ॥ धृ० ॥ परी हें नेणवेचि यश । भेओं नको सुखी आस ॥ १ ॥ सुख समाधानें । कोण पाहे देणें घेणें ॥ २ ॥ न लगे निरोपासी मोल । तुका ह्मणे वेचे बोल ॥ ३ ॥

॥ १९२५ ॥ जोडीच्या हव्यासें । लागे धनाचेंचि पिसें ॥ धृ० ॥ मग आणिक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥ १ ॥ पाहे रुक्याकडे । मग अवघें ओस पडे ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । तुला बहुतचि हेवा ॥ ३ ॥

॥ १९२६ ॥ मविलें मविती । नेणों रासी पडिल्या किती ॥ धृ० ॥ परि तूं धालाचि न धासी । आलें उभाउभीं घेसी ॥ १ ॥ अवघ्या अवघा काळ । वाटा पाहाती सकळ ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । अराणूक तुज कांहीं ॥ ३ ॥

॥ १९२७ ॥ न बैससी खालीं । सम उभाच पाउलीं ॥ धृ० ॥ ऐसे जाले बहुत

दिस । झालीं युगें अठ्ठाविस ॥ १ ॥ नाहीं भाग सीण । अराणूक एक क्षण ॥ २ ॥ तुका ह्मणे किती । मापें केलीं देती घेती ॥ ३ ॥

॥ १९२८ ॥ जोडी कोणासाटीं । एवढी करितोसी आटी ॥ धृ० ॥ जरी हें आह्मां नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥ १ ॥ करूनि जतन । कोणा देसील हें धन ॥ २ ॥ आमचे तळमळे । तुझें होईल वाटोळें ॥ ३ ॥ घेसील हा शाप । माझा होऊनियां बाप ॥ ४ ॥ तुका ह्मणे उरी । आतां न ठेवीं यावरी ॥ ५ ॥

॥ १९२९ ॥ करूनि चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥ धृ० ॥ जरि तूं होऊनि उदास । माझी बुडविसी आस ॥ १ ॥ येथें न करीं काम । मुखें नेघे तुझें नाम ॥ २ ॥ तुका ह्मणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥ ३ ॥

॥ १९३० ॥ समर्थाचे पोटीं । आह्मीं जन्मलों करंटीं ॥ धृ० ॥ ऐसी जाली कीर्ति । तुझ्या मानाची फजिती ॥ १ ॥ येथें नाहीं खाया । न ये कोणी मूळ न्याया ॥ २ ॥ तुका ह्मणे जिणें । आतां खोटें जीवपणें ॥ ३ ॥

॥ १९३१ ॥ पुढें तरी चित्ता । काय येईल तें आतां ॥ धृ० ॥ मज सांगोनियां धाडी । वाट पाहातों बराडी ॥ १ ॥ कंठीं धरिला प्राण । पायांपाशीं आलें मन ॥ २ ॥ तुका ह्मणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥ ३ ॥

॥ १९३२ ॥ कैंचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥ धृ० ॥ जें या मनासी आवरूं । आंत पोटीं वाव धरूं ॥ १ ॥ कैंची शुद्ध मती । भांडवल ऐसें हातीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंगा । कोण दशा आली सांगा ॥ ३ ॥

॥ १९३३ ॥ समर्पक वाणी । नाहीं ऐकिजेसी कानीं ॥ धृ० ॥ आतां भावें करूनि साचा । पायां पडिलों विठोबाच्या ॥ १ ॥ न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥ २ ॥ तुका ह्मणे विनंती । विनविली धरा चित्तीं ॥ ३ ॥

॥ १९३४ ॥ येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥ धृ० ॥ घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥ १ ॥ पत्र हातीं दिलें । जया जेथें पाठविलें ॥ २ ॥ तुका ह्मणे येती । जाइन सामोरा पुढती ॥ ३ ॥

॥ १९३५ ॥ रुळे महाद्वारीं । पायां खालील पायरी ॥ धृ० ॥ तैसें माझें दंडवत । निरोप सांगतील संत ॥ १ ॥ पडे दंडकाठी । देह भलतीसवा लोटी ॥ २ ॥ तुका ह्मणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥ ३ ॥

॥ १९३६ ॥ तुह्मीं संतजनीं । माझी करावी विनवणी ॥ धृ० ॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥ १ ॥ भाका बहुतां रीती । माझी कींव काकुलती ॥ २ ॥ न देखे पंढरी । तुका चरण विटेवरी ॥ ३ ॥

॥ १९३७ ॥ होईल कृपादान । तरी मी येईन धांवोन ॥ धृ० ॥ होती संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ १ ॥ रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे ताप । हरतां देखोनियां बाप ॥ ३ ॥

॥ १९३८ ॥ परिसोनि उत्तर । जाब देईजे सत्वर ॥ धृ० ॥ जरी तूं होसी कृपावंत ।

तरि हा बोलावीं पतित ॥ १ ॥ नाणीं कांहीं मना । करूनि पापाचा उगाणा ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं । काय शक्ति तुझे पायीं ॥ ३ ॥

॥ १९३९ ॥ ऐकोनियां कीर्ती । ऐसी वाटती विश्रांती ॥ धृ० ॥ माते सुख डोळां पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥ १ ॥ बोलतां ये वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥ २ ॥ तुका ह्मणे धांवे । वासना ते रस घ्यावे ॥ ३ ॥

॥ १९४० ॥ किती करूं शोक । पुढें वाढे दुःखें दुःख ॥ धृ० ॥ आतां जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥ १ ॥ पुण्य होतें गांठीं । तरि कां लागती हे आटी ॥ २ ॥ तुका ह्मणे बळ । माझी राहिली तळमळ ॥ ३ ॥

॥ १९४१ ॥ करील आबाळी । माझ्या संताची कसाळी ॥ धृ० ॥ जासी एखादे मसेन । पाठी लागेल हें जन ॥ १ ॥ घरीं लागे कलह । नाहीं जात तो शीतळ ॥ २ ॥ तुका ह्मणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥ ३ ॥

॥ १९१४२ ॥ आतां आशीर्वाद । माझा असो सुखें नांद ॥ धृ० ॥ ह्मणसी कोणा तरी काळें । आहेतसीं माझीं बाळें ॥ १ ॥ दुरी दूरांतर । तरी घेसी समाचार ॥ २ ॥ नेसी कधीं तरी । तुका ह्मणे लाज हरी ॥ ३ ॥

॥ १९४३ ॥ आतां हे सेवटीं । माझी आइकावी गोष्टी ॥ धृ० ॥ आतां द्यावा वचनाचा । जाब कळे तैसा याचा ॥ १ ॥ आतां करकर । पुढें न करीं उत्तर ॥ २ ॥ तुका ह्मणे ठसा । तुझा आहे राखें तैसा ॥ ३ ॥

॥ १९४४ ॥ बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ धृ० ॥ क्षमा करावें अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ १ ॥ स्तुति निंदा केली । लागें पाहिजे साहिली ॥ २ ॥ तुका ह्मणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥ ३ ॥

वारकरी पंढरपुरास निघून गेल्यानंतर पांडुरंग आपणावर कृपा करील अगर नाहीं कोण जाणे, अशा संशयांत तुकाराम होता व वारकरी परत येण्याची मार्गप्रतीक्षा करीत होता. त्यांच्या येण्याच्या संधीस त्यांस मोठ्या उत्कंठेनें सामोरा जाऊन तुकारामानें त्यांचा फारच आदरसत्कार केला. व त्यांजपासून पंढरपुरच्या उत्साहासंबंधी सर्व हकीकत ऐकून तो संतोष पावला. तुकारामानें अभंग रूपानें पाठविलेलें पत्र वारकऱ्यांनीं दिल्यावर पांडुरंगानें स्वतः देहूस येऊन तुकारामास दर्शन दिलें; व त्याच्या घरीं जाऊन भोजन केलें, अशी आख्यायिका आहे.

नेहमी मुकुंदराजकृत विवेकसिंधु वाचणारा एक वेदांती निर्गुणब्रह्मवादी ब्राह्मण होता, तो तुकारामाची बहुत हेळणा करीत असे. त्यानें एके प्रसंगीं आपणापासून तुकारामानें विवेकसिंधु ऐकावा असा योग आणिला. तुकाराम बाह्यात्कारें "हों" ह्मणून त्याच्यापुढें सर्वांगावरून घुंगट घेऊन श्रवणास बसला. कांहीं हुंकार वगैरे

मुलींच न देतां एक प्रहर लोटला, तेव्हां ब्राह्मणानें तुकारामाचें घुंगट काढून पाहिलें तों त्यानें कानांत घट्ट बोटें घालून नामस्मरण चालविलें होतें. ब्राह्मणानें हें पाहून तुकारामाची उघडपणें हेळणा मांडिली. तेव्हां त्यानें निर्गुणोपासनेपेक्षां सगुणोपासनेची योग्यता अधिक दाखवून निर्गुणविषयक वर्णन ऐकण्याची माझी इच्छा नाहीं असें सांगितलें व पुढें त्या ब्राह्मणासही आपल्या अनुयायिवर्गांत आणिलें.

एका प्रसंगीं लोहगांवास तुकाराम कीर्तन करीत असतां एका बाईनें आपल्या मुलाचें प्रेत आणून तेथें टाकलें आणि म्हणाली कीं, "यास जर उठविशील तरच तूं विष्णुभक्त खरा." तुकारामाचें भजन चालतां चालतां तें मूल सजीव होऊन उठून बसलें असें महीपति म्हणतो. याबद्दल तुकाराम अभंगांत असें म्हणतो:—

॥ २३१५ ॥ अशक्य तों तुम्ही नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥ धृ० ॥ मागें काय जाणों स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडें दावूं नये ॥ १ ॥ थोर भाग्य आह्मीं समर्थाचे कासे । ह्मणवितों दास काय थोडें ॥ २ ॥ तुका ह्मणे माझे निववावे डोळे । दावूनि सोहाळे सामर्थ्याचे ॥ ३ ॥

॥ २३१६ ॥ दाता तो एक जाणा । नारायणा स्मरवी ॥ धृ० ॥ आणीक नाशिवंतें काय । न सरे हाय ज्यांच्यानें ॥ १ ॥ यावें तयां काकुलती । जे दाविती सुपंथ ॥ २ ॥ तुका ह्मणे उरी नुरे । त्याचे खरे उपकार ॥ ३ ॥

दुसऱ्या एका प्रसंगीं लोहगांवीं तुकारामाचें कीर्त्तन चाललें असतां तेथें दोन मोठे दुरभिमानी संन्यासी बसले होते. तुकारामानें नाममाहात्म्य चालविलें तेव्हां दोन्ही संन्याशांस तुकारामाचें वर्चस्व सहन न होऊन ते पुण्यांतील दादोजी कोंडदेव (शिवाजी राजाचा शिक्षक) मोकाशी याजकडे फिर्याद गेले कीं, तुकाराम जातीचा शूद्र असून वेदोक्त कर्ममार्गाच्या उच्छेदार्थ प्रवृत्त झाला आहे व भोळ्या भाविक जनांस नाममाहात्म्य सांगून त्यापासून भ्रष्ट करीत आहे व ते ब्राह्मण असतांही त्यास नमस्कार करितात त्यापक्षीं त्यास येथें आणून चांगली शिक्षा करावी. मोकाशी शाहणा व चतुर होता; त्यानें संन्याशांस सांगितलें कीं, तुकारामास बोलावून आणून त्याचा व तुमचा वादविवाद करवूं आणि जे हरतील त्यांस शिक्षा करूं असें सांगून तुकारामास बोलावणें पाठविलें. तुकाराम पुण्यास आला त्याजबरोबर सर्व लोहगांवकर ब्राह्मणादि मंडळ आलें. पुण्यांत संगमावर तुकाराम उतरला असतां तेथील भाविक लोकांनीं त्याचा मोठाच आदरसत्कार केला. दादोजी कोंडदेवही त्याच्या भेटीस निघाला. संन्यासी यांनीं दादोजीस निषेध केला तरी

तो ह्मणाला मी त्यास येथें तुम्हांशीं वादविवादाकरितां घेऊन येतों. असें ह्मणून त्यानें तुकारामास मोठ्या आदरानें गांवांत आणिलें. नंतर तेथें कीर्तनास प्रारंभ झाल्यावर ते संन्यासी तेथें आले होते; त्यांसही तुकयाचा भाव वगैरे पाहून पश्चात्ताप झाला व ते त्यास प्रणत झाले. तेव्हां [1]दादोजीस मोठा क्रोध येऊन तो संन्याशांस म्हणाला कीं, तुम्ही हरलां सबब मी तुह्मांस गाढवावर बसवून तुमची धिंड काढतों; परंतु शेवटीं तुकारामाच्या मध्यस्थीनेंच ती गोष्ट रहित झाली.

तुकारामाविषयीं झालेला वृत्तांत दादोजीनें शिवाजीस लिहून पाठविला, तेव्हां तो स्वतः त्याच्या दर्शनार्थ पुण्यांत आला. तेथें एकेदिवशीं शिवाजी तुकारामाच्या कथेंत बसला असतां चाकणच्या किल्ल्यांत जो मुसलमान अधिकारी होता त्यास शिवाजी पुण्यांत आल्याचें वर्तमान कळून त्यानें पठाण लोक त्यास पकडण्यासाठीं पाठविले होते ते तेथें येऊन थडकले. ही गूल शिवाजीस कळतांच त्यानें तुकारामापाशीं जावयास निरोप मागितला. तुकारामानें निरोप न देतां आलेल्या परचक्रापासून सर्वांचें संरक्षण करण्याकरितां विठोबाचा धांवा केला. मुसलमान कथेंत शिवाजीस धरण्याकरितां आले; परंतु शिवाजी कोणता हा त्यांस उमजच पडला नाहीं; इतक्यांत त्या श्रोत्यांतून एक मनुष्य बाहेर पडून गेला व तो शिवाजीसा शत्रूंच्या कांहीं लोकांस भासला. ह्मणून आलेल्या सर्व पठाणांनीं त्याचा दूरवर पाठलाग केला; परंतु तो हातीं लागला नाहीं. याप्रमाणें परचक्र निघून गेल्यावर शिवाजी सिंहगडास निघून गेला व तुकाराम सर्व अनुयायीलोकांसुद्धां लोहगांवांस निघून गेला.

कोंडोबा लोहोकरे म्हणून एक ब्राह्मण होता तो तुकारामाच्या कथेंत ध्रुवपद धरीत असे. त्याच्या मनांत महायात्रा करण्याचें येऊन त्यानें तुकारामास आपणास द्रव्यसामग्री करून देण्याविषयीं प्रार्थना केली. ती त्याची तुकारामानें अद्भुत रीतीनें शेवटास नेली असें म्हणतात. म्हणजे त्यानें त्यास एक होन दिला होता व तो मोडून त्यांतला एक पैसा पदरीं बांधून ठेवण्यास सांगितलें होतें. तसें केलें ह्मणजे

१ दादोजी हा खोट्याचा व अन्यायाचा अतिशय द्वेष्टा होता. तो एकवेळ, स्वतांच्या हातून झालेला लहानसा अन्याय बायकोनें विनोदानें दाखवल्यावरून आपलाच हात तोडण्यास सिद्ध झाला होता; परंतु तितक्यांत एका पंडितानें येऊन सांगितलें कीं, जो हात जितका तोडायाचा त्याची बाही नेहमीं तितकी कापली ह्मणजे तो हात तोडल्याप्रमाणें झालें. त्याप्रमाणेंच दादोजीनें आमरणांत चालविलें होतें असें महीपतीनें लिहिलें आहे.

पुनः त्याचा होन होत असे तो शेवटपर्यंत पुरून शेवटीं तुकारामानें तो परत घेतला असें महीपति ह्मणतो. तुकारामानें या ब्राह्मणाबरोबर काशीविश्वेश्वरास, भागीरथीस व विष्णुपदास पत्ररूपानें पाठविले ते अभंगः—

॥ १६५६ ॥ परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ धृ० ॥ भागीरथी महादोष निवारणी । सकळा स्वामिणी तीर्थांचिये ॥ १ ॥ जीतां भुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तिरीं । अहिक्यपरत्रीं सुखरूप ॥ २ ॥ तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठविलें ॥ ३ ॥

॥ १६५७ ॥ तुह्मी विश्वनाथ । दीन रंक मी अनाथ ॥ धृ० ॥ कृपा कराल ते थोडी । पायां पडिलों बराडी ॥ १ ॥ काय उणें तुह्मांपाशीं । मी तों अल्पेंचि संतोषी ॥ २ ॥ तुका ह्मणे देवा । कांहीं भातुकें पाठवा ॥ ३ ॥

॥ १६५८ ॥ पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥ धृ० ॥ माझें जालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥ १ ॥ केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ २ ॥ तुका ह्मणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ३ ॥

एका प्रसंगीं तुकाराम आळंदीस गेला असतां तेथें "आज्यान" वृक्षाखालीं पक्षी दाणे वेंचीत होते ते तुकाराम जवळ आलासा पाहून एकदम उडून गेले. हें पाहून तुकारामास फार खेद झाला. त्यास वाटलें कीं, सर्व ब्रह्मरूप असून व सर्वत्र माझी अभेदबुद्धि झाली असून ज्याअर्थीं मला पाहून हे पक्षी भितात त्याअर्थीं खरें वैराग्य व अभेदबुद्धि अजून मला झालीच नाहीं. याप्रमाणें वाटून तो तेथेंच पांडुरंगाची स्तुति करून अगदीं प्रेतवत् निश्चेष्ट उभा राहिला. असाच कांहीं वेळ उभा राहिल्यानंतर बहुत पक्षी त्याच्या अंगावर येऊन बसले असें ह्मणतात. तो तेथें उभा असून त्याच्या अंगावर पक्षी बसले होते तोंच त्याचे अनुयायी तेथें येऊन त्यांनीं ती स्थिति पाहिली व पुढें तिची चोहोंकडे प्रसिद्धि झाली. याबद्दल तुकाराम अभंगीं लिहितोः—

॥ १५०९ ॥ अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ धृ० ॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ १ ॥ माझी कोणी न धरो शंका । हो कां लोकां निर्द्वंद्व ॥ २ ॥ तुका ह्मणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥ ३ ॥

वर लिहिलेली अनुयायीमंडळी आळंदीस येऊन पोहोंचल्यावर तुकाराम ज्ञानदेवापुढें रात्रीं कीर्तन करून दुसरे दिवशीं द्वादशीचें पारणें करून देहूस परत आला. तुकारामाच्या अंगावर पक्षी निर्भयपणीं बसल्याची कीर्ति चिंचवडच्या देवांच्या कानीं गेल्यावरून आपण त्याचा कांहीं चमत्कार पाहवा म्हणून त्यांनीं तुकारामाची भेट घेतली. परस्परांस भेटीपासून आनंद होऊन देवांनीं तुकारामास "तूं मानव नसून

कोणी तरी अद्भुत पुरुष आहेस असें वाटतें" ह्मणून सांगितलें; तेव्हां तुकारामानें आपल्या मांडीचें कातडें कापून देवांस दाखविलें तों आंतून रक्त वगैरे न निघतां पिंजलेल्या कापसाप्रमाणें कापूस दृष्टीस पडाला व त्यानें आपल्या स्वरूपाचें ज्ञान देवांस व्हावें ह्मणून एक अभंग केला तोः—

॥ ९९३ ॥ अणुरणीयां थोकडा । तुका आकाशाएवढा ॥ धृ० ॥ गिळूनि सांडिलें कळिवर । भवभ्रमाचा आकार ॥ १ ॥ सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे आतां । उरलों उपकारापुरता ॥ ३ ॥

या गोष्टीवरून देवांस त्याचा खरा साक्षात्कार आला व त्यांनीं उठून तुकारामास साष्टांग नमस्कार घातला. नंतर त्यांनीं त्यास चिंचवडास नेऊन तीन दिवस राहून घेतलें व मोठा ब्राह्मणभोजनाचा समारंभ केला. प्रत्यहीं रात्रीं कथेचाही मोठाच थाट जमत असे. याप्रमाणें देवांनीं त्याचा मोठा आदर केला व त्यास पंक्तीस घेऊन भोजन केलें असें महीपति म्हणतो व अखेरीस तुकाराम त्यांचा निरोप घेऊन देहूस परत आला.

परचक्रानें लोहगांवच्या लोकांस लुटून नेल्यामुळें ते दुःखी झाले व त्यामुळें तुकारामास वाईट वाटलें व तो निघून देहूस आला. लोहगांवकरांचें प्रेम तुकारामाचे ठिकाणीं फारच जडलें होतें, त्याच्या शब्दावर त्यांचा अतिशय भरंवसा होता व त्यांस तुकारामाच्या नेहमींच्या उपदेशापासून बरीच विरक्तिही उत्पन्न झाली होती. त्यांतच त्यांच्यावर ह्या परचक्राचा घाला पडल्यामुळें ते संसाराविषयीं जास्ती उदासीन झाले. आणि कितीएक तर देहूस येऊन राहून तुकारामाचें कीर्तन नेहमी ऐकूं लागले. याचप्रमाणें देहूच्या आसपासच्या गांवचे हजारों लोक कोणी नेहमी परंतु बहुतेक दर एकादशीस येऊन कथाकीर्तन मनापासून ऐकत असत व कायावाचा-मनांनीं तुकारामावर विश्वास ठेवित असत. असा क्रम चालला असतां पुढें कांहीं दिवसांनीं तुकारामानें "काया ब्रह्म केली" साविषयीं त्याचे अभंगः—

॥ १५८६ ॥ सोंवळितांचि नये । ह्मणोनि बोळगतों पाये ॥ धृ० ॥ आतां दिसों नये जना । ऐसें करा नारायणा ॥ १ ॥ परतोनी मन । मेलें ठायींचि मुरोन ॥ २ ॥ विसरला तुका । बोलों चालों जाला मुका ॥ ३ ॥

॥ १५८७ ॥ रज्जुसर्पाकार । भासयेलें जगडंबर ॥ धृ० ॥ ह्मणोनि आठवती पाय । घेतों आलाय बलाय ॥ १ ॥ दृश्य द्रुमाकार लाणी । केलों सर्वस्वासी धणी ॥ २ ॥ तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनि उरला लोकां ॥ ३ ॥

॥ १५८८ ॥ ह्मणवितों दास । परि मी असें उदास ॥ धृ० ॥ ह्माचि निश्चय माझा । परि मी निश्चयाहुनि दुजा ॥ १ ॥ सरतें कर्तृत्व माझ्यानें । परि मी त्याहीहुन भिन्न ॥ २ ॥ तुका तुकासी तुकला । तुका तुकाहुनी निराळा ॥ ३ ॥

॥ १५८९ ॥ घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिति सांडवीन ॥ धृ० ॥ ब्रह्मभूत होते कायाच कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ १ ॥ तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडु स्वर्गवास करिन भोग ॥ २ ॥ सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ३ ॥ भक्तिभाग्यप्रेमा साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ४ ॥ धन्य ह्मणवीन येह लोकीं लोकां । भाग्य आह्मीं तुका देखियेला ॥ ५ ॥

॥ १५९० ॥ संसाराचें अंगीं अवघींच व्यसनें । आह्मी या कीर्तनें शुद्ध जालों ॥ धृ० ॥ आतां हें सोंवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें ॥ १ ॥ ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥ ३ ॥

॥ १५९१ ॥ तुह्मी सनकादिक संत । ह्मणवितां कृपावंत ॥ धृ० ॥ एवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ॥ १ ॥ भाकूनि करुणा । विनवा वैकुंठींचा राणा ॥ २ ॥ तुका ह्मणे मज आठवा । मूळ लवकरी पाठवा ॥ ३ ॥

॥ १५९२ ॥ आपुल्या माहेरा जाईन मी आतां । निरोप या संतां हातीं आला ॥ धृ० ॥ सुख दुःख माझें आइकिलें कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥ १ ॥ करुनी सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसें एकें न्यावयासी ॥ २ ॥ त्याचि पंथें माझें लागलेंसें चित्त । वाट पाहे नित्य माहेराची ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलीया मायबाप ॥ ४ ॥

॥ १५९३ ॥ चिन्हें उमटती अंगीं । शकुना जोगीं उत्तम ॥ धृ० ॥ आठवला बापमाय । येईल काय मूळ नेणों ॥ १ ॥ उत्कंठित जालें मन । तेंचि खुण तेथींची ॥ २ ॥ तुका ह्मणे काम वारीं । आळस घरीं करमेना ॥ ३ ॥

॥ १५९४ ॥ आरोनियां पाहे वाट । कटकट सोसेना ॥ धृ० ॥ आलियांस पुसें मात । तेथें चित्त लागलें ॥ १ ॥ दळीं कांडीं लोकांऐसें । परि मी नसें ते ठायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे येथें पिसें । तेथें तैसें असेल ॥ ३ ॥

॥ १५९५ ॥ येथीलिया अनुभवें । कळों जीवें हें येतसे ॥ धृ० ॥ दोहीं ठायीं एक जीव । माझी कींव त्या अंगीं ॥ १ ॥ भूक भुकेचि खाउनि धाय । नाहीं हाय अन्नाची ॥ २ ॥ तुका ह्मणे सुख जालें । अंतर धालें त्या गुणें ॥ ३ ॥

॥ १५९६ ॥ पैल आले हरी । शंख चक्र शोभे करीं ॥ धृ० ॥ गरुड येतो फडत्कारें । ना भीं ना भीं ह्मणे त्वरें ॥ १ ॥ मुगुट कुंडलांच्या दीप्ती । तेथें लोपला गभस्ती ॥ २ ॥ मेघश्यामवर्ण हरी । मूर्ति डोळस साजिरी ॥ ३ ॥ चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रुळती ॥ ४ ॥ पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥ ५ ॥ तुका जालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ ॥ ६ ॥

॥ १५९७ ॥ शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ धृ० ॥ ना भी ना भी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥ १ ॥ दुरूनि येतां दिसे दृष्टी । धाकें दोष पळती सृष्टी ॥ २ ॥ तुका देखोनि एकला । वैकुंठींहूनि हरि आला ॥ ३ ॥

॥ १५९८ ॥ पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥ धृ० ॥ आला पंढरीचा राणा । दिसतील त्याच्या खुणा । सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरती ॥ १ ॥ उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥ २ ॥ तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥ ३ ॥

॥ १५९९ ॥ चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥ धृ० ॥ तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं । फेडावया धणी । प्रेमसुखाची आजी ॥ १ ॥ पुढें आले कृपावंत । मायबाप साधुसंत ॥ २ ॥ तुका आळंगिला बाहीं । ठेविला विठोबाचे पायीं ॥ ३ ॥

॥ १६०० ॥ पाहुणे घरासी । आजि आले हृषीकेशी ॥ धृ० ॥ काय करूं उपचार । कोंप मोडकी जर्जर । कण्या दरदर । पाण्यामाजी रांधिल्या ॥ १ ॥ घरीं मोडकिया बाजा । वरि वाकळांच्या शेजा ॥ २ ॥ मुखशुद्धि तुळसी दळ । तुका ह्मणे मी दुर्बळ ॥ ३ ॥

॥ १६०१ ॥ संतीं केला अंगीकार । त्यासी अभिमान थोर ॥ धृ० ॥ कांहीं ठेविलें चरणीं । घेती तेंचि पुरवूनी । तुका पायवणी । घेऊनियां निराळा ॥ १ ॥ नसतां कांहीं संचित । भेटी जाली अवचित ॥ २ ॥ देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥ ३ ॥

॥ १६०२ ॥ अवघियांच्या आलों मुळें । एका वेळे न्यावया ॥ धृ० ॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें । आधीं ठावें करितों ॥ २ ॥ जोंवरी ते घटिका दुरी । आहे उरी तों काळ ॥ २ ॥ मंगळाचे वेळे उभे । असों शोभे सावध ॥ ३ ॥ अवघियांचा योग घडे । तरी जोडे श्लाघ्यता ॥ ४ ॥ तुका ह्मणे पाहें वाट । बहु आट करुनी ॥ ५ ॥

सकळही माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुह्मीं ॥ धृ० ॥ ासावें कल्याण । द्या माझें वचन आशीर्वाद ॥ १ ॥ वाढवूनि दिलो एकाचिये हातीं । सकळ निश्चिंती जाली तेथें ॥ २ ॥ आतां मज जाणें प्राणेश्वरासवें । मी माझिया भावें अनुसरलों ॥ ३ ॥ वाढवितां लोभ होईल उसीर । अवघींच स्थिर करा ठायीं ॥ ४ ॥ धर्म अर्थ काम जाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाता हात ॥ ५ ॥ तुका ह्मणे आतां जाली हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया ॥ ६ ॥

॥ १६०४ ॥ बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें पुण्य कोण माझें गांठी ॥ धृ० ॥ जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी । काळक्षेप आह्मीं करूं कोठें ॥ १ ॥ न घडे यावरि न धरवे धीर । पीडतां राष्ट्र देखोनि जग ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं दिसे मोकलिलें । काय आतां आलें जीवित्वाचें ॥ ३ ॥

॥ १६०५ ॥ करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ धृ० ॥ अवघें एकमय । राज्य

बोलों चालों नये ॥ १ ॥ दुजयाची सत्ता । न चलेसी जाली आतां ॥ २ ॥ आतां नाहीं तुका । पुन्हा हारपला लोकां ॥ ३ ॥

॥ १६०६ ॥ आह्मी जातों तुह्मी कृपा असों द्यावी । सकळां सांगावी विनंति माझी ॥ धृ० ॥ वाडवेळ जाला उभा पांडुरंग । वैकुंठा श्रीरंग बोलावितो ॥ १ ॥ अंत-काळीं विठो आह्मांसी पावला । कुडीसहित जाला गुप्त तुका ॥ ३ ॥

॥ १६०७ ॥ तुका उतरला तुकीं । नवल जालें तिहीं लोकीं ॥ धृ० ॥ नित्य करितों कीर्तन । हेंचि माझें अनुष्ठान ॥ १ ॥ तुका बैसला विमानीं । संत पाहाती लोचनीं ॥ २ ॥ देव भावाचा भुकेला । तुका वैकुंठासी नेला ॥ ३ ॥

॥ १६०८ ॥ न देखिजे ऐसें केलें । या विठ्ठलें दुःखासी ॥ धृ० ॥ कृपेचिये सिंहासनीं । अधिष्ठानीं बैसविलें ॥ १ ॥ वाजता तो नलगे वारा । क्षीरसागरा शयनीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अवघे ठायीं । मज पायीं राखिलें ॥ ३ ॥

॥ १६०९ ॥ वाराणसीपर्यंत असों सुखरूप । सांगावा निरोप संतांसी हा ॥ धृ० ॥ येथूनियां आह्मां जाणें निजधामा । सवें असे आह्मां गरुड हा ॥ १ ॥ कृपा असों द्यावी मज दीनावरी । जातसों माहेरीं तुका ह्मणे ॥ २ ॥

तुकाराम भगवद्भजनांत अगदीं रंगून गेला असतां त्या वेळेस त्याच्या मनाची स्थिति कशी होत असे ती त्यानेंच एका अभंगांत वर्णिली आहे ती अशीः—

॥ २६१० ॥ डोळां भरिलें रूप । चित्ता पायांपें संकल्प ॥ धृ० ॥ अवघी घातली वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥ १ ॥ वाचा केली माप । रासीं हरिनाम अमूप ॥ २ ॥ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥ ३ ॥

या रीतीनें उत्तम प्रकारें कालक्षेप करीत असतां शके १५७१ विरोधीनाम संवत्स-राच्या फाल्गुनाचा पहिला पंधरवडा गेला आणि फाल्गुन वद्य द्वितीया सोमवारीं सकाळीं त्यानें आपल्या अनुयायिजनांस पुढील अभंगांत लिहिल्याप्रमाणें अखेरीचा उपदेश केलाः—

॥ २४६२ ॥ ऐका ऐका भाविकजन । कोण कोण व्हाल ते ॥ धृ० ॥ तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो ॥ १ ॥ नका शोधूं मतांतरें । नुमगे खरें बुडाल ॥ २ ॥ कलिमध्यें दास तुका । जातो लोकां सांगत ॥ ३ ॥

याप्रमाणें उपदेश करून तुकारामानें आपल्या बायकोस निरोप पाठविला कीं, "आम्ही वैकुंठपुरास जातों, तर तुह्मीही बरोबर चलावें." तिनें उत्तर पाठविलें कीं, "मी पांचा महिन्यांची गरोदर आहें, मुलें लेंकरें लहान आहेत, घरीं गुरूंढोर आहे व प्रपंच सारा पसरला आहे तेव्हां येणें घडत नाहीं." तिच्या मनांत नेहमीच वैकुंठ-पुरास जातों असें ह्मणण्याचा त्याचा परिपाठ असून कोठें तरी आसपास महिना

पंधरा दिवस जात असे तसाच कोठें तो जात असेल; परंतु या वेळेस तसें झालें नाहीं.

अशाप्रकारें अभंग करीतच देवास नमस्कार करून नामस्मरण करीतच तो देउळाबाहेर पडला. सर्व श्रोत्यांस अतिशय वाईट वाटलें. पुढें तुकाराम कोणीकडे जाणार वगैरे कोणासच कांहीं कळलें नाहीं; परंतु सामान्यतः कोठें तरी तीर्थाटणास व त्यांतही प्रायः हिमालयाकडे जाणार असा सर्वांचा ग्रह होता. देवळांतून निघाल्यावर चवदा शिष्यांसहवर्तमान इंद्रायणीच्या तीरीं येऊन तेथें कीर्तनास प्रारंभ केला. येथें विहरिणीचे (विराण्या) २५ अभग केले तेः—

॥ ७ ॥ वाळो जन मज ह्मणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥ धृ० ॥ सांडूनि लौकिक जालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥ १ ॥ नाइकें वचन बोलतां या लोकां । ह्मणे जालों तुका हरिरता ॥ २ ॥

॥ ८ ॥ आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । ह्मणोनि व्यभिचारा टेकलिये ॥ धृ० ॥ रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण त्यानिराळी न गमे घडी ॥ १ ॥ नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रातलें अनंता तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ९ ॥ हाचि नेम आतां न फिरें माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ धृ० ॥ घररिघी जालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ १ ॥ बळियाचा अंगसंग जाला आतां । नाहीं भय चिंता तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ १० ॥ नाहीं काम माझें काज तुह्मांसवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥ धृ० ॥ व्यभिचार माझा पडिला ठाउका । न सर ती लोकामाजी जालें ॥ १ ॥ न धरावा लोभ कांहीं मजविशीं । जालें देवपिशी तुका ह्मणे ॥ २ ॥

॥ ११ ॥ विसरलें कुळ आपुला आचार । पति भावे दीर घर सोय ॥ धृ० ॥ सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माझें ॥ १ ॥ मज आतां कोणी आळवाल ह्मणी । तुका ह्मणे कानीं बहिरी जालें ॥ ३ ॥

॥ १२ ॥ न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ धृ० ॥ सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥ १ ॥ आळ आला होता आह्मी भांडखोरी । तुका ह्मणे खरी केली मात ॥ २ ॥

॥ १३ ॥ दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंता पासूनियां ॥ धृ० ॥ बळियाच्या आह्मीं जालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ १ ॥ तुका ह्मणे आह्मी जिवाच्या उदारा । जालों प्रीतिकरा गोविंदासी ॥ २ ॥

॥ १४ ॥ क्षणभरी आह्मीं सोसिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥ धृ० ॥ सांडी मांडी मागें केल्या भरोवरी । अधिकचि परी दुःखाचिया ॥ १ ॥ तुका ह्मणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ २ ॥

॥ १५ ॥ आह्मां आह्मी आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठी पोटीं कोणी दुजें ॥ धृ० ॥ फावला एकांत एकविध भाव । हरि आह्मांसवें सर्व भोगीं ॥ १ ॥ तुका ह्मणे अंगसंग एके ठायीं । असो जेथें नाहीं दुजें कोणी ॥ २ ॥

॥ १६ ॥ सर्व सुख आह्मी भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥ धृ० ॥ याचसाठीं सांडियेले भरतार । रातलों या परपुरूषाशीं ॥ १ ॥ तुका ह्मणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ २ ॥

॥ १७ ॥ एका जिवें आतां जिणें जालें दोहीं । वेगळिक कांहीं नव्हे आतां ॥ धृ० ॥ नारायणा आह्मां नाहीं वेगळिक । पुरविली हे भाक सांभाळिली ॥ १ ॥ तुका ह्मणे जालें सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ २ ॥

॥ १८ ॥ हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरींची गोडी अवीट ते ॥ धृ० ॥ सेवा सुखें करूं विनोदवचन । आह्मी नारायण एकाएकीं ॥ १ ॥ तुका ह्मणे आह्मी जालों उदासीन । आपुल्या आधीन केला पती ॥ २ ॥

॥ १९ ॥ मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयानों ॥ धृ० ॥ न साहवे तुह्मां या जनाची कूट । बोलती वाईट ओखटें तें ॥ १ ॥ तुका ह्मणे जालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आह्मी ॥ २ ॥

॥ २० ॥ शिकविलें तुह्मी तें राहे तोंवरी । मज आणि हरि वियोग तों ॥ धृ० ॥ प्रसंगीं या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥ १ ॥ तुका ह्मणे. चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ २ ॥

॥ २१ ॥ सांगतों तें तुह्मीं आइकावें कानीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ धृ० ॥ जोंवरी या तुह्मां मागिलांची आस । तोंवरी उदास होऊं नका ॥ १ ॥ तुका ह्मणे काय वांयांविण धिंद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ २ ॥

॥ २२ ॥ आजिवरी तुह्मां आह्मां नेणपण । कौतुकें खेळणें संग होता ॥ धृ० ॥ आतां अनावर जालें अगुणाची । करूं नये तेंचि करीं सुखें ॥ १ ॥ तुका ह्मणे आतां बुडविलीं दोन्ही । कुळें एक मनीं नारायण ॥ २ ॥

॥ २३ ॥ सासुरियां वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावेंची ॥ धृ० ॥ सांडवर कोणी न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥ १ ॥ न व्हावी ते जाली आमची भंडाई । तुका ह्मणे काई लाजों आतां ॥ २ ॥

॥ २४ ॥ मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ धृ० ॥ आतां तुह्मी पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वांयांविण ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी भयाभीत नारी । कैसी संग सरी तुह्मां आह्मां ॥ ३ ॥

॥ २५ ॥ परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ धृ० ॥ संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनि मागुतें पाहूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपासोई ॥ ३ ॥

॥ २६ ॥ भइकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडा या सोई अंताराची ॥ धृ० ॥ नव्हे आराणुक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥ १ ॥ तुका ह्मणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥ ३ ॥

॥ २७ ॥ आहांच वाहांच आंत वरी दोन्ही । न लगा गडणी आह्मां तैशा ॥ धृ० ॥ भेऊं नये तेथें भेडसावूं कोणा । आवरूनि मना बंद द्यावा ॥ २ ॥ तुका ह्मणे कांहीं अभ्यासावांचुनी । नव्हे हे करणी भलतीची ॥ ३ ॥

॥ २८ ॥ बहुतांच्या आह्मी न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥ धृ० ॥ विचार करितां वांया जाय काळ । लटिकें तें मूळ फजितीचें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥ ३ ॥

॥ २९ ॥ त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा । कठिण हें जिवा तोंचिवरी ॥ धृ० ॥ मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा । अंतर हें संगा नेदी पुढें ॥ १ ॥ तुका ह्मणे सर्वविशीं हा संपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसें ॥ ३ ॥

॥ ३० ॥ न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ धृ० ॥ मानेल त्या तुह्मी आइका स्वभावें । मी तों माझ्याभावें अनुसरलें ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मीं फिरावें बहुतीं । माझी तों हे गति जाली आतां ॥ ३ ॥

॥ ३१ ॥ न बोलतां तुह्मां कळों न ये गुज । ह्मणउनी लाज सांडियेली ॥ धृ० ॥ आतां तुह्मां पुढें जोडितसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥ २ ॥ तुका ह्मणे आह्मी बैसलों शेजारीं । करील तें हरि पाहों आतां ॥ ३ ॥

हे अभंग सरतात तों असा चमत्कार झाला कीं, पुष्पक नांवाच्या विमानांत बसून ब्रह्मा, विष्णु, महेश्वर प्रभृति सर्व देव, यक्ष, गंधर्व, किन्नर, अप्सरा वगैरे तेथें आल्या. तुकारामाचें शरीर दिव्य व तेजःपुंज म्हणजे केवळ "ब्रह्मरूप" झालें. तुकारामाच्या अनुयायिजनांमध्यें व विमानांतल्या सुरलोकांमध्यें भगवन्नामस्मरणाचा व जयजयकाराचा एकसारखा मोठा घोष चालला होता. त्या दैदीप्यमान विमान वगैरेच्या अद्भुत तेजानें तुकारामाच्या अनुयायिजनांचे नेत्र दिपून झांकून गेले. इतक्यांत देवांनीं तुकारामास सदेह विमानांत बसविलें, आणि विमान चालूं झालें. विष्णूनें तुकारामास आपलें क्षीराब्धींतील निवासस्थान व तेथील सर्व ऐश्वर्य दाखवून मग वैकुंठास जाऊं असें सांगितलें. हें ऐकून सर्व देवांनीं जयजयकार केला. विमानाच्या घंटांच्या नादानें सर्व आकाश भरून गेलें होतें. कांहीं वेळानें पुष्पकाचा प्रकाश गेल्यावर लोकांनीं नेत्र उघडून पाहिलें तों तुकाराम कोठेंच दिसत नाहीं असें पाहून सर्वजन शोकनिमग्न होऊन त्यांनीं व तें वर्तमान कळल्यावर तुकारामाची

पत्नी जिजाबाई इनेंही नाना प्रकारें बहुतच विलाप केला तो ग्रंथीं लिहितां पुरवत नाहीं, असें महीपति म्हणतो. याप्रमाणें तुकाराम गुप्त होण्याची हकीकत शके १५७१ विरोधिनाम संवत्सरीं फाल्गुन वद्य द्वितीयेस सकाळीं चार घटिका दिवसास घडून आली. तुकारामास महादेव व विठोबा या नांवानें दोन मुलगे होते, तेही अतिशय शोक करूं लागले. तुकाराम कदाचित् परत येईल ह्मणून लोक इंद्रायणीच्या तीरीं संध्याकाळपावेतों बसले, नंतर उठून आपआपल्या घरीं चालते झाले. तुकारामाच्या दर्शनार्थ पुष्कळ दुरून यात्रा आली होती, तीही परतून जिकडच्या तिकडे माघारी गेली व देशांत चोहोंकडे पसरली, तेणेंकरून तुकारामाची वर लिहिलेली शेवटील हकीकत सर्व देशांत तावडतोब पसरली. त्याच वेळेस तुकाराम सदेह वैकुंठास गेला हें कितीएकांनीं खरें व कितीएकांनीं खोटें मानिलें. देहू मुकामीं विठोबाचा एक अत्यंत प्रेमळ, निःसीम, व लोकोपदेशक असा बाणेदार भक्त होऊन तो वर लिहिल्याप्रमाणें गुप्त झाला. तुकारामाच्या वंशांत जें डोहांतून निघालेलें पुस्तक आहे व ज्याची त्या कुळांत पूजा करीत असतात त्यांत "तुकोबांनीं तीर्थास प्रयाण केलें"[1] असें साफ लिहिलें आहे. सदेह वैकुंठास गेल्याचें लिहिलें नाहीं. तुकाराम गेल्यानंतर त्याचे निःसीम चवदा भक्त निश्चयानें तेथें बसून राहिले. त्यांत रामेश्वरभट्ट, तुकारामाचा सख्खा बंधु कान्हया, गंगाजीमवाळ कडुसकर, कोंडोबा विप्र लोहकऱ्या, संताजी तेली जगनाड्या, व दुसरे ९ असामी इतके होते. हे एकवेळ आपणास तुकारामाचें दर्शन होईल तरच आपण प्राण राखूं, आशा निश्चयानें बसले. कान्हयानें त्या वेळेस शोकपर असे बहुत अभंग केले.

तुकारामाच्या नेहमींच्या वर्त्तनक्रमांत मित आहार, सर्वदा नामस्मरण, संसाराविषयीं व इतर ऐहिक गोष्टींविषयीं औदासीन्य, परोपकाराविषयीं तत्परता, द्रव्य, मान इत्यादिकांविषयीं निःस्पृहता, निरभिमानपणा, निश्चय, एकांतवासाची आवड, कथेची व भजनाची अतिशय प्रीति, उपदेश करण्याविषयीं सिद्धता, मुख्यत्वें सगुणरूपावर दृढतमभाव, स्पष्टवक्तृत्व या गोष्टी ढळढळीत दिसून येतात. त्याचे परमभक्त असे एकंदर चौदा असामी होते ते कथेंत नेहमी त्याच्या मागें उभे राहून ध्रुवपद धरीत असत.

तुकाराम गुप्त होण्याच्या अगोदर त्यानें कांहीं दिवस असें आरंभिलें होतें कीं, या

---

१ "शके १५७१ विरोधीनां संवछरेः सीमगा वद्य द्वितीयाः वार सोमवारः ते दीवसीं: प्रातःकाळीं: तुकोबानीं: तीर्थास प्रयाण केलें शुभं भवतुः मंगलम्" ॥ ॥ ॥ ॥ ॥

चौदाही असामींतून कोणास न पुसतां एकाएकीं उठून कोठें तरी चालतें व्हावें आणि कोणी विचारल्यास "आह्मी वैकुंठपुरास जातों" असें सांगावें. आणि कोणी कांहीं विचारलें तरी त्यानें अभंगरूप कवितेवांचून उत्तर देऊं नये.

या प्रसंगीं त्या चौदा भक्तांचीं मनें अगदीं उद्विग्न होऊन ते सारखे तीन दिवस तेथें बसले होते. तों चवथ्या दिवशीं ह्मणजे पंचमीच्या दिवशीं सकाळीं तुकारामाच्या हातचा नेहमींचा टाळ व त्याच्या अंगावरील गोदडी हीं दोन्हीं वरून खालीं पडलीं. याखेरीज तुकारामाकडून कांहीं अभंगही लिहून आले ते वाचून सर्व भक्तलोक आनंद पावले. गोदडी व टाळ पाहण्याकरितां दूरदूरचे लोक बहुत आले होते ते तीं पाहून फार समाधान पावले आणि "हेंच तुकारामबावांचें दर्शन" असें ह्मणाले व त्यांस अद्भुत चमत्कार वाटला. कान्हयानें रामेश्वरभट्ट यास विचारिलें कीं, "तुकारामबावांची पुण्यतिथि कोणती धरावी?" रामेश्वरभट्ट म्हणाला कीं, तुकाराम हा क्रियाकर्मविरहित होता आणि त्याच्या देहाचें येथें पतन न होतां तो "तुका श्रीविष्णुलोकाप्रत गेला." तो जरी वैकुंठवासास फाल्गुन वद्य द्वितीयेस गेला तरी टाळ, गोदडी व निरोप हीं फाल्गुन वद्य पंचमीस परत आलीं; यास्तव ती पंचमीच पुण्यतिथि मानून त्या दिवशीं साधुसंत जमवून हरिकीर्तन करावें व ब्राह्मणसंतर्पण करावें. त्याचा देहपातच झाला नाहीं त्यापक्षीं त्याचें क्रियाकर्मांतर वगैरे कांहीं एक करण्यास अधिकार नाहीं. ही रामेश्वरभट्टाची योजना ऐकून सर्व संतमंडळीनें मोठा जयजयकार केला. त्यानंतर त्या पंचमीपासूनच मोठा उत्साह व ब्राह्मणभोजन चालू केलें. पंचमी व षष्ठी या दोन दिवशीं कीर्तनें झालीं आणि सप्तमीस ललित झालें. जिकडे तिकडे आनंद झाला. तुकारामाच्या पुण्यतिथीचा त्या वेळेस जो क्रम जसा चालू झाला तो क्रम तसा आजपर्यंत देहूस चालू आहे.

तुकारामास महादेव व विठोबा हे दोघे पुत्र होते हें पूर्वीं लिहिलेंच आहे. आणि त्याशिवाय तुकारामाची पत्नी जिजाबाई गर्भिणी होती ती पूर्णकाळ गेल्या नंतर प्रसूत होऊन पुत्र झाला त्याचें नांव नारायण असें ठेविलें. हा पुत्र दिसेंमासें मोठा झाला. पुढें राजा शिवाजी त्याच्या दर्शनार्थ येऊन त्यानें त्यास चार गांव इनाम दिले व विठोबाच्या देवळास शिखर बांधिलें. नारायणबावा हाही वयांत आल्यावर मोठा भगवद्भक्त निघाला. त्यास वैराग्य उपजलें त्याकाळीं त्यानें सर्वस्व दान करून बहुत दूरदूरच्या यात्रा केल्या. भागीरथीच्या अकरा कावडी रामेश्वरास नेऊन

घातल्या. त्याच्या पाठांत तुकारामाचे बहुत अभंग असून तो कीर्तन करणारा फार चांगला होता.

तुकाराम गुप्त झाल्यानंतरही त्याच्या कितीएक परम भक्तांस त्याचें साक्षात् किंवा स्वप्नांत दर्शन झालें असें महीपति ह्मणतो. त्यांत त्याची येलवाडी येथील कन्या, एक संन्यासी, बहिणाबाई नांवाची एक ब्राह्मणी, सुदुंबऱ्यास राहणारा एक लिंगायत वाणी, निळोबा गोसावी पिंपळनेरकर यांस अशीं दर्शनें झाल्याचें महीपतीनें लिहिलें आहे.

## रामेश्वरभट्टकृत तुकाराम स्तुति.

॥ १ ॥ भक्त भागवत जीवन्मुक्त संत । महिमा अत्यद्भुत चराचरीं । ऐसिया अनंतामाजी तूं अनंत । लीला वेश होत जगत्राता ॥ १ ॥ ब्रह्मानंद तुकें तुळे आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥ धृ० ॥ शास्त्रा श्रेष्ठाचार अविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली । देऊनि तिळांजुळी काम्य निषिद्धांसी । विधिविणे योगेशी ब्रह्मार्पण ॥ २ ॥ संत ग्रहमेळीं जगधंद्या गिळी । पैल उदयाचळीं भानु तुका । संत वृंदें तीर्थ गौतमी हरिकथा । तुकया नर सिंहस्ता भेटों आली ॥ ३ ॥ शांति पतिव्रते जाले परि नयन । काम संतर्पण निष्कामता । क्षमा क्षमापणें प्रसिद्ध प्रथा जगीं । तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमंत ॥ ४ ॥ दया दिनानाथा तुवां जीवविली । विश्वीं विस्तारली कीर्ति तुझी । वेदवाक्यबाहु उभारिला ध्वज । पूजिले देव द्विज सर्वभूतें ॥ ५ ॥ अधर्म क्षयव्याधि धर्माशीं स्पर्शला । तो त्वां उपचारिला अनन्यभक्तीं । ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली । वाक्यें सफळ केलीं वेदविहितें ॥ ६ ॥ देहबुद्धि जाल्या अभिमानें वंचलों । तो मी उपेक्षिलों न पाहिजे । न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार । मागे रामेश्वर रामचंद्र ॥ ७ ॥

॥ २ ॥ पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची । शास्त्रही पुराणें गीता नित्य नेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥ १ ॥ कर्म अभिमानें वर्ण अभिमानें । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥ धृ० ॥ तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे । अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥ २ ॥ चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां । उत्तम मध्यम कनिष्ट वेगळे । करुनी निराळे ठेविले ते ॥ ३ ॥ भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला । जप तप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तनें करूनियां ॥ ४ ॥ मागें कवीश्वर जाले थोर थोर । नेलें कलिवर कोणें सांगा । ह्मणे रामेश्वर सकळां पुसोनी । गेला तो विमानीं बैसोनियां ॥ ५ ॥

॥ ३ ॥ माझी मज आली रोकडी प्रचित । होऊनि फजित दुःख पावें ॥ धृ० ॥ कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत जाली ॥ १ ॥ ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥ २ ॥ तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आह्मां थोर ।

कां जे अवतार नामयाचा ॥ ३ ॥ त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । ह्मणोनि हे बाधा घडली तुज ॥ ४ ॥ आतां एक करीं सांगेन तें तुला। शरण जाईं त्याला निश्चयेंशीं ॥ ५ ॥ दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार। होय तो विचार सांगितला ॥ ६ ॥ तोचि हा विश्वास धरूनि मानसीं। जाय कीर्त्तनासी नित्य काळ ॥ ७ ॥ ह्मणे रामेश्वर त्याच्या समागमें। जालें हें आराम देह माझें ॥ ८ ॥

॥ ४ ॥ वैष्णवांची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥ धृ० ॥ ऐशी वेद श्रुति बोलती पुराणें । नाहीं तें दूषण हरिभक्ता ॥ १ ॥ उंच निंच वर्ण न ह्मणावा कोणी। जें कां नारायणीं प्रिय जालें ॥ २ ॥ चहूं वर्णासी हा असे अधिकार। करितां नमस्कार दोष नाहीं ॥ ३ ॥ जैसा शालिग्राम न ह्मणावा पाषाण। होय पूज्यमान सर्वत्रासी ॥ ४ ॥ गुरु परब्रह्म देवाचा तो देव । त्यासी तो मानव ह्मणूं नये ॥ ५ ॥ ह्मणे रामेश्वर नामीं जे रंगले। स्वयेंचि ते जालें देवरूप ॥ ६ ॥

---